॥ श्री ॥



# कौटिलीय-अर्थशास्त्र

( पूर्वार्ध, मूळ संस्कृत व संपूर्ण मराठी भाषांतर )

लेखकः—१ रा. रा. जनार्दन सखाराम करंदीकर;

दुय्यम संपादक "केसरी" पुणें.

२ रा. रा. बळवंत रामचंद्र हिवरगांवकर;

नगर.

प्रकाशकः—गजानन रघुनाथ मुळे,

करजत, जि. कुलाबा.

सन १९२७.

किंमत ३ रुपये.



# आत्मनिवेदन.

१९११ सालीं प्रथम कौटिल्याचें अर्थशास्त्र शामशास्त्री यांनीं छापलेलें माझ्या पाहण्यांत आलें व त्यावेळेपासून त्या ग्रंथाचें मराठींत रूपांतर करावें अशी इच्छा उद्भवली. तथापि विविध व्यवसायांमुळें भाषांतर करण्यास लागणाऱ्या स्वस्थतेचा अभाव आणि ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याच्या साधनांचाहि अभाव अशा या दुहेरी कारणांमुळें भाषांतराची इच्छा तशीच मनांत राहून गेली. पुढें १९१९ सालीं कर्जतचे श्रीयुत गजानन रघुनाथ मुळे यांनीं कौटिलीय अर्थशास्त्राचें भाषांतर करवून तें छापविण्याची उमेद मनांत धरून भाषांतराचें काम तुह्मीं आपल्या अंगावर घेतां काय अशी मजला पृच्छा केली. अशा रीतीनें छपाईची जबाबदारी स्वतःवर न पडतां मराठी भाषांतर करण्याची संधी मिळत आहे हें पाहून श्रीयुत मुळे यांना मी संमति कळविली. व्यवसायबाहुल्याची अडचण कायमच असल्यानें भाषांतराचें हें कार्य आपल्या हातून कसें काय पार पडेल याची शंका मनांतून वाटतच होती, परंतु त्या वेळच्या कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें भाषांतराचें हें काम हातचें जाऊं देऊं नये असें वाटून भाषांतर करण्याचा निश्चय कायम केला.

याप्रमाणें भाषांतर करण्याचें ठरून मूळ ग्रंथ वाचण्यास प्रारंभ होतो न होतो तोंच राजकीय वातावरणांत अनेक घडामोडी होऊन त्यांतूनच पुणें जिल्ह्यांतल्या मुळशी सत्याग्रहाचें प्रकरण उद्भवलें व त्या प्रकरणांत १९२१ व १९२२ हीं दोन वर्षें समग्र खर्ची झालीं आणि त्याचाच परिणाम म्हणून १९२३ साल माझ्या आजारांत गेलें. मुळशी सत्याग्रहाचें प्रकरण प्रथम उद्भवलें त्यावेळींच हें भाषांतराचें काम दिरंगाईवर पडणार असें कळून चुकल्यामुळें तें कार्य दुसऱ्या कोणातरी लायक इसमाकडे सोंपवावें असा विचार मनांत येऊन प्रथम रा. दत्तोपंत आपटे यांना विचारून पाहिलें; त्यांच्याकडून नकार आल्यावर रा शंकर रामचंद्र बेडेकर यांनाहि आग्रह करून पाहिला; पण त्यांच्याकडूनहि रुकार मिळेना. अशा परिस्थितींत नगरचे रा. रा. बळवंत रामचंद्र हिंवरगांवकर यांनीं आपण होऊनच हें भाषांतराचें काम हौसेनें आपल्याकडे मागून घेतलें. आणि त्यांची ती उत्सुकता लक्षांत घेऊन हें काम त्यांच्याकडे सोंपविण्यांत आलें. भाषांतराचें कच्चें काम हिंवरगांवकर यांनीं करावें आणि तें तपासून पाहून व जरूर तेथें फेरबदल करून पक्कें भाषांतर मीं तयार करावें असा आह्मां उभयतांचा संकेत ठरला. व त्याप्रमाणें रा. हिंवरगांवकर यांच्याकडून भाषांतर तयार होऊं लागलें.

रा. हिंवरगांवकर यांनीं ज्यावेळा भाषांतरास प्रारंभ केला त्यावेळीं गणपतिशास्त्री यांच्या टीकेचें समग्र पुस्तक प्रसिद्ध झालें नव्हतें. हिंदी भाषांतराचें पुस्तकहि त्यावेळीं हातीं आलें नव्हतें. यामुळें रा. हिंवरगांवकर यांना केवळ शामशास्त्री यांच्याच भाषांतराच्या आधारानें मराठींत रूपांतर करावें लागलें. शामशास्त्री यांनीं स्वीकारलेले पाठभेद अनेकस्थलीं चुकलेले आढळतात; आणि त्यांचें भाषांतर तर अनेक ठिकाणीं चुकांनीं भरलेलें आहे. या कारणामुळें हिंवरगांवकर यांनीं केलेल्या भाषांतरांत भागाहून मिळालेल्या साधनांच्या आधारें पुष्कळच दुरुस्ती करावी लागली. आणि भाषांतर तपासण्याच्या कामाला जवळजवळ मूळभाषांतरा इतकाच वेळ लागूं लागला. अर्थातच इतर सर्व कामें संभाळून राहिलेल्या फुरसतींत हें काम संपविण्यास दोन वर्षें लागलीं. अशारीतीनें हें भाषांतराचें काम दिरंगाईवर पडत चाललें. आणि अद्यापिहि तें कार्य शेवटास गेलें नसून मूळग्रंथाचा अर्धाच भाग म्हणजे पहिलीं चारच अधिकरणें प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. भाषांतर तयार होऊन व छापण्यास प्रारंभ झाल्यानंतर मुंबई विश्वविद्यापीठानें बी. ए. च्या अभ्यासक्रमांत या पुस्तकाचा समावेश केल्याचें कळलें; त्यावरून भाषांतराबरोबर मूळसंस्कृत भागहि देण्याची जरूरी वाटून मूळसंस्कृतहि छापण्यास सुरुवात करण्यांत आली. यामुळें ग्रंथ विद्यार्थ्यांच्या हातीं लवकर

पडावा म्हणून अर्धाच भाग म्हणजे पहिलीं चार अधिकरणें मूळ व भाषांतर यांसह छापविण्यांत आलीं व तीं वाचकांच्या हातीं आतां देण्यांत येत आहेत. राहिलेला उत्तरार्धहि यापुढें लवकरच मुळासह छापून काढण्यांत येईल.

मूळभाषांतराचें काम रा. हिंवरगांवकर यांनीं आपखुषीनें स्वतःकडे घेतलें ह्मणूनच या ग्रंथाचा पूर्वार्ध वाचकांच्या हातीं आतां पडत आहे व त्याचें श्रेय हिंवरगांवकर यांजकडेच आहे. आणि उत्तरार्धाचेंहि त्यांचें भाषांतर तयार आहे. भाषांतराचें मूळ काम जरी हिंवरगांवकर यांच्या हातचें असलें तरी त्या भाषांतरांत मागाहून जरूरीप्रमाणें अनेक ठिकाणीं फेरफार करण्यांत आले आहेत. त्यामुळें आतां प्रसिद्ध होत असलेल्या या भाषांतराची जबाबदारी मुख्यतः मजवरच आहे ह्मणून टीकाकारांनीं ह्यांतील दोषांबद्दल हिंवरगांवकर यांना जबाबदार धरूं नये.

हिंवरगांवकर यांनीं तयार केलेलें भाषांतर तपासण्याच्या कामांत मला चि. **अनंत** उर्फ **बाबू** याचें अतिशयच साहाय्य झालें हें कळविण्यास आनंद व अभिमान वाटतो. किंबहुना त्याच्या सहाय्याशिवाय हें कार्य एवढ्या कालावधीनें तरी पूर्ण झालें असतें कीं नाहीं याची शंकाच आहे. या अर्थशास्त्राचें जर्मन भाषेंत जें भाषांतर झालें आहे तें पाहून आणि विशेषतः जर्मनभाषांतरकारची विस्तृत प्रस्तावना वाचून त्यावरूनहि त्यानें वेळोवेळीं अनेक सूचना केल्या आहेत.

अशा रीतीनें कौटिलीय अर्थशास्त्राच्या मराठी भाषांतराचा हा पूर्वार्ध आज वाचकांना सादर करण्यांत येत आहे. ग्रंथाची भाषा सूत्रमय असून त्या ग्रंथांत प्रस्तुत कालांत अपरिचित असे अनेक शब्द व विषय आले असल्यामुळें ग्रंथकाराचा अभिप्राय निश्चित ठरविणें अवघड झालें आहे. वास्तव कोणतेंहि भाषांतर निर्दोष किंवा स्वतःच्या मनापुरतेंहि समाधानकारक वाटत नाहीं. तथापि मिळालेल्या सर्व साधनांचा यथाशक्ति उपयोग करून त्यांतून तारतम्यानें ग्राह्याग्राह्य ठरवून प्रस्तुतचें भाषांतर तयार केलें आहे. हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्यापूर्वीं दोघांतिघां तज्ज्ञ स्नेह्यांना तें दाखविण्यांत आलें होतें; परंतु वरवर मूळ ग्रंथ चाळून पाहिल्यानें किंवा भाषांतर वाचून पाहिल्यानें मुळांतील सगळीं दुर्बोध स्थळें एकदम लक्षांत येणें शक्य नाहीं. म्हणून त्या स्नेह्यांचा सल्लाहि फारसा उपयोगी पडूं शकला नाहीं. पण आतां पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर आणि विशेषतः बी. ए. च्या वर्गांतील अध्यापनाचे वेळीं भाषांतराची चिकित्सा होईलच. तशी चिकित्सा करून कोणी कांहीं उपयुक्त सूचना केल्यास त्यांचा उत्तरार्धाच्या प्रकाशनाचे वेळीं अवश्य विचार करण्यांत येईल.

पुणें सदाशिव पेठ ५१०<br>मिति ज्येष्ठ कृ. १०।१८४९ } **ज. स. करंदीकर.**






# प्रस्तावना.

कौटिलीय अर्थशास्त्राची हस्तलिखित प्रत, म्हैसूरच्या पौर्वात्य ग्रंथालयाचे अधिकारी शामशास्त्री यांना प्रथम १९०९ साली उपलब्ध झाली व त्यांनीं ती म्हैसूरसरकारच्या ग्रंथमालेंत त्याच वर्षी छापून प्रसिद्ध केली. ही प्रत प्रसिद्ध होईपर्यंत कौटिलीय अर्थ-शास्त्राची प्रत्यक्ष माहिती आधुनिक विद्वानांना नव्हती. शामशास्त्री यांचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्रिवेंद्रम येथील महामहोपाध्याय गणपतिशास्त्री यांनीं शामशास्त्र्यांची प्रत अत्यंत अशुद्ध असल्याचें पाहून, दुसरी प्रत मिळविण्याचा प्रयत्न सुरू केला. सुदैवानें त्रावण-कोर संस्थानांत कोदायम नजीक थिरुप्पारपु येथील स्वामींच्या मठांत मल्याळी लिपींत ताडपत्रावर लिहिलेल्या दोन प्रती त्यांस मिळाल्या. त्यांतली एक प्रत तीनचारशें वर्षांची जुनी असून अगदीं जीर्ण झालेली होती. दुसरी प्रत शंभर वर्षांपूर्वीची असून चांगल्या स्थितींत आढळली. मद्रास सरकारच्या पौर्वात्य हस्तलिखितांच्या संग्रहालयांतहि दोन प्रती आढळल्या. त्यांतील एक मल्ल्याळी लिपींत असून, दुसरी तेलगू लिपींत आहे व ती अपूर्ण आहे. पांचवी एक प्रत कोचिन संस्थानांत तेथील हस्तलिखितांच्या संग्रहांत होती; पण ती थिरुप्पारपु येथील प्रतीहूनहि अधिक जीर्ण झालेली होती.

याप्रमाणें अर्थशास्त्राच्या मूळग्रंथाच्या प्रती हस्तगत करून घेतल्यानंतर गणपतिशास्त्री यांनीं अर्थशास्त्रावरील प्राचीन टीकांचा शोध चालविला. त्यावेळीं त्यांना मद्रासच्या संग्रहालयांत भट्टस्वामींची प्रतिपदपंचिका नांवाची टीका आढळली. पण ती दुसऱ्या अधि-करणाच्या आठव्या अध्यायापासून त्या अधिकरणाच्या अखेरपर्यंतच होती. माधवयज्वन् यांची नयचंद्रिका नांवाची दुसरी एक टीका मिळाली, तींत सातव्या अधिकरणांतील सातव्या अध्यायापासून तो १२ व्या अधिकरणांतील ४ थ्या अधिकरणापर्यंतच भाग होता. यांतलींहि कित्येक पानें गळवटलीं होतीं व लेखनहि अतिशय अशुद्ध असल्याचें दिसून आलें. या खेरीज भट्टस्वामींच्या टीकेवरून मल्याळम भाषेंत केलेल्या भाषांतराची एक हस्तलिखित प्रत त्रावणकोरला व दुसरी मद्रासला सांपडली. यांतील भाषांतर सात अधिकरणांपर्यंतच होतें. व त्यांतहि ओळीनें कित्येक अध्याय गळलेले दिसले. मूळग्रंथ व त्यावरील टीका यांच्या एवढ्या अपुऱ्या सामुग्रीवर गणपतिशास्त्री यांनीं स्वतः संस्कृतांत श्रीमूलम् नांवाची टीका लिहिली व ती मूळग्रंथासह छापून काढली.

ही टीका लिहिण्याचें काम चालू असतां लाहोर येथें डॉ. जॉली यांनीं प्रसिद्ध केलेली एक प्रत गणपति शास्त्री यांच्या हातीं आली. तिचाहि त्यांनीं उपयोग केला असून टीकेच्या शेवटच्या भागांत म्हैसूर प्रत, लाहोर प्रत, आणि स्वतः गणपति शास्त्री यांची त्रिवेंद्रम् प्रत यांतील पाठभेद तुलनात्मक पद्धतीनें शेवटीं दिले आहेत. या तिन्ही प्रतींत शामशास्त्री यांची म्हैसूरची प्रत अतिशय अशुद्ध असून लाहोरची प्रतहि बहुतांशीं तिचेंच भावंड आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. गणपति शास्त्री यांची त्रिवेंद्रम् येथील प्रत बरीच शुद्ध असून, तिचाच उपयोग प्रस्तुतच्या पुस्तकांतील मूळग्रंथ छापण्यांत केला आहे. आणि भाषांतरहि बहुतेक ठिकाणीं गण-पति शास्त्री यांच्या पाठांच्या आधारेंच केलेलें आहे.

## कौटिल्य का कौटल्य ?

अर्थशास्त्राचा कर्ता आर्य चाणक्य, हा विष्णुगुप्त आणि कौटल्य या नांवानेंहि प्रसिद्ध आहे. विष्णुगुप्त हें त्याचें बालपणचें खरें नामकरण असावें. कामंदकीय नीतिसार हा ग्रंथ आर्यचाणक्याच्या अर्थशास्त्राचीच छोटी आवृत्ति आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या कामंदकीय नीतिसार–ग्रंथांत प्रारंभींच अर्थशास्त्राचा प्रणेता जो विष्णुगुप्त त्यास विष्णुगुप्त या नांवानेंच नमन आहे, तें असें:—

> वंशेविशालवंश्यानामृषीणामिव भूयसां ।
> अप्रतिग्राहकाणां यो बभूव भुवि विश्रुतः ॥ १ ॥
> जातवेदा इवार्चिष्मान् वेदान् वेदविदांवरः ।
> योऽधीतवान् सुचतुरश्चतुरोऽप्येकवेदवत् ॥ २ ॥

यस्याभिचारवज्रेण वज्रज्वलनतेजसः ।
पपात मूलतः श्रीमान् सुपर्वा नंदपर्वतः ॥ ३ ॥
एकाकीमंत्रशक्त्या यः शक्त्याशक्तिधरोपमः ।
आजहार नृचंद्राय चंद्रगुप्ताय मेदिनीम् ॥ ४ ॥
नीतिशास्त्रामृतं धीमान् अर्थशास्त्रमहोदधेः ।
समुद्दध्रे नमस्तस्मै विष्णुगुप्ताय वेधसे ॥ ५ ॥

या उल्लेखावरून कामंदकाच्या वेळींतरी हें अर्थशास्त्र विष्णुगुप्तानें रचिलें आहे आणि तो विष्णुगुप्त म्हणजे नंदांचा निःपात करून, चंद्रगुप्ताला राज्य देणारा आर्यचाणक्यच होय याविषयीं संशय नव्हता. त्याचेंच दुसरें नांव चाणक्य हें असून तें चणक नामक गांवावरून किंवा प्रातांवरून पडलें असावें.

तिसरें नांव कौटिल्य नसून तें कौटल्य असें असण्याचा संभव आहे. कौटिल्य हें नांव मुद्राराक्षस नाटकाचा कर्ता विशाखदत्त यानें रूढ केलें आहे.

कौटिल्यः कुटिलमतिः स एष येन ।
क्रोधाग्नौ प्रसभमदाहि नंदवंशः ॥

ज्यानें नंद वंशाचा इतक्या गुप्तपणें घोरतऱ्हेनें निःपात केला त्याची बुद्धि कुटिल या विशेषणाला साजेशीच असली पाहिजे, या समजुतीनें विशाखदत्तानें त्यास कुटिल मति बनविलें आहे. आणि या कुटिल शब्दावरूनच पुढें आर्यचाणक्यास कौटिल्य असें नांव पडणें हें स्वाभाविकच आहे. पण मूळारंभांत कौटिल्य हें नांन आपण होऊन कोणी धारण करण्याचा संभव क्वचितच आढळतो. आणि चाणक्यानें अर्थशास्त्रांत जागोजागीं स्वमतप्रतिपादनार्थ 'नेति कौटल्यः' या शब्दांनीं सिद्धांत पक्ष मांडला आहे. तेव्हां स्वतः आर्यचाणक्यतरी कौटिल्य हा शब्द आपल्या ग्रंथांत उपयोगांत आणणार नाहीं. शिवाय कौटल्य शब्दाची व्युत्पत्ति पाहिली असतां तीवरूनहि कौटल्य असाच शब्द सिद्ध होतो. केशवस्वामीनें आपल्या नानार्थार्णवसंक्षेप नामक ग्रंथांत कुटल शब्दाचे अर्थ पुढील प्रमाणें दिले आहेतः—

अथस्यात् कुटलो गोत्रकृत्यृषौ पुंसि नपू पुनः ।
विद्यादाभरणेऽथ त्रिः कुटिलं कुंचिते भवेत् ॥

या श्लोकावरून कुटल नांवाचें गोत्र पूर्वी प्रसिद्ध होतें. व त्यावरून कौटल्यः हा शब्द सिद्ध होतो अशी खात्री पटते.

कौटल्य याची आणखी एक उपपत्ति कामन्दकीय नीतिसाराच्या टीकेंत दिली आहे. ती अशी—"कुटो घटः तं धान्य-[illegible] लान्ति नाम गृण्हन्ति ते कुटलाः कुंभीधान्याः । अत एव तेषां कुटलानां अपत्यं पुमान् कौटल्यः ।" पण असे कुंभी धान्य [illegible]ाहक लोक त्या काळीं अनेक असूं शकतील. तेव्हां या अर्थानें आर्य चाणक्यासच कौटल्य नांव कां लावावें हें सांगतां येत नाहीं. [illegible]ी व्युत्पत्ति काल्पनिक दिसते.

परंतु शामशास्त्री यांस जी अर्थशास्त्राची मूळ प्रत सांपडली तींत सर्वत्र कौटिल्य असाच पाठ असल्यानें व तोच पाठ अद्याप पावेतों रूढ असल्यानें पूर्वपरंपरेला अनुसरून कौटिल्य असाच शब्द या ग्रंथांतहि सर्वत्र योजण्यांत आला आहे.

## अर्थशास्त्र कोणीं लिहिलें ?

प्रस्तुत कौटिलीय अर्थशास्त्राचा जो ग्रंथ उपलब्ध झाला आहे त्यांत पहिल्याच अध्यायाचे शेवटीं

सुखग्रहणविज्ञेयं तत्त्वार्थपदनिश्चितम् ।
कौटिल्येन कृतं शास्त्रं विमुक्तग्रंथविस्तरम् ॥ १ ॥

असा श्लोक आहे. यांत हा अर्थशास्त्राचा ग्रंथ कौटिल्यानें रचिला असें स्पष्ट सांगितलें आहे. दुसऱ्या अधिकरणाच्या दहाव्या अध्यायाचे शेवटीं श्लोक आहे तो असाः—

सर्वशास्त्राण्यनुक्रम्य प्रयोगानुपलभ्यच ।
कौटल्येन नरेंद्रार्थे शासनस्य विधिःकृतः ॥

या श्लोकांतहि कौटिल्यानें अर्थशास्त्र लिहिलें आणि तें नरेंद्राच्या उपयोगासाठीं लिहिलें असें स्पष्ट सांगितलें आहे. अर्थशास्त्राच्या शेवटच्या प्रकरणाच्या समाप्तीस पुढील दोन श्लोक आहेतः—

येनशस्त्रंच शास्त्रंच नंदराजगताच भूः ।
अमर्षेणोद्धृतान्याशु तेनशास्त्रमिदंकृतम् ॥
दृष्ट्वाविप्रतिपत्यं बहुधाशास्त्रेषुभाष्यकाराणाम् ।
स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रंच भाष्यंच ॥

या श्लोकांत कौटिल्याचें नांव नसून विष्णुगुप्तानें हा ग्रंथ केला असें म्हटलें आहे. तरीपण त्यांत नंदराजांच्या स्वाधीन असलेली भूमि विष्णुगुप्तानें क्रोधानें हिसकावून घेतली असें म्हटलें आहे. त्यावरून विष्णुगुप्त व कौटिल्य हे एकच असावेत आणि कौटिल्यानेंच हा ग्रंथ रचिला असावा असें सिद्ध होतें.

कौटिल्याचीं विष्णुगुप्त व चाणक्य हीं दोन नांवें प्रसिद्धच आहेत. याखेरीज त्याचें तिसरें कोणतेंहि नांव आढळत नाहीं. तथापि हेमचंद्ररचित अभिधानचिंतामणी आणि यादवप्रकाशकृत वैजयंती या ग्रंथांच्या आधारानें प्रो. कीथ् यानें वात्स्यायन, मल्लनाग, द्रामिल इत्यादि नांवें दिलीं असून कामसूत्रांचा कर्ता वात्स्यायन हाच अर्थशास्त्राचा कर्ता कौटिल्य होय असें म्हटलें आहे ! वात्स्यायनाचा काल खिस्तीशक २०० च्या सुमारास येतो. कारण त्याच्या ग्रंथांत शातवाहन कुलांतील शातकरणीचा उल्लेख असून या शातवाहनवंशीय शातकरणीचा अंमल इ. स. १३७ ते २०९ पर्यंत होता. आर्यचाणक्य हा जर मौर्यचंद्रगुप्त कालीन असल्याचें सुप्रसिद्ध आहे तर वात्स्यायन व आर्यचाणक्य हे एकच कसे होऊं शकतील ?

शिवाय वात्स्यायनानें आपल्या स्वतःच्या न्यायसूत्र भाष्यांत अर्थशास्त्रांतील कांहीं वचनें जशींच्या तशींच उद्धृत केलीं असून तीं वचनें स्वतःच्या अन्य ग्रंथांतून घेतलीं आहेत असें तो म्हणत नाहीं. न्यायसूत्राच्या भाष्यांत प्रारंभींच " प्रदीपः सर्व विद्यानो उपायः सर्व कर्मणाम् । आश्रयः सर्वधर्माणां विद्योद्देशे प्रकीर्तिता ॥ " हें वचन दिलें आहे. त्याचप्रमाणें ' परमतमप्रतिषिद्धमनुमतमितिहि तंत्रयुक्तिः ' आणि ' पदसमूहो वाक्यमर्थपरिसमाप्तौ ' हीं अर्थशास्त्रांतील वचनेंही वात्स्यायनानें घेतलीं असून तीं स्वतःच्या ग्रंथांतलीं आहेत असें दर्शविलेलें नाहीं. एके ठिकाणीं तर " अन्ये च बहवो दृश्यन्ते कामवशगा विनष्टाः " असें वाक्य लिहून, त्यापुढें ' इत्यर्थचिंतकाः ' या पदानें वरील विधान अर्थशास्त्रांतलें आहे व त्याचा कर्ता वेगळा आहे असें स्पष्टच दर्शविलें आहे.

अर्थशास्त्रांतील पारिभाषिक शब्द आणि कित्येक सूत्ररूप वाक्यें वात्स्यायनानें अर्थशास्त्रांतून जशींच्या तशींच घेतलीं आहेत. असल्या अनुकरणाचीं वाटेल तितकीं उदाहरणें देतां येतील. गवाध्यक्ष, सूत्राध्यक्ष, पण्याध्यक्ष, या प्रकरणांतील पारिभाषिक शब्द वात्स्यायनानें आपल्या ग्रंथांत जसेच्या तसे योजिले आहेत.

परंतु कौटिल्याला पाणिनीच्या व्याकरणाचा परिचय नव्हता म्हणून कौटिल्य हा पाणिनीच्या पूर्वीचा आहे आणि वात्स्यायन हा स्वतःच्या ग्रंथांत पाणिनीय परिभाषेचा उपयोग करितो त्यावरून वात्स्यायन मात्र पाणिनीच्या नंतरचा आहे आणि अशा दीर्घकालभेदामुळें कौटिल्य व वात्स्यायन हे एक होऊं शकत नाहींत असें जें शामशास्त्र्यांचें तर्कट आहे तें चुकीचें आहे. वात्स्यायन हा पाणिनीनंतरचा याविषयीं शंकाच नाहीं. पण कौटिल्यहि पाणिनीच्या आधींचा नसून तोहि पाणिनीच्या मागाहूनचाच आहे. अर्थातच शामशास्त्री यांचा हा मुद्दा लंगडा पडतो. तरी पण वात्स्यायन आणि कौटिल्य एक नव्हत हें इतर प्रमाणांनींहि सिद्धच आहे. वात्स्यायनाच्या कामसूत्राचा टीकाकार यशोधर यानें ' वात्स्यायन इति स्वगोत्र निमित्ता समाख्या मल्लनाग इति सांस्कारिकी ' असें म्हणून वात्स्यायनाच्या मल्लनाथ या नांवाचा निर्देश केला आहे. कौटिल्य हें त्याचेंच आणखी एक नांव असतें तर मल्लनाग नांवाबरोबरच त्या नांवाचाहि उल्लेख जरूर झाला असता.

वराहमिहिराच्या बृहज्जातक ग्रंथावरील भट्टोत्पलाच्या टीकेंत विष्णुगुप्ताचा उल्लेख अनेकवेळां आलेला आहे; तथापि ज्योतिःशास्त्रकार विष्णुगुप्त हा अर्थशास्त्रकार विष्णुगुप्ताहून वेगळा असावा असें त्या उल्लेखावरूनच अनुमान निघतें. कारण अर्थशास्त्राचा कर्ता विष्णुगुप्त हा ज्योतिःशास्त्रज्ञ नव्हता आणि त्यावेळीं ज्योतिःशास्त्राची एवढी प्रगतीहि झालेली नव्हती.

अर्थशास्त्राचा कर्ता चाणक्य आहे याविषयीं स्पष्ट उल्लेख पंचतंत्रांत आढळतो. त्यांत " ततोधर्मशास्त्राणि मन्वादीन्यर्थशास्त्राणि, चाणक्यादीनि कामशास्त्राणि वात्स्यायनादीनि " असें वाक्य प्रारंभींच असून त्यांत मन्वादि स्मृतिकार, चाणक्यादि अर्थशास्त्रकार व वात्स्यायनादि कामशास्त्रकार हे सर्व वेगवेगळे असल्याचें स्पष्ट दर्शविलें आहे. नंदिसूत्रनामक जैन ग्रंथांत चाणक्य हा एक प्रसिद्ध मुत्सद्दी होता आणि त्याचें कौटिलीय नांवाचें कपटनीतिशास्त्र आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. यांत अर्थशास्त्र हा शब्द नसला तरी कौटिल्याची कपटनीति म्हणजे अर्थशास्त्राचा ग्रंथच होय या विषयीं संशय नाहीं.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतील अनेक वाक्यें दंडिकवीनें आपल्या दशकुमार चरित्रांत प्रसंगानुरोधानें योजिलीं आहेत. आणि बाणकवीनें आपल्या कादंबरी ग्रंथांत कौटिल्याच्या अर्थशास्त्राला नृशंस, निर्घृण, क्रूर अशीं विशेषणें जोडून त्या शास्त्राचा तिरस्कार दर्शविला असला तरी त्यांतील कौटिल्य शब्दाच्या उल्लेखावरून हल्लींचा अर्थशास्त्राचा ग्रंथ कौटिल्यकृत आहे हें बाणभट्टास अवगत असल्याचें सिद्ध होतें. अर्थातच आर्यचाणक्य, विष्णुगुप्त आणि कौटिल्य या तीनहि नांवांनीं प्रसिद्ध असलेली व्यक्ती एकच असून, तिनें रचलेला अर्थशास्त्रावरील ग्रंथ त्यावेळीं सर्वत्रांस परिचित होता. एवढेंच नव्हे तर राजपुत्रांना तो ग्रंथ पढवीत असत असेंहि त्यावरून अनुमान निघतें.

यशोधर राजाचा समकालीन सोमदेवसूरि यानें नीतिवाक्यामृत नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. तो कौटिलीय अर्थशास्त्र व कामंदकीय नीतिसार यांच्या आधारेंच रचलेला असावा. कालिदासाच्या काव्यावरील प्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथसूरि यानेंहि रघुवंशाच्या टीकेंत कौटिलीय अर्थशास्त्रांतील कित्येक वाक्यें आधारभूत प्रमाण म्हणून दिलीं आहेत. पण मल्लिनाथ हा टीकाकार त्या मानानें अगदीं अलीकडील असून त्यानें कौटिल्याच्या कोणत्याच नांवाचा उल्लेख केलेला नसल्यामुळें मल्लिनाथकृत उल्लेख स्वतंत्र प्रमाण म्हणून उपयोगी पडूं शकत नाहीं; तथापि वात्स्यायनापासून दंडिकवीपर्यंत अनेक ग्रंथकारांनीं आर्यचाणक्य किंवा विष्णुगुप्त अथवा कौटिल्य या तिहींतून कोणत्या तरी एका नांवाचा अर्थशास्त्र ग्रंथाशीं संबंध जोडला असल्यानें कौटिलीय अर्थशास्त्राचें कर्तृत्व व प्राचीनत्व सिद्ध होतें.

---




# ग्रंथ परिचय.

## अधिकरण पहिलें.

कौटिल्यानें अर्थशास्त्राचा ग्रंथ लिहितांना पूर्वीच्या आचार्यांनीं त्याच शास्त्रावर लिहिलेल्या ग्रंथांचा उपयोग करून हा ग्रंथ लिहिल्याचें स्वतःच सांगितलें आहे. हे पूर्वींचे ग्रंथ सध्या उपलब्ध नसल्यानें त्यांचा कौटिल्याला कितपत उपयोग झाला हें समजण्याला साधन नाहीं. पूर्वाचार्यांशीं जेथें मतभेद झाला तेथें कौटिल्यानें त्यांचीं मतें देऊन त्यांचें खंडण केलेंच आहे. पण तेवढ्यावरून पूर्वीच्या ग्रंथांची व्याप्ति लक्षांत येत नाहीं. चाणक्याच्यापूर्वी जरी या विषयावर अनेक ग्रंथ असले तरी ते कौटिलीय अर्थशास्त्राइतके व्यापक असतील असें वाटत नाहीं. कौटिल्यानें ग्रंथारंभीं कोणत्याहि देवतेला नमन न करितां देवांचे गुरु बृहस्पती आणि असुरांचे गुरु शुक्राचार्य या उभयतांनाच वंदन केलें आहे. त्यावरून चाणक्याला औशनस नीति व बार्हस्पत्य नीति यांचा अर्थशास्त्र रचण्याच्या कामीं पुष्कळ उपयोग झाला असावा असें मानण्यास आधार आहे.

पहिल्या अध्यायांतील अनुक्रमणिकेनंतर दुसऱ्या अध्यायापासून कौटिल्यानें ग्रंथास प्रारंभ केला आहे. आणि प्रारंभींच विद्या किती व त्यांचा उपयोग काय हें सांगितलें आहे. शुक्र, बृहस्पति व मनु हे अनुक्रमें एक, दोन व तीन विद्या मानीत असतां कौटिल्यानें विद्या चार मानल्या यांतच त्याच्या बुद्धीचें व्यापकत्व व्यक्त होतें. आन्वीक्षिकी म्हणजे तर्कशास्त्र, ही विद्या कोणीहि स्वतंत्र मानली नव्हती. पण कोणत्याहि विद्येला तर्कशास्त्राचाच मुख्य आधार असल्यानें कौटिल्यानें आन्वीक्षिकी विद्या सर्व विद्यांचा प्रदीप आणि सर्व धर्मांचा आश्रय, असें म्हटलें आहे. विद्या शिकण्यासाठीं ब्रह्मचाऱ्यानें गुरुगृहीं सोळा वर्षेपर्यंत ब्रह्मचर्य पाळावें असें कौटिल्यानें सांगितलें आहे. उपनयन झाल्यापासून हीं १६ वर्षें मोजावयाची हें उघड आहे. पण कित्येक टीकाकारांनीं जन्मापासून १६ वर्षें असा अर्थ करून त्यावरून कौटिल्याच्या वेळेस बालविवाहाचा प्रघात सुरूं होऊं लागला अशी त्यावर टीका केली आहे, ती चुकीची आहे.

आपल्या देशांत पूर्वी इतिहास लिहिण्याची कलाच अवगत नव्हती आणि अर्थांतच इतिहासाचें अध्ययन माहीतहि नव्हतें अशी समजूत आहे, पण चाणक्यानें दिलेल्या अभ्यासक्रमांत इतिहासाच्या अभ्यासाचा स्पष्ट उल्लेख असून इतिहासांत पुराणें, बखरी, आख्यायिका, जुने दाखले, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र इतक्यांचा समावेश होतो असें म्हटलें आहे. यावरून कौटिल्याच्या वेळची इतिहासशास्त्राची व्यापकता लक्षांत येईल.

सहाव्या अध्यायांत इंद्रियजयाचें महत्त्व वर्णिलें असून काम क्रोधादि षड्रिपूंच्या तावडींत सांपडलेल्यांची कशी त्रेधा होते या विषयीं पूर्वीच्या राजांचीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत जनमेजयराजाचें जें उदाहरण आलें आहे त्यावरून कौटिल्याचा हा ग्रंथ महाभारतानंतरचा असावा असें स्पष्ट दिसतें.

सातव्या अध्यायांत राजर्षिचें वर्तन कसें असावें, राजानें धर्म व अर्थ यांना विरोध न येईल अशा रीतीनें कामाचा उपभोग घ्यावा, राजानें अगदींच संन्याशाप्रमाणें राहूं नये असा व्यावहारिक उपदेश केला असून धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांत अर्थ हाच प्रमुख आहे, कारण धर्म व काम हे अर्थावर अवलंबून असतात असें आधुनिक मत प्रतिपादिलें आहे.

अमात्य, मंत्री व पुरोहित यांच्या नेमणुका करतांना कोणत्या गुणावर विशेष नजर द्यावी या विषयींचें कौटिल्याचें मत आजहि लक्षांत घेण्यासारखें आहे. मात्र अमात्यांच्या निष्ठेची परिक्षा कशी करावी याविषयींचे नियम अगदींच सीधे किंवहुना बालिश स्वरूपाचे आहेत.

११ व्या अध्यायापासून १४ व्या अध्यायापर्यंत हेरांच्या संबंधी विवेचन आहे. कौटिल्याच्या राज्यकारभारांत हेरांचे प्रस्थ फारच माजलेलें होतें असें या वर्णनावरून दिसतें. यापुढें मसलत कशी करावी, ती गुप्त कशी राखावी, मसलतीच्या सिद्धीसाठीं दूताची योजना कशी करावी आणि दूतांच्या अंगीं कोणते गुण असावे याविषयीं या ग्रंथांत फारच मार्मिक विचार केलेला दिसतो.

१७ व्या अध्यायांत राजपुत्रापासून आत्मसंरक्षण कसें करावें याचा विचार सांगितला असून त्यांत राजपुत्राची विल्हेवाट लावण्याचे जे विविध प्रकार वर्णिले आहेत, ते वाचून युरोपांतील तुर्कस्थानच्या राजपुत्रांची स्थिति डोळ्यापुढें उभी राहते; व अंगांवर शहारे येतात. यासंबंधांत आर्यचाणक्याचें मत तत्पूर्वीच्या आचार्यांप्रमाणें निर्घृणतेचें नाहीं ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. राजपुत्राला बंदींत टाकण्यापेक्षां किंवा व्यसनांत पाडण्यापेक्षां त्यास चांगलें शिक्षण देऊन प्रेमानें वागवावें असा योग्य सल्ला चाणक्यानें दिला आहे.

१९ साव्या अध्यायांत राजाची दिनचर्या कशी असावी याविषयीं सूचना केलेल्या आहेत; व त्या तत्त्वतः आणि व्यवहारतःहि यथायोग्य आहेत.

प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानांच हिते हितं ।
नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम् ॥
तस्मान्नित्योत्थितो राजा कुर्यादर्थानुशासनम् ॥
अर्थस्य मूलमुत्थानमनर्थस्य विपर्ययः ।
अनुत्थाने ध्रुवो नाशः प्राप्तस्यानागतस्य च
प्राप्यते फलमुत्थानाल्लभते चार्थसंपदम् ॥

असा जो चाणक्यानें राजाला इशारा दिला आहे तो खरोखरीच सांप्रतच्या काळांत देखील सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे. राजाला त्याच्याहून अधिक मौल्यवान् उपदेश कोणी करूं शकेल असें वाटत नाहीं.

२० व्या अध्यायांत राजवाड्याची रचना कशी असावी याविषयीं तत्कालीन दृष्टीनें कांहीं प्रकार सांगितलेले आहेत.

२१ व्या अध्यायांत विषप्रयोगादिकापासून राजानें आपला बचाव कसा करून घ्यावा याचे उपाय सांगितलेले आहेत. या ठिकाणीं पहिलें अधिकरण समाप्त झालें आहे.

---

# अधिकरण दुसरें.



२२ व्या अध्यायापासून 'अध्यक्षप्रचार' नामक दुसऱ्या अधिकरणास सुरवात झाली आहे. देशाचा राज्यकारभार चालविण्याला राजाला जीं जीं महत्वाचीं खातीं निर्माण करावीं लागतात त्या त्या खात्यावरील जो मुख्याधिकारी त्यास या ग्रंथांत 'अध्यक्ष' म्हटलें आहे. आणि या अध्यक्षांच्या बरेवाईटपणावर राज्याची सगळी इमारत अवलंबून असते म्हणून हे अध्यक्ष म्हणजे अधिकारी कसे असावेत आणि त्यांनीं आपापलीं कामें कशी करावीत हा महत्वाचा विषय या दुसऱ्या अधिकरणांत सांगितलेला आहे. आणि या मुळेंच हें अधिकरण अत्यंत महत्वाचें असें झालें आहे.

नवीं गावें कशीं वसवावींत, त्यांत येऊन राहण्यास लोकांस कसें उत्तेजन द्यावें, खेडेगांवचे व शहरचे अधिकारी कोण कोण असावे, शेतसारा किती असावा, शेतकऱ्यांना तगाई किंवा सूट केव्हां द्यावी, खाणींची व्यवस्था कशी ठेवावी, जंगल कसें राखावें, गांवच्या लोकांनीं सहकारितेनें सार्वजनिक कामें कशीं करावीं या विषयीं महत्वाच्या सूचना या अध्यायांत केलेल्या आहेत. त्यांत शेतकऱ्यांना सूट दिल्यानें खजिन्याला तूट न येईल अशी दक्षता ठेवावी, कारण चांगला राज्यकारभार भरपूर खजिन्यावर अवलंबून असतो हें सांगण्यास कौटिल्य विसरला नाहीं; अज्ञान मुलें सज्ञान होईपर्यंत त्यांच्या उत्पन्नाची व्यवस्था गांवांतील वयोवृद्ध शिष्टांनीं पहावी व देवालयांच्या उत्पन्नाचीही देखरेख पंचाकडे असावी, हे नियम सार्वजनिक हिताचीं कामें व्यक्तीकडे न सोपवितां पंचाकडे सोंपविलीं जात, हे दर्शवितात. आपल्यावर अवलंबून असलेल्या कुटुंबीयांच्या पोषणाची तरतूद न करतात संन्यास घेणें हा गुन्हा मानला जात असे, यावरून चाणक्याला रिकामटेकड्या संन्याशांच्या संख्येला आळा घालण्याची जरूरी वाटूं लागली होती असें दिसतें. खेडेगांवांतील लोक शेतीकडे दुर्लक्ष करून नाटकें, तमाशे इत्यादिकांच्या नादीं लागल्यास देशाचें नुकसान होतें म्हणून करमणुकीच्या प्रकाराला खेड्यांतून प्रतिबंध केला जात असे हें गैरवाजवी दिसतें !

२४ व्या अध्यायांत दुर्गरचनेचें वर्णन आहे. या वर्णनांतील बहुतेक शब्द पारिभाषिक असून अलीकडील वाङ्मयांत ते आढळत नसल्यामुळें या अध्यायाचा अर्थ बराचसा अनुमानानेंच करावा लागला आहे. हीच स्थिति 'किल्यांतील नगररचना' या अध्यायांतील कांहीं भागालाहि लागू आहे. या दोन्ही अध्यायांतील वर्णनावरून दुर्गरचना व नगररचना या शास्त्रांत अडीच हजार वर्षांपूर्वीहि किती प्रगति झाली होती तें समजून येतें. शहराच्या मध्यभागीं जीं देवालयें असावीं म्हणून सांगितलें आहे, त्यांत लक्ष्मी, विष्णू व शंकर यांच्या बरोबरच इंद्र, कुबेर अश्विनीकुमार, यांचींहि देवळें असावीं असें म्हटलें आहे. देवतांच्या या यादींत गणपतीचें नांव नाहीं आणि इंद्र, यम यांचीं नांवें आहेत हें विचित्र दिसतें. त्यांत 'मदिरागृह' असे शब्द आहेत. गणपतीशास्त्री यांनीं आपल्या टीकेंत त्याचा अर्थच दिला नाहीं. हिंदी भाषांतरांत त्याचा अर्थ 'शरावखाने' असा केला आहे. शामशास्त्री यांनींहि इंग्रजी भाषांतरांत 'The honorable liquor-house' असाच विचित्र अर्थ दिला आहे! पण 'मदिरा' हा चामुंडा म्हणजे दुर्गा या देवतेचा पर्यायवाचक शब्द आहे. असले अर्थाचे अनर्थ शामशास्त्र्यांच्या भाषांतरांत कितीतरी आढळतील. पण सर्वच ठिकाणीं त्यांचा उल्लेख करणें शक्य नाहीं. सर्वच भाषांतरें एकमेकांशीं ताडून पहाणाऱ्यांस अशीं स्थळें लक्षांत येतीलच.

चांडालांची वस्ती स्मशाना नजीक असावी हें तत्कालीन कल्पनेस अनुसरूनच आहे. पण पाखांडी लोकांचीहि वस्ती चांडालाप्रमाणेंच स्मशानाशेजारीं असावी असें सांगितलें आहे, तें चमत्कारिक दिसतें. पाखांडी याचा निश्चित अर्थ त्यावेळीं कोणता समजला जात होता हें समजण्यास मार्ग नाहीं.

२७ व्या अध्यायांत करवसूलीचा विचार सांगितला आहे व त्यांत अलीकडील बहुतेक सर्व प्रकारच्या करांचा समावेश झालेला दिसतो. खर्चाच्या प्रकारांत ज्या खर्चापासून अखेरीस राजाला लाभच अधिक होतो असा एक खर्चाचा प्रकार सांगितला आहे. त्यावरून त्यावेळीं कित्येक उत्पन्नाचे धंदे स्वतः सरकार आपणाकडे राखून ठेवीत असे. असें दिसतें. खजिन्याची इमारत कशी असावी, कोशगृहाचें संरक्षण कसें करावें, नाण्यांची पारख कशी करावी, खोटीं नाणीं पाडणाऱ्यांना पकडून शिक्षा कशी करावी, हिशेब कोणत्या पद्धतीनें लिहावे, त्यांचा ताळेबंद करून मेळ कसा पहावा, हिशेबनिसानें किंवा खजिनदारानें अफरातफर केल्यास भरपाई कशी करून घ्यावी, अफरातफरीचे प्रकार किती संभवतात, या विषयींची इतकी सूक्ष्म माहिती या तीन चार अध्यायांत दिली आहे कीं जणूं काय आपण हल्लीचें 'अकौंट कोड' वाचतों आहों असेंच वाटतें.

३० व्या अध्यायांत अधिकाऱ्यांची परिक्षा कशी करावी हें सांगितलें आहे, आणि त्यांत लांचखाऊ अधिकाऱ्यांवर नजर ठेवण्याविषयीं इशारत दिली आहे. तरीपण पाण्यांत राहणारे मासे हे पाणी केव्हां पितात हें कळणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणेंच कामावर नेमलेले अधिकारी पैसे केव्हां खातात हें जाणणें शक्य नाहीं, असा शेरा कौटिल्यानेंहि निराश होऊन लिहिला आहे! यावरून लांच खाण्याची प्रवृत्ति बंद पाडणें किती दुर्घट आहे याची कल्पना येते.

३१ साव्या अध्यायांत राज्यकारभारांतील कामाची लेखनपद्धति कशी असावी याविषयीं सूक्ष्म व मार्मिक असें विवेचन केलेलें आहे. या प्रकरणाच्या शेवटीं सर्व शास्त्रें पाहून व अनुभव घेऊन, "कौटिल्येन नरेन्द्रार्थे शासनस्य विधिः कृतः।" असें चाणक्यानें म्हटलें आहे. यावरून चाणक्याच्या पूर्वी सरकारी कागदपत्रांच्या लेखनपद्धतीला नियमबद्ध स्वरूप आलें नव्हतें व तें चाणक्यानें प्रथम आणलें, असें दिसतें. पत्रांवर तारीख घालतांना राज्याभिषेक शकवर्ष घालावें असें कौटिल्यानें सांगितलें आहे. पण ती पद्धत जाऊन विक्रम संवत् किंवा शालिवाहन शकवर्ष घालण्याचा परिपाठ केव्हां रूढ झाला कळत नाहीं.

३२ साव्या भागांत खजिन्यांत येणाऱ्या रत्नांची पारख कशी करावी हें सांगितलें आहे. 'रत्न' शब्दांत नुसते हिरे, माणीक वगैरेंचाच समावेश नसून मोतीं, सोनें, रुपें, पोवळीं, विविध प्रकारचें चंदन, चामडीं कातडीं, रेशमी लोंकरी वस्त्रें व सुती वस्त्रें यांचाहि समावेश केलेला आढळून येतो; यावरून हिऱ्यापासून सुती वस्त्रापर्यंत सर्व प्रकारचे जिन्नस कारणपरत्वें खजिन्यांत येत असत असें वाटतें. ही आयात निर्यात दूरदूरच्या परदेशांतूनही होत असे. बार्बरी देशाचा यांत अनेकवेळां उल्लेख आलेला आहे. यांत जीं वस्त्रें सांगितलीं आहेत त्यांतलीं कांहीं शिवलेलींहि असत. यावरून हिंदुस्थानांत ह्यूएनत्संगच्या कालापर्यंत शिवलेले कपडे वापरण्याची चाल नव्हती ही समजूत चुकीची ठरते.

३३ व्या अध्यायांत खाणी व खाणींचा उपयोग यांचें विवेचन आहे. त्यांत अशोधित धातु शुद्ध कशा कराव्या याविषयीं विवेचन असून प्रत्येक धातूच्या रंगाचीहि माहिती दिली आहे. याच भागांत नाणीं पाडण्याकरितां धातु कोणती, कशी वापरावी व त्यांत हीण कोणता, किती घालावा याविषयींहि प्रमाण सांगितलें आहे

३४ व ३५ या दोन अध्यायांत सोनाराची काम करण्याचीं पद्धति व तीवर देखरेख, त्याचप्रमाणें सराफकट्ट्यावरील व्यवहार, वजनें, मापें, सोन्याला कस लावणें आणि दागिने करतांना केली जाणारी लबाडी यांचें वर्णन दिलेलें आहे.

३६ साव्या अध्यायांत कोठींत वस्तुसंग्रह कसा करावा आणि पशु व मनुष्य यांना आहार किती व कसा द्यावा याविषयीं बारीकसारीक माहिति दिली आहे.

३७ व्या अध्यायांत बाजारावर देखरेख ठेवणाऱ्या पण्याध्यक्षाचीं कामें सांगितलीं आहेत.

३८ साव्यांत वनांतील वनस्पति आणि जंगलांतले पशु व त्यापासून मिळणारे पदार्थ यांची माहिती दिलेली आहे.

३९ व्या अध्यायांत आयुधांची माहिती दिली आहे. त्यांत हत्यारें कोठें ठेवावीं, उष्णता, आर्द्रता, कीटकादि प्राणी, यांच्या-पासून त्यांचें रक्षण करण्याकरतां कोणती तजवीज ठेवावी याचें वर्णन दिलें आहे. शत्रूचा नाश करणारीं व आपला बचाव करणारीं जीं यंत्रें त्यावेळीं अवगत होतीं, त्यांचें स्थिरयंत्रें, चलयंत्रें, आयुधें असें वर्गीकरण करून कोणतीं शस्त्रें कोणत्या वस्तूपासून बनवावीं, याचेंहि विस्तारपूर्वक वर्णन दिलें आहे.

४० व्या अध्यायांत वजनें व मापें यांचीं कोष्टकें दिलीं आहेत. यांत 'माष' हें सर्वांत लहान वजन असून 'भार' हें सर्वांत मोठें वजन सांगितलें आहे. हल्लींच्या वजनांच्या मानानें पाहतां, 'माष' अर्ध्या गुंजेबरोबर असून, एक 'भार' म्हणजे पक्के दोन मण ( ८० शेर ) इतकें वजन होतें. धान्य मोजण्याच्या मापांत 'आढक', 'कुडव', हीं मापें किती वजनाचीं असावींत याचा अंदाज करण्यास साधन नाहीं. मापांत सर्वांत मोठें माप, 'वह' हें सांगितलें असून, तें १० कुंभ म्हणजे २०० द्रोण यांच्या बरोबरीचें सांगितलेलें आहे. बहुतकरून 'वह' म्हणजे १ पल्ला धान्य होत असावें. तराजु कसा असावा, वजना–मापांवर शिक्के कोणी मारावे, त्यांची तपासणी कोणी करावी, त्या तपासणीबद्दल फी किती घ्यावी, आणि सरकारी शिक्क्यांच्या वजनाची किंमत किती असावी याची सविस्तर माहिती या प्रकरणांत आहे.

४१ व्या अध्यायांत स्थलमान व कालमान यांचीं कोष्टकें दिलीं आहेत. स्थलमापनाचें एक साधन म्हणजे वीत अगर हात हे सर्वांच्या परिचयाचें आहे. स्थलमापनांतलें सर्वांत मोठें प्रमाण म्हणजे एक योजन सांगितलें असून, तें सरासरीनें ४॥ मैलांबरोबर येतें. एक योजन म्हणजे ८ मैल अशी सामान्यतः समजूत आहे. परंतु १ हात म्हणजे १॥ फूट धरल्यास योजनाची लांबी ४॥ मैलच भरते. त्यावरून त्यावेळचा हात १॥ फुटांहून अधिक मानला असेल असें वाटतें. कालगणनेंत मात्र दोन अडीच हजार वर्षांत कांहींच फरक झाला नसून कालमानाचें कोष्टक अद्यापिहि जशाचें तसें उपयोगांत येण्यासारखें आहे. कालगणनेकरतां घ्यावयाचें घटकायंत्र केवढें असावें व त्यास छिद्र केवढें पाडावें, दिवसा छायेवरून दिवस किती आला हें कसें समजावें, याच्या विषयीं निरनिराळीं कोष्टकें दिलेलीं आहेत.

महिना किती दिवसांचा धरावा हें सांगतांना चांद्रमास २९॥ दिवसांचा व सौरमास ३०॥ दिवसांचा आणि सामान्यतः एका महिन्यांत ३० अहोरात्री असें प्रमाण यांत दिलें आहे. त्यापुढें मल्ल जातीच्या लोकांत ३२ दिवसांचा महिना, अश्ववाहांचा ३५ दिवसांचा महिना, आणि हस्तिवाहांचा ४० दिवसांचा महिना असें भिन्न प्रकार सांगितले आहेत. ३२, ३५ अगर ४० दिवसांचे महिने कधीं, कोठें कोणत्या लोकांत प्रचारांत होते तें कळत नाहीं. मल्लवाह, अश्ववाह, हस्तिवाह, या शब्दांचे अर्थ प्रत्येक टीकाकारानें अगर भाषांतरकारानें वेगवेगळे केले आहेत. पण त्यांतून कोणता अर्थ मूळचा खरा हें सांगतां येत नाहीं. ऋतूंचीं नांवें सांगतांना वर्षाऋतू-पासून प्रारंभ केला आहे. त्यावेळीं 'चैत्रवैशाख वसंतऋतु' ही कालगणना हल्लींसारखी बदललेली नव्हती. दक्षिणायनास प्रारंभ श्रावण महिन्यांत व उत्तरायणास प्रारंभ माघ महिन्यांत होत असे. पांच संवत्सरें मिळून एक 'युग' ही वेदांगज्योतिषांतील पद्धति यांत दिसून येते. परंतु अधिकमास मात्र आषाढ आणि पौष या महिन्यांत सुरू होत असे; आणि वेदांगज्योतिषांत श्रावण व माघ हे अधिक महिने सांगितलेले आहेत. कदाचित् अधिकमासासंबंधाचा जो श्लोक या अध्यायांत दिलेला आहे, त्याचा अर्थ निराळा असून तो वेदांगज्योतिषाला जुळत असेल.

अध्याय ४२ व ४३ यांत जकात, व दस्तुरी यासंबंधी व्यवस्था सांगितलेली आहे. यांत लग्नकार्य, चौल, मौजीबंधन, व्रतादि धर्मक्रिया, यज्ञ, बाळंतपण, नजराणा, इत्यादि कामाकरतां आणलेल्या मालाला जकात माफ असावी असें सांगितलें आहे. हल्लींच्या

काळीं माफीच्या सदरांत इतके प्रकार नमूद केले असतां थोडीतरी जकात वसूल होईल कीं याची शंकाच आहे. पण त्यावेळीं इतके अपवाद मानून देखील जकातीचें उत्पन्न बरेंच येत होतें, यावरून त्यावेळच्या प्रामाणिकपणाविषयींहि खात्री पटते.

४४ साव्या अध्यायांत सूत काढणें, व कापड बनविणें या विषयींची माहिती ग्रथित केलेली आहे. सूत काढण्याचें काम कोणी करावें व त्यास मजुरी कोणत्या हिशेबानें द्यावी याविषयीं नियम दिलेले आहेत. त्यांत विशेषतः ज्यांचे पति परागंदा झालेले आहेत, ज्या पंगु आहेत, किंवा अविवाहित आहेत अशा आणि घराबाहेर न पडणाऱ्या स्त्रियांस स्वतःच्या श्रमानें उदरभरणाचें हें एक साधन म्हणून सांगितलें आहे हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

४५ साव्या अध्यायांत शेतीसंबंधाच्या सर्व प्रश्नांचा विचार ग्रथित केलेला आहे. शेतीचीं कामें वेळच्या वेळीं न केल्यामुळें उत्पन्नांत तूट आल्यास वक्तशीर काम न करणाऱ्यास शिक्षा करावी असें यांत सांगितलें असून, गुलाम आणि सक्त मजुरीचे कैदी यांचा उपयोग शेतीच्या कामांत करावा असें सांगितलें आहे. पावसाळ्यांतील पावसाचा अंदाज रवि, शुक्र, गुरु इत्यादि ग्रहांच्या स्थितीवरून, मेघांच्या गर्भधारणेवरून आणि सूर्यावरील डागामुळें होणाऱ्या सूर्याच्या तेजांतील फरकावरून करावा; आणि पाऊस कमी अधिक पडणार असेल त्याप्रमाणें धान्यें पेरावीं असें सांगितलें आहे. पाणीपट्टी किती घ्यावी या संबंधी नियम सांगितला आहे पण त्यावरून नीटसा बोध होत नाहीं. धान्य पेरण्यापूर्वी म्हणावयाचा मंत्र यांत दिला आहे. आणि बीं पेरण्याविषयीं निरनिराळे नियम दिलेले आहेत. उंच्छवृत्तीनें राहणारे तपस्वी आणि अग्निहोत्री श्रोत्रिय यांना लागणारें धान्य नेण्याला मोकळीक असे. शेतीचे आणि गुरांचें रक्षण करणारे जे मजूर किंवा दास त्यांना एक महिन्यास १। पण वेतन द्यावें, असें म्हटलें आहे. यावरून ' पण ' हें नाणें निदान एक रुपयाएवढें तरी असावें असें अनुमान करतां येतें.

४६ साव्या अध्यायांत मद्यपानबंदीविषयीं नियम सांगितलेले आहेत. गुत्याच्या बाहेर दारू नेण्याला त्यावेळीं मनाई असे. मद्यें तयार करण्याचे अनेक प्रकार या भागांत वर्णिलेले आहेत. त्यावरोबरच दारूचे गुत्ते कोठें असावेत, कसे असावेत आणि त्यांत विक्रीस ठेविलेले पदार्थ कसे विकावे, कोणास विकावे आणि विक्रीस ठेवलेलीं मद्यें कोणाच्या हातून विकवावीं आणि दारू पिऊन झिंगलेल्यांची स्थिति काय होते व गुत्यांत ठेवल्या जाणाऱ्या दासीकडून दारू पिणारांच्या गुप्त गोष्टी कशा जाणल्या जाव्या इत्यादिकांची माहिती सूक्ष्मतऱ्हेनें दिलेली आहे.

४७ व्या अध्यायांत कसाई-खान्यावरील अधिकाऱ्याचीं कामें व मांसाची परीक्षा यांची माहिती सांगितलेली आहे. त्यांत बैल, गाय व वांसरें मारूं नयेत असा स्पष्ट हुकूम दिला आहे. त्या पुढील अध्यायांत गणिकाध्यक्षाचीं कर्तव्यें सांगितलीं असून गणिकांचीं जीं कामें सांगितलीं आहेत त्यावरून गणिकांची स्थिति अत्यंत शोचनीय होती असें सिद्ध होतें.

४९ साव्या ' नावाध्यक्ष ' प्रकरणांत नावा चालविण्याचा परवाना कोणास केव्हां द्यावा आणि नावेंतून प्रवास करणाऱ्याजवळ परवाना असण्याची अवश्यकता, परवान्याशिवाय नावेंतून प्रवास करण्यास मोकळीक असलेले इसम, संशयास्पद इसमांना व परवान्यावांचून प्रवास करणाऱ्या इसमांना करावयाचा ' प्रतिबंध, ' विक्रीच्या पदार्थांवर घ्यावयाचा कर या विषयीं माहिती दिलेली आहे. आषाढ वद्य अष्टमी पासून कार्तिक वद्य अष्टमीपर्यंत नावा चालू असाव्या असें सांगितलें आहे, त्यावरून त्यावेळीं आषाढ महिना संपत आला तरी पावसाला सुरवात होत नसे असें अनुमान निघतें. नावेला अगर जहाजांना अपघात होऊन नुकसान झाल्यास तें ' नावाध्यक्षानें अगर जहाजावरील अधिकाऱ्यानें भरून द्यावें, ' असा नियम होता. नावेंतून जाण्यायेण्यास परवाना लागत असे व परवान्यावांचून जाणाऱ्यांस अटक होत असल्यामुळें गुन्हेगारांना पकडणें सुलभ होत असे.

अध्याय ५० यांत सरकारी गुरेंढोरें व त्यांच्या जोपासनेचे, कामाचे व औषधपाण्याचे सर्व प्रकार सांगितले आहेत. कळपांतील जनावरें पळवून नेणाऱ्यांस किंवा ठार मारणाऱ्यांस यांत देहांत शिक्षा सांगितली आहे. यावरून त्यावेळीं जनावरांची किंमत किती मानली जात असे तें कळतें. जनावरांची विक्री झाल्यास पावपट किंमत सरकारांत भरावी लागे. हा कर जबर आहे यांत शंका नाहीं. शिशिर, वसंत व ग्रीष्म ऋतूंत धार एकवेळच काढावी व दुसऱ्यांदा काढल्यास काढणाराचें बोट कापावें ही शिक्षाहि गैरवाजवी कडक दिसते. याच भागांत शेळ्या, मेंढ्या, गाढवें, खेचरें वगैरे पशूंच्या रक्षणाविषयीं नियम सांगितले आहेत.

अध्याय ५१ वा—अश्वशाळेवरील अधिकाऱ्यानें घोड्याविषयीं कोणकोणती माहिती नोंदून ठेवावी तें या अध्यायांत सांगितलें आहे. उत्तम घोड्याचीं लक्षणें, घोड्यांचा आहार, चांगल्या घोड्यांची पैदास घोड्यांच्या वेगवेगळ्या चाली यांचें सवि-

स्तर वर्णन यांत दिलेलें आहे. घोड्यांच्या औषधपाण्याचीहि सोय यांत सांगितली असून औषधोपचारांतील दोषामुळें घोडा मेला तर त्याबद्दल घोडयाच्या किंमती इतका दंड होत असे. इतर जनावरांच्या संबंधानेंहि असेच नियम सांगितलेले आहेत.

अध्याय ५२ व्यांत हत्तींची व्यवस्था, त्यांचीं लक्षणें, त्यांचें शिक्षण याची संपूर्ण माहिती दिली असून ५३ व्या अध्यायांत युद्धासाठीं किंवा इतर कामासाठीं हत्ती तयार कसे करावेत याची विशेष माहिती दिली आहे.

अध्याय ५४ यांत रथाध्यक्ष, पायदळावरील अधिकारी आणि सेनापती यांच्या आंगचे गुण, त्यांना लागणारीं शस्त्रें व इतर वस्तु यांचें विवेचन आहे. लढाईच्या संबंधांत सेनापतीनें कशी शिस्त राखावी आणि कवाईत कशी शिकवावी या विषयीं सूचना केलेल्या आहेत.

अध्याय ५५ यांत सरहद्दीवरील रानांतील अधिकारी, गुरचराईच्या जंगलावरील अधिकारी आणि परहद्दींत जाणारे व परहद्दींतून येणारे इसम यांच्या परवान्याविषयीं माहिती सांगितली आहे.

५६ व्या अध्यायांत जमावंदीवरील मुख्य अधिकाऱ्यानें कर आकारणें आणि कर वसूल करणें हीं कामें करण्याविषयीं सूचना आहेत. करवसुलीसाठीं प्रजाजनांची गणती करणें, कर देण्याला पात्र अशा जमीनींची नोंद ठेवणें, आयात निर्गत जकाती वसूल करणें आणि हेरामार्फत सर्व प्रकारच्या लोकांची माहिती काढून ती नोंदून ठेवणें वगैरे कामें या प्रकरणांत येतात.

अध्याय ५७ वा–यांत नागरिक आणि शहर–कामगार यांचीं कामें सांगितलीं असून शहराची खाने सुमारी, संशयित इसमास पकडणें, आगीचा बंदोबस्त करणें, शहरांत स्वच्छता राखणें, प्रेतांची व्यवस्था लावणें, गांवचा पाणीपुरवठा, शत्रूंपासून संरक्षणाची तजवीज, वगैरे अनेक बाबी संबंधानें उपयुक्त विचार यांत सांगितले असून अध्यक्ष प्रचाराचें अधिकरण येथें समाप्त झालें आहे.

## अधिकरण तिसरें.



अध्याय ५८ पासून तिसऱ्या अधिकरणास सुरवात झाली. यांत प्रथम करारनामे व मुकदमे या संबंधाचें विवेचन केलेलें आहे. एकांतांत गुप्तपणें कपटानें केलेले करार रद्द समजावेत. त्याचप्रमाणें अनधिकृत माणसांनीं केलेले करार व व्यवहार गैरकायदा होत. शिवाय करार करणारा इसम करार करतांना जुलमाच्या किंवा रोगांच्या तावडींत सांपडलेला असूं नये असें म्हटलें आहे. अर्थातच असले करार निरुपयोगी ठरतात.

कराराचा असा विचार झाल्यानंतर मुकदमा चालविण्याच्या पद्धतीचा विचार यांतच दिला आहे. वादाचा निर्णय एकट्यानें देऊं नये याविषयीं त्यावेळीं मोठा कटाक्ष असे. याकरितां वाद तोडण्यासाठीं तिघे न्यायाधीश व तिघे अमात्य राजानें नेमावे असें यांत सांगितलें आहे. दावा दाखल करतांना हल्लीं ' कोर्ट फी ' भरावी लागते तशी त्यावेळीं पद्धत नसे. जो कज्जा हरेल त्याकडून आणि गुन्हेगाराकडून मागाहून दंड घेण्यांत येई. साक्षीदार साक्ष देण्यास आल्यास त्यांना पोटगी–भत्ता मिळे; त्याशिवाय त्यांना वाटखर्चीहि देण्यांत येई. वादांत हरणाऱ्या इसमानें विरुद्ध बाजूचा कोर्ट खर्च द्यावा, असेंहि यांत नमूद आहे. जेथें धर्मशास्त्र आणि नीति यांचा विरोध येईल तेथें धर्मशास्त्रास प्रमाण मानून निकाल देण्यांत यावा असा नियम असे.

अध्याय ५९ यांत वैवाहिक संबंध आणि स्त्रीधन याविषयीं विचार केला आहे. विवाहाचे आठहि प्रकार यांत सांगितले असले तरी त्यांतले पहिले चार यथाशास्त्र विवाह होत. विवाह झाल्यावर देखील नवरा बायकोचें न पटल्यास काडी मोडून घेण्याचा अधिकार उभयतांनाहि असे. नवऱ्याचें घर सोडून स्त्री जर परगांवास गेली तर तेवढ्याबद्दलहि तिला दंड होत असे. नवरा परगांवीं जाऊन बेपत्ता झाल्यास तिनें किती दिवस त्याची वाट पहावी आणि किती दिवसानंतर पुनः विवाह करावा याची माहिती ६० व्या अध्यायांत दिली आहे. बरेच दिवस पतीचा पत्ता नसल्यास स्त्री पुनर्विवाहास तयार होई, पण तिला न्यायाधीशाची परवानगी घ्यावी लागत असे. पुनर्विवाह करावयाचा झाला तरी पतीच्या भावाशीं अथवा भाऊ नसल्यास सगोत्र बांधवांशीं किंवा पतीच्या दुसऱ्या आप्ताशीं दुसरा विवाह करावा असा निर्बंध असे. हे सर्व आप्त सोडून इतरांशीं विवाह केल्यास विवाह करणारा पुरुष, ती स्त्री व त्या विवाहास संमति देणारे हे सर्वच अपराधी ठरत.

अध्याय ६१ वा—यांत भाऊबंदांच्या वाटण्यांची पद्धति सांगितली आहे. तींत व हल्लींच्या कायद्यांत कांहीं विशेष फरक नाहीं. ज्याला वारस नाहीं त्याची जिनगी राजानें घ्यावी असा कायदा असून श्रोत्रिय ब्राह्मणांची जिनगी मात्र बेवारसी असली तरी ती राजानें न घेतां वेदज्ञ ब्राह्मणांना अर्पण करावी असें यांत सांगितलें आहे. जातिभ्रष्ट झाल्यास जिंदगीचा वांटा मिळत नसे हें सांगावयासच नको.

भाग ६२ वा—यांत वाटप करतांना इतरांहून अधिक हिस्सा कोणास केव्हां मिळावा याविषयींचे नियम दिले असून त्यांत पित्याच्या अगर मातेच्या वर्णानुरूप श्रेष्ठत्व ठरविलें आहे. तसा वर्णमूलक श्रेष्ठ कनिष्ठपणा नसल्यास वारसाच्या विशिष्ट गुणांवरूनहि एखाद्यास मोठा भाग मिळत असे.

अध्याय ६३ यांत विविध प्रकारचे पुत्रांचे प्रकार सांगितले असून त्यांत औरस, क्षेत्रज, गूढज, अपविद्ध, कानीन, सहोढ, पौनर्भव, दत्तक, उपगत, कृतक व क्रीत इतके प्रकार प्रामुख्यानें सांगितलेले आहेत. याशिवाय अनुलोम व प्रतिलोम विवाहापासून होणाऱ्या पुत्रांचा समावेश कोणत्या वर्णांत करावा याविषयींहि कांहीं नियम सांगितले आहेत.

अध्याय ६४ वा—यांत घर कसें बांधावें याविषयींचे नियम दिले आहेत. घरांतील पाणी बाहेर जाण्याकरितां जें गटार बांधावयाचें, त्यांतून पाणी खळखळ वाहून न गेल्यास मालकाला १२ पण दंड करावा, असे कडक नियम सांगितले आहेत. बिऱ्हाडकरू कांहीं कारण नसतां, आपण होऊन घर सोडून जाईल तर त्यानें वर्षाचें भाडें द्यावें असा यांत नियम दिलेला आहे.

प्रकरण ६५ स्थावर विक्री, या अध्यायांत घरेंदारें, शेतजमीन वगैरे स्थावर इस्टेटीची खरेदी—विक्री कशी व्हावी, तें सांगितलें आहे. शेताला मिळावयाच्या कालव्याच्या पाण्याची जी नक्की तारीख असेल त्या तारखेच्या अगोदर पाणी घेतल्यास किंवा भलत्याच दिवशीं पाणी घेणारांस आणि दुसऱ्याच्या पाळीच्या दिवशीं त्याच्या शेताची वाट बंद केल्यास त्यांस दंड सांगितला आहे.

अध्याय ६६ वा, यांत गायरानें, शेतें, रस्ते, यांचें नुकसान केल्यास त्याबद्दल शिक्षा सांगितली आहे. पेरणीच्या दिवसांत शेतकरी शेत सोडून जाईल तर त्यास १२ पण दंड सांगितला आहे. जनावरांनीं दुसऱ्याच्या शेतांत शिरून नुकसान केल्यास कडक दंड ठेवला आहे. गांवाबाहेर धर्मशाळा बांधणें, जनावरांस चरण्यासाठीं गायरानें राखणें, जनावरांना क्लेश न होतील अशा रीतीनें त्यांना वागविणें अशा विषयीं कांहीं नियम दिले आहेत.

अध्याय ६७ वा यांत कर्ज काढणें, कर्ज देणें, व्याजाचे दर, व्याज आकारण्याची पद्धति, कर्ज फेडण्याची जबाबदारी, कर्जाची शाबिती, साक्षीदार होण्याची पात्रता, साक्षीदारास हजर ठेवण्याची जबाबदारी, इत्यादि बाबतींचा विचार केलेला आहे.

अध्याय ६८ यांत ठेवीचा विचार व अध्याय ६९ यांत स्थावर गहाण ठेवण्यासंबंधाचे नियम सविस्तर दिले आहेत.

अध्याय ७० यांत दास, नोकर व मजूर यांचा विचार केला आहे, त्यावरून त्याकाळीं गुलामाची पद्धति जारीनें सुरुं असून गुलामांची खरेदी–विक्री होत असे हें उघड दिसतें. तरीपण आर्येतर किंवा अनार्य इसमच दास्याला पात्र समजला जाई आणि आर्यास दासपणा कधींहि येतां कामा नये असा स्पष्ट निषेध सांगिला आहे. गुलाम म्हणून पुरुषांची जशी खरेदी–विक्री होई तशीच स्त्रियांचीहि होत असे !

अध्याय ७१ वा—यांत मजूर व सहकारी मंडळें यांच्या संबंधाचे नियम घालून दिले आहेत. मजूर मध्येंच विनाकारण काम सोडून जाईल तर त्यास १२ पण दंड सांगितलेला आहे. पण पीनल कोडांतल्याप्रमाणें त्यास कैदेची शिक्षा सांगितलेली नाहीं. काम सोडून देण्याचा गुन्हा यज्ञादि धार्मिक विधींसहि लागू केलेला आहे. यज्ञसमाप्ति पूर्वी यजमानानें ऋत्विजांस किंवा ऋत्विजानें यजमानास सोडून दिल्यास ४८ पासून ९६ पण दंड सांगितला आहे. शूद्र स्त्रीशीं विवाह करणें, चोरी करणें, निंद्य वर्तनाच्या लोकांचें आचार्यत्व करणें इत्यादि दोष ऋत्विजाच्या हातून घडल्यास तो त्यागाला पात्र होतो, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

अध्याय ७२ यांत खरेदी–विक्री आणि कराराची पूर्तता या संबंधी नियम दिले आहेत. यांतच ठरलेलें लग्न मोडणें वगैरेविषयीं उहापोह केला आहे, त्यावरून लग्नाचा ठराव हाहि इतर कराराप्रमाणेंच करार मानला जात असे हें उघड आहे.

अध्याय ७३ यांत दिलेली देणगी केव्हां नाकारावी यासंबंधी आणि मालकी नसतां केलेली विक्री यासंबंधीं विवेचन आहे. स्थावर इस्टेटीवरील मालकीहि १० वर्षे स्वस्थ बसल्यास मुदतबंदीमुळें नाहींशी होते. राहत्या घराला १२ वर्षांची मुदत लागू आहे. संन्याशानेंहि गैरवाजवी आचरण केलें तर त्यास राजानें शिक्षा करावी, कारण धर्म अधर्मानें दूषित झाला असतां त्याकडे दुर्लक्ष केलें तर तो राजासच मारतो असें बजावलें आहे.

अध्याय ७४ यांत प्रथम कांहीं किरकोळ गुन्ह्यांबद्दल दंड सांगून चोरी व दरवडा याबद्दल शिक्षा सांगितल्या आहेत. या नंतरच्या ७५ व्या अध्यायांत अब्रूनुकसानीविषयींचा विचार नमूद केलेला आहे. त्यांत कोणच्याहि जातीसंबंधानें, देशासंबंधानें किंव्र समाजासंबंधानें अपमानकारक शब्द असल्यास त्यास २०० पासून १००० पणापर्यंत दंड भोगावा लागेल असें म्हटलें आहे.

अध्याय ७६ यांत मारामारी व दुखापत यांचा विचार केलेला आढळतो. हल्लींच्या कायद्यांतील टॉर्ट, कॉन्ट्रॅक्ट व पीनलकोड या तिहींत सांगितलेल्या दोषांचा उहापोह या एकाच अध्यायांत केलेला आहे. मात्र गुन्हा करणाऱ्याच्या वर्णाप्रमाणें त्यास कमीजास्त शिक्षा सांगितली आहे. जुगार, सोडत, वगैरेंना मनाई असून परवानगीशिवाय खेळणाऱ्यांस अध्याय ७७ मध्यें शिक्षा सांगितली आहे. सोडतीस एक अपवाद सांगितला आहे, तो महत्वाचा आहे. विद्या किंवा कला यांच्या उत्तेजनार्थ पैज लाविल्यास किंवा सोडत काढल्यास तो गुन्हा मानला जात नसे. याप्रमाणें हें न्याय प्रकरण सांगितलें आहे.

---

# अधिकरण ४ थें.

या अधिकरणांत मुख्यतः समाजकंटकांचा बंदोबस्त कसा करावा हें सांगितलें आहे. त्यांत प्रारंभींच ७८ व्या अध्यायांत कारागिरांवर देखरेख कशी ठेवावी हें सांगितलें असून, विशेषतः सोनार-लोक कसे फसवितात याचा विस्तारपूर्वक उल्लेख केला आहे. या अध्यायांत शिंप्यांचा उल्लेख आहे; त्यावरून कपडे शिवण्याची कला यावेळीं प्रचलित होती असें सिद्ध होतें आणि हुएनत्संगच्या वेळेपर्यंत कपडे शिवण्याची कला प्रचारांत नव्हती हें चिंतामणराव वैद्यांचें मत निराधार ठरतें. भाट, चारण, इत्यादिकांच्या हातून गुन्हा घडल्यास त्यास फटके मारण्याची शिक्षा सांगितली आहे. वाणी, उदमी, कारागीर, गवई, भिक्षुक, खुषमस्कऱ्ये, गारुडी, व जादुगार यांची वस्तुतः चोरांत गणना होत नसली तरी ते चोरच आहेत व त्यांच्यापासून जनतेला पीडा होणार नाहीं अशी खबरदारी घ्यावी, असें कौटिल्य म्हणतो! यावरून त्याच्या व्यावहारिक स्वभावाची व कडक शिस्तीची कल्पना करतां येते.

अध्याय ७९ मध्यें व्यापाऱ्यापासून होणाऱ्या लबाड्या सांगितल्या असून कोणत्या गुन्ह्याबद्दल किती दंड घ्यावा याचें प्रमाण त्यांत सांगितलें आहे. कट करून व्यापारी लोक मालाच्या किंमती चढवितील किंवा उतरवितील तर त्यास दंड सांगितला आहे.

अध्याय ८० यांत आकस्मिक आपत्ति निवारण्याचे उपाय सांगितले आहेत. आग, महापूर, दुष्काळ, सांथीचे रोग, हिंस्र पशु, भूतपिशाच यांना 'दैवी कोप' असें म्हटलें असून त्यापासून आपल्या गांवाचें, शहराचें, आणि प्रांताचें रक्षण कसें करावें याविषयीं सूचना दिलेल्या आहेत. त्यांत दुष्काळ निवारणार्थ सांगितलेले उपाय हल्लींच्या सरकारेंनेंहि विचारांत घेण्याजोगे आहेत.

८१ या अध्यायांत ज्या सरकारी कामगारांच्या किंवा खाजगी व्यक्तींच्या वर्तनाविषयीं संशय येईल त्यांची परीक्षा हेरांकडून कशी करावी याविषयीं सूचना दिलेल्या आहेत. पण त्या अगदींच उत्तान स्वरूपाच्या असल्यामुळें त्यांचा त्यावेळीं तरी कितपत उपयोग होत असेल कोण जाणे ?

अध्याय ८२ मध्यें हेरांच्या हातून पुंड लोकांचा बंदोबस्त कसा करावा याचा विचार सांगितला आहे; पण तोहि वरच्या सारखाच निरुपयोगी ठरणारा आहे.

अध्याय ८३ मध्यें चोरांचा तपास कसा लावावा आणि चोरीला गेलेला माल कसा शोधून काढावा याविषयीं कांहीं व्यावहारिक सूचना केलेल्या आहेत.

यापुढील अध्याय ८४ हा विशेष महत्वाचा आहे. त्यांत आकस्मिक मेलेल्याची परीक्षा करून त्याच्या मृत्यूचें कारण ठरविण्याविषयीं पुष्कळच अनुभवसिद्ध नियम सांगितलेले आहेत. त्यांत विषप्रयोगानें मेलेला, पाण्यांत बुडून मेलेला, गळफांस लावून मेलेला, अशा इसमांच्या शरीरावरील खाणाखुणांचें वर्णन कोणासहि समजेल असें तपशीलवार केलेलें आहे. आत्महत्या करणाराची उत्तरक्रिया किंवा श्राद्धक्रिया कोणी करूं नये व जो कोणी ती करील त्यालाहि आत्महत्या करणाऱ्या इतकाच दोष लागतो असें यांत सांगितलें आहे.

अध्याय ८५ यांत आरोपीची चौकशी आणि कबुलीजबाबाकरितां केली जाणारी छळणूक यांची माहिती दिली आहे. गुन्हेगाराला शिक्षा कोणकोणत्या प्रकारच्या कराव्या त्यांचें विवेचन याच अध्यायांत केलेलें आहे. त्यांत दंड, साधीकैद, सक्तमजूरी,

फटके मारणें, वगैरे प्रकार हल्लीं देखील रूढ आहेत; पण बोटांत सुया टोंचणें, हाताच्या बोटाचें एक पेर जाळणें, उन्हांत बसविणें, हिवाळ्यांत रात्रभर ओल्या गवतांवर निजविणें असले शिक्षेचे प्रकार विचित्र असून हे हल्लीं रूढ नाहींत. ब्राह्मणानें कसलाहि गुन्हा केला तरी त्यास कबुलीजबाबाकरितां छळूं नये किंवा देहांत शिक्षाहि देऊं नये, पण त्याचा गुन्हा सर्वांस कळून यावा या करितां त्याच्या अंगावर अपराधाचें निदर्शक असे डाग द्यावे आणि त्याला हद्दपार करून द्यावा असें सांगितलें आहे. यांत ब्राह्मणांना देहांत शिक्षा न देण्याविषयीं पक्षपात दिसतो, पण त्या शिक्षेच्या मोबदला सांगितलेली डाग देऊन हद्दपार करण्याची शिक्षा इतकी कडक आहे कीं त्यापेक्षां देहांत शिक्षा बरी, असेंच कोणीहि म्हणेल ! प्रत्येक कैद्याला शिक्षा कोणती झाली, शिक्षा कधीं देण्यांत आली, शिक्षेच्या अनेक प्रकारांपैकीं कोणता आधीं भोगावयाचा इत्यादि माहिती हल्लीं ज्याप्रमाणें प्रत्येक कैद्याच्या गळ्यांत असलेल्या बिल्ल्या-वर नमूद केलेली असते तशीच ती त्यावेळीं नमूद केली जात असे.

या ठिकाणीं मूळांत, 'खरपट्टादागमयेत्' असे शब्द आहेत. पण 'खरपट्ट' म्ह० लोखंडी बिल्ला असा अर्थ कोणीहि भाषांतर कारानें केलेला नाहीं. शामशास्त्री यांनीं त्याचा अर्थ 'गुन्हेगाराचीं हत्यारें गाढवाच्या पाठीवरून मिरवावींत' असा केला आहे. गणपतिशास्त्री यांनीं 'खरपट्ट नांवाचा चौर्यशास्त्रावरील एक ग्रंथ आहे' असें म्हटलें आहे. हिंदी भाषांतरांतहि शामशास्त्री यांच्याच प्रमाणें 'खर' याचा अर्थ 'गाढव' असाच केला आहे !

अध्याय ८६ यांत सरकारी अधिकारी व त्यांच्या हातून घडणारे गुन्हे यांना शिक्षा सांगितलेली आहे. त्यांत सरकारी खजि-न्यांतून, खाणींतून, अगर सरकारी कारखान्यांतून ८ पणाहून अधिक किंमतीची वस्तु किंवा जवाहीर कोणी लांबवील तर वधाची शिक्षा सांगितलेली आहे. चोराशीं जो कोणी संगनमत करील त्याला हालहाल करून ठार करावें असेंहि सांगितलें आहे. प्रमुख अधिकारी किंवा राजा यांच्या नांवाचा खोटा हुकूम तयार केला किंवा खोटी मोहोर केली तर त्यांसहि वधाची शिक्षा सांगितली आहे.

न्यायाधीश अगर कारकून यांनीं कज्जा चालवितांना कांहीं लबाडी केली तर त्यास पूर्व दंड करावा. कैद्यांना निजण्या-बसण्यास, जेवण्यास, बोलण्यास, किंवा हालचाल करण्यास जो कोणी हरकत करील त्यास ३ पणापासून पुढें दंड करावा. जो अधिकारी संशयित आरोपीस किंवा कैद्यास अटकेंतून सोडवील किंवा हालवील, किंवा त्याचें अन्नपाणी बंद करील, त्यासहि दंड सांगितला आहे. पक्क्या तुरुंगांतून कैद्यास पळवून लाविल्यास इस्टेट जप्त करून शिवाय वधाची शिक्षा सांगितली आहे.

अध्याय ८७ यांत कैद्याचे हस्तपादादि अवयव छेदनाची शिक्षा केव्हां युक्त आहे याचें विवरण केलें आहे. यांत जो शूद्र स्वतःस ब्राह्मण म्हणवील त्यासहि शिक्षा सांगितली आहे ! कुजकें मांस विकणें हा गुन्हा मानला जाऊन त्याबद्दल हात पाय तोडण्याची शिक्षा सांगितली आहे आणि मनुष्याचें मांस विकण्याबद्दल तर वधाचीच शिक्षा सांगितलेली आहे.

अध्याय ८८ यांमध्यें घोर अपराधाबद्दल हालहाल करून वध करण्याची शिक्षा सांगितली आहे. असल्या अपराध्यांस फांशीं दिल्यावर किंवा सुळावर चढविल्यावर जो मनुष्य त्याच्या प्रेताचें दहन करील त्यालाहि शिक्षा सांगितली आहे. खुनी माणसांस किंवा चोरास अन्न, वस्त्र वगैरे देणें किंवा नुसता सल्ला देणें हाहि अपराध गणला गेला आहे. राजाविरुद्ध बंड उभारण्याचा गुन्हा करणाऱ्यांस जिवंत जाळून टाकण्याची घोर शिक्षा सांगितली आहे. मात्र गुन्हेगार ब्राह्मण असल्यास त्यास अंधार-कोठडींत कोंडून ठेवावें असें म्हटलें आहे. राजाविरुद्ध विपरीत कंड्या उठविणारांसहि जीभ कापून टाकण्याची कडक शिक्षा सांगितली आहे. या सर्व शिक्षा चाणक्यानें स्मृतिग्रंथांतून घेतलेल्या दिसतात; पण स्वतः चाणक्याला हाल करून ठार मारण्याची शिक्षा नापसंत होती असें दिसतें.

अध्याय ८९ यांत स्त्रियांवर व विशेषतः कुमारीवर बलात्कार केल्यास त्याबद्दल शिक्षा सांगितलेली आहे. याशिवाय स्त्रियांच्या संबंधांत घडणाऱ्या इतरहि कित्येक अपराधाबद्दल शिक्षा सांगून ठेवल्या आहेत.

अध्याय ९० वा—चौथ्या अधिकरणांतील या शेवटच्या अध्यायांत अनेक किरकोळ गुन्ह्यांबद्दल शिक्षा सांगितल्या आहेत. त्यांत अखेरीस राजाच्या हातून निरपराधी पुरुषांस शिक्षा झाली तर त्या शिक्षेच्या ३० पट दंड राजानें द्यावा व तो ब्राह्मणांना वाटला जावा, असें म्हटलें आहे.

---

त्याप्रमाणें हा राजा तुझ्यापासून आपल्यावर संकट येणार या भयानें लवकरच तुझ्यावर क्रोध करील तर येथून दुसरी-कडे जावें, " असा भीरु वर्गाला उपदेश करावा.

" कुत्रें वाढविणाऱ्यांच्या घरांतील गाईचें दूध जसें कुत्र्यांच्याच कामाला येतें, ब्राह्मणाला त्याचा उपयोग होत नाहीं तसेंच या राजाचें द्रव्य सत्व, प्रज्ञा, वक्तृत्व हे गुण ज्यांच्या अंगीं नाहींत अशाच लोकांना मिळतें. खऱ्या शिष्ट लोकांना मिळत नाहीं. हा दुसरा राजा पुरुषांचें श्रेष्ठपण जाणतो, तर त्याच्या पदरीं राहा ' असा लुब्ध वर्गाला उपदेश करावा.

" चांडाळांच्या विहिरीचें पाणी जसें चांडाळांनाच पिण्याला योग्य; इतरांनीं त्याचें सेवन करणें योग्य होणार नाहीं, त्याप्रमाणें नीच राजा नीचांनींच आश्रय करण्याला योग्य आहे. आपणासारख्या खऱ्या आर्यांनीं याजजवळ राहूं नये. हा दुसरा राजा पुरुषाचे श्रेष्ठ गुण जाणतो तर त्याच्या पदरीं राहा ' असा मानी लोकांना उपदेश करावा.

अशा उपदेशानें अनुकूल झालेल्यांना व प्रतिज्ञापूर्वक ज्यांच्याबरोबर करार झाला आहे अशा लोकांना त्यांच्या वर हेर ठेवून त्यांच्या शक्तीप्रमाणें आपलें काम सांगावें. साम व दाम यांनीं परदेशांतील अराजनिष्ठांना आपल्या बाजूला करून घ्यावें. राजनिष्ठांनां भेद व दंड यांचा उपयोग करून वठणीवर आणावें. भेद उत्पन्न करण्यासाठीं शत्रूच्या दोषांचा फायदा घ्यावा.

---

# अध्याय पंधरावा.

## मंत्राधिकार.

याप्रमाणें स्वपरपक्षाचें नियंत्रण केल्यावर कार्य करण्याचा विचार करावा. सर्व कार्यावलंबाचे मुळाशीं मंत्र आहे. मसलत करणें ती एकांतांत वार्ता बाहेर कळणार नाहीं अशी काळजी घेऊन व पक्ष्यांनाहि ज्या ठिकाणीं येतां येणार नाहीं अशा ठिकाणीं करावी.

शुकसारिकांनीं तसेंच कुत्र्यांनीं व इतर प्राण्यांनीं मसलत फोडल्याचें ऐकिवांत आहे. म्हणून ज्यांना मसलतींत घेतलें नाहीं अशांना मसलतीच्या जागेकडे येऊं देऊं नये. जो मंत्र भेद करील त्याला ठार मारावें.

दूत, अमात्य, अथवा राजा यांच्या इंगिताकारावरून मसलत फुटते. आचरणांतील फरक म्हणजे इंगित; स्वरू-पांतील फरक म्हणजे आकार. कार्यारंभ होईपर्यंत आकारेंगितावरून व मसलतींत घेतलेल्या पुरुषाकडून गोप्य स्फोट होणार नाहीं अशी व्यवस्था करावी. प्रमाद, कैफ, झोपेंत बडबडणें व कामवशता इत्यादि प्रकारानें मसलत फुटते. जो खोल स्वभावाचा असेल किंवा राजाकडून ज्याचा पाणउतारा झाला असेल तो मसलत फोडतो. या सर्वांपासून मसलत गुप्त राखावी.

मंत्र भेद होणें हें राजाच्या व मसलतींतील इतर पुरुषांच्या योगक्षेमाला विघातक आहे. " म्हणून गुप्त मसलत करावयाची ती एकट्यानेंच करावी कारण राजा ज्या मंत्र्यांचा विचार घेतो ते मंत्रीहि दुसऱ्यांचा सल्ला घेतात. तेहि इतरांचा सल्ला घेतात या परंपरेनें मसलत फुटते " असें भारद्वाजाचें मत आहे.

" म्हणून राजा कोणतें कार्य करूं इच्छितो याची वार्ता दुसऱ्याला समजूं देऊं नये. ज्यांच्याकडून काम करवा-वयाचें त्यांना देखील आरंभ केल्यावर किंबहुना काम संपल्यावरच तें समजावें.

विशालाक्ष म्हणतो, " एकाच्याच हातून सर्व बाजूनीं विचार होऊं शकत नाहीं. प्रत्यक्ष, परोक्ष व अनुमान या तीन गोष्टींवर राजाचें धोरण अवलंबून असतें. माहित नसलेल्या गोष्टींचें ज्ञान करून घेणें, उपलब्ध माहितीचा निश्चितपणा ठरविणें, मिळालेल्या माहितीवरून अनेक अनुमानें निघत असल्यास संशय निवृत्ती करून घेणें, व आप-

त्याला एकच बाजू माहित असल्यास दुसरी बाजू समजावून घेणें या सर्व गोष्टी मंत्र्याशिवाय होत नाहींत. म्हणून ज्यांची बुद्धि चांगली असेल त्यांच्याबरोबर मसलत करावी. कोणाचाही अवमान करूं नये; सर्वांचीं मतें ऐकून घ्यावींत. लहान मुलांच्या तोंडूनही जे शहाणपणाचे शब्द निघतील त्यांचा शाहण्यानें उपयोग करून घ्यावा. "

" याच्या योगानें मसलत परिपक्व होईल पण गुप्त राहावयाची नाहीं. " असा पाराशरांचा आक्षेप आहे. " जें कार्य करावयाचें असेल त्या सारखेंच दुसरें एक काम मंत्र्यापुढें ठेवावें. व हें कार्य पूर्वीं असें होतें आणि आतां जर असें होईल तर पुढें काय होईल ? " असें विचारावें. या रीतीनें सल्ला तर घेतां येतो व गुप्तपणाहि राखला जातो.

पण पिशुनाचें मत याच्या विरुद्ध आहे. तो म्हणतो " सुरू केलेल्या किंवा सुरू करावयाच्या कार्याविषयीं मंत्र्यांचा मोघम सल्ला विचारला असतां ते निष्काळजीपणानें सल्ला देतात व प्रसंगविशेषीं ती गोष्ट बाहेर फोडतात. हा यांत दोष आहे. म्हणून ज्या कामामध्यें जे तज्ज्ञ असतात त्यांचा सल्ला घ्यावा म्हणजे सल्ला मिळेल व गोप्य स्फोटहि व्हावयाचा नाहीं. "

" असें मुळींच चालावयाचें नाहीं " असें कौटिल्य म्हणतो. " तीन किंवा चार मंत्र्यांबरोबर खलबत करावें. एकाबरोबरच खलबत केल्यास भानगडीच्या प्रश्नांत निश्चय होत नाहीं. शिवाय मंत्री एकच असल्यास तो अनिर्बंध होऊन आपल्याच इच्छेप्रमाणें वागतो. दोघांना मसलतींत घेतलें असतां त्या दोघांच्या एकजुटीपुढें राजाला नमावें लागतें किंवा त्यांच्या मतभेदामुळें राजाचा नाश होतो. तिघांना अथवा चौघांना मसलतींत घेतले असतां मोठीशी चूक सहजासहजीं होत नाहीं व योग्य सल्ला मिळतो. यापेक्षां अधिक मंत्री असल्यास निश्चित मसलत होणें कठिण जातें व मसलत गुप्त राखणेंहि दुष्कर होतें.

तशीच परिस्थिती असेल तर एकट्यानेंच किंवा शक्य असेल तर एक अगर दोन मंत्र्यांबरोबर मसलत करावी.

कार्याला सुरवात करण्याचा उपाय, द्रव्यबल व पुरुषबल, कार्याचें स्थळ व काळ, अकल्पित संकटांचा प्रतिकार व कार्याचा शेवट अशी मसलतीचीं पांच अंगें आहेत. यां सर्व अंगांविषयीं पृथक्त्वानें व समुच्चयानें मंत्र्यांचा विचार घ्यावा. त्यांच्यांत मतभेद झाल्यास त्याचीं कारणें काय याचा विचार करावा, व निश्चय ठरवावा. निश्चय ठरल्यावर दीर्घसूत्रीपणा करूं नये. ज्याचें नुकसान करावयाचें असेल त्यांच्याबरोबर फार वेळ वाटाघाट करीत बसूं नये.

मंत्रीपरिषदेंत बारा अमात्य असावेत असें मानवांचें मत आहे. सोळा असावेत असें बार्हस्पत्यांचें मत आहे व वीस असावेत असें औशनसांचें मत आहे.

जरूरी प्रमाणें प्रधानांची संख्या असावी असा कौटिल्याचा निर्णय आहे. त्यांनीं राजाच्या स्वपरपक्षाचा विचार करावा. नवीन कार्यांना आरंभ करणें, आरंभिलेल्या कार्यांची पूर्तता करणें, ज्यांची पूर्तता झाली असेल ती विशेष फलप्रद होतील असें उपाय योजणें व कामें नेमून देणें, हीं कामें मंत्र्यांनीं करावीं.

समीप असेल त्यांच्याबरोबर कार्यांची वाटाघाट करावी व दूर असलेल्यांना पत्रें पाठवून त्यांचा विचार घ्यावा.

इंद्राच्या मंत्रीपरिषदेंत एक हजार ऋषी आहेत तेंच त्याचे डोळे होत. म्हणून त्याला दोन डोळे असतांना सहस्राक्ष म्हणतात. जरूरीच्या प्रसंगीं मंत्र्यांना व मंत्रीपरिषदेला बोलवून त्यांना निमंत्रणाचें प्रयोजन सांगावें. परिषदेंत बहुमतानें जें ठरेल किंवा ज्याच्या योगानें कार्यसिद्धि होईल तें करावें. कार्य करणाऱ्यानें आपलें गुह्य दुसऱ्याला समजूं देऊं नये. शत्रूचें मर्म शोधून काढावें. आपलीं उघडीं अंगें कासवाप्रमाणें गुप्त करावींत.

जो श्रोत्रिय नाहीं त्याला चांगल्या माणसांच्या घरीं श्राद्धाच्या निमंत्रणाला अधिकार नाहीं. त्याप्रमाणें शास्त्रानभिज्ञ मनुष्य मसलतींच्या वेळीं सभेंत बसण्याला योग्य नाहीं.

---

# अध्याय सोळावा.

## दूताची योजना.

ज्याला मसलत कळविली आहे तो दूतनामक प्रणिधी. अमात्याला आवश्यक असे सर्व गुण अंगीं असलेल्या दूतांवर संपूर्ण जबाबदारी टाकावी. ज्याच्या अंगीं तीन चतुर्थांश गुण असतील त्याला आंखून दिलेल्या कामावर योजावें. ज्याच्या अंगीं अर्धेच गुण असतील तो केवळ निरोप पोहोंचविणारा दूत होय.

यान, वाहन, चाकर इत्यादि लवाजम्याची योग्य तजवीज करूनें दूतानें निघावें. " शत्रूला निरोप असा कळवावा, त्याला शत्रु असें उत्तर देईल त्याला प्रत्युत्तर अमुक द्यावें, त्याला अशा रीतिनें फसवावें, " वगैरे विचार करीत त्यानें जावें. अटवीपालक, सरहद्दीवरचे अधिकारी, नगरांचे मुख्य व जानपदांवरील अधिकारी यांच्याशीं संघटण ठेवावें. सैन्याच्या छावणीची जागा, शत्रूशीं युद्ध करण्याला अनुकूल भूमी व आश्रयाचीं स्थानें यासंबंधी स्वपक्ष व परपक्ष यांच्या सामर्थ्याची तुलना करावी. किल्ले व देश यांचा विस्तार, मूल्यवान् वस्तु ठेवण्याचीं स्थानें व त्यांच्या संरक्षणाचीं साधनें व इतर मर्मस्थानें यांचा शोध काढावा. परवानगी मिळाल्यावर राजधानींत प्रवेश करावा. प्राणहानिची भीति न बाळगतां अक्षरशः सांगितल्याप्रमाणें निरोप कळवावा. शत्रूच्या मुखावर, दृष्टींत व भाषणांत प्रसन्नता, आदरपूर्वक निरोप ऐकणें, राजाविषयीं कुशल प्रश्न करणें, गुणवर्णनांत भाग घेणें, सिंहासनाजवळ आसन देणें, सन्मान करणें, मित्रांचें स्मरण करणें, व विश्वस्त अंतःकरणानें वागणें हीं सर्व संतोषवृत्तीचीं लक्षणें आहेत. याच्या विपरीत दिसून आल्यास राग आला आहे हें जाणावें. त्याला म्हणावें, " तूं काय आणि इतर काय, सर्व राजे दूतांच्या तोंडून बोलतात. म्हणून शस्त्र उगारलें तरी आम्ही सांगितल्याप्रमाणें बोलणार. दूतांमध्यें चांडाल देखील अवध्य आहेत मग ब्राह्मणांची गोष्ट कशाला ? आम्ही जें सांगतों तो दुसऱ्यांचा निरोप आहे हा केवळ दूतांचा धर्म आहे."

निरोप मिळेपर्यंत तेथें रहावें. सत्कारानें गर्वित होऊं नये. शत्रूच्या सामर्थ्याचा दरकार बाळगूं नये. न आवडणारें बोलणें सहन करावें. स्त्रीसंग व मद्यपान यांचा त्याग करावा. एकांतांत शयन करावें. निद्रित असतांना व मद्यपानानें मत्त झाला असतांना गुह्य बाहेर पडतें. आपल्या उपयोगी पडणाऱ्या वर्गाशीं बोलणें करणें, शत्रूच्या मित्रांवर हेरांची योजना करणें, प्रजेचें राजावर प्रेम आहे कीं नाहीं हें पाहणें, प्रजेच्या दोषांचा शोध घेणें हीं कामें तापस व वैदेहक यांच्यावर सोंपवावीं. त्यांचे अनुयायी, वैद्य, पाखंडी व दोन्हीकडे वेतन घेणारे यांचाहि या कामीं उपयोग करावा. त्यांना शत्रूपक्षाशीं बोलणें अवघड असल्यास भिकारी, मद्यपी, उन्मत्त व निजले असतां बडबडणारे इत्यादींच्या बोलण्यावरून, तसेंच पवित्र स्थानें व देवालयें या ठिकाणीं काढलेल्या चित्रांवरून किंवा खुणा वरून त्यांनीं बातमी काढावी. बातमी मिळाल्यावर फितुर करण्याचें बोलणें सुरू करावें. शत्रूनें विचारिलें असतां आपल्या राज्यांतील बलाबलाविषयीं माहिती सांगूं नये. " आपण सर्व जाणतच आहां " असें म्हणावें किंवा आपलें कार्य साधेल असें कांहींहि उत्तर द्यावें.

आपल्या स्वामीच्या म्हणण्याला अनुमति तर देत नाहीं व आपल्यालाहि जाण्याला परवानगी देत नाहीं अशा वेळीं विचार करावा कीं, माझ्या स्वामीवर लवकरच संकट येणार असें पाहून किंवा आपल्यावरच्या संकटाचा प्रतिकार करण्यासाठीं मुदत मिळावी याहेतूनें, किंवा आपल्या धन्याच्या राज्यालगतचे आपले शत्रू आपल्या शत्रूंचे मित्र आपल्या पिछाडीवर उठविण्याची इच्छा करून, किंवा प्रजेंत बंड चेतविण्याच्या अगर रानटी लोकांकडून हल्ला चढविण्याच्या इच्छेनें, अथवा आपल्या राजांच्या मित्रांचा दुसऱ्या राजाकडून नाश करविण्याच्या हेतूनें, कीं स्वतःवर येणारे परचक्र अगर आपल्याच प्रजेचें बंड अथवा आपल्यावर येणाऱ्या रानटी टोळ्यांचा प्रतिकार करण्याच्या उद्देशानें, कीं संपूर्ण तयारी असलेल्या माझ्या स्वामींची स्वारी करण्याची योग्य वेळ टळावी म्हणून, कीं शेतांतील धान्य जंगलांतील वस्तु द्रव्य गोळा करण्यासाठीं, कीं

किल्ल्यांची दुरुस्ती करण्याकरितां, कां नवीन सैन्य जमविण्याकरितां, कां आपल्या सैन्याला कवाइत शिकविण्याकरितां, कीं देशकालाचा विचार करून अनुकूल संधि मिळेपर्यंत काल हरण करण्याच्या हेतूनें, कीं अपमान किंवा चुकी टाळण्याकरितां अथवा आपल्या स्नेही राजांची मैत्री दृढ करण्याकरितां यांतील कोणत्या हतूनें मला निरोप दिला नाहीं? हें समजून संदेश घेऊन त्याप्रमाणें रहावें अगर गुप्तपणें निघून जावें अथवा अनुकूल संधिची वाट पहावी. अनिष्ट असा सांगून मृत्यूच्या अगर कारागृहाच्या भीतिनें निरोप न घेतां प्रयाण करावें, नाहींतर बंधनांत पडावें लागेल.

निरोप पोहोंचविणें, तहाचें पालन करणें, शत्रूला त्रास देणें, मित्र मिळविणें व राखणें, फितुर करणें, शत्रूच्या मित्रांत भांडणें लावणें, गुप्त सैन्याचा नाश करणें, आप्तांजवळच्या रत्नाचा अपहार करणें, हेर शोधून काढणें, पराक्रम दाखविणें, शांततेचा भंग करणें, ओलीस ठेवलेल्यांची सुटका करविणें, आणि जारण मारणादि अनुष्ठानें करणें हीं दूताचीं कामें होत. आपल्या दूतांकडून हीं कामें करवावीं आणि प्रतिदूतांची योजना करून आणि दृश्य व अदृश्य रक्षक नेमून शत्रूंच्या दूतांपासून स्वकीयांचें रक्षण करावें.

---

# अध्याय सतरावा.

## राजपुत्ररक्षण.

अंतः शत्रु व बहिः शत्रु यांच्यापासून सुरक्षित असा राजा राज्याचें रक्षण करूं शकतो. अंतःशत्रूंत स्त्रियांपासून व राजपुत्रांपासून संरक्षणाचा विचार मुख्य होय. त्यांतून स्त्रियांपासून संरक्षण कसें करून घ्यावें हें निशांतप्रणिधि या प्रकरणांत सांगण्यांत येईल. प्रस्तुत ठिकाणीं राजपुत्रापासून संरक्षण कसें करून घ्यावें याचा विचार करावयाचा आहे.

जन्मापासून राजपुत्रावर देखरेख ठेवावी. कारण राजपुत्र हे खेंकड्याप्रमाणें आपल्या जन्मदात्याचा नाश करतात.

" राजपुत्रांच्या अंतःकरणांत पित्याविषयीं स्नेह उत्पन्न झाला नाहींतर त्यांचा गुप्तपणें वध करावा " असें भारद्वाजाचें मत आहे.

" अन्यायानें वध करणें हें राक्षसी कृत्य आहे व त्यामुळें क्षत्रिय कुलाच्या बीजाचाच नाश होईल म्हणून राजपुत्राला अंतःपुरांत एखाद्या निर्दिष्ट ठिकाणीं बंदींत ठेवणें श्रेयस्कर होईल, " असें विशालाक्ष म्हणतो.

पाराशर म्हणतात, " असें करणें हें घरांत साप बाळगण्यासारखें आहे. बंडाच्या भयानें पिता मला बंदींत ठेवीत आहे असें जाणून राजपुत्र खरोखरच बंड करील म्हणून त्याला सरहद्दीवरील अधिकाऱ्याच्या ताब्यांतील किल्ल्यांत ठेवणें जास्त चांगलें. "

पिशुन म्हणतो, " टक्कर देऊं इच्छिणारा एडका दूर नेल्यानें तो अधिकच जोरानें हल्ला करितो तसाच हा प्रकार भीतिदायक होईल. कारण आपल्या बंदिवासाचें कारण समजून घेऊन राजपुत्र सरहद्दीवरील अधिकाऱ्याला आपल्या बाजूस वळवून घेईल. म्हणून आपल्या देशापासून दूर असलेल्या सामंताच्या किल्ल्यांत त्यास ठेवावें. "

"म्हणजे तो सामंत त्याचा वत्सासारखा उपयोग करून घेईल. वत्स पुढें ठेवून गाईची धार काढतात त्याप्रमाणें तो मांडलीक याच्या पित्याला पिळून काढील; यास्तव त्याला मातुल कुलांत ठेवणें श्रेयस्कर होय, " असें कौणपदंत म्हणतो "

" ही भिक्षेकऱ्याची पताकाच आहे! भिकारी ज्याप्रमाणें देवाच्या मूर्ती किंवा साप दाखवून भिक्षा मागतात त्याप्रमाणें ही पताका दाखवून त्याच्या आईच्या घरची मंडळी याच्या नांवावर पैसे काढतील. म्हणून त्याला क्षुद्र विषयोपभोगांचा नाद लावावा. बंदींत सुखाचा लाभ होत असल्यास पुत्र पित्याचा द्वेष करीत नाहीं, " असें वातव्याधी म्हणतो.

कौटिल्य म्हणतो, " हें जीवंत मरण होय. ज्या कुलांतील राजपुत्र दुष्ट झाले आहेत असें कुल हल्ला आला असतां भोंग्यांनीं पोखरलेल्या लांकडाप्रमाणें मोडतें. म्हणून पट्टराणी ऋतुमती झाल्यावरोबर ऋत्विजांनीं इंद्र व बृहस्पती यांना हवि द्यावा. गरोदर झाल्यावर सूतिकाशास्त्रवेत्त्या वैद्यांनीं गर्भपोषण व सुख प्रसूति करण्याचा यत्न करावा. प्रसूत झाल्यावर उचित पुत्रसंस्कार पुरोहितांनीं करावेत. राजपुत्र मोठा झाल्यावर निरनिराळ्या विषयांतील तज्ञांनीं त्याला शिक्षण द्यावें. "

" सत्र्यांपैकीं एकानें मृगया, द्यूत, मद्य व स्त्री यांचा नाद लावून राजपुत्रांना पित्याचा पराभव करून राज्य घे असा उपदेश करावा व या उपदेशाचा दुसऱ्या सत्र्यानें निषेध करावा " असें आम्भीय सांगतात.

" अज्ञानी मनुष्याला अशा मार्गाला लावणें हें महत्पाप आहे " असें कौटिल्याचें मत आहे. एखादा नवा पदार्थ त्याला ज्याचा लेप करावा त्याचेंच शोषण करून घेतो त्याचप्रमाणें अपक्व बुद्धीचा राजपुत्र त्याला जें कांहीं सांगितलें जाईल तें शास्त्रच समजून त्याचें श्रद्धा पूर्वक ग्रहण करील; यास्तव त्याला धर्मार्थी-चाच उपदेश करावा. अधर्मसंयुक्त व अनर्थसंयुक्त व्यवहाराचा उपदेश करूं नये. " आम्ही तुझेच किंकर " असें म्हणणाऱ्या सत्री लोकांनीं त्याचें पालन करावें.

यौवनमदानें परस्त्रीवर मन ठेवणाऱ्या राजपुत्राला कुलस्त्रियांचा वेश घेतलेल्या बदचालीच्या स्त्रियांकडून रात्रीं एकांतांत उद्वेग आणवावा. कांहींतरी वाईट रस पाजवून मद्याविषयीं त्याच्या मनांत तिटकारा उत्पन्न करवावा. तो द्यूतासक्त झाल्यास कपटद्यूत खेळणाऱ्यांकडून त्याला फसवून द्यूतापासून परावृत्त करावें. मृगयाप्रेमी राजपुत्राला शिकार अडविणाऱ्यांनीं भिववावें. पित्याविरुद्ध कट करण्याची इच्छा प्रदर्शित केल्यास त्याला अनुमोदन देऊन कटांत शिरून मग अडचणी उपस्थित कराव्यात. त्याला म्हणावें " राजाजवळ कोणाची भीड चालावयाची नाहीं. तुझा बेत सिद्धीस न गेल्यास घात होईल. सिद्धीस गेल्यास परलोकांत नरक आणि या लोकांत प्रजेकडून निंदा आणि कदाचित् सार्वत्रिक द्वेषामुळें धोंडमार होऊन मृत्यू येण्याची भीति आहे. "

प्रिय किंवा एकुलत्या एक पण बंडखोर मुलाला बंधनांत ठेवावें. पुष्कळ पुत्र असल्यास राजानें त्यांस आपल्या हद्दीबाहेर किंवा दुसऱ्या कोणाच्या राज्यांत जेथें मुळींच मुलें नाहींत अगर मूर्ख किंवा नपूंसक मुलें नाहींत अशा जागीं पाठवावें.

गुणसंपन्न अशा पुत्राला सेनापति किंवा युवराज करावें.

बुद्धिमान, सांगितलेल्या बुद्धीचा व दुर्बुद्धी असे तीन प्रकारचे पुत्र असतात. जो बुद्धिमान असतो त्याला शिकविलें असतां तो धर्म व अर्थ या गोष्टी समजून घेतो व त्याप्रमाणें वागतो. ज्याला तत्त्वें समजून देखील त्याचा व्यवहारांत उपयोग करतां येत नाहीं तो धृतबुद्धीचा पुत्र होय. नेहमीं संकटांत सांपडणारा व धर्मार्थाचा द्वेष करणारा तो दुर्बुद्धि पुत्र होय. एकच पुत्र असल्यास नातू होण्याविषयीं यत्न करावा किंवा मुलीला जो मुलगा होईल तो आपल्याला देण्याविषयीं संकेत करून मुलीचा विवाह करावा.

राजा म्हातारा किंवा व्याधिग्रस्त असेल तर आपल्या मातृकूलांतून किंवा कुलीन अशा मांडलिकांपैकीं कोणा-कडून तरी नियोग पद्धतीनें पुत्रोत्पत्ती करून घ्यावी. दुर्विनीत अशा एकट्या पुत्राला राज्यावर बसवूं नये.

पुष्कळांचा आधार अशा राजानें पुत्राच्या कल्याणासाठीं तत्पर असावें. विशेष परिस्थिती खेरीज इतर प्रसंगीं ज्येष्ठ पुत्राला राज्य देणें हें शास्त्रसंमत आहे.

किंवा कुलाचेंच राज्य असावें; कुलाचा संघ दुर्जय असतो; त्याला अराजकतेच्या संकटाची बाधा होत नाहीं म्हणून तो कुलसंघ पृथ्वीवर शाश्वत राहतो.

---

# अध्याय अठरावा.

## राजानें नियंत्रणांत ठेवलेल्या राजपुत्राचें वर्तन व त्याच्याशीं राजाचा व्यवहार.

राजानें कठिण कामावर किंवा आपल्याला न शोभणाऱ्या कामावर योजलें तरी राजपुत्रानें पित्याच्या मर्जी प्रमाणें वागावें. मात्र ज्या योगानें जीवित धोक्यांत पडेल अगर प्रजेचा कोप होईल अगर पातक घडेल अशा कामांत अपवाद समजावा. चांगल्या कामावर योजिलें असतां कार्यकर्ता अधिकारी मागून घ्यावा, व मागून घेतल्यानंतर त्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करावा. आपल्या कार्याचें योग्य उत्पन्न व मिळालेला नजराणा पित्याकडे पाठवावा. त्यानें देखील जर बापाची तृप्ती न होईल किंवा दुसऱ्या पुत्रावर किंवा स्त्रीवर अधिक मेहेरबानगी होईल तर अरण्याला जाण्याकरितां निरोप घ्यावा. कैद किंवा वध यांची भीति वाटेल तर जो मांडलीक न्यायपरायण, धार्मिक, सत्यवादी व दिलेलें वचन पाळणारा, शरण आलेल्यांना सत्कारपूर्वक आसरा देणारा असा असेल त्याचा त्यानें आश्रय करावा. त्याठिकाणीं राहून सैन्य व खजिना जमवून राजपुत्रानें वीर पुरुषाच्या कन्येशीं विवाह करावा, आणि रानटी लोकांशीं किंवा असंतुष्ट लोकांशीं सख्य जोडावें.

दुसरे कोणी सहाय्यक न मिळतील तर एकट्यानें किमया करून किंवा माणीक, सोनें, रुपें इत्यादि धातूंच्या खाणींत व्यवहार करून उपजीविका करावी. पाखंडी संघाचें द्रव्य किंवा श्रोत्रिया खेरीज इतरांना मिळणारें देवद्रव्य, किंवा श्रीमंत विधवेजवळ असलेली पुंजी, किंवा व्यापारी संघाच्या गलबतांतून गुप्त प्रवेश करून व त्यांना गुंगीचीं औषधें देऊन त्यांचें द्रव्य हरण करावें; अथवा परक्यांच्या मुलुखांत धामधूम करावी. किंवा आजोळच्या सेवकांच्या सहाय्यानें उद्योग करावा; किंवा वेष पालटून सुतार, चित्रकार, भाट, वैद्य, पाखंडी, गोंधळी यांच्या मिषानें तसलेंच भिष करणाऱ्या मित्राला बरोबर घेऊन राजाला एकांतात गांठून शस्त्रानें किंवा विषानें राजाचा घात करून लोकांना म्हणावें कीं, " मीं तो युवराज ! हें राज्य मला मिळालें आहे पण राज्याचा उपभोग एकट्यानेंच घेणें योग्य नाहीं, तेव्हां जे मला धनी मानतील त्यांना दुप्पट पगार देऊन कामावर ठेवीन. " या प्रमाणें बंधनांत असलेल्या राजपुत्रानें वागावें.

दूर ठेवलेल्या ज्येष्ठ पुत्राकडे हेर पाठवून त्याला आणवावें किंवा आईकडून त्याला बोलवावें. टाकून दिलेल्या पुत्राला गुप्त पुरुषांनीं शस्त्रांनीं अगर विषप्रयोगांनीं मारून टाकावें. न टाकलेल्या पुत्राला धाडसी आणि बदमाष स्त्रियांकडून मद्यपानानें विकल करून किंवा शिकारींत पकडून किंवा रात्रींच्या वेळीं पकडून आणावें. आणल्यावर, " माझ्यानंतर राज्य तुझेंच आहे " असें सांगून त्याचें सांत्वन करावें, व त्याला नजरकैदेंत ठेवावें. किंवा राजाला अनेक पुत्र असल्यास अशा पुत्राला हद्दीपार करावें.

---

# अध्याय एकोणिसावा.

## राजाची दिनचर्या.

राजा उद्योगी असला म्हणजे चाकरही उद्योगी होतात. राजाच्या हातून दुर्लक्ष होऊं लागल्यास चाकरहि दुर्लक्ष करितात व राजाच्या कार्याचा विघात करतात. असला राजा शत्रूकडून फसविला जातो; म्हणून राजानें सतत उद्योग करावा. घटका-पात्राच्या सहाय्यानें किंवा सावली मोजून दिवस व रात्र यांचे आठ आठ भाग करावें. तीन पुरुष, एक पुरुष, चार अंगुलें व मुळींच छाया नसणें असें मध्यान्हापर्यंत चार भाग आणि याचप्रमाणें अपराण्हाचे चार भाग मिळून दिवसाचे आठ भाग समजावें.

दिवसाच्या पहिल्या भागांत राज्यांतील बंदोबस्ताची हालहवाल व जमाखर्च ऐकावा. दुसऱ्याभागांत पौरजानपदांच्या तक्रारी ऐकाव्यात. तिसऱ्या भागांत स्नान व भोजन करावें व अभ्यास करावा. चवथ्या विभागांत वसूलीचा स्वीकार करावा व निरनिराळ्या खात्यावरील अध्यक्षांच्या भेटी घ्याव्या. पांचव्या भागांत पत्रें पाठवून मंत्री परिषदेची सल्ला मसलत घ्यावी व गुप्त हेरांनीं आणलेल्या महत्वाच्या बातम्या ऐकाव्या. सहाव्या विभागांत स्वच्छंद विहार करावा किंवा मसलत करावी. सातव्या विभागांत हत्ती, घोडे, रथ व योद्धे यांची पहाणी करावी. आठव्या विभागांत सेनापती बरोबर युद्ध-चर्चा करावी.

संध्याकाळ झाल्याबरोबर संध्या करावी. रात्रीच्या पहिल्या भागांत गुप्त हेरांची भेट घ्यावी. दुसऱ्या विभागांत स्नान, भोजन करावें व अभ्यास करावा. तिसऱ्या भागांत अंतःपुरांत प्रवेश करावा व गतिवाद्य श्रवण करावें. चवथ्या व पांचव्या भागांत शयन करावें. सहाव्या भागांत गीतवाद्यांच्या आवाजानें जागें होऊन शास्त्र व इतिकर्तव्यता यांचें चिंतन करावें. सातव्या भागांत मसलत करावी व गुप्त हेरांना कामें सांगून त्यांची रवानगी करावी. आठव्या भागांत ऋत्विज आचार्य व पुरोहित यांच्याकडून स्वस्तिवाचन करून घ्यावें. आणि नंतर राजवैद्य, बल्लवाधिकारी व ज्योतिषी यांची भेट घ्यावी. मग सवत्सधेनूला व बैलाला प्रदक्षिणा करून दरबाराला जावें. किंवा आपल्या शक्तीप्रमाणें अहोरात्राचे कमजास्त भाग करून त्याप्रमाणें कार्य करावें.

दरबारांत गेल्यावर अर्जदारांना आंत येण्यास मोकळीक द्यावी. राजाची भेट दुर्घट झाल्यास राजाजवळच्या लोकांना कार्याचा विपर्यास करण्याला अवकाश सांपडतो त्यामुळें प्रजेंत असंतोष उद्भवतो आणि राजा शत्रूच्या आहारीं जातो. म्हणून राजानें, देवस्थानें, आश्रम, पाखंड, श्रोत्रिय, पशु, पुण्यस्थानें, बाल, वृद्ध, रोगी, व्यसनी, अनाथ व स्त्रिया यांचीं कामें क्रमानें पहावींत किंवा जरुरीच्या अगर महत्वाच्या मानानें त्यांचा क्रम लावावा.

सर्व जरुरीचीं कार्यें लागलींच पहावींत; कालावधीवर टाकूं नयेत. कार्यें लांबणीवर पडलीं असतां दुर्घट अथवा असाध्य होऊन बसतात.

अग्न्यागारांत राजानें प्रथम अभ्युत्थान देऊन व प्रणाम करून तपस्वी व वैद्य यांचीं कामें पहावीं. त्यावेळीं पुरोहित व आचार्य समीप असावेत. तपस्वी व जादुगार यांचीं कार्यें तीन्ही वेदांचें अध्ययन केलेल्यांच्या साहाय्यानें पहावींत. एकट्यानें पाहूं नयेत कारण त्यांचा राग मोठा कठिण असतो.

उद्योग, यज्ञ, न्यायदान, द्रव्यदान, निष्पक्षपाती आचरण व यज्ञांत अवभृथ स्नान हीं राजाचीं व्रतें आहेत.

प्रजासुख हेंच राजाचें सुख. प्रजेचें हित हेंच राजाचें हित. स्वतःच्या इच्छेची तृप्ती करण्यांत त्याचें हित नसतें. तर प्रजेच्या इच्छेप्रमाणें वागण्यांत त्याचें हित असतें.

म्हणून राजानें नित्य उद्योग करून द्रव्यसाधन करावें. सतत उद्योग हा द्रव्यसाधनाचें मूलकारण आहे, आणि त्याच्या उलट म्हणजे आळस हा अनर्थाचें बीज आहे.

उद्योग न केल्यास जवळ असलेल्या व पुढें मिळावयाच्या संपत्तीचा निःसंशय नाश होईल. उद्योगानें फलप्राप्ती होते व संपत्तीचा लाभ होतो.

---

# अध्याय विसावा.



## राजवाड्याचा बंदोबस्त.

वास्तुविद्या जाणणाऱ्यांनीं प्रशंसिलेल्या जागीं कोट, खंदक व महाद्वार यांनीं युक्त असें व अनेक महालांनीं वेष्टिलेलें असें अंतःपुर करावें. त्यामध्यें राजाचें राहाण्याचें स्थान खजिन्यासारखें ( बंदोबस्ताचें ) असावें. किंवा ज्याच्या

भिंतीमधून गुप्त वाटा आहेत असें ( शत्रूला ) फसविणारें गृह करून त्यामध्यें राजानें आपली राहाण्याची जागा करावी; किंवा ज्याच्या दरवाज्यावर लांकडाच्या मूर्ति किंवा बौद्ध स्तूप आहेत आणि ज्याला अनेक भुयारांतून वाटा आहेत असें तळघर करवावें. किंवा खांबामधून जाण्यायेण्याचे मार्ग असलेले व भिंतीमधून गुप्त जिने असलेलें मंदिर करवावें. संकटसमयीं उपयोगी पडावें म्हणून ज्याची तक्तपोशी यंत्रानें वाटेल तेव्हां पाडतां येते असा एक दिवाणखाना करून ठेवावा किंवा प्रसंग येईल तेव्हां करावा. आपल्या बरोबरच्या सहाध्यायांना हे प्रकार माहीत असतील अशी शंका आल्यास आपल्या बुद्धीनें वेगळीच कांहीं कपटरचना करावी.

प्रेताच्या हाडांतून अग्नि घेऊन त्या अग्नीसह अंतःपुराला डाव्या बाजूनें तीन फेऱ्या घातल्या असतां तें इतर अग्नीनें जळत नाहीं. वीज पडलेल्या झाडाच्या राखेनें व गारांच्या पाण्यांत भिजविलेल्या मातीनें गिलावा केला असतां तें अंतःपुरहि अग्नीनें जळत नाहीं.

जीवन्ती, श्वेता, मुष्कक ( कस्तुरी ), पुष्पवंदाका व क्षार भूमींत उगवलेल्या पिंपळाच्या डहाळ्यांनीं संरक्षिलेल्या ठिकाणीं सर्प व विष यांचें बल चालत नाहीं. मांजर मोर, मुंगुस व ठिपक्याचे हरिण यांचा संचार ज्या ठिकाणीं असतो तेथें ते सापाचा नाश करतात.

शुक, सारिका व भारद्वजपक्षी हे पक्षी सापाची व विषाची शंका आल्यास आक्रोश करतात. विषाच्या सानिध्यांत क्रौंच विव्हल होतात. जीवंजीवकाला ग्लानी येते. मत्त कोकिलाला मरण येतें, चकोराच्या डोळ्याचा रंग बदलतो. याप्रमाणें अग्नी, विष, व सर्प यांपासून संरक्षणाची तजवीज करावी.

पाठी मागल्या महालांत स्त्रियांच्या रहाण्याची जागा करावी. गर्भ रोगांच्या वैद्यांनीं सांगितलेल्या वनस्पतींच्या कुंड्या, उद्यान व जलाशय हे त्याचें भोंवती असावेत. अंतःपुराच्या पुढल्या भागांत राजकन्या व राजकुमार यांचे महाल असावेत. पुढें वेणीफणी करण्याची जागा, सल्लामसलतीची जागा, दिवाणखाना, राजपुत्रांच्यावर देखरेख करणाऱ्या अधिकाऱ्यांचें स्थान असावें. देवड्यांच्यामध्यें अंतःपुरावर देखरेख करणारे पहारेकरी असावेत.

अंतःपुरांत गेलें असतां वृद्ध स्त्रियांनीं शुद्धतेविषयीं खात्री पटविल्यावर राणीची भेट घ्यावी. कोणाच्याहि महालांत एकदम जाऊं नये. राणीच्या महालांत लपून बसलेल्या भावानें भद्रसेनाचा खून केला. आईच्या शय्येंत लपलेल्या मुलानें कारूशाचा वध केला. लाह्यांना मध म्हणून विष लावून राणीनें काशी राजाचा घात केला. विषाचीं पुटें दिलेल्या नूपुरानें वैरंत्याला, कमरपट्ट्यांतील मण्यानें सौवीराला, आरशानें जालुथाला व वेणींत लपविलेल्या शस्त्रानें राणीनें विदूरथाला मारिलें. म्हणून या सर्व भयस्थानापासून आत्मसंरक्षण करून घ्यावें.

अंतःपुरांतील स्त्रियांनीं मुंड, जटिल व चेटके यांचा व बाहेरील दासींचा संपर्क टाळावा. कुलीन स्त्रियांचा संपर्क देखील गर्भव्याधीच्या प्रसंगाखेरीज इतर वेळीं होऊं देऊं नये. स्नानानें शुद्ध होऊन व नवीन वस्त्रालंकार परिधान करून वेश्यांनीं राजाची भेट घ्यावी. माता पित्यासारखे मानलेले ऐंशीच्या सुमाराचे पुरुष व पन्नाशीच्या सुमाराच्या स्त्रिया, वृद्ध खोजे व सेविका यांनीं अंतःपुरांत रहाणाऱ्यांची शुद्धाशुद्धता पहावी व त्यांना स्वामी हिताच्या मार्गाला लावावें.

सर्वांनीं आपआपल्या निर्दिष्ट जागेंत रहावें. दुसऱ्याच्या जागेंत भटकूं नये. अंतःपुरांतील लोकांनीं बाहेरच्या लोकांबरोबर संबध ठेवूं नये.

सर्व प्रकारच्या वस्तूंची येतां जातांना अडवन तपासणी करण्यांत यावी व मुद्रेनें निर्दिष्टस्थानीं त्याची रवानगी करावी.

---

# अध्याय एकविसावा.



## आत्मसंरक्षण.

शयनावरून उठल्यावर धनुष्यधारी स्त्रियांनीं राजाचें स्वागत करावें. दुसऱ्या चौकांत राजाचें कवच व शिरोवस्त्र देणारे सेवक, वृद्ध खोजे व अंतःपुरांतील इतर सेवक, तिसऱ्या चौकांत कुबडे, ठेंगू व किरात, चवथ्या चौकांत मंत्री, आप्त व भालाईत द्वारपाळ यांची भेट घ्यावी, वंशपरंपरेनें पदरीं असलेले, कुलीन, सुशिक्षित, अनुरक्त, कर्तृत्ववान् असे लोक राजानें जवळ करावे. ज्याचा द्रव्य अगर मान देऊन सत्कार केलेला नाहीं अशा परदेशी मनुष्याला किंवा दुष्कृत्यांत धरलेला पण क्षमा केलेला अशा स्वदेशी मनुष्याला राजानें जवळ करूं नये. अंतर्वंशिक सैन्यानें राजा व अंतःपुर यांचें रक्षण करावें.

सुरक्षित अशा ठिकाणीं बल्लवाधिकाऱ्यानें चवदार अन्न तयार करवावें. प्रथम वैश्वदेव करून व नंतर काक बळी देऊन तें राजानें खावें. अन्नांत विष असेल तर अग्नीची ज्वाला व धूर निळा होतो व आवाज निघतो आणि कावळे मरतात. अन्नाची वाफ जर मोराच्या मानेच्या रंगाची दिसेल व अन्न एकदम थंड होईल तर तें विषयुक्त समजावें. अन्नाचा रंग अनैसर्गिक दिसेल किंवा त्याला पाणी सुटेल अगर तें नीट शिजलें नसेल तर तें विषयुक्त समजावें. भाजींत विष असेल तर ती एकदम शुष्क होईल किंवा ती खतखतूं लागेल किंवा काळसर फेंस भाजींतन वेगळा निघेल किंवा तिचा वास, चव आणि स्पर्श बदलून जाईल. भांड्यांत विष असेल तर तें अधिक चकाकूं लागतें किंवा काळें पडतें, आणि त्याच्या कांठावर फेसाचें कडें होऊन रहातें. विषयुक्त तूप, तेल यांच्यामध्यें निळसर, दुधामध्यें तांबडी, दारु आणि पाण्यामध्यें काळी, दह्यामध्यें काळसर, मधामध्यें पांढरी रेघ दिसते. रसाळ फळें विषयुक्त झालीं असल्यास एकदम सुकतात किंवा लवकर कुजतात किंवा त्यांतून निळा, काळा असला फेंस निघतो. शुष्क द्रव्यें एकदम चुरडलीं जातात व त्यांचे रंग बदलतात. कठीण पदार्थ मृदू होतात व मृदु कठिण होतात—विषयुक्त पदार्थांच्या सांनिध्यांत क्षुद्र जंतु मरतात, वस्त्रें व प्रावरणें काळीं होतात, आणि त्यांचे धागे व केंस यांचे तंतु गळून पडतात, लोखंड व रत्नें यांच्यावर मल सांठवतो व त्यांचा स्पर्श, रंग, वजन व गुणधर्म बदलतात. हीं सर्व विषाचीं लक्षणें होत.

तोंड वळणें व काळें पडणें, बोलतांना अडखळणें, घाम सुटणें, पुनः पुनः जांभई देणें, कंप सुटणें, चालतांना अडखळणें, कोण काय बोलतो याच्याकडे कान देणें, भानावर नसणें, आपल्या कामांत दुर्लक्ष व आपल्या नेमलेल्या जागीं नसणें हीं सर्व विषप्रयोग करणाऱ्याचीं लक्षणें होत.

म्हणून विषवैद्य व रसायनज्ञ राजाच्या सांनिध असावेत.

वद्यानें औषधागारांतून चांगलें परीक्षित व शुद्ध औषध घेऊन औषधें तयार करणाऱ्यांसह स्वतः चाखून पाहून मग तें राजाला द्यावें. पाणी व दारु यांचीहि औषधाप्रमाणेंच खबरदारी घ्यावी. न्हावी व राजाला पोषाख घालणारा यांनीं स्नान करून व शुद्ध वस्त्रें परिधान करून अंतर्वंशिकाकडून मोहोरबंद उपकरणें घेऊन राजाची परिचर्या करावी. स्नान घालणें, अंगाचें मर्दन करणें, बिछाने घालणें, वस्त्रें धुणें व हार गुंफणें हीं कामें दासींनीं करावींत अथवा त्यांच्या देखरेखीखालीं कारागिरांनीं करावींत. वस्त्रें व माळा स्वतः पाहून द्याव्या. स्नानाचीं उटणें, सौगंधिक द्रव्यानें सुवासिक केलेलें वस्त्र इत्यादि स्नानाचीं उपकरणें स्वतःच्या बाहूवर व उरावर ठेवून राजाला द्यावीं. हीच खबरदारी इतरांकडून आलेल्या वस्तूविषयीं घ्यावी.

नटांनीं शस्त्र, अग्नी व विष हीं वर्ज करून खेळ करून राजाचें विनोदन करावें. त्यांचीं वाद्यें, घोडे, रथ, व हत्ती यांचे अलंकार अंतःपुरांतच ठेवावेत.

वंशपरंपरेच्या सेवकानें अधिष्ठित अशा यान वाहनावर राजानें आरोहण करावें. विश्वसनीय नावाड्यानें चालविलेल्या नावेंत राजानें बसावें. दुसऱ्या नावेला बांधलेल्या व वाऱ्यानें अनावर होणाऱ्या नावेंत बसूं नये. नदीतीरावर सैन्य असावें. नक्र वगैरे नाहींत अशी खात्री करून घेऊन जलक्रीडा करावी. साप वगैरे नाहींत अशी खात्री करून घेतल्यावर बागेंत फिरावयाला जावें. चललक्ष्याचा वेध करण्याच्या अभ्यासाकरितां व्याधांनीं व शिकारी कुत्रे बाळगणाऱ्यांनीं चोर, वाघ व शत्रू यांचा उपद्रव न होण्याची तजवीज केली असेल अशा मृगारण्यांत जावें. विश्वासूक व सशस्त्र अशा शरीरसंरक्षकाला बरोबर घेऊन सिद्ध व तापसी यांची भेट घ्यावी. मंत्रीपरिषदे समक्ष मांडलिकांच्या वकिलांची भेट घ्यावी. चिलखत घालून घोड्यावर, हत्तीवर अथवा रथावर बसून युद्धाला सज्ज झालेल्या सैन्याची तपासणी करावी. नगरांतून जातांना व येतांना दंडधारी पुरुषांनीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंवर पहारा ठेवावा व मार्गांतून सशस्त्र मनुष्य, संन्याशी व व्यंग असलेले लोक काढून लावावे. जेथें अतिशय गर्दी असेल तेथें जाऊं नये.

यात्रा व समाजोत्सव यांच्या वेळीं मिरवणुकीच्या रथावर सर्व वर्गाच्या पुढाऱ्यांना घेऊन बसावें.

ज्याप्रमाणें हेरांच्या सहाय्यानें शहाणा राजा इतरांचें संरक्षण करतो त्याप्रमाणेंच इतरांपासून त्यानें स्वतःचें संरक्षण करून घ्यावें.

॥ पहिलें अधिकरण समाप्त. ॥

---



# अधिकरण २ रें

## अध्यक्ष-प्रचार

## अध्याय २२ वा.

### गांवें वसविणें.

वस्तीशून्य झालेल्या जुन्या जागीं किंवा नव्याच ठिकाणीं राजानें नवीन गांवें वसवावींत. तेथें वसाहत करण्याला परदेशांतून लोक आणवावे किंवा आपल्या राज्यांतल्याच दाटवस्तीच्या भागांतून गर्दी कमी करण्यासाठीं फाजील लोकसंख्या नव्या गांवीं पाठवून द्यावी. गांवाचें क्षेत्रफळ एक ते दोन कोस असावें. गांवांतील घरांची संख्या १०० ते ५०० असावी. व त्यांत शेतकरी व शूद्र यांचा भरणा अधिक असावा. तीं गांवें संकट प्रसंगीं परस्पराला सहाय्य करूं शकतील इतक्या बेताच्या अंतरावर असावींत. गांवाच्या सीमेवर नदी, टेकडी, जंगल, दरी, सेतू, किंवा वड, पिंपळ, शमी व बोरी वगैरे झाडें यांची खूण असावी.

दहा गांवांमध्यें एक संग्रहण, दोनशें गांवामध्यें खार्वटिक, चारशें गांवांमध्यें द्रोणमुख व आठशें गांवांमध्यें एक स्थानीय स्थापावें. सरहद्दीवर देशाचे दरवाजेच असे किल्ले बांधावे व त्यावर सरहद्दीवरील अधिकारी ठेवावेत. त्यांच्यामधील येण्याजाण्याच्या वाटेवर फासे पारधी, भिल्ल, पुलिंद व चांडाल यांचा पहारा असावा.

ऋत्विज, आचार्य, पुरोहित व श्रोत्रिय यांना त्यांच्या योग्यतेनुरूप उत्पन्नाच्या जमिनी द्याव्या व त्यांच्याकडून दंड किंवा कर घेऊं नये. त्याचप्रमाणें अध्यक्ष ( पाटील ), कुलकर्णी, मुलकी अधिकारी, गुरांचे वैद्य, चाबूकस्वार, जासूद इत्यादिकांनाहि जमिनी द्याव्या; मात्र त्यांना त्या विकण्याचा किंवा गहाण टाकण्याचा अधिकार असूं नये.

जमिनीचा खंड देण्यास जे तयार असतील त्यांना लागवडीला योग्य अशीं शेतें त्याच्या हयातीपर्यंत द्यावीं. एखादे वर्षीं जमीन पड टाकली असली तरी ती कुळाकडून काढून घेऊं नये. पण जें कुळ जमीन कायमची पड टाकेल त्याच्या हातून ती काढून घ्यावी व ती गांवचे नोकर किंवा वैदेहक हेर यांना द्यावी. त्यांनीं ती जमीन पिकविली नाहीं तर त्यांच्याकडून दंड घ्यावा. जमीन लागवडीस आणतील तर त्यांना बैल, बीं, आणि तगाई द्यावी; व ती पकि आल्यावर त्यांच्याकडून वसूल करून घ्यावी.

शेतकऱ्यांना तगाई किंवा सूट द्यावयाची ती खजिन्याला तूट न येईल अशी द्यावी कारण ज्या राजाच्या खजिन्यांत शिल्लक नसते तो राजा नागरिकांना व गांवकऱ्यांना छळतो. नवीन वस्ती करण्याचे वेळीं किंवा त्यानंतरही जे कोणी येऊन राहतील त्यांना प्रथम कांहीं वर्षें सूट द्यावी. ती मुदत संपल्यानंतर देखील त्यांच्यावर पित्याप्रमाणें लोभ करावा.

खाणींतील द्रव्यांचा व्यवहार, जंगलाची व्यवस्था, रानहत्ती पकडणें, गौळवाडे, राजमार्गावरील बंदोबस्त, जलमार्गानें किंवा स्थलमार्गानें येणाऱ्या मालाच्या विक्रीसाठीं पेठ वसविणें इत्यादि कामें राजानें करावीं. बारमाही किंवा पावसाळ्यांत वाहाणाऱ्या नदीनाल्यांना धरण बांधावें; किंवा दुसरे कोणी धरण बांधतील तर त्यांना माती, लाकडें वगैरे सामान फुकट द्यावें. त्याचप्रमाणें देवालयें व बागबगीचे करवावे. गांवच्या लोकांनीं सहकारितेनें असलें सार्वजनिक काम सुरूं केल्यास त्या कामाला जो स्वतः सहाय्य करणार नाहीं त्याचे चाकर व बैल वेठीस धरावे. त्याच्या वाटणीचा खर्च त्याच्याकडून घ्यावा पण त्या कामापासून होणाऱ्या नफ्याचा अंश त्याला देऊं नये. धरण बांधलेल्या तलावांतील मासे, नावा व गवत यांच्यावर राजाचें स्वामित्व आहे. दास चाकर व भाऊबंद

यांच्या पोषणाची जर कोणी हयगय करील तर राजानें त्यास ताळ्यावर आणावें. बाल, वृद्ध, रोगी, व्यसनी, आणि अनाथ त्याच प्रमाणें पुत्रवती स्त्रियांचीं मुलें व अपुत्रवती स्त्रिया यांच्या पालन पोषणाची राजानें तजवीज करावी.

अज्ञान मुलें सज्ञान होईपर्यंत त्यांचें उत्पन्न व देवालयांचें उत्पन्न यांची व्यवस्था गांवांतलि वयोवृद्ध शिष्टांनीं पहावी. पत्नी, मुलें, मातापिता, सज्ञान न झालेले भाऊबंद, बहिणी, मुली, आणि कुटुंबांतील विधवा यांचें जो कोणी शक्ति असूनही पालन करणार नाहीं त्यास बारापण दंड करावा. मात्र हे आप्त जर जातिबहिष्कृत असतील तर हा नियम लागू नाहीं. माता जातिबहिष्कृत असली तरी तिचें पोषण केलेंच पाहिजे. स्त्रिया व मुलें यांच्या पोषणाची तजवीज न करतां जो संन्यास घेईल किंवा भार्येला संन्यास घ्यावयाला लावील त्यास २५० पण दंड करावा. कामवृत्तिशून्य पुरुषानें धर्माधिकाऱ्यांची संमति घेऊन संन्यास घ्यावा. न विचारतां संन्यास घेतल्यास त्याला शिक्षा करावी.

वानप्रस्थ सोडून इतर संन्यासी, राजाच्या कल्याणाखेरीज इतर हेतूनें स्थापलेले संघ आणि सहकारितेच्या कार्याखेरीज इतर उद्देशानें स्थापलेल्या मंडळ्यांना आपल्या हद्दींत राजानें राहूं देऊं नये.

खेडेगांवांत बगीचे व नाटकगृहें असूं नयेत. नट, नर्तक, गायक, वादक, भाट, व गोंधळी हे खेडेगांवांत राहिल्यानें शेतकामाला हरकत येते व या लोकापासून खेड्यांचें संरक्षण करण्याला साधन नसतें. खेड्यांतील लोक आपल्या शेतकामांत गुंतून राहतील तर द्रव्य, धान्य, लांकूड, रस, इत्यादिकांची वृद्धि होते.

परचक्राचे व रानटी लोकांचे हल्ले, सांथीचे रोग, व दुष्काळ यांनीं पीडलेल्या प्रांताचा राजानें बंदोबस्त करावा व आपल्या देशांत जुगारी सारखे खेळहि मना करावेत.

दंड, वेठ बिगार, कर, यांच्या ओझ्यानें जिकीरीस आलेल्या शेतीचें रक्षण करावें. चोर, हिंस्र पशु, विषप्रयोग आणि सांथीचे रोग यांच्यापासून गुराढोरांचें रक्षण करावें.

राजवल्लभ, वसुली कामगार, चोर, सरहद्दीवरचे रखवालदार आणि रानटी जनावरांचे कळप यांच्या उपद्रवानें लमाणांची रहदारी कमी होऊं लागली तर राजानें रस्त्यांचा नीट बंदोबस्त राखावा.

त्याचप्रमाणें खाणी, हत्ती, व वनस्पति असणारी जंगलें, पाटबंधारे ही पूर्वींची असतील त्यांचीं निगा राखून आपण त्यांची आणखी वाढ करवावी.

---

# अध्याय २३ वा.



## जमिनीचे विभाग.

लागवडीस योग्य नसलेल्या अशा भूमींत जनावराकरतां गायरान असावें. तपश्चर्या, सोमयाग व ब्रह्मकर्में करण्याकरतां ब्राह्मणांना व तपस्व्यांना जमीन द्यावी. ती गाईचें हंबरणें एकीकडून दुसरीकडे ऐकूं जाईल इतक्या लांबी रुंदीची असावी आणि त्या जमिनींतील झाडाझुडपांना व प्राण्यांना उपद्रव न होईल असें अभय द्यावें. तेवढ्याच क्षेत्रफळाचें एकच प्रवेशद्वार असलेलें व खंदकानें रक्षित असें मृगयावन राजाकरितां करावें. त्यांत रुचकर फळांचीं झाडें असावीं. कांटेरी झाडें झुडपें मुळींच नसावीं. पाणी अगदीं वर असलेलें तलाव असावें. त्या वनांत माणसाळलेलीं जनावरें, दांत व नखें काढलेले वाघ, शिकार करण्याला योग्य असे हत्ती, हत्तिणी व हत्तींचे छावे असावे.

या शिवाय सरहद्दीवर किंवा जेथें जागा सोईची मिळेल तेथें दुसरे एक शिकारीचें रान असावें व त्यांत वाटेल ते पशु येऊन राहण्याला वाट असावी. जंगलासंबंधींच्या भागांत ज्या वस्तू सांगितल्या आहेत त्यांचीं रानें वेगवेगळीं असावींत किंवा एकत्र असावींत. जंगलांतील वस्तूपासून पक्क्या वस्तू तयार करण्याचे कारखाने त्या जंगलानजीकच असावे.

अशा जंगलांचें रक्षण होईल अशा बेतानें सरहद्दीवर हस्तिवन राखावें. हत्तीच्या रानांवरील अधिकाऱ्यानें डोंगरावरील, नदीकांठच्या, सरोवराशेजारच्या व दलदलीच्या नागवनाची सरहद्द व येण्याजाण्याचे मार्ग यावर नजर ठेवून वनपालाकडून त्याचें रक्षण करावें. हत्तींची शिकार करणाऱ्यांना ठार करावे. आपोआप मेलेल्या हत्तीचे दांत आणून देणाऱ्याला सवा चार (४।) पण बक्षीस द्यावें. हत्तीच्या वनावरील अधिकाऱ्यांनीं आपल्याबरोबर माहूत, पायबंद लावणारे, सरहद्दीवरील संरक्षक, वनसंचारी हत्तींची शुश्रूषा करण्यांत चतुर असे लोक आणि पांचसात शिकविलेल्या हत्तिणी घेऊन हत्तीच्या मलमूत्रानें इतर वास लोपून टाकून व बिऱ्याच्या झाडाच्या खांद्यानीं शरीर झांकून घेऊन हत्तीचा माग काढावा. हत्ती बसण्याची जागा, त्यांची उठलेलीं पावलें, विष्ठा, नदीकांठची ढासळलेली दरड या चिन्हां-वरून हत्तीचा कळप केवढा आहे तें ओळखावें. तसेच हत्तींचा कळप एकत्र आहे काय का एकच हत्ती कळपांतून निघून हिंडतो आहे व तो केवढा आहे, मस्तीला आलेला आहे कीं काय, हिंसक आहे काय, बंधनांतून सुटून रानांत आलेला आहे कीं काय याचेंही अनुमान निरनिराळ्या खुणांवरून करावें. हत्तीच्या परिक्षकांनीं जीं लक्षणें प्रशस्त म्हणून सांगितलीं आहेत अशीं लक्षणें असलेले हत्ती पकडावे, कारण राजाचा विजय हत्तीवर अवलंबून असतो, शत्रूसैन्याचा व्यूह, किल्ल्याचें दार व शत्रूची छावणी ह्यांचें मर्दन करण्याला धिप्पाड शरीराचे व प्राणघातक हत्ती हें साधन आहे.

कलिंग, अंग तसेच चेदि, करूष व प्राच्यदेश यांतील हत्ती उत्तम; दशार्ण व अपरान्त यांतील हत्ती मध्यम; आणि सौराष्ट्र व पंजाब यांतील हत्ती कनिष्ठ समजले जातात. परंतु योग्य काळजी घेतली असतां सर्वच हत्तींचा तेज-स्वीपणा, वेग व पराक्रम वाढूं शकतो.

---

# अध्याय २४ वा.

## दुर्ग रचना.

आपल्या राज्याच्या सरहद्दीवर चारी दिशांना नैसर्गिक भूरचनेचा फायदा घेऊन युद्धोपयोगी अशा दुर्गाची रचना करावी. जलवेष्टित, खंदकानें वेष्टिलेले, डोंगरावरील दगडांत रचलेले किंवा खोदलेले, निर्जल व निर्वृक्ष अशा दलदलीनें ओसाड प्रदेशांत वसविलेले किंवा कुसळाचे गवतानें वेष्टिलेले, कांटेरी झाडांनीं घेरलेले असे किल्ल्याचे आठ भेद आहेत. यापैकीं जलदुर्ग व पर्वत दुर्ग यांच्या योगानें देशाचें रक्षण होतें. धान्वन (ओसाड प्रदेशांतील ) व वनदुर्ग यांनीं अटवी स्थानाचें रक्षण होतें किंवा संकटाचे वेळीं त्यांत आश्रय घेतां येतो.

देशाच्या मध्यभागीं देवघेवीचें केंद्र असें शहर वसवावें. वस्ती करण्याला प्रशस्त अशा प्रदेशांत, नदी-संगमावर किंवा कधींहि कोरडें न पडणाऱ्या सरोवराच्या किंवा तलावाच्या कांठीं स्थानीय बसवावें. जागेच्या सोयीप्रमाणें तें वर्तुळाकार, लांबट किंवा चौकोनी असावें. त्याच्या भोंवतीं सर्व दिशांना पाणी असावें. त्यांत निरनिराळ्या मालांच्या वेगवेगळ्या पेठा असाव्या व त्याला खुषकीवरून व पाण्यावरून येण्याचे मार्ग असावेत. त्याच्या भोंवती चार चार हातांच्या अंतरावर तीन खंदक असावेत. खंदकांची रुंदी अनुक्रमें चवदा, बारा व दहा दंड असावी आणि खोली रुंदीच्या तीन चतुर्थांश किंवा अर्धी असावी. तळाची रुंदी खंदकाच्या पाऊणपट असून तळाशीं फरशी केलेली असावी. त्याच्या बाजू दगड अथवा पक्क्या विटा यांनीं बांधून काढाव्या. खंदकांत जिवंत पाणी असावें किंवा बाहेरून पाणी सोडून तो भरावा. त्यांतील पाणी जाण्यालाहि वाट ठेवावी. खंदकांत कमळें व नक्र असावेत.

आंतल्या खंदकापासून चार दंडाच्या अंतरावर सहा दंड उंच आणि बारा दंड रुंद असा तट बांधावा. तो खालीं रुंद व वर निमुळता किंवा खालीं व वर सारख्याच रुंदीचा अथवा खालीं व वर निमुळता आणि मध्यें फुगीर असा

असावा. त्याच्यामध्यें मातीची भर घालून ती हत्ती व बैल यांच्याकडून तुडवावी, आणि त्यावर कांटेरीं झाडें व विषारी वेली लावाव्या. नवीन मातीनें तटाला असणारीं छिद्रें भरून काढावीं.

तटाच्या वर रुंदीच्या दुप्पट उंचीचे असे विटांचे बुरुज १२ हातांवर एक किंवा २४ हातांवर दोन असे करावे. तटावर रथ चालवितां येईल अशी वाट असावी आणि त्या वाटेच्या कडेला तालमूलाप्रमाणें किंवा मृदंगासारखे किंवा माकडाच्या डोकीच्या आकाराचे दगडांचे कठडे असावे. त्यांत लाकडाचा उपयोग करूं नये कारण लाकडाला अग्नीचें भय असतें.

तीस दंड अंतरावर रुंदीच्या इतक्याच उंचीचा चबुतरा करावा व त्यावर चढण्याला व उतरण्याला जिना असावा. तटावरील दोन चबुतऱ्यांच्या मध्यें रुंदीच्या दीडपट लांबी असलेली दुमजली व वर गच्ची असलेली अशी देवडी बांधावी. बुरुजांच्या व वाड्यांच्या मध्यंतरी तिघे धनुर्धारी बसतील एवढी पुढें आलेली खिडकी असावी व त्या खिडकीच्या झडपांना भोकें असून तीं वाटेल तेव्हां उघडतां झाकतां यावीं. तटावरून मध्यें मध्यें दोन हात रुंदीचे गुप्त रस्ते तटाच्या अनुरोधानें व तटाच्या कडेपासून आठ हात आंतल्या बाजूस असे करावे. दोन दंड किंवा चार दंड अंतरावर तटावर चढण्या उतरण्याला आंतल्या बाजूंस जिने बांधावे तटांत अवघड जागीं बाहेर निघून जाण्याला काढता घालता पूल असावा व त्याचा चोरदरवाजा या वाटेजवळ असावा.

तटाच्या बाहेरल्या बाजूस बाहेर पडण्याची गुप्त वाट करवावी; तिच्या मध्यें जानुभञ्जिनी, त्रिशूल, प्रकर, कूपकूट वगैरे घातक शस्त्रें; कांटे, सापाच्या हाडाचे सांगाडे, तालपत्र, शृंगाटक, श्वदंष्ट्रार्गल वगैरे हत्यारें वांकडी तिकडी ठेवलेलीं असावीत व तिच्या जवळ रोगट पाण्याचीं डबकीं असावीं अशा तऱ्हेनें ती वाट झाकलेली असावी. दाराच्या दोन्ही बाजूला कमानी करून सहा हात रुंदीचा दरवाजा सहा रस्त्यांना एक असा करावा किंवा दरवाज्यामधील अंतर वीस हातापासून बत्तीस हातांपर्यंत असावें व दरवाज्याची उंची आठ हात असावी किंवा रुंदीपेक्षां एक षष्ठांशानें किंवा एक अष्टमांशानें अधिक असावी. तटाच्या आंत एक वाडा असावा. त्याचे खांब पंधरा हातापासून १८ हातापर्यंत उंच असावे. त्या खांबाचा परीघ तळाशीं उंचीच्या एक षष्ठांश असावा व टोंकाशीं त्याच्या एक चतुर्थांश असावा व खांबाचा एक तृतियांश भाग जमिनींत पुरला जावा.

---

# अध्याय २५ वा.



## किल्ल्यांतील नगररचना.

किल्याच्या आंत पूर्व पश्चिम असे तीन आणि दक्षिणोत्तर तीन असे सहा रस्ते आखून नगराचे भाग पाडावे. त्या नगराला बारा दरवाजे असावे व त्यांतले कांहीं दरवाजे जमिनीवरून, कांहीं पाण्यांतून व कांहीं भुयारांतून जातां येईल असे असावे. गांवांतले सामान्य रस्ते चारदंड रुंदीचे असावे. राजमार्ग, त्याचप्रमाणें द्रोणमुख, स्थानीय, जनपद, गायरानें, उतारपेठा, छावणी, स्मशान यांना जाणारे रस्ते आठ दंड रुंदीचे असावे. धरणावरील आणि वनाला जाणारे रस्ते चार दंड रुंदीचे असावे. हत्तीच्या रानाला जाणारा रस्ता दोन दंड असावा. गाडीचा रस्ता पांच अरत्नी ( मुंढा हात ), गुरांचा रस्ता चार अरत्नी आणि शेळ्या, मेंढ्या व माणसें जाण्याचा रस्ता दोन अरत्नी असावा. शहराच्या मध्यापासून उत्तर दिशेला नवव्या भागांत बळकट अशा जागीं व जेथें चारहि वर्णांची वस्ती आहे अशा जागीं राजवाडा बांधावा. तो उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख असावा व त्याची रचना निशान्तप्रणिधी प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें असावी. राजवाड्याच्या ईशान्येला आचार्य, पुरोहित, यज्ञागार व जलागार आणि मंत्र्यांची राहण्याची जागा असावी. आग्नेय दिशेला पाकशाळा, हस्तीशाळा (?)

व कोठी असावी. पूर्वेच्या बाजूला गंध, माल्य, धान्य, रस यांचे व्यापारी, प्रमुख कारागीर व क्षत्रिय यांची वस्ती असावी. त्याच्या दक्षिणेला खजिना, सराफकट्टा व कारखाने असावे. नैर्ऋत्य भागांत वन्यवस्तु व आयुधें यांचें आगर असावें. वाड्याच्या दक्षिण दिशेला नगराध्यक्ष, धान्याध्यक्ष, व्यापाराध्यक्ष, कारखान्यांचा अध्यक्ष व सेनाध्यक्ष तसेंच पक्कान्नें, सुरा व मांस विकणारे, वेश्या, नट, व वैश्य यांचा वास असावा. वाड्यांत नैऋत्येला गाढवें व उंट यांचे गोठे व त्यांच्या कामाची जागा असावी. वायव्य भागांत रथादि वाहनें ठेवण्याची जागा असावी. त्याच्या पलिकडे पश्चिमेला लोंकरीचीं व कापसाचीं वस्त्रें करणारे, बुरुड, चामडें कमावणारे, चिलखतें शस्त्रें, म्यानें यांचे कारागीर आणि शूद्र यांनीं राहावें. नैर्ऋत्येला दुकानें व औषधिशाला असावी. ईशान्य भागांत कोठार, गोशाला, अश्वशाळा असावी. त्याच्या पलीकडे देवालयें, लोहार, जवाहिर, आणि ब्राह्मण यांचें स्थान असावें. मध्यंतरीं जागा असेल तेथें स्थानिक व्यापारी व परदेशी व्यापारी यांचे संघाची जागा असावी.

शहराच्या मध्यभागीं अपराजिता ( लक्ष्मी ), अप्रतिहत ( विष्णू ), जयंत ( कार्तिकस्वामी ), वैजयंत ( इंद्र ) शिव, कुबेर, अश्विनीकुमार, मदिरा ( चामुंडा ) इत्यादि देवतांची देवळें करवावीं. त्या देवालयांतून वास्तुदेवतांना त्यांच्या त्यांच्या योग्य जागीं स्थान द्यावें. दरवाजावर ब्रह्मा, इंद्र, यम व कार्तिकस्वामी यांची स्थापना करावी. खंद-काच्या बाहेर चारशें हातांच्या पलीकडे चैत्य वृक्षाचे पार, मठ, तीर्थें, सेतु वगैरे करवावे. दशदिशांना त्या त्या दिशेच्या देवतांची स्थापना करावी.

गांवाच्या उत्तरेला व पूर्वेला स्मशान असावें. दक्षिण दिशेला श्रेष्ठवर्णाच्या लोकांचें स्मशान असावें. त्याचा कोणी अतिक्रम केल्यास अडीचशें पण दंड करावा. पाखांडी व चांडाल यांची वस्ती स्मशानापलीकडे असावी. कामाच्या गरजे-प्रमाणें किंवा जागेच्या सोयीप्रमाणें कुटुंबांना जागा आंखून द्यावी. तींत अधिकाऱ्यांच्या परवानगीनें त्यांनीं फुलबाग, फळबाग, राई, व मळे करावे. धान्य व किराणा माल यांचीं कोठारें करावीं. दहा दहा घरांच्या समूहाला एक एक विहीर असावी. तेल, तूप, धान्य, सैंधव, मीठ, औषधें, वाळविलेल्या भाज्या, सातू, वाळविलेलें मांस, गवत, लांकडें धातु, कांतडीं, कोळसे, तात, विष, शिंगें, वेळू, वल्कलाला लागणाऱ्या साली, इमारती लांकडें, हल्ला करावयाचीं व संरक्षक हत्यारें, गोटे, यांचा अनेक वर्षे पुरेल असा संग्रह करून ठेवावा. नवीन संग्रह हातीं आला म्हणजे जुना काढून टाकावा.

हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांच्यावर अनेक अधिकारी नेमून त्यांची किल्यांत स्थापना करावी. अनेक अधि-कारी नेमले म्हणजे एकमेकाच्या भयानें ते शत्रूला फितूर होत नाहींत. अशाच रीतीनें सरहद्दीवरील दुर्गांची व्यवस्था ठेवावी.

किल्ल्यामध्यें शहर व राज्य यांचा घात करणारे विहार स्थापूं देऊं नयेत. यांना जनपदांत स्थान द्यावें व त्या सर्वांना कर द्यावयाला लावावें.

---

# अध्याय २६ वा.

## भांडाराधिपति.

भांडारावरील मुख्य अधिकाऱ्यानें खजिना, किराणामाल, भुसारमाल, वनस्पती व हत्यारें हीं ठेवण्यासाठीं आणि कैद्यांना कोंडून ठेवण्यासाठीं निरनिराळीं बंदोबस्ताचीं आगारें बांधवावीं.

जिथें पाणी किंवा लोणा लागणार नाहीं अशा ठिकाणीं चौकोनी विहीर खोदावी. तिचा तळ आणि सगळ्या बाजू मोठाल्या फरशांनीं बांधून काढाव्या. तिला भुईसपाट अशी बळकट लांकडाचीं दारें असावीं. तिच्यांत तीन मजले

व अनेक कोठड्या असाव्या. वरचें दार संगमरवरी फरशीच्या खालीं असावें. त्यांतून खालीं उतरण्याला कळीचा जिना असावा आणि दरवाज्याच्यावर देवतेची स्थापना करून दार लोपवून टाकावें. त्याच्यावर खालून व वरून शिरकाव न होण्याजोगा सभोंवतीं कठडा असलेलें, कोशसंरक्षकांच्या पहाऱ्याच्या जागा सभोंवतीं असलेलें, विटांचें कोशगृह बांधावें; किंवा पूर्वीं सांगितल्या प्रकारचा वाडा बांधावा. सरहद्दीवर संकटाचे प्रसंगीं उपयोगी पडण्यासाठीं गंगाजळी ठेव ठेवण्याचें गुप्तगृह वध्यपुरुषाकडून तयार करवावें.

पक्क्या विटांचे खांब असलेलें, चौसोपी, एकचदार असलेलें, अनेक मजले असलेलें, मोठ्या खांबामधून ओट्यावर बसण्याची जागा असलेलें असें पण्यगृह असावें. विस्तृत आणि अनेक चौक असलेलें व भिंतींत कोनाडे असलेलें कोष्ठागार करावें. व त्यांतच कुप्यगृह असावें. आणि कोष्ठागाराखालींच तळघर करून तिथें आयुधागार करावें. ज्याच्या भिंतीमधून बाहेर जातां येणार नाहीं असें, स्त्रीपुरुषांची तसेंच राजकीय आणि साधे कैदी यांची पृथक् व्यवस्था असलेलें असें बंधनागार करावें.

या सर्व इमारतीमधून दिवाणखाने, भुयारें, विहिरी, तसेंच अग्नि आणि विष यापासून सुरक्षित अशीं स्नानगृहें असावींत. व त्यांतून मांजरें व मुंगसें पाळावींत आणि प्रत्येक आगरांमधून अनुरूप देवतांची पूजा अर्चा चालू असावी. कोठीमध्यें अरत्नीच्या ( २४ अंगुळें ) घेराचें पाऊस मोजण्याचें कुंड असावें. त्या त्या तज्ज्ञांच्या मदतीनें भांडागाराधिपतीनें जुनीं आणि नवीं रत्नें, बहुमूल्य सामान, वस्त्रें व वनस्पती ही पारखून घ्यावींत. रत्नांच्या बाबतींत फसविणाऱ्याला व फसणाऱ्याला सर्वांत मोठी शिक्षा करावी, मूल्यवान वस्तूंच्या बाबतींत मध्यम दंड करावा; वस्त्रें व वनस्पती याच्या बाबतींत त्यांच्या किंमतीइतकाच दंड करावा. परिक्षकांनीं शिक्क्याची परीक्षा केल्यावर नाणें खाजिन्यांत घ्यावें. खोटें नाणें तोडून टाकावें व खोटी नाणीं आणणाऱ्याला पूर्वसाहस ( अडीचशे पण ) दंड करावा. कोठीमध्यें शुद्ध, बरोबर माप घेतलेलें असें नवीन धान्य सांठवावें. याच्या उलट वागल्यास मूळ धान्याच्या किंमतीच्या दुप्पट दंड करावा. हाच न्याय किराणामाल, वनस्पती व शस्त्रें यांना लागू करावा. सर्वच स्थानीं मुख्य अपराधी, त्याचा सहकारी व त्यांचे अनुचर यांना ४, २ व १ पण असा क्रमानें दंड करावा. पुनः पुनः अपराध केला असतां उत्तम, मध्यम, प्रथम दंड क्रमानें करावेत. कोशाध्यक्षानें कोशाचा नाश केला असतां त्याला मारून टाकावें. व त्याच्या अंतरंगांतील अनुचरांना अर्धदंड करावा. त्यांना झालेला प्रकार अज्ञात असल्यास एकवार इशारा द्यावा. हल्ला करण्याचें सोंग करून चोरांना पळण्याची सूचना देणाऱ्यांना छळ करून जिवें मारावें. याप्रमाणें विश्वसनीय पुरुषांच्या सहाय्यानें कोशपालानें संग्रहाचा बंदोबस्त ठेवावा.

कोशपालाला शेकडो वर्षांपासूनची जमाखर्चाची माहिती असावी; आणखी त्यानें विचारतांच न अडखळतां ती सांगावी व शिल्लक रक्कम बरोबर दाखवून द्यावी.

---

# अध्याय २७ वा.



## समाहर्त्याच्या ( फडणीसाच्या ) कर वसुलीचा विचार.

समाहर्त्यानें दुर्ग, राष्ट्र, खाणी, सेतू, वनें, गौळवाडे, व्यापाराचे मार्ग यांच्यावर देखरेख ठेवावी.

दुर्ग म्हणजे शहर या सदरांत जकात, दंड, वजनें, मापें, नगराध्यक्ष, सीमा तपासणारा, टांकसाळ कामगार, मद्यगृहें, कत्तलखाने, कोष्टी, तेल, तूप, मीठ, सोनें विकणारे, मंडई, वेश्यागृहें, जुगारांचे अड्डे, वास्तुस्थलें, सुतार वगैरे कारागीर, देवाचे पुजारी, बाहेरून गांवांत येणाऱ्या मालावर वेशींत घ्यावयाचा कर या सर्वांचा समावेश होतो.

राष्ट्र ( जनपद ) शब्दांत शेरींचें उत्पन्न, शेतसारा, यात्रेकरूंवरील कर, रोकड कर, व्यापारी, तीर्थरक्षक, तरी, नावा, गांव, कुरणें, रस्ते, जागले व चोर पकडणारे यांच्या देण्याघेण्याचा समावेश होतो.

सोनें, रुपें, हिरे, मोतीं, पोवळें, शंख, लोह, सैंधव, माती, शिला, पारा व धातू, यांचा खाणींत समावेश होतो.

फुलें, फळें, पानमळे, भातगड्डे, वाफे या सर्वांचा सेतूंत समावेश होतो.

पशु, मृग, इमारती लांकडें, हत्ती, यांचा वसूल वन शब्दांत येतो.

गाई, म्हशी, शेळ्या, मेंढ्या, गाढवें, उंट, घोडे, खेचरें यांचा व्रज शब्दांत समावेश होतो.

खुष्कीवरून व पाण्यावरून व्यापाराचे मार्ग ते वणिक्पथ होत.

वर सांगितलेल्या या उत्पन्नाच्या बाबी होत. धान्यादि विक्रीची किंमत, खंड, व्याज, भाडें, मक्ते, नाणीं पाडून देण्याबद्दलचा कर आणि दंड हे सर्व वसुलाचे प्रकार होत.

देवपूजा, पितृकार्यें, दानधर्म, शांतिकारक कर्में, अंतःपुर, भोजनगृह, वकिलातीचा खर्च, कोठी, शस्त्रागार, पदार्थसंग्रहालय, वनस्पती संग्रहालय, कारखाने, वेठ, पायदळ, घोडदळ, रथ, हत्ती, खिल्लार, पशुपक्षीसंग्रहालय, तृण-काष्ठसंग्रह हीं खर्चाचीं स्थानें होत.

राज्याभिषेक शक, महिना, पक्ष, दिवस, उषःकाल, हे कालभाग होत. वर्षांत पावसाळा, हिंवाळा व उन्हाळा हे तीन काल असून त्या प्रत्येकांतील तिसरा व सातवा पंधरवडा एकेक दिवसानें कमी असतो. बाकीचे पूर्ण असतात. यांशिवाय अधिक महिना येईल तो वेगळा. चालू काम, पुरें झालेलें काम, अपुरतें राहिलेलें काम, यांचा जमाखर्च लिहून शेवटीं राहिलेली शिल्लक काढावी. चालूकारभार, नवीन कामें, जुन्या कामाची रिपेरी, करवसुली, वसूल एकत्र भरणा करणें, व त्यांचा हिशेब ठेवणें हीं कामें करणीय सदरांत येतात.

खजिन्यांत टाकलेले, राजानें घेतलेले, पक्का जमाखर्च झालेले, सालगुदस्तावरून शिल्लक ओढलेले, लेखी व तोंडी हुकूमानें खर्च झालेले, आकस्मिक खर्च केलेले, हे सर्व सिद्ध शब्दांत येतात.

संपलेल्या कामाचा घ्यावयाचा हिशेब, दंडाचा राहिलेला वसूल, विगर परवानगीनें थकलेल्या वसूलाची उगवणी, शिल्लक मालाची किंमत, तसलमातीचा हिशेब, याला शेष असें म्हणतात. यांतला वसूल थोडा येईल किंवा मुळींच येणार नाहीं.

जमेचे चालू, मागील शिल्लकी व आकस्मिक असे तीन प्रकार आहेत. ज्या त्या वेळच्या वेळीं येणारी ती चालू जमा. गतसंवत्सराची किंवा एका कामगारानें अधिकार सोडतांना दुसऱ्याच्या हवालीं केलेली ती शिलकी जमा होय.

मालकाचा पत्ता न लागलेली, मालकाच्या विस्मरणानें राहिलेली, अधिकाऱ्यांकडून घेतलेला दंड, कायद्याचा दुरुपयोग करून केलेला वसूल, नुकसान भरपाई, नजराणा, परमुलुखांतील लूट, बेवारसीइस्टेट हे सगळे आकस्मिक जमेचे प्रकार होत.

गुंतवलेल्या भांडवलाचा हप्ता, दिवाळें निघालेल्या कामांतील शिल्लक, मंजूर केलेल्या खर्चांतून राहिलेली शिल्लक, ही खर्चांतून परत आलेली बचत समजावी.

सरकारी कोठींतील माल महागाईनें विकून झालेला नफा, मापांत कमी जास्तपणा असल्यामुळें होणारा नफा, लिलावांतील चढाओढीनें आलेली जादा किंमत हेही जमेचेच प्रकार आहेत.

व्यय चार प्रकारचा—नित्य, नित्यानुषंगी, लाभ व लाभानुषंगी. रोजच्या रोज होणारा खर्च तो नित्य समजावा. पक्ष, मास, वर्ष अशा कालांतरानें ज्या खर्चापासून परत प्राप्ती होते त्या खर्चाला लाभ म्हणावें आणि या दोन्ही प्रकारच्या खर्चाच्या अनुषंगानें होणारा तो नित्योत्पादिक व लाभोत्पादिक खर्च होय.

एकंदर खर्चाचा हिशेब करून जमाखर्चांत जी शिल्लक राहते तिला नींवी म्हणतात. ही शिल्लक दोन प्रकारची एक रोख व दुसरी हिशेबी.

यापमाणें शहाण्या समाहर्त्यानें जमाखर्च ठेवावा. त्यांत जमा वाढती असावी व खर्चात काटकसर दाखवावी आणि याच्या उलट प्रकार होऊं लागला तर त्याचें निवारण करावें.

---

# अध्याय २८ वा.

## दप्तरदार कचेरी व हिशेबनिसाचें कर्तव्य.

दप्तरदारानें पूर्वाभिमुखी किंवा उत्तराभिमुखी अशी कचेरी करवावी; तींत निरनिराळ्या कामगारांना बसावयाला वेग-वेगळी जागा असावी व हिशेबाच्या वह्या ठेवण्याची जागा असावी; हिशेबांच्या पुस्तकांत उत्पन्नाच्या खात्यांची नांवानिशी, राष्ट्रांतील उत्पन्नाच्या बाबी, कारखान्याकडे दिलेल्या द्रव्यांपैकीं नफा, नुकसान, खर्च, धान्यांचे दर, वजनें व मापें यांतील फरकानें होणारा वाढावा, मालाचें उत्पत्तीस्थान, मजुरीचे आणि बिगारीचे दर, रत्नें व भारी व हलक्या जंग-लांतील मालाची किंमत, मोबदला, वजन, माप, आकार, मूळ किंमत हें सर्व नमूद करावें. त्याचप्रमाणें देश, गांव, जात, कूळ, संघ यांच्या धार्मिक व सामाजिक चालीरीति व स्वभाव विशेष; राजावर अवलंबून असलेल्यांचा आदरसत्कार, त्यांच्याकडील जमिनीचा भोगवटा, करमाफी, भत्ता व पगार; राजपत्नी व राजपुत्र यांना दिलेलें जवाहीर, जमीन व विशेष सवलती, संकट प्रसंगीं विशेष सहाय्य, नमूद करावे. तसेंच शत्रू, मित्र, यांच्याशीं होणारे संधि, विग्रह, नज-राणा व खंडणी या सर्वांची नोंद दप्तरांत असावी.

तसेंच सर्व खात्याधिकाऱ्यांनीं करावयाचें काम, त्यांतलें झालेलें काम, शिल्लक राहिलेलें काम, जमा, खर्च शिल्लक, कामाची वेळ, कामाची वहिवाट व स्वरूप हे सर्व वहींत नोंदून ठेवावें. उत्तम, मध्यम व कनिष्ठ कामांवर त्या त्या लायकीचे अधिकारी नेमावे. अनेक उमेदवार असतील तर त्यांत जो अधिक योग्य असेल व ज्याच्या हातून चूक झाली असतां शिक्षा केल्यानें राजाला पश्चात्ताप करण्याची पाळी येणार नाहीं त्याला नेमावें.

सोपविलेलें काम एखाद्याच्या हातून न झाल्यास त्याचे सहकारी, जामीनदार, त्याच्या कामावर उपजीविका करणारे, पुत्र, बंधु, भार्या, कन्या अगर नोकर यांनीं तें नुकसान भरून द्यावें. कामाचें वर्ष ३५४ दिवसांचें समजावें. ते आषाढी पौर्णिमेस संपावें. त्यांत कामाचे दिवस उणे किंवा पुरे असतील त्याप्रमाणें उणा किंवा पुरा पगार द्यावा. अधिक महिन्याचा हिशेब हिशेबनिसानें वेगळा करावा.

सर्व चालू कामावर हेराकडून देखरेख ठेवावी. कामाचा शिरस्ता व स्वरूप याची ज्यानें माहिती करून घेतली नाहीं तो अधिकारी अज्ञानामुळें उत्पन्न बुडवितो. ज्याला फिरतीचे श्रम सहन होत नाहींत तो आळसामुळें, शारीरिक व्यंगें असल्यास त्या दोषानें, भित्रा मनुष्य ओरड, पापाची किंवा अनर्थाची भीति यांच्या भयामुळें, कार्यसाधु लोकांवर उपकार करणारा आपल्या स्वार्थबुद्धीनें, क्रूर स्वभावाचा मनुष्य आपल्या क्रोधानें, विद्या, द्रव्य व वशिला असणारा गर्वानें, नर्तक, गणिका यांच्या नादीं लागणारा लोभानें, राजाचें नुकसान करतो.

या दोषामुळें जें नुकसान होईल त्याबद्दल पहिल्या दोषाबद्दल एकपट, दुसऱ्याबद्दल दुप्पट असा अनुक्रमानें चढता दंड घ्यावा. असें मनुसांप्रदायाचें मत आहे.

' सर्वांच्याकडूनच आठपट दंड घ्यावा ' असें पाराशर म्हणतात; ' दसपट दंड घ्यावा ' असें बृहस्पतीचे शिष्य व ' वीसपट दंड घ्यावा ' असें शुक्राचार्यांचे सांप्रदायी सांगतात.

' अपराधाच्या मानानें दंड करावा ' असें कौटिल्याचें मत आहे.

हिशेब लिहिणाऱ्यांनीं आषाढी पौर्णिमेला आपापले हिशेब घेऊन यावें. सीलबंद पुस्तकाची पेटी व शिल्लक घेऊन आलेल्यांना एकमेकाशीं खलबत करूं देऊं नये. जमा, खर्च व शिल्लक यांचे ताळेबंदांचे आंकडे त्यांना विचारावेत व

शिल्लक मोजून घ्यावी. दिलेल्या रकमेपेक्षां वहींतली शिल्लक अधिक असेल किंवा सांगितलेल्या खर्चापेक्षां वहींतला खर्च कमी असेल तर जो फरक येईल त्याच्या आठपट रक्कम त्या कामगाराकडून घ्यावी. याच्या उलट प्रकार झाल्यास जी शिल्लक घेतली ती कायम समजावी. जे अधिकारी वेळेवर हिशेब देण्यास येणार नाहींत, अथवा हिशेबाची वही व शिल्लक बरोबर आणणार नाहींत त्यांना त्यांच्याकडून यावयाच्या रकमेच्या दसपट दंड करावा. हिशेब घेऊन अधिकारी आले असतां तपासनीस त्यांचे हिशेब न तपासील तर त्याला ४८ पासून ९६ पण दंड करावा. उलटपक्षीं हिशेब न देणाऱ्यास दुप्पट दंड करावा.

सर्व अमात्यांनीं एकत्र जमून एकमतानें शिरस्ता जाहीर करावा. त्यांच्यांतून जो कोणी फुटून वेगळाच नियम सांगेल त्याला उत्तम दंड करावा. ज्या दिवशीं हिशेबी शिल्लक आणून भरणा करावयाची त्या दिवशीं जो भरणा न करील त्याची एक महिना वाट पहावी व त्यानंतर दर महिन्यास दोनशें पण दंड करावा. भरणा करावयाची रक्कम अल्प असेल तेव्हां पांच दिवस वाट पहावी, न आल्यास दंड करावा.

हिशेब घेऊन शिल्लक भरणा करण्याकरितां अधिकारी आला असतां धर्म, व्यवहार, चारित्र्य, वहिवाट, ताळेबंद, तर्क, आणि हेरांची देखरेख इतक्या प्रकारांनीं त्याची परिक्षा करावी. दिवस, पांच दिवस, पक्ष, महिना, चार महिने व वर्ष अशा क्रमानें हिशेबाचा ताळा पहावा. दिवस, देश, काल, उत्पन्नाची बाब, वसूल, मोबदला, दाखला, वसूल ठरविणारा, हिशेब लिहिणारा व वसूल करणारा यांच्याशीं जमेचा मेळ पहावा. दिवस, देश, काल, खर्चाची बाब, लाभ, कारण, खर्चाची रक्कम, प्रत्यक्ष दिलेली रक्कम, अंदाज, मंजुरी देणारा, रक्कम घेणारा, खजिनदार, वसूल करणारा यांच्याशीं खर्चाचा मेळ पहावा. दिवस, देश, काल, शिलकेचा प्रकार, मेळ, नाण्यांची शुद्धाशुद्धता, वजन, तिजोरीच्या पहाऱ्याचा बंदोबस्त यांचा विचार शिल्लक तपासतांना करावा.

भरणा करण्याकरितां रक्कम आणली असतां जो जमा करून घेत नाहीं किंवा हुकूम मोडतो किंवा हिशेबांत भलताच जमाखर्च दाखवितो त्याला ४८ तें ९६ पण दंड करावा. जो लेखक हिशेब पद्धतशीर लिहित नाहीं, भलत्याच प्रकारानें लिहितो, न समजण्यासारखे लिहितो किंवा पुनरुक्ती करतो त्याला बारा पण दंड करावा. शिल्लक लिहितांना चुकला तर दुप्पट दंड, अफरातफर केली तर आठपट दंड, शिल्लक गहाळ केली तर रक्कम भरून घेऊन शिवाय पांचपट दंड, खोटा हिशेब सांगेल तर चोराइतका दंड, मागाहून रक्कम लिहिली असतां किंवा विसरलेली रक्कम आठवण झाल्यावर लिहिली असतां दुप्पट दंड घ्यावा.

थोडासा अपराध असल्यास क्षमा करावी, थोडादेखील नफा करून दाखविल्यास गौरव करावा आणि जो अधिकारी मोठाच उपकार करील त्याला बढती द्यावी.

---

# अध्याय २९ वा.



## द्रव्योत्पत्तिस्थानावरील अधिकाऱ्यानें अफरातफर केलेलें द्रव्य परत आणणें.

सर्व कामांना प्रारंभ कोशापासून होतो म्हणून प्रथम कोशाची काळजी घ्यावी. देशांतील कारखान्यांची समृद्धि, शीलरक्षण, चोरांचा बंदोबस्त, अधिकाऱ्यांवरील कदर, शेतांची सुपिकता, व्यापारी मालाची विपुलता, आधिभौतिक संकटापासून बचाव, वसूलाची सूट न देणें, रोख नजराणा हीं सर्व कोशाच्या वृद्धीचीं साधनें होत.

प्रतिबंध, व्याजानें द्रव्य देणें, देवघेव, खोटे हिशेब करणें, वसूल न करणें, उपभोग, अदलाबदल, व अफरातफर हें कोशाचा नाश होण्याचे मार्ग होत.

वसूल न करणें, दिलेला वसूल न घेणें व घेतलेल्या वसूलाचा खजिन्यांत भरणा न करणें याला प्रतिबंध म्हणतात. त्याबद्दल दसपट दंड करावा. खजिन्यांतील द्रव्य व्याजानें देणें याला प्रयोग म्हणतात. भांडारांतील मालाचा विक्रय करणें हा व्यवहार होय. या दोन्ही बाबतींत नफ्याच्या दुप्पट दंड करावा. वसूल करावयाच्या तारखा लबाडीनें मागें पुढें करणें याला खोटा जमाखर्च म्हणतात; त्याबद्दल पांच पट दंड घ्यावा. ठराविक उत्पन्न कमी करणें किंवा खर्च वाढविणें याला परिहापण म्हणतात. या बाबतींत नुकसानीच्या चौपट दंड करावा. सरकारी द्रव्याचा स्वतः किंवा आपल्या माणसाकडून उपभोग घेणें याला उपभोग म्हणतात. त्यांत रत्नांचा उपभोग घेणाऱ्यांस देहान्त शिक्षा, मूल्यवान् वस्तूंचा उपयोग करणाऱ्यांस मध्यमसाहसदंड; हलक्या किंमतींच्या जंगली वस्तूंचा उपभोग घेतल्यास त्याची किंमत घेऊन वर तितकाच दंड करावा. सरकारी द्रव्य घेऊन त्याच्याच जागीं दुसरी वस्तु ठेवणें याला परिवर्तन म्हणतात. याला उपभोगाप्रमाणेंच शिक्षा करावी. वसूलाचा भरणा न करणें, ठरलेला खर्च लिहून त्याला न देणें, शिल्लक हातीं आली असून हातांत आली नाहीं असें म्हणणें याला अपहार म्हणतात. याला बारापट दंड करावा.

अधिकाऱ्यांचें राजद्रव्याचें हरण करण करण्याचे प्रकार चाळीस आहेत. ते असेः—अगोदर वसूल केलेली रक्कम मागून मांडतात; कांहीं काळानें वसूल करावयाचा, तो आजच मांडून टाकतात; जो वसूल सहज मिळविण्यासारखा आहे, तो वसूल करीत नाहींत; जो वसूल घ्यावयास नको, तो घेतात; जो वसूल झाला असेल तो झाला नाहीं असें मांडतात; जो झाला नाहीं तो झाला असें दाखवितात; थोडा झाला असेल तो पुष्कळ दाखवितात; पुष्कळ झाला असेल तो थोडा दाखवितात; एका सदराखालीं आलेला वसूल, भलत्या सदरांत दाखवितात; एका माणसाकडून आलेला वसूल दुसऱ्यामाणसाकडून आलेला दाखवितात; जें दिलें पाहिजे तें देत नाहींत; जें द्यावयास नको तें देतात; जेव्हां द्यावयास पाहिजे तेव्हां देत नाहींत; जेव्हां द्यावयास नको तेव्हां देतात; थोडें दिलेलें असून पुष्कळ दिलें असें दाखवितात; पुष्कळ दिलेलें असून थोडें दाखवितात; अमुक वस्तु द्यावयाची ती न देतां तिच्या ऐवजीं दुसरीच देतात; एकास द्यावयास सांगितलें असतां दुसऱ्या कोणास देऊन टाकतात; खजिन्यांत भरण्याकरितां रक्कम आली असूनहि ती भरीत नाहींत; खजिन्यांत भरणा न करितां भरणा केला असें दाखवितात; ज्यांची किंमत आली नाहीं असा कच्चा माल नोंदून टाकितात; ज्यांची किंमत वसूल झाली, त्यांची नोंद करीत नाहींत; जो वसूल एकदम ठोक रकमेनें करावयास पाहिजे तो हत्या हत्यानें करितात; जो हत्या हत्यानें करावयास पाहिजे, तो ठोक रकमेनें करितात; भारी किंमतीची वस्तु देऊन हलक्या किंमतीची वस्तु घेतात; हलक्या किंमतीची वस्तु देऊन तिच्या बदली भारी किंमतीची वस्तु घेतात; ठराविक किंमती वाढवितात; ठराविक किंमती उतरवितात; रात्री ( दिवस ) वाढवितात; रात्री ( दिवस ) कमी करतात; वर्ष व वर्षांतील महिने यांतील मेळ घालवून टाकितात; महिना व महिन्याचा दिवस यांतील मेळ नाहींसा करितात; मजुरी देतेवेळीं अमुक अमुक मनुष्य गैरहजर असल्यामुळें त्याची मजुरी देणें राहिली आहे, या सबबीनें ती काढून घेतात; उत्पन्नाच्या सदरांत विरोध दाखवितात; धर्मादायांत लबाडी करितात; तयार झालेल्या कामांत लबाडी करितात; ठोक रक्कम किंवा ठोक माल देतांना लबाडी करितात; सोन्या रुप्याच्या कामांत लबाडी करितात;—अथवा अमुक वर्णाच्या लोकांस सवलती द्यावयाच्या, असा कायदा असूनहि त्यांत लबाडी करितात; किंमतींत लबाडी करितात; वजनांत लबाडी करितात; मापांत लबाडी करितात; मोजण्यांत लबाडी करितातः—अशा या अफरातफरीच्या युक्त्या आहेत. अपहार घडला असतां कामावर नेमलेले खजिनदार, हिशेबनीस, वसूल घेणारा, वसूल देणारा, वसूल ठरविणारा, मंत्री, त्यांच्या अंतरंगातील अनुचर यांची वेग वेगळी जबानी घ्यावी. खोटी साक्ष दिल्यास अपराध्याइतकाच त्यांनाहि दंड करावा व देशांत दवंडी पिटवावी कीं, यानें ज्यांना छळलें असेल त्यांनीं आपल्या तक्रारी कळवाव्या. तशा तक्रारी कळविल्यास त्यांची नुकसान भरपाई करून देववावी. अनेक आरोपामध्यें सर्व नाकबूल केले असतां एकाहि बाबतींत जरी गुन्हा शाबीत झाला तरी सर्वांचें नुकसान त्यानें भरून द्यावें. तक्रारींत फरक पडल्यास आरोपांचा विचार वेगवेगळा

करावा. पुष्कळ द्रव्याचा अपहार केल्याचा बोभाटा आला असतां त्यांतला थोडा भाग शाबीत झाला कीं, सगळा अपराध त्याजवर लागू करावा. ज्यानें अफरातफर करण्याच्या कामांत अडथळा आणून वर्दी दिली असेल त्याला वाद्यांतील रकमेचा एक षष्ठांश हिस्सा मिळावा. तो जर सरकारी नोकर असेल तर एक बारांश हिस्सा मिळावा; मोठ्या रकमेचा आरोप करून थोडीच निष्पत्ति झाली तर त्याचा कांहीं हिस्सा मिळावा. मुळींच निष्पत्ति झाली नाहीं तर त्याला देहदंड किंवा द्रव्यदंड व्हावा. त्याला माफी देऊं नये.

आरोप सिद्ध झाला असतां सूचकानें चाहाडीचा अपवाद दुसऱ्यावर घालावा किंवा आपण इतरत्र निघून जावें. आरोपींच्या बरोबर संगनमत करणाऱ्या सूचकाला देहान्त शिक्षा व्हावी.

---

# अध्याय २० वा.

## अधिकाऱ्यांची परीक्षा.

ज्यांच्या अंगीं अमात्यांचे गुण आहेत असे अधिकारी त्यांच्या गुणाप्रमाणें त्या त्या कामावर नेमावे. ते आपापलीं कामें कशीं करतात याची नित्य चौकशी करावी, कारण मनुष्याचें मन चंचल आहे आणि कामावर योजना केली कीं मनुष्यें घोड्यासारखी बिथरतात; म्हणून काम करणारा, कामाचीं साधनें, देश, काल, कामाचें स्वरूप, खर्च, नफा या सर्वांची चौकशी ठेवावी. त्यांनीं संगनमत न करतां किंवा हुकुमाप्रमाणें आपलीं कामें करावीं. संगनमत झालें असता ते पैसे खातील व भांडले असतां कार्यघात करतील. धन्याला न कळवितां अधिकाऱ्यांनीं कोणचेंहि काम अंगावर घेऊं नये. संकट निवारणाच्या प्रसंगीं हा नियम लागू नाहीं. यांच्या हातून प्रमाद घडला असतां नुकसान भरून घेऊन शिवाय रोजच्या पगाराच्या दुप्पट दंड करावा. जो कोणी सांगितलेलें कार्य सांगितल्याप्रमाणें किंवा त्याहून चांगलें करून दाखवील त्यास बढती व सन्मान द्यावा.

' पगार थोडा असून जो खर्च अधिक करतो तो लांच खातो. ज्याचा खर्च पगाराहून कमी किंवा पगाराच्या बेतानें असतो तो लांच खात नाहीं असें आचार्यांचें मत आहे. पण कौटिल्य म्हणतो, ' लांच खाणें किंवा न खाणें याची माहिती हेराकडूनच मिळूं शकेल. '

ज्याच्या हातून राजाचा वसूल कमी होतो तो राजाचें नुकसान करणारा होय. हें जर अज्ञानादिकांमुळें घडत असेल तर त्याच्याकडून नुकसान भरपाई करून घ्यावी.

जो वसूल दुप्पट करतो तो प्रजेचें नुकसान करतो. त्यानें जर सगळ्या वसुलाचा भरणा केला असेल व प्रजेचा छळ थोडाच झाला असेल तर त्यास ताकीद द्यावी. याहून मोठा अपराध घडेल तर तदनुसार शिक्षा करावी. ज्याच्या कामांत सगळें उत्पन्न खर्च होऊन जातें तो मजुरांच्या श्रमाचा दुरुपयोग करतो. त्याला कामाच्या मुदतींत खर्च झालेल्या मालाची किंमत भरून द्यावयास लावावी, मजुरांच्या वेतनाचा अपहार केल्यास यथायोग्य शिक्षा करावी. ज्याची ज्या कामावर नेमणूक झाली असेल त्यानें त्या कामाचा जमाखर्च बरोबर समजून घ्यावा व तो त्यानें ठोकळ व तपशीलवार राजास सांगावा.

जो कांहीं उत्पन्न न करतां वाडवडिलांची शिल्लक खाऊन टाकतो तो मूलहर; ज्याचें उत्पन्न व खर्च समसमान असतात तो तादात्विक; आणि जो स्वतःला आणि चाकरांना पीडा देऊन द्रव्य संचय करतो तो कदर्य. राजानें या तिघांनाहि ताळ्यावर आणावें. ज्या कृपणाला पुष्कळांचें पाठबळ असेल त्याच्या वाटेला जाऊं नये. पण ज्याला कोणाचें पाठबळ नसेल त्याजकडून धन काढून घ्यावें. जो कृपण पुष्कळ द्रव्यसंचय करून आपल्या घरांत पुरून ठेवतो

किंवा लोकांच्याकडे ठेवी ठेवतो अथवा परदेशांत पाठवून देतो त्याच्यासंबंधानें हेरांनीं त्याचे सल्लागार, मित्र, चाकर, बांधव आणि द्रव्याचे येण्याजाण्याचे मार्ग यांचा पत्ता काढावा. ज्याच्यामार्फत द्रव्य परराष्ट्रांत पाठविलें जात असेल त्याच्या पोटांत शिरून त्याचें गुह्य जाणावें आणि मग त्या माणसाकडून निरोप आल्याचें मिष करून घात करावा.

याकरतां राजाच्या वसूल कामगारांनीं हिशेबनीस, कारकून, सराफ, खजिनदार व वरिष्ठ अधिकारी ( उत्तराध्यक्ष ) यांच्या देखत आपलीं कामें करावीं. उत्तराध्यक्षाला हत्ती, घोडे व रथ या वाहनांचा उपयोग करतां येत असावा. त्याच्या जवळचे शिष्य कला कौशल्यांत तरबेज व प्रामाणिक असावेत आणि त्यांनीं हिशेबनीसादि लोकांवर नजर राखावी. अधिकाराच्या जागेवर अनेक कामगार नेमावे व त्यांची वरचेवर बदली करावी.

ज्याप्रमाणें जिभेवरील मध किंवा विष चाखल्यावांचून राहात नाहीं त्याप्रमाणें राजाच्या खजिन्यांत वागणाऱ्याकडून थोडातरी पैसा खाल्यावांचून राहाणें शक्य नाहीं. पाण्यांतच राहाणारे मासे पाणी केव्हां पितात हें कळणें जसें शक्य नाहीं त्याप्रमाणें कारखान्यावर नेमलेले अधिकारी पैसे केव्हां खातात हें जाणणें शक्य नाहीं.

आकाशांतून उडणाऱ्या पक्ष्यांची गति एकवेळ ओळखतां येईल पण गुप्तपणानें कारभार करणाऱ्या अधिकाऱ्यांचें वर्तन जाणणें अशक्य आहे.

कामगाराच्या जवळ पैसे फार सांठल्यास त्याला ते बाहेर काढावयाला लावावेत. एकाच कामावर त्यांना न ठेवतां पालटून पालटून कामें सांगावीं. सारांश, ते लांच न खातील किंवा खाल्लेली ओकावी लागेल अशी तजवीज करावी. जे कामगार पैसे खात नाहींत व न्यायानें राजाचा वसूल वाढवितात असे राजाचें कल्याण करणारे जे अधिकारी असतील त्यांची एकाच कामावर कायमची नेमणूक करण्यास हरकत नाहीं.

---

# अध्याय ३१ वा.



## आज्ञापत्रपद्धति.

आज्ञापत्रालाच शासन हा शब्द लागू पडतो. आज्ञा करणें हेंच राजाचें मुख्य कर्तव्य होय. कारण त्याच्यावरच मैत्री व कलह अवलंबून असतात. यास्तव अमात्याचे गुण अंगीं असलेला, व्यवहार जाणणारा, शीघ्र मजकूर जुळविणारा, चांगलें अक्षर असणारा, लेख वाचण्यांत कुशल असा लेखक असावा. त्यानें एकाग्र चित्तानें राजाचे हुकूम ऐकून स्पष्टार्थवाचक शब्दांत लेख तयार करावा. तो राजाला पाठवावयाचा असल्यास त्यावर त्याचा देश, पदवी, नांव, आडनांव लिहावें. राजाखेरीज इतरांच्या पत्रावर देश व नांव एवढेंच लिहावें.

जात, कुल, दर्जा, वय, विद्या, धंदा, संपत्ति, शील, देश, काल, आणि आप्तपणा लक्षांत घेऊन त्या पुरुषाला अनुरुप असा लेख कारण पडेल तेव्हां लिहावा.

अर्थाचा अनुक्रम, वाक्यांची संगति, परिपूर्णता, माधुर्य, गौरव आणि निःसंदेहपणा हे लेखाचे गुण होत. त्यांत कार्याचा क्रम राखणें आणि महत्त्वाचा मजकूर आरंभी लिहिणें याला अर्थक्रम म्हणतात. आरंभापासून अखेर पर्यंत प्रथम लिहिलेल्या मजकुराचा पुढील भागाशीं विरोध न येणें याला संबंध म्हणतात. अर्थ, पदें व अक्षरें हीं वाजवीपेक्षां कमी किंवा अधिक नसणें आणि हेतु, उदाहरण, दृष्टांत वगैरे देऊन अर्थाचा खुलासा करण्यांत कंटाळा न करणें ही परिपूर्णता होय. कानाला गोड लागणारे व सुंदर अर्थाचे शब्द योजणें यास माधुर्य म्हणावें. ग्राम्य शब्द न योजणें म्हणजे औदार्य होय. व्यवहारांतील शब्दांचा उपयोग करणें हा स्पष्टपणा होय.

अकारादि वर्ण ६३ आहेत. अक्षरांचा समूह म्हणजे पद. तीं पदें चार प्रकारचीं;—नाम, आख्यात, उपसर्ग

व निपात. वस्तुगुणवाचक शब्द तें नाम, क्रियावाचक व लिंगभेदरहित अशा पदाला आख्यात म्हणतात; क्रियेचें विशेष द्योतक प्र, आदि उपसर्ग आणि च इत्यादि अव्ययें निपात होत. अर्थ समाप्तिकारक पदसमूहाला वाक्य म्हणतात. शब्दांची परस्पर संगति पाहून कमींत कमी एक शब्दाचा व जास्तींत जास्ती तीन शब्दांचा समास करावा. लेखाची समाप्ति सुचविण्यासाठीं ' इति ' शब्दाची योजना करावी.

निंदा, स्तुति, पृच्छा, कथन, प्रार्थना, नकार, उपालंभ, निषेध, चोदना, सांत्वन, सहाय्यदान, भर्त्सन, मनधरणी, असे लेखांचे तेरा उद्देश संभवतात.

हीन कुल, वाईट शील व शारीरिक व्यंग यांचा आरोप करणें ही निन्दा. कुलशील शरीराची स्तुती करणें ही प्रशंसा. ' हे कसे ' ? असें विचारणें ही पृच्छा. ' हें असें ' म्हणून सांगणें तें कथन. ' द्या ' म्हणून मागणें ही प्रार्थना. ' देत नाहीं ' असें सांगणें हा नकार. ' असें करणें आपल्याला शोभत नाहीं ' हा उपालंभ. ' करूं नको ' असें सांगणें हा निषेध. ' अमुक करा ' असें सुचविणें ही चोदना. 'तुम्ही व मी एकच आहों, माझी संपत्ती ती आपलीच आहे' असा अनुग्रह करणें हें सांत्वन. ' संकटांत मदत करणें ' हें सहाय्य दान. ' दोष दर्शवून पुढें जड जाईल, ' असें सांगणें ही धमकी. पैशाची याचना, केलेला अतिक्रम माफ करण्याविषयीं विनंती, डोईजड झालेल्या पुरुषाची मनधरणी असे अनुनयाचे तीन प्रकार.

निवेदन, हुकूम, दान, सूट, परवाना, संकट निवारणार्थ प्रार्थने संबंधी सूचना, प्रत्युत्तर, जाहीरनामा हे खलित्यांचे प्रकार आहेत. अमक्यानें असें कळविलें आहे, अमका असें म्हणतो, हें खरें असेल तर ठरलेली वस्तु पाठवून द्यावी, राजाकडे शत्रूच्या कृत्यासंबंधी अशी बातमी आली आहे असे हे निवेदनाचे विविध प्रकार आहेत.

विशेषत: नोकरांच्या संबंधानें शिक्षा किंवा अनुग्रह करण्याविषयींचा जो हुकूम त्याला आज्ञा लेख म्हणतात. ज्यांत गुणीजनांच्या बक्षिसाचा किंवा संकटसमयींच्या मदतीचा उल्लेख असतो त्याला परिदान लेख म्हणतात. विशिष्ट जातीला, नगराला, ग्रामाला व प्रांताला राजाच्या हुकूमानें जी सूट देण्यांत येते त्या हुकुमाला परीहार म्हणतात. अमुक इसमाला हें कार्य करण्याला व अमुक बोलण्याला परवानगी आहे असें कळविण्याच्या प्रकाराला निसृष्टि म्हणतात. निसृष्टि तोंडीहि असते. दैवी किंवा मानुषी अशा द्विविध आपत्तींच्या प्रतिकारासाठीं अमुक करा असें कळविणें हा प्रावृत्तिक लेख होय. दुसऱ्याकडून आलेला लेख वाचून, समजून घेऊन, त्याच्यावर भाष्य करून, राजाचें उत्तर ऐकून तें लिहिणें हा प्रतिलेख होय. सत्रपांना व अधिकाऱ्यांना उद्देशून प्रवाशांच्या रक्षणासाठीं व सहाय्यासाठीं राजानें जो हुकूम देशांत, मार्गांत सर्वत्र जाहीर करावयाचा त्याला जाहीरनामा ( सर्वत्रग ) म्हणतात.

साम, उपप्रदान, भेद व दंड हे चार उपाय आहेत. त्यांत सामाचे प्रकार पांच:—गुणसंकीर्तन, संबंध कथन; परस्पर उपकार दर्शन, परस्परांना सामान्य संकटाची भीति व अभेद दर्शन. त्यांत कुल, स्वरूप, पराक्रम, स्वभाव, विद्या, संपत्ति इत्यादि असलेल्या किंवा नसलेल्या गुणांची प्रशंसा हें गुणसंकीर्तन होय. जात, विवाह संबंध, गुरुबंधुत्व, समानयजन संबंध, कुलपरंपरा, एकचित्तता व समान मित्रत्व हें सांगणें याला ' संबंधकथन ' म्हणतात. स्वपक्ष व परपक्ष यांनीं परस्परावर केलेल्या उपकाराची आठवण देणें हें ' उपकार संदर्शन ' होय. असें केलें असतां असा परिणाम होईल अशी कल्पना आणून देणें याला ' आयतिदर्शन ' म्हणतात. मी तो तूंच, माझें द्रव्य तें तुझेंच, त्याचा तूं आपल्या कामीं खुशाल उपयोग करावा ! असें सांगणें हें ' अभेदकथन ' होय.

द्रव्य देऊं करणें म्हणजे ' दान '.

शंका व भीति उत्पन्न करणें हा ' भेद ' होय.

वध, छळ व द्रव्य हरण हा ' दंड ' होय.

कळाहीनपणा, विरोध, पुनरुक्ति, चुकीचा शब्द प्रयोग व अक्षरांचा घोटाळा इतके लेखदोष संभवतात.

शाईचे डाग पडणें, बेढब, लहान मोठीं, अस्पष्ट अक्षरें लिहिणें हा ‘ कळाहीनपणा ’ होय.

पहिल्या वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं विरोध येणें हा ‘ व्याघात ’ होय.

कारण नसतां एकदां लिहिलेलें पुन्हां लिहिणें याला ‘ पुनरुक्ति ’ म्हणतात.

लिंग, वचन, काळ, कारक, यांच्यांत चूक करणें याला ‘ अपशब्द ’ म्हणतात.

शब्द तोडावयाचे ते न तोडणें, न तोडावयाचे ते तोडणें व इतर अव्यवस्था याला ‘ संप्लव ’ म्हणतात.

सर्व शास्त्रें पाहून आणि त्यांचा अनुभव घेऊन कौटिल्यानें राजाच्यासाठीं आज्ञापत्रकाची ही रीत घालून दिली.

---

# अध्याय ३२ वा.



## कोशागारांत येणाऱ्या रत्नांची परीक्षा.

कोशाध्यक्षानें कोशांत संग्रह करून ठेवण्याकरितां जीं हलकीं किंवा भारी रत्नें व वनद्रव्यें येतील तीं त्यांची त्यांची पारख असलेल्या माणसाकडून परीक्षा करवून संग्रहांत ठेवावींत.

( पांड्य देशांत ) ताम्रपर्णी नदींत उत्पन्न झालेलीं, ( पांड्य देशांतील ) मलयकोटी पर्वतांत उत्पन्न झालेलीं, ( पाटलिपुत्राजवळील ) पाशिका नामक नदींत उत्पन्न झालेलीं, ( सिंहल द्विपांतील मयूरनामक गांवाजवळील ) कुला नदींत उत्पन्न झालेलीं, ( केरळ देशांतील मुरची नामक शहराजवळील ) चूर्णा नदींत उत्पन्न झालेलीं, महींद्रपर्वताजवळील समुद्रांत उत्पन्न झालेलीं, ( पारसीकांतील ) कर्दमा नदींत उत्पन्न झालेलीं, ( बार्बरीद्वीपांतील ) स्रोतसी नदींत उत्पन्न झालेलीं, ( बार्बरी द्वीपांतील ) सरोवरांत उत्पन्न झालेलीं, व हिमालयांत उत्पन्न झालेलीं मोत्यें असे मोत्यांत दहा प्रकार आहेत.

शिंपा, शंख व इतर गजकुंभादि स्थानापासून त्यांचीं उत्पत्ती होते.

मसुरीच्या आकाराचें, तीन गांठी असलेलें, कांसवासारखे खडबडीत, अर्धचंद्राकार, सुरकुतलेलें, जुळलेलें, खरबडलेलें, बेढब, कमंडलूच्या आकाराचें, काळसर, निळसर, भलतीकडे भोंक पडलेलें असें मोतीं अप्रशस्त समजावें.

टपोरें, वाटोळें, बिनबुडाचें, पाणीदार, पांढरें सफेत, वजनदार, स्निग्ध, योग्य ठिकाणीं भोंक पाडलेलें मोतीं प्रशस्त समजावें.

लहानमोठ्या मण्यांच्या वेगवेगळ्या रचनेवरून मोत्यांच्या सरांचे शीर्षक, उपशीर्षक, प्रकांडक, अवघाटक आणि तरल प्रतिबंध असे प्रकार होतात. ज्यांत एक हजार आठ ( १००८ ) सर असतात तो ‘ इंद्रछंद ’ हार होय. ५०४ सरांच्या हाराला ‘ विजयछंद ’ म्हणतात. १०० सरांचा तो ‘ देवछंद ’; ६४ सरांचा तो अर्धा हार; चोपन्न सरांचा ‘ रश्मिकलाप ’; ३२ सांचा ‘ गुच्छ ’; २७ सांची नक्षत्र माला; २४ सांचा अर्धगुच्छ; वीसांचा ‘ माणवक ’ दहांचा अर्धमाणवक. याच हारांत मध्यंतरीं एक एक रत्न लाविलें असतां त्या त्या नांवाचा ‘ माणवक ’ हार होतो.

एक शीर्षक पद्धतीचा हार शुद्ध होय. त्याचप्रमाणें इतरहि मानावें. ज्यांत मध्यें रत्न गोवलें आहे असा एकपदरी, त्रिपदरी किंवा पांच पदरी हार अर्धमाणवक म्हणावा.

नुसतींच मोत्यें ओवलीं असल्यास ती ‘ एकावली ’ होय. तिलाच मध्यें रत्न लावल्यास त्याला ‘ सर ’ असें म्हणतात. ज्या माळेंत सोन्याचे मणि घातलेले असतात तिला ‘ रत्नावली ’ असें नांव आहे. सोन्याचे मणि व मोत्यें हीं क्रमाक्रमानें ओवल्यास त्या माळेला ‘ अपवर्तक ’ म्हणतात. सोन्याच्या तारेंत ओंविलेल्या हाराला ‘ सोपानक ’ म्हणतात. त्यांतच मध्यें मध्यें माणी ओविले म्हणजे तें ‘ मणि सोपानक ’ झालें.

याप्रमाणें डोकें, हात, पाय, कंबर या ठिकाणीं घालावयाच्या मोत्यांच्या हारांचे प्रकार वर्णिले आहेत.

कौट, मालेयक, आणि पारसमुद्रक अशीं तीन प्रकारचीं रत्नें असतात. 'सौगंधिक' (माणीक) रत्न पद्मरागासारखें किंवा शुद्ध लाल किंवा पारीजात पुष्पासारखें किंवा बालसूर्यासारख्या रंगाचें असतें. 'वैडूर्य' रत्न नीलकमलासारखें, शिरीषपुष्पाच्या वर्णाचें, पाण्याच्या रंगाचें, बांबूच्या रंगाचें, पोपटाच्या पंखाच्या वर्णाचें, हळदीच्या रंगाचें, गोमूत्राच्या वर्णाचें किंवा गोरोचनाच्या वर्णाचें असतें. 'इंद्रनील' रत्न नीलरेखा असलेलें, कलाय पुष्पाच्या वर्णाचें, ( मटारच्या फुलासारखे ) अतिशय निळें, जांभळाच्या वर्णाचें, मेघांच्या वर्णाचें, इंद्रधनुष्यासारखें आनंददायक असतें. या शिवाय शुद्ध स्फटिक, दधिवर्ण, चंद्रकांत व सूर्यकान्त असे आणखी मण्याचे भेद आहेत.

रत्न सहापैलू किंवा चारपैलू असलेलें किंवा वाटोळें, तेजस्वी, सौंदर्य पूर्ण, निर्मळ, स्निग्ध, वजनदार, कांतिमान, पारदर्शक सभोंवार प्रभा पाडणारें असलें म्हणजे चांगलें समजावें.

निस्तेज, रंग व प्रभा नसणें, खरखरीतपणा, ठिपके असणें, तडा असणें, भलत्या ठिकाणीं भोंक असणें व पट्टे असणें हे रत्नांचे दोष होत.

विमलक, सस्यक, अंजनमूलक, पित्तक, सुलभ, लोहितक, अमृतांशुक, ज्योतिरसक, मैलेयक, आहिच्छत्रक, कूर्प, प्रतिकूर्प, सुगंधिकूर्प, क्षीरपक, शुक्तिचूर्णक शिलाप्रवालक, पुळक, शुक्रपुळक या आणखी रत्नांच्या पोटजाती आहेत. या खेरीज बाकीचे कांचमणि होत.

सभाराष्ट्रक, मध्यराष्ट्रक, कास्तीरराष्ट्रक, श्रीकटनक, मणिमंतक, इंद्रवानक असे हिऱ्यांचे प्रकार आहेत. खाणींत, नदींत व इतर जागांतूनहि हिरे सांपडतात.

मांजराच्या डोळ्यासारखे, शिरीष पुष्पासारखे, गोमूत्रासारखे, गोरोचनासारखे, शुद्धस्फटिकासारखे, मालती पुष्पासारखे, किंवा याहूनहि इतर वर्णाचे असे हिरे असतात. त्यांत मोठ्या आकाराचे, वजनदार, प्रहार सोसण्यास समर्थ, सारखे पैलू असलेले, भांड्यावरतीं नांव घालण्याइतके कठीण, परावर्तनशील व कांतिमान असे हिरे हे चांगले हिरे होत. पैलू नष्ट झालेला, प्रभा नसलेला, एका बाजूला कललेला हा 'अशुभ' हिरा होय.

आलकंदक आणि वैवर्णिक असे प्रवाळाचे दोन प्रकार आहेत. यांचा रंग पद्मरागासारखा व शुद्धलाल असा असतो. प्रवाळ कृमीयुक्त व स्थूलमध्य असें असूं नये.

चंदनाचे प्रकारः—सतन देशांतील सातन नामक चंदन लाल असून त्याला मातीचा वास येतो, गोशीर्षक चंदन काळसर व तांबूस असून त्याला माशाचा वास येतो, हरिचंदन पोपटाच्या रंगाचें असून त्याला आंब्यासारखा वास येतो, हेंच वर्णन तार्णस चंदनाला लागू पडतें. ग्रामेरुक चंदन लाल किंवा काळसर लाल असून त्याला अजमूत्राचा वास येतो. दैवसभेय लाल असून त्याला पद्माचा वास येतो. जावक चंदनहि पण असेंच असतें. जोंगक व सौरूप लाल किंवा काळसर लाल असून हाताला गुळगुळीत लागतें. मालेयक चंदन फिकट तांबूस असतें. कुचंदन काळें, व गोमूत्राच्या वासाचें असतें; कालपर्वतक चंदन खरखरीत, अगरु सारखे काळें किंवा तांबडें किंवा काळसर तांबडें असतें. कोशाकारपर्वतक काळें किंवा काळ्या ठिपक्याचें असतें; शीतोदकीय हें कमलाच्या वर्णाचें किंवा मऊ काळसर असतें; नागपर्वतक रुक्ष व शेवाळाच्या वर्णाचें असतें; आणि शाकल चंदन पिंगट वर्णाचें असतें.

हलकेपणा, मऊपणा, दमटपणा, तुपासारखा अंगाला मऊपणा आणणें, सुगंध, त्वचेंत भिनणें, बुळबुळीतपणा नसणें, रंग व गंध कायम राहणें, उष्णता शोषून घेणें, लवकर पेटणें, स्पर्शसुख देणें हे चंदनाचे गुण होत.

जोंगक देशांतले 'अगरु' काळें, काळ्या ठिपक्याचें किंवा काळ्या पट्ट्याचें असतें. 'दोंगक' श्याम व 'पारसमुद्रक' विविध रंगांचें असतें. याचा वास वाळ्यासारखा किंवा नवमालती सारखा असतो. चांगलें अगरु जड,

स्निग्ध , सुवासिक, दूरवर वास येणारें, लवकर पेट न घेणारें, धूर न होणारें, आंत बाहेर सारखाच वास असणारें, न झिजणारें असें असावें.

'तैलपर्णिका' हें अशोक ग्रामांत उद्भवतें, व याचा वर्ण मांसासारखा व गंध पद्मासारखा असतो. जोंगक पिवळसर तांबूस असून त्याला नीलकमलासारखा किंवा गोमूत्रासारखा वास येतो. 'ग्रामेरुक' हें स्निग्ध व गोमूत्राच्या वासाचें असतें. सौवर्णकुड्यक हें पिवळसर तांबूस व महाळुंगाच्या वासाचें असतें. 'पूर्णकद्वीपक' हें कमलाच्या किंवा लोण्याच्या वासाचें असतें. भद्रश्रीय रक्तचंदनाचे दोन प्रकार; त्यांतलें लौहित्यक म्हणजे ब्रह्मपुत्रानदीकडे उत्पन्न होणारे, जाईच्या वर्णाचें आणि अंतरवती नदीनजीक उत्पन्न होणारें वाळ्याच्या रंगाचें असून दोघांसहि कुष्ठ नांवाच्या वनस्पतीचा वास येतो. 'कालेयक' दोन प्रकारचें; त्यांतलें सुवर्ण भूमींत होणारे मऊ व पिवळें, आणि उत्तर पर्वतावर होणारें तांबूस पिवळें असतें. तैलपर्णिक चंदन उगाळलें, उकळलें किंवा धुरकटलें, तरी त्याचा सुवास कमी होत नाहीं, किंवा तें विकार पावत नाहीं व इतर पदार्थांशीं मिसळण्याला सोयीचें असतें. या जातींत चंदन व अगरु या दोहोंचेहि चांगले गुण एकत्र झाले आहेत. येथें चंदनादि मूल्यवान् वनस्पतींचा वर्ग समाप्त झाला.

उत्तरपर्वतांमधील कान्तनावक व प्रैयक या प्रांतांत जें चामडें सांपडतें त्याला अनुक्रमें कान्तनावक व प्रैयक ह्मणतात; कांतनावक चर्माचा रंग मयूरकंठी असतो, व प्रैयक चामड्यावर निळें, पिवळे व पांढरे असे बारीक बारीक ठिपके असतात. हीं दोन्हीं चामडीं आठ अंगुळें रुंद असतात.

हिमालयांतील द्वादशग्रामीं बिसी व महाबिसी या नांवाच्या चामडयांची पैदास होते. बिसी चामडयांचा रंग कधीं न ओळखण्याजोगा, व कधीं चित्रविचित्र असतो व त्यावर फार केंस असतात. महाबिसी चामडें खडबडीत व बहुधा पांढऱ्या रंगाचें असतें. या दोहीं चामडयांची रुंदी बारा अंगुळें असते.

श्यामिका, कालिका, कदली, चंद्रोत्तरा, शाकुला हीं चामडीं आरोह प्रांतांत सांपडतात. काळसर किंवा ठिपकेदार ती श्यामिका; काळसर किंवा पारव्या रंगाची ती कालिका; या दोन्ही जातींची रुंदी आठ अंगुळें असते. कदली खरखरीत असून हातभर रुंदीची असतें. चंद्रचित्रा व चंद्रोत्तरा यांनाही हेंच वर्णन लागूं पडतें. कदलीच्या एक तृतीयांश शाकुला चामड्याची रुंदी असते, व त्याच्यावर लाल वर्तुळें असतात व स्वाभाविक ग्रंथीमुळें त्याला एक प्रकारची शोभा आलेली असते.

सामूर, चीनसी व सामूली हे तीन प्रकार बाह्लव प्रांतांत सांपडतात. सामूर ३६ अंगुळें लांबीचें व काजळी रंगाचें असतें; चीनसी लालसरकाळें किंवा करडें असतें व सामुली गव्हाच्या वर्णाचें असतें.

सातिना, नलतूला, व वृत्तपुच्छा हीं उद्रनामक जलचर प्राण्याचीं चामडीं होत. सातिना काळ्या रंगाचें; नलतूला हे नलनामक तृणाच्या रंगाचे; व वृत्तपुच्छा काळ्या रंगाचें असतें. ह्या चामड्यांच्या जाति झाल्या.

चामड्यामध्यें मऊ, स्निग्ध, व केसाळ कातडें उत्तम.

लोंकर पांढरी, तांबडी, व मिश्र रंगाची असते. यापासून चार प्रकारचीं सणगें तयार करितां येतात. एक लोंकर ठोंकून बुरणुसासारखें, दुसरे चित्रविचित्र रंगाच्या तंतूंनीं विणलेलें गालीच्यासारखें, तिसरें पट्या जोडून तयार केलेलें, व चवथें धागे जोडून गळपट्ट्यासारखें केलेलें.

लोंकरीपासून कांबळें, गुराख्यांची घोंगडी, हत्ती, बैल यांची झूल, घोड्यांचें जीन, रंगीत शाल, धाबळी इत्यादि वस्त्रें आणि त्यापासून विविध कपडे होतात.

जी लोंकर गुळगुळीत, तुळतुळीत, बारीक व मऊ असते ती श्रेष्ठ होय.

काळ्या रंगाच्या, आठ तुकडे जोडून केलेल्या नेपाळी कांबळ्याला 'भिंगिसी' म्हणतात. ही पावसापासून संरक्षण करते. हिच्याच दुसऱ्या प्रकाराला 'अप्सारक' म्हणतात.

मांडचोळणा, चौकोनी आसन, सरपोस, पडदा, शाल, गालीचा हे सगळे प्रकार वन्यपशूंच्या लोंकरीचे करितात.

वंगदेशांतलें रेशमी कापड श्वेत व स्निग्ध असतें. पुंड्र देशांतलें काळें व मण्यासासारखें गुळगुळीत असतें. सुवर्णकुड्य देशांतले रेशमी कापड अरुणच्छटेचें असतें, हें रेशमी कापड रेशीम भिजवून, घोटून तयार केलें जातें व तें एक वर्णाचें किंवा मिश्र वर्णाचें असतें.

ह्याचे एक दोन, तीन, चार असे आडवे व उभे धागे एकदम घेऊन विणल्यानें निरनिराळे प्रकार होतात. हे प्रकार उत्तरोत्तर हलक्या प्रतीचे होत. अशा प्रकारानें काशींत व पुंड्र देशांत होणाऱ्या रेशमी कापडाचें वर्णन झालें.

मगध, पुंड्र व सुवर्णकुड्य या देशांत नागवृक्ष, लकुच, बकुल व वड या झाडांच्या पानांवर किडयांपासून एक प्रकारचें रेशीम होतें. नागवृक्षावरचें रेशीम पिवळें, लकुच्यावरचें गव्हाच्या रंगाचें, बकुळीच्या पानांवरचें पांढरे व इतर झाडावरचें लोण्याच्या रंगाचें असतें. त्यांतलें सुवर्णकुड्य देशांतलें श्रेष्ठ होय. हेंच वर्णन चीन देशांतील रेशमाला व वस्त्राला लागू पडतें.

पांड्य, कोंकण, कलिंग, काशी, वंग, वत्स, माळवा या देशांतील सुती वस्त्रें श्रेष्ठ होत.

या खेरीज इतर मूल्यवान वस्तूंहिचें वजन, माप यांची किंमत, लक्षण, जात, रंग, रूप सुरक्षित ठेवण्याचा प्रकार व जुनें काढून नवें संग्रहित करण्याची वेळ अधिकाऱ्याला माहीत असावी. त्याचप्रमाणें जुन्या वस्तूंची सफाई, खराब वस्तु चांगली दिसण्याकरितां करावयाची कृति व त्यास लागणारीं साधनें, वस्तु उत्पन्न होण्याचे देश व काल तसेंच त्यांचा उपभोग घ्यावयाचे प्रकार आणि कृमिकीटकांपासून संरक्षण याचीहि पण अधिकाऱ्याला माहिती असावी.

---

# अध्याय ३२ वा.



## खाणी व खाणींचा उपयोग.

ज्यास तांबें वगैरे धातूंचें शास्त्र माहीत आहे, पाऱ्याची कृती किंवा रसायन शास्त्र यांत ज्यानें प्रावीण्य मिळविलें आहे व ज्यास अनेक प्रकारच्या रत्नांचे रंग व तद्विषयक शास्त्रें अवगत आहेत अशा आकराध्यक्षानें आपण एकट्यानें, किंवा शास्त्रांत प्रवीण असलेल्या माणसांच्या सहाय्यानें, आपल्याबरोबर माहीतगार नोकर व आवश्यक साधनसामग्री घेऊन देशांतील कोणत्या भागांत खाणी सांपडण्यासारख्या आहेत याचा शोध लावावा. ज्या ठिकाणीं धातूंचें किट्ट, मुशी, कोळसे व राख यांचीं चिन्हें दिसतील त्या ठिकाणीं पूर्वी केव्हांतरी खनिज पदार्थांची उत्पत्ति होत असली पाहिजे हें समजावें; अथवा भूधातु, शिलाधातु किंवा रसधातु यांची नवीनच खाण कोठें आहे याचा तपास करावा, आणि ज्या ठिकाणची मृत्तिका, शिला व रस अतिशय चकचकीत व जड असून त्यास उग्र वास व स्वाद येत असेल, त्या ठिकाणीं अशी खाण आहे, हें समजावें.

उद्देशानुरूप ठरवलेल्या पर्वतांच्या विवरांमधून, गुहांमधून, पृष्ठभागावरून, टांक्या मारून पडलेल्या खळग्यांमधून, शिळेनें झांकलेल्या विवरांमधून जो रस पाझरत असेल तो जर पेरूच्या, आंब्याच्या किंवा तरल फळाच्या रंगाचा असेल, पक्क्या हळदीच्या तुकड्याच्या, हरताळीच्या, मधपोळ्याच्या, हिंगुळाच्या, कमलपत्राच्या किंवा शुकमयूरांच्या पंखांच्या रंगाचा असेल आणि चिकण, पारदर्शक व वजनदार असेल, तसेंच त्याच्या आजूबाजूचे जलाशय व वृक्ष त्यासारखे दिसत असतील तर तेथें अशोधित सोनें आहे असें समजावें.

जे रस पाण्यांत टाकिले असतां तेलासारखे पसरतात, ज्यास चिखल व मळ चिकटूं शकतात, आणि जे तांब्यांत किंवा रुप्यांत शेंकडा शंभर प्रमाणांत मिसळूं शकतात, तेहि अशोधित सुवर्णाचे रस समजावें.

अशाच स्वरूपाचा रस पण ज्यास उग्र वास व स्वाद आहे तो शिलाधातु समजावा.

भूमींत किंवा पर्वतशिलांत जे असे अशोधित धातु सांपडतात ते निवळ पिवळे किंवा निखालस लाल किंवा तांबूस पिवळट असून ते फोडल्यास त्यांत निळ्या रंगाच्या रेखा असतात; त्यांचा रंग मूग, माष किंवा तीळ यांच्यासारखा असतो व त्यांवर दह्यांतील लहान लहान गठळ्यासारख्या गांठीं असतात. त्यांचा वर्ण हळद, हरताळ, कमळदळ, शेवाळ, यकृत् व प्लीहा या सारखा चकचकीत असतो आणि ते जर फोडिले तर त्यांत वाळूचे थर व बारीक बारीक बिंदूचीं स्वस्तिकें दिसतात. त्यांत बारीक गोळ्या दिसतात, आणि त्यांची कांति अत्यंत दैदिप्यमान दिसते. हे कितीजरी तापविले तरी फुटत किंवा तडकत नाहींत; त्यांतून फेंस व धूर मात्र पुष्कळ निघतो; असे हे धातु सुवर्ण धातु होत. ते तांबें व रुपें यांत मिसळण्यास उपयोगी पडतात.

ज्या धातूंचा रंग शंख, कापूर, तुरटी, कबुतर, रानकबूतर, विमलक म्हणजे श्वेतरक्त मणि, किंवा मोराची मान यांच्यासारखा असतो, ज्यांस सस्यक ( नीलमणि ), गोमेदक, गूळ किंवा साखर यासारखें तेज आहे, कोविदार, पद्म, पाटली, कलाय, क्षौम व अळशी यांच्या फुलांसारखा ज्यांचा रंग आहे, ज्यांत शिशाचा व लोखंडाचा अंश आहे, जे फोडिले असतां वरून पांढरे व आंत काळसर किंवा वरून काळसर व आंत पांढरे असे दिसतात, असे धातु म्हणजे अशोधित रुपें समजावें. या सर्वांवर रेखा व ठिपके असून ते मऊ असतात; आणि ते तापविले तरी तडकत नाहींत. त्यांतून फेंस व धूर मात्र पुष्कळ निघतो.

अशोधित धातु वजनांत जितके जितके जड तितकें तितकें त्यांत शुद्ध धातूचें प्रमाण अधिक असतें. त्यांपैकीं ज्यांमध्यें इतर अशुद्ध द्रव्यें असतील किंवा मूळचेंच कांहीं दोष असतील त्यांवर मनुष्याचें किंवा पशूचें मूत्र व कांहीं क्षार यांचीं पुटें द्यावीं व त्यांत राजवृक्ष, पीलु, वड, गाईचें पित्त व गोरोचन यांची भुकटी, म्हशीच्या, गाढवाच्या किंवा हत्तीच्या मलमूत्रांत कालवून तिच्या गोळ्या करून मिसळाव्या किंवा त्यांवर या गोळ्या थापटून ठेवाव्यात, म्हणजे त्यांतून शुद्ध रस बाहेर निघूं लागतो.

यव, माष, तीळ, पलाश, व ताड यांची राख, किंवा केळीची व सुरणाची भुकटी यांचें गाईच्या किंवा मेंढीच्या दुधांत मिश्रण करून त्याचा लेप केल्यास धातूला मऊपणा येतो.

मध, मधुक वृक्षाचा चिक, मेंढीचें दूध, केळीच्या कालाचें पाणी, तूप, गूळ, आम्ल व तेल यांच्या मिश्रणांत कसलाहि खडबडीत धातु तीन वेळां बुचकळून काढिला असतां मऊ होतो.

गाईचा दांत व शिंगें यांची भुकटी मृदुपणा नाहींसा करते.

तांबें जड, स्निग्ध, मृदु, रंगानें पिंगट, हिरवट, तांबूस किंवा लाल भडक असून भूमींत अथवा पर्वतपृष्ठावर सांपडतें.

शिसें, कावळ्याप्रमाणें काळें किंवा कपोत वर्णाचें किंवा गोरोचन वर्णाचें असतें व त्यावर पांढऱ्या रेघा असून त्याला दुर्गंध येतो.

खारवट जमीनीसारखा चित्रविचित्र अथवा भाजलेल्या मातीच्या ढेंकळासारखा ज्याचा रंग तें कथील होय.

लोखंड नारिंगी, पांढुरकें तांबूस, किंवा निर्गुंडीच्या फुलाच्या वर्णाचें असतें.

पोलाद कावळ्याच्या अंड्याच्या वर्णाचें किंवा भूर्जपत्राच्या वर्णाचें असतें.

स्वच्छ, स्निग्ध, कांतिमान्, नाद करणारा, अतिशय थंड, किंचित् तांबूस असा धातु तो मणि धातु होय.

खाणींतून निघालेले धातु त्यांच्या त्यांच्या कारखान्यांत पाठवून द्यावेत. त्या त्या धातूचा सर्व व्यवहार ठरलेल्या एकाच ठिकाणीं व्हावा; इतरत्र धातु गाळणें, खरेदी किंवा विक्री करणें हा गुन्हा समजून त्याला दंड ठरवावा.

खाणींतील लोकांनीं चोरी केल्यास त्यांना आठपट दंड करावा; रत्नांच्या चोरीला हा न्याय लागू नाहीं. चोर व उडाणटप्पू यांना पकडून खाणींत कामाला लावावे; किंवा त्यांच्याकडून दंड घ्यावा.

ज्या खाणीला खर्च फार येतो व कामहि फार पडतें अशी खाण हिस्सरसीनें किंवा मक्त्यानें द्यावी. थोड्या खर्चाच्या व अल्प श्रमाच्या खाणी स्वतःकडे ठेवाव्या.

लोहाध्यक्षानें तांबें, शिसें, कथील, पोलाद, पितळ, वृत्त, कांसें व लोखंड या खाणींचे धंदे व त्या धातूंपासून होणाऱ्या भांड्यांचे धंदे चालवावे.

टांकसाळीवरील अधिकाऱ्यानें चार भाग तांबें, एक भाग लोखंड, कथील, शिसें व अंजन यांपैकीं एक धातु व अकरा भाग रुपें मिसळून 'पण' नांवाचीं रुप्याचीं नाणीं करावींत. याच प्रमाणांत अर्धा पण, पाव पण व एक अष्टमांश पण हींहि नाणीं पाडवावींत. त्याचप्रमाणें तांब्याचीं माष, अर्धमाष, काकणी व अर्धकाकणी अशीं चार प्रकारचीं नाणीं करावींत. तांब्याच्या माष नाण्यांत तांब्याच्या एक चतुर्थांश इतर हलके धातु असावेत.

नाणीं पारखणारा अधिकारी जो असेल त्यानें देवघेवींत चालूं असलेलीं नाणीं व सरकारी तिजोरींत भरणा करावयाचीं नाणीं यांच्या बाबतींत बट्टा ठरवून टाकावा. तो असाः—शेंकडा आठ मजुरी शेंकडा पांच सरकारी कर आणि शेंकडा एक अष्टमांश परिक्षकाची फी; जो या नियमाचें उल्लंघन करून नाणीं पाडील, त्यांचा व्यवहार करील किंवा त्यांची परीक्षा करील त्याला पंचवीस पण दंड करावा.

खाणीवरील अधिकाऱ्यानें शंख, हिरे, मोत्यें, पोंवळीं व क्षार यांचीं कामें आणि क्रयविक्रयादिक व्यवहार चालवावे. लवणाध्यक्षानें खाणींत मीठ तयार झालें म्हणजे त्या मिठावरील ठराविक खंड वसूल करावा व मिठाच्या व्यापाऱ्यांनीं सरकारी मीठ विकून त्याची किंमत, नाणीं पारखण्याचा मोबदला व कसर यांचा भरणा करावा. परदेशांतून आणलेल्या मिठाचा सहावा हिस्सा कर द्यावा. कर म्हणून दिलेल्या मिठाची व्यापाऱ्यानीं विक्री करून कसर, रूपिक व नाणीं पारखण्याची फी, यांसह किंमतीचा भरणा करावा. परदेशी माल खरेदी करण्यास जकात द्यावी लागून शिवाय सरकारी माल न खपल्यानें जें नुकसान येईल तें भरून द्यावें लागतें. हें कर चुकविल्यास ६०० पण दंड करावा.

मिठांत भेसळ करणाऱ्यांस व वानप्रस्थाखेरीज इतर जो कोणी परवान्या वांचून मीठ तयार करील त्यास ५०० पासून १००० पण दंड करावा. विद्वान् ब्राह्मण, तपस्या करणारे मुनि व मजूर यांनीं भोजनास लागतें तेवढें मीठ तयार केल्यास हरकत नाहीं. या खेरीज इतरांजवळ मीठ किंवा इतर क्षार पदार्थ सांपडल्यास त्यांच्याकडून जकात घ्यावी.

याप्रमाणें खंड, षड्भाग, कसर, नाणीं परिक्षिकाची फी, ठराविक दंड, जकात, नुकसान भरपाई, अपराधाबरहुकूम दंड, नाणीं, रूपिक ( नाणीं पाडण्याबद्दलचा कर ), धातु व किंमत असें बारा प्रकारचें उत्पन्न खाणीपासून काढावें. याप्रमाणें सर्व प्रकारच्या विक्रीच्या मालावर सरकारनें आपला हक्क स्थापन करावा.

खाणीपासून कोशाची उत्पत्ति होते व कोशावर सेना अवलंबून असते. खजिना आणि सैन्य यांच्या बलावर धनसमृद्ध अशा पृथ्वीचा लाभ होतो.

---

# अध्याय ३४ वा.

## " सोनारांची काम करण्याची जागा व तीवरील सुवर्णाध्यक्ष. "

सुवर्णाध्यक्षानें सोन्या चांदीचे दागिने वगैरे करण्याकरितां अक्षशाला करवावी, त्याच्यांत चार चौक असून ते एकमेकापासून अलग असावे, व त्यांना एकच दार असावें; त्या अक्षशालेच्या वाटेवर कसबी, कुलीन व विश्वासु अशा सोनाराची स्थापना करावी.

जांबूनद, शातकुंभ, हाटक, वैणव, व शृंगीशुक्तिज असे सोन्याचे उत्पत्तिस्थानावरून पांच भेद आहेत. हें सोनें शुद्ध रूपाचें, रसायनानें बनविलेलें किंवा खाणींतून काढून शुद्ध केलेलें असें तीन प्रकारचें असतें.

कमळांतील परागाच्या वर्णाचें, मऊ, स्निग्ध, नादरहित, व चमकणारें सोनें श्रेष्ठ होय; तांबूसपिवळें मध्यम, व लाल कनिष्ठ होय. श्रेष्ठ जातीच्या सोन्यांत फिकट पांढरा रंग असला तर तें सोनें अशोधित समजावें. तो अशुद्धपणा घालविण्याकरितां त्याच्या चौपट शिसें मिसळून तें शुद्ध करावें. शिशाच्या मिश्रणामुळें त्याचे तुकडे पडत असल्यास रानशेणींनीं त्याला आंच द्यावी. रुपक्षणामुळें तुकडे पडत असल्यास तेल व शेण यामध्यें तें घालून ठेवावें. खाणींतल्या सोन्याचे शिशाच्या मिश्रणानें तुकडे पडत असल्यास त्याचे पातळ पत्रे करून खलांत घालून कुटावें किंवा केळीच्या अगर सुरणाच्या कलकामध्यें तें घालून ठेवावें.

तुत्थोद्गत, गौडिक, कांबुक व चाक्रवालिक असे स्थानभेदानें रुप्याचे चार प्रकार आहेत. सफेत, स्निग्ध, व मऊ रुपें श्रेष्ठ; याच्या उलट गुणाचें व तडकणारें हें हीन होय. हीन रुप्यांत चतुर्थांश भाग शिसें घालून तापवून शुद्ध करावें. वर गोळे गोळे असलेलें, स्वच्छ, चकाकणारें, व दह्याच्या रंगाचें रुपें शुद्ध समजावें.

शुद्ध सोन्याचा हळदीसारखा एकच वर्ण असतो; त्यांत निरनिराळ्या प्रमाणांत तांबें मिसळलें असतां एक ते सोळा प्रकार होतात. कसोटीच्या दगडावर उत्तम सोन्याची प्रथम रेघ काढून पाठीमागून ज्या सोन्याची परीक्षा करावयाची आहे त्याची रेघ काढावी. दोन्हीचा रंग सारखा असल्यास तें सोनें चांगलें; कसोटीच्या सपाट पृष्ठभागावर काढलेली सोन्याची रेघ बोटानें किंवा नखानें घासली किंवा चोळली असतां पुसून गेल्यास सोनें शुद्ध समजावें. ती पुसतांना खालीं जर पूड पडेल तर सोन्यांत लबाडी आहे हें ओळखावें.

गोमूत्रांत भिजविलेले हिंगूळ, किंवा पुष्पकासीस (Sulphate of iron) यांचा हात सोन्याला दिला असतां तें पांढरें होतें. कमळाच्या केसरासारखा स्निग्ध, मृदु व चकचकीत असा कसोटीवरील रेघेचा रंग असल्यास तो श्रेष्ठ. कलिंग देशांतला किंवा तापी नदींतला व मुगासारखा काळसर रंगाचा दगड कसोटीला उत्तम होय. ज्या कसोटीवर सोन्याचा वर्ण जशाचा तसा उठतो तो दगड क्रय व विक्रय दोहोला हिताकारक होय. जो दगड हत्तीच्या कातड्यासारखा खरखरीत व हिरव्या रंगावर असतो व ज्यावर सोन्याचा रंग अधिक उठावदार दिसतो तो विक्री करण्याला फायदेशीर होय. अतिकठीण खडबडीत, विविधरंगाचा व सोन्याचा वर्ण वास्तविक असेल त्यापेक्षां कमी दाखविणारा दगड खरेदी करण्याला फायदेशीर असतो. कस पाहण्याकरितां सोन्याचा तुकडा तोडल्यास त्यांत जो स्निग्ध, अंतर्बाह्य सारख्या रंगाचा, मृदु, गुळगुळीत व तेजदार असेल तो श्रेष्ठ; सोनें तापविलें असतां जें आंत व बाहेर कमळांतील परागासारखें किंवा कोरांटीच्या फुलासारखें एकरंगी असतें तें उत्तम; काळसर किंवा निळसर निघाल्यास तें अशुद्ध जाणावें.

सोन्याचें वजन व माप याचें विवेचन ' पौतवाध्यक्ष ' प्रकरणांत करण्यांत येईल. त्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सोन्याचांदीची देवघेव व्हावी.

अधिकारावर नेमिल्यावांचून कोणीहि टांकसाळींत जाऊं नये; जो जाईल त्याचें सर्वस्व दंडादाखल काढून घ्यावें. कामावरील अधिकाऱ्यांजवळ सोनें किंवा रुपें सांपडल्यास तें दंडादाखल जप्त करावें.

सोन्याचे दागिने करणारे, मण्याचें व जडावाचें काम करणारे, निरनिराळ्या प्रकारचे सोनार, भातापुंकणारे, झाडलोट करणारे, मूस तयार करणारे, इत्यादि कामकऱ्यांना आंत जातांना व बाहेर येतांना झडती घेऊन सोडावें. त्यांचीं कामाचीं हत्यारें व अर्धवट राहिलेलीं कामें तेथल्यातेथेंच ठेवून द्यावीं. दागिने करण्याकरितां घेतलेलें सोनें व त्याचे चालू असलेलें काम याची रोजच्या रोज नोंद करावी व त्यावर सकाळ संध्याकाळ दोन्ही वेळां कारागीर व अधिकारी यांचे शिक्का मोर्तब व्हावें.

क्षेपण, गुण व क्षुद्रक असे दागिन्यांच्या कामाचे तीन प्रकार आहेत. ' क्षेपण ' म्हणजे माणि, हिरे वगैरेंचें जडावाचें काम होय; सोन्याची तार काढून सांखळीचें काम करणें याला ' गुण ' म्हणतात; सोन्याचे भरींव अगर पोकळ दागिने किंवा मणि तयार करणें याला ' क्षुद्रक ' काम म्हणतात.

जडावाचें काम करतांना मण्याचा किंवा रत्नाचा पांचवा भाग सोन्यांत बसवावा. आणि त्यावर त्याच्या अर्ध्यानें डाग लावावा. रुप्याच्या दागिन्यांत पाव हिस्सा तांबें व सोन्याच्या दागिन्यांत पाव हिस्सा रुपें खपलें जातें; म्हणून तशी लबाडी न होण्याविषयीं जपावें. सोन्याचे पोकळ मणि करण्याला तीन भाग शुद्ध सोन्याबरोबर दोन भाग हीण किंवा तीन भाग सोनें व चार भाग हिणकस घालावें. तार काढून दागिने करतांना अर्धें सोनें व अर्धी हीण धातु योजावी. रुप्याच्या भरीव किंवा पोकळ भांड्यांवर सोन्याचा मुलामा देण्याला रुप्याच्या अर्ध्यानें सोनें घ्यावें, किंवा रुप्याच्या चौथाई सोनें घेऊन हिंगुळाच्या चूर्णाशीं मिसळून लेप द्यावा किंवा रस करून मुलामा चढवावा.

दागिने करावयाला सोनें चांगल्या वर्णाचें व कांतिमान् असावें; सोन्यांत भारंभार शिसें घालून तें तापविलें व त्यास सैंधवाच्या भुकटीनें उजळा दिला तर निळी, पिवळी, पांढरी, पारवी किंवा पोपटाच्या रंगाची भेसळ धातु बनते.

सोन्यांत ३२ मिसळ घातली असतां मोराच्या कंठासारखें, तुकडा काढला असतां पांढरें, चकाकणारें असें ' तीक्ष्ण ' नांवाचें अशुद्ध सोनें होतें.

रुपेंहि शुद्ध किंवा अशुद्ध दोन्हीं प्रकारचें असतें. अशुद्ध रुपें शुद्ध करावयाचें असल्यास चार वेळां हाडाच्या भुकटीचा लेप देऊन, चारवेळां समभाग शिशाचें पुट देऊन, चारवेळां नुसत्या मोरचूदाचा, तीन वेळां शुद्ध मातीचा आणि दोन वेळां गोमयाचा असा सत्रा वेळां लेप देऊन, तापवून क्षारानें त्यास उजळा द्यावा. याप्रमाणें शुद्ध केलेलें रुपें एक कांकिणी पासून दोन माषपर्यंत सोन्यांत घालावें म्हणजे त्या सोन्यास रंग येतो व तेंच रुप्यांत घातल्यास त्यालाहि अत्यंत तजेला चढतो. शुद्ध सोनें तीन भाग व सफेत चांदी बत्तीस भाग एकत्र केली असतां तांबूसपांढरा असा मिश्रित धातु होतो. तेंच सोनें तांब्यांत मिसळल्यास पीतवर्ण मिश्रित धातु होतो.

सोन्याला उजळा देऊन तीन भाग तांबें मिसळल्यास तेंहि पिवळ्या रंगाचें होतें. दोन भाग रुपें व एक भाग शुद्ध सोनें यांचें मिश्रण केल्यास तें मुगाच्या रंगाचें होतें.

सोन्यांत निम्मा भाग लोखंड मिसळलें असतां तें काळें होतें. लोहाच्या व पाऱ्याच्या मिश्रणांत सोनें दोनदां बुचकळलें असतां त्याचा रंग पोपटाच्या पंखासारखा होतो.

या मिश्रणाकरितां सोनें घेतांना त्याचा कस पाहून तें घ्यावें. पोलाद व तांबें यांच्या मिश्रणाचे प्रकार असेच जाणावे. हिरे, माणिकें, मोतीं, पोंवळीं, व नाणीं यांच्या संबंधांत खरेखोटेपणा व सोन्यारुप्याचीं भांडीं घडवितांना त्या त्या धातूंचें प्रमाण माहीत असलें पाहिजे.

एकसारख्या रंगाचा, सारख्या वजनाचा, वर ठिपके वगैरे नसलेला, अंगाबरोबर बसणारा, चांगला घासलेला, खऱ्या रंगाचा व सहज घालतां काढतां येणारा दागिना वापरण्यांत आनंद होतो.

त्याचप्रमाणें उजळा दिलेला, प्रभायुक्त, डौलदार, रमणीय, व चांगल्या घाटाचा व बरोबर बसणारा असा दागिना सर्वोत्कृष्ट होय.

---

## अध्याय १५ वा.

### " सराफकट्ट्यावरील मुख्य सोनारांचे व्यवहार "

अधिकाऱ्यानें नेमिलेल्या मुख्य सोनारानें शहरवासी व जानपद यांच्याकडून जें सोनें, रुपें येईल त्याचे कारा-

गिराकडून दागिने करवावे. कारागिरांनीं अमुक दिवसांत हें काम करून देतों असा करार करून काम करावें. एखादें काम विशेष प्रकारचें असल्यास त्याला कालाची मुदत न घालतांहि काम करावें.

वायदा टळल्यास एक चतुर्थांश वेतन कमी द्यावें आणि त्याच्या दुप्पट दंड करावा. सांगितलेल्याहून विपरीत प्रकारानें काम केल्यास वेतन देऊं नये शिवाय वेतनाच्या दुप्पट दंड करावा.

सोनें, चांदी घेतांना ज्या कसाची व वजनाची असेल तशाच वजनाची व कसाचीं नाणीं पाडून द्यावीं. कालांतरानें देखील नाण्यांची देवघेव पहिल्या प्रमाणेंच व्हावी; मात्र तीं नाणीं झिजलेलीं किंवा फुटलेलीं नसावीं.

मुख्य सोनारानें कारागिरापासून शुद्ध सोनें, दागिने, नाण्यांवरील शिक्के व हुंडणावळ यांची माहिती समजून घ्यावी. सोन्यारुप्याचें नाणें पाडून देतांना सोळा भागांत एक चतुर्थांश भाग कमी द्यावा. एक कांकिणीभार पोलाद व दोन कांकिणीभार रुपें, सोळा माष वजनाच्या सोन्यामध्यें रंगाकरितां टाकितात. त्यांतला ½ भाग म्हणजे अर्धी कांकिणी झीज जाते. एक माषभार सोनें कमी झालें असतां किंवा कस बदलला असतां 'पूर्वसाहस दंड' घ्यावा. खोटें वजन दिलें असतां मध्यमदंड; तागडी खोटी असतां 'उत्तम दंड;' त्याचप्रमाणें शुद्ध धातूंत अदलाबदल केली असतां 'उत्तम दंडच' करावा.

मुख्य सोनाराच्या देखरेखी व्यतिरिक्त किंवा इतरत्र नाणीं बनविल्यास जो करविणारा त्याला १२ पण दंड; तो पळून गेला असतां नाणें करणाऱ्याला दुप्पट दंड; तो पळून गेला नसल्यास त्याच्याकडे दोष आहे कीं काय याची चौकशी करण्याकरितां त्यास कंटक शोधकाकडे न्यावें व ( निरपराधी ठरल्यास ) कर्त्याला दोनशें पण दंड करावा. दंड न दिल्यास बोटें तोडावींत.

तराजू व वजनें हीं वजनामापावरील अध्यक्षाच्या जवळून विकत घ्यावीं; न घेतल्यास बारापण दंड करावा. भरीव दागिना, भांड्यासारखे मध्यें पोकळ असलेल्या वस्तु घडविणें, जाडपत्र्यानें मढविणें, पातळ पत्र्यानें मढविणें, तार काढून सांखळीसारखे दागिने करणें व मुलामा चढविणें अशीं सहा प्रकारचीं कारागिरीचीं कामें होत.

खोटें वजन देणें, दागिन्यांतलें सोनें काढून हीण धातु घालणें, जुन्या दागिन्याचा रस करतांना त्यांतलें सोनें लांबविणें, पत्र्यांनीं मढवितांना मधला सोन्याचा पत्रा काढून दुसरा घालणें, आणि धातु तापवून ती शुद्ध करतांना भेसळ करणें या अपहार करण्याच्या युक्त्या होत.

वाटेल तेव्हां झटका देतां येईल असा बनविलेला, तळाला पोकळींत लोखंड किंवा शिसें भरलेला, मधला कांटा मोडलेला, पोकळ दांडीचा, विषम पारडीं असलेला, दोरीला गांठी असलेला, दांडी वांकलेला, व लोहचुंबकाचा उपयोग केलेला तराजू खोटा होय.

दोन भाग रुपें व एक भाग तांबें मिसळून 'त्रिपुटक' होतें. शुद्ध सोन्यांत तें त्रिपुटक घालून तेवढें सोनें काढलें म्हणजे त्यास 'त्रिपुटकापसारित' म्हणतात. नुसतें तांबें मिसळून तितकेंच सोनें काढून घेतल्यास तें 'शुल्बापसारित' होय. लोखंड व रुपें यांच्या समभाग मिश्रणास 'वेल्लक' म्हणतात. त्याची अदलाबदल करून सोनें लांबविल्यास त्यास 'वेल्लकापसारित' म्हणतात. एक भाग सोनें व अर्धा भाग तांबें यांचें मिश्रण सोन्यांत घालून शुद्ध सोनें काढून घेतल्यास तें 'हेमापसारित' होय.

पोकळ मूस, धातुशुद्ध करतांना निघालेली मळी, कात्री, पन्हळी, चिमटा, सांडस, सुवर्चिकाक्षार, व मीठ हीं सर्व सोन्याचा रस करतांना अपहार करण्याचीं साधनें होत, किंवा सोन्याच्या रसांत बुडविलेले वाळूचे गोळे शेगडींत आधीं घालून ठेवून मूस फुटली असें म्हणून अग्नींतून बाहेर काढून खरें सोनें काढून घेतलें जातें. हाहि एक अपसारणाचा मार्ग होय.

जुना मढविलेला दागिना दुरुस्त करतांना, वरील पत्रा काढतांना, सोन्याच्या ऐवजीं रुपें घालावयाचें किंवा सोन्याच्या मण्यांच्या जागीं सोन्याचा मुलामा दिलेलें लोखंडाचे चूर घालावयाचें याला विस्रावण म्हणतात.

पेटक म्हणजे लपेटा, यांत पक्का किंवा ढिला असे दोन प्रकार आहेत. जोडणी किंवा डाग करतांना, मुलामा चढवितांना किंवा तार विणून दागिना करतांना या युक्त्यांचा उपयोग करण्यांत येतो. शिशावर सोन्याचा पत्रा लपेटून मधील भाग लाखेनें भरला म्हणजे तो घट्ट लपेटा झाला. त्यांत लाख न बसाविल्यास तोच ढिला लपेटा होतो.

लपेटा करतांना एकाच बाजूस किंवा दोन्ही बाजूंना पत्रा ठोकून लपेटा करतां येतो. या पत्र्यामध्यें तांबें किंवा रुपें घालतात. तांब्याच्या तुकड्यांवर सोन्याचा पत्रा लपेटून दोन्ही कडा ठोकून ठोकून गुळगुळीत करतात. त्याच प्रमाणें हलक्या धातूवर तांब्याचा किंवा रुप्याचा पत्रा ठोकून त्याचाहि लपेटा करतां येतो.

कसोटीवर घासून, तापवून अथवा आवाजावरून किंवा छेदन करून पाहून लपेट्यांतील खरा प्रकार जाणावा. एकत्रित केलेले दोन धातु पक्के सांधले नसतील तर बोराच्या आंबट रसांत किंवा मिठाच्या पाण्यांत टाकल्यास ते उलगडतां येतात.

कडीं, आंगठ्या वगैरे सारख्या दागिन्यांत किंवा नाण्यांत सोनमाती अगर हिंगूळ यांचा कल्क तापवून घालतात. खड्याच्या अंगठी सारख्या अलंकारांत सोन्याचे कण व गांधार देशांतील लाखसारखी माती यांचें मिश्रण करून तें तापवून दागिन्यांत घालतात; म्हणजे तो अलंकार घट्ट होतो. तोच अलंकार लाल तापविला असतां किंवा ठोकला असतां त्यांतील अशुद्ध भाग नाहींसा होतो. सोन्यारुप्याच्या दागिन्यांत अथवा नाण्यांत बारीक मीठ किंवा वाळूचे कण लाल तापवून घातले असतां तो दागिना पक्का होतो. तो उकळून काढिल्यास त्यांतील अशुद्ध भाग नाहींसा होतो. सोन्यारुप्याच्या दोन पत्र्यांच्या मधील भागांत मेण व अभ्रकाची भुकटी घालतात. त्याच्या सर्व बाजू पक्क्या केल्या नसल्यास तो दागिना पाण्यांत टाकिल्यास त्यांतली एक बाजू मात्र खालीं जाते, किंवा त्याच्या जोडांत सुई टोचली जाते, जडावाच्या पोकळ दागिन्यांत मणि, चांदी किंवा सुवर्ण काढून घेऊन त्याच्या जागीं तसलेच खोटें बसवितां येतें. याला ' पिंक अपसारण ' म्हणतात. खूप तापविणें किंवा ठोकणें हा त्याच्या परीक्षेचा मार्ग होय. असल्या सर्व लबाड्या माहीत होण्यास हिरे, माणकें, मोत्यें, पोवळीं, यांच्या जाति, रूप, वर्ण, वजन, माप, व रंग इत्यादिकांचीं लक्षणें समजून घ्यावीं.

तयार केलेल्या वस्तूंची परीक्षा करतांना किंवा जुन्या वस्तूंची परीक्षा करतांना ठोकणें, तोडणें, खरडणें, व घासणें असे चार सोनें हरण करण्याचे साधनप्रकार आहेत. दागिन्याचा जोड बरोबर आहे कीं नाहीं हें पाहण्याच्या मिषानें लहान, तारेचे किंवा पेटीसारखे पोकळ दागिने हातोड्यानें ठोकून वाढविले जातात, व त्यांतलें वाढलेलें सोनें काढून घेतलें जातें, याला ' परिकुट्टन ' म्हणतात. ज्या दागिन्यांत पत्र्यांवर पत्रे जोडलेले असतात त्यांतला मधलाच पत्रा काढून घेऊन त्याच्या जागीं मुलामा दिलेल्या शिशाच्या पत्र्याची योजना करणें याला ' अवचेतन ' म्हणतात.

भरीव दागिना तीक्ष्ण हत्यारानें खरडून सोनें काढलें जातें, तें ' उल्लेखन ' होय. हरताळ, मनशीळ, किंवा हिंगूळ यांच्या बरोबर कुरुंदाचें चूर्ण मिसळून तें वस्त्रांत घालून त्यानें दागिना घासणें हें ' परिमर्दन ' होय. अशा घासण्यानें सोन्यारुप्याचीं भांडीं हलकीं होत जातात; पण दागिन्यांत फरक झालेला दिसत नाहीं.

मोडलेले, तोडलेले किंवा घासलेले दागिने किती कमी झाले हे त्याच्या सारख्याच दुसऱ्या बिनतोडलेल्या दागिन्यांशीं ताडून अनुमान करावें. पत्रा काढून घेतला असेल तर तेवढाच पत्र्याचा तुकडा घेऊन त्यावर अनुमान बांधावें. तोडलेल्या दागिन्यालाहि हाच नियम लागू आहे.

दागिने शुद्ध राखण्यासाठीं पुनः पुनः तापवावेत व पाण्यांत घालावेत.

शेगडी, ऐरण, रस ओतण्याची पन्हळी, हत्यारें, मोरपीस, दोरा, कपडे, शेंडी, सांधे, भाता, पाण्याचें भांडें, राख हीं स्थानें सोनाराची लबाडी ओळखण्याकरितां तपासावी. त्याचप्रमाणें हाताची हालचाल, दुसऱ्याला

कांहीं देणें घेणें, माशा निवारण करणें, आपल्या शरीराच्या विशिष्ट भागांकडे वारंवार पहाणें वगैरे प्रकारांवरूनहि त्याची लबाडी शोधून काढावी.

ज्या रुप्याच्या वस्तु दुर्गंधियुक्त, मलीन, खरखरीत, टणक, व वर्णहीन असतील त्यांतील रुपें शुद्ध नाहीं असें समजावें.

याप्रमाणें नव्या, जुन्या, बिघडलेल्या सोन्यारुप्याच्या वस्तूंची परीक्षा करावी, व त्यांत लबाडी दिसून आल्यास इतरत्र सांगितल्याप्रमाणें दंड करावा.

---

# अध्याय ३६ वा.

## " कोठीकामगार "

कोठी कामगारानें सीता, राष्ट्र, क्रयिम, परिवर्तक, प्रामित्यक, आपमित्यक, सिंव्हनिक, अन्यजात, व्ययप्रत्याय, उपस्थान इतक्या गोष्टींवर नजर ठेवावी.

शेती कामगारानें आणलेला धान्यादि माल म्हणजे सीता ( शेतीचें उत्पन्न ).

गांवाची खंडणी, शेतीचा सहावा हिस्सा, सैन्यास द्यावयाची पोटगी, बली म्हणजे बलुतें, फळबागांवरील कर, संतोष पट्टी, जादा कर, कोंडवाडा पट्टी, नजराणा, तलाव, राजमार्ग यांच्यावरील झाडांचें उत्पन्न, या सर्वाला ' राष्ट्र ' असें म्हणतात.

धान्य विकून आलेली रोकड, द्रव्य देऊन खरेदी केलेलें धान्य, वाढीच्या बोलीनें धान्य ठेवून घेणें व तसलें धान्य परत करणें याला ' क्रयिम ' असें म्हणावें. एका जातीचें धान्य देऊन त्याच्या मोबदला दुसऱ्या जातीचें धान्य घेणें हें ' परिवर्तक ' होय. मागून आणलेलें धान्य तें ' प्रामित्यक; ' व परत देण्याच्या बोलीनें धान्य आणणें हें ' आपमित्यक ' होय.

सडणें, भरडणें, भाजणें, दारु गाळणें, पीठ करणें, तेल काढणें, मेंढ्या पाळणें, उसाचीं गुऱ्हाळीं लावणें व गूळ, साखर वगैरे तयार करणें, इत्यादि कामें करवून घेण्याला ' सिंहनिका ' असें म्हणतात.

बेवारस माल व चुकून राहिलेला माल हा ' अन्यजात ' होय. खर्चाकरितां दिलेल्या रकमेंतून काम संपवून किंवा काम फसल्यामुळें सोडून देऊन किंवा अंदाजापेक्षां कमी खर्च झाल्यानें परत आलेल्या रकमेला ' व्ययप्रत्याय ' म्हणतात.

वजनामापांत राहिलेली कसर, माप घेतांना वर हात धरून माप घेतल्यानें येणारी वाढ, कमिशन, कसर, मागील शिल्लक, अगाऊ घेतलेलें उत्पन्न इतक्यांना ' उपस्थान ' म्हणतात.

धान्य, स्नेह, क्षार, व लवण यांच्या व्यवहाराचें वर्णन करावयाचें, त्यांपैकीं धान्याचें विवेचन ' सीताध्यक्ष ' प्रकरणांत सांगितलें जाईल.

तूप, तेल, चरबी व मज्जा हे स्नेहाचे प्रकार होत.

काकवी, गूळ, गुळी साखर, खडीसाखर हा क्षार वर्ग होय.

खाणींतील मीठ, समुद्रांतील मीठ, विड ( एक प्रकारचें कृत्रिम मीठ ), जवखार सुवर्चल देशांतले मीठ, व सोरमीठ हे लवणाचे प्रकार होत.

मधमाशांनीं तयार केलेला व द्राक्षांतून काढलेला असे मधाचे दोन प्रकार आहेत.

उंसाचा रस, गूळ, मध, काकवी, जांभूळ, अगर फणस यांचा रस यांपैकीं एक पदार्थ घेऊन त्यांत मुरुडशिंगी व पिंपळी यांचा कषाय घालून एक महिना, सहा महिने किंवा वर्षभर तो ठेवला व त्यांत चिबूड, कांकडी, ऊंस, आंबा, किंवा आंवळा याचा रस मिसळला तर किंवा रस न मिसळतांहि शुक्त नांवाचें आसव तयार होतें.

चिंच, करवंद, आंबा, आवळा, डाळिंब, लिंबू, बोरें, कागदी लिंबू, साखर लिंबू इत्यादि फळांचा ' आम्ल-वर्ग ' होय.

दहीं, कांजी हा ' द्रवाम्लवर्ग ' होय.

पिंपळी, मिरीं, सुंठ, जिरें, भूनिंब, पांढरी मोहरी, धने, शतावरी, दवणा, मरवा इत्यादि अनेक वस्तूंच्या वर्गाला ' तिक्त ' ( तिखट ) वर्ग म्हणतात.

सुके मासे व मांस, कंदमुळें, फळें व भाजीपाला हे शाक वर्गांतले होत.

याप्रमाणें कोठारांत जें धान्य वगैरे आलें असेल त्यांपैकीं अर्धें लोकांच्या अडचणी दूर करण्याकरितां शिल्लक ठेवावें व अर्धें उपयोगाकरितां आणावें; नवीन धान्य हातीं आल्यावर जुनें काढून टाकावें.

धान्य कुटलें, सडलें, दळलें, भाजलें, भिजविलें, सुकविलें, किंवा रांधलें तर त्यांत वाढ किंवा तूट किती येते याचें प्रमाण कोठी कामगारानें तपासून पहावें.

कोद्रूव साळ यांचा अर्धा भाग, तांदुळाच्या साळीचा सात अष्टमांश भाग, वरी तांदुळाचा दोन तृतियांश भाग असे भाग चांगले उतरतात. प्रियंगू धान्याचा अर्धा भाग, चवळी, मूग, उडीद यांचा सात अष्टमांश भाग, रौब्य धान्याचा अर्धा भाग आणि मसुराचा $\frac{2}{3}$ भाग चांगला उतरतो. कच्चे मूग, उडीद वगैरेंचें पीठ, मूळ धान्याच्या दीडपट भरतें. फोल काढलेल्या यंवाचें पीठ दुप्पट भरतें, त्याचप्रमाणें कण्हेरी अथवा कांजी ही शिजविली किंवा पीठ उकडलें म्हणजे तेंहि दुप्पट होतें.

कोद्रव, वरी, उदारक, प्रियंगू वगैरे धान्यें शिजविलीं म्हणजे तिप्पट होतात, तांदूळ चौपट होतो आणि शाली पांचपट फुगतात. डाळी वगैरे सारखीं धान्यें ओलीं करून ठेविलीं म्हणजे दुप्पट आणि मोड येई पर्यंत ठेविलीं म्हणजे तिप्पट फुगतात. धान्यें भाजलीं म्हणजे पांचवा हिस्सा अधिक भरतात. चणे वगैरे द्विदल धान्यें भाजलीं म्हणजे दुप्पट आणि साळीच्या लाह्या किंवा मुरमुरे हे दुप्पट भरतात. आळशीचें तेल सहावा हिस्सा; लिंबू, कुशाम्र, कवठ, वगैरेंचें पांचवा हिस्सा आणि तीळ, कुसुब, मधूक, हिंगणबेट यांचें तेल चौथा हिस्सा भरतें. कापूस व हलकें रेशीम यांच्या वजनाच्या एक पंचमांश सूत निघतें.

पांच द्रोण म्हणजे वीस आढक साळी मधून बारा आढक तांदुळांचा आहार हत्तीच्या छाव्याला द्यावा. माजलेल्या हत्तीला अकरा आढक; अंबारीच्या हत्तीला दहा आढक, लढाईच्या हत्तीला नऊ; पायदळाबरोबरच्या हत्तीला आठ, अधिकाऱ्यांच्या हत्तीला सात, राणी व राजपुत्र यांच्या हत्तीला सहा, व राजाच्या हत्तीला पांच आढक असें खाणें द्यावें.

अखंड किंवा अत्यंत स्वच्छ केलेले एक प्रस्थ ( पावशेर ) तांदूळ, त्याचा चतुर्थांश डाळ, डाळीच्या सोळावा हिस्सा मीठ, डाळीचा चतुर्थांश तूप किंवा तेल हा एका चांगल्या माणसाचा शिधा झाला. तांदुळाच्या सहावा हिस्सा डाळ व वरच्या अर्धें तेल इतर जनांना द्यावें. स्त्रियांना पहिल्या शिध्याच्या तीन चतुर्थांश व बालांना अर्धा शिधा द्यावा.

वीस पल मांसाला अर्धा छटाक तेल, एक पल मीठ, गूळ एक पल, अर्धा तोळा तिखट, व दहीं अदपाव द्यावें. मांस जितकें अधिक असेल तितक्या प्रमाणांत बाकीचेहि जिन्नस अधिक द्यावेत. भाजीपाल्याला मांसाच्या दीडपटीनें व सुकलेली भाजी किंवा सुकलेलें मांस असेल तर सगळे जिन्नस दुप्पट प्रमाणांत द्यावेत.

हत्ती घोड्यांस खाणें किती द्यावें तें ' हस्त्यध्यक्ष ' व ' अश्वाध्यक्ष ' या प्रकरणांत सांगूं.

बैलांना एक द्रोण ( चार आढक ) उडीद अथवा सातू अर्धे कच्चे शिजवून घालावें. इतर जिन्नस घोड्या प्रमाणें समजावे; शिवाय बैलांना एक तुला पेंड किंवा दहा आढक भूस घालावें. म्हैस व उंट यांना बैलाच्या दुप्पट, गाढव व काळवीट यांना दोन आढक, हरिणांना एक आढक, शेळी, एडका व डुक्कर यांना अर्धा आढक धान्य द्यावें किंवा भूस दुप्पट द्यावें. कुत्र्यांना पावशेर भात घालावा, हंस, क्रौंच, मोर यांना अदपाव; या खेरीज जे मृग, पशु, पक्षी हिंस्र जनावरें असतील त्यांना एक वेळ खावयाला घालून त्यावरून त्यांच्या खाण्याचें प्रमाण ठरवावें.

कोळसे व भूस, लोहार व विटा भाजणारे यांना अनुक्रमें द्यावें. कण्या राहतील त्या दास, मजूर, व स्वैपाकी यांना द्याव्या. या खेरीज इतर जिन्नस सूपकाच्या हाताखालील माणसांना द्यावेत.

तराजू, मापें, वजनें, जातें, उखळ, मुसळ, खलबत्ता, अडकित्ता, सूप, चाळण, रोंळी, पेटारा, व केरसुणी या वस्तु कोठींत लागतात.

झाडलोट करणारे, राखण करणारे, वजन–माप करणारे, त्यांच्यावर देखरेख करणारे, सामान काढून देणारे, दिलेलें सामान टिपून ठेवणारे, सर्पणं आणणारे दास, मजूर व वेठीला धरलेले इसम हा नोकरपेशा असावा.

धान्य जमिनीला न लागेल असें उंच ठेवावें. गूळ, काकवी वगैरे जिन्नस तोंड बंद करून व गवतानें आच्छादून ठेवावे. तेल घागरींत किंवा लाकडी पिपांत भरून ठेवावें. मीठ मातीच्या घड्यांत ठेवावें व इतर जिन्नस त्याला योग्य अशा जागीं ठेवून द्यावें.

---

# अध्याय १७ वा.

## पण्याध्यक्ष.

पण्याध्यक्षाला जमिनीवर किंवा पाण्यांत उत्पन्न झालेल्या आणि स्थलमार्गानें किंवा जलमार्गानें आलेल्या वस्तूंची बरी वाईट परीक्षा, तेजी, मंदी, आणि आवड नावड माहीत पाहिजे. त्याचप्रमाणें कोणता जिन्नस केव्हां अधिक सांठवावा केव्हां कमी सांठवावा, कोणत्या वस्तूची विक्री केव्हां करावी, व खरेदी केव्हां करावी याचें त्याला ज्ञान असावें.

जो माल भरपूर व ठिकठिकाणीं तयार झाला असेल तो एकत्र करून त्याची किंमत चढवावी, मूळ किंमत पदरांत पडल्यावर मग त्याची किंमत उतरवावी. स्वदेशांत उत्पन्न झालेला जेवढा राजाच्या हक्काचा माल असेल तेवढा एकत्र करून त्याचा एकालाच मक्ता द्यावा. परदेशांतून आलेला माल विकण्याविषयीं प्रतिबंध असूं नये. स्वदेशचा व परदेशचा कोणताहि माल प्रजेला फायदेशीर होईल अशा रीतीनें विकावयाला लावावा. मोठा लाभ होत असला तरी त्यांत प्रजेचें नुकसान असल्यास तसा नफा घेऊं देऊं नये.

नित्य व्यवहाराच्या वस्तूंच्या विक्रींत काल व स्थल यांचीं बंधनें घालावींत.

किंवा राजाचा माल ठरीव किंमतीला विकण्यासाठीं निरनिराळ्या व्यापाऱ्यांना द्यावा. नुकसान झाल्यास तें भरून घ्यावें.

मापावर सोळा टक्के, वजनावर वीस टक्के, संख्येनें मोजून द्यावयाच्या पदार्थांवर अकरा टक्के कसर घ्यावी.

परदेशांतील मालाला सवलती देऊन व्यापार वाढवावा. परदेशांतील माल वाहून आणणारे नावाडी व कारवान यांना जकातीची माफी असावी, पण तो दाखला मानूं नये. परदेशांतून आलेल्या व्यापाऱ्यांवर पैशाच्या वसुली करितां खटले होऊं नयेत; मात्र त्यांच्याच भागीदारांना हा प्रतिबंध लागू असूं नये.

राजाच्या मालाची विक्री करणाऱ्यांनीं विक्रीचा पैसा एकच भोंक असलेल्या लाकडी पेटींत टाकावा, व तो संध्याकाळच्यावेळीं पण्याध्यक्षाच्या स्वाधीन करावा, व त्यांना " ही विक्री झाली व इतका माल शिल्लक राहिला "

असा हिशेब द्यावा, आणि आपली तागडी, वजनें, मापें त्याजजवळ द्यावीं. हा आपल्या देशांतील व्यापाराचा विचार झाला.

परदेशांत माल पाठवावयाचा असेल तर त्या देशांतील त्या मालाची व तत्सदृश मालाची मूळ किंमत व विक्रीची किंमत यांची माहिती मिळवून त्याचप्रमाणें मालावरील जकात, रस्त्यावरील जकात, मालाच्या बरोबरीच्या पहारे-कऱ्यांचा पगार, रानटी लोकांना द्यावयाचा कर, नदीवरील उताराचें भाडें, वाटेंतील अन्नपाण्याचा खर्च या सर्वांचा विचार करून नफा काय येईल तें पहावें. नफा होण्याचें लक्षण नसल्यास निदान आपल्या मालाच्या मोबदला दुसरा माल घेतल्यानें नफा होतो काय पहावें. नफा होतोसा वाटल्यास नफ्याच्या चतुर्थांश खर्चानें, चांगल्या सुरक्षित रस्त्यानें, खुष्कीवरून माल पाठवावा. रानटी टोळ्या, सरहद्दीवरील संरक्षक, शहर व राष्ट्र यांचे मुख्य यांची मर्जी राखण्याकरितां त्यांना भेट पाठवावी.

संकट ओढवल्यास मालाचें आणि स्वतःचें संरक्षण करावें.

माल आपल्या निर्दिष्ट स्थानाप्रत न पोंचल्यास निदान सर्व खर्च उगवेल अशा ठिकाणीं तो विकून टाकावा.

दर्यामार्गानें माल पाठवावयाचा झाल्यास गाडीभाडें, भोजन खर्च, परदेशांतील त्याच मालाची व सदृश मालाची किंमत, प्रवासाला सोयीचा काळ, संकटांचा प्रतीकार व बाजारपेठेंतील चालीरीति व व्यवहार यांची माहिती मिळवावी.

नदीच्या मार्गानेंहि त्या त्या पेठेंतील माहितीवरून नफातोट्याचें अनुमान करून जेथें लाभ होईलसें वाटेल तिकडे जावें. नुकसानीच्या पेठा टाळाव्यात.

---

# अध्याय ३८ वा.

## कुप्याध्यक्ष अथवा वन्यसंपत्तीवरील अधिकारी.

कुप्याध्यक्षानें उत्पादक वनाचें रक्षण करणाऱ्यांकडून वन्य द्रव्यें आणवावीं, व त्यांचे कारखाने पण चाल-वावेत. राखलेल्या वनांतील झाडें तोडणाऱ्या इसमापासून नुकसान भरपाई व दंड किती घ्यावा याचाहि निर्णय कुप्या-ध्यक्षानें करावा, व आकस्मिक विपत्तीच्या प्रसंगीं हा दंड माफ करावा.

साग, तिनिश, धन्वन म्हणजे अश्वत्थ किंवा बांबू, अर्जुन, मोह, तिलक, साल, अशोक, अरिमेद, राजादन, ( पियाल ) शिरीष, खैर, देवदार, ताड, सर्ज ( साल ), अश्वकर्ण, सोमवल्क, ( पांढरा खैर ), कश, आम्र, प्रियक, धव, हा सर्व इमारती लाकडांचा वर्ग होय.

उटज, चिमिय, चाप, वेणु, वंश, सातिन, कंटक, भाल्लुक हें सर्व ‘ वेणु ’ वर्गांत येतात.

वेत, शोकवल्ली, वाशी, श्यामलता, नागलता हा ‘ वल्लीवर्ग ’ होय. मालती, मूर्वा, अर्का, अंबाडी, केत्की, ताग हा ‘ वल्कल वर्ग ’ होय.

मुंज, बल्बज इत्यादिकांचा दोऱ्या वळण्याकडे उपयोग होतो. ताली, ताड आणि भूर्ज यांचीं पानें लेखनाला उपयोगी पडतात. किंशुक, कुसुंबा, व जास्वंदी हीं रंग करण्याला उपयोगी पडणारीं फुलें होत. कंदमूलफलें इत्यादिकांचा औषधीकडे उपयोग होतो.

कालकूट, बचनाग, हालाहल, मेषशृंग, मुस्ता, कुष्ठ, महाविष, वेल्लितक, गौरार्द्र, बालार्द्र, मार्कट, हैमवत, कालिंगक, दारदक, अंकोलसारक, उष्ट्रक हे सर्व वनस्पतींच्या विषांचे प्रकार होत. सर्प आणि किडे हे घटांत घालून सांठवून ठेविले असतां त्यांचें विष होतें.

घोरपड, पांढरी घोरपड, चित्ता, कांसव, सिंह, व्याघ्र, हत्ती, रेडे, वनगाई, शरभ, गेंडा, गाय, हरिण, गवा, इत्यादि पशूपासून चामडें, हाडें, पित्त, तात, दांत, शिंगें, खूर, शेपूट, इत्यादि वस्तू मिळतात. त्याचप्रमाणें इतरहि मृग, पशु, पक्षी, व्याल यांपासूनहि या वस्तु मिळूं शकतात.

लोखंड, तांबें, वृत्त ?, कांसें, शिसें, कथील, जस्त, पितळ हे सर्व ' लोहवर्गांत ' येतात.

वेत, साल, आणि माती यांचीं भांडीं होतात.

कोळसे, धान्याचें भूस, भस्म, जनावरें, गुरें, पक्षी, व्याल, लाकडें, गवत यांचा संग्रह कुप्यवर्गांतच येतो.

कुप्याध्यक्षानें शहरांत व शहराबाहेर सर्व तऱ्हेच्या उपजीविकेच्या आणि शहर रक्षणाच्या सामानाचे निरनिराळे कारखाने स्थापावेत.

---

# अध्याय २९ वा.



## आयुधागाराध्यक्ष.

आयुधागारावरील अधिकाऱ्यानें युद्धोपयोगी, किल्ल्याच्या वेढ्याच्या उपयोगी पडणारीं, शत्रूच्या शहराचा नाश करणारीं यंत्रें, शस्त्रें, चिलखतें व इतर हत्यारें त्या त्या तज्ज्ञ कारागिरांकडून करवून घ्यावीं, व त्यांना केलेल्या कामाच्या व लागलेल्या वेळाच्या मानानें वेतन देण्याचें ठरवावें. हत्यारें तयार झाल्यावर त्या त्या हत्याराला योग्य अशा जागेंत तीं ठेवावीं, व वरचेवर त्यांची जागा बदलावी आणि त्यांना ऊन व हवा वारंवार द्यावी. उष्णता, ओलावा, कीटक यांनीं जर हत्यारांचा नाश होत असेल तर त्यांच्या व्यवस्थेंत बदल करावा. हत्यारांच्या जाति, रूप, लक्षण, मोजमाप, उगमस्थान, किंमत यांची तीं तीं हत्यारें वापरणाऱ्यांकडून परीक्षा करवावी. स्थिरयंत्रें पुढील प्रमाणें आहेतः—

१ सर्वतोभद्र—चक्राकार तीक्ष्ण यंत्र—हें गरगर फिरविलें म्हणजे पाषाणांचा मारा होतो.
२ जामदग्न्य—मध्यरंध्र असलेलें यंत्र—यानें मोठमोठे बाण सोडितां येतात.
३ बहुमुख—किल्ल्याच्या तटावर कातड्यानें आच्छादिलेला व अनेक छिद्रें असलेला मोठा बुरुज—यांतून सर्व बाजूंनीं बाण सोडितां येतात.
४ विश्वासघाति—किल्ल्याच्या खंदकावर टाकिलेला व शत्रु आल्यास पडेल अशा रीतीची योजना केलेला पूल ( किंवा परीघ—तुळई ).
५ संघाटी—शत्रूच्या किल्ल्याच्या बुरुजास किंवा इतर भागांस आग लावण्याकरितां दीर्घ काष्ठदंड.
६ यानक—चक्रावर बसविलेला दंड.
७ पर्जन्यक—आग विझविण्याकरितां केलेलें यंत्र.
८ अर्धबाहु—शत्रूच्या अंगावर पाडतां येतील अशा रीतीनें समोरासमोर ठेविलेले दोन स्तंभ.
९ ऊर्ध्वबाहु—उंचीवरून शत्रूवर फेंकण्याकरितां केलेले स्तंभ.

चलयंत्रें पुढें दिल्याप्रमाणें असतातः—

१ पंचालिक—मोठमोठे खिळे ठोकलेली फळी—शत्रूच्या मार्गांत पाण्यांत बुडवून ठेविलेली.
२ देवदंड—बुरुजावर ठेविलेला लांब लांब खिळे ठोकलेला दंड.
३ सूकरिका—पाषाणांच्या माऱ्यापासून किल्ल्यांचें संरक्षण करण्याकरतां कापूस किंवा लोंकर भरलेली कातडी पिशवी.

४ मुसळ—खैराचा शूळ.

५ यष्टि—खैराचा दंड.

६ हस्तिवारक—हत्तीचा मारा उलटविण्यासाठीं तीक्ष्ण टोकाचा दंड.

७ तालवृंत—पंख्याच्या आकाराचें चक्र.

८ मुद्गर—मुद्गल.

९ गदा—गदा.

१० स्पृक्तला—अणकुच्या असलेली गदा.

११ कुद्दाल—कुदळ.

१२ आस्फोटिम—कातड्यानें मढविलेलें चार खांबी यंत्र.

१३ औद्धाटिम—एक मुद्गराकार यंत्र—बुरुज पाडण्याकरितां.

१४ सतघ्नि—किल्ल्याच्या तटावर ठेविलेला तीक्ष्ण अणकुच्यांचा मोठा स्तंभ.

१५ त्रिशूल.

१६ चक्र.

आयुधें अथवा शस्त्रें यांचे प्रकार:—

१ शक्ति—गोस्तनाकार मुठीचें चार हात लांबीचें करवीरपत्राकार लोखंडी शस्त्र.

२ प्रास—दोनमुठींचें, चोवीस अंगुळें लांबीचें शस्त्र.

३ कुंत—पांच, सहा किंवा सात हात लांबीचा काष्ठदंड.

४ हाटक—तीन किंवा चार पात्यांचा दंड.

५ भिंडिवाल—जाड कुंत.

६ शूल.

७ तोमर—चार, साडेचार किंवा पांच हात लांबीचा, बाणासारखें पातें असलेला दंड.

८ वराहकर्ण—वराहाच्या कानासारखें पातें असलेला दंड.

९ कणय—वीस, बावीस किंवा चोवीस अंगुळें लांबीचा दोनहि टोंकें त्रिकोणाकृति असलेला लोहदंड.

१० कर्पण—हातानें फेंकण्याचा बाण.

११ त्रासिक—प्रासासारखें लोहशस्त्र.

हीं सर्व हलमुखी म्हणजे नांगरतोंडी शस्त्रें होत.

धनुष्यें ताडाचीं, चाप नामक कळकाचीं, लांकडाचीं ( धन्वन झाडाच्या लांकडाचीं ) आणि शिंगाचीं केलेलीं असतात; आणि त्यांस अनुक्रमें कार्मुक, कोदंड, द्रूणा व धनु म्हणतात.

धनुष्यांच्या दोऱ्या मूर्वाच्या धाग्याच्या, अर्कवृक्षाच्या धाग्याच्या, अंबाडीच्या, गवेधुकाच्या धाग्याच्या, वेळूच्या किंवा तांतीच्या करतात.

वेणु, शर, शलाका, दंडासन व नाराच हे बाणांचे प्रकार होत.

ज्यावर बाण सोडावयाचा त्याच्या अवयवाचा तुकडा पडावा, किंवा रक्तबंबाळ होऊन त्यास जबर जखम व्हावी, किंवा रक्तस्राव न होतां तडाखा बसावा, म्हणून त्यांचीं टोकें लोखंडाचीं किंवा लांकडाचीं केलेलीं असतात.

निस्त्रिंश—वरच्या भागांस वांकलेली तरवार, मंडलाग्र—टोकाला बाक असलेली तरवार, आणि असियष्टि—दीर्घ व तीक्ष्ण तरवार, हे तरवारीचे प्रकार होत. तरवारींच्या मुठी गेंड्याच्या किंवा म्हशीच्या शिंगाच्या, हत्तीच्या दांताच्या, लांकडाच्या किंवा कळकाच्या मुळ्यांच्या करितात.

परशु, कुठार, पट्टस—दोनहि टोकांस त्रिशूलाकर झालेला परशु—खनित्र ( पावडें ), कुदळ, चक्र व मोठी कुठार हीं क्षुर ( म्हणजे वस्तरा ) वर्गीतील होत.

यंत्रानें फेंकलेले पाषाण, गोप्पण नामक दंडानें टाकिलेले पाषाण, हातांनीं टाकिलेले पाषाण, जात्याची तळी, व धोंडे हींहि एकप्रकारचीं आयुधेंच होत.

लोहजालिका—डोकें, हात वगैरे सर्व शरीरावरील चिलखत, लोहपट्ट—बाहूंशिवाय शरीरावरील चिलखत, लोहकवच—वक्षःस्थळावरील चिलखत, कार्पासादिसूत्रमय चिलखत; देवमासा, अंभुकपिनामक जलचर, गेंडा, गवा, हत्ती व गाय यांच्या कातड्याचें खूर, शिंगें असलेलें चिलखत—हे अंगावरील चिलखतांचे प्रकार होत.

शिरस्त्राण, कंठत्राण, कूर्पास ( कोंपरापर्यंत आवरण ), कंचुक ( गुडघ्यापर्यंत आवरण ), वारवाण ( घोट्यांपर्यंत आवरण ), पट्ट ( बिन बाह्यांचें आवरण ) आणि नागोदारिका म्हणजे अंगुलीत्राण—हीं निरनिराळीं आवरणें होत; यांशिवाय आणखी आवरणें म्हटलीं म्हणजे वेटि—वेलीच्या पानाचें शरीरावरील आच्छादन, चर्म—कातडी आच्छादन, हस्तीकर्ण—शरीरावरील लांकडी फळ्यांचें आच्छादन, तालमूल—लांकडी ढाल, धमनिका—वेळूच्या धाग्यांचें आच्छादन, कवाट—लांकडी तक्ता, किटिका—चामड्याचें अथवा वेळूच्या सालाचें आच्छादन, अप्रतिहत—हत्तीला हांकण्याकरितां केलेलें साधन, आणि बलाहकांत हीं आवरणें स्वसंरक्षणार्थ उपयोगी असतात.

हत्ती, रथ, घोडे यांकरितां अवश्य लागणारी सामुग्री म्हणजे त्यांस शिकविण्याकरितां चाबूक, अंकुश, वगैरे; अंगावर घालण्याकरितां—शृंगारण्याकरितां अलंकार, कापड वगैरे आणि युद्धापयोगी वर्ग, तोमर वगैरे होत.

मायावी प्रदर्शनाची युक्ति व विषप्रयोग करण्याची युक्ति—सारांश निष्णात माणसांनीं युद्धोपयोगी जी जी युक्ति काढिली असेल ती ती युक्ति—प्रसंग विशेषीं उपयोगांत आणण्याकरितां माहीत असावी.

आयुधाध्यक्षानें आयुधें बनविण्याकरितां लांकडें, धातु वगैरे कच्चा माल किती पाहिजे हें आधीं पहावें; जितका मिळेल, तितक्यांत आपल्या कामापुरती आयुधें तयार करतां येतील किंवा नाहीं याचा अंदाज करावा; कोणत्या लांकडाचें किंवा कोणत्या धातूचें कोणतें आयुध होण्यासारखें आहे याची चौकशी करावी. कच्चा माल जो आणिलेला असेल, त्यांत चांगला वाईट कोणता हें पहाव; त्यांत झीज किंवा तूट येते कीं काय, याची चौकशी करावी.

---

# अध्याय ४० वा.

## वजनें व मापें—कोष्टक.

वजना-मापांवरील अधिकाऱ्यानें शुद्ध वजनें व मापें तयार करण्याचा कारखाना चालवावा.

| | |
|---|---|
| १० माष अथवा उडीद | = १ सुवर्ण माष. |
| ५ गुंजा | = १ सुवर्ण माष. |
| १६ सुवर्ण माष | = १ सुवर्ण कर्ष. |
| ४ कर्ष | = १ पल. |
| ८८ पांढऱ्या मोहऱ्या | = १ रूप्य माष. |
| १६ रूप्य माष | = १ धरण. |
| २० शैब्य | = १ धरण. |
| २० तांदूळ | = १ हिरे तोलण्याचें धरण. |

अर्धा माष, माष, दोन माष, चार माष, आठ माष; सुवर्ण, दोन सुवर्ण, चार सुवर्ण, आठ सुवर्ण, दहा सुवर्ण, वीस सुवर्ण, तीस सुवर्ण, चाळीस सुवर्ण, शंभर सुवर्ण—हीं वजनें होत.

धरण वजनाचे प्रकारहि असेच समजावे.

वजनें लोखंडाचीं, किंवा मागध व मेकल देशांतील दगडांचीं, अथवा जे पाण्याच्या लेपानें वाढणार नाहींत, किंवा उष्णतेनें कमी होणार नाहींत, अशा पदार्थांचीं करावीं.

सहा अंगुळें लांबीच्या व एक पल वजनाच्या धातूच्या दांडीपासून तों आठ आठ अंगुळें अधिक लांबीच्या व एक एक पल अधिक वजनाच्या धातूच्या दांडीपर्यंत दहा निरनिराळे कांटे तयार करवावे, व कांट्याच्या दोनहि अंगास एक एक पारडें लावावें.

७२ अंगुळें लांबीच्या व ३५ पल वजनाच्या धातूच्या दांडीचें ‘ समवृत्ता ’ नामक तुला-यंत्र तयार करवावें; त्यास पांच पल वजनाचा गोलक बांधून तो जेथें ठेविला असतां दांडी अगदीं समतोल राहील तेथें खूण करून तेंच ( समकरण ) चिन्ह ठरवावें; या समकरण चिन्हापलीकडे कर्ष म्हणजे ¼ पल, अर्ध पल, पाउण पल, व पल यांचीं चिन्हें करावीं, पुढें दोन, तीन पासून दहापर्यंत व मग बारा पंधरा व वीस, यानंतर दहा दहांनीं वाढवून शंभर पलापर्यंत चिन्हें करावीं. अक्षांच्या म्हणजे पांचा पांचांच्या स्थानीं नान्दीचें म्हणजे स्वस्तिकाचें चिन्ह करावें.

समवृत्ता तुलेच्या दुप्पट वजनाची म्हणजे ७० पल वजनाची व ९६ अंगुळें लांबीची ‘ परिमाणी ’ नामक तुला करवावी. तिजवर वरीलप्रमाणें शंभर पर्यंत वजनाचीं चिन्हें मांडल्यावर पुढें वीस, पन्नास, शंभर ( अर्थात्-दोनशें ) अशीं चिन्हें करावीं.

| | |
|---|---|
| १० धरण | =१ पल. |
| १०० पल | =१ आयमानी तुला. |
| २० तुला ( तुला=१०० पल ) | =१ भार. |

व्यवहारांतील आयमानी सरकारी आयमानीहून पांच पलें कमी, नोकर वर्गास तोलून देण्याकरितां जी भाजनी आयमानी ती व्यवहारांतील आयमानीहून पांच पलें कमी आहे. अंतःपुरभाजनी नोकरांच्या आयमानीहून पांच पलें कमी.

यांतील व्यवहारांतील पल सरकारी पलाहून अर्ध–धरण कमी, नोकरांचें पल व्यवहारांतील पलाहून अर्ध–धरण कमी, व अंतःपुरांतील पल नोकरांच्या पलाहून अर्ध धरण कमी.

तुलेच्या दांडीचें वजन दोन दोन पलें कमी व लांबी सहा सहा अंगुळें कमी.

या दोन तुलायंत्रांत वजन केलें असतां, मांस, लोह, मीठ व रत्नें खेरीज करून इतर सर्व जिनसांवर शेंकडा पांच पलें सरकारास अधिक दिलीं पाहिजेत.

आठ हात लांबीच्या दांडीचा, वर वजनांचीं चिन्हें मांडलेला व वजनें असलेला लांकूड वजन करण्याचा कांटा मयूराकार स्तंभाच्या आधारावर बसवून ठेवावा.

पंचवीस पलें वजनाच्या लांकडावर एक प्रस्थ तांदूळ शिजतात यावरून जास्ती कमीचें प्रमाण ठरवावें.

याप्रमाणें कांटे व वजनें यांचा विचार झाला.

| | |
|---|---|
| २०० माष | = १ द्रोण. |
| १८७½ „ | = १ व्यावहारिक द्रोण. |
| १७५ „ | = भाजनी द्रोण. |
| १६२½ „ | = अंतः पुरभाजनी द्रोण. |

| | |
|---|---|
| १/४ द्रोण | = १ आढक |
| १/४ आढक | = १ प्रस्थ |
| १/४ प्रस्थ | = १ कुडुव. |
| १६ द्रोण | = १ सारी. |
| २० द्रोण | = १ कुंभ. |
| १० कुंभ | = १ वह. |

धान्याचें माप करावयाचें तें कणखर व शुष्क लांकडाचें करावें आणि तें असें करावें कीं, मापाच्या तोंडाच्या सपाटीवर असलेला धान्याचा भाग एकंदर धान्याचा चौथा भाग होईल अथवा सगळें धान्य मापाच्या सपाटीपर्यंतच राहील असें करावें. सुरा वगैरे रसालाहि असलेंच माप असावें.

फुलें, फळें, धान्याचा भुसा, कोळसे व सफेतीचा चुना यांच्या बाबतींत वरची शीग दुप्पट होते.

| | |
|---|---|
| १ द्रोण | = १ १/४ पण. |
| १ आडका | = ३/४ पण. |
| १ प्रस्थ | = ६ माष. |
| १ कुडव | = १ माष. |

पातळ पदार्थांच्या मापांचीं किंमत वरच्यांच्या दुप्पट. सर्व वजनांचा जोड एकत्र घेतल्यास वीसपण. कांस्याची किंमत वरील किंमतीच्या तीन चतुर्थांश ( पंधरा पण ).

वजना—मापांची परीक्षा करून शिक्के मारावे; व त्याबद्दल चार माष फी घ्यावी, ज्याच्यावर शिक्का नसेल त्याबद्दल २७ पण दंड घ्यावा.

दर तपासणीगणीक वजनामापामागें एक कांकणी पौतवाध्यक्षाला द्यावी.

तूप विकत घेतांना १/३२ भाग तें ऊन केल्यावर कमी भरेल म्हणून अधिक घ्यावा, तेलाचा १/६४ भाग घ्यावा आणि इतर द्रव पदार्थांचा ५० वा भाग घ्यावा.

कुडवाचीं अर्धकुडव, पावकुडव, १/८ कुडव अशीं मापें करवावीं. ८४ कुडव म्हणजे १ वारक तूप समजावें आणि ६४ कुडव तेल म्हणजे एक वारक समजावें. पाव वारक म्हणजे तेलाची किंवा तुपाची घटिका होय.

---

# अध्याय ४१ वा.

## देशकालमान.

मानाध्यक्षाला स्थल व काल यांचें प्रमाण अवगत असलें पाहिजे.

| | |
|---|---|
| ८ परमाणु | = १ रथचक्रानें उडालेला धूलिकण. |
| ८ धूलिकण | = १ लीख. |
| ८ लिखा | = १ ऊं |
| ८ ऊवा | = १ यवाचा दाणा |
| ८ यव | = १ अंगुल |

| | | |
|---|---|---|
| ४ अंगुळें | = | १ धनुर्ग्रह |
| २ धुनुर्ग्रह | = | १ धनुर्मुष्टि |
| १॥ धनुर्मुष्टि | = | १ वीत |
| २ विती | = | १ हात ( अरत्नि ) |

मध्यम बांध्याच्या पुरुषाच्या मधल्या बोटाचें मधलें पेर म्हणजे एक अंगुळ समजावें. चौदा अंगुळांचा ' शम, ' किंवा ' शल ' किंवा ' परिरय ' अथवा एक पाउल होतें. दोन विती आणि एक धनुर्ग्रह मिळून जो हात होतो तो जंगलाचें मोजमाप करतांना योजितात. दोन विती आणि एक धनुर्मुष्टि मिळून एक ' किष्कु ' किंवा कस होतो.

| | | |
|---|---|---|
| ४२ अंगुळें | = | १ किष्कु ( याचा उपयोग सैन्याची छावणी, किल्ला किंवा राजवाडा याची मोजणी करतांना करितात. |
| ५४ अंगुळें | = | १ हात ( जंगल वगैरे मोजतांना याचा उपयोग होतो. ) |
| ८४ अंगुळें | = | १ व्याम ( दोर, माणसाची उंची किंवा विहीरींची खोली मोजण्याकरितां याचा उपयोग करतात. ) |
| ४ हात | = | १ दंड, धनु, नालिका, |
| १०८ अंगुळें | = | १ सुताराचें एक धनु ( रस्ते व तट मोजतांना वापरतात, व यज्ञवेदी मोजण्यालाहि त्याचाच उपयोग होतो. ) |

ब्राह्मणास द्यावयाच्या जमिनी मोजण्याकरितां १९२ अंगुळें म्हणजे एक दंड समजावा.

| | | |
|---|---|---|
| १० दंड | = | १ रज्जु |
| २ रज्जु | = | १ परिदेश |
| १॥ परिदेश | = | निवर्तन ( यांतच एक बाजू दोन दंड अधिक वाढविली म्हणजे त्याला ' बाहू ' म्हणतात ) |
| १००० धनु | = | १ गोरुत. |
| ४ गोरुतें | = | १ योजन. |

याप्रमाणें जमीन मोजण्याचें कोष्टक झालें. आतां कालगणनेचें कोष्टक सांगतों.

त्रुटि, लव, निमेष, काष्ठा, कला, नाडिका, मुहूर्त, पुर्वाण्ह, अपराण्ह, अहोरात्र, पक्ष, मास, ऋतु, अयन, संवत्सर व युग हीं कालांचीं परिमाणें होत.

| | | |
|---|---|---|
| २ त्रुटी | = | १ लव. |
| २ लव | = | १ निमेष. |
| ५ निमेष | = | १ काष्ठा. |
| ३० काष्ठा | = | १ कला. |
| ४० कला | = | १ नाडी. |
| २ नाड्या | = | १ मुहूर्त. |
| १५ मुहूर्त | = | १ दिवस अगर रात्र. |

रात्र व दिवस मिळून एक अहोरात्र होते.

४ मासे सोन्याची ४ अंगुळें लांब तार काढिली असतां ती जितकी जाड होते, तेवढ्या जाडीचें छिद्र भांड्याला पाडून त्यांतून १ आढक पाणी गळावयास जेवढा वेळ लागतो त्या वेळाला ' नाडिका ' किंवा ' घटका ' असें म्हणतात.

चैत्र व आश्विन या महिन्यांत दिवस व रात्री सारख्या असतात, पुढें सहा महिनेपर्यंत अनुक्रमें दिवस व रात्र तीन मुहूर्त–पर्यंत वाढतात.

छाया जेव्हां आठ पौरुष म्हणजे ९६ अंगुळें भरते तेव्हां दिवसाचा एक अठरावा भाग गेला असें समजावें. छाया ७२ अंगुळें भरली म्हणजे $\frac{१}{१४}$ भाग गेला असें समजावें. ४८ अंगुळांवरून ८ वा भाग, २४ अंगुळांवरून ६ वा भाग, १२ अंगुळांवरून $\frac{१}{४}$ भाग, ८ अंगुळांवरून $\frac{३}{१०}$, ४ अंगुळांवरून $\frac{३}{८}$ भाग गेला असें समजावें. जेव्हां छाया मुळींच पडत नाहीं तेव्हां मध्यान्हकाल समजावा. दिवस उलटला म्हणजे वरील कोष्टकच उलटें म्हणजे शिल्लक राहिलेल्या दिवसाला लागू पडतें. आषाढ महिन्यांत मध्यान्हीं छाया मुळींच नसते. श्रावणापासून माघापर्यंत दोन दोन अंगुळें वाढत जाते आणि माघापासून आषाढापर्यंत तितकीच कमी होत जाते.

पंधरा अहोरात्रांचा एक पक्ष होतो. ज्या पक्षांत चंद्र वाढत जातो तो शुक्ल पक्ष, व ज्यांत चंद्र क्षीण होत जातो तो कृष्ण पक्ष किंवा बहुलपक्ष समजावा.

दोन पक्ष मिळून एक महिना होतो. एका महिन्यांत तीस अहोरात्री असतात. सौर महिना साडेतीस दिवसांचा व चांद्रमास २९॥ दिवसांचा होतो. नाक्षत्र महिन्यांत सत्तावीस दिवस असतात. मल्ल जातीच्या लोकांत ३२ दिवसांचा महिना, अश्ववाहांचा ३५ दिवसांचा आणि हस्तिवाहांचा ४० दिवसांचा महिना असतो.

दोन महिन्यांचा एक ऋतु होतो. श्रावण–भाद्रभद वर्षाऋतु, आश्विन-कार्तिक शरदृतु, मार्गशीर्ष–पौष हेमंत ऋतु, माघ–फाल्गुन शिशिर ऋतु, चैत्र–वैशाख वसंत ऋतु, आणि ज्येष्ठ–आषाढ ग्रीष्म ऋतु असे सहा ऋतु आहेत. शिशिर ऋतूपासून उत्तरायण व वषा ऋतूपासून दक्षिणायन सुरू होतें. दोन अयनांचें एक संवत्सर आणि पांच संवत्सरांचें एक युग होतें.

सूर्य दररोज दिवसाचा $\frac{१}{६०}$ भाग ह्मणजे एक घटका मागें पडतो, ह्मणून दोन ऋतूंत ६१ दिवस होतात. चंद्रहि दिवसाचा $\frac{१}{६०}$ भाग अधिक आक्रमितो म्हणून दोन ऋतूंत त्याचे ५९ दिवस होतात. याकारणामुळें अडीच वर्षांत एक अधिक महिना येतो.

पहिला अधिकमास आषाढ येतो व त्यानंतर अडीच वर्षानीं पौष हा महिना अधिक येतो.

---

## अध्याय ४२ वा.



### शुल्काध्यक्ष.

जकात व दस्तुरी यांवरील अधिकाऱ्यानें मोठ्या वेशीनजीक जकातीचें नाकें बसवावें. तें पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख असावें व त्यावर खुणेकरितां निशाण लावून ठेवावें. जकात वसूल करण्याकरितां चार पांच कारकून नेमावे, आणि त्यांनीं जे व्यापारी माल घेऊन येतील ते कोण, कोठले, कोणता माल त्यांचेजवळ आहे, किती माल आहे, त्यावर कोणत्या ठिकाणचा शिक्का आहे याची चौकशी करावी व हें सर्व कारकुनांनीं लिहावें.

ज्या मालावर शिक्कामोर्तब नसेल त्याबद्दल दुप्पट दंड घ्यावा. खोटा छाप मारलेला असल्यास जकातीच्या आठपट दंड घ्यावा. छाप फाडला असल्यास त्यास घटिकास्थानीं एक दिवस रहावयास लावावें. सरकारी मालावरील शिक्का बदलला किंवा भलताच माल आपला आहे असें म्हटलें, तर त्यांना बंदींत टाकावें, व प्रत्येक मालाच्या गठ्ठ्या-बद्दल सव्वा पण दंड करावा.

व्यापाऱ्यानें जकातीच्या नाक्यावर माल आणून ठेवून तो माल किती आहे, त्याची किंमत काय, तें सर्व ओरडून सांगावें. तीन वेळां किंमत पुकारल्यावर जो शेवटीं लिलांव बोलेल त्यास तो द्यावा. गिऱ्हाइकांचे

गर्दीमुळें मालाची किंमत वाढते. तशी ती वाढल्यास किंमतींतील वाढ व जकात सरकारी तिजोरींत भरणा करावी. जकात जास्त पडेल म्हणून जर मालाचें वजन किंवा मालाची किंमत कोणी कमी सांगेल तर राजानें तो अधिक माल आपले ताब्यांत घ्यावा. किंवा त्याजकडून आठपट जकात घ्यावी. त्याचप्रमाणें कमी प्रतीचा नमुना दाखवून त्याच्याखालीं भारी किंमतीचा माल लपवून ठेवील तर त्यालाहि वरच्याप्रमाणेंच दंड व्हावा.

चढाओढीच्या भरांत वाजवीपेक्षां अधिक किंमत आल्यास तिचाहि भरणा सरकारी खजिन्यांत करावा; अथवा मालकानें नेहमींच्या जकातीच्या दुप्पट जकात द्यावी. जकातीवरील मुख्य अधिकाऱ्यानें अशी लपवाछपव केल्यास त्यास वरील दंडाच्या आठपट दंड करावा. म्हणून माल तोलल्यानंतर, मापल्यानंतर, किंवा मोजल्यानंतर त्याची विक्री करावी. माल कमी किंमतीचा व हलक्या दर्जाचा आहे कीं काय, आणि त्यावर जकात माफ करण्यासारखा तो आहे कीं काय याची चौकशी करावी. जकात न देतां नाक्याचें निशाण ओलांडून जाणाऱ्यांस जकातीच्या आठपट दंड करावा. रस्त्यारस्त्यानें किंवा आडरस्त्यानें पाठविलेल्या नोकरांनीं हा तपास करावा.

लग्नकार्याकरितां आणिलेला माल, विवाहित स्त्रीनें बापाच्या घरून पतिगृहीं चालविलेला माल, नजर करण्याकरितां आणिलेला माल, यज्ञाकरितां आणिलेला माल, बाळंतिणीकरितां आणिलेला माल, देवपूजेचें सामान, चौलसमारंभाकरितां आणिलेला माल, मौंजीबंधनाकरितां आणिलेला माल, गोप्रदानाकरितां आणिलेला माल, अगर व्रतांकरितां, उद्यापनाकरितां किंवा धर्मक्रियांकरितां आणिलेला माल जकात न घेतां जाऊं द्यावा.

खोटें बोलणारांस चोरीच्या इतका दंड करावा.

ज्यावर जकात भरली नाहीं, असा माल जकात भरलेल्या मालांत घुसडून घेऊन जाणाऱ्या व्यापाऱ्याकडून, अथवा एका मालाचा परवाना दाखवून दुसराच माल घेऊन जाणाऱ्या व्यापाऱ्याकडून, अथवा गठ्ठा किंवा पेटी फोडून आणखी माल घालून जाणाऱ्या व्यापाऱ्याकडून त्या मालाची किंमत व तितकाच दंड घ्यावा.

नाक्यावरून जो कोणीं शेण, काड्याकुड्या वगैरे घेऊन चाललों आहें, असें भासवून माल घेऊन जाईल, त्यास उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड.

हत्यारें, चिलखतें, बाहुचिलखतें, धातु, रत्नें, धान्य व पशु या कायद्यानें मना केलेल्या मालापैकीं कोणताहि माल घेऊन जाणारांस जसा दंड पुकारलो असेल तसा दंड करावा आणि माल जप्त करावा. यांपैकीं कोणताहि माल आणिलेला असेल, तो बाहेरच्या बाहेर जकात न घेतां विकून टाकावा.

अंतपालानें म्हणजे हद्दीवरील अधिकाऱ्यानें सव्वा पण दस्तुरी वसूल करावी.

माल वाहून नेणाऱ्या एक खुरी जनावरावर एक पण, पशूवर अर्धा पण, क्षुद्र जनावरावर पाव पण दस्तुरी घ्यावी. डोक्यावर नेणाऱ्यावर एक माष घ्यावी. जो माल हरवला असेल किंवा चोरीस गेला असेल तो त्यानें ( अंतपालानें ) भरून दिला पाहिजे.

परकीय देशाहून जे व्यापारी आले असतील, त्यांचा अमुक माल भारी, अमुक माल हलका अशी पूर्ण तपासणी करून खुणेकरितां निरनिराळे छाप मारावे, आणि मग तो माल जकातीवरील मुख्य अधिकाऱ्याकडे पाठवावा.

व्यापाऱ्याचा वेष धारण केलेल्या गुप्त हेरानें व्यापाऱ्यांसंबंधानें व त्यांच्या मालासंबंधानें इत्थंभूत बातमी खुद्द राजास कळवावी.

ज्याकडून राजाला बातमी कळली, त्याच्या मार्फतच राजानें सदर व्यापाऱ्यांची व त्यांच्या मालाची हकीकत जकातीवरील अधिकाऱ्याकडे, आपल्याला इत्थंभूत वर्तमान कळत असतं हें दाखविण्याकरितां, पाठवून द्यावी. नंतर जकातीवरील अधिकाऱ्यानें त्या व्यापाऱ्यांस गांठून म्हणावें:—" अमुक माल अमक्याचा आहे, अमक्याचा इतका माल भारी आहे, इतका इतका हलका आहे, छपवून चालावयाचें नाहीं, राजाचा हा प्रभाव आहे."

हलका माल छपविल्यास, आठपट जकात दंड म्हणून वसूल करावी, भारी माल छपविल्यास, सर्व माल जप्त करावा.

देशांत पीडा करणारे जिन्नस नष्ट करून टाकावे, ज्यांपासून थोडें फळ उत्पन्न होतें, असे जिन्नस येऊं देऊं नयेत. ज्यांपासून देशास अत्यंत फायदा आहे, व ज्यांचें बीज सहज मिळण्यासारखें नाहीं असे जिन्नस जकात न घेतां येऊं द्यावे.

---

# अध्याय ४३ वा.

## शुल्क व्यवहार.

परदेशांत उत्पन्न झालेला, स्वदेशांत किल्ले वगैरे बंदोबस्ताच्या जागीं झालेला आणि खेड्यापाड्यांतून झालेला माल यांवर आंत येतांना व बाहेर जातांना जकात घेतली जाते. आयात मालावर किंमतीच्या एक पंचमांश जकात घ्यावी. फुलें, फळें, भाजीपाला, मुळें, कंद, खरबुजासारखीं किंवा भोपळ्यासारखीं वेलांना येणारीं फळें, धान्य, सुके मासे व मांस यांवर एक षष्ठांश जकात घ्यावी.

शंख, हिरे, रत्नें, मोत्यें, पोंवळीं, हार वगैरेंवर जकात घ्यावयाची ती ज्यांस त्या जिनसांचें श्रम, वेळ, मजुरी व एकंदर कामाची माहिती असेल अशा सुज्ञांस विचारून ठरवावी.

जाडें, तलम, रेशमी कापड, सुती कापड, हरताळ, मनशीळ, हिंगूळ, धातु, रंग, चंदन, अगरु, कुटकी, खदखदणारें द्रव्य, अंगांत घालावयाचीं वस्त्रें, मद्य, हस्तिदंत, चामडीं, जाडें कापड, बारीक कापड, सतरंज्या, कांबळीं, आणि रेशीम व लोंकर यांवर एक दशांश किंवा एक पंधरांश जकात घ्यावी.

कापड, चतुष्पाद जनावर, द्विपाद प्राणी, सूत, कापूस, औषधें, सौगंधिक माल, लांकडें, वेळू, वल्कल, कातडीं व मातीचीं भांडीं, धान्यें, तूप, तेल, गूळ, साखर, मीठ, मद्य, पक्की रसोई वगैरेंवर एकवीसांश किंवा एक पंचवीसांश जकात घ्यावी. वेशींत आल्यावर जकातीचा एक पंचमांश जादा कर घ्यावयाचा असतो. तो परस्परसंबंधाला अनुसरून योग्य वाटल्यास कमजास्त करावा.

जेथें माल उत्पन्न झाला असेल तेथेंच त्याची विक्री होऊं देऊं नये. खाणींमधून धातूंचा माल घेतल्यास ६०० पण दंड होईल.

फळबागेमधून किंवा फुलबागेमधून फळें, फुलें, घेणारांस ५४ पण दंड करावा. बागेंतून किंवा मळ्यामधून भाजीपाला, मुळे, कंद वगैरे घेणारा ५१¾ पण दंडास पात्र होतो.

शेतांतील सगळें पीक घेणारांस ५३ पण दंड. शेतांतील विक्रीचा अगर खरेदीचा अपराध घडल्यास त्याबद्दल एक पण किंवा दीड पण दंड करावा. जुन्या किंवा नव्या मालांवर जकात ठरवितांना तो कोणत्या ठिकाणचा आहे, कोणत्या प्रकारचा आहे हें पहावें व मग जकात ठरवावी. दंड घ्यावयाचा तो अपराधाच्या प्रमाणांत घ्यावा.

---

# अध्याय ४४ वा.

## सूतकामावरील अधिकारी.

सूतकामावरील अधिकाऱ्यानें त्या धंद्यांतील प्रवीण असे लोक नेमून सूत, कवच, कापड, दोर यांचे कारखाने चालवावे.

विधवा स्त्रिया, पंगु स्त्रिया, अविवाहित स्त्रिया, दंड न दिल्यामुळें कामावर लावलेल्या स्त्रिया, त्याचप्रमाणें वेश्यांच्या

आया आणि देवालयांतील नृत्यगीतादि सेवेला नालायक झालेल्या देवदासी यांना कामावर लावून त्यांकरवीं लोंकर, झाडांची साल, कापूस, अंबाडी व ताग पिंजून घ्यावा; राजवाड्यांत ज्या म्हाताऱ्या दासी असतील, त्यांसहि या कामावर योजावें.

सूत बारीक, जाडें किंवा मध्यम आहे हें पाहून रोजमुरा ठरवावा. सूत पुष्कळ आहे किंवा थोडें आहे याचाहि विचार मजुरी ठरवितांना करावा, आणि त्या मानानें त्यांस अंगास लावण्याकरितां तेल व आंवळकाठी द्यावी.

सणाच्या दिवशीं सत्काराच्या लोभानें काम करवून घ्यावें.

सूत काढण्यासाठीं जो कच्चा माल दिलेला असेल, त्यांतील सुतांत जितकी तूट येईल, तितकी मजुरींतून कापून घ्यावी.

अमुक काळांत व अमुक मजुरींत इतकें काम करावयाचें, अशा करारबंदीनें काम करणाऱ्या लोकांकरवीं ( वाटल्यास ) वरील कामें करून घ्यावीं, अशांबरोबर नेहमीं असावयास पाहिजे.

ताग, रेशीम, कोशे, शंकुनामक हरिणाची लोंकर, व कापूस यांचें सूत काढून कापड विणणाऱ्या कारागिरांना सुवासिक द्रव्यें व पुष्पमाला, अथवा दुसरे कांहीं पदार्थ देऊन खुष ठेवावें.

अंगावर वापरण्याकरितां, अंथरण्याकरितां, पांघरण्याकरितां, अनेक प्रकारचें कापड तयार करावें.

ज्यांचे पति परागंदा झाले आहत, ज्या पंगु आहेत, ज्या अविवाहित आहेत अशा घराबाहेर न पडणाऱ्या स्त्रियांस स्वतःचें उदरभरण स्वतःच्या श्रमानें करणें भाग पडत असेल, तेव्हां कारखान्यांतील स्त्री नोकरांस त्यांच्याकडे पाठवून त्यांस मोठ्या अदबीनें कांहीं काम द्यावें.

कवच बनविण्याचें काम हें त्याच धंद्यांतील मजूरांखेरीज व कारागिरांखेरीज इतरांना सांगूं नये.

कारखान्यांत माल पोहोंचविणाऱ्या स्त्रियांना सकाळीं वेतन द्यावें. सूत पारखून घेण्यासाठीं जेवढा उजेड पाहिजे तेवढाच उजेड असावा. स्त्रीच्या तोंडाकडे पाहिल्यास अथवा तिजपाशीं इतर गोष्टी काढल्यास, त्याबद्दल पूर्व दंड होईल. मजुरी देण्यास उशीर केल्यास मध्यम दंड होईल. त्याचप्रमाणें काम पुरें झाल्यावांचून मजुरी दिल्यास हाच दंड.

जी स्त्री मजुरी मिळाली असून, काम पुरें करणार नाहीं, तिचा अंगठा कापून टाकण्यांत येईल.

ज्यांनीं माल खाऊन टाकिला आहे ( गडप केला आहे ), चोरून ठेविला आहे, अथवा जे कामांत अडथळे उत्पन्न करितात त्यांसहि अशीच शिक्षा करावी.

कामकऱ्यांच्या मजुरीमधून दंड घ्यावयाचा तो अपराधाच्या मानानें घेण्यांत यावा.

दोर, कवचें वगैरे तयार करणाऱ्या कामकऱ्यांच्या कामावर आरंभापासून देखरेख ठेविली पाहिजे. त्याचप्रमाणें पट्टे, वाद्या वगैरे जिन्नसा आणि इतर माल तयार करावा.

सुताचे दोर व वारवाचे दोर, वेताचे पट्टे व वेळूचे पट्टे, गाडीचीं जनावरें बांधण्यासाठीं व अंगावर कवच चढविण्यासाठीं लागणारे दोर—पट्टे तयार करवाव.

---

# अध्याय ४५ वा.

## " शेतकीखात्याचा अधिकारी. "

शेतकीखात्यावरील अधिकारी शेतीच्या कामांत, बागाईतींत, आणि वनस्पतिशास्त्रांत प्रवीण असला पाहिजे. किंवा त्याला अशा तज्ज्ञाचें सहाय्य तरी पाहिजे. अशा शेतीच्या अध्यक्षानें सर्व प्रकारचीं धान्यें, फुलें, फळें, भाजीपाला, कंद, मुळें, वेलीला लागणारीं फळ, ताग, कापूस, इत्यादींचीं बीजें योग्य वेळीं जमवून ठेवावीं,

पुष्कळ वेळां नांगरलेल्या अशा स्वतःच्या शेतांत गुलाम, मजूर, आणि सक्त मजुरीची शिक्षा झालेले कैदी यांच्याकरवीं पेरणी करवावी. त्यांस नांगर, शेतीचीं आउतें आणि बैल यांची वाण पडूं देऊं नये.

लोहार, सुतार, जमीन खणणारे, दोर वळणारे आणि सर्पादि प्राणी पकडणारे यांचीहि वाण भासूं देऊं नये. या लोकांनीं आपापलीं कामें वेळेवर न केल्यामुळें उत्पन्नांत तूट आल्यास तिच्या प्रमाणांत तें काम करणाऱ्यांस दंड करावा.

रुक्ष प्रदेशांत पावसाचें मान १६ द्रोण, दलदलीच्या प्रदेशांत त्याच्या दीडपट; अश्मक म्हणजे महाराष्ट्र प्रांतांत वृष्टीचें प्रमाण १३॥ द्रोण; ‘ अवंति ’ प्रांतांत २३ द्रोण; कोंकणांत बिनमाप वृष्टी होते. हिमालयाच्या प्रदेशांत आणि जेथें पाटाचें पाणी आहे तेथें वृष्टीचें कारण नसून कालक्रमानें पीक येतें.

पावसाळ्याच्या पहिल्या व शेवटच्या महिन्यांत $\frac{१}{३}$ वृष्टि आणि मधल्या महिन्यांत $\frac{२}{३}$ वृष्टि झाल्यास ती अमृत-वृष्टि समजावी. पावसाचा अंदाज गुरूचें स्थान, गमन, आणि मेघांची गर्भधारणा, त्याचप्रमाणें शुक्राचे उदयास्त आणि सूर्याच्या प्रकृतींत ( नैसर्गिक स्थितींत ) होणारे फरक यांवरून करतां येतो. सूर्यावरून शेताची पेरणी, गुरूवरून धान्याची कमी अधिक उत्पत्ति आणि शुक्रावरून पावसाचें प्रमाण इत्यादि गोष्टी जाणतां येतात.

सतत सात दिवस अहोरात्र वृष्टी करणारे मेघ तीन आहेत. उगाच केव्हांतरी चार थेंब वर्षाव करणारे मेघ ८० आहेत. कडक ऊन पाडणारे मेघ ६० आहेत. ज्या वर्षीं ऊन आणि वारा यांचा संपर्क न होतां वृष्टी होते आणि शेताची कोळपणी तीन वेळां करावी लागते, त्या वर्षीं पीक खात्रीनें चांगल येतें असें समजावें. पावसाचा अंदाज ठरवून त्याप्रमाणें कमी पाऊस लागणारे किंवा अधिक पाऊस लागणारें धान्य पेरावें.

साळी, तांदूळ, कोद्रव, तीळ, जवस दारक ( ? ), वरी हीं धान्यें पावसाळ्याच्या आरंभास पेरावीं लागतात.

मूग, उडीद व शैंब्य ( ? ) हीं भर पावसाळ्यांत पेरावयाचीं धान्यें होत. कुसुम्भ, मसूर, कुळीथ, सातु, गहूं, द्विदल धान्यें, अळशी व मोहोरी हीं पावसाळ्याच्या शेवटीं पेरावयाचीं धान्यें होत.

ऋतुमानाप्रमाणें बीं पेरावें.

ज्यांत पेरणी झाली नाहीं असें शेत, अथवा पडितशेत जे कोणी अर्ध्या वांटयानें करावयास तयार असतील, त्यांना करावयाला द्यावें. शेतावरील अंगमेहेनतीचा भाग तेवढा अंगावर घेणाऱ्या शेतकऱ्याला उत्पन्नाचा $\frac{१}{४}$ किंवा $\frac{१}{५}$ हिस्सा द्यावा. ज्याची कष्टमशागत केलेली नाहीं, अशा शेतांतील उत्पन्नाचा वांटा परस्परांच्या इच्छेप्रमाणें व्हावा. संकटाचे प्रसंगीं मात्र हा नियम लागू नाहीं. स्वतः धरण घालून जे आपल्या हातांनीं पाणी घालून शेती करितात त्यास उत्पन्नाचा $\frac{१}{५}$ पाणी-पट्टी द्यावी लागते. जे खांद्यावर पाणी वाहून आणून शेती करितात, त्यांस $\frac{१}{४}$ पाणी-पट्टी पडते. मोट, रहाट वगैरे यंत्रांनीं पाणी घालून शेती करणाऱ्यांस $\frac{१}{३}$ पाणी-पट्टी द्यावी लागते.

नदीचें, सरोवराचें, व सार्वजनिक तळ्याचें व विहीरींचे पाणी घेऊन पिकें करणाऱ्यांनीं $\frac{१}{४}$ पाणी-पट्टी दिली पाहिजे.

पाण्याचा पुरवठा असेल, त्या अंदाजानें तांदळाचें पीक किंवा हिंवाळ्यांतील व उन्हाळ्यांतील बागाईत पिकें लावण्याची व्यवस्था करावी. साळी वगैरेचें पीक उत्तम; भाजीपाला मध्यम; ऊंस सर्वांत वाईट. कारण ऊंसाच्या पिकास अनेक अपाय होतात, आणि त्यास खर्चहि पुष्कळ येतो.

जीवर पाण्याचा फेंस येऊन बसतो अशी जमीन म्हणजे नदींतील वाळवंट, खरबुजें, भोपळे वगैरे लावावयास योग्य होय; नदीकांठावरील ज्या जमिनींत नदीच्या पुराचें पाणी पसरतें अशी जमीन पिप्पली, द्राक्षें व ऊंस लावण्याला चांगली; विहीरीनजीकच्या जमिनी भाजीपाल्यांस चांगल्या; पाणथळ जमीन गवतास व घांसास चांगली; शेतांतील पाळी पाळी मधून सुगंधी व औषधि वनस्पती, वाळा, हीर (?) बेर, पिंडालुक वगैरे लाविल्यास चांगलें; कोरड्या जमि-नींत व दलदलीच्या जमिनींत उगवणाऱ्या औषधींची लागवड त्यांना अनुकूल अशाच जागेमध्यें करावी.

दहिंवराचा ओलावा व उन्हाची उष्णता मिळावी म्हणून धान्याचें बीं सात दिवस; आणि द्विदल धान्याचें बीं तीन किंवा पांच दिवस पसरून ठेवावें; ज्यांची पेर कांडीं करून करावयाची असते, त्यांच्या कांड्यांना मध, तूप, डुकराची चरबी माखून, वर शेण लावून ठेवावें; कंद लावतांना ज्या ठिकाणीं कापला असेल त्या ठिकाणीं मधाचा व तुपाचा लेप करावा. कपाशीचें बीं शेणानें चोपडावें. योग्य वेळीं झाडाचीं आळीं जाळून काढावीं, आणि त्यांस हाडांचें व शेणाचें खत घालावें.

अंकूर फुटून वर आले म्हणजे त्यांस ताज्या उग्र वासाच्या मासळीचें खत घालावें, व 'स्नुही'चें दूध शिंपडावें. सरकी व सापाची कांत एकत्र करून धूर दिला असतां त्या ठिकाणीं साप रहात नाहींत.

कोणतेंहि धान्य पेरावयाचें असेल, तेव्हां अगोदर मूठभर धान्य सोन्याच्या भांड्यांतील पाण्यांत बुचकळून पेरावें, व खालील मंत्र तोंडानें म्हणावा:—

"प्रजापतये काश्यपाय देवाय च नमः सदा ।
सीता मे ऋध्यतां देवी बीजेषु च धनेषु च" ॥

मळ्यांत किंवा बगीच्यांत राखण करणारे दास व मजूर, आणि गाई राखणारे दास व मजूर यांस कामाच्या मानानें पोटास दिलें पाहिजे. त्यास महिन्यास सव्वा पण द्यावा.

कामकऱ्यांना त्यांच्या त्यांच्या कामाप्रमाणें वेतन द्यावें. गळून पडलेलीं फुलें व फळें देवपूजेसाठीं आणि साळी व यव आग्रयणासाठीं श्रोत्रियांनीं व तापसांनीं खुशाल घेऊन जावें.

उंछवृत्तीनें राहाणाऱ्या तपस्व्यांनीं धान्यांची रास झाल्यानंतर शेतांत पडलेलें धान्य घेऊन जावें.

धान्य व इतर पिकें जसजशीं तयार होतील तसतशीं काढून नेण्यांत यावीं. शहाण्या शेतकऱ्यांनीं शेतांत गवताची काडीदेखील राहूं देऊं नये.

धान्यांच्या वेगवेगळ्या राशी करून त्या मनोऱ्यासारख्या रचाव्या. त्यांचीं शिखरें एकमेकांलगत असूं नयेत आणि तीं वाऱ्यानें उडण्यासारखीं हलकींहि असूं नयेत. खळ्याच्या सीमेच्या बाहेर धान्याच्या राशी रचाव्या व अनेकांनीं एकमेकांच्या आश्रयानें त्या रचाव्या, त्या ठिकाणीं जवळपास पाणी असावें पण तिथें वावरणाऱ्या नोकरांच्याजवळ विस्तव केव्हांहि असूं नये.

---

# अध्याय ४६ वा.

## दारूखात्यावरील अधिकारी.

सुराध्यक्षानें किल्ल्यांत, जनपदांत, व छावणींत दारू तयार करणें व विकणें वगैरे व्यवहार, तत्संबंधीं तज्ज्ञांच्या-कडून करवावे. दारूच्या खरेदीविक्रीची व्यवस्था एका किंवा अनेक ठिकाणीं करवावी. ठराविक जागेहून इतर ठिकाणीं दारू गाळणें अगर खरेदी–विक्री करणें हीं कामें केल्यास सहाशें पण दंड ठेवावा. तसेंच एका गांवाहून दुसऱ्या गांवाला दारू नेणें किंवा एकाच ठिकाणीं मोठा सांठा करणें यालाहि प्रतिबंध करावा.

दारू अतिशय प्याल्यानें कामावरील चाकरमाणसें कामांत दुर्लक्ष करतील म्हणून, चांगले लोक मर्यादेचें अति-क्रमण करतील म्हणून आणि आडदांड लोक बेफाम होतील म्हणून त्यांच्यावर नजर ठेवून व त्यांच्या वर्तमानासंबंधीं चौकशी करून पाव कुडवापासून ज्यास्तींत ज्यास्ती एक प्रस्थापर्यंत दारू द्यावी; किंवा त्यांनीं गुत्यांतच दारू प्यावी पण तेथून लगेच बाहेर जाऊं नये,

जर कोणी आपल्या मालकीचे नसलेले दागिने व इतर माल दारूच्या दुकानांत गहाण ठेवील तर तो माल, उघड अथवा मोहोरबंद करून गहाण ठेवलेला माल, जिन्नस घडविण्याकरितां दिलेलें सोनें अगर रुपें यांचा गैरहक्कानें अपहार केला असल्यास तो माल किंवा इतर लबाडीच्या मार्गानें आणलेला माल यांचा पत्ता काढण्याकरितां अशा लोकांना कांहीं तरी निमित्तानें दुसरीकडे नेऊन पकडावें. जो आपल्या उत्पन्नापेक्षां अधिक खर्च करितो व जो कांहिंच प्राप्ती नसतां खर्च करितो त्यालाहि असेंच पकडावें. चांगली दारू वाजवीपेक्षां कमी किंमतीनें किंवा उधारीनें देऊं नये. दारूचा गाळ निराळ्या दुकानांतून विकावा किंवा गुलामांना व मजूरांना मजूरीच्या ऐवजीं द्यावा किंवा वाहतुकीच्या जनावरांकरितां अगर डुकरांच्या पोषणाकरितां तो द्यावा.

दारूच्या दुकानांना अनेक खिडक्या असाव्या. दुकानांत निजण्याच्या व बसण्याच्या जागा पृथक् असाव्यात, आणि ऋतुमानाप्रमाणें गंध, माळा, व उदक हीं ठेवावीं.

दारूच्या दुकानांतील नोकरानें दारूबाजांच्या नेहमींच्या व विशेष खर्चावर नजर ठेवावी, आणि तेथील हेरांनीं नवीन येणाऱ्या माणसांवर नजर ठेवावी.

दारू पिऊन झिंगून निजलल्या गिऱ्हाईकांच्या अंगावरील दागिने, वस्त्रें व पैसे किती आहेत ते पाहून ठेवावे. ते जर नाहींसे झाले तर गुत्तेवाल्यांनीं नुकसान भरून द्यावें व तितकाच दंड पण द्यावा.

गुप्त दालनांतून स्वरूपवान् अशा दासी ठेवून गुत्तेवाल्यांनीं त्या दासींकडून झिंगून निजलेल्या परदेशीय किंवा देशांतल्याच गिऱ्हाईकांच्या मनांतील हेतु जाणावा.

मेदक, प्रसन्न, आसव, अरिष्ट, मैरेय व मधु इत्यादि दारूचे प्रकार आहेत.

एक द्रोण पाणी, अर्धा आढक तांदूळ व तीन प्रस्थ आम्ल यांपासून ‘ मेदक ’ दारू बनते.

बारा आढक पीठ व पांच प्रस्थ आम्ल आणि पुत्रकझाडाची साल, फळें व इतर मसाला यांच्यापासून ‘ प्रसन्ना दारू ’ होते.

शंभरपल कवठाचा गीर, पांचशें पल गूळ आणि एक प्रस्थ मध यांपासून ‘ आसव ’ दारू बनते. यांत सव्वा प्रस्थ मध असेल तर तें आसव उत्तम व पाउणप्रस्थ मध असेल तर तें कनिष्ठ होय.

निरनिराळ्या विकारांवरील अरिष्टें कशीं करावींत हें वैद्यांनींच सांगावें.

मेषशृंगीच्या सालीचा कषाय काढून त्यांत गूळ कालवावा आणि त्यांत पिंपळी, मिरीं वगैरे मसाला किंवा त्रिफळाचूर्ण घालावें म्हणजे मैरेय मद्य तयार होईल. ज्यांत गूळ मिसळला असतो अशा सर्वच मद्यांत त्रिफळाचूर्ण घालावें.

द्राक्षाच्या रसांपासून ‘ मधु ’ नामक मद्य तयार होतें. याच मद्याला ‘ कापिशायन ’ व ‘ हारहूरक ’ अशी उत्पत्तिस्थानांवरून नांवें पडलीं आहेत.

कच्चें किंवा शिजविलेलें उडदाचें पीठ एक द्रोण, पावणेदोन द्रोण तांदूळ, एक कर्ष मोरटा वगैरे द्रव्यें यांपासून ‘ किण्व ’ तयार होतें.

पाठा, ( अंबष्ठ ) लोध्र, ( गजपिंपळी ) तेजोवती, एल, ( एलची ) वालुक, ज्येष्ठमध, दूर्वा, प्रियंगु (वाघांटी), दारूहळद, मिरीं, पिंपळी, सर्व मिळून पांच कर्ष मसाला मेदक व प्रसन्ना दारूंत घालावा व या दोन्ही दारूंत ज्येष्ठमधाचा कषाय व खडीसाखर घातली असतां दारूला रंग चढतो.

दालचिनी, चित्रक, वावडिंग, गजपिंपळी मिळून एक कर्ष व सुपारी, ज्येष्ठमध, नागरमोथे व लोध्र मिळून दोन कर्ष हा आसवांत घालावयाचा मसाला होय.

वरील मसाल्याचाच एक दशांश भाग दारू तयार करण्याच्या आम्ल रसांत घालावा.

‘ प्रसन्ना ’ दारूंत घालावयाचा मसालाच ‘ श्वेतसुरा ’ दारूंत घालतात.

आंब्याच्या दारूंत रसाचें प्रमाण अधिक असल्यास ती ' रसोत्तरा ', आम्ल द्रव्याचें प्रमाण अधिक असल्यास ती ' बीजोत्तरा ' किंवा ' महासुरा ' व मसाल्याचें प्रमाण अधिक असल्यास ती ' संभारिकी '.

मोरटा, पलाश, पत्तुर [ लोहमारक ], मेषशृंगी, करंज, वड वगैरे पांच क्षीरवृक्ष यांच्या काढ्यांत खडीसाखरेची मूठभर पूड आणि त्यांत लोध्र, चित्रक, वावडिंग, अंबष्ठ, नागरमोथे, डाळ, सातु, दारूहळद, कमळ, शतपुष्प, आघाडा, सप्तपर्ण, व निंब यांचा कल्क करून घालावा आणि तें तयार केलेलें मिश्रण एक कुंभ मदिरेंत मिसळलें असतां ती मदिरा इतकी स्वादिष्ट होते कीं ती राजानेंसुद्धां घ्यावी. या दारूला रस सुटण्यासाठीं तींत पांच पल गूळ घालावा. कौटुंबिक धर्मकृत्यासाठीं श्वेतसुरा व आजाराच्या प्रसंगीं अरिष्टें तयार करण्याला परवानगी असावी. उत्सव, जत्रा किंवा यात्रा यांच्या प्रसंगीं चार दिवस दारू तयार करण्याला परवानगी द्यावी. ज्यांना अशी परवानगी मिळाली असेल त्याजपासून रोज संध्याकाळीं परवाना फी वसूल केली पाहिजे.

सुरा व किण्व तयार करण्याचें काम स्त्रिया व मुली यांच्याकडे द्यावें.

सरकारी दारूवांचून इतर दारू विकणाऱ्यांस शेंकडा पांच दंड करावा. सुरा, मेदका, अरिष्ट, द्राक्षासव, फळांची दारू आणि सीधू म्हणजे गुळापासून केलेली दारू यांच्या बाबतींत पुढें दिल्याप्रमाणें नियम करावा.

रोजची विक्री, सरकारी मापानें आलेला वाढावा आणि त्या वाढाव्यामुळें आलेला नफा यांचा हिशेब पाहून त्या मानानें व्यापाऱ्यांकडून नुकसानभरपाई घ्यावी, म्हणजे योग्य होईल.

---

# अध्याय ४७ वा.



## " कसाई-खान्यावरील मुख्य अधिकारी.

सूनाध्यक्षानें म्हणजे कसाईखान्यावरील मुख्य अधिकाऱ्यानें जे हरिण, पशु, पक्षी, व मासे सरकारनें राखून ठेविले असतील, अथवा राखीव जंगलांत राहात असतील, त्यांस पकडणाऱ्या, इजा करणाऱ्या किंवा ठार मारणाऱ्या इसमास उत्तम दंड करावा; कुटुंबवत्सल माणसानें वरील अपराध केल्यास त्यास मध्यम दंड करावा.

हिंसा न करणाऱ्या माशांस किंवा पक्ष्यांस पकडणाऱ्या, इजा करणाऱ्या किंवा ठार मारणाऱ्या इसमास पावणे सत्तावीस पण दंड करावा; हरिणांस किंवा पशूंस असें करणाऱ्या इसमास दुप्पट दंड करावा.

बिंन राखलेल्या जंगलांतील हिंस्र पशु पकडले असतां त्याचा षड्भाग, मत्स्य आणि पक्षी यांचा दहावा भाग किंवा अधिक भाग आणि मृगादि पशूंची एक दशांशाहून अधिक किंमत घ्यावी.

वर सांगितल्याप्रमाणें राजभाग म्हणून घेतलेले जिवंत पशु-पक्षी राखीव जंगलांत सोडून द्यावे.

सरोवरांत, नद्यांत, तळ्यांत किंवा नदीच्या कालव्यांत राहणारे मासे; हत्तीच्या, घोड्याच्या, माणसाच्या, बैलाच्या किंवा गाढवाच्या आकाराचे समुद्रांतील मासे; क्रौंच, उत्क्रोश, दात्यूह, हंस, चक्रवाक, जीवंजीवक, भृंगराज, चकोर, कोकिल, मोर, पोपट, सारिका वगैरे क्रीडा-पक्षी; किंवा इतर शुभसूचक पक्षी; त्याचप्रमाणें दुसरे पशुपक्षी यांस कोणी मारणार नाहीं किंवा इजा करणार नाहीं असा बंदोबस्त करावा. त्यांच्या सुरक्षितपणाचा बंदोबस्त केला नाहीं, तर त्याबद्दल पूर्व दंड होईल.

हरिणांचें, व जनावरांचें मांस विकावयाचें, तें नुकतेंच मारून व हाडें काढून विकलें पाहिजे; त्यांत हाड असल्यास, हाडाच्या भारंभार शुद्ध मांस दिलें पाहिजे. वजनांत कमी दिल्यास, जितकें कमी दिलें असेल, त्याच्या आठपट मांस द्यावें लागेल.

वांसरूं, बैल व गाय कधींच मारतां कामा नये, जो मारील किंवा हाल करून मारील, त्यास पन्नास पण दंड.

कसाईखान्याबाहेर मारलेल्या जनावराचें मांस; मस्तकरहित, पादरहित, व अस्थिरहित मांस; कुजकें मांस; व आपोआप मेलेल्या जनावराचें मांस विकतां कामा नये; नाहीं तर बारा पण दंड.

जे पशु, वन्य पशु, हत्ती आणि मासे सरकारी राखीव हद्दींत राहतात ते जर त्या हद्दीबाहेर गेले तर त्यांना पकडावें किंवा ठार मारावें.

---

# अध्याय ४८ वा.

## गणिकाध्यक्ष.

गणिकाध्यक्षानें रूपानें सुंदर, तरुण व कलासंपन्न अशी एखादी स्त्री—गणिकेच्या कुलांत जन्मलेली असो वा नसो—पाहून तिला हजार पणांवर गणिका म्हणून नेमावी.

वरील तनख्याच्या अर्ध्या तनख्यावर तिला प्रतिस्पर्धी म्हणून दुसरी एक गणिका नेमावी.

गणिका परांगदा झाली किंवा मेली तर तिच्या बहिणीस किंवा मुलीस तनखा किंवा मालमत्ता द्यावी अथवा तिच्या आईनें तिच्या ऐवजीं दुसरी गणिका आणावी. याच्या अभावीं तिची सगळी मालमत्ता राजानें घ्यावी.

सौंदर्य व दागदागिने यांची समृद्धि असेल त्या मानानें तनखा हजार पण ठरवावा, आणि उत्तम, व मध्यम व कनिष्ठ दर्जा ठरवावा. राजाचें छत्र धरणाऱ्या, सुवर्णपात्र धरणाऱ्या, चवरी वारणाऱ्या, राजा पालखींत, सिंहासनावर किंवा रथांत बसला असतां त्याच्या सन्निध असणाऱ्या गणिकांच्या बाबतींत तर सौंदर्य व दागदागिने यांकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे.

जिचें सौंदर्य नष्ट झालें तिला दाई म्हणून ठेवावी. गणिकेला काम सोडून जावयाचें असेल, तर मोबदला म्हणून २४००० पण दिले पाहिजेत. गणिकेच्या पुत्रानें बारा हजार दिले पाहिजेत.

आठव्या वर्षापासून राजासमोर गाण्या–नाचण्याचें काम केलें पाहिजे. जी गणिका दासी सुखोपभोगास निरुपयोगी झाली तिला कोठींत किंवा मुदपाकखान्यांत काम सांगावें.

जी दुसऱ्याच्या ताब्यांत असल्यामुळें राजवाड्यांत काम करावयास येऊं शकत नाहीं तिनें तिच्या ऐवजीं काम करणाऱ्या दासीस दर महिन्यास सव्वा पण दिला पाहिजे.

प्रत्येक गणिकेचा दर, वडिलोपार्जित धन, प्राप्ति व खर्च, आणि पुढील प्राप्ती नोंदून ठेविली पाहिजे. उधळेपणाचा कारभार बंद केला पाहिजे.

आईजवळ दागिने न ठेवितां भलत्याजवळ ठेविल्यास त्याबद्दल सव्वाचार पण दंड. इतर धन अथवा मालमत्ता व जिनगी विकली किंवा गहाण टाकिली तर ५४। पण दंड.

बेअब्रू किंवा बदनामी केल्यास २४ पण दंड; मारहाण केल्यास दुप्पट दंड, कान तोडल्यास त्याबद्दल ५४। पण दंड ( सरकारला द्यावयाचा तो ), आणि १॥ पण गणिकाध्यक्षाला द्यावयाचा दंड घ्यावा. कुमारीच्या इच्छेविरुद्ध बळजबरी केल्यास उत्तम दंड; इच्छेनें केल्यास पूर्वदंड.

गणिकेच्या इच्छेविरुद्ध तिला कोंडून ठेवणारास अथवा पळवून नेणारास अथवा तिच्या शरीरास इजा करून तिला कुरूप करणारास हजार पण दंड; इजा केलेला अवयव जर विशेष महत्वाचा असेल तर दंड वाढवावा; पण गणिकेच्या मुक्ततेबद्दल जी रक्कम सांगितली आहे ( २४००० )—तिच्या दुपटीपर्यंतच दंड वाढवावा किंवा एक हजार पण दंड करावा.

नोकरीवर नेमलेल्या गणिकेस मारणारास गणिकेच्या मुक्ततेबद्दल सांगितलेल्या रकमेच्या तिप्पट दंड; निरुपयोगी

झाल्यामुळें केवळ गणिकामाता म्हणून ठेवलेली गणिका, कुमारी गणिका आणि रूप दासी म्हणजे हारतुरे, अत्तर वगैरे देणारी गणिका यांस मारणारा अगर इजा करणारा उत्तम म्हणजे ५०० पासून एक हजार पण दंडास पात्र होतो.

सर्व गुन्ह्यांच्या बाबतींत गुन्हा पहिला असेल, तेव्हां प्रथम दंड करावा, तोच दुसरा असेल तर दुप्पट, आणि तिसरा असेल तेव्हां तिप्पट करावा. तोच गुन्हां चवथा असेल, तर वाटेल तितका दंड करावा.

राजानें अमुक पुरुषाकडे जा, अशी आज्ञा केली असतांहि गणिका जाणार नाहीं, तर तिला हजार फटके बसतील अथवा ५००० पण दंड होईल.

भोगद्रव्य घेऊन जी भोग नाकारील तिला भोगद्रव्याच्या दुप्पट दंड, घरामध्यें आलेल्या माणसाचें भोगद्रव्य घेऊन जी भोग नाकारील तिनें भोगद्रव्याच्या आठपट रक्कम दिली पाहिजे, मात्र तो माणूस रोगग्रस्त किंवा दोषयुक्त नसला पाहिजे.

पुरुषाचा खून करणाऱ्या गणिकेस अग्नींत किंवा पाण्यांत टाकावें.

गणिकेचे दागदागिने किंवा धन हरण करणारा, आणि तिचें भोगद्रव्य चुकविणारा आठपट दंडास पात्र होतो.

गणिकेनें आपला दर, पुढील उत्पन्नाचा अंदाज, आणि ज्यानें तिला ठेविली असेल त्याचें नांव सरकारांत कळविलें पाहिजे.

नाटकी लोक, नाचकाम करणारे लोक, गाणारे, वाद्यें वाजविणारे, कथा सांगणारे, बहुरूपी, दोरावर काम करणारे, जादूचें काम करणारे, भाट, स्त्रियांचा व्यापार करणारे, आणि प्रच्छन्न रीतीनें गैर मार्गानें वागणाऱ्या स्त्रिया यासर्वांसहि वरील नियम लागू आहे.

त्यांच्यापैकीं जे परदेशांतून आले असतील, त्यांनीं आपली कला दाखविण्यास परवानगी करितां पांच पण सरकारांत भरले पाहिजेत.

स्वतःच्या रूपावर निर्वाह करणारी वेश्या—हिनें महिन्यांतून दोन दिवसाचें भोगद्रव्य सरकारास दिलें पाहिजे.

गणिका, गणिकेच्या दासी आणि रंगभूमीच्या कामावर निर्वाह करणाऱ्या स्त्रिया, यांस जे गायन, वादन, वाचन, नर्तन, नाट्यकला, लेखन, चित्रकला, वीणा, वेणु, मृदंग, दुसऱ्याच्या मनोगत ओळखण्याच्या कला, गन्धयुक्ती, मालागुंफन, अंगमर्दन, दुसऱ्याचें मन मोहून टाकण्याची कला,—वगैरे शिकवीतील, त्यांस सरकारांतून उपजीविका मिळावी. गणिकेचे पुत्र सर्वनटांत प्रमुख नट होतील, असें त्यांस त्यांनीं शिक्षण द्यावें.

त्यांच्या स्त्रियांपैकीं ज्या स्त्रियांस सांकेतिक भाषा येत असेल, त्यांस त्यांच्याबरोबर त्यांचे कांहीं आप्त देऊन दुष्टांचा घात करण्याच्या किंवा त्यास चकविण्याच्या कामगिरीवर, त्याचप्रमाणें परकीय देशांतील हेरांस मारण्याच्या किंवा चकविण्याच्या कामगिरीवर नेमून पाठवावें.

---

# अध्याय ४९ वा.



## “ नावाध्यक्ष ”

समुद्रांत, नद्यांच्या मुखांत, महान् सरोवरांत, शोष्य सरोवरांत, आणि नदींत संचार करणाऱ्या जहाजांची देखरेख नावाध्यक्षानें करावी. त्याचें राहाण्याचें ठिकाण बंदरांत किंवा बंदरानजीकच्या किल्ल्यांत असावें. समुद्रकिनाऱ्याजवळील व नदीकांठावरील गांवांनीं नावाकरितां ठराविक कर दिला पाहिजे.

मासे पकडणाऱ्या कोळ्यांनीं आपल्या प्राप्तीचा सहावा हिस्सा दिला पाहिजे, बंदरांतील व्यापाऱ्यांनीं शिरस्त्याप्र-

माणें पंचमांश किंवा षष्ठांश जकात घ्यावी. सरकारी जहाजांतून जाणाऱ्या येणाऱ्या उतारूनें ठराविक भाडें द्यावें. शंख व मोतीं गोळा करण्याकरितां सरकारी जहाजांचा उपयोग केल्यास त्याचें भाडें दिलें पाहिजे; नाहींतर खासगी जहाजांचा त्यांनीं उपयोग करावा. शंख व मोतीं यांवरील अधिकाऱ्याचें काम खाणीवरील अधिकाऱ्याच्या कामासारखेंच होय.

नावाध्यक्षानें बंदरगांवांतील मुख्य अधिकाऱ्याचा हुकूम व व्यापारी शिरस्ता राखला पाहिजे. वादळांत सांपडलेल्या जहाजांचा पित्याप्रमाणें सदयतेनें परामर्ष घ्यावा. पाण्यानें खराब झालेल्या मालावरील जकात माफ करावी, किंवा फारतर अर्धीच जकात घ्यावी. प्रवासी नावा वाटेंत बंदरास लागल्यास त्यांपासून जकात घ्यावी. चांचे लोकांचीं जहाजें, शत्रुदेशाला जाणारीं जहाजें, व बंदरगांवांतील जकात किंवा व्यापारी शिरस्ता चुकवून जाणारीं जहाजें नष्ट करावीं. हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत सुद्धां ज्या नद्यांना उतार नसतो अशा महानद्यांत मोठीं जहाजें चालविण्याची परवानगी द्यावी, व अशा जहाजांवर नाखवा, सुकाण्या, दोरवाला, आणि जहाजांत सांचलेलें पाणी काढून टाकणारे कामगार असले पाहिजेत. फक्त पावसाळ्यांत प्रतिबंध करणाऱ्या लहान नद्यांत लहान होड्या चालविण्याची परवानगी असावी.

राजाच्या शत्रूंनीं नदी ओलांडून येऊं नये म्हणून परवानगीशिवाय कोणीहि नदी ओलांडूं नये असा नियम करावा. भलत्या ठिकाणीं आणि भलत्या वेळीं नदी ओलांडिल्यास कमाल दंड करावा. योग्य स्थळीं व योग्य काळीं पण परवान्यावांचून नदी ओलांडल्यास २६॥ पण दंड करावा. कोळी; मोळीवाले; गवत, फुलें, फळें, भाजीपाला, दूध वगैरे पदार्थ नेणारे; गुन्हेगारांचा पाठलाग करणारे; पुढें गेलेल्या दूतामागून जाणारे दुसरे दूत; लष्करी सामान व हुकूम पोचविणारे यांस परवाना नको.

ब्राह्मण, संन्याशी, लहान मुलें, म्हातारे, रोगिष्ट, राजदूत व गरोदर स्त्रिया यांना मोफत परवाने द्यावे. देशांत येऊन राहिलेले परदेशीय लोक तसेंच स्थानिक व्यापाऱ्यांच्या परिचयाचे लोक यांना येण्याजाण्यास परवानगी असावी. दुसऱ्याची स्त्री, कन्या, किंवा वित्त यांचें हरण करणारा मनुष्य, शंकित मनुष्य, कावरा बावरा झालेला मनुष्य, बोजावांचून जाणारा मनुष्य, जड बोजा असून जकात चुकविण्याकरितां तो बोजा डोईवरून घेऊन जाणारा मनुष्य, नुकतेंच वेषांतर केलेला, नेहमींचा वेष टाकून दिलेला, नुकताच संन्यास घेतलेला, रोग्याचें ढोंग करणारा, जडजवाहीर घेऊन जाणारा, चोरून गुप्त संदेश घेऊन जाणारा, चोरून शस्त्रें किंवा स्फोटक द्रव्यें घेऊन जाणारा, विष घेऊन जाणारा, लांबून आलेला, परवान्यावांचून जाणारा हे इसम आढळल्यास त्यांस अटकेंत ठेवावें.

लहान चतुष्पाद व थोडासा बोजा घेऊन जाणारा मनुष्य यांचेकडून एक माष भाडें घ्यावें. पाठीवर अगर डोक्यावर नेतां येण्याजोगें ओझें, गाय, बैल, घोडा यांबद्दल दोन माष; उंट व म्हैस यांच्याबद्दल चार माष घ्यावें. एक्याबद्दल पांच माष, साधारण गाडीबद्दल सहा माष आणि मोठ्या गाडीबद्दल सात माष उतार—भाडें घ्यावें. व्यापारी मालाच्या शेर ओझ्यास पाव माष घ्यावा.

मोठी नदी तरून जाण्यास याच्या दुप्पट दर ठेवावा. नदी व समुद्र यांच्या शेजारच्या गांवकऱ्यांनीं नावाड्यांची पोटगी द्यावी. सरहद्दीवरील नावाड्यांनीं जकात, टोल, व त्यांशिवाय भाडें वसूल करून घ्यावें. परवान्यावांचून निघून जाणाऱ्याचा माल जप्त करावा. नावेंत अगर जहाजांत वाजवीपेक्षां जास्त माल अगर माणसें घेतल्यामुळें, भलत्या वेळीं किंवा भलत्या ठिकाणीं नांव हांकलल्यामुळें, खलाशी कमी असल्यामुळें अगर जहाज नादुरुस्त असल्यामुळें होणारें नुकसान नावाध्यक्षानें अगर जहाजांवरील अधिकाऱ्यानें भरून दिलें पाहिजे.

आषाढ वद्य अष्टमीपासून कार्तिक वद्य अष्टमीपर्यंत होड्या किंवा नावा सुटाव्या. नावाध्यक्षानें नावाड्यांना पगाराची रक्कम द्यावी आणि रोजमुरा वसूल त्यांजकडून हिशेबासह घ्यावा.

---

# अध्याय ५० वा.

## गोपाध्यक्ष किंवा थट्टीकामगार.

गुरांवरील अधिकाऱ्यानें वेतनोपग्राहिक, करप्रतिकर, भग्नोत्सृष्टक, भागानुप्रविष्टक, व्रजपर्यग्र, नष्ट, विनष्ट, असे पशु आणि दूध व तूप ह्यांचा संचय, यांची देखरेख ठेवावी.

गोपाल, महिषपाल, दूध काढणारे, ताक करणारे, व गुराखी यांनीं रोख पगार घेऊन शंभर शंभर जनावरांचें रक्षण करावें. त्यांना वेतनाच्या ऐवजीं दूधदुभतें देऊं केलें असतां ते वासरांची उपासमार करतील. अशा रीतीनें राखण्यास दिलेलीं गुरें ' वेतनोपग्राहिक ' या वर्गांत येतात.

वृद्ध, दुभत्या, गाभण्या गाई आणि वयांत आलेल्या कालवडी व वांसरें हीं ज्यांत सारखीं आहेत असा शंभरांचा एक एक कळप एक एकानें राखावा. आठ वारक ( ८४ कुडव ) तूप, ठराविक कर, व मेलेल्या जनावरांचें शेपूट आणि शिक्का मारलेलें कांतडें, हीं दरवर्षीं राजाला द्यावींत. याला ' करप्रतिकर ' म्हणतात.

रोगी, पंगु, एकहातीं दोहनाची संवय असलेली, धार काढण्यास कठीण अशी, जिचीं वांसरें जगत नाहींत अशी, अशा गायी ज्यांत समप्रमाण आहेत असे शंभरांचे कळप पाळणाऱ्याला त्यांच्या दूधदुभत्याचा ठराविक भाग द्यावा. या प्रकाराला ' भग्नोत्सृष्टक ' म्हणतात.

शत्रूंच्या किंवा रानटी लोकांच्या भयामुळें जीं गुरें रक्षणाकरितां आलीं असतील, त्यांचा दहावा हिस्सा घ्यावा. याला ' भागानुप्रविष्टक ' म्हणतात.

कांसेपासून सोडविलेलें व न सोडविलेलें वांसरूं, अंडिल बैल, ओझ्याचे बैल, पोळ, वयांत आलेले, व म्हातारे बैल, नांगर ओढणारे व गाड्या वाहाणारे बैल; मांसाकरितां मारावयाचे बैल; भार वाहणारे रेडे; पिणाऱ्या व न पिणाऱ्या कालवडी, वयांत आलेल्या कालवडी, गाभण्या व दुभत्या गायी, न व्यालेल्या, वंध्या अशा गायी व म्हशी व त्यांची महिना दोन महिने गेलेलीं वांसरें या सर्वांना गोपाध्यक्षानें डागावें. कोणतेंहि जनावर आपल्या ताब्यांत आल्यावर महिन्या दोनमहिन्यांनीं डागावें. अंगावर केलेली खूण, स्वाभाविक खाणाखुणा, रंग, शिंगामधील अंतर, हें सर्व नोंदून ठेवावें. या पद्धतीस ' व्रजपर्यग्र म्हणतात.'

चोरानें नेलेलें, दुसऱ्या कळपांत शिरलेलें व बेपत्ता झालेलें जनावर नष्ट वर्गांत येतें.

चिखलांत फसलेलें, रोगांनीं पीडलेलें, खड्ड्यांत पडलेले, म्हातारपणामुळें किंवा अन्नपाण्याच्या अभावीं मेलेलें, दरड कोसळून किंवा झाड पडून मेलेलें, लांकडांनीं किंवा दगडांनीं मारलेलें, वीज, व्याघ्र, सर्प, नक्र, व दावाग्नि यामुळें मेलेलें, हीं सर्व जनावरेंहि नष्ट वर्गांत येतात.

रखवालदाराच्या चुकीमुळें गुरांचा नाश झाल्यास त्यानें भरपाई केली पाहिजे.

या वर दिलेल्या व्याख्या या प्रकरणांत पुढेंहि लागू आहेत. जनावरास स्वतः मारणारा किंवा दुसऱ्याकडून मारविणारा, स्वतः पळवून नेणारा किंवा दुसऱ्याकडून पळवून नेणारा देहान्त शिक्षेस पात्र होतो. दुसऱ्या जनावरांवर सरकारी खूण अथवा छाप मारून अदलाबदल करणारास प्रत्येक जनावराच्या बाबतींत पूर्ण म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड.

स्वदेशीयाचें जनावर चोरून नेलेलें परत आणून देणाऱ्याला कबूल केलेलें इनाम द्यावें. परदेशीयांचें जनावर चोरून नेलेलें सोडवून आणणारास जनावराची अर्धी किंमत बक्षीस द्यावी.

गोपालकांनीं वांसरांची, म्हाताऱ्या व रोगी जनावरांची नीट जोपासना करावी, आणि ज्यामधील चोरांची, हिंस्रपशूंची व शत्रूंची उपद्रव—भीति लुब्धकांनीं शिकारी कुत्र्यांच्या मदतीनें दूर केली आहे, अशा ऋतुमानाप्रमाणें वांटून दिलेल्या, रानांत गुरें चारणीस घेऊन जावीं.

साप व वाघ वगैरे हिंस्र पशु घाबरविण्याकरितां, त्याचप्रमाणें गुरें कोठें कोठें चरतात हें निश्चितपणें समजण्याकरितां भिऱ्या गुरांच्या गळ्यांत घंटा बांधाव्या. गुरें पाण्यावर न्यावयाचीं, तीं जेथें खांचखळगे नाहींत, जागा लांबरुंद आहे, अशा वाटेनें चिखल नसलेल्या व मगरी नसलेल्या जलाशयांत न्यावीं व त्यांचें चांगलें पालन करावें.

चोरानें, दुष्ट हत्तीनें, सापानें किंवा मगरीनें जनावर पकडल्यास त्याचप्रमाणें रोगानें किंवा म्हातारपणानें जनावर मेल्यास, त्याचें वर्तमान कळविलें पाहिजे, नाहींतर जनावराच्या किंमतीइतकें द्रव्य द्यावें लागेल.

योग्य कारणानें जनावर मेल्यास, गाईम्हशीचें खूण केलेलें कातडें, शेळी-मेंढीची कानावरील खूण, घोडे, खेंचर, व उंट यांचें शेंपूट व खूण केलेलें कातडें, त्याचप्रमाणें त्यांचें केंस, कातडें, बस्ती, पित्ताशय, स्नायु, दांत, खूर, व शिंगें आणून द्यावीं.

मांस ओलें किंवा सुकें विकून टाकावें. ताक कुत्र्यांस व डुकरांस घालावें; थोडेंसें काशाच्या भांड्यांत गुरांना पाजण्याकरितां घेऊन यावें. नासलेलें दूध जनावरांची पेंड भिजविण्यासाठीं उपयोगांत आणावें. जनावर विकणारानें जनावराची पावपट किंमत सरकारांत भरावी.

वर्षाऋतूंत, शरदृतूंत, व हेमंतऋतूंत दोन वेळां दूध काढावें; व शिशिरऋतूंत, वसंतऋतूंत व ग्रीष्मऋतूंत एकवेळ काढावें. दोन वेळां दूध काढणाराचें बोट कापावें. दूध काढण्याची वेळ टाळणारास एक दिवसाची मजुरी दंड करावा. वेसण घालण्याचा काळ, गाडीला जोडावयास शिकविण्याचा काळ, बिनशिकविलेला बैल शिकलेल्या बैलाच्या जोडीला जुंपण्याचा काळ, आणि शिस्तीनें चालण्याचा काळ-याबाबतींतहि वरील दंड लागू आहे.

गाईच्या एक द्रोण दुधांत एक प्रस्थ तूप निघतें; म्हशीच्या इतक्याच दुधांत एक पंचमांश आणि शेळीच्यांत एक द्वितीयांश अधिक निघतें. सर्व प्रकारच्या दुधांतील तुपाचें प्रमाण घुसळण्यावर आहे; हवा, गवत व पाणी चांगलें असलें म्हणजे दूध व तूप अधिक होतें.

कळपांतील बैलाची दुसऱ्या बैलाशीं झुंज लावणारास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड, त्यांत त्यास इजा झाल्यास, उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड.

सारख्या रंगाचीं जनावरें दहा दहांच्या कळपांनीं ठेवावीं. गुरांची संख्या व बल असेल त्याप्रमाणें व राखण्याची व्यवस्था असेल त्याप्रमाणें लांब किंवा जवळपास गुरें चारणीस घालावीं.

शेळ्या—मेंढ्यांचीं लोंकर सहा सहा महिन्यांनीं काढावीं. घोडे, गाढव, उंट व डुकरें व गुरें यांच्या बाबतींतहि वरील नियम लागू आहे. वेसण घातलेल्या व घोड्याप्रमाणें सक्त काम करणाऱ्या बैलांस चांगलें गवत अर्धा भार म्हणजे १००० पल, साधें गवत दुप्पट, घाणीची पेंड एक तुला, कोंडा किंवा चूण अर्धा आढक, मीठ पांच पल, नाकांत घालावयास तेल कुडव, प्यावयास तेल एक प्रस्थ, मांस एक तुला, व दहीं अर्ध आढक, यंव एक द्रोण, अथवा उडदाचा पुलावा, दूध एक द्रोण किंवा मद्य अर्ध आढक, तेल किंवा तूप एक प्रस्थ, गूळ किंवा साखर दहा पल, आणि पाणी पिण्याच्या वेळीं दरखेपेस सुंठ एक पल असें द्यावें.

खेंचरास, गाईस व गाढवास वरील प्रमाणांत ¼ कमी आणि म्हशी व उंट यांस दुप्पट.

कामास लाविलेल्या बैलांस व दुधाकरितां ठेविलेल्या गाईसहि दुप्पट प्रमाणानें आहार द्यावा; शिवाय त्यांच्या कामाच्या, वेळेच्या व दुभत्याच्या मानानें प्रसंगीं अधिकहि द्यावा. सर्वांस गवत व पाणी मनमुराद द्यावें.

यांप्रमाणें खिल्लारांचें प्रकरण सांगितलें.

शंभर गाढवांच्या व खेंचरांच्या कळपांत पांच, शेळ्यांच्या व मेंढ्यांच्या कळपांत दहा, आणि गाईंच्या व म्हशींच्या कळपांत चार नर असावे.

---

# अध्याय ५१ वा.



## अश्वशाळेवरील मुख्य अधिकारी.

अश्वशाळेवरील मुख्य अधिकाऱ्यानें घोड्यांची वर्गवारी नोंदून ठेवावी; ती येणेंप्रमाणें:—विक्रीसाठीं काढिलेलें; खरेदी करून आणिलेले; लढाईत मिळालेले; पागेंत जन्मलेले; मित्रांनीं पाठवून दिलेले; गहाण किंवा ठेव या करारानें ठेविलेले किंवा हंगामी उपयोगाकरितां असलेले. त्यांची जात, वय, रंग, खूण, वर्ग, व जन्मस्थान नोंदून ठेवावें. जे अपशकुनी, अधू व रोगी असतील त्यांची नोंद ठेवावी.

खिजमतगारानें सरकारी तिजोरींतून व कोठागारांतून महिन्याच्या खर्चासाठीं लागणारे पैसे, व दाणा, चारा आणून नीट व्यवस्था ठेवावी.

पागेंतील अश्वांच्या संख्येच्या मानानें विस्तीर्ण अशी अश्वशाला तयार करावी; अश्वांची लांबी असेल तिच्या दुप्पट त्या अश्वशालेची रुंदी असावी; तिला चार दारें असावीं; मध्यभागीं लोळण्यास जागा असावी; सभोंवतीं लांकडी कठडा असावा; दाराच्या तोंडाशीं बसण्याला लांकडी तक्तपोशी असावी; तींत वानर, मोर, काळवीट, मुंगूस, चकोर, पोपट व मैना इत्यादि प्राणी असावे.

प्रत्येक घोड्याकरितां पूर्वाभिमुखी किंवा उत्तराभिमुखी निरनिराळें स्थान तयार करावें. त्याची हमचौरस लांबी रुंदी घोड्याच्या लांबी इतकी असावी; त्यांत गुळगुळीत लांकडी तक्तपोशी केलेली असावी. दाणाचाऱ्यासाठीं गव्हाण असावी; मूत्र व मल निघून जाण्याकरितां योजना केलेली असावी; ( राजवाड्याच्या ईशान्यभागीं अश्वशाला बांधावी, असा नियम असला तरी ) प्रसंगोपात्त अश्वशाला दुसरीकडे बांधणें अवश्य असल्यास बांधावी. माद्या, वळूं व तट्टें भिन्नस्थानीं बांधावीं.

मादी प्रसवली, म्हणजे पहिल्या तीन रात्रीं एक प्रस्थ तप पाजावें; यानंतर दहारात्रीं एक प्रस्थ सातू खाऊं घालावें आणि औषध व तेल पाजावें; यापुढें पुलाक ( पुलावा ? ) म्हणजे घुगऱ्या, गवत आणि ऋतुयोग्य आहार द्यावा.

शिंगरूं दहा दिवसांचें झालें म्हणजे तेव्हांपासून सहा महिन्यांचें होईपर्यंत त्यास एक कुडव सातू, पाव कुडव तूप मिसळून द्यावें, व एक प्रस्थ दूध पाजावें, नंतर तीन वर्षांचें होईपर्यंत दरमहिन्यास वरील आहार $\frac{1}{2}$ नें वाढवीत जावा, आणि त्याबरोबर एक प्रस्थ यव द्यावे. चार वर्षांचें होईपर्यंत एक द्रोण द्यावा. यानंतर चार वर्षांचें किंवा पांच वर्षांचें झालें म्हणजे तें कामाला योग्य झालें असें समजावें, व त्यास पुरा आहार द्यावा.

उत्तम घोड्याचें तोंड ३२ अंगुळें असतें; लांबी तोंडाच्या पांचपट अर्थात् १६० अंगुळें, पाय २० अंगुळें, उंची पायाच्या चौपट अर्थात् ८० अंगुळें असते, मध्यम घोड्याचें प्रमाण तीन अंगुळें कमी, व हलक्या घोड्याचें याहून तीन कमी. उत्तम घोड्याचा घेर १०० अंगुळें आणि मध्यम घोड्याचा पांच भाग कमी अर्थात् ८० अंगुळें व हलक्या घोड्याचा याहूनहि पांच भाग कमी अर्थात् ६० अंगुळें.

उत्तम घोड्यास आहार येणेंप्रमाणें द्यावा:—साळ, तांदूळ, यव किंवा प्रियंगु यांपैकीं कोणतेंहि धान्य दोन द्रोण भिजविलेले किंवा अर्धें कच्चें शिजविलेलें; अथवा मूग किंवा उडीद दोन द्रोण पक्के शिजविलेलें; शिवाय एक प्रस्थ तेल, पांच पल मीठ, पन्नास पल मांस, आढकभर दूध ( नासकें ) किंवा दुप्पट दहीं; खाल्लेलें अन्न पचण्यासाठीं पाणी पाजण्याच्या वेळीं पांच पल गूळ किंवा साखर, एक प्रस्थ मद्य अथवा मद्याऐवजीं दुप्पट दूध द्यावें. लांबच्या प्रवासानें किंवा ओझ्यानें थकलेल्यांस अन्न जावें म्हणून बस्तिप्रयोग करण्याकरितां एक प्रस्थ तेल द्यावें. नाकांत घालण्याकरितां एक कुडव तेल द्यावें. भारी गवत अर्ध भार ( १००० पल ) व दुप्पट हरळ द्यावी. सहा अरत्नी ( हात ) घेराइतकें गवत द्यावें.

मध्यम घोड्यांस वरील आहाराहून पाव हिस्सा कमी, व हलक्या घोड्यांस यांहूनहि पाव हिस्सा कमी द्यावा. गाडीला जोडण्याच्या मध्यम वर्गांतील घोडा व मध्यम वर्गांतील वळू घोडा यांस उत्तम घोड्याचा आहार द्यावा. गाडीला जोडण्याच्या हलक्या वर्गांतील घोडा व हलक्या वर्गांतील वळू घोडा यास मध्यम घोड्याचा आहार द्यावा. घोड्या व खेंचरें यांस पाव हिस्सा कमी आहार द्यावा; आणि यांच्या अर्धा आहार तट्टांस द्यावा. याप्रमाणें आहाराची योजना आहे.

घोड्याचें अन्न तयार करणारे, लगाम धरणारे, व अश्ववैद्य यांस आहारांत भाग असतो. लढाया करून कामास नालायक झालेले आणि रोगानें किंवा म्हातारपणामुळें नालायक झालेले अशा घोड्यांना पोटापुरतें खाणें द्यावें. लढाईच्या कामांत नालायक असे घोडे शहरांतील किंवा खेड्यांपाड्यांतील लोकांच्या माद्यांकरितां वळू म्हणून उपयोगांत आणावें.

अवलाद उत्पन्न करण्याकरितां उपयोगी घोड्यांत उत्तम घोडे म्हटलें म्हणजे कांबोज, सिंधु, अरट्ट व वनायु या देशांतील; मध्यम बाल्हीक, पापेय, सौबीर व तैतल देशांतील; इतर भागांतील हलके होत.

ते तीक्ष्ण, भद्र व मंद असतील, त्यामानानें त्यांस लढाईकरितां किंवा बसावयाकरितां तयार करावें.

लढाईचा घोडा हरकामांत चौकोनी चिरा झाला पाहिजे. बसावयाच्या घोड्यांस मंडलाकार चालणें, सावकाश चालणें, उडी मारून चालणें, भरधांव जाणें, आणि निशाणांच्या संधानानें जाणें आलें पाहिजे.

त्यांत मंडलाकाराचे प्रकार येणें प्रमाणें:—हातभर मंडलांत गरकन् फिरणें ( औपवेणुक ), मंडल धरून, चालून जाणें, ( वर्धमानक ), एकाच वेळीं या दोनहि गतींनें जाणें ( यमक ), एक पाय वांकवून व दुसरा पाय पसरून उडी मारणें ( आलीढप्लुत ), पुढचा भाग मंडलाकार करणें ( पृथग ), आणि मागचा भाग मंडलाकार करणें ( त्रिकचाली ).

त्याच मंडलाकार गतींत डोकें व कान नीट उभारलेले असले म्हणजे ती सावकाश गति ( नीचैर्गति ) होते; ही सोळा तऱ्हांनीं करितां येते:—प्रकीर्णक ( सर्व गतींचें मिश्रण ), प्रकीर्णोत्तर ( जींत एक प्रकार विशेष प्रामुख्यानें दिसतो, अशी प्रकीर्ण गती ), निषण्ण ( जींत मागील भाग निषण्ण म्हणजे निश्चळ अशी ), पार्श्वानुवृत्त ( जींत दोनहि बाजूंची गति आहे ), उर्मिमार्ग ( लाटेसारखी खालींवर ), शरभक्रीडित ( शरभपशूसारखी क्रीडा गति ), शरभप्लुत ( शरभाप्रमाणें उड्या मारीत ), त्रिताल ( तीन पायांवर ), बाह्यानुवृत्त ( डावी उजवी गति ), पंचपाणि ( एकदां तीन पायांवर व एकदां दोन पायांवर, ) सिंहायत ( सिंहासारखी गति ), स्वाधूत ( लांब लांब पावलें टाकीत भरधांव गति ), क्लिष्ट ( वर कोणीं बसलेला नसतांहि धोपट गति ); श्लाघित ( पुढील भाग वांकवून ), बृंहित ( मागील भाग वांकवून ) व पुष्पाभिकीर्ण ( नागमोडी चाल )–अशा नीचैर्गतीच्या म्हणजे सावकाश चालीच्या तऱ्हा आहेत.

माकडाप्रमाणें उड्या मारीत चालणें, बेडकाप्रमाणें उड्या मारीत चालणें, हरणासारखें उड्या मारीत चालणें, एकदम उड्या मारीत चालणें, कोकिळाप्रमाणें चालणें, छाती भुईला लावून चालणें, बगळ्याप्रमाणें चालणें ह्या लंघनाच्या म्हणजे उडी मारून चालण्याच्या निरनिराळ्या तऱ्हा आहेत.

गिधाडाप्रमाणें धांवणें, पाणकोंबड्याप्रमाणें धांवणें, मयूराप्रमाणें धांवणें, अर्धवट मयूराप्रमाणें धांवणें, मुंगूसाप्रमाणें धांवणें, अर्धवट मुंगूसाप्रमाणें धांवणें, रानडुकराप्रमाणें डावणें व अर्धवट रानडुकराप्रमाणें धांवणें. या भरधांव चालीच्या तऱ्हा होत.

निशाणाच्या संधानानें चालणें या चालीस ‘ नारोष्ट ’ म्हणतात.

गाडीला जोडावयाचें घोडे ( दिवसांत ) सहा, नऊ किंवा बारा योजनें आणि बसावयाचे घोडे पांच, आठ किंवा दहा योजनें जातात.

घोड्याचा मगदूर चांगला असला तरच चालून जातां येईल असा मार्ग; श्वासोच्छ्वासाची क्रिया नीट चालवून जातां येईल असा मार्ग; व जड ओझें घेऊन जातां येईल असा मार्ग;—हे मार्गाचे प्रकार होत.

सावकाश चाल, मंडलाकार चाल, उडत उडत चाल, आरंभीं जलद चाल, व शेवटीं जलद चाल, याप्रमाणें चालींचे वेग आहेत.

त्यांस बांधण्याकरितां व इतर कारणाकरितां लागणारी सामुग्री अश्वशिक्षक वगैरे अधिकारी माणसांस विचारावी. लढाईची सामुग्री व रथाला जोडावयाच्या घोड्यांस लागणारे शृंगार कोणकोणते पाहिजेत, याविषयीं सारथ्यांनीं खुलासा करावा. अश्ववैद्यांनीं घोड्याचें शरीर रोड झाल्यास किंवा लठ्ठ झाल्यास त्यावर योजना करावी, आणि ऋतुमानाप्रमाणें आहार ठरवावा.

रथ हांकणारे अथवा सारथी, लगाम, खोगीर, पायबंद वगैरे वर देखरेख करणारे, गवत, कडबा वगैरे पाहाणारे, अन्न तयार करणारे, घोडशाळेंत रखवाली करणारे, खरारा करणारे, आणि विषवैद्य यांनीं आपापल्या कामांत दक्ष राहून घोड्यांची नीट काळजी घ्यावी. त्यांनीं आपल्या कामांत कसूर केल्यास, त्यांची दिवसाची मजूरी कापावी. नीराजनविधी करण्याकरितां किंवा औषधोपचार करण्याकरितां बांधून ठेविलेला घोडा जो कोणी स्वतःला बसावयास घेऊन जाईल त्यास बारा पण दंड करावा. आजारी घोड्याच्या शुश्रूषेमुळें किंवा औषधामुळें आजार वाढल्यास शुश्रूषेस किंवा औषधास जो खर्च झाला असेल त्याच्या दुप्पट त्याजपासून भरपाई घ्यावी. शुश्रूषेंतील किंवा औषधांतील दोषांमुळें, विपरीत प्रकार घडून आला म्हणून घोडा मेला तर मेलेल्या घोड्याच्या किंमती इतका दंड करावा. गाय, बैल, गाढव, उंट, म्हैस, शेळी, व मेंढी यांच्या बाबतींतहि हाच नियम लागू आहे.

घोड्यांना दिवसांतून दोनदां स्नान घालावें व गंध, फूल वाहावें. अमावास्येस भूतांना बलि द्यावे व पूर्णिमेस आशीर्वचनें पठन करावीं. अश्वयुज—आश्विन—महिन्याच्या नवव्या दिवशीं, त्याचप्रमाणें लढाईस निघण्यापूर्वी व लढाई संपल्यानंतर आणि सार्थीच्या दिवसांत शांतिकर्म करतांना नीराजनविधि करावा.

---

# अध्याय ५२ वा.



## हत्तीवरील अधिकारी.

हत्तींवरील अधिकाऱ्यानें हत्ती—रानांचा बंदोबस्त ठेवावा. शिक्षा लावून ताळ्यावर आणिलेले हत्ती, हत्तिणी, आणि छावे यांकरितां हत्तीशाळा तयार करावी. त्यांची बांधण्याची जागा, निजण्याची जागा, शिकण्याची जागा, यांची व्यवस्था पहावी; त्याचप्रमाणें त्यांची खाण्यापिण्याची व गवताची योग्य तरतूद करावी; ज्या कामाकरितां त्यांची योजना करावयाची, त्यांत तरबेज करण्याकरितां तालमीची अथवा कवाईतीची व्यवस्था पहावी. त्यांस बांधण्याकरितां सासळदंळ, लढाईच्या वेळीं लागणारें सामान, गळ्यांतील माळा वगैरे अलंकार यांची योजना करावी. त्याजकरितां वैद्य, चाबुकस्वार व माहुत वगैरे नोकर लागतात; त्यांवरहि त्यानें देखरेख ठेवावी.

हत्तीशाळा बांधावयाची ती हत्तीच्या शरीराच्या लांबीच्या दुप्पट ( नऊ हातांच्या दुप्पट ) उंच, तितकीच रुंद व तितकीच लांब असावी; तींत हत्तिणीकरितां स्वतंत्र जागा असावी; पुढें लांकडी कठडा असावा, हत्तीच्या खुंट्यावर आडवा दांडा असावा; आणि तोंड पूर्वेस किंवा उत्तरेस असावें. मूत्रोत्सर्ग व मलोत्सर्ग करण्यासाठीं असलेली जागा हत्तीच्या लांबीच्या इतकी चौरस असावी, त्याचप्रमाणें ती गुळगुळीत असावी व तींत हत्तीच्या खुंट्यापासून लांकडी तक्तपोशी केलेली असून मधून मधून छिद्रें असावीं.

निजण्याची जागा नेहमींच्या बांधून ठेवण्याच्या जागे एवढीं असून तींत निम्मी जागा त्यास टेकण्याकरितां उंच केलेली असावी लढाईचे हत्ती व बसण्याचे हत्ती किल्ल्यांत ठेवावे; व जे हत्ती दुष्ट असतील त्यांस बाहेर ठेवावें.

दिवसाच्या आठ विभागापैकीं पहिला व सातवा विभाग स्नानाची वेळ; त्याच्या पुढचे दोन विभाग खाण्याची वेळ; सकाळ व्यायामाची वेळ, तिसरा प्रहर म्हणजे पाणी पिण्याची वेळ, रात्रीचे दोन विभाग निजण्याची वेळ; आणि राहिलेला एक तृतियांश भाग थोडें बसणें, थोडें उठणें याकरितां होय. हत्ती पकडण्याला योग्य काळ म्हणजे ग्रीष्मऋतु; जो हत्ती वीस वर्षांचा असेल तो पकडण्याला योग्य. बच्चा, हत्तिणीसारखे दांत असलेला, दंतरहित, रोगी असा हत्ती व गाभण किंवा दुभती हत्तिण पकडूं नये.

सात अरत्नी म्हणजे सात हात उंच, नऊ हात लांब, व दहा हात रुंद अशा प्रमाणाचा हत्ती असला म्हणजे तो चाळीस वर्षांचा व उत्तम म्हणावा; तीस वर्षांचा हत्ती मध्यम; पंचवीस वर्षांचा कनिष्ठ. या दोन वर्गांतील हत्तींस खुराक द्यावयाचा तो पाव पाव हिस्सा कमी द्यावा.

हत्तीच्या दर अरत्नीस खाण्याचें प्रमाण येणें प्रमाणें:—एक द्रोण तांदूळ, दोन आढक तेल, तीन प्रस्थ तूप, दहा पल मीठ, पन्नास पल मांस, एक आढक नासलेलें दूध व तें नसल्यास त्याच्या दुप्पट दहीं; खाल्लेलें अन्न चांगलें जिरावें म्हणून पाणी पिण्याच्या दर वेळेस दहा पल गुळ किंवा साखर, व एक आढक मद्य किंवा त्याच्या दुप्पट दूध; अंगाला माखण्यासाठीं एक प्रस्थ तेल; डोक्याला लावण्यासाठीं व दिव्यासाठीं एक प्रस्थ तेल; भारी गवताचे दोन भार; हरळ सव्वा भार; वाळलेलें गवत अडीच भार आणि भेसळ गवत हवें तितकें द्यावें. ( भार=२००० ).

आठ अरत्नी—आठ हात–उंच असा मदोन्मत्त हत्ती असेल, तर त्यास सात हात उंचीच्या हत्ती इतकाच खुराक द्यावा. सहा अरत्नी किंवा पांच अरत्नी उंचीच्या हत्तीस खुराक द्यावयाचा तो दर अरत्नीस जें प्रमाण सांगितलें आहे त्याप्रमाणें द्यावा. हत्तीचा बच्चा फक्त क्रीडेकरितां पकडावा, आणि त्यास गवत व दूध द्यावें.

हत्तीच्या अंगावर लाली आली, थोडें थोडें मांस आलें, दोनहि कुशी भरल्या, हातपाय वगैरे अवयव सारखे वाढले, अंगांत अगदीं कमी किंवा अगदीं जास्त मांस नसलें, किंवा पृष्ठवंशाचा भाग सारखा झाला म्हणजे त्यास शोभा येते.

हत्तीची शोभा कशी आहे हें पाहून, किंवा योग्य काळ पाहून मंगल अथवा मंद किंवा सामान्य गुणांचा हत्ती असेल त्याप्रमाणें व ज्या कामाकरितां त्याची योजना करावयाची असेल त्याप्रमाणें त्यास शिक्षण देण्याची व्यवस्था करावी.

---

# अध्याय ५३ वा.



## हस्त्यध्यक्ष प्रकरणांतील हत्तीशिक्षा.

हत्तीशिक्षेच्या कार्यक्रमाप्रमाणें हत्तीचे चार वर्ग पडतात:—ज्यास शिकवून ताब्यांत आणावयास पाहिजे असा हत्ती; लढाईकरितां तयार करावयाचा हत्ती, बसावयास तयार करावयाचा हत्ती; आणि जात्या दुष्ट हत्ती.

त्यांतहि शिकवून ताब्यांत आणावयाच्या हत्तीचे पांच प्रकार आहेत:—खांद्यावर अथवा मानेवर बसूं देणारा; खुंट्याला बांधूं देणारा; हत्ती ज्या भूमींत पकडतां येईल त्या भूमींत शिरलेला; हत्ती पकडण्याकरितां तयार केलेल्या खड्ड्यांत शिरलेला; कळपांत असलेला. लहान बच्च्यांची जशी तरतूद करावयाची तशी यांची ठेवावी.

लढाईकरितां तयार करावयाचा हत्ती सात प्रकारांनीं तयार करावा लागतो:—वांकणें, उंच होणें, दोर–काठी–

निशाण यावरून उडी मारणें वगैरे कवाईत; जमिनीवर निजणें, बसणें किंवा खळग्यावरून उडी मारून जाणें; मंडल धरणें; तुडवून जाणें व तुडवून न जाणें; हत्तीशीं लढाई; वेशीवर व तटबंदीवर टक्कर मारणें आणि लढाई करणें.

यांच्या बाबतींत काळजी घ्यावयाची ती अशी:—कंबरेला दोर बांधावा, गळ्यांत साखळदंड घालावा, आणि नेहमीं हत्तीच्या कळपांत ठेवून काम करावयास लावावें.

बसावयाच्या हत्तींचे आठ प्रकार:—ज्यास सर्व गति माहीत आहेत असा; दुसरा हत्ती बरोबर असेल तेव्हांच बसूं देणारा; दौडत चालणारा; नानाप्रकारच्या गतीनें चालणारा; काठीच्या मारानें चालणारा; अंकुशाच्या मारानें चालणारा; आपण होऊन चालणारा; आणि शिकारींत उपयोगी पडणारा. यांच्या बाबतींत शारदकर्म केलें पाहिजे, म्हणजे हत्ती लठ्ठ असल्यास रोड केला पाहिजे; रोड असल्यास लठ्ठ केला पाहिजे; लाल अर्थात् मंदाग्नि असल्यास त्याचा जठराग्नि प्रदीप्त केला पाहिजे आणि त्याची शरीरप्रकृति चांगली राखली पाहिजे. हत्ती हीन म्हणजे व्यायामावांचून असल्यास त्यांस व्यायाम दिला पाहिजे, आणि त्यास निशाणांचें काम शिकविलें पाहिजे.

दुष्ट हत्तीला शिकविण्याचा मार्ग एक होय; त्याच्या बाबतींत कडक मारा हाच काय तो मार्ग आहे; तो कामाला कुचर, हट्टी, स्वच्छंदी, चंचल, मदोन्मत्त, व मददोषामुळें अविश्वसनीय असा असतो.

जे दुष्ट हत्ती कधीं शिकविले जाणार नाहींत त्यांचे प्रकार:—शुद्ध (म्हणजे अठरा दोषांनीं युक्त), सुव्रत (म्हणजे पंधरा दोषांनीं युक्त), विषम (म्हणजे अठरा व पंधरा मिळून ३३ दोषांनीं युक्त), सर्व दोषप्रदुष्ट (म्हणजे ३३ व स्वतःचे २९ दोषांनीं युक्त).

त्यांस बांधण्याकरितां लागणारें सामान व तदनुषंगिक सामान हस्ति–शिक्षकाच्या विचारानें ठरवावें. खुंटा, गळ्याला साखळदंड, कंबरेला पट्टा, चढून बसण्याकरितां दोर, पायबंद, पुढील बंद–हीं बंधनें होत. अंकुश, काठी आणि यंत्र–हें हत्ती चालविण्याचें साधन होय. गजपताका, नक्षत्रमाळा, हौदा व गालिचा हीं भूषणें होत. कवच, तोमर, बाणभाता, आणि यंत्रें हीं लढाईचीं आयुधें होत.

गजवैद्य आणि गजशिक्षक, गजारोहणांत पटाईत मनुष्य, माहूत, गजरक्षक, गजाची शुश्रूषा करणारा, अन्न शिजविणारा, गवत घालणारा, पायबंद बांधणारा, गजशाला साफ करणारा, रात्रीं गजापाशीं निजणारा,— इत्यादि गजशाळेवरील नोकर होत.

गजवैद्य, गजशालारक्षक, गजाचें अन्न शिजविणारे, झाडझूड करणारे यांनीं एक प्रस्थ भात, अर्धी ओंजळ तेल, दोन पल गूळ किंवा साखर, आणि दोन पल मीठ तेथून घ्यावें, गजवैद्याशिवाय इतरांनीं दहा पल मांस घ्यावें. जे हत्ती वाटचालीनें आजारी झाले असतील, कामामुळें थकले असतील, मदानें पछाडिले असतील किंवा म्हातारपणामुळें कमजोर झाले असतील त्यांस गजवैद्यानें उपाय करावे.

गजशाळा अस्वच्छ ठेवणें; खुराक न देणें; टणक जमिनीवर निजविणें; मर्मस्थळीं मारणें; भलत्या माणसास बसूं देणें; भलत्या वेळीं, जमिनीवर भलत्या ठिकाणीं किंवा नदींत भलत्या ठिकाणीं नेणें; दाट झाडींत उतरविणें हे अपराध होत. त्यांच्या भत्यामधून अगर पगारामधून याबद्दल दंड वसूल करून घ्यावा.

चार चार महिन्यांनीं म्हणजे आषाढी, कार्तिकी व फाल्गुनी पूर्णिमेस तीन वेळां नीराजन विधि करावा. दर अमावास्येस भूतांस आणि पूर्णिमेस कार्तिकेयास बलि अर्पण करावा.

दांतांच्या मुळाशीं जो घेर असेल, त्याच्या दुप्पट लांब भाग ठेवून बाकीचे दांत कापावे. नदीकांठच्या हत्तींचे अडीच अडीच वर्षांनीं आणि डोंगराळ हत्तींचे पांच पांच वर्षांनीं दांत कापावे.

# अध्याय ५४ वा.



## " रथाध्यक्ष, पायदळावरील अधिकारी आणि सेनापतीचें काम. "

घोड्यावरील मुख्य अधिकाऱ्याचीं जीं कामें सांगितलीं आहेत, तींच रथावरील अधिकाऱ्याचीं होत. त्यानें रथाच्या कारखान्याचा धंदा चालवावा.

दहा पुरुष उंच व बारा पुरुष रुंद असा जो रथ तो पहिल्या प्रतीचा होय, यानंतर एक एक पुरुष कमी करून सहा पुरुष रुंदीपर्यंत असे सात प्रकारचे रथ तयार करावे. देवाच्या मिरवणुकीकरितां, मंगलकार्याकरितां, लढाईकरितां, प्रवासाकरितां, शत्रूच्या राजधानीवर हल्ला करण्याकरितां, आणि रथाचें शिक्षण देण्याकरितां, वेगळ्या वेगळ्या प्रकारचे रथ तयार करवावे.

सैनिकामध्यें बाण, अस्त्रें, व शस्त्रें सोडण्यांत, चिलखतें अंगांत चढविण्यांत व इतर युद्धसामुग्री वापरण्यांत तरबेजपणा किती आला आहे व रथांतील योद्धा, रथावरील सारथी आणि रथाचे अश्व आपापल्या कामांत कितपत वाकबगार झाले आहेत हें रथाध्यक्षानें पाहिलें पाहिजे.

याशिवाय कारखान्यांत जे लोक काम करीत असतील त्यास पोटगी व मजूरी वांटणें, कायम किंवा हंगामी नोकरांचा योग्य प्रतिपाळ करणें आणि रस्त्यांची मापणी करून ठेवणें, हीं कामें त्यांसच करावीं लागतात.

पायदळावरील मुख्य अधिकाऱ्याचें कामहि असेंच समजलें पाहिजे. पूर्वापार नोकरींत असलेलें सैन्य, पगारी अथवा भाडोत्री सैन्य, संघांचे अथवा समूहानें काम करणाऱ्या लोकांचें सैन्य, मित्रराजाचें सैन्य, शत्रूराजाचें सैन्य, आणि रानटी लोकांचें सैन्य हीं अफाट आहेत किंवा लहान आहेत, त्यांस दऱ्याखोऱ्यामध्यें किंवा पठारावर लढाई करण्याची कला अवगत आहे किंवा काय, त्यास मैदानी किंवा गनिमी लढाई करतां येते किंवा काय, खंदकांत बसून अगर विमानी लढाई करितां येते किंवा काय अगर लढाई दिवसाची असो अगर रात्रीची असो ती करावयास ते सैनिक तयार असतात किंवा काय, निरनिराळ्या प्रकारच्या कवाइतींत वाकबगार आहेत किंवा काय, आणि ते आपापलीं कामें बरोबर करतात कीं नाहीं हेंहि त्यानें पाहिलें पाहिजे.

सेनापतीलाहि सर्व प्रकारचीं युद्धें व शस्त्रास्त्रें यांचें पूर्णपणें शिक्षण असलें पाहिजे. हत्ती, घोडे व रथ यांच्या एकंदर व्यवहाराची पूर्ण माहिती आणि चतुरंग सैन्य उत्तम रीतीनें कवाईत शिकवून निरंतर सज्ज ठेवण्याची कला त्यास अवगत पाहिजे. आपल्यास अनुकूल अशी युद्धभूमी कोणती किंवा युद्धकाळ कोणता हें त्यास ठरवितां आलें पाहिजे. शत्रूचें सैन्य त्यास अजमावितां आलें पाहिजे. ज्यामध्यें दुही नाहीं त्यांत दुही कशी उत्पन्न करावी, ज्यांत दुही आहे त्यांत एकी कशी घडवून आणावी, ज्यामध्यें जूट आहे त्यांत फूट कशी पाडावी, फूट पाडलेल्यांना [illegible]रीस कसें आणावें; शत्रूच्या किल्ल्यावर हल्ला कसा चढवावा व योग्य समय पाहून स्वारीस केव्हां निघावें, या [illegible] गोष्टी त्यास माहीत पाहिजेत.

तळ देतांना, कूच करतांना व हल्ला चढवितांना सैन्यांत शिस्त आहे किंवा नाहीं हें त्यानें [illegible] पहावें आणि सैन्यांतील पलटणीस तूर्य, ध्वज, पताका, यांच्या खुणांवरून व्यूह बनविण्यास शिकवावें.

# अध्याय ५५ वा.

## " परवाना अधिकारी; वन-चराई अधिकारी "

परवाना अधिकाऱ्यानें एक माष घेऊन परवाना द्यावा. ज्याजवळ परवाना असेल त्यानेंच देशांत प्रवेश करावा किंवा बाहेर जावें. देशांतील रहिवाश्यांजवळ परवाना नसेल तर त्यास बारा पण दंड द्यावा लागेल. खोटा परवाना दाखविणारास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड द्यावा लागेल. ( खोटा परवाना दाखविणारा मनुष्य ) परदेशी असल्यास त्यास उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण, दंड द्यावा लागेल.

वनचराईवरील अधिकाऱ्यानें परवाना तपासला पाहिजे.

जीं जीं धोक्याचीं ठिकाणें असतील तीं सोडून त्यांच्या दरम्यान चराईचें रान राखून ठेवावें; दऱ्याखोऱ्यांतून चोर व हत्ती यांना हांकून लावावें, आणि तीं निर्धोक करावीं.

निर्जल स्थळीं विहिरी, कुवे व तळीं खणून ठेवावीं; शिवाय फुलबाग व फळबागहि लावून ठेवावे. पारधी आणि शिकारी व कुत्र्यांनिशीं शिकार करणारे लोक ह्यांनीं अरण्यांत टेहेळणी करीत हिंडलें पाहिजे.

चोर किंवा शत्रू चाल करून आल्यास शंखांचे नाद व दुंदुभीचे कडकडाट करून गुरें शत्रूच्या हातीं सांपडण्याचा प्रसंग येऊं देऊं नये. त्याचप्रमाणें डोंगरावर अथवा झाडावर चढून किंवा चपल घोड्यावर बसून निसटून जाऊन शत्रु किंवा रानटी लोक आले आहेत ही बातमी राजाला पोहोंचविण्याकरितां पाळीव कबुतरांच्या गळ्यांत मोहोरबंद लखोटे बांधून त्यास उडवावें; किंवा एकापुढें एक असे आगीचे व धुराचे लोळ उठवावे.

द्रव्य वनाचें व हत्तीरानांचें संरक्षण, रहदारी रस्त्याची दुरुस्ती, चोरांचा बंदोबस्त, व्यापारी लोकांना सुरक्षित पोंचविणें आणि गाईचें रक्षण, हीं कामें त्यास करावीं लागतात.

---

# अध्याय ५६ वा.

## जमाबंदीवरील मुख्य अधिकाऱ्याचीं कामें. कुटुंबी ( शेतकरी ), व्यापारी, व गोसावी हेरांकरवीं करावयाचीं कामें.

जमाबंदीवरील मुख्य अधिकाऱ्यानें जनपदांचे चार भाग पाडावे; त्यांतील गांवांचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे वर्ग पाडून पुढीलप्रमाणें त्यांचे पोटविभाग करावे:—करमाफीचीं गांवें; सैन्याकरितां भरती सैनिक पुरविणारीं गांवें, धान्यरूपानें कर देणारीं गांवें; पशुरूपानें कर देणारीं; सुवर्णरूपानें कर देणारीं; कच्च्यामालाच्या रूपानें कर देणारीं; वेठीच्या किंवा मेहतीच्या रूपानें कर देणारीं; किंवा अन्य रूपानें कर देणारीं गांवें.

समाहर्ता अथवा जमाबंदीवरील मुख्य अधिकारी यानें पांच पांच गांवांवर अथवा दहादहा गांवांवर जो गोप नेमिला असेल, त्यानें त्या त्या गांवांचें काम पहावें.

त्यानें गांवा गांवाच्या शिवारांच्या सीमा ठरवून टाकिल्या पाहिजेत. गांवांतील जमिनीची लागवड, बिन लागवड, पठार, पाणथळ, बाग, मळा, बगीचा, जंगल, समाधि ( मठ ), देऊळ, पाठस्थळ, स्मशान, अन्नसत्र,

पाणपोई, क्षेत्र ( पवित्रस्थान ), गायरान, व रस्ता अशीं सदरें पाडून ठेविलीं पाहिजेत. अशा रीतीनें गांवांच्या, शेतांच्या, जंगलांच्या, व रस्त्यांच्या सीमा ठरल्यावर शेतासंबंधीं जीं बक्षीसपत्रें, खरेदी–पत्रें, दानधर्म-पत्रें होतील त्यांची नोंद करून ठेविली पाहिजे. त्याचप्रमाणें ज्या जमिनीस कर माफ आहे, त्याचीहि नोंद ठेविली पाहिजे. गांवांतील घरांपैकीं कोणती घरें कर देणारी व कोणत्या घरांस कर माफी दिली आहे, त्याची नोंद केली पाहिजे. इतके चातुर्वर्णी लोक, इतके शेतकरी, इतके गुराखी, इतके व्यापारी, इतके सुतार-लोहार वगैरे, इतके मजूर इतके दास, इतके द्विपाद व इतके चतुष्पाद प्राणी अशी नोंद ठेविली पाहिजे. शिवाय गांवांमधून प्रसंगविशेषीं सुवर्ण, वेठ, जकात अथवा कर आणि दंड अजमासें इतका जमा होण्याचा संभव आहे, असा अंदाज केलेला असावा.

गांवांमधील स्त्रियांची व पुरुषांची खानेसुमारी आणि कलांची नोंद ठेवलेली पाहिजे; त्याचप्रमाणें लहानापासून तों थोरापर्यंत प्रत्येक माणसाचा वर्तनक्रम, धंदा, उत्पन्न व खर्च नोंदलेला असला पाहिजे.

देशाच्या चार विभागांपैकीं एक एक भागावर जो स्थानिक अथवा प्रांताधिकारी असतो त्यालाहि अशीच कामें करावीं लागतात.

गोप व स्थानिक यांच्या प्रांतांमध्यें प्रद्वेष्टा नामक अधिकाऱ्यानें जाऊन त्यांच्या कामाची तपासणी करीत जावी, आणि थकलेला सारा किंवा कर कडक उपाय योजून वसूल करावा.

जमाबंदीवरील अधिकाऱ्यानें कुटुंबी अथवा शेतकरी हेर ज्या गांवांत कामगिरीवर पाठविले असतील, त्या गांवांतील शेतासंबंधीं, घरासंबंधीं अगर कुळांसंबंधीं झालेले व्यवहार बरोबर आहेत किंवा नाहींत याची चौकशी त्यांनीं करावी; त्याचप्रमाणें शेताचें क्षेत्रफळ व उत्पन्न, घरांचे भोगवट्याचे हक्क, करमाफी आणि कुळांची जाति व धंदा यांची नोंद बरोबर झाली आहे किंवा नाहीं हेंहि पहावें.

गांवांमधील जनावरांची नोंद आणि माणसी उत्पन्नाची व खर्चाची नोंद तपासून पहावी. गांवांतील मनुष्य परगांवीं गेला असल्यास तो कां गेला, अथवा परकीय मनुष्य गांवांत रहावयास आल्यास तो कां आला याचा तपास करावा. त्या प्रांतांतील अनिष्ट अथवा अपायकारक स्त्री पुरुषांच्या हालचालींवर त्यांनीं नजर ठेवावी.

व्यापारी हेरांनीं अशाच प्रकारें देशांमध्यें राजाच्या मालकीचा खनिज माल, बागाईत माल, जंगल माल, जिराइत माल, अथवा कारखान्यांत तयार झालेला माल असेल त्याची मोजदाद व किंमत तपासून पहावी.

परकीय देशांमधून जलमार्गानें किंवा स्थलमार्गानें आलेल्या हलक्या व भारी मालावरील जकात, दस्तुरी, वाहतूक, लष्करी कर, तरी भाडें, षष्ठांश भाग, भत्ता आणि वखार–भाडें त्यांनीं तपासून पहावें.

गोसावी हेरांनीं अशाच रीतीनें जमाबंदीवरील मुख्य अधिकारी हुकूम करील तेव्हां शेतकरी, गुराखी, व्यापारी, त्याचप्रमाणें सरकारी खात्यावरील अधिकारी यांचे व्यवहार सचोटीनें चालले आहेत किंवा लबाडीनें चालले आहेत याची बारीक चौकशी करावी.

अट्टल चोरांचा वेष घेतलेल्या हेरांनीं आपल्या चेल्यांच्या मदतीनें मठांत, शहरांतील चौकांत, निर्जन स्थळांत, तळ्यावर, नदीवर, विहीरीवर, घांटावर, पवित्र स्थळांत, देवळांत, आश्रमांत, अरण्यांत, डोंगराळ भागांत, किंवा दाट जंगलांत, चोर, शत्रु किंवा साहसी लोक येऊन वस्ती करून राहिले किंवा निघून गेले, तसेंच ते कां आले किंवा कां निघून गेले याची चौकशी करावी.

याप्रमाणें जमाबंदीवरील मुख्य अधिकाऱ्यानें अत्यंत दक्षतेनें देशांतील कारभार केला पाहिजे. त्याचप्रमाणें त्याच्या हाताखालीं असलेले गुप्त हेर खात्यांतील लोक, आणि त्यांचे सहकारी व अनुयायी यांनींहि असाच दक्षतेनें कारभार चालविला पाहिजे.

---

# अध्याय ५७ वा.



## नागरिकांचीं अथवा शहर-कामदारांचीं कामें.

जमाबंदीवरील मुख्य अधिकाऱ्याप्रमाणें नागरिकानें अथवा शहर कामदारानें शहराचीं कामें पहावीं. दहा दहा किंवा वीस वीस किंवा चाळीस चाळीस कुळांवर गोपानें काम पहावें.

त्यानें त्यांतील स्त्रियांची व पुरुषांची जातवार, गोत्रवार, धंद्येवार खानेसुमारी, जनावरांची खानेसुमारी, आणि उत्पन्न व खर्च यांची तपशीलवार माहिती नोंदून ठेवावी. त्याचप्रमाणें शहरांतील दुर्ग भागाच्या प्रत्येक चवथ्या भागावर स्थानिक नामक कामगारानें काम पहावें.

धर्मार्थ संस्थांच्या व्यवस्थापकांनीं पाखंडी प्रवाशांची वर्दी देऊन त्यास उतरावयास जागा दिली पाहिजे. तपस्वी किंवा ब्राह्मण आपल्या खात्रीचे असल्यास त्यास त्यानें मुक्कामास जागा द्यावयास हरकत नाहीं. सुतार लोहार वगैरे काम-गार आणि इतर कुशल कारागीर ह्यांनीं आपापल्या धंद्याच्या जागीं आपापल्या जातीच्या लोकांस उतरावयास सांगावें.

व्यापाऱ्यांनीं एकमेकांस आपापल्या धंद्याच्या जागीं उतरावयास जागा द्यावी; त्यांपैकीं कोणीं भलत्या वेळीं विक्री करणारा असेल, अथवा भलत्याचाच माल विकीत असेल तर त्याची वर्दी दिली पाहिजे.

गुत्तेवाले, हलवाई, खाटिक, भडभुंजे, आणि वेश्या यांनीं ओळखीच्या माणसास उतरावयास जागा द्यावी; पण ह्यांपैकीं कोणीं उधळ्या असला अथवा गुंड असला तर याची वर्दी दिली पाहिजे.

वैद्यानें मजपाशीं अमुक मनुष्य गुप्त रोगांवर, व्रणावर औषध मागत आहे, त्याचप्रमाणें घराच्या मालकानें अमुक मनुष्य निंद्य वर्तन करीत आहे, अशी वर्दी गोपास व स्थानिकास दिली म्हणजे तो दोषमुक्त होतो, नाहीं तर गुन्हेगारांप्रमाणेंच तो दोषी ठरतो.

( घराच्या मालकानें ) आल्यागेल्याची वर्दी दिली पाहिजे, नाहींतर रात्रीं एकादा गुन्हा घडल्यास त्याचा दोष त्यावर येईल; गुन्हा घडला नसेल तेव्हां त्यास तीन पण दंड द्यावा लागेल.

रस्त्यानें किंवा आडरस्त्यानें जाणाऱ्या प्रवाशांस शहरांतील किंवा शहराच्या बाहेरील देवळांत, पवित्र स्थळांत, रानांत किंवा स्मशानांत एखादा व्रणाचा रोगी, विध्वंसक हत्यारें घेऊन जाणारा, जड ओझें घेऊन चाललेला, कावरा-बावरा झालेला, झोंपाळू, प्रवासानें दमलेला, किंवा अगदीं अपरिचित असा मनुष्य आढळल्यास त्यानें त्याला पकडून ठेविलें पाहिजे.

अशाप्रकारें ओसाड जागेंत, कारखान्यांत, गुत्यांत, भडभुंज्याच्या दुकानांत, हलवायाच्या दुकानांत, खाटकाच्या दुकानांत, जुगारखान्यांत, व पाखंडाच्या वसतीस्थळांत तपासणी करावी.

उन्हाळ्यांत आगीचा बंदोबस्त करून ठेवला पाहिजे. दिवसाच्या चार विभागांपैकीं मधल्या दोन विभागांत ( दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरांत ) जो विस्तव पेटवील त्यास $\frac{1}{8}$ पण दंड होईल. चूल पेटवावयाची झाल्यास ती बाहे-रील जागेंत पेटविली पाहिजे.

ज्याजवळ पांच घडे, कुंभ, डोण, शिडी, कुऱ्हाड, सूप, आंकडी, चिमटा, व पखाल नसेल त्यास $\frac{1}{4}$ पण दंड होईल.

घरांवरील गवतांचीं छपरें काढून टाकलीं पाहिजेत. विस्तवाशीं ज्याचें काम असतें अशा लोहार वगैरे लोकांस एका ठिकाणीं राहावयास लावावें.

घरांतलि मालकांनीं आपआपल्या घरांच्या दारांशीं असलें पाहिजे. रात्रींच्या वेळीं रस्त्यारस्त्यावर पाण्यानें भरलेले हजारों घडे ठेवलेले असले पाहिजेत. चौरस्त्यावर अथवा शहरांतील चौका चौकांत व सरकारी इमारतींजवळहि तसेच घडे असले पाहिजेत.

एखाद्या घराचा मालक आग लागली असतां ती विझवण्यास जाणार नाहीं, त्यास बारा पण, व भाडेकऱ्यास सहा पण दंड होईल. ज्याच्या निष्काळजीपणामुळें आग लागली असेल त्यास ६८ पण दंड होईल. मुद्दाम आग लावणारास आगींत टाकून ठार करावें.

रस्त्यावर कचरा टाकणारा इसम ⅛ पण दंडास पात्र होतो.

चिखलानें किंवा पाण्यानें रस्ता आडविणारा ¼ पण दंडास पात्र होतो. राजमार्गावरील अडविणारा दुप्पट दंडास पात्र होतो.

पवित्र स्थळीं, तळीं, विहिरी वगैरे जलाशयांत, देवालयांत, अथवा सरकारी इमारतीनजीक मलोत्सर्ग करणारास, एक पणापासून पुढें व लघुशंका करणारास अर्ध्या पणापर्यंत दंड होतो. परंतु औषधामुळें, रोगामुळें किंवा भीतीमुळें वरील अपराध घडून आला असेल तर मात्र तो दंडास पात्र होत नाहीं.

शहरांत मेलेलें मांजर, कुत्रें, मुंगुस किंवा साप, टाकिल्याबद्दल तीन पण दंड, मेलेलें गाढव, उंट, खेंचरें, घोडें किंवा जनावर टाकिल्याबद्दल सहा पण दंड, मनुष्याचें प्रेत टाकिल्याबद्दल पन्नास पण दंड, भलत्याच रस्त्यानें किंवा ज्या वेशींतून प्रेत न्यावयाचें, त्या वेशींतून न नेतां भलत्याच वेशींतून, प्रेत बाहेर नेल्यास, पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड आणि वेशीवरील रखवालदारास दोनशें पण दंड.

स्मशानावांचून भलत्याच ठिकाणीं पुरल्याबद्दल किंवा जाळिल्याबद्दल बारा पण दंड.

रात्रींच्या सहा घटकानंतर व रात्र संपण्याच्या सहा घटका अगोदर यामधील वेळांत कोणी बाहेर फिरूं नये, म्हणून सूचनार्थ नगारा होतो. नगारा वाजल्यावर जो कोणी राजवाड्याच्या आसपास पहिल्या व शेवटल्या प्रहरांत संचार करील, त्यास भलत्याच वेळीं भटकत राहिल्याबद्दल सव्वा पण दंड; मधल्या प्रहरांत संचार करील, त्यास दुप्पट आणि बाहेर निघून जाण्याबद्दल चौपट दंड.

संशयास्पद ठिकाणीं एखादा मनुष्य आढळल्यास, अथवा पूर्वीं एखादा गुन्हा केलेला मनुष्य आढळल्यास, त्यास पकडून त्याचा जबाब घ्यावा.

राजवाड्यांत किंवा राजाच्या बागेंत किंवा राजाच्या मालकीच्या कोणत्याहि स्थळीं प्रवेश केल्यास, अथवा शहरांची तटबंदी चढून गेल्यास मध्यम म्हणज २०० पासून ५०० पण दंड.

बाळंतिणीच्या शुश्रूषेकरितां, किंवा वैद्यकीच्या कामाकरितां, किंवा प्रेतयात्रेकरितां चाललेला मनुष्य, जवळ कंदील घेऊन चाललेला मनुष्य, लोकांस जमविण्यासाठीं नगारा कां झाला हा तपास करण्यासाठीं चाललेला मनुष्य, नाटक किंवा जलसा पाहण्यास चाललेला मनुष्य किंवा आग विझविण्यासाठीं चाललेला मनुष्य, यांस अथवा ज्याजवळ परवाना आहे अशा मनुष्यास पकडतां येत नाहीं.

ज्या रात्रीं बाहेर फिरण्याची परवानगी असेल, त्या रात्रीं जीं मनुष्यें हातीं काठ्या किंवा हत्यारें घेऊन फिरतील, त्यांस त्यांच्या अपराधाप्रमाणें दंड करावा; त्याचप्रमाणें जे हद्दपार झालेले लोक लपून छपून अथवा वेष पालटून येतील, त्यांसहि त्यांच्या अपराधाप्रमाणें दंड करावा.

ज्यांस अटकाव करावयास नको त्यांस अटकाव केल्यास अथवा ज्यांस अटकाव करावयास पाहिजे त्यांस न केल्यास पहारेवाल्याला, भलत्याच वेळीं भटकण्याबद्दल जो दंड होतो त्याच्या दुप्पट दंड.

ज्या स्त्रीची स्वतःवर मालकी नाहीं, तिजवर बलात्कार करणाऱ्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड, जिची स्वतःवर मालकी आहे व जी स्वतंत्र आहे अशा गणिकेवर बलात्कार करणाऱ्यास मध्यम म्हणजे २०० पासून ५०० पण दंड, जी बायको या नात्यानें एखाद्याच्या ताब्यांत आहे अशा स्त्रीवर बलात्कार करणाऱ्यास उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड, आणि लग्नाच्या बायकोवर बलात्कार करणाऱ्यास देहांत शासन.

नागरकानें—शहर कामदारानें—रात्रीच्या वेळीं अचेतन पदार्थांपासून किंवा जिवंत प्राण्यापासून जो उपद्रव झालेला असेल त्याचें वर्तमान कळविलें नाहीं, तर त्यांस उपद्रवाच्या मानानें दंड करावा. त्याचप्रमाणें त्यानें हलगर्जीपणा केल्यासहि दंड करावा.

नदी, विहिरी, सरोवरें, वगैरे, जाण्यायेण्याचे रस्ते, जमिनींतील चोरवाटा, बुरूज, तट, खंदक, वगैरे यांची तपासणी नागरकानें, हमेश केली पाहिजे. एखाद्या माणसाची वस्तु गळून पडलेली असेल, विसरून राहिलेली असेल, अथवा जनावर अगर पक्षी पळून आलेला असेल तर नागरकानें तें सांभाळून ठेवलें पाहिजे. तुरुंगांत जितकीं लहान वयाचीं मुलें, म्हातारी माणसें, रोगी माणसें व बिनवारसी माणसें असतील, तितकीं राजाच्या वाढदिवशीं व पौर्णिमेच्या दिवशीं मुक्त करण्यांत यावी. जे स्वभावतः सदाचरणी लोक कांहीं अपराधामुळें तुरुंगांत आले असतील, त्यांनीं अपराधाबद्दल कांहीं दंड द्यावा.

प्रतिदिवशीं अथवा पांच रात्रींतून एकदां कैद्यांकडून सक्त मजुरीचें काम घेऊन, अथवा त्यांस शारिरीक शिक्षा करून, अथवा त्यांपासून द्रव्य घेऊन त्यांची मुक्तता करावी.

नवीन देश ताब्यांत येईल त्या दिवशीं, युवराजाला यौवराज्याभिषेक होईल त्या दिवशीं, व राजाला पुत्र होईल त्या दिवशीं, कैद्याला मुक्त करावें.



# अधिकरण ३ रें.



## अध्याय ५८ वा.



### करारनामे व मुकदमे.

तिघे न्यायाधीश व तीन अमात्य यांनीं संग्रह, द्रोणमुख, स्थानीय अशा प्रांताच्या विभागांत कज्जे चालवून निवाडे द्यावे. एकांतांत गुप्तपणें, घरांतल्या घरांत, रात्रीं अरण्यांत, कपटानें आणि तिसऱ्या कोणास न कळवितां केलेले करार रद्द समजावे. असले व्यवहार करणारा व करविणारा या दोघांनाहि प्रथम साहसदंड करावा; साक्षीदारांना प्रत्येकीं अर्धा दंड करावा; आणि असल्या व्यवहारांवर विश्वास ठेवणारांचें नुकसान झाल्यास तें त्यांनीं स्वतःच सोसावें.

जंगम माल गहाण ठेवून केलेला कर्जाचा व्यवहार आणि ज्या देवघेवीला आक्षेप घेतां येत नाहीं असा व्यवहार एकांतांत केला तरी तो मान्य व्हावा. भाऊबंदाची वांटणी, निक्षेप, गुप्त ठेव व विवाह या व्यवहारांत गोषांतील स्त्रिया व गैरशुद्धींत नसलेले रोगी यांचे व्यवहार अंतर्गृहांत जरी झाले असले तरी कायदेशीर समजावे.

साहसकर्म करण्याचा करार, द्वंद्वयुद्ध, विवाह, सरकारी हुकमाची बजावणी आणि ज्यांचे व्यवहार रात्रीच्या पूर्व भागांत होतात असे लोक या संबंधाचे व्यवहार रात्रीं झाले तरी कायम समजावे. व्यापाऱ्यांचा समूह, गवळी, अरण्यवासी, शिकारी लोक, यात्रेकरू यांनीं रानांत असतांना केलेले करार रद्द समजूं नयेत. गुप्त व्यवहारावर उपजीविका करणाऱ्या लोकांशीं कपटानें केलेले करारदेखील ग्राह्य मानावे.

त्याचप्रमाणें संघांतील सभासदांनीं आपापसांत करार करून त्यास हरकत न घेतल्यास तेहि करार कायदेशीर समजले जावे; यावांचून इतर व्यवहार कायदेशीर होत नाहींत.

दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्यांनीं केलेले व्यवहार, पिता जिवंत असतां पुत्रानें केलेले व्यवहार, ज्यांस पुत्र आहे अशा पित्यानें केलेले, कुलभ्रष्ट झालेल्या भावानें केलेले, अविभक्त कुटुंबांतील धाकट्या भावानें केलेले, पति असलेल्या स्त्रीनें व पुत्र असलेल्या स्त्रीनें केलेले, दास व परस्वाधीन इसम यानें केलेले, वयांत न आलेला किंवा अति वयातीत यानें केलेले, गुन्हेगार, संन्यासी, पंगु आणि व्यसनी यांनीं केलेले हे सर्व व्यवहार गैरकायदा होत; मात्र यांपैकीं जर कोणाकडे एखादा व्यवहार सोंपविला असेल तर तेवढा कायदेशीर समजावा. त्यांत पुनः क्रुद्ध, दुःखित, मत्त, उन्मादयुक्त किंवा झपाटलेला यांनीं केलेले व्यवहार कायदेशीर मानले जाणार नाहींत. असल्या प्रकारचे व्यवहार करणारा, करविणारा व साक्षीदार यांना इतरत्र सांगितल्याप्रमाणें दंड करावा.

एखाद्यानें आपल्याच वर्गातील माणसाशीं योग्य स्थळीं व योग्य काळीं राजीखुषीनें व अक्कलहुषारीनें सार्वजनिक ठिकाणीं केलेला करार कायदेशीर समजावा; मात्र त्यांत कराराचा प्रकार, अट, वर्णन, तपशील वगैरे सर्व नीट नमूद केलेले असावे. अनेक करारांमध्यें शेवटचा करार प्रमाण समजावा; मात्र तो करितांना करार करणारा मनुष्य जुलुमाच्या किंवा रोगाच्या आधीन असूं नये. याप्रमाणें करारांचा विचार झाला.

करारांत संवत्सर, ऋतु, मास, पक्ष, तिथी, करण, स्थान, कर्जाची रक्कम, करार करण्याला लायक अशा वादीप्रतिवादींचे देश, गांव, जात, गोत्र, नांव आणि धंदा हें सर्व लिहून वादीप्रतिवादी यांचें जबाबहि यथानुक्रमें लिहावे; आणि लिहिल्यावर ते पुनः तपासावेत.

चालू मुद्दा सोडून भलताच मुद्दा कोणी काढूं लागला, पहिल्या व दुसऱ्या जबानींत फरक पडला, तिऱ्हाइतांच्या सांगण्यावर आक्षेप घेतां येत नसला तरी त्यावर आक्षेप घेऊं लागला व आक्षेपाचें समर्थन करीत नाहीं, प्रश्नाचें उत्तर द्यावयाला सांगितलें असतां बोलत नाहीं, मुद्द्यावर आणण्याचा प्रयत्न केला असतांहि जो मुद्दा सोडून बोलतो, एक कबूल करून तें परत घेतो, चालू वादांत लागू पडणाऱ्या वचनांचा अर्थ असा होत नाहीं म्हणून हट्ट धरून बसतो, आपल्याच साक्षीदारानें सांगितलेला मजकूर नाकबूल करतो, व जेथें साक्षीदाराशीं बोलूं नये तेथें त्यांच्याशीं बोलतो अशा सर्वांना ' परोक्त ' अपराधी म्हणतात.

परोक्त अपराधाबद्दल रकमेच्या आठपट दंड करावा; ज्याला स्वतःखेरीज दुसरे साक्षीदार मिळत नसतील तो हरल्यास दहा पट दंड करावा. साक्षीदारांस पोटगी $\frac{1}{८}$ द्यावी; वाटखर्चीबद्दल वादाच्या मानानें कमी अधिक रक्कम द्यावी; वादांत जो हरेल त्यानें दुसऱ्याचा कोर्टखर्च द्यावा.

भांडण, चोरी, आणि व्यापारी किंवा संघाचे वाद यांवांचून इतर बाबतींत प्रतिवादीस वादीविरुद्ध उलट फिर्याद करितां येत नाहीं. त्याचप्रमाणें प्रतिवादीविरुद्ध वादीसहि तक्रार करतां येणार नाहीं. प्रतिवादीनें उत्तर दिलें असूनहि त्याच दिवशीं वादी प्रत्युत्तर देणार नाहीं तर त्यावरहि परोक्ताचा अपराध लागू होतो; कारण मुकदम्यांतील मुद्द्यांची माहिती वादीस असते तशी प्रतिवादीस असत नाहीं. प्रतिवादीस उत्तरासाठीं तीन दिवस किंवा सात दिवस अवसर द्यावा; त्यानंतर तो वेळेवर साक्षीपुरावा न देईल तर त्यांस बारा पण दंड करावा. तीन पंधरवडे झाले व प्रतिवादीनें उत्तर दिलें नाहीं, तर त्यास कमींत कमी तीन पण व ज्यास्तींत ज्यास्त बारा पण दंड करावा. परोक्त अपराधाबद्दल दंड करून त्याची जिनगी असेल ती प्रतिपक्षांस देववावी; परंतु उपकारादाखल दिलेल्या रकमेबद्दल फिर्याद असेल तर मात्र तसें करितां येणार नाहीं. प्रतिवादीस तक्रार शाबीद करतां आली नाहीं म्हणजेहि तसेंच करावें. वादीचा दावा रद्द झाला तर त्यांवर परोक्त अपराध लागू होतो. मृत किंवा संकटग्रस्त मनुष्यांवर फिर्याद करून, खोटे साक्षीदार आणून ती शाबीत करूं पाहील तर त्यांस दंड करून त्याची क्रिया करवावयास लावावें. दावा शाबीत झाल्यास प्रतिवादीची जिंदगी त्याच्या कबजांत द्यावी; तो ब्राह्मण असेल तर त्यास भूत पिशाचाची बाधा दूर करणाऱ्या गोष्टी करावयास लावावें.

राजाला चारहि वर्णांतील व आश्रमांतील लोकांचें रक्षण करावें लागतें व धर्माचें उल्लंघन न होईल अशी खबरदारी घ्यावी लागते, म्हणून तोच धर्मांचा पुरस्कर्ता होय. धर्म, व्यवहार, शील व राजशासन हे धर्माचे चार पाय होत. खटला चालवितांना पहिल्यापेक्षां दुसरा, दुसऱ्यापेक्षां तिसरा, तिसऱ्यापेक्षां चवथा अधिक प्रमाणभूत मानावे.

धर्माचा पाया सत्य हा आहे; व्यवहाराचा पाया साक्षी हा आहे; रूढी जनसमूहावर अवलंबून आहे, आणि राजशासन राजाच्या हुकुमावर अवलंबून आहे. धर्माचरणानें प्रजेचें रक्षण करणें हा राजाचा स्वधर्म असून तोच त्याला स्वर्गप्राप्ति करून देतो. जो राजा प्रजेचें रक्षण न करितां तिला सोडून देतो तो फुकट राजदंड धारण करतो व तो नरकास जातो.

आपला पुत्र असो वा शत्रु असो, जो राजा अपराध्याला अपराधाप्रमाणें निःपक्षपातानें दंड करतो, त्याला तो दंड इहलोकीं व परलोकीं उपयोगी पडतो.

धर्म, व्यवहार, रूढी, व कायदे या चार प्रकारांनीं प्रजेचें रक्षण करणारा राजा सर्व पृथ्वी जिंकितो. जेव्हां रूढीला धर्मशास्त्राचा व धर्मशास्त्राला व्यवहाराचा विरोध येतो, त्या वेळीं धर्मास अनुसरून निर्णय द्यावा.

जेथें धर्मशास्त्र आणि धर्मनीति यांत विरोध येईल तेथें धर्मशास्त्र सोडून नीतीलाच प्रमाण मानावें.

वादी व प्रतिवादी या उभयतांनाहि स्वतःशिवाय इतर साक्षीदार नसणें हा मोठा दोष होय; उलट तपासणी, साक्षींतील सरळपणा, उद्देश आणि शपथक्रिया हीं निर्णायक साधनें होत. ज्यांच्या पहिल्या व दुसऱ्या साक्षींत फरक पडला असेल, साक्षीदारांनीं ज्यांच्याविरुद्ध साक्ष दिली असेल व ज्याची बाजू खोटी आहे, असे गुप्त हेरांनीं सांगितलें असेल त्याची बाजू खोटी आहे असा निकाल द्यावा.

---

# अध्याय ५९ वा.

## " विवाह–संबंध–" स्त्रीधन.

सर्व व्यवहारांत विवाहाला आद्य स्थान दिलें आहे. विवाहविधि आठ प्रकारचे आहेत.

१ कन्येच्या अंगावर दागिने घालून तिचें दान करतात तो ' ब्राह्म ' विवाह.

२. तुम्हीं उभयतां सहधर्माचें आचरण करा असें म्हणून वधूवरांचा संबंध जोडिला जातो तो ' प्राजापत्य ' विवाह.

३. वराकडून दोन गाई घेऊन कन्या दिली जाते तो ' आर्ष ' विवाह.

४. यज्ञवेदीवर असलेल्या ऋत्विजाला कन्या अर्पण करणें हा 'दैव' विवाह होय.

५. वधूवरांच्या परस्पर संमतीनें जो संबंध जडतो तो 'गांधर्व' विवाह.

६ कन्येसाठीं शुल्क ( हुंडा ) घेऊन कन्या देणें हा 'आसुर' विवाह.

७ बलात्कारानें कन्या घेऊन जाणें हा 'राक्षस' विवाह.

८ सुप्तावस्थेंत कन्येचें हरण करणें हा 'पैशाच' विवाह.

यांतले पहिले चार विवाह पित्याच्या संमतीनें लाविलेले असल्यामुळें ते यथाशास्त्र विवाह होत. बाकीचे विवाह मातापित्यांच्या संमतीवर अवलंबून आहेत. कारण ते कन्येच्या शुल्काचे अधिकारी होत. मातापित्यांपैकीं कोणीहि एकजण नसल्यास राहिलेला दुसरा शुल्काधिकारी होतो; दुसऱ्या शुल्काची स्वतः स्त्रीच मालक होय; याखेरीज कोणीहि स्त्रीला कांहीं दिलें तर त्याच्यावर तिचाच हक्क होतो.

स्त्रीच्या उपजीविकेकरितां तोडून दिलेली वृत्ति व दागदागिने हें स्त्रीधन होय. उपजीविकेकरितां तोडून द्यावयाची रक्कम २००० हून अधिक असावी; दागिन्याला किंमतीची मर्यादा नाहीं. यास्तव आपलीं मुलें, सुना व स्त्री यांच्या निर्वाहाची तरतूद न करितां पति प्रवासास गेला असेल तर स्त्रीनें स्त्रीधनाचा उपभोग घ्यावयास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें दरवडा, आजार, दुर्भिक्ष यांचा प्रतिकार करण्यासाठीं व धर्मकार्यासाठीं पतीनें स्त्रीधनाचा उपयोग केल्यास त्यांत त्याचाहि दोष नाहीं.

ज्या नवराबायकोस मुलें झालीं असतील त्यांनीं परस्पर संमतीनें स्त्रीधनाचा खुशाल उपभोग घ्यावा. धार्मिक विवाहपद्धतीनें विवाह झालेला असला म्हणजे तीन वर्षेपर्यंत शुल्काचा उपभोग घेतल्यानंतर त्याबद्दल फिर्याद चालत नाहीं. गांधर्व किंवा आसुर पद्धतीनें विवाह झालेला असेल तर शुल्काचा उपभोग घेतला असल्यास तें सव्याज परत केलें पाहिजे. राक्षस किंवा पैशाच पद्धतीनें विवाह होऊन स्त्रीधनाचा उपभोग घेतला असल्यास ती चोरी समजावी व चोरीप्रमाणें दंड करावा. याप्रमाणें हा विवाहाचा कायदा आहे.

पतीच्या मृत्यूनंतर धर्माचरणार्थ कालक्षेप करणाऱ्या स्त्रीला तिचे दागदागिने व राहिलेलें शुल्क मिळालें पाहिजे. दागिने व शुल्क तिच्या ताब्यांत आलीं नसतील तर तीं तिला सव्याज मिळावीं; तिला दुसरें लग्न करण्याची इच्छा असल्यास सासऱ्यांकडून व नवऱ्यांकडून मिळावयाचें धन तिला विवाहकालीं मिळावें. या विवाहाचा विचार 'दीर्घ-प्रवास' प्रकरणांत सांगितला आहे.

सासऱ्याच्या इच्छेविरुद्ध जर तिनें पुनर्विवाह केला तर सासऱ्यांकडून किंवा पतीकडून मिळालेलें द्रव्य तिनें परत केलें पाहिजे. ती स्त्री जर ज्ञातिबांधवांच्या आधीन झाली तर त्या ज्ञातिबांधवांनीं श्वशुर व पति यांचें धन परत देऊन टाकावें. ती स्त्री जर नीतिमार्गानें चालत असेल तर तिचा जो पालक असेल त्यानें तिच्या स्त्रीधनाचें रक्षण करावें. वैधव्य धर्मानें वागणाऱ्या स्त्रीला आपल्या स्त्रीधनाचा उपभोग घेतां येतो. पुनर्विवाह करणाऱ्या स्त्रीला पतीनें दिलेलें धन परत करावें लागतें. पुत्रवती स्त्री पुनर्विवाह करील तर तिचें स्त्रीधन पहिल्या विवाहाच्या संततीस मिळेल.

पुत्रांचें पोषण करण्याकरितां जरी दुसरें लग्न केलें तरी तिनें पुत्रासाठीं स्त्रीधनाची अभिवृद्धि केली पाहिजे.

एखाद्या स्त्रीला अनेक पतीपासून अनेक पुत्र असतील तर त्या पुत्रांना त्यांच्या त्यांच्या पित्यानें दिलेलें स्त्रीधन मिळेल. स्त्रीनें वाटेल तसा विनियोग करावा असें म्हणून स्त्रीधन दिलें असलें, तरी तें तिनें पुत्रांकरितां राखून ठेवावें. निपुत्रिक स्त्री पातिव्रत्यानें राहिल्यास तिनें आपलें स्त्रीधन वडील माणसांच्या जवळ ठेवून आपल्या हयातीपर्यंत त्यांतून लागेल तसा खर्च करावा; कारण स्त्रीधन हें संकटकालाकरितांच असतें. तिच्या पश्चात् राहिलेलें धन भाऊबंदांना जाईल.

भर्ता जिवंत असून स्त्री मरण पावल्यास पुत्र व कन्या यांनीं स्त्रीधन वांटून घ्यावें. मुलगे नसतील तर मुलींनाच तें मिळेल व मुलीहि नसतील तर तें नवऱ्याला मिळेल.

शुल्क, आहेर, किंवा बांधवांनीं दिलेल्या इतर देणग्या या बांधवांनींच घ्याव्यां. याप्रमाणें स्त्रीधनाचा विचार झाला.

स्त्रीला पुत्र होत नसतील, मुलें जगत नसतील, किंवा ती वंध्या असेल तर पतीनें आठ वर्षें वाट पहावी; मुलें उपजत मरत असतील तर नऊ वर्षें, आणि नुसत्या कन्याच होत असतील तर बारा वर्षें वाट पहावी. त्यानंतर पुत्राची इच्छा करणाऱ्या भर्त्यानें दुसरी स्त्री वरावी. कालप्रतीक्षेचा नियम मोडिल्यास भर्त्यानें हुंडा, अर्धें स्त्रीधन आणि नुकसानभरपाई द्यावी. याशिवाय त्यानें चोवीस पणाहून अधिक दंड द्यावा.

शुल्क व स्त्रीधन परत करून अथवा जिला शुल्क व स्त्रीधन नसेल तिला नुकसान भरपाई देऊन व यथोचित पोटगीची व्यवस्था करून पुरुषानें वाटेल तितक्या स्त्रिया कराव्या. कारण स्त्रिया पुत्रप्राप्तीकरितांच असतात.

स्त्रीसमागमकालीं प्रथम पूर्वविवाहित किंवा जिला पुत्र होत आहेत तिच्याशीं समागम करावा. ऋतुकालीं समागम न केल्यास ९६ पण दंड द्यावा. जी स्त्री बाळंतपणांत असेल, व्रताचरण करीत असेल अथवा जी वंध्या, मृतपुत्रा, अतिवयस्क अशी असेल त्याचप्रमाणें जी रोगी किंवा उन्मत्त असेल तिच्याशीं संबंध ठेवूं नये. पुरुष रोगी किंवा वेडा असला तरी स्त्रीनें त्याचा संबंध टाकूं नये, परंतु जो पुरुष दुर्वर्तनी झाला, परदेशांत जाऊन राहिला, राजाचा अपराधी ठरला, जीव घेण्याचा धाक घालूं लागला, ज्ञातिभ्रष्ट झाला, किंवा क्लीब असला तर स्त्रीनें त्याचा त्याग करावा.

---

# अध्याय ६० वा.



## विवाहसंबंध.

स्त्री बाराव्या वर्षी, व पुरुष सोळाव्या वर्षीं कायदेशीर व्यवहार करावयास योग्य म्हणजे सज्ञान होतो; तदनंतर स्त्रीनें आज्ञा मोडल्यास तिला बारा पण दंड, व पुरुषानें मोडल्यास त्यास चोवीस पण दंड.

ज्या स्त्रीला अनियमित काळपर्यंत अन्नवस्त्राचा हक्क आहे तिला जरूर तेवढें अन्नवस्त्र आणि देणाराची स्थिती असेल त्या मानानें अधिक द्रव्य देण्यांत यावें; अन्नवस्त्राची मुदत ठरलेली असल्यास देणाराचें स्थितिमान पाहून ठराविक रक्कम तोडून देण्यांत यावी. तिनें शुल्क, स्त्रीधन व नवऱ्यानें दुसरी बायको केल्याबद्दलची भरपाई घेतली नसल्यासहि वरीलप्रमाणें रक्कम देण्यांत यावी.

नवऱ्यापासून निराळी होऊन स्त्री जर सासरच्या माणसाच्या घरीं किंवा स्वतंत्र राहील, तर तिला नवऱ्यावर अन्नवस्त्राची फिर्याद करितां येणार नाहीं.

स्त्रीला नागवी, निसंग, पांगळी, रांडलेकं, बटकीची कारटी असले अपशब्द न बोलतां शिक्षण देण्याचा प्रयत्न करावा; तें न साधेल तर तिच्या पाठीवर कळकाची साल, दोर किंवा चापट यांचे तीन तडाखे मारावे. या नियमाचें उल्लंघन करणारांस अब्रूनुकसानीबद्दल किंवा मारहाणीबद्दल जो दंड सांगितला आहे, त्याच्या अर्धा दंड द्यावा लागेल.

विटाळाच्या सात पाळ्या झालेली स्त्री नवऱ्यावर नाराज होऊन परपुरुषाची इच्छा करीत असेल तर तिनें ताबडतोब आपल्याला मिळालेली स्थावरजंगम जिनगी नवऱ्यास परत करून त्यास दुसऱ्या स्त्रीशीं विवाह लावावयास अनुमती दिली पाहिजे.

नवरा स्त्रीवर नाराज असेल, तर ती एखाद्या संन्यासिनीच्या घरीं किंवा कायदेशीर पालकाच्या घरीं, किंवा तिच्या माहेरच्या माणसाच्या घरीं राहिल्यास नवऱ्यानें तिला हरकत करूं नये.

बायको समागमास हरकत करिते, किंवा समानवर्णीतील पुरुषाशीं समागम करिते, असा आरोप प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं खोटा ठरल्यास नवऱ्यास बारा पण दंड होईल.

बायकोला नवरा आवडत नसला तरी नवऱ्याच्या इच्छेविरुद्ध सोडचिठी तिला मागतां येणार नाहीं; नवऱ्याला बायको आवडत नसली तरी त्यास बायकोच्या इच्छेविरुद्ध सोडचिठी मागतां येणार नाहीं, परंतु दोघांनाहि एकमेक आवडत नसतील तर मात्र सोडचिठी देतां येते. बायकोपासून जाच होतो या सबबीवर जर नवरा सोडचिठी मागत असेल तर त्याजवळ तिची जिनगी असेल ती त्यानें तिला परत द्यावी. नवऱ्यापासून जाच होतो या सबबीवर बायको सोडचिठी मागत असेल तर, त्याजवळ तिची जिनगी असेल, ती त्यानें परत देऊं नये. धर्मविवाह पद्धतीनें विवाह झालेला असल्यास, सोडचिठी देतां येत नाहीं.

नवऱ्यानें बायकोला छानछुकी किंवा मद्यपान करण्याची मनाई केली असूनहि ती जर तसें करील तर तिला तीन पण दंड होईल.

दिवसा एखाद्या स्त्रीस भेटण्याकरितां किंवा क्रीडा करण्याकरितां बाहेर गेल्यास तिला सहा पण दंड होईल. पुरुषांस भेटण्याकरितां किंवा क्रीडा करण्याकरितां गेल्यास बारा पण दंड; रात्रीं गेल्यास दुप्पट दंड.

झोंपेंत असलेल्या किंवा मदोन्मत्त झालेल्या स्त्रीस काढून आणिल्याबद्दल, तसेंच नवऱ्याला दारापर्यंत ओढीत आणिल्याबद्दल, बारा पण दंड. रात्रीं काढून आणिल्याबद्दल दुप्पट दंड.

स्त्रीपुरुष समागमेच्छेनें एकमेकांकडे खुणा करितील, किंवा एकांतांत संभाषण करितील तर स्त्रीला चोवीस पण व पुरुषाला दुप्पट दंड होईल. स्त्रीनें आपले केंस, निरीची गांठ, दांत किंवा नखें यांस हात लावून खूण केल्यास, चोरीला जो जास्तींत जास्ती दंड सांगितला आहे तो तिला होईल, व पुरुषाला अशा अपराधाबद्दल दुप्पट दंड होईल.

संशयित स्थळीं संभाषण चाललें असेल, तर दंडाऐवजीं फटक्याची शिक्षा द्यावी; स्त्रीला गांवाच्या मध्यभागीं आणून चांडालाकरवीं कुशीवर पांच फटके द्यावे; तिला वाटेल तर दर फटक्यामागें एक पण देऊन तिनें मोकळें व्हावें.

याप्रमाणें अत्याचाराचा कायदा आहे.

ज्या स्त्रीपुरुषांमध्यें आपसांत देवघेवीची सक्त मनाई आहे, ते जर आपसांत देवघेव करितील तर क्षुल्लक बाबत असल्यास बारा पण, मोठी असल्यास चोवीस पण, व सोनें किंवा सोन्याचीं नाणीं असल्यास चोपन्न पण दंड स्त्रीला होईल व पुरुषाला दुप्पट होईल.

ज्या स्त्रीपुरुषांत परस्पर सहवास निषिद्ध मानिलेला आहे ते जर आपसांत देवघेव करतील, तर त्यास वर सांगितलेल्या दंडाच्या अर्धा दंड होईल. ज्या पुरुषापुरुषांत देवघेवीची मनाई आहे, त्यांसहि व्यवहार करण्याबद्दल असाच दंड होईल.

याप्रमाणें व्यवहारांच्या मनाईचा कायदा आहे.

स्त्रीधन, नवऱ्यानें दुसरें लग्न केल्यामुळें मिळालेली भरपाईची रक्कम किंवा नवऱ्याकडून आईबापांस मिळालेलें शुल्क यांवरील स्त्रीचा हक्क राजद्रोहामुळें, अत्याचारामुळें किंवा स्वैराचरणामुळें नाहींसा होतो.

बायको नवऱ्याच्या घरांतून कारणावांचून पळून गेली, तर तिला सहा पण दंड; नवरा छळीत असल्यामुळें जर ती गेली तर दंड नाहीं. नवऱ्यानें बजावलें असूनहि जर ती पळून गेली, तर बारा पण दंड. शेजारच्या घरापलीकडे गेली असेल तर सहा पण दंड. शेजारच्या घरांत आश्रय घेतल्यास, संन्याशाकडून भिक्षा घेतल्यास किंवा व्यापाऱ्याकडून कांहीं द्रव्य घेतल्यास बारा पण दंड. नवऱ्यानें बजाविलें असूनहि असें केल्यास चोरीला जो जास्तींत जास्ती दंड आहे तो दंड देणें पडेल. आसपासच्या घरापलीकडे अगर आळीच्या पलीकडे जर ती निघून गेली, तर चोवीस पण दंड.

दुसऱ्याच्या बायकोस जर ती आपल्या घरांत थारा देईल, तर शंभर पण दंड, परंतु तिच्यावरील संकट टाळण्याकरितां तिला थारा दिल्यास दंड नाहीं. तिला नकळत, किंवा तिनें हरकत करूनहि, जर ती बायको घरीं आली, तर ही स्त्री दोषी ठरत नाहीं.

आमच्या गुरूचें असें मत आहे कीं, स्त्री जर नवऱ्याच्या नातलगांपैकीं, गांवांतील सुखवस्तु गृहस्थांपैकीं, किंवा स्वतःच्या नातलगांपैकीं एखाद्या पुरुषाच्या घरीं, अथवा पालकाच्या घरीं, तसेंच एखाद्या भिक्षुणीच्या घरीं गेली तर तो अपराध नाहीं.

यावर कौटिल्याची शंका अशी आहे कीं, आपल्या माहेरचे पुरुष सद्वर्तनी आहेत किंवा नाहींत, हें तरी साध्वी स्त्रीला कसें समजणार ?

माहेरघरीं कोणी मेलें, आजारी झालें, संकट आलें किंवा कोणी प्रसूत झालें, तर स्त्रीनें तिकडे बिलकूल जावयास हरकत नाहीं. या निमित्तानें तिला जाऊं देण्यास जो हरकत करील त्यास बारा पण दंड होईल. या निमित्तानें जाऊन ती जर दडून बसेल, तर स्त्रीधनावरील तिचा हक्क नाहींसा होईल. तिचीं माहेरचीं माणसें तिला दडवून ठेवतील तर त्यांस उरलेल्या शुल्कधनास मुकावें लागेल.

याप्रमाणें नवऱ्याचें घर सोडून स्त्री जर परगांवांस गेली तर तिला बारा पण दंड होईल; शिवाय तिला तोडून दिलेली जिनगी व दागदागिने यांवरील तिचा हक्क बुडेल.

ज्या पुरुषाबरोबर सहवास ठेवावयास हरकत नाहीं, अशाबरोबर जर ती परगांवांस जाईल, तर तिला चोवीस पण दंड होईल; कोणताहि सामाजिक हक्क तिला राहाणार नाहीं. अन्नवस्त्र मागण्याकरितां किंवा तीर्थयात्रेकरितां

जाण्यांत दोष नाहीं. पुरुषाला चोरीबद्दल जास्तींत जास्ती जो दंड आहे तो त्याला होईल. स्त्रिचें व पुरुषाचें परम साध्य एकच असून जर तीं उभयतां दुराचरणी असतील तर त्यास मध्यम दंड करावा. तिजबरोबर जाणारा मनुष्य तिचा आप्त असल्यास त्याला दंड व्हावयाचा नाहीं. पण बजावलें असूनहि जर तो तिजबरोबर जाईल तर त्यास अर्धा दंड होईल.

रस्त्यांत, मध्येंच एखाद्या गुप्त स्थळीं समागमेच्छेनें पुरुषाबरोबर जाणें अथवा संशयित व अनुचित पुरुषाबरोबर समागमेच्छेनें त्याच्या मागें जाणें म्हणजे त्याचा हात धरून पळून जाणें होय व त्याबद्दल व्यभिचाराइतका दंड होईल.

नाटकवाले, खेळवाले, भाट, कोळी, फांसेपारधी, गवळी, दारू गाळणारे वगैरे लोकांत बायकांसह प्रवास करण्याची वहिवाट आहे. त्यांच्या बायका त्या त्या पुरुषांबरोबर प्रवास करीत असल्यास अपराधी होत नाहींत.

हरकतीस न जुमानतां दुसऱ्याची बायको नेणाऱ्या अशा पुरुषास किंवा त्याबरोबर जाणाऱ्या बायकोस वरील दंडाच्या अर्धा दंड होईल. याप्रमाणें पुरुषाच्या मागें जाण्याची बाब आहे.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र स्त्रीचा नवरा जवळपास प्रवासास गेला असेल तर तिनें मूलबाळ झालें नसल्यास वर्षभर व मूलबाळ झालें असल्यास वर्षापेक्षां अधिक दिवस नवऱ्याची वाट पहावी. तिच्या अन्नवस्त्राची तरतूद झालेली असेल, तर तिनें दुप्पट काळ वाट पाहिली पाहिजे. अन्नवस्त्राची तरतूद झालेली नसेल, तर पतीच्या सुखवस्तु आप्तांनीं फक्त चार वर्षें, अथवा माहेरच्या माणसांनीं आठ वर्षें पोशिलें पाहिजे. तदनंतर तिला जें धन मिळालें असेल, तें तिजपासून घेऊन त्यांनीं तिला मर्जीप्रमाणें वागण्यास परवानगी द्यावी.

नवरा ब्राह्मण असून अध्ययनासाठीं परगांवीं गेला असेल, तर बायकोनें मूल झालें नसल्यास दहा वर्षें व झालें असल्यास बारा वर्षें वाट पहावी. नवरा क्षत्रिय असून राजाचे कामासाठीं गेला असेल, तर तिनें मरेपर्यंत वाट पहावी. मध्यंतरीं वंश नष्ट होऊं नये म्हणून क्षत्रियापासून तिला संतति झाली, तरी तिला लांछन नाहीं. सुखवस्तु आप्तांनीं तिचें पोषण करण्याचें बंद केल्यास, तिनें आपल्या पसंतीप्रमाणें दुसरा पति करावा, तो केवळ स्वतःच्या जीव वांचविण्यासाठीं किंवा संकट निवारण्यासाठीं. धर्मविवाह पद्धतीनें ज्या कुमारीचा विवाह झाला असेल, तिचा पति जर न कळवितां बाहेर गांवीं गेला असेल व त्याचें वतमान जर वरचेवर कळत असेल तर तिनें सात विटाळ वाट पहावी; कळवून बाहेर गांवीं गेला असेल व त्याचें वर्तमान कळत असेल तर वर्षभर वाट पहावी. परदेशांत गेलेला असून वर्तमान कळत नसेल तर पांच विटाळ व वर्तमान कळत असेल तर दहा विटाळ वाट पहावी. पतीपासून शुल्क धनाचा थोडासाच भाग मिळाला असेल व पतीचें वर्तमान कळत नसेल तर तीन विटाळ व वर्तमान कळत असेल तर सात विटाळ वाट पहावी. समग्र शुल्क धन मिळालें असेल, तर नापत्ता पतीची पांच विटाळ व पतीचा पत्ता असल्यास दहा विटाळ वाट पहावी. नंतर न्यायाधीशाची परवानगी घेऊन तिनें आपल्या पसंतीप्रमाणें दुसरा पती करावा. कारण ऋतुस्नात भार्येशीं गमन न केल्यामुळें धर्माचें उल्लंघन होतें असें कौटिल्याचें मत आहे.

ज्या स्त्रीचा पति पुष्कळ दिवस बाहेर आहे, संन्यासी झाला आहे, किंवा निवर्तला आहे, तिनें सात विटाळ व तिला मूलबाळ झाल असल्यास वर्षभर वाट पहावी. नंतर पतीच्या सख्या भावाशीं गमन करावें. भाऊ पुष्कळ असल्यास पतीच्या पाठच्या भावांशीं किंवा जो धार्मिक असेल किंवा तिला पोसावयास समर्थ असेल अशा धाकट्या भावांशीं किंवा ज्यास बायको नसेल त्याशीं गमन करावें. पतीला भाऊ नसल्यास त्याच्या सगोत्र बांधवांशीं किंवा दुसऱ्या आप्तांशीं गमन करावें; ते पुष्कळ असल्यास पतीचा जो जवळचा असेल त्याशीं गमन करावें असा क्रम आहे.

ह्या सर्व दायांदास टाकून विवाह लागला तर स्त्री, विवाह करणारा पुरुष, स्त्रीस देणारा, आणि विवाहास संमति देणारा यांवर संग्रहणाचा ( व्यभिचाराचा ) अपराध लागू होता.

# अध्याय ६१ वा.



## वांटणी प्रकरण; वांटणीचा क्रम.

ज्यांचे आईबाप जिवंत आहेत, अशा मुलांस बाप, आजा किंवा पणजा जिवंत असतां वांटणी मागतां येत नाहीं; त्यांच्या पश्चात् पूर्वज क्रमाप्रमाणें वडिलार्जित जिनगीची वांटणी होते. स्वकष्टार्जित जिनगीची वांटणी होत नाहीं, पण जर ती वडिलार्जित जिनगीच्या सहाय्यानें मिळविली असेल तर मात्र तिचीहि वांटणी होते.

वडिलार्जित जिनगीच्या सहाय्यानें अविभक्त कुटुंबांत जिनगी वाढली असेल तर तीन मुलगे, नातू व पणतू यांस वांटणीचा हक्क आहे; कारण चवथ्या पिढीपर्यंत वंश अविच्छिन्न राहतो. चवथ्या पिढीपलीकडील वंशजाची वांटणी सारख्या प्रमाणांत व्हावी. वडिलार्जित जिनगी नसून जे एकत्र राहतात, किंवा वडिलार्जित जिनगीची वांटणी करूनहि एकत्र राहातात त्यांनीं पुन्हां वांटणी करावी. एकत्र जिनगी ज्यांच्या सहाय्यानें वाढली असेल त्यांस तीमधून इतरांपेक्षां अधिक हिस्सा मिळला पाहिजे.

ज्यांस पुत्र नसेल त्याची जंगम जिनगी त्याच्या सख्या भावांस किंवा त्याच्याशीं एकत्र राहात असतील त्यांस व स्थावर जिनगी मुलीस मिळेल. ज्यांस पुत्र असेल त्याची जिनगी धर्मविवाह पद्धतीनें झालेल्या पुत्रांस किंवा मुलींस मिळेल. त्यांच्या अभावीं बाप जिवंत असल्यास त्यास मिळेल; बाप नसल्यास भावांस व भावाच्या मुलास मिळेल.

घरांत बाप नसून भाऊ व भावाचे मुलगे पुष्कळ असतील, तर प्रत्येकाला बापाला जो भाग मिळाला असता त्यांतला आपला हिस्सा मिळेल.

चुलत भावांचे बाप व चुलते जर अनेक असतील तर त्यांच्या बापाच्या हिश्शाप्रमाणें त्यास हिस्से मिळतील. बाप, भाऊ, व भावाचे मुलगे यांमध्यें पहिला जिवंत असल्यास दुसऱ्यांस व तिसऱ्यांस मिळणार नाहीं, व दुसरा जिवंत असल्यास तिसऱ्यांस मिळणार नाहीं.

बापानें आपल्या हयातींत जिनगीची वांटणी करतांना कोणाला जास्त देऊं नये व कारणांवाचून कोणाची वांटणी बुडवूं नये. बापाच्या पश्चात् वांटणी झाल्यास वडील असतील त्यांनीं धाकट्याकडे ते दुराचरणी नसतील तर अधिक लक्ष द्यावें.

व्यवहारयोग्य वयांत आल्यानंतर वांटणी होते; जे वयांत आले नसतील त्यांच्या वांटणीवर कसल्याहि तऱ्हेचा बोजा न ठेवितां, ती ते वयांत येईपर्यंत त्याच्या मामाच्या किंवा वृद्ध गांवकऱ्याच्या ताब्यांत द्यावी. एखादा हिस्सेदार परगांवीं गेला असल्यास त्याच्या वांटणीचीहि अशीच व्यवस्था लावावी.

लग्न झालेल्यांच्या लग्नास जितकी रक्कम खर्च झाली असेल तितकी रक्कम लग्नाकरितां म्हणून लग्न न झालेल्यांना अधिक मिळाली पाहिजे; त्याचप्रमाणें कन्यांस विवाहदानाकरितां तितकी रक्कम मिळाली पाहिजे.

कर्ज व जिनगी सारखी वांटण्यांत यावी. आचार्यांचें मत असें आहे कीं, ज्यास कांहीं नाहीं त्या कफल्लकांनीं मडकीं गाडगींसुद्धां वांटून घ्यावीं.

परंतु कौटिल्य म्हणतो 'हें सांगणें व्यर्थ आहे.' कांहीं असेल तरच त्याची वांटणी; नसेल त्याची वांटणी कोठून करणार ? वांटणी करावयाची ती चार चौघे साक्षीदार बोलावून आणून त्यांच्यासमक्ष, 'इतकी इतकी जिनगी समाईक आहे, अमक्याचा अमका अमका जादा भाग आहे' असें स्पष्टपणें सांगून करावी. वांटणी चांगली झाली नसेल, कोणाला अधिक हिस्सा गेला असेल, छपवाछपवी झाली असेल, किंवा गुप्तपणें मिळवून ठेवलेली जिनगी कळली असेल, तर पुन्हां वांटणी करावी.

ज्या जिनगीला वारस नाहीं ती राजानें घ्यावी; मात्र स्त्रीला अन्नवस्त्रासाठीं तोडून दिलेलें उत्पन्न किंवा मृताच्या क्रियेसाठीं काढून ठेवलेली रक्कम, किंवा कृपणाची ठेव हिला हात लावूं नये.

श्रोत्रिय ब्राह्मणाची जिनगी वारस नसला तरी राजानें घेऊं नये. ती तीन वेदांत निष्णात असलेल्या ब्राह्मणाला अर्पण करावी. जातिभ्रष्ट, जातिभ्रष्टाचीं मुलें आणि षंढ यांस वांटणी नाहीं. मूर्ख, वेडा, अंधळा, कुष्ठरोगी यांनाहि हिस्सा नाहीं. परंतु त्याच्या बायकोचें धन असेल, तर तें त्यांचीं अपत्यें त्यांच्यासारखीं नसतील तर त्यांना मिळेल. जातिभ्रष्टावांचून इतरांस अन्नाच्छादनाचा हक्क आहे.

जातिभ्रष्ट होण्याअगोदर लग्न झालें असेल आणि त्याचा वंश नष्ट होण्याची भीति असेल तर त्याच्या बांधवांनीं त्याकरितां पुत्रोत्पत्ती करावी, आणि त्या पुत्रांस त्याचा हिस्सा द्यावा.

---

# अध्याय ६२ वा.



## जादा वांटणी.

एका स्त्रीपासून झालेले अनेक पुत्र असतील, तर त्यांतील सर्वांत वडील पुत्रांस विशिष्ट भाग द्यावा. तो असा– ब्राह्मणांस बोकड, क्षत्रियांस घोडे, वैश्यांस गाई, बैल, शूद्रांस मेंढे. यांपैकीं जीं अंधळीं पांगळीं असतील ती मधल्या मुलांस आणि रंगीबेरंगी असतील तीं धाकट्या मुलांस द्यावीं.

चतुष्पाद जनावरें नसतील तेव्हां जडजवाहीर सोडून बाकीच्या द्रव्याचा हिस्सा वडील पुत्रांस अधिक मिळाला पाहिजे. कारण तोच पितरांच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां विधि करितो. याप्रमाणें उशनसानें विभागासंबंधीं सांगितलें आहे.

बापाच्या सामानापैकीं गाडी व अंगावरील दागिने वडील मुलास; आंथरूण, पाट, खुर्ची, जेवावयाचें कांशाचें ताट हीं मधल्या मुलांस; धान्याचे लोखंडी डबे, भांडींकुंडी, गाई व बैलगाडी धाकट्या मुलास. बाकीच्या जिनगीच्या व वाटल्यास वर निर्दिष्ट केलेल्या जिनगीच्याहि सारख्या वांटण्या कराव्या. बहिणी हिस्सेदार नाहींत; मात्र त्यांस आईच्या सामानापैकीं जेवावयाचें काश्याचें ताट व अंगावरील दागिने मिळाले पाहिजेत.

वडील मुलगा पौरुषहीन असेल तर त्याचा जो विशिष्ट भाग आहे त्याचा $\frac{१}{३}$ आणि निंद्य व्यवसाय करणारा किंवा धर्मभ्रष्ट असेल तर $\frac{१}{४}$ भाग त्यास मिळेल, आणि तो स्वेच्छाचारी असेल तर कांहीं मिळणार नाहीं. मधला व धाकटा मुलगा यांसहि हाच नियम लागू आहे. यांपैकीं जो पौरुषयुक्त असेल, त्यास वडिलाच्या विशिष्ट भागाचा अर्धा हिस्सा मिळेल.

अनेक स्त्रियांपासून झालेल्या पुत्रांत वडील कोण ? यासंबंधीं असा नियम आहे कीं, दोन स्त्रियांपैकीं एकीचे धर्मसंस्कार झालेले आहेत व दुसरीचे नाहींत किंवा दोघींचेहि कौमार्यदशेंत संस्कार झालेले नाहींत, किंवा एकीस जुळे मुलगे झाले आहेत, असें असेल, तेव्हां जो अगोदर जन्मला असेल तोच वडील समजावा.

सूत, मागध, व्रात्य व रथकार यांस जिनगीच्या मानानें म्हणजे जिनगी भरपूर असल्यास हिस्सा मिळेल; इतर जातीचे भावांस वडील भावापासून अन्नवस्त्र मिळेल, मालकी अथवा हक्क नाहीं; त्या सर्वांस सारखा भाग मिळेल.

ब्राह्मणांस चारहि वर्णाच्या स्त्रिया असल्यास, ब्राह्मण स्त्रीपासून झालेल्या पुत्रांस चार भाग, क्षत्रिय स्त्रीपासून झालेल्या पुत्रांस तीन भाग, वैश्य स्त्रीपासून झालेल्या पुत्रास दोन भाग, आणि शूद्र स्त्रीपासून झालेल्या पुत्रास एक भाग मिळेल.

क्षत्रियास क्षत्रिय, वैश्य, व शूद्र या तीन वर्णांतील, वैश्यास वैश्य व शूद्र या दोन वर्णांतील, स्त्रिया असल्यास त्यांच्या पुत्रांसहि वरील नियम लागू आहे.

ब्राह्मणाच्या क्षत्रिय स्त्रीपासून झालेल्या पुत्रास समान भाग, क्षत्रियाच्या वैश्य स्त्रीपासून व वैश्याच्या शूद्र स्त्रीपासून, झालेल्या पुत्रांस अर्धा भाग किंवा विशिष्टगुण युक्त असल्यास समान भाग.

भिन्न भिन्न वर्णांतील स्त्रियांस जर एकुलता एक पुत्र असेल, तर त्यास सर्व जिनगी मिळेल, व त्यानें बांधवांचें आणि बंधूचें पोषण करावें.

ब्राह्मणाच्या पारशव म्हणजे शूद्र स्त्रीपासून झालेल्या पुत्रांस एक भाग मिळेल. सपिंड किंवा जवळचा समानोदक यास श्राद्ध क्रिया करावी लागते म्हणून त्यास दोन भाग मिळतील; ते नसल्यास बापाचा गुरु किंवा शिष्य यांस ते मिळतील; अथवा त्या ब्राह्मणाच्या सगोत्र बांधवाकडून किंवा मातुल गोत्रांतील आप्ताकडून नियोगविधीनें त्याच्या स्त्रीस पुत्र होईल अशी व्यवस्था करावी, आणि त्या क्षेत्रज पुत्रांस तें धन द्यावें.

---

# अध्याय ६२ वा.



## पुत्रांचे विभाग.

दुसऱ्याच्या क्षेत्रांत टाकिलेलें बीज क्षेत्राच्या मालकांचें समजावें असें आमच्या गुरूचें मत आहे.

माता केवळ धारण करणारी आहे; ज्याचें रेत, त्याचेंच अपत्य समजावें असें कित्येकांचें मत आहे.

'दोघे जीवमान असल्यास, दोघांचें अपत्य समजावें,' असें कौटिल्याचें मत आहे.

जिचे धर्मसंस्कार यथाशास्त्र झाले आहेत, अशा स्त्रीपासून स्वतःला पुत्र होईल तो 'औरस पुत्र' होय. मानिलेल्या मुलीचा पुत्र औरस पुत्रासमान होय. पतीच्या सगोत्र किंवा परगोत्र आप्तांपासून नियोगविधीनें स्त्रीस झालेला तो क्षेत्रज; त्यास जन्म देणाऱ्या बापास दुसरा पुत्र नसेल तर, तोच उभयतांचा पुत्र होतो, उभयतांचें गोत्र धारण करितो, उभयतांच्या जिनगीचा वारस होतो, व उभयांची श्राद्धक्रियाहि करितो. त्याच्याचसारखा दुसरा पुत्र म्हणजे बांधवांच्या घरीं गुप्तपणें झालेला 'गूढज' पुत्र होय. बांधवांनीं टाकिलेला तो 'अपविद्ध;' त्याचे उपनयनादि संस्कार करणाऱ्याचा तो पुत्र समजावा. विवाह संस्कारापूर्वी कुमारीस झालेला पुत्र 'कानीन'; गर्भवती असतांना लग्न झालेल्या स्त्रीस जो पुत्र होतो तो 'सहोद;' पुनर्विवाहित स्त्रीचा पुत्र 'पौनर्भव.'

औरस पुत्र बापाचा किंवा बंधूचा, आजा पणजाचा समभागी होतो. दुसऱ्यांपासून जन्मलेला पुत्र संस्कार करणाराचा समभागी होतो. बंधूचा समभागी होत नाहीं.

मातापितरांनीं यथाविधि उदक सोडून दुसऱ्यास दिलेला पुत्र तो 'दत्त पुत्र' होय. त्यास वरीलप्रमाणेंच हक्क असतो. आपण होऊन किंवा बंधूच्या अनुमतीनें एखाद्याजवळ पुत्र म्हणून राहिलेला तो 'उपगत'; मानिलेला तो 'कृतक' व विकत घेतलेला तो 'क्रीत.'

औरस पुत्र झाला असतां सवर्ण पुत्रांस तिसरा हिस्सा, असवर्ण पुत्रांस फक्त अन्नवस्त्र. ब्राह्मणास खालच्या वर्णांतील स्त्रीपासून म्हणजे क्षत्रिय वर्णांतील स्त्रीपासून झालेला व क्षत्रियांस खालच्या वर्णांतील म्हणजे वैश्यवर्णांतील स्त्रीपासून झालेला व वैश्यांस शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र 'असवर्ण' होय.

ब्राह्मणास वैश्य स्त्रीपासून झालेला पुत्र अंबष्ठ, शूद्र स्त्रीपासून झालेला निषाद किंवा पारशव. क्षत्रियांस शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र उग्र, वैश्यास शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र अर्थात शूद्रच.

दुर्वृत्त पुरुषांस खालच्याच वर्णांतील स्त्रीपासून झालेला तो व्रात्य. याप्रमाणें अनुलोम पुत्रांचें खालच्या वर्णांतील स्त्रीपासून झालेल्या पुत्रांचे प्रकार आहेत.

उच्च वर्णांतील स्त्रीपासून शूद्रास झालेले पुत्र अनुक्रमें आयोगव; क्षत्त व चांडाल. वैश्यास झालेले पुत्र मागधव व वैदेहक; आणि क्षत्रियास झालेला पुत्र सूत. परंतु पुराणांतील सूत व मागध वेगळे आहेत, ते ब्राह्मण क्षत्रियाहूंनहि श्रेष्ठ होत.

उच्च वर्णांतील स्त्रीपासून झालेल्यांना प्रतिलोम म्हणतात, राजानें स्वधर्माचें उल्लंघन केलें म्हणजे ह्यांची उत्पत्ति होते. उग्र जातीच्या स्त्रीस निषाद पुरुषापासून झालेला पुत्र तो कुटक; याच्या उलट झालेला तो पुक्स. अंबष्ठ जातीच्या पुरुषापासून वैदेहिक स्त्रीला झालेला पुत्र तो वैण; याच्या उलट झालेला कुशीलव. उग्र जातीच्या पुरुषापासून क्षत्ता स्त्रीला झालेला पुत्र श्वपाक; ह्या व इतर पुत्रांस अंतराळ असेंहि म्हणतात. वैण जातींतील लोक रथकाराचा अथवा गाडी हांकण्याचा धंदा करितात. या सर्वांचे विवाहसंबंध त्यांच्या जातींतच घडतात. वाडवडिलांपासून चालत आलेल्या मार्गानें व व्यवसायानें वागणें हाच त्यांचा धर्म समजावा. किंवा त्यांनीं ( चांडालावांचून ) शूद्राचा अथवा वाटेल तर इतर कोणत्याहि हीन जातीचा धर्म स्वीकारावा.

राजा हे नियम पाळील तरच तो स्वर्गास जाईल, नाहींतर नरकास जाईल.

अंतराळास म्हणजे मिश्र संततीस समसमान भाग मिळतील.

जिनगीची वांटणी करावयाची ती त्या त्या देशांत, किंवा जातींत, किंवा व्यापारी मंडळांत, किंवा गांवांत वहिवाट चालू असेल तीप्रमाणें करावी.

---

# अध्याय ६४ वा.



## " स्थावर. "

घरासंबंधीं दाव्यास शेजाऱ्याचा पुरावा लागतो. घर, शेत, बगीचा, सेतुबंध, सरोवर, विहीर किंवा तळें यांस वास्तु म्हणतात. उभ्या खांबावर आडवे वांसे टाकून कडीपाट करितात, त्यास सेतु म्हणतात. सेतु टिकेल त्या मानानें घराची रचना करावी. नवीन घर बांधावयाचें झाल्यास दुसऱ्याच्या जागेवर अतिक्रमण करूं नये.

पाया दोन अरत्नी म्हणजे हात, किंवा तीन पावलें खोल रचावा. बाळंतिणीसाठीं दहा दिवसांपुरतीच बांधावयाच्या खोलीवांचून इतर सर्व घरांत पायखाना, मोरी, व पिण्याच्या पाण्याची विहीर असली पाहिजे.

याचें उल्लंघन करणारांस जास्तींत जास्ती दंड होईल.

उत्सवप्रसंगीं स्वतंत्र स्नानगृहें व मुखमार्जनगृहें तयार करावीं, व त्यांतील पाण्याकरितां उतार करून एक नाली काढून द्यावा; तो न दिल्यास वरील नियमाप्रमाणें दंड लागू होईल.

मोरी तीन पावलें अथवा दीड ( अरत्नी ) हात रुंद असावी; तीमधून पाणी खळखळ वाहील किंवा खालीं पडेल, असा तिला ढाळ असावा. याचें उल्लंघन झाल्यास चोपन पण दंड होईल.

एक पावलापासून किंवा ( अरत्नी ) हातापासून आरंभ करून अग्नीसाठीं, पाण्यासाठीं, जात्यासाठीं, व उखळासाठीं तीन पावलें रुंद व चार पावलें लांब अशा स्वतंत्र जागा तयार करवाव्या. तसें न केल्यास चोवीस पण दंड होईल.

दोन घरांमधील किंवा सज्ज्यांमधील उघड्या जागेचें अंतर एक किष्कु म्हणजे चार पावलें किंवा तीन पावलें असावें. घरांचीं छपरें एकमेकांपासून चार अंगुळें दूर किंवा एकमेकांस लागलेलीं असावीं. पुढील दरवाजा किष्कु म्हणजे चार पावलें रुंद असावा, व त्याच्या फळ्या उघडतांना आंत अटकाव होणार नाहीं असें करावें. उजेडाकरितां लहानशी उंच खिडकी ठेवावी. किंवा घराच्या मालकांनीं आपसांत ठरवून जसें इष्ट वाटेल तसें करावें; मात्र दुसऱ्याचें नुकसान होऊं देऊं नये.

पावसानें नुकसान होऊं नये म्हणून छपरावर किंवा माळवदावर, उडून जाणार नाहीं अशा तऱ्हेचें झांकण घालावें; त्याचप्रमाणें छपरें मोडावयाचीं नाहींत अशीं असावीं. यांचें उल्लंघन झाल्यास जास्तींत जास्ती दंड होईल.

समोरील घराच्या दरवाज्यास किंवा खिडकीस प्रतिबंध करणारांसहि वरील दंड होईल. मात्र दोन घरांमध्यें हमरस्ता किंवा गाडीरस्ता असल्यास दंड होणार नाहीं.

खड्डा, पायऱ्या, मोरी, जिना किंवा उकीरडा यापासून कोणास प्रतिबंध झाला किंवा वापरण्याच्या कामांत व्यत्यय आला, अथवा कोणाच्या भिंतीचें नुकसान होईल अशा रीतीनें पाण्याची सांडलवंड झाली, तर त्याबद्दल बारा पण दंड होईल. मलमूत्रामुळें नुकसान झाल्यास दुप्पट दंड होईल.

पाण्याकरितां गटर बांधले पाहिजे व त्यांतून ते खळखळ वाहून गेलें पाहिजे, नाहींतर बारा पण दंड होईल.

घर रिकामें करावयास सांगितलें असूनहि जो राहील, किंवा भाडेकऱ्यांस जो हांकून देईल, यांसहि वरील दंड होईल. मारहाण, चोरी, दरवडा, बायको पळवून नेणें, हा अपराध नसेल किंवा बिनहक्क उपभोग होत असेल, तर मात्र दंड नाहीं.

आपण होऊन सोडून जाणारानें वर्षाचें राहिलेलें भाडें दिलें पाहिजे.

समाईक घरांत राहणाऱ्या इसमांपैकीं जो डागडुजीचा खर्च देणार नाहीं; किंवा घरांत समाईक उपभोगास हरकत करील त्यांस बारा पण दंड होईल, जो नुकसान करील त्यास दुप्पट दंड होईल.

खास खोल्या व दिवाणखाने याखेरीज इतर सर्व खुली जागा त्याचप्रमाणें स्नानगृह व कांडणाची जागा समाईक उपभोगाकरितां असावी.

---

# अध्याय ६५ वा.



## " स्थावर विक्री. "

ज़मीनजुमला, घर वगैरे स्थावराची खरेदी जातींतील लोक, शेजारी, व धनिक या लोकांनीं या क्रमानें करावी. यांच्या अभावीं इतरांना हक्क पोंचतो; जे घर घ्यावयाचें असेल त्यासमोर शेजारच्या चाळीस कुलवान गांवकऱ्यांनीं हें घर विकावयाचें आहे असें सांगावें. शेत, बगीचा, वहिवाटीचे रस्ते, सरोवर, तळें, अथवा विहीर यांच्या तपशीलवार मर्यादा व भोगवट्याचे हक्क अमुक आहेत, अमुक किंमतीला कोणी घेणारा आहे काय, असें जवळच्या वृद्ध गांवकऱ्यांमध्यें तीनदां समक्ष पुकारावें. कोणाची हरकत नसल्यास विकत घेणारानें तें विकत घ्यावें.

चढाओढीनें किंमत वाढली, तर त्या किंमतीस विक्री करावी; वाढलेली किंमत व ठरलेली सरकारी फी सरकारी तिजोरींत भरावी. सरकारदेणें लिलांव बोलावणारानें दिलें पाहिजे.

मालक नसतांना लिलांव केल्याबद्दल चोवीस पण दंड होतो. लिलांव पुकारल्यानंतर सात रात्रीपर्यंत मालक आला नाहीं तर लिलांव बोलणारानें खरेदी करावी; देणारा घर द्यावयास नाकबूल झाला तर त्यांस दोनशें पण दंड होतो. घराशिवाय इतर ईमारतीच्या बाबतींत चोवीस पण दंड. याप्रमाणें वास्तु विक्र्यासंबंधानें नियम आहे.

दोन गांवांतील सीमेविषयीं तंटा पडल्यास, शिवारांत राहणारे लोक किंवा पांच किंवा दहा कोसांच्या टापूंतले लोक यांनीं नैसर्गिक किंवा कृत्रिम बांधांवरून तो तंटा मिटवावा.

शेतकरी, गवळी यांपैकीं वृद्ध लोक किंवा ज्यांनीं पूर्वीं वहिवाट केली असेल, असे लोक किंवा बांधाची माहिती नसलेला एक किंवा अनेक तिऱ्हाईत लोक, यांनीं सीमेचा अमुक अमुक बांध आहे असें सांगावें; व नंतर त्यांनीं वेषांतर करून त्यांस त्या सीमेकडे घेऊन जावें. वर्णिलेला सीमेचा बांध न आढळल्यास हजार दंड. त्याच बांधावर आल्यानंतर सीमेवर अतिक्रमण झालेले किंवा बांध फोडिलेला असेल तर तो अपराध करणारासहि वरील शिक्षा होईल.

ज्या स्थावरांतील बांध नाहींसा झाला आहे किंवा जे बरेच दिवस वहिवाटींत नाहींत, ते सर्वांस हितकर होतील अशा रीतीनें राजानें वांटून द्यावे.

शेताचा तंटा शेजारच्या किंवा गांवांतील वृद्ध माणसांनीं मिटवावा. त्यांचें आपसांत दुमत पडल्यास चार चौघा सज्जन व संभावित माणसाचें मत घ्यावें व नंतर वांटणी करावी, अथवा आपापसांत समसमान वांटणी करून घ्यावी. दोन्हीहि फसल्यास राजानें तें स्थावर ताब्यांत घ्यावे. ज्याचा मालक नाहींसा झाला आहे, त्याची वांटणी सर्वांस हितकर होईल अशा रीतीनें करावी.

जो बलात्कारानें दुसऱ्याचे स्थावर ताब्यांत घेईल, त्यास चोरीचा दंड द्यावा लागेल. कांहीं कारणानें दुसऱ्याचें स्थावर कबज्यांत घेणाऱ्या मनुष्यानें मालकास स्थावरासाठीं करावें लागलेलें कष्ट व चरितार्थास लागणारी रक्कम, यांचा विचार करून ठराविक भाडें दिलें पाहिजे. सीमेवर अतिक्रमण करणारांस जास्तींत जास्ती दंड आणि सीमा मोडणारास चोवीस पण दंड.

तपोवनें, गायरानें, हमरस्ते, स्मशानें, देवालयें, यज्ञभूमि, क्षेत्रस्थळें वगैरे संबंधी तंट्यास वरील नियम लागू आहे. याप्रमाणें समा ठरविण्याचे नियम आहेत.

सर्व प्रकारचे तंटे शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या साक्षीवरून मिटतात. गायरान, शेत, बगीचा, खळें, घर, गाडी व जनावरांचा गोठा यांपैकीं अनेकांस किंवा सर्वांस प्रतिबंध झाला तर उलट्या क्रमानें तंट्यांचा निकाल करावा. ब्रह्मारण्यांत, सोमारण्यांत, देवालयांत, यज्ञभूमींत, किंवा पुण्य क्षेत्रांत राहाणाऱ्या लोकांखेरीज जो कोणी सरोवरावर, विहीरीवर किंवा शेतावर आडवाटेनें जातांना, दुसऱ्याच्या शेतांत पेरलेल्या धान्याचें नुकसान करील, त्यानें नुकसान भरून दिलें पाहिजे. शेतें, बगीचे किंवा इतर इमारती यांच्या मालकांनीं परस्परांचें नुकसान केलें, तर त्यांस नुकसानीच्या दुप्पट दंड द्यावा लागेल.

मागाहून खालच्या बाजूंस बांधलेल्या तळ्यांतील पाणी वरच्या बाजूच्या तळ्यानें भिजणाऱ्या शेतांत जाऊं देतां कामा नये.

वरच्या बाजूस बांधलेल्या तळ्यांतील पाण्यास खालच्या बांधलेल्या तळ्यांत जाऊं देण्यास हरकत करूं नये. पण तीन वर्षें त्या तळ्याचा उपयोग झाला नसेल तर हा नियम लागू नाहीं. याचें उल्लंघन झाल्यास जास्तींत जास्ती दंड होईल आणि तळ्यांतील पाणी उपसून तें कोरडें करण्यांत येईल.

पांच वर्षें जें उपयोगांत आलेलें नाहीं त्या स्थावराची मालकी नाहींशी होते. मात्र कांहीं संकटामुळें उपयोगांत आलेले नसल्यास, हा नियम लागू नाहीं.

तळें, विहीर वगैरे स्थावर नवीन बांधल तर पांच वर्षेंपर्यंत कर माफ होतो; पडलेलें दुरुस्त केलें तर चार वर्षें व वाढविलें तर कर तीन वर्षें कर माफ होतो. ज्या जमिनीवर अशीं तळ्याचीं किंवा विहीरीचीं कामें चाललीं आहेत तीं गहाण किंवा खरेदी घेणारास दोन वर्षें कर माफ होतो.

पाणचक्कीनें, बैलाच्या मोटेनें, पाटाखालीं किंवा तळ्याखालीं भिजणारीं जीं शेतें, बागबगीचे वगैरे असतील, त्यांच्या मालकांनीं आणि धान्य, कडबा यांमधून किंवा दुसऱ्या उत्पन्नामधून ठोक रकमेनें, भाडेपट्ट्यानें, वांट्यानें किंवा बिनशर्त वहिवाटीनें जमीन उपभोगास घेणाऱ्यानें तळीं, विहीरी, वगैरेंची दुरुस्ती केली पाहिजे; ती दुरुस्ती त्यानें केली नाहीं तर झालेल्या नुकसानीच्या दुप्पट त्यास दंड द्यावा लागेल.

पाणी घेण्याकरितां ठरलेल्या दिवसाखेरीज भलत्याच दिवशीं पाणी घेणारास किंवा दुसऱ्याच्या शेतांत पाणी जाण्याच्या पाळीच्या दिवशीं त्याची वाट मुद्दाम बंद करणारास सहा पण दंड होईल.

---

# अध्याय ६६ वा.

## गायरानें, शेतें, व रस्ते यांचें नुकसान.

शेतीच्या कामासाठीं बांधलेल्या पाटास जो अडथळा करील किंवा त्यांची खराबी करील त्यास जास्तींत जास्ती दंड होईल.

दुसऱ्याच्या जमिनींत जो सेतु, विहीर, मठ, चैत्य, किंवा देवालयें बांधील किंवा पूर्वापार चालत आलेली धार्मिक इमारत गहाण टाकील किंवा विकील अथवा गहाण टाकवील किंवा विकावयास लावील, त्यांस मध्यम दंड; आणि खोट्या साक्षीदारास जास्तींत जास्त दंड होईल. नादुरुस्त व बिनवहिवाटीची इमारत या नियमांस अपवाद आहे.

इमारतीचा मालक नसल्यास गांवकऱ्यांनीं किंवा धार्मिक लोकांनीं तिची दुरुस्ती करावी. रस्त्यासंबंधीं नियम ' दुर्गनिवेश ' प्रकरणांत सांगितले आहेत.

लहान जनावरांची किंवा माणसांची वाट बंद करण्याबद्दल बारा पण दंड, मोठ्या जनावरांची वाट बंद करण्याबद्दल चोवीस पण दंड, हत्तीची वाट बंद करण्याबद्दल चोपन्न पण दंड, इमारतीची किंवा रानांची वाट बंद करण्याबद्दल सहाशें पण दंड, स्मशानाची किंवा गांवाची वाट बंद करण्याबद्दल दोनशें पण दंड, किल्ल्याची वाट बंद करण्याबद्दल पांचशें आणि स्थानीय किल्ल्यांत किंवा दुसऱ्या प्रांतांत किंवा गायरानांत जाण्याची वाट बंद करण्याबद्दल हजार पण दंड करावा. वरील वाटा खोल नांगरून ठेवल्याबद्दलहि वरीलप्रमाणें दंड होईल, व त्या नुसत्या नांगरून ठेवल्याबद्दल वर सांगितलेल्या दंडाचा ¼ दंड होईल.

पेरणीच्या दिवसांत शेतकरी पेरण्यास हरकत करील किंवा शेतांत राहणारा असून शेत सोडून जाईल तर त्यास बारा पण दंड होईल, परंतु आजारामुळें, संकटामुळें किंवा असल्याच कांहीं असह्य कारणामुळें त्यास तसें करावें लागलें तर दंड माफ आहे. कर देणारांनीं कर देणाराशींच गहाणाचा किंवा विक्रीचा व्यवहार करावा, ब्रह्मकर्माबद्दल ज्यांस वर्षासन असेल त्यांनीं तसलें वर्षासन असलेल्याशींच व्यवहार करावा, नाहींतर जास्तींत जास्त दंड होईल. कर देणारा मनुष्य कर न देणाऱ्या गांवांत गेल्यास त्यांसहि वरीलप्रमाणें दंड होईल. एकाद्या कर देणाऱ्या इसमाची स्थावर जिनगी दुसरा इसम कबज्यांत घेतांना त्यास पहिल्या इसमाच्या राहत्या घराखेरीज इतर सर्व भोगवटे मिळाले पाहिजेत.

जी जमीन विकतां येत नाहीं ती मालकानें पडित ठेवल्यास दुसऱ्यानें पांच वर्षांच्या करारानें त्यापासून उपभोगास घ्यावी. पांच वर्षांनंतर परत देतांना त्यानें केलेला जमीनसुधराईचा खर्च मालकानें त्यास द्यावा. कर न देणारा मनुष्य परस्थळीं राहावयास गेला असला तरी त्याची जमिनीवर मालकी कायम राहील. गांवकामगार गांवाच्या कामासाठीं बाहेरगांवीं जाईल तेव्हां त्याबरोबर गांवकऱ्यांनीं पाळीपाळीनें जावें. जे जाणार नाहींत त्यांनीं दर योजनास

दीड पण प्रमाणें दंड दिला पाहिजे. चोर किंवा वाईट चालीचा इसम याखेरीज इतर माणसांस गांवकरी गांवांतून हांकून देईल तर त्यांस चोवीस पण आणि मुख्य गांवकऱ्यांस जास्तींत जास्त दंड होईल.

गांवांतून हांकून लाविलेल्या माणसानें परत केव्हां व कसें यावें याविषयीं ' अधिगम ' प्रकरणांत व ' गांव वसाहत ' प्रकरणांत सांगितलें आहे.

गांवासभोंवतीं शंभर धनु म्हणजे सहाशें फूट अंतरावर भक्कम खांब असलेल्या धर्मशाळा करवाव्या. जनावरास चरण्यासाठीं गायरानें व मोकळें हिंडण्यासाठीं माळ जमीन असावी. गायरानांत चरून जाणाऱ्या जनावरांत उंट व म्हशी याबद्दल पाव पण; गाई, बैल, घोडे व गाढव यांचेबद्दल एक अष्टमांश पण आणि इतर क्षुद्र पशूबद्दल $\frac{1}{16}$ पण चरणावळ द्यावी. जनावरें चरून तेथेंच बसून राहिल्यास वरच्या दुप्पट फी घ्यावी. जीं गुरें गायरानांतच राहतील त्यांच्याबद्दल चौपट दर घ्यावा. देवाला सोडलेले पोळ, जिला विऊन दहा दिवस झाले नाहींत अशी गाय, म्हातारे बैल आणि वळू, यांना चराई माफ असावी.

जनावरांनीं शेतांतील पीक खाल्यास पिकाचें नुकसान अजमावून नुकसानीच्या दुप्पट दंड घ्यावा. मालकाची परवानगी न घेतां गुरें चारल्यास बारा पण दंड. दुसऱ्याच्या शेतांत गुरें सोडून निघून गेल्यास चोवीस पण दंड. बागेंतील भाजीपाला खाल्याबद्दल असाच दंड करावा. कुंपण मोडून गुरें आंत शिरल्यास दुप्पट दंड करावा; केलेल्या दंडांतला अर्धा दंड रखवालदारांस द्यावा.

घराचें अंगण किंवा खळें यांतलें धान्य खाण्यास गुरें येतील तर त्यांना इजा न होईल अशा बेतानें हांकून लावावें. मुद्दाम पाळलेल्या वनमृगांना खातांना पकडल्यास, मालकाला कळवून घालवून द्यावें.

जनावरांना दोरी किंवा चाबूक घेऊन हांकावें; इतर रीतीनें जर कोणीं त्यांस हांकून इजा करील, तर इजा करणाऱ्यांस दंड द्यावा लागेल. मालकाला कळवूनदेखील जर गुरें पुन्हां येतील, तर सर्व प्रकारें त्यांचा बंदोबस्त करावा. शेतीच्या नुकसानीसंबंधीं हा विचार झाला.

शेतकरी गांवांत येऊन राहून काम करणार नाहीं, तर गांवच्या अधिकाऱ्यांनीं त्याला दंड करावा. काम न करणाऱ्यांना अगाऊ दिलेल्या मजूरीच्या दुप्पट रक्कम द्यावी लागेल; त्याचप्रमाणें त्याच्यासाठीं झालेल्या खाण्यापिण्याच्या खर्चाच्याहि दुप्पट रक्कम त्याजपासून घ्यावी. तो जर यज्ञादि सार्वजनिक कार्यांत काम करण्याचें नाकारील तर वरच्या दुप्पट दंड घ्यावा. सार्वजनिक नाटक, खेळ, तमाशा वगैरेंत जो कोणीं आपल्या वांटणीचें काम करणार नाहीं त्याला व त्याच्या आप्तेष्टांना तें पहावयास मिळणार नाहीं; ते जर लपून छपून ऐकतील किंवा पाहतील तर त्यांना दुप्पट रक्कम द्यावी लागेल. त्याप्रमाणें सार्वजनिक हिताच्या कामांत एकाचा हुकूम इतरांनीं पाळला पाहिजे, जो न पाळील त्याला बारा पण दंड होईल. सर्वांनीं मिळून काम बिघडविल्यास त्यांपैकीं प्रत्येकांस दुप्पट दंड होईल. त्यांत जर ब्राह्मण असतील तर त्यांना आर्धा दंड करावा.

सार्वजनिक कामांत ब्राह्मणांनीं जर आपल्या वांट्याचें काम केलें नाहीं तर इतरांनीं तें करावें आणि त्याचा मोबदला ब्राह्मणाकडून घ्यावा. गांवांत, जातींत, कुलांत किंवा संघांत जे कोणीं आपलें काम न करतील त्यांसहि हाच वरील नियम लागू आहे.

जे लोक देशहिताच्या बुद्धीनें रस्त्यावर सेतु किंवा पूल बांधतात, गांवाची शोभा वाढवितात व गांवाचें रक्षण करितात त्यांवर राजानें नेहमीं मेहेरनजर ठेवावी.

---

# अध्याय ६८ वा.



## " कर्जाची वसुली. "

शंभर पणांस सव्वा पण व्याज धर्मास अनुसरून आहे. व्यापार–धंद्यांत पांच पण व्याज घ्यावें; रानांत राहणाऱ्या लोकांशीं व्यवहार करतांना दर शेंकडा दहा पण आणि समुद्रांतून परदेशाशीं व्यापार करणाऱ्यांकडून दरशेंकडा वीस पण व्याज घ्यावें. याहून अधिक व्याज घेणारा व घेऊं देणारा पूर्व साहस दंडाला पात्र होईल. साक्षीदारापैकीं प्रत्येकाला अर्धा दंड करावा. धनको आणि ऋणको यांच्या पूर्व वृत्तावर व वागणुकीवर राजाचा योगक्षेम अवलंबून असतो; म्हणून त्याचा अगोदर विचार केला पाहिजे. व्याज धान्यरूपानें ठरलें असल्यास त्याची वाढ हंगामामध्यें दिढीपेक्षां अधिक होतां कामा नये. मालावरील व्याज नफ्याच्या अर्धें असावें; व तें वर्षाचें वर्षास देण्यांत यावें. पुष्कळ दिवस बाहेर गांवीं गेल्यामुळें कितीहि व्याज थकलें असलें तरीं धनकोस मुदलाच्या दुप्पट रक्कम द्यावी. व्याज लागू होण्यापूर्वीं तें मागितल्यास किंवा चक्रवाढीनें व्याज मागितल्यास, मागणीच्या चौपट दंड करावा. मुदलाच्या चौपट रकमेची फिर्याद केल्यास खोट्या रकमेच्या चौपट दंड होईल, यापैकीं तीन भाग धनकोनें व बाकीचा एक भाग ऋणकोनें द्यावा.

जो बरेच दिवस चालणाऱ्या यज्ञांत गुंतला आहे, किंवा जो आजारी आहे अथवा जो अभ्यासासाठीं गुरुकुलांत किंवा विद्यापीठांत राहात आहे, किंवा जो अज्ञान आहे, अगर जो अकिंचन आहे त्यांजवर व्याजाचा बोजा वाढवूं नये. ऋणको कर्जाची फेड करावयास आल्यास धनको जर तें स्वीकारणार नाहीं तर त्यास बारा पण दंड होईल. कांहीं कारणानें जर त्यास स्वीकारावयाचें नसेल तर सदर रकम कोणाच्या तरी हवालीं करण्यांत यावी व तिजवरचें व्याज बंद व्हावें. दहा वर्षें ज्या कर्जाची वास्तपुस्त केली नाहीं; तें कर्ज परत देण्याचें कारण नाहीं. परंतु ऋणको जर बाल, वृद्ध, व्याधित, व्यसनी असेल किंवा देशत्याग करून गेला असेल किंवा राज्यांत धामधूम असेल तर मात्र हा मुदतीचा नियम लागू नाहीं.

मृताचें कर्ज व्याजासहित पुत्रानें किंवा मृताच्या जिनगीच्या वारसदार बांधवांनीं किंवा कर्जांतील भागीदारांनीं अथवा जामिनानें परत फेडावें. उपजीविकेसाठीं व विवाहासाठीं घेतलेलें आणि ज्या कर्जाला स्थळ किंवा मुदत निर्दिष्ट केलेली नाहीं तें पुत्रांनीं, नातवांनीं किंवा वारसदार बांधवांनीं द्यावें. इतरांवर हा बोजा बसणार नाहीं. जमीन गहाण ठेवून घेतलेल्या कर्जास स्थळाची किंवा मुदतीची अट नसली तरी तें पुत्रांनीं किंवा नातवांनीं फेडलें पाहिजे.

ज्यास अनेक कर्जें असतील त्यावर एकानें किंवा दोघांनीं एकसमयावच्छेदेंकरून फिर्यादी करूं नये; तो परस्थळीं निघून जात असेल, तर करण्यास हरकत नाहीं; परंतु तेव्हांहि त्यानें ज्याचें कर्ज अगोदर घेतलें असेल, त्याचें कर्ज आधीं द्यावें, किंवा राजाचें किंवा श्रोत्रियाचें कर्ज अगोदर द्यावें.

नवरा बायकोंत, बापलेकांत, किंवा अविभक्त भावांत कर्ज आपसांत दिलें घेतलें असेल तर तें वसूल करितां येत नाहीं.

शेतकरी व सरकारी नोकर काम करीत असतां त्यास धरितां येत नाहीं, बायको नवऱ्यानें केलेल्या कर्जाविरुद्ध तक्रार करील तर तिला धरितां येणार नाहीं, पण नवरा जर गवळी असेल किंवा अर्ध्या हिश्यानें जमीन वाहणारा असेल तर मात्र धरितां येते. बायकोच्या कर्जाबद्दल नवऱ्यास मात्र धरितां येते. नवरा स्त्रीनें केलेल्या कर्जाची तजवीज न करितां देशांतरास गेला असें सिद्ध झाल्यास सर्वांत अधिक दंड होईल, तसें सिद्ध न झालें तर साक्षीदाराच्या साक्षीवरून निकाल द्यावा.

साक्षीदार विश्वसनीय, सदाचारी व संभावित अशीं तीन माणसें पाहिजेत, किंवा उभयतांस संमत अशीं दोन असावीं. कर्जाच्या बाबतींत एकच चालणार नाहीं.

बायकोचा भाऊ, भागीदार, कैदी, धनको, ऋणको, वैरी, लुलापांगळा व शिक्षा भोगलेला मनुष्य साक्षीदार व्हावयास नालायक होय. व्यवहार करावयास अयोग्य ठरलेला मनुष्य, राजा, श्रोत्रिय ब्राह्मण, गांवकऱ्यांनीं पोसलेला मनुष्य, कोड्या, जखमी, जातिभ्रष्ट, चांडाल, निंद्य धंदा करणारा, अंधळा, बहिरा, मुका, चढेल, स्त्री व सरकारी नौकर हेहि साक्षीदार व्हावयास नालायक होत. पण फिर्याद जर त्या त्या वर्गांतच असेल तर साक्षीदार व्हावयास हरकत नाहीं. मारहाण, चोरी व बायको पळवून नेणें या फिर्यादींत वैरी, बायकोचा भाऊ व भागीदार याखेरीज इतर साक्षीदार असावे. एकांतांत झालेल्या व्यवहारांत दुरून ऐकणारी किंवा दुरून पाहणारी एकच स्त्री किंवा पुरुष साक्षीदार चालेल, मात्र तो राजा किंवा तपस्वी नसावा.

चाकराविरुद्ध मालक, शिष्यांविरुद्ध यज्ञगुरु किंवा आचार्य आणि पुत्रांविरुद्ध मातापितरें आपखुषीनें साक्ष देण्यास आल्यास ते साक्ष देण्यास लायक आहेत. यांची परस्पराविरुद्ध फिर्याद असेल, तर त्यांस सर्वांत अधिक दंड करावा. एवढा दंड द्यावयास समर्थ नसल्यास निदान पांचपट तरी घ्यावा.

याप्रमाणें साक्षीसंबंधीं प्रकरण आहे.

साक्षीदारास ब्राह्मणासमोर, जलकुंभासमोर किंवा अग्नीसमोर नेऊन उभें करावें. ब्राह्मण साक्षीदारास असें म्हणावें, "खरें सांग". क्षत्रिय अथवा वैश्य साक्षीदारास असें म्हणावें, "खोटें सांगशील तर तुला यज्ञक्रियेचें फळ मिळणार नाहीं, तूं शत्रूचें निर्दालन केल्यावरसुद्धां हातीं करवंटी घेऊन भीक मागशील." शूद्र साक्षीदारास म्हणावें, "खोटें बोलशील तर पूर्वजन्मांतील व पुढील जन्मांतील सुकृताचें फळ राजास मिळेल आणि पाप तुला लागेल. शिवाय खोटें बोलल्याबद्दल तूला शिक्षा होईल, कारण तूं जें खरें खरें पाहिलें किंवा ऐकिलें असशील तें केव्हांतरी कळणारच." तुम्हीं सर्वजण एक विचार करून सांगा. सात रात्रीं विचार करूनहि त्यांनीं खरें सांगितलें नाहीं तर त्यांस बारा पण दंड करावा; तीन पंधरवड्यांत जर सांगितलें नाहीं तर त्यापासून दाव्याची रक्कम वसूल करावी.

साक्षीदारांत फरक पडल्यास, जे सदाचारी असतील किंवा संभावित असतील त्यांच्या बहुमताप्रमाणें निकाल लावावा, नाहींतर राजानें ती रक्कम घ्यावी. फिर्यादींतील रकमेपेक्षां कमी रक्कम साक्षीदारांच्या सांगण्यांत आली तर फिर्यादीनें वाढल्या रकमेबद्दल दंड दिला पाहिजे. अधिक रक्कम सांगण्यांत आली तर ती रक्कम राजानें घ्यावी. फिर्यादी मूर्ख असेल, साक्षीदारांनीं नीट ऐकिलें नसेल, कागद चांगला लिहिला नसेल, अथवा प्रतिवादी मयत असेल, तर साक्षीची तपासणी चांगली केल्यानंतरच त्यावर विश्वास ठेवावा.

"साक्षीदाराच्या मूर्खपणानें स्थळ, मुदत व व्यवहाराचें स्वरूप याचा उलगडा झाला नाहीं, तर पूर्व, मध्यम व उत्तम दंड करावा," असें उशनसाचे अनुयायी म्हणतात.

"फिर्यादींतलि रक्कम खरी असो वा खोटी असो साक्षीदारानें खोटी साक्ष दिल्यामुळें जें नुकसान, होईल, त्याच्या दसपट त्यानें दंड दिला पाहिजे" असें मनूचे अनुयायी म्हणतात.

"मूर्खपणामुळें आपसांत जर त्यांच्यांत फरक पडला असेल तर त्यांस हाल हाल करून मारावें" असें बृहस्पतीचे अनुयायी म्हणतात !

यावर कौटिल्य म्हणतो, 'असें नव्हे, साक्षीदारांनीं खरें असेल तेंच सांगितलें पाहिजे, न सांगितल्यास चोवीस पण दंड; खोट्या व्यवहारांत साक्ष दिल्यास अर्धा पण दंड.'

जे साक्षीदार फार दूर रहात नसतील व ज्यांस यावयास फार वेळ लागणार नाहीं ते ज्यानें त्यानें आणावे. जे फार दूर राहतात किंवा जे बाहेर पडत नाहींत, ते सरकारी हुकूमानें आणावे.

# अध्याय ६९ वा.



## ठेव

कर्जाचे नियम ठेवीस लागू आहेत. शत्रूच्या किंवा रानटी लोकांच्या हल्ल्यांत एखादा प्रांत किंवा किल्ला उध्वस्त झाला असतां, किंवा दरवडेखोरांनीं गांवावर, व्यापाऱ्यांच्या तांड्यावर अथवा गवळीवाड्यावर हल्ला करून त्यांचा नाश केला असतां, किंवा अंत:कोपानें सर्व देशाची नासाडी झाली असतां किंवा गांवांत अग्नीचा भडका उडून गेल्यामुळें, अगर पूर आल्यामुळें जंगम मालसुद्धां काढणें अशक्य झालें असतां, आगीच्या लोळांत सांपडल्यामुळें ठिकाणावरील माल तसाच राहिला असतां, किंवा नाव बुडाली असतां, अथवा लुटली गेली असतां ठेव जर नष्ट झाली तर ती परत करण्याचें ( तिचा मोबदला देण्याचें ) कारण नाहीं.

ठेवीचा उपयोग करणाऱ्या ठेवीदारानें देशकालानुरूप व्याज देऊन शिवाय बारा पण दंडहि दिला पाहिजे. ठेवीचा उपभोग घेत असतां नुकसान झाल्यास तें भरून दिलें पाहिजे; शिवाय २४ पण दंड दिला पाहिजे. उपभोग न घेतां नुसतीच ठेव अन्यत्र नेण्यांत आली तरी २४ पण दंड दिला पाहिजे. ठेवीदार मेला किंवा संकटांत पडला तर ठेवीबद्दल फिर्याद चालूं नये.

ठेव गहाण टाकली, विकली किंवा गडप केली तर तिची चौपट किंमत दिली पाहिजे व या चौपट किंमतींतला पांचवा हिस्सा राजाला मिळावा. अदलाबदल केली किंवा ठेव अन्यत्र पाठविली तर तिची किंमत व तितकाच दंड भरला पाहिजे.

गहाण ठेवलेली वस्तु नाहींशी झाली, उपयोगांत आणली, विकली, गहाण टाकली किंवा हक्क नसतां वापरली तर वरील नियम लागू होतात. ज्याचा नित्य उपयोग होतो असलें गहाण नाश पावलें ही सबब चालणार नाहीं व गहाणाचा उपभोग घेत असतां व्याज आकारतां येणार नाहीं. नित्य उपयोग नसलेलें गहाण नाश पावूं शकतें व तें गहाण ठेवून घेऊन व्याज आकारतां येतें. अशा गहाणाचा उपयोग करण्याची परवानगी देऊनहि उपभोग न घेतल्यास ही सवलत जाते.

गहाण सोडवावयास आला असतां तें दिलें नाहीं तर १२ पण दंड होईल.

सावकार हजर नसेल तर गहाणाची रक्कम गांवांतील वृद्ध माणसांच्या हवालीं करून गहाण जिन्नस परत घ्यावा. किंवा त्याच वेळीं एकंदर हिशेब करावा व रकमेवरील पुढील व्याज बंद करून जिन्नस जेथें आहे तेथेंच संरक्षणाची तजवीज करून असूं द्यावा. गहाण ठेवलेल्या जिनसाची किंमत वाढली असल्यास, नुकसान होऊं नये म्हणून रिणकोनें न्यायाधिकाऱ्यांची परवानगी घेऊन संदर जिन्नस विकून टाकावी; किंवा गहाण ज्याच्या स्वाधीन आहे त्या मनुष्याच्या संमतीनें विकून टाकावी.

## स्थावर गहाण.

मेहनत करून किंवा मेहनतीवांचून फलदायी होऊं शकतें असें स्थावर गहाण गहाणाच्या व्याजाची रक्कम घेऊन व उत्पन्न उपभोगून मूळ किंमतींत नुकसान न होऊं देतां परत करण्यांत आलें पाहिजे. बिन–परवानगीनें उपभोग घेतल्यास गहाण परत करावें लागून, मुद्दलास मुकावें लागेल व शिवाय दंड द्यावा लागेल. बाकीचे नियम उघड ठेवीसारखेच होत.

आदेश म्हणजे गांवांतल्या गांवांत एखाद्याला पोंचतें करण्यासाठीं दुसऱ्याजवळ दिलेलें द्रव्य, आणि अन्वाधि म्हणजे देशांतरीं संभाळून नेण्यासाठीं हवालीं केलेलें द्रव्य यासंहि हेच नियम लागतात.

परदेशीं द्रव्य घेऊन व्यापाऱ्यांच्या तांड्याबरोबर निघालेला मनुष्य उद्दिष्ट स्थळीं जाऊन पोहोंचला नाहीं, किंवा चोरांनीं त्यास लुबाडून हांकून दिलें, तर तो जबाबदार नाहीं अथवा मध्येंच तो मेला तर त्याचे बांधवहि जबाबदार नाहींत. बाकीचे नियम उघड ठेवीसारखेच. मागून घेतलेला किंवा भाड्यानें घेतलेला जिन्नस जसा घेतलेला असेल तसाच परत केला पाहिजे.

चोरांच्या हल्ल्यांमुळें किंवा आकस्मिक आपत्तीमुळें किंवा हालचालीला प्रतिबंध झाल्यामुळें माल नाहींसा झाला अथवा कांहीं नुकसान झालें, तर त्याबद्दल जबाबदारी नाहीं. बाकीचे नियम उघड ठेवीच्या सारखेच.

गुमास्त्यांच्या व्यवहारासंबंधीं नियम म्हणजे त्यांनीं विवक्षित ठिकाणीं व योग्य वेळीं माल विकून राहिलेला माल आणि विकलेल्या मालाची किंमत व नफा मूळ मालकास दिला पाहिजे. बाकीचे नियम ठेवीच्या सारखेच.

भलत्या ठिकाणीं किंवा भलत्या वेळीं विकल्यामुळें नुकसान झाल्यास माल गुमास्त्याच्या हातीं देतेवेळीं जो दर असेल त्या दरानें होणारी किंमत व नफा दिला पाहिजे.

सांगितलेल्या दरानें माल विकणारानें नफा देण्याचें कारण नाहीं, फक्त मालाची किंमत द्यावी. मात्र भाव उतरल्यास जितकी कमी किंमत आली असेल तितकी भरून द्यावी.

मालकांच्या विश्वासास पात्र असलल्या, पूर्वीं कधीं शिक्षा न झालेल्या अशा व्यापारी मंडळांच्या नोकरांच्या व्यवहारांत माल खराब असल्यामुळें किंवा आकस्मिक आपत्तीमुळें माल नाहींसा झाला, किंवा नुकसान झालें तर किंमत देण्याचें कारण नाहीं; परंतु भलत्या ठिकाणीं किंवा भलत्या वेळीं माल विकला तर झीज, तूट व खर्च वजा जातां होणारी किंमत व नफा त्याचप्रमाणें निरनिराळ्या मालांतून राहिलेला भाग हे सर्व दिले पाहिजेत.

बाकीचे नियम बंद ठेवीच्या सारखेच. याप्रमाणें परत बोलविर विक्री करण्यासंबंधीं नियम आहेत.

बंद ठेवीचे नियम उघड्या ठेवीच्या सारखेच होत.

एकानें ठेवलेली ठेव ठेवीदार दुसऱ्यास देईल तर त्यास दंड होईल. ठेवीदारानें ठेव नाकबूल केल्यास पूर्वींची परिस्थिति व ठेव ठेवणाऱ्या इसमांचा बरेवाईटपणा यांवरून निकाल लाविला पाहिजे.

कारागीर लोक बहुधा सज्जन नसतात. ते कधीं विनाकारण ठेव ठेवणार नाहींत म्हणून कारणावांचून ठेवलेली ठेव जर नाकबूल करण्यांत येईल तर ठेव ठेवणारानें ठेव ठेवतांना भिंतीआड दडवून ठेविलेले साक्षीदार आणण्याची परवानगी मिळण्याकरितां अधिकाऱ्याची गुप्तपणें विनवणी करावी.

रानांत किंवा जलप्रवासांत एखादा वृद्ध व रोगी व्यापारी विश्वासानें दुसऱ्यापाशीं मोहोर करून गुपचुप ठेव ठेवून निघून गेला, तर त्याच्या मुलानें किंवा भावानें, त्याचें पत्र आल्यावर, ठेवीदाराकडे जाऊन ठेव मागावी; ठेव दिल्यास ठीक, न दिली तर त्यास ठेव परत द्यावी लागून, शिवाय चोरीची शिक्षा होईल.

संन्यास घेण्याच्या तयारीनें एखादा साधाभोळा मनुष्य कांहीं द्रव्य मोहोर करून कोणाच्या हवालीं करून निघून गेला, तर त्यानें कांहीं दिवसांनीं परत आल्यावर त्यापाशीं ती परत मागावी; दिल्यास ठीक, नाहीं तर त्यास ठेव परत द्यावी लागून शिवाय चोरीची शिक्षा होईल.

असें समजा कीं, एखादा खुळचट मनुष्य मोहोर केलेलें द्रव्य हातीं घेऊन रात्रीं चालला असतां, राजाचे नोकर आपणास पकडतील या भीतीनें जवळचें द्रव्य कोणाच्या हवालीं करून निघून गेला; आणि त्यास जर खरोखरच

पकडलें असलें, तर त्यानें कैदेंतून सुटल्यावर तें मागावें; दिल्यास ठीक नाहीं, तर ठेव परत द्यावी लागून शिवाय चोरीची शिक्षा होईल.

मोहर ओळखून ठेवीदाराच्या घरांतील माणसास व ठेवीदारास ठेव मागावी. न दिल्यास पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ठेव अमक्याच्या ताब्यांत कशी आली, एकंदर व्यवहार कसा झाला, फिर्यादीची सांपत्तिक स्थिती कशी आहे वगैरे बाबीसंबंधीं शहानिशा झाली पाहिजे.

दोन माणसांनीं परस्परांत केलेल्या व्यवहारासहि वरील नियम लागू आहे.

म्हणून व्यवहार आप्ताशीं असो वा इतराशीं असो तो व्यवहार मुदत, ठिकाण वगैरे तपशील स्पष्ट शब्दांत ठरवून साक्षीदारासमक्ष उघडपणें करण्यांत यावा.

---

# अध्याय ० वा.



## दास, नोकर, मजूर व त्यांचे नियम.

जो जन्मसिद्ध दास नाहीं, अशा आर्यवंशीय अज्ञानवयस्क शूद्रास त्याचा आप्त विकील किंवा गहाण ठेवील तर त्यास बारा पण दंड, वैश्यास दुप्पट, क्षत्रियास तिप्पट, व ब्राह्मणास चौपट. गहाण टाकणारा किंवा विकणारा परका असल्यास, त्याला अनुक्रमें पूर्व ४८ पासून ९६ पण दंड, मध्यम २०० पासून ५०० पण दंड, उत्तम ५०० पासून १००० पण दंड व वधाची शिक्षा; विकत घेणारास व साथीदारासहि असाच दंड.

म्लेच्छानें आपलें आपल्यास विकलें किंवा गहाण टाकलें, तर तो अपराधी नाहीं; परंतु आर्यास दासपणा कधीं येतां कामा नये.

तथापि कुटुंबावरील संकट टाळण्यासाठीं, किंवा फौजदारी, किंवा दिवाणी फिर्याद चालविण्यासाठीं किंवा दरखास्त भरण्यासाठीं आर्य जातींत एकानें दुसऱ्यास गहाण टाकून पैसे काढिले, तर त्यानें तावडतोब पैसे भरून दुसऱ्यास मुक्त करावें, त्यांतहि गहाण टाकलेला इसम अज्ञान असेल किंवा चारचौघांचा पोशिंदा असेल, तर त्यास अगोदर मुक्त करावें.

ज्यानें आपल्या राजीखुशीनें स्वतः एकदां दासपणा पतकरिला आहे तो जर गुन्हेगार ठरला, तर त्यानें जन्मभर दासच राहिलें पाहिजे. ज्यास दुसऱ्यानें गहाण टाकिलें, तो जर दोनदा गुन्हेगार ठरला, तर तोहि जन्मभर दासच राहिला पाहिजे. हे दोघे परदेशास पळून जाण्याच्या बेतांत आहेत असें एकदां जरी आढळण्यांत आलें, तरी त्यांनीं जन्मभर दासत्व भोगलें पाहिजे.

जो दासाचें धन गैरकायदा वापरील किंवा बुडवील अथवा जो दासाचे आर्यपणाचे वाजवी हक्क नष्ट करील, त्यांस अर्धा दंड.

जो कैद्यास, मेलेल्यास किंवा संकटांत पडलेल्यास किंवा रोगी माणसास गहाण घेईल, त्यास गहाण रक्कम परत मिळाली पाहिजे.

जो गहाण ठेवलेल्या इसमास प्रेत उचलावयास, किंवा विष्ठा, मूत्र किंवा उष्टें काढावयास लावील, नागवें ठेवील, मारहाण करील किंवा शिवीगाळ करील, किंवा तो इसम स्त्री असल्यास, तिजवर बलात्कार करील, तर त्यास गहाण रक्कम मिळणार नाहीं. दाई, स्वयंपाकीण, किंवा अर्धेलीनें शेती करणाऱ्या शेतकरी वर्गांतील स्त्री मजूर, हिजवर जर

सदर अत्याचार झाला, तर ती लागलींच दासपणांतून सुटली पाहिजे. कुलशीलवान दासाच्या बाबतींत वरील अपराध घडल्यास तो पळून गेला तर अपराधी होत नाहीं.

जो दाईशीं किंवा गहाण ठेवलेल्या बाईशीं तिच्या इच्छेविरुद्ध स्वतः समागम करील, त्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड, आणि दुसऱ्याकडे समागमाकरितां पाठवील, त्यास मध्यम म्हणजे २०० पासून ५०० पण दंड. जो गहाण ठेवलेल्या अविवाहित स्त्रीस स्वतः अथवा दुसऱ्या करवीं भ्रष्ट करील, त्याचा गहाण रकमेवरील हक्क नाहींसा होइल, शिवाय त्यास सदर स्त्रिस शुल्क द्यावें लागेल व शुल्काच्या दुप्पट दंड सरकारांत भरावा लागेल. आपण होऊन स्वतःस विकणाऱ्याची संतती आर्य समजावी. दासानें स्वतः मिळविलेलें किंवा वडिलार्जित जिनगीपैकीं वांट्यास आलेलें धन मालकाच्या कामांत व्यत्यय न आणितां उपभोगावें.

दासास मालकानें दिलेली रकम त्यास परत करून पुन्हां आर्य होतां येतें. जन्मदास व गहाण टाकिलेले दास यांस हेच नियम लागू.

गहाण ठेवतांना किंवा विकतांना जेवढी रकम मिळाली असेल, तेवढी रकम दासपणांतून मुक्त व्हावयाकरितां घ्यावी लागते. शिक्षा झाल्यामुळें किंवा दरखास्तीमुळें जो दास झाला असेल, त्यानें काम करून तेवढे पैसे देऊन सुटका करून घ्यावी.

एखादा आर्यवंशांतील मनुष्य लढाईंत पकडला गेला, तर त्याचेकडून कांहीं दिवस नोकरी घेऊन अथवा अर्धी रक्कम घेऊन त्याची सुटका करून द्यावी.

आपल्या घरीं जन्मलेला, वारसदारीच्या हक्कानें मिळालेला आणि विकत घेतलेला यांपैकीं एखाद्या आठ वर्षांहून कमी वयाच्या व नातलग नसलेल्या मनुष्यास जो निंद्य कर्म करण्याकरितां परदेशांत विकील किंवा गहाण टाकील, अथवा जी स्त्री दासी गर्भवती असून तिच्या बाळंतपणाची तजवीज न करितां तिला जो परदेशांत विकील किंवा गहाण टाकील, त्यास पूर्व म्हणजे ४८ पासन ९६ पण दंड. विकत घेणारास व साथीदारासहि तितकाच दंड.

योग्य रक्कम घेऊन दासास जो आर्यपणाचे हक्क देणार नाहीं, म्हणजे दास्यांतून मुक्त करणार नाहीं, त्यास बारा पण दंड; विनाकारण प्रतिबंध करणारासहि तितकाच दंड.

दासाच्या धनास दासाचे बांधव वारस होत. ते नसतील तेव्हां त्याचा मालक हाच वारस होय.

स्त्रीदासीस मालकापासून पुत्र झाल्यास, पुत्रास व त्याच्या आईस दासपणांतून तत्काळ मुक्त केलें पाहिजे. कुटुंबाचा निर्वाह चालविण्याच्या विवंचनेमुळें तिला जर दास्यांत रहाणें भाग पडलें, तर तिच्या मोबदला तिची माता, भाऊ, बहीण यांना मुक्त केलें पाहिजे.

पुरुषदासास किंवा स्त्रीदासीस एकदां रक्कम भरून सोडविल्यानंतर पुन्हां जो विकील किंवा गहाण ठेवील, त्यांस बारा पण दंड, पण तो किंवा ती आपण होऊन स्वतःस विकील किंवा गहाण ठेवील तर दंड नाहीं.

याप्रमाणें दासासंबंधानें नियम आहेत.

मजुरांच्या कामासंबंधानें ठराव करावयाचा तो आसपास राहणाऱ्या लोकांसमक्ष करावा. मजुरास बोलीप्रमाणें मजुरी मिळाली पाहिजे. मजुरी ठरविली नसेल, तेव्हां काम पाहून व वेळ पाहून योग्य ती मजुरी द्यावी, किंवा त्या दिवशींची तशा कामाची चालू मजुरी द्यावी. पूर्वीं ठराव झाला नसेल, तेव्हां शेतकऱ्यास आपण केलेल्या पिकाचा, गवळ्यास तुपाचा, व व्यापाऱ्याच्या गुमास्त्यास त्याच्या मालविक्रीच्या नफ्याचा दहावा हिस्सा मजुरी मिळाली पाहिजे. पूर्वीं ठराव जाहला असेल, तेव्हां ठरावाप्रमाणें मजुरी मिळाली पाहिजे.

चतुर कारागीर, गवई, वैद्य, भाट, स्वयंपाकीण वगैरे जे कामगार पगाराच्या आशेनें काम करितात, त्यांस

त्यांच्या सारख्यास जें मिळत असेल तें किंवा तज्ज्ञ ठरवितील तें वेतन द्यावें. मजुरीसंबंधानें निकाल साक्षीदाराच्या जबानीवरून द्यावा. साक्षीदार नसतील, तेव्हां ज्यानें काम करावयास दिलें असेल, त्याची तपासणी करावी.

मजुरी बुडविणारास मजुरीच्या दसपट दंड, किंवा सहा पण दंड आणि मजुरी घेऊन नाकबूल करणाऱ्यास किंवा काम न करणारास बारा पण किंवा मजुरीच्या पांच पट दंड.

नदीच्या पुरांत, आगींत, किंवा चोरा-वाघाच्या तावडींत सांपडलेल्या माणसानें व्याकुळ होऊन स्वतःला सोड-विण्याकरितां एखाद्यास हांक मारून आपल्या जवळचें सारें वित्त किंवा बायको किंवा मुलगा किंवा स्वतःचा जीव अर्पण करण्याचें कबूल केलें असलें, तरी त्यानें चार चौघे चतुर लोक सांगतील, तितकेंच वेतन मदत करणारास द्यावें. हाच नियम इतर कोणत्याहि अडचणींत सांपडून केलेल्या करारांतून सुटका करून घेण्याविषयीं लागू आहे.

वेश्येस उपभोगाबद्दल ठरविलेलें वेतन मिळेल; परंतु ती भलतेंच द्रव्य मागेल किंवा दुष्टबुद्धीनें वगैरे वर्तन करील तर तिला शिक्षा होईल.

---

# अध्याय ७१ वा.



## मजूर व सहकारी मंडळ्यां याचे नियम

मजूरी घेऊन जो नोकर काम करणार नाहीं त्यास बारा पण दंड करावा आणि काम संपवीपर्यंत त्यास नजर-कैदेंत ठेवावें.

जो अशक्त असेल, निंद्य काम करावयास लाविलेला असेल, रोगी असेल, अथवा संकटांत सापडलेला असेल, त्यास सवलत द्यावी; किंवा दुसऱ्याकडून काम करून घ्यावयास परवानगी द्यावी; किंवा मालकानें तें काम दुसऱ्याकडून करून घ्यावें व नुकसान होईल तर तें याजकडून भरून घ्यावें.

मालकानें दुसऱ्याकडून काम करून घेऊं नये व नोकरानें दुसऱ्याचें काम करुं नये असा करार असतांना मालक जर नोकराकडून काम करून घेणार नाहीं, किंवा नोकर जर मालकाचें काम करणार नाहीं, तर त्या अशा उभयतांसहि बारा पण दंड. अमुक काम पुरें करण्याकरितां लाविलेला मजूर जर मालकाकडून तें काम पुरें होण्यापूर्वीच दुसऱ्याकडून मजूरी घेऊन बसला असेल, तर त्यास पहिल्या मालकाच्या परवानगीशिवाय दुसरीकडे दुसऱ्या कामास लागतां येणार नाहीं.

नोकर किंवा मजूर ठरवलेलें काम करावयास तयार असून, त्यास जर मालक काम करूं देणार नाहीं, तर तें काम त्यानें केलें असें समजावें, असें आचार्य म्हणतात. यावर कौटिल्य म्हणतो—असें नव्हे; केलेल्या कामाची मजूरी मिळते; काम केलें नसल्यास मजूरी कशाची ? मालकानें मजूराकडून थोडेंसें तरी काम घेऊन पुढें बंद केलें असेल, तर तें काम पुरें झालें, असें समजावें. मजूर भलत्या ठिकाणीं किंवा भलत्या वेळीं काम करीत राहिल्यामुळें, किंवा वाकबगार नसल्यामुळें, काम मर्जीसारखें न झाल्यास, मालकानें तें खुशाल नापसंत करावें. मजूरानें जर ठरविलेल्या कामापेक्षां ( न सांगतां ) अधिक काम केलें, तर त्याचें श्रम फुकट घालवूं नयेत. मजूरसंघासहि हेच नियम लागू आहेत. मजूर-संघास ठराविक मुदतीपेक्षां सात दिवस सवलत द्यावी; तदनंतर मालकानें दुसऱ्याकडून काम पुरें करवून घ्यावें. नोकरानें

मालकाच्या परवानगीवांचून कोणत्याहि वस्तूला हात लावूं नये; ती भलतीकडे घेऊन जाऊं नये. या नियमाचें कोणा मजुरानें उल्लंघन केल्यास, चोवीस पण दंड, आणि संघानें उल्लंघन केल्यास अर्धा म्हणजे बारा पण दंड. असे मजुराचे नियम आहेत.

मजूरसंघांतील किंवा सहकारी मंडळांतील मजुरांनीं किंवा नोकरांनीं ठरविलेल्या हिश्यानें किंवा सारख्या प्रमाणानें मजूरी वांटून घ्यावी.

शेतकऱ्यांच्या किंवा कारखानदारांच्या मजुरांनीं पीक किंवा माल तयार करण्याच्या कामास सुरवात करून तें पुरें करण्यापूर्वी आजारीपणामुळें मध्येंच मजूरी मागितल्यास, काम झालें असेल त्या मानानें मजूरी दर एकास देण्यांत यावी; एखाद्या मजूरानें आपल्याबद्दल दुसरा इसम बदली दिल्यास, त्यास सगळी मजूरी देण्यांत यावी.

व्यापारी संघांतील एकादा इसम आजारी पडला तर तो ज्या वेळीं हिस्सा मागेल त्या वेळीं जेवढा नफा झाला असेल तेवढ्याचा हिस्सा त्यास द्यावा. कारण पुढील व्यापारांत नफा किंवा तोटा होईल याविषयीं कांहींच खात्री देतां येत नाहीं.

कामास सुरवात केल्यानंतर मजूर धडधाकट असून निघून जाईल, तर त्यास बारा पण दंड; कारण स्वैरपणानें काम सोडून जातां येत नाहीं.

मजुरानें काम करतांना कांहीं वस्तु चोरली तर त्यास एकदा अभय देऊन केलेल्या कामाचा पगार द्यावा; पुन्हां चोरी केल्यास कामावरून हांकून द्यावें; भयंकर अपराध केल्यास खटला करावा.

यज्ञांतील याजकांनीं विशेष दक्षिणेखेरीज इतर दक्षिणांची रक्कम ठरल्याप्रमाणें आपसांत वांटून घ्यावी, अग्निष्टोम वगैरे यज्ञांत दीक्षा घेतल्यानंतर जर याजक मेला, तर त्यास किंवा वारसास पांचवा हिस्सा मिळाला पाहिजे; 'सोम विक्रय' या विधीनंतर मेला, तर चवथा हिस्सा; 'मध्यमोपसद,' किंवा 'प्रवर्ग्योद्वासन' विधिनंतर मेला, तर दुसरा हिस्सा; 'सुत्य' यज्ञांत 'प्रातःसवना' नंतर मेला, तर पाऊण हिस्सा; 'मध्यं दिन' किंवा 'सावन' विधिनंतर मेला, तर सगळा हिस्सा मिळाला पाहिजे; कारण त्यानंतर दक्षिणा देण्याचा प्रसंग येत नाहीं.

'बृहस्पतिसवन' यज्ञाखेरीज इतर सर्व यज्ञांत दक्षिणा द्यावी लागते. अहर्गण यज्ञाच्या दक्षिणेचाहि विचार यांत आला.

मृत याजकाची दक्षिणा त्याच्या पश्चात् ज्यांस मिळाली त्यांनीं, किंवा मृत याजकाच्या वारिसदारांनीं दहा दिवसांनंतर पुढें त्या यज्ञाची परिसमाप्ति करावी; कारण यज्ञ अर्धवट राहिल्यास यजमानावर संकट येतें. म्हणून ऋत्विजांनीं तो यज्ञ समाप्त करून मग दक्षिणा घ्यावी. यज्ञ समाप्त होण्यापूर्वी यजमानानें ऋत्विजांस किंवा ऋत्विजानें यजमानास मध्येंच सोडल्यास त्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड करावा.

शंभर गाई घरांत असून अग्न्याधान न करणें, सहस्र गाईंचा मालक असून यज्ञ न करणें, सुरापान करणें, शूद्र स्त्रीशीं विवाह करणें, ब्रह्महत्या, गुरुतल्पगमन इत्यादि पापें घडणें, नेहमीं दुष्ट प्रतिग्रह करणें, चोरी करणें आणि निंद्य वर्तनाच्या लोकांचें आचार्यत्व करणें इत्यादि दोष कोणा एकामध्यें दिसून आल्यास दुसऱ्यानें त्याचा त्याग केल्यास त्यांत त्याला दोष लागत नाहीं; कारण असल्यांच्या हातून यज्ञादि कर्मांत हटकून दोष घडावयाचा.

# अध्याय ७२ वा.

## खरेदी-विक्री व करारांतून सुटका

जो दुसऱ्यास माल विकल्यानंतर तो देणार नाहीं, त्यास बारा पण दंड; पण मालांतील दोषामुळें किंवा आकस्मिक आपत्तीमुळें किंवा असह्य कारणामुळें न दिल्यास, दंड नाहीं.

नैसर्गिक दोष म्हणजे मालांतील दोष; राजाचें भय, आगीचें भय, पाण्याचें भय अथवा चोराचें भय म्हणजे आकस्मिक आपत्ति; खराब माल किंवा रोगी माणसानें बनविलेला माल म्हणजे असह्य कारण.

व्यापाऱ्यांस माल नाकारण्यास एक रात्र मुदत, शेतकऱ्यास तीन रात्री, गवळ्यास पांच रात्री, मिश्र जातींतील व उत्तम वर्णांतील लोकांस वृत्तीच्या विक्रीच्या बाबतींत सात रात्री मुदत देण्यांत यावी. लवकर खराब होणारा माल इतर ठिकाणीं खपला जाणार नाहीं म्हणन त्यानें नुकसान न होईल एवढीच माल नाकारण्यास सवलत ठेवावी. या नियमाचें उल्लंघन करणारास चोवीस पण किंवा माल विक्रीच्या किंमतीचा दहावा भाग दंड.

माल विकत घेऊन जो स्वीकारणार नाहीं, त्यास बारा पण दंड; पण मालांतलि दोषामुळें, किंवा आकस्मिक कारणामुळें किंवा असह्य कारणामुळें न स्वीकारल्यास, दंड नाहीं. विकणाराच्या बाबतींत जे मुदतीचे प्रकार तेच खरेदी करणाराच्या बाबतींतहि लागू आहेत असें समजावें.

लग्नासंबंधीं नियम पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—पहिल्या तीन वर्णांमध्यें पाणिग्रहण झालें म्हणजे नाकारणी करितां येत नाहीं, त्याचप्रमाणें विधियुक्त कर्म करणाऱ्या शूद्रांतहि करितां येत नाहीं. वधूवरांचें पाणिग्रहण झालें असलें, तरी शारीरिक दोष कळून आल्यास नाकारणी करितां येते; परंतु जो कन्येचे शारीरिक दोष न कळवितां तिचें लग्न लावील, त्यास शहाण्णव पण दंड होईल; शिवाय कन्येस मिळालेलें शुल्क व स्त्रीधन त्यास परत करावें लागेल.

वराचा दोष न कळवितां लग्न लावील, त्यास दुप्पट दंड होईल; शिवाय वधूस दिलेलें शुल्क व स्त्रीधनहि त्यास परत मिळणार नाहीं.

दोन पायांच्या व चार पायांच्या प्राण्यांविषयीं नियम पुढें लिहिल्याप्रमाणें आहेतः—

जो आपलें जनावर महारोगानें पीडिलेलें किंवा गलिच्छ असतांना तें धडधाकट, निरोगी व स्वच्छ असें सांगून विकील, त्यास बारा पण दंड.

चार पायांचा पशु परत करावयाचा झाल्यास, तीन पंधरवड्यांत, आणि दास परत करावयाचा झाल्यास एक वर्षांत परत करावा; कारण तितक्या अवधींत त्याचे गुणदोष कळून येतात. दानाच्या व्यवहारांत किंवा खरेदीविक्रीच्या व्यवहारांत देणारा व स्वीकारणारा या उभयतांसहि नुकसान पोंचणार नाहीं अशा रीतीनें समाजांतील सभासदांनीं वादाचा निकाल करावा.

---

# अध्याय ७३ वा.

## १ दिलेली देणगी केव्हां नाकारावी ?

कर्जवसुलीचे नियम देणगी परत घेण्यासंबंधानेंहि लागू आहेत. अव्यवहार्य देणगी परत घेण्यास पात्र आहे. ज्यानें आपल्याजवळ असलेलें सर्व धन, बायका, पोरें किंवा स्वतःचा देह दुसऱ्यास दान देऊं केला असेल त्याला पश्चात्ताप होऊं लागल्यास दान घेणाऱ्यानें त्यास वचनमुक्त करावें ( दान परत द्यावें ). दुष्ट मनुष्यास, किंवा अनिष्ट कार्या

करितां दिलेली देणगी, कृतघ्न किंवा उपद्रवी माणसास देऊं केलेलें द्रव्य आणि अयोग्य माणसास दिलेलें इष्ट दान परत घेण्यास पात्र आहे. मात्र या बाबतींत देणगी देणाराचें व घेणाराचें नुकसान होणार नाहीं, अशा रीतीनें चार चौघां शहाण्यांनीं तडजोड करावी.

जो कोणी दुसऱ्यास मारहाण करण्याचें किंवा बालंट घेण्याचें अगर संकट आणण्याचें भय घालून त्यापासून देणगी घेईल त्यास चोरीची शिक्षा होईल, आणि असली देणगी देणारासहि तीच शिक्षा होईल. जो कोणी दुसऱ्यास अपाय करण्याच्या कामाकरितां द्रव्य देईल, किंवा जो राजाशीं मगरूरी करील त्यास उत्तम ह्मणजे ५०० पासून १००० पण दंड करावा.

जामिनकीची रक्कम, दंडाची रक्कम, जकातीची बाकी, जुगारींत हरलेली रक्कम, दारूच्या दुकानाचें देणें, किंवा कलावंतांना देऊं केलेली बक्षिसी न देतां मनुष्य मेला तर त्याच्या पुत्रास किंवा इस्टेट घेणाऱ्या वारसदारास, त्याच्या इच्छेविरुद्ध तें वचन पुरें करण्यास लावितां येणार नाहीं.

याप्रमाणें देणगी नाकारण्यासंबंधीं नियम आहेत.

## २ बिन मालकीनें केलेली विक्री.

ज्या मनुष्याला हरवलेली वस्तु सांपडलेली आहे तो मनुष्य शोधून काढिल्यानंतर, मालकानें न्यायाधिशाकरवीं त्यास पकडावें. तो फरारी होण्याचा संभव असला, किंवा पुनः लवकर सांपडण्याचा संभव नसला, तर मालकानें स्वतः त्यास पकडून न्यायाधिशाकडे न्यावें. मालकाच्या फिर्यादीवरून न्यायाधिशानें अपराध्यास विचारावें, ‘ तुजजवळ ही वस्तु कशी आली ? ’ ‘ अमुक अमुक तऱ्हेनें मजजवळ आली विकत घेतलेली नाहीं. ’ असें तो सिद्ध करील तर त्यापासून ती वस्तू जप्त करून त्यास सोडावें; पण अमक्या माणसापासून विकत घेतली असें सांगून त्या माणसास हजर करील तर विकणारापासून वस्तूची किंमत घेऊन त्यास चोरीची शिक्षा करावी.

जो हरवलेली वस्तू घेऊन पळून जाईल, किंवा ती नाहींशी होईपर्यंत दडून बसेल, त्यास तिची किंमत द्यावी लागून शिवाय चोरीची शिक्षा होईल.

हरवलेल्या वस्तूच्या मालकानें आपली मालकी शाबीद केल्यानंतर, त्यास ती परत देण्यांत यावी; मालकी शाबीद केली नाहीं तर किंमतीच्या पांचपट रक्कम त्यापासून घ्यावी व ती सरकारांत जमा करावी.

हरवलेली वस्तु परवानगीवांचून मालकानें ताब्यांत घेतल्यास, त्यास पूर्व ह्मणजे ४८ पासन ९६ पण दंड.

हरवलेली किंवा चोरीस गेलेली वस्तु सांपडल्यावर जकात नाक्यांत ठेवून द्यावी. तीन पंधरवड्यांत कोणी आला नाहीं तर ती सरकारांत जप्त करावी किंवा आल्यास मालकास द्यावी.

मालकानें मालकी शाबीद केल्यास, द्विपादाबद्दल पांचपण, एक खुराच्या प्राण्याबद्दल चारपण, गाईह्मशी-बद्दल दोनपण लहान जनावराबद्दल पावपण, आणि जडजवाहीर व भारीहलक्या कच्च्या मालाबद्दल शेंकडा पांचपण भरपाई दंड दिला पाहिजे.

आपल्या देशांतून शत्रूनें हल्ला करून लुटलेलें द्रव्य किंवा रानटी लोकांनीं लुटून नेलेलें द्रव्य राजानें परत आणून ज्याचें त्यास परत करावें; तें द्रव्य न सांपडेल अगर तें परत आणण्यास राजा समर्थ नसेल तर त्यानें आपल्या खजिन्यांतून मालकाची भरपाई करावी, किंवा जो मनुष्य आपण होऊन परत आणावयास तयार होईल त्यास परवानगी द्यावी आणि तें त्यानें परत आणिल्यानंतर त्यास योग्य तो मोबदला द्यावा.

परदेशांतून स्वतःच्या पराक्रमानें आणलेलें द्रव्य राजा देईल तेवढेंच उपभोगावें. मात्र आर्यवंशीयांचा प्राण आणि देव, ब्राह्मण व तपस्वी यांचें द्रव्य एवढें मात्र उपभोगास मिळणार नाहीं.

याप्रमाणें बिनमालकीच्या विक्रीचे नियम आहेत.

## ३. मालकी हक्क.

देश सोडून गेलेल्या माणसांची जी जिनगी स्वदेशांत असेल तिजवर त्यांचा हक्क कायम असतो.

दुसऱ्याच्या उपभोगांत किंवा वहिवाटींत असलेली आपली जिनगी ताब्यांत न घेतां मालक जर दहा वर्षे स्वस्थ बसेल, तर तिजवर त्याचा हक्क राहाणार नाहीं. मात्र तो मालक अज्ञान, वृद्ध, रोगी किंवा संकटांत पडलेला असेल, देशांतरास गेलेला असेल किंवा राज्याच्या धामधुमींत देश सोडून गेलेला असेल तर त्याचा हक्क मुदतीच्या कायद्यानें नष्ट होणार नाहीं. राहात्या घराला बारा वर्षांच्या वहिवाटीची मुदत लागू आहे.

देशांत राजा नसतांना एकाद्याचें घर त्याचा आप्त किंवा श्रोत्रिय ब्राह्मण किंवा पाखंडी मनुष्य यांच्या ताब्यांत गेलें ह्मणून तेवढ्यानें त्याचा त्या घरावरचा हक्क नष्ट होत नाहीं. त्याचप्रमाणें उघडी ठेव, गहाण जिन्नस, बंद ठेव, भूमिगत द्रव्य, स्त्री, शींव, राजाचें द्रव्य व श्रोत्रिय ब्राह्मणाचें द्रव्य यांनाहि वरील मुदतीची अट लागू नाहीं.

आश्रमवासी व पाखंडी यांनीं परस्परांस परस्परांचा उपसर्ग लागूं नये अशा कालक्रमानें मठादिकांत वस्ती करावी. थोडासा जरी उपसर्ग पोंचला तरी पहिल्यानें पाठीमागून येणाऱ्यास जागा द्यावी. तशी तो न देईल तर त्यास घालवून दिलें जाईल.

वानप्रस्थाश्रमी, संन्यासी व ब्रह्मचारी ( अध्ययन करणारा ) यांच्या द्रव्यास गुरु, शिष्य, धर्मबंधु व सहाध्यायी वारस होत. यदाकदाचित् या बाबतींत वाद उपस्थित झालाच तर वादांत हरणाऱ्यांस सामान्यतः जितके पण दंड झाला असता, तितक्या रात्रीं त्यांस, राजाच्या कल्याणार्थ तपश्चर्या, देवाला अभिषेक, होम किंवा महाकृच्छ्र वर्धन विधि करावयास लावावें; ज्या पाखंड्याजवळ सोनें किंवा सोन्याचें नाणें नाहीं त्यांनींहि उपवास व व्रतें करून आराधना करावी. मात्र मारहाण, चोरी, दरवडा किंवा लग्नाची बायको पळवून नेणें असला अपराध त्यांचे हातून घडत नसला पाहिजे. अशा अपराधाबद्दल कायद्याप्रमाणें शिक्षाच करावी.

संन्यासी गैरवाजवी व स्वैर आचरण करील तर त्यास राजानें शिक्षा करावी; कारण धर्म अधर्मानें दूषित झाला असतां तिकडे दुर्लक्ष केलें तर तो दंडधारी राजास मारतो.

---

# अध्याय ७४ वा.



## दरोडा—चोरी.

समक्ष व जबरदस्तीनें वस्तु हरण करणें म्हणजे साहस ( दरोडा ) आणि परोक्ष वस्तु हरण करणें किंवा अनधिकारानें खर्च करणें म्हणजे स्तेय ( चोरी ) होय.

जवाहीर, हलका—भारी इतर माल किंवा जंगलांत उत्पन्न होणाऱ्या वस्तु जबरदस्तीनें हरण केल्यास, किंमती इतका दंड घ्यावा असें मनूच्या अनुयायांचें मत आहे. किंमतीच्या दुप्पट दंड घ्यावा असें उशनसाचे अनुयायी म्हणतात; पण कौटिल्याचें असें मत आहे कीं, अपराधाचें स्वरूप असेल तसा दंड करावा.

फुलें, फळें, भाजीपाला, मुळें, कांदे, शिजलेलें अन्न, चामडें, वेळू, मातीचीं भांडीं वगैरे हलक्या किंमतीच्या मालाबद्दल बारा पणांपासून चोवीस पणांपर्यंत दंड.

लोखंड, लांकूड, दोर, क्षुद्र पशु, कापड वगैरे मालाबद्दल २४ पासून ४८ पण दंड.

तांबें, पितळ, कांसें, कांच, हस्तिदंत वगैरे भारी किंमतीच्या वस्तूंबद्दल ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड करावा या दंडासच पूर्व दंड असें म्हणतात.

मोठें जनावर, मनुष्य, शेत, घर, सोन, सुवर्ण नाणीं, तलम कापड वगैरे मूल्यवान् मालाबद्दल दोनशें पासून पांचशें पणांपर्यंत दंड. यासच मध्यम दंड असें म्हणतात.

जो जबरदस्तीनें एखाद्या स्त्रीला किंवा पुरुषाला बंधनांत ठेवील किंवा ठेववील, अथवा बंधनांतून सोडण्याचें नाकारील त्यास ५०० पासून १००० पणांपर्यंत दंड करावा; यांसच उत्तम दंड म्हणतात; हें आमच्या गुरूंचें मत आहे.

दरोड्याबद्दल मीं जबाबदार आहें असें ह्मणून जो दुसऱ्यास अपराध करावयास लावितो, त्यास दुप्पट दंड करावा. 'तुला जितकें सोनें उपयोगांत आणावें लागेल तितकें मीं तुला देईन' असें सांगणाऱ्यास चौपट दंड करावा आणि या कृत्याकरितां मी तुला इतकें सोनें देईन असा करार करून जो दुसऱ्यास दरोडा घालावयास लावितो, त्यानें कराराप्रमाणें सोनेंहि दिलें पाहिजे व वरील दंडहि दिला पाहिजे, असें बृहस्पतीचे अनुयायी ह्मणतात.

मी रागांत होतों, किंवा कैफ केला होता, किंवा बेशुद्ध होतों असें जर चोर खोटेंच निमित्त सांगेल, तर त्यास वरीलप्रमाणें दंड करावा असें कौटिल्य ह्मणतो.

शंभर पणांखालीं जेव्हां दंड होतो, तेव्हां राजानें शेंकडा आठ प्रमाणें 'रूप' घ्यावें, आणि पांचशें पणांहून अधिक दंड होतो तेव्हां शेंकडा पांच प्रमाणें 'व्याजी' घ्यावी. लोकांत पापप्रवृत्ति असते, राजाहि साहजिकपणें लोभानें वाहविला जाण्याचा संभव असतो, ह्मणून हे विशेष दंड नीतीस अनुसरून नाहींत. कायद्यानें सांगितलेला तेवढाच दंड घेणें हेंच धर्मास अनुसरून आहे.

---

## अध्याय ७५ वा.



### अब्रूनुकसान.

तुच्छतापूर्वक टोंचून बोलणें, शिवीगाळ करणें, धमकी देणें, इत्यादि प्रकारांस अब्रूनुकसान किंवा बेअब्रू असें ह्मणतात.

शरीर, स्वभाव, विद्या, धंदा, व देश अशा पांच बाबतींत टोंचून बोलण्याचा दोष घडतो त्यांत पहिला प्रकार शरीरासंबंधीं आहे. एखाद्यास 'काणा' 'लंगडा' असें तुच्छतापूर्वक जो लावून बोलेल त्यास, तें खरें असल्यास, तीन पण दंड, आणि खोटें असल्यास, सहा पण दंड.

'किती सुंदर डोळे! काय सुंदर दांत!' अशी आंधळ्यालंगड्याची व्याजस्तुतीनें निंदा केल्यास, बारा पण दंड. एखाद्याला कोड लागलें आहे, वेड लागलें आहे, तो षंढ आहे वगैरे आरोप केल्यासहि तितकाच दंड.

असले अपशब्द खरे असोत, खोटे असोत वा व्याजस्तुति असोत, त्याबद्दल सारख्या स्थितींतील लोकांस बारा पणांवर दंड, ज्याविषयीं अपशब्द उच्चारले तो वरिष्ठ असेल तर उच्चारणारास दुप्पट दंड आणि कनिष्ठ असेल तर अर्धा दंड, दुसऱ्याचे स्त्रीविषयीं निंदास्पद शब्द उच्चारले असतील तर दुप्पट दंड. चुकून किंवा अमलांत किंवा गैरशुद्धींत उच्चारले असतील तर अर्धा दंड.

कोड किंवा वेड ठरविण्याकरितां वैद्याची व शेजारी रहाणाऱ्याची साक्ष घ्यावी.

षंढ आहे किंवा नाहीं, हें पहाण्याकरितां स्त्रियांची साक्ष घ्यावी, किंवा मूत्रावर फेंस उठतो किंवा काय हें पहावें, किंवा पाण्यांत विष्ठा बुडते किंवा काय हें पहावें.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, व हीन यांमध्यें खालच्यानें वरील माणसाच्या स्वभावासंबंधानें अपशब्द उच्चारल्यास तीन पणांपेक्षां अधिक दंड. वरच्यानें खालच्या माणसाच्या स्वभावासंबंधानें उच्चारल्यास दोन पणांपर्यंत दंड घ्यावा. अमुक ब्राह्मण अगदीं वाईट आहे, अशा अपशब्दाबद्दलहि वरीलप्रमाणें दंड.

विद्येवर उपजीविका करणाऱ्याच्या विद्येसंबंधानें निंदा करणें, नट, नर्तक, गवई, कारागीर, भाट इत्यादिकांच्या कौशल्यासंबंधानें व प्राज्जणूक, गांधार वगैरे देशांत रहाणाऱ्यांच्या देशवासासंबंधानें अपशब्द उच्चारल्यासहि वरील प्रमाणेंच दंड घेण्यांत यावा.

जो दुसऱ्यास ' मीं तुला असें करीन ' असें ह्मणून अंगचेष्टेनें लज्जित करवितो, त्याच्या हातून प्रत्यक्ष क्रिया घडली नसेल तर, क्रिया घडली असतां जो दंड झाला असता, त्याच्या अर्धा दंड त्यास द्यावा लागेल.

क्रिया करण्यास असमर्थ होऊन जर तो रागाची, अंमलाची किंवा गैरशुद्धीची खोटी सबब सांगेल तर त्यास बारा पण दंड. जर कोणी दुसऱ्याच्या वैमनस्यानें जळफळत असेल आणि अपाय करण्याला तो समर्थ असेल तर त्याजकडून आमरणांत जामिनकी घ्यावी.

जो एखाद्याच्या मायदेशासंबंधानें किंवा गांवासंबंधानें अपशब्द बोलेल, त्यास पूर्वदंड ह्मणजे ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड, जातीसंबंधानें किंवा समाजासंबंधानें बोलेल, तर मध्यम ह्मणजे २०० पासून ५०० पर्यंत, देवासंबंधानें किंवा देवालयासबंधानें बोलेल, तर उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पणांपर्यंत दंड भोगावा लागेल.

---

# अध्याय ७६ वा.



## मारहाण—दुखापत.

एखाद्यास स्पर्श करणें, हत्यार उगारून चाल करणें, किंवा दुखापत करणें म्हणजे मारहाण करणें होय.

बेंबीच्या खालच्या शरिराच्या भागास हातानें स्पर्श करणाऱ्यास किंवा चिखल अथवा धूळ फेंकणारास तीन पण दंड.

घाणेरड्या हातानें आणि पायानें स्पर्श करणारास, चिखल, राख किंवा धूळ फेंकणारास अथवा अंगावर थुंकणारास सहा पण दंड, शेंबूड, मूत्र, किंवा विष्ठा अंगावर टाकणाऱ्यास बारा पण दंड, बेंबीच्या वरील भागावर असले प्रयोग करणारास दुप्पट आणि डोक्यावर असले प्रकार केल्यास चौपट दंड; ही सारख्या दर्जाच्या माणसांमधील व्यवस्था होय वरिष्ठ माणसाच्या बाबतींत कनिष्ठाकडून हेंच अपराध घडल्यास दुप्पट दंड, निकृष्ट माणसाच्या बाबतींत वरिष्ठाकडून घडल्यास अर्धा दंड, व परस्त्रीच्या बाबतींत घडल्यास दुप्पट दंड; चुकून, अंमलांत किंवा गैरशुद्धींत हीं कृत्यें घडल्यास अधा दंड.

पाय कपडा हात किंवा केंस धरिल्यास सहा पणांवर दंड.

पिरगळलें, आवळून धरिलें, ढकललें, ओढलें, किंवा स्वारी भरली तर पूर्व दंड म्हणजे ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड. पाडून निघून गेल्यास अर्धा दंड.

शूद्र ब्राह्मणास ज्या अवयवानें ताडन करील तो अवयव तोडून टाकावा. नुसताच अंगावर धांवून गेल्यास त्यानें नुकसान भरपाई दिली पाहिजे. नुसत्या स्पर्शाबद्दल अर्धा दंड दिला पाहिजे.

चांडाल व इतर हीनजातीय यांस हेच नियम लागू आहेत.

हातानें मारिल्याबद्दल तीनपासून बारा पण दंड, पायानें मारिल्याबद्दल दुप्पट, तोंड सुजेल अशा रीतीनें मारल्याबद्दल पूर्व ह्मणजे ४८ पासून ९६ पण दंड. जीव जाईल अशी इजा केल्याबद्दल मध्यम दंड ह्मणजे २०० पासून ५०० पण दंड.

लांकूड, ढेंकूळ, दगड, लोखंडी कांब किंवा दोर यानें मारून दुखापत केल्याबद्दल, रक्त निघालें नसल्यास चोवीसपण, व रक्त निघालें असल्यास दुप्पट दंड. मात्र तें रक्त दूषित नसलें पाहिजे.

जो कोणी एखाद्यास रक्त न काढितांहि अर्धमेला करील किंवा हातपाय मोडील त्यास पूर्व ह्मणजे ४८ पासून ९६ पण दंड.

जो कोणी एखाद्याचा पाय किंवा हात कापील, दांत पाडील, नाक किंवा कान कापील अथवा शरीर छिन्न विच्छिन्न करील, त्यासहि वरील दंड. मात्र ज्यास अशी दुखापत झाली असेल त्यास दूषित जखमा किंवा गळवें नसलीं पाहिजेत.

मांडी किंवा मान मोडल्याबद्दल, डोळा फोडल्याबद्दल, अथवा बोलणें, हस्तपादादिकांच्या क्रिया किंवा भोजन करितां येणार नाहीं अशी दुखापत करणें याबद्दल मध्यम म्हणजे २०० पासून ५०० पण दंड. शिवाय बरें करण्याकरितां लागणारा खर्च दिला पाहिजे. अशा अपराध्यास लवकर पकडणें शक्य नसल्यास, कंटकशोधन प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें तजवीज करावी.

अनेकांनीं संगनमतानें एकाद्या मोठ्या माणसास मारल्यास कटवाल्यांपैकीं प्रत्येकास दुप्पट दंड.

आमच्या गुरूंचें मत असें आहे कीं, पुष्कळ दिवसांमागें घडलेल्या भांडणाबद्दल किंवा मारहाणीबद्दल फिर्याद चालूं नये. परंतु यावर कौटिल्य म्हणतो कीं, केव्हांहि अपराधी सुटतां कामा नये.

आमचे गुरू ह्मणतात कीं, भांडणांत जो प्रथम फिर्याद करील त्याचा पक्ष खरा; कारण त्याला दुखापत सहन झाली नाहीं ह्मणून तो धांवत आला. परंतु कौटिल्य ह्मणतो असें नव्हे, अगोदर येवो वा मागून येवो; साक्षीदार सांगतील तें खरें; साक्षीदार नसतील तेव्हां मारहाण कशी झाली काय झाली हें पाहिलें पाहिजे, किंवा भांडणाचें स्वरूप पाहिलें पाहिजे ह्मणजे खरें समजेल.

मारहाणीच्या फिर्यादींत आरोपीनें जबाब देऊन आरोप खोडून काढला नाहीं तर त्याच दिवशीं शिक्षा फर्मावावी.

भांडाभांडींत किंवा गर्दीमारामारींत चोरी करणारास सहा पण दंड.

हलक्या सलक्या मालाची नुकसानी करणारास नुकसानीची किंमत व तितकाच दंड द्यावा लागेल; भारी मालाची नुकसानी करणारास नुकसानीची किंमत व दुप्पट दंड द्यावा लागेल.

कापड, दागदागिने, सोनें, सोन्याचीं नाणीं, किंवा दुकानांतील भांडीं यांची नुकसानी करणारास नुकसानीची किंमत व पूर्वदंड ह्मणजे ४८ पासून ९६ पण दंड द्यावा लागेल.

दुसऱ्याचे भिंतीस धक्का देऊन नुकसान केलें तर तीन पण दंड, व भोंक पाडलें किंवा भिंत पाडली तर सहा पण दंड द्यावा लागून भिंत बांधून द्यावी लागेल.

दुखापत किंवा नुकसान करणारा पदार्थ एखाद्याचे घरांत फेंकल्यास बारा पण दंड व जीव घेण्याइतकी दुखापत करणारा पदार्थ फेंकल्यास पूर्व ह्मणजे ४८ पासून ९६ पण दंड.

हलक्या सलक्या जनावरांस काठी वगैरे हत्यारानें दुखापत केल्यास एक दोन पण दंड, पण रक्त निघालें तर दुप्पट दंड. हाच अपराध मोठ्या जनावराच्या बाबतींत घडल्यास दुप्पट दंड व तें बरें करण्याकरितां लागणारा खर्च द्यावा लागेल.

शहरांतील किंवा बागेंतील फुलझाडांची, फळझाडांची किंवा छायेकरितां लावलेल्या झाडांची पालवी तोडल्यास सहा पण, डहाळी तोडल्यास बारा पण दंड, मोठी थोरली फांदी तोडल्यास चोवीस पण आणि झाडाचा बुंधा तोडल्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड. झाड उपटून टाकल्यास मध्यम म्हणजे २०० पासून ५०० पण दंड.

फुलवेलीच्या किंवा फळवेलीच्या किंवा छायेकरितां लावलेल्या वेलीच्या बाबतींत, व तसेंच देवालयांतील, मठांतील, तपोवनांतील, किंवा स्मशानांतील झाडांच्या बाबतींत वरील अपराध घडल्यास अर्धा दंड.

सीमा दर्शविणारे वृक्ष, क्षेत्रांत किंवा सरकारी जंगलांत राखून ठेवलेले वृक्ष अथवा राजाच्या खास वनांतले वृक्ष यांच्या बाबतींत अपराध घडल्यास दुप्पट दंड करावा.

---

# अध्याय ७७ वा



## जुगार, सोडत आणि किरकोळ गुन्हे.

संशयास्पद रीतीनें चरितार्थ चालविणारे चोर व जुगारी शोधून काढतां यावे म्हणून द्यूताध्यक्षानें जुगार खेळण्याकरितां एक स्थळ नेमून द्यावें व त्यावांचून इतरत्र जुगार खेळणारास बारा पण दंड ठोकावा.

द्यूतासंबंधानें फिर्याद आली तर द्यूतांत जिंकणारास पूर्व दंड म्हणजे ४८ पासून ९६ पण व हरलेल्यास मध्यम म्हणजे २०० पासून ५०० पण दंड करावा; कारण स्वतः दुसऱ्याला जिंकण्याची उत्कंठा असली तरी या बालिश वृत्तीच्या इसमाला स्वतःचा पराजय मात्र सहन होत नाहीं असें गुरू म्हणतात. परंतु कौटिल्य म्हणतो हरलेल्या माणसास जर दुप्पट दंड केला, तर राजाकडे कोणीहि धांव घेणार नाहीं. जुगारी लोक बहुधा खेळामध्यें लबाडी करणारे असतात. म्हणून द्यूताध्यक्षानें खरे फांसे व कवड्याच उपयोगांत आणल्या जातील अशी तजवीज करावी.

जो कोणी बनावट फांसे अगर कवड्या वापरील, त्यास बारा पण दंड. कपटानें खेळणारापासून पूर्वदंड—४८ पासून ९६ पण दंड—घ्यावा, पैजेची रक्कम जप्त करावी, आणि लबाडीबरोबर धाकदपटशा दाखविला असेल तर त्यास चोरीबद्दल व फसवणुकीबद्दल शिक्षा करावी.

मुख्य अधिकाऱ्यानें जिंकणाऱ्याच्या पैजेच्या रकमेवर शेंकडा पांचप्रमाणें सरकारी वसूल करावा, कवड्या फांसे व इतर सामानाचें मूल्य वसूल करावें आणि पाणी दिल्याबद्दल, जागा दिल्याबद्दल, व खेळाच्या परवानगीबद्दल मोबदलाहि वसूल करावा.

सदर ठिकाणा सांपडलेल्या जिनसा अधिकाऱ्यानें जप्त करून ठेवाव्या किंवा विकून टाकाव्या. बनावट फांशांनीं खेळणारास, किंवा भलत्याच स्थळीं खेळणारास, किंवा खेळांत हातचलाखी करणारास जर द्यूताध्यक्ष हरकत करणार नाहीं, तर त्यास दुप्पट दंड होईल.

पैजेस किंवा सोडतीस हेच नियम लागू आहेत; विद्या किंवा कला या बाबतींत लागलेली पैज अपवाद समजावी.

किरकोळ अपराध येणेंप्रमाणें:—

जो मागून आणलेली वस्तु, भाड्यानें घेतलेली वस्तु, गहाण ठेवलेली वस्तु, अथवा ठेव म्हणून ठेवलेली वस्तु योग्य स्थळीं व योग्य कालीं परत देणार नाहीं, छायेखालीं फक्त एक याम म्हणजे सव्वा तास बसण्याची परवानगी असतां त्या ठिकाणीं जो अधिक वेळ बसेल, किंवा जो नदी पार करण्याबद्दल ब्राह्मणाकडून नांवेचें भाडें घेईल अथवा जो कोणी शेजाऱ्यापाजाऱ्याविरुद्ध ओरड करून दुसऱ्या लोकांस हांक मारून उगाच जमवील त्यास बारा पण दंड होईल. जो कोणी वचन दिलेली रकम देण्याचें नाकारील, जो भ्रातृपत्नीचा उपमर्द करील, दुसऱ्याच्या वेश्येशीं संबंध ठेवील, दुसऱ्यानें घेतलेला माल चढाई करून आपण घेईल, मोहोरबंद दरवाजा उघडून कोणाच्या घरांत शिरेल, शेजारपाजाऱ्याच्या चाळीस व घरांना उपद्रव देईल त्याला ५८ पण दंड करावा.

जो आपल्याच कुटुंबांतील ठेव घेऊन ती नाकबूल करील, किंवा जो स्वतंत्र रहाणाऱ्या विधवेवर अत्याचार करील, किंवा जो चांडाळ आर्यस्त्रीला स्पर्श करील, संकटाच्या वेळीं जवळ असून जो मदतीला धांवत जाणार नाहीं, किंवा जो खरें संकट नसतांना हूल उठवून उगाच लोकांना जमवील, अथवा जो देवाच्या उत्सवांत अगर पितृकार्यांत क्षपणक, बैरागी, शूद्र, किंवा जैन भिक्षुक यांना जेवावयास बोलावील, त्यास १०० पण दंड.

जो अधिकारावांचून एखाद्याची शपथेवर जबानी घेईल, अयोग्य माणसाला अधिकाराच्या कामावर नेमील, क्षुद्र पशु किंवा पोळ यांच्या पुंस्त्वाची खच्ची करील, एखाद्या दासीला औषध देऊन गर्भपात करवील, तर त्यास ४८ पासून ९६ पण दंड करावा.

बाप व मुलगा, नवरा व बायको, भाऊ व बहीण, मामा व भाचा, आणि गुरु व शिष्य यांच्यापैकीं जो दुसऱ्यास जातिभ्रष्ट नसतांना टाकून देईल, किंवा एकत्र जमून प्रवास करीत असतां एखाद्याला मध्येंच एखाद्या गांवीं सोडून पुढें जाईल त्यास पूर्व दंड होईल. वर निर्दिष्ट केलेला त्याग गांवांत न होतां रानावनांत केला जाईल तर त्यास मध्यम दंड करावा आणि हा त्याग करतांना जो दुसऱ्यास धमकी देऊन भिववील त्यास उत्तम दंड होईल. आप्तसंबंधी माणसांना या संबंधांत अर्धा दंड करावा.

जो एखाद्यास गैरकायदा अटक करील किंवा करावयास लावील, अगर एखाद्यास कायदेशीर अटकेंतून सोडवील किंवा जो अज्ञान अशा मुलास कोंडून ठेवील किंवा ठेवावयास लावील त्यास १००० पण दंड होईल. अपराधी विशिष्ट दर्जाचा असेल किंवा अपराधाचें स्वरूप भयंकर असेल तर त्या मानानें अधिक दंड करावा.

यात्रेकरू, तपस्वी, रोगी, भुकेतहानेनें पीडिलेला, दूर गांवाहून थकूनभागून आलेला, परदेशी, निष्कांचन अथवा ज्याला पूर्वींचाच दंड भरण्याची पंचाईत पडली आहे अशा लोकांवर दया दाखवावी.

देव, ब्राह्मण, तपस्वी, स्त्रिया, अज्ञान मुलें, वृद्ध, रोगी, आणि अनाथ यांनीं आपण होऊन फिर्याद दिली नाहीं तरी न्यायाधिशानें त्यांच्या तक्रारींची चौकशी करून निकाल करावा, आणि अशा खटल्यास, स्थल—कालाची किंवा भोगवट्याची सबब बाधक होणार नाहीं असें करावें.

ज्यांच्या अंगांत विद्या, बुद्धि, पराक्रम, कुल, शील, दिसून येईल त्यांना न्यायाधिकाऱ्यांनीं विशेष सन्मान द्यावा.

याप्रमाणें न्यायाधिशांनीं अपराध्यांची लबाडी शोधून काढून पक्षपात न करितां समबुद्धि ठेवून लोकांचा विश्वास संपादन करावा आणि लोकप्रिय व्हावें.

**अधिकरण तिसरें समाप्त.**



# अधिकरण ४ थें.



## अध्याय ७८ वा.

### समाजकंटकांचा बंदोबस्त.

#### कारागिरांवर देखरेख.

तीन जिल्हाधिकारी आणि तीन अमात्य ह्यांनीं देशांतील अनिष्ट लोकांचा ( कंटकांचा ) बंदोबस्त करावा.

जे संकट निवारण्यास समर्थ असतील, जे कामगारांस शिकवूं शकतील, ठेव सांभाळण्यास जे पात्र असतील, जे स्वतःच्या भांडवलावर धंदा करूं शकतील, अथवा जे कामगार संघाच्या विश्वासांतील असतील, अशा लोकांजवळ कामगारांनीं ठेव ठेवावी; संकटप्रसंगीं सदर ठेव संघानें उपयोगांत आणावी.

अमुक ठिकाणीं अमुक वेळीं व अमुक प्रकारें काम करावें असा करार असल्यास कारागिरानें तदनुसार काम करावें; अमुक ठिकाणीं, अमुक वेळीं, व अमुक प्रकारें काम करावें असा करार नाहीं या सबबीवर तो जर कामाची टंगळमंगळ करील, तर त्याच्या मजुरींतून चवथा हिस्सा कापून घ्यावा, आणि मजुरीच्या दुप्पट दंड करावा, काम मुळींच झालें नसेल, किंवा कामांत नुकसान झालें असेल तर तें त्यानें भरून दिलें पाहिजे, आकस्मिक आपत्तीमुळें जर नुकसान झालें तर हा नियम लागू नाहीं. भलत्याच तऱ्हेनें जर तो काम करील तर त्याची मजुरी बुडेल आणि त्यास मजुरीच्या दुप्पट दंड होईल.

साळी किंवा कोष्टी कामगारांनीं कापड विणतांना दहास अकरा या प्रमाणांत सूत वाढविलें पाहिजे ( खळ लावल्यानें इतकें वजन वाढावें ) विणतां विणतां जितकें सूत तुटेल, तितक्याच्या दुप्पट दंड व सुताची किंमत द्यावी लागेल. कापड विणण्याबद्दल जी मजुरी द्यावयाची ती सुताच्या किंमतीच्या प्रमाणांत द्यावी. रेशीम व ताग यांचे बाबतींत दीडपट मजुरी द्यावी. कच्चें रेशीम, लोंकर इत्यादिकांच्या वस्त्रांच्या बाबतींत दुप्पट मजुरी द्यावी. लांबी कमी झाल्यास मजुरींतून नुकसान भरून घेतलें जाईल, शिवाय मजुरीच्या दुप्पट दंड होईल, वजन कमी झाल्यास नुकसानीच्या चौपट दंड, आणि सूत बदलल्यास किंमतीच्या दुप्पट दंड पडेल.

रुंद पन्ह्याच्या कापडास हाच नियम लागू.

लोंकर साफ करतांना किंवा पिंजतांना केंस गळल्यामुळें लोंकरीचें वजन पांच पल कमी होतें.

परटांनीं लांकडी फळीवर किंवा गुळगुळीत दगडावर कपडे धुतले पाहिजेत. इतरत्र धुतल्यास कापडाच्या नुकसानीबद्दल नुकसान भरून द्यावें लागेल, शिवाय सहा पण दंड द्यावा लागेल. परीट जर ' मुद्गर ' छापाच्या कपड्याखेरीज इतर कपडा वापरील तर त्यास तीन पण दंड द्यावा लागेल. दुसऱ्याचा कपडा विकला, भाड्यानें दिला किंवा गहाण टाकला तर बारा पण दंड; बदलला तर किंमतीच्या दुप्पट रक्कम आणि कपडा दिला पाहिजे.

जाईच्या फुलासारखा पांढरा शुभ्र करण्याकरितां दिलेला कपडा किंवा दगडावर आपटून मळ काढून देण्याकरितां दिलेला कपडा, किंवा मूळ रंग आणण्याकरितां दिलेला कपडा, किंवा नुसता धुवून साफ करण्याकरितां दिलेला स्वच्छ कपडा. हे उलट्या क्रमानें एक ते चार रात्री नंतर परत करावे. फिका रंग देण्याकरितां दिलेला कपडा पांच दिवस, निळा रंग देण्याकरितां दिलेला कपडा सहा दिवस, आणि फुलाचा रंग, राखी रंग, केशरी रंग, किंवा

आवाशाई रंग देण्याकरितां दिलेला कपडा त्याचप्रमाणें जो रंग देण्यास विशेष चातुर्य खर्चून श्रम व काळजी घ्यावी लागते असा रंग देण्याकरितां दिलेला कपडा सात दिवस ठेवावा. तदनंतर मजुरी मिळणार नाहीं.

रंगासंबंधानें वाद उपस्थित झाला असल्यास चारचौघां विश्वसनीय तज्ज्ञांकडून निकाल लावून ते सांगतील तें वेतन द्यावें.

भारी कपड्याबद्दल धुणावळ एक पण, मध्यम कपड्याबद्दल अर्धा पण व हलक्या कपड्याबद्दल पाव पण, जाड्या भरड्या कपड्याबद्दल एक दोन माष, तांबड्या कपड्याबद्दल दुप्पट प्रमाण. पहिल्या धुण्यास तांबड्या कपड्याचा रंग चौथा हिस्सा व दुसऱ्या धुण्यास पांचवा हिस्सा उतरतो. पुढील प्रमाण यावरून समजावें.

परटांचेच नियम शिंप्यांस लागू आहेत.

सोनारानें संशयित वर्तनाच्या माणसापासून चौकशी न करितां सोनें किंवा रुपें मूळ स्वरूपांत खरेदी केल्यास बारा पण आणि पालटलेल्या स्वरूपांत खरेदी केल्यास चोविस पण दंड. चोरापासून घेतल्यास अठ्ठेचाळीस पण दंड, चोरून गाळलेलें सोनें रुपें थोडक्या किंमतींत घेतल्यास चोरीचा दंड. घेतलेल्या वस्तूचा आकार बदलून तिला निराळा आकार दिल्यासहि वरील दंड. सुवर्णनाण्यांतून एक माष चोरून काढिल्याबद्दल दोनशें पण दंड व रुप्याच्या धरणामधून एक माष चोरून काढिल्याबद्दल बारा पण दंड. पुढील प्रमाण यावरून समजावें. सोनारानें 'अपसारण' प्रयोगानें सुवर्णांतून सर्व सोनें काढून घेतल्यास, किंवा अन्य तऱ्हेनें हीन धातूचें मिश्रण केल्यास पांचशें पण दंड. अशा प्रकारें सुवर्णास किंवा धरणास हीन केलें कीं काय याची परीक्षा अग्रचादिकांनीं करावी.

रुप्याचें धरण नाणें पाडण्याची मजुरी एक माष व सुवर्णनाणें पाडण्याची मजुरी सुवर्णाचा आठवा भाग. कामगार विशेष चतुर असल्यास दुप्पट मजुरी द्यावी. यावरून पुढील प्रमाण समजावें.

तांबें, पितळ, कांसें, वैकृंतक, व आरकूट यांचे पदार्थ तयार करण्याची मजुरी शेंकडा पांच अशी आहे. तांबें आटतांना त्यांत $\frac{१}{१०}$ झीज येते. वजनांत एक पळ कमी आल्यास नुकसानीच्या दुप्पट दंड दिला पाहिजे. पुढील प्रमाण यावरून समजावें.

शिसें व कथील यांत $\frac{१}{२०}$ झीज येते; याची मजुरी दर पलास एक काकिणी अशी आहे. पोलादाची झीज $\frac{१}{५}$ होते. ह्याची मजुरी दर पलास दोन काकिणी. पुढील प्रमाण यावरून समजावें.

नाण्यांवरील सरकारी अधिकाऱ्यानें बाजारांत चालू असलेलें नाणें स्वीकारिलें नाहीं किंवा न चालणारें नाणें स्वीकारिलें तर बारा पण दंड. नाणें पाडण्याची मजुरी शेंकडा पांच दिली म्हणजे कोणासहि नाणें पाडून द्यावें. एका पणांतून एक माष धातु काढून घेणारास बारा पण दंड. पुढील प्रमाण यावरून समजावें.

खोटें नाणें पाडल्याबद्दल, पाडविल्याबद्दल व स्वीकारल्याबद्दल किंवा चालविल्याबद्दल हजार पण दंड आणि तें सरकारी तिजोरींत भरल्याबद्दल वधाची शिक्षा.

रस्ते झाडणारास जें सांपडेल, त्याचा एक हिस्सा त्याचा व बाकी दोन हिस्से राजाचें. रत्न सांपडल्यास तें राजास दिलें पाहिजे; न दिल्यास उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड.

खाण रत्नें किंवा भूमिगत द्रव्य ज्यास सांपडेल त्यानें राजास वर्दी देऊन त्यांपैकीं $\frac{१}{६}$ भाग आपण ठेवावा; वर्दी देणारा जर नोकर असला तर त्यास $\frac{१}{१२}$ भाग मिळेल. सदर खाणीची, रत्नाची किंवा भूमिगत द्रव्याची किंमत जर १००००० पणांपेक्षां अधिक असेल तर तें राजासच मिळालें पाहिजे; किंमत यापेक्षां कमी असेल तर त्या माणसास $\frac{१}{३}$ मिळेल.

एखादा सत्त्वस्थ नागरिक वाडवडिलांनीं ठेवलेल्या भूमिगत द्रव्यावर आपली मालकी शाबीत करील, तर त्यास तें सर्व द्रव्य मिळालें पाहिजे. मालकी शाबीत केली नाहीं तर त्यास ५०० पण दंड होईल. चोरून ठेवील तर १००० पण दंड होईल.

जर वैद्यानें अमुक माणूस अमक्या रोगानें प्राणांतिक अवस्थेंत आहे अशी सूचना न देतां औषधोपचार सुरू केले व रोगी मेला तर त्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड; आणि रोगी वैद्याच्या हलगर्जीपणामुळें मेला, तर मध्यम म्हणजे २०० ते ५०० दंड. वैद्यानें भलतेंच कडक औषध दिल्यामुळें रोगी मेला तर त्यावर दंडपारुष्य अथवा जबर दुखापत केल्याचा अपराध लागू होईल.

भाट, गोंधळी इत्यादिकांनीं पावसाळ्यांत एका गांवींच रहावें. कोणाकडून वाजवीपेक्षां अधिक मजुरी घेऊं नये. किंवा कोणाशीं मजुरीकरितां तंटत बसूं नये. या नियमांचें उल्लंघन केल्यास बारा पण दंड होईल. कोणाचा देश, जात, गोत, धंदा, विद्या किंवा गुप्तव्यवहार यांची थट्टा न करितां त्यांनीं मनरंजन करावें.

भाट वगैरेंचे नियम चारण व भिक्षुक यास लागू आहेत. यांच्या म्हणजे भाट, चारण इत्यादिकांच्या हातून अपराध घडल्यास त्यास त्या अपराधाबद्दल जितके पण दंड झाला असता, तितके फटके वेतानें मारावे.

इतर कारागिरांस वेतन वरील नियमाप्रमाणें ठरवावें. वाणी, उदमी, कारागीर, गवई, भिक्षुक, खुषमस्करे किंवा गारुडी व जादुगार, जे वस्तुतः चोर असून ज्यांची चोरांत गणना होत नाहीं, अशांपासून देशांतील लोकांस पीडा होणार नाहीं अशी खबरदारी घेतली पाहिजे.

---

# अध्याय ७९ वा.



## व्यापाऱ्यांपासून प्रजेचें रक्षण.

व्यापारखात्यावरील मुख्य अधिकाऱ्यानें बाजाराचे जागीं माल आला असतां, जुन्या मालाचा मालकी हक्क मालकानें सिद्ध केल्यानंतर तो विकण्यास किंवा विक्रीकरितां ठेवून घेण्यास परवानगी द्यावी.

लबाडी होऊं नये म्हणून वजनें व मापें तपासून घ्यावीं. ' परिमाणी ' व ' द्रोण ' या मापांत अर्धपल फरक असल्यास चालेल. पण एक पल फरक असल्यास बारा पण दंड, अधिक फरकाबद्दल वरील प्रमाणांत दंड वाढवावा. वजनांत एक कर्ष कमजास्त असल्यास चालेल; दोन कर्ष फरक पडल्यास सहा पण दंड. हेंचप्रमाण अधिक फरक पडल्यास त्यासहि लागू करावें. ' आढक ' वजनांत अर्ध कर्ष फरक क्षम्य; अधिक फरक असल्यास तीन पण दंड. हेंच प्रमाण पुढेंहि समजावें. याखेरीज इतर वजनें व मापें आहेत, त्यासंबंधानें वरील प्रमाणावरून दंड ठरवावेत.

भारी वजनानें किंवा मापानें माल विकत घेऊन कमी वजनानें किंवा मापानें विकील, त्यास वरच्या दुप्पट दंड. एक पण किंमतीचा माल मोजून किंवा तोलून द्यावयाचा असेल तेव्हां मालांत $\frac{१}{८}$ चोरून ठेविल्यास ( कमी दिसल्यास ) ९६ पण दंड.

लांकडी व लोखंडी माल, जवाहीर, दोर, कातडी माल, मातीच्या जिनसा, कापड, वल्कल किंवा लोंकरी कापड, वगैरे माल खरोखर हलका असून भारी किंमतीचा म्हणून विकला किंवा विक्रीस ठेवला तर किंमतीच्या आठपट दंड.

जो व्यापारी माल हलका असून तो भारी आहे असें भासवील, ज्या ठिकाणीं तयार झालेला नाहीं त्या ठिकाणींच तयार झालेला आहे असें सांगेल, भेसळ केलेला असून शुद्ध आहे असें म्हणेल, किंवा मालाची अदलाबदल करून माल विकील किंवा विक्रीला ठेवील त्यास नुकसान भरपाई करून वरतीं ५४ पण दंड द्यावा लागेल.

एका पणाची किंमत कमी केल्याबद्दल दोन पण दंड, व शंभर पणांची किंमत कमी केल्याबद्दल दोनशें पण दंड, यांवरून किंमतीच्या मानानें दंड वाढविण्याचें प्रमाण समजून येईल.

जे व्यापारी संघ करून काम करीत असलेल्या मजुरांच्या किंवा कारागिरांच्या कामांत वैगुण्य उत्पन्न करतात अथवा खराबी करतात, त्यांचा चरितार्थ बंद करितात, किंवा त्यांस खरेदी अथवा विक्री करण्याच्या कामांत अडथळा करितात, त्यांस हजार पण दंड.

व्यापारी लोक संगनमत करून बाजार बंद करितील, किंवा खरेदीचे किंवा विक्रीचे दर उतरवतील किंवा वाढवतील, तर त्यास हजार पण दंड.

कांटेवाला किंवा मापाड्या हातचलाखी करून, वजनांत किंवा मापांत झटका देऊन, किंवा भेसळ करून $\frac{1}{8}$ पण नुकसान करील तर त्यास दोनशें पण दंड; नुकसान अधिक केल्यास दोनशेंच्या मानानें दंड वाढवावा.

धान्य, तेल, क्षार, मीठ, सुगन्धी किंवा औषधीपदार्थ यांत त्याच जातीचा हलका माल मिसळल्यास बारा पण दंड.

व्यापाऱ्यानें दलालांची किंवा अडत्यांची मजुरी रोज हिशोब करून चुकती केली पाहिजे; त्याचप्रमाणें त्यांनीं अमुक खर्चांत निर्वाह चालवावा असें ठरविलें पाहिजे; कारण खरेदीदार व विक्री करणारा यांच्या दरम्यान जें मिळेल, तें नफ्यांत येत नाहीं.

ज्यांस अधिकार दिला असेल त्यांनींच धान्य वगैरे माल सांठवून ठेवावा. अधिकारावांचून सांठवून ठेवलेला माल व्यापार खात्यावरील अधिकाऱ्यानें सरकार जमा करावा.

सारांश व्यापाऱ्यांनीं धान्य वगैरे माल विकतांना लोकांच्या हिताकडे लक्ष दिलें पाहिजे.

ठराविक दरावर स्वदेशी मालाचे बाबतींत शेंकडा पांच, आणि परदेशी मालाचे बाबतींत शेंकडा दहा, नफा कायम ठरविण्यांत यावा. ठराविक दरापेक्षां किंवा शेंकडा पांच नफ्यापेक्षां अधिक किंमती वाढवून खरेदी किंवा विक्री केली तर दोनशें पण दंड, अधिक दरानें व अधिक नफ्यानें विकल्याबद्दल याच मानानें दंड वाढवावा.

घाऊक विक्रीनें विकावयाचा माल बाजारांतील ठरविलेल्या दरानें विकला जाणार नाहीं, तर तो माल विकण्याला दुसऱ्याला परवानगी देऊं नये. बाजारांत माल फार आल्यानें यांना नफा न होईल तर त्यास कांहीं विशेष सवलत द्यावी.

अधिकाऱ्यानें मालाच्या विक्रीकरितां एकच ठिकाण नेमून द्यावें. आणि तो माल विकला गेल्याशिवाय इतरत्र तसला माल विकण्याची मनाई करावी. लोकांच्या हिताकरितां असा माल व्यापाऱ्यांनीं दिवसमजूरीनें काम करणाऱ्या लोकांसच विकावा.

जो माल पुष्कळ दिवसांपूर्वीं तयार होऊन पडला आहे, अथवा दूर गांवाहून आला आहे, अशा मालाच्या बाबतींत, मालावर खर्च किती झाला, माल किती निघाला, जकात किती पडली, रकमेवर व्याज किती झालें, भाडें किती झालें, किरकोळ खर्च किती झाला वगैरे बाबी विचारांत घेऊन बाजार भावाच्या तज्ज्ञ अधिकाऱ्यानें मालविक्रीचा दर ठरवून द्यावा.

---

## अध्याय ८० वा.



## आकस्मिक आपत्ति निवारण्याचे उपाय.

आठ प्रकारचे दैवी कोप असतातः—अग्नि, पाणी, रोग, दुष्काळ, उंदीर, हिंस्र पशु, साप, व भूतपिशाच्च. यांपासून प्रजेचें संरक्षण करावें.

उन्हाळ्यांत गांवांतील लोकांनीं घराबाहेर निजावें किंवा घरांत दशमूली—अग्निनिवारक द्रव्यें—ठेवून मग घरांत निजावें.

आग लागूं नये म्हणून काय उपाय करावे, हें ग्रामाधिपतीचीं कर्तव्यें सांगतांना सांगितलें आहे. त्याचप्रमाणें जनानखान्यासंबंधानें व सेवकांसंबंधानें सांगतांनाहि सांगितलें आहे.

प्रत्यहीं तसेंच पर्वणीच्या दिवशीं लोकांनीं देवतांस बलि-देऊन, होम करून व स्वस्तिवाचन पठण करून अग्नि-नारायणाची पूजा करावी.

नदी तीरावरील खोलगट जागेंतील गांवच्या लोकांनीं पावसाळ्यांत पुराच्या सीमेपलीकडे जाऊन रहावें; आणि जवळ लांकडी फळ्या, तराफे व नावा असूं द्याव्या.

एकादा मनुष्य वहात चालला असल्यास, त्यास भोपळा, होडगें, लांकूड-फांटा किंवा तराफा घेऊन वांचवावें; त्यास सोडविण्यास जो जाणार नाहीं, त्याला बारा पण दंड; होडगें वगैरे साधन जवळ नसलेंच तर दंड होणार नाहीं.

पर्वणीच्या दिवशीं नदीची पूजा करावी.

माया विद्या, योग विद्या, व वेद जाणणाऱ्या लोकांनीं अतिवृष्टि बंद व्हावी म्हणून मंत्र-पठण करावें.

अवर्षण पडल्यास इंद्र, गंगा, पर्वत व वरुण देवता यांची पूजा करावी.

रोगाची सांथ उद्भवल्यास, औपनिषदिक प्रकरणांत उपाय सांगण्यांत येतील, ते योजावे; वैद्यांनीं औषधोपचारांनीं आणि सिद्ध तापसांनीं मंगल विधींनीं व प्रायश्चित्तादि कर्मांनीं सांथीचें शमन करावें.

देवास अभिषेक करून तें तीर्थ सर्वत्र शिंपडावें, समुद्र पूजन करावें, स्मशानांत गाय दोहावी ( धार काढावी ), पिठाचा पुतळा करून जाळावा किंवा रात्रभर भजन करीत असावें. या प्रमाणें महामारीसंबंधानें विधि सांगितला.

जनावरास रोग झाला, किंवा जनावरास रोगाची सांथ आली, तर गोठ्यांत नीरांजन विधि करावा आणि कुलदेवतेची पूजा करावी.

दुष्काळ पडला असतां राजानें प्रजेला धान्य आणि बी सवलतीनें पुरवून दया दाखवावी; किंवा दुष्काळी कामें काढावीं; स्वतःच्या किंवा इतरांच्या संग्रहांतून धान्य किंवा अन्नसामग्री प्रजेस वांटून द्यावी; देशांतील प्रजा कांहीं काळपर्यंत परदेशांत पाठवावी; आपल्या मित्रांपाशीं मदत मागावी. अखेरीस ( श्रीमंत लोकांवर ) जबरदस्त कर बसवावा किंवा त्यांच्या कडून वर्गण्या वसूल कराव्या.

राजानें हवेंतर, आपल्या प्रजेसह ज्या प्रांतांत धान्य-समृद्धि आहे त्याप्रांतांत जाऊन रहावें, अथवा समुद्र-कांठीं किंवा सरोवराच्या कांठीं जाऊन राहावें.

पाण्याच्या संन्निध असलेल्या आपल्या जमिनींत धान्य, भाजीपाला, कंदमुळें, फळें वगैरे उत्पन्न करावें. अथवा हरिण, जनावरें, पक्षी, हिंस्रपशु, मासे वगैरे प्राण्यांची शिकार करून अन्नाची भरती करावी. उंदरांचा उपद्रव झाला, म्हणजे मांजरें व मुंगूस मोकळे सोडावे; त्यास जो धरील किंवा मारील त्यास बारा पण दंड, त्याप्रमाणें रानटी माणसा खेरीज इतर कोणी आपलें कुत्रें मोकळें सोडील तर त्यासही तोच दंड करावा.

'स्नुहि' वृक्षाच्या चिकानें माखलेलें अथवा औपनिषादिक प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें तयार केलेलें धान्य जमिनीवर विखरून ठेवावें, म्हणजे उंदीर नाहींसे होतात. उंदीर पकडून किंवा मारून आणून देणाऱ्यांस बक्षीस द्यावें. सिद्ध तापसांनीं मंगलविधि करावे; पर्वणीच्या दिवशीं म्हणजे अमावास्येच्या व पूर्णिमेच्या दिवशीं उंदराची पूजा करावी. टोळ, पांखरें, किडे यांचा उपद्रव झाल्यास असेच उपाय करावे. वाघांचा उपद्रव झाला, म्हणजे जनावरांच्या प्रेतांस मदन वृक्षाचा रस चोपडून ठिकठिकाणीं तीं ठेवून द्यावीं, किंवा त्यांच्या पोटांत मदनवृक्षाचा किंवा कोद्रववृक्षाचा रस भरून त्यांचें मांस पसरून ठेवावें.

फासे पारधी किंवा कुत्रे पाळणारे पारधी यांनीं ठिकठिकाणीं जाळीं टाकून वाघास पकडावें.

ज्यांच्या अंगांत चिलखत व हातांत शस्त्र आहे अशा माणसांनीं वाघ मारावे; ( वाघाच्या तावडींत सापडलेल्या माणसास मदत करण्याकरतां ) जो पुढें सरसावणार नाहीं, त्यास बारा पण दंड होईल; जो वाघ मारील त्यास तितकेंच इनाम मिळेल.

पर्वणीच्या दिवशीं पर्वतांची पूजा करावी.

पशूंच्या कळपापासून, पांखरांच्या टोळ्यांपासून, किंवा मगरीपासून उपद्रव झाल्यास, असेच, उपाय योजाव.

सापांचा उपद्रव झाल्यास, सापाच्या विषाची माहिती असलेल्या माणसांनीं मंत्रांनीं किंवा औषधांनीं उपाय योजावे; सर्वांनीं एकदम हल्ला करून एकेका आळींतले साप मारून टाकावे; अथर्व वेद जाणणाऱ्या ब्राम्हणांनीं मंत्र जपावे; पर्वणीच्या दिवशीं, सापाची पूजा करावी. जलचर प्राण्यांपासून उपद्रव झाल्यास हेच उपाय योजावे.

भूत पिशाच्चादिकांचा उपद्रव झाल्यास अथर्व वेद जाणणाऱ्यांनीं, किंवा मायायोग जाणणाऱ्यांनीं भुतें नाहींशीं होतील अशीं कर्में करावीं. पर्वणीच्या दिवशीं स्थंडिल घालून त्यावर छत्री, हातपताका, व बकऱ्याचें मांस वहावें आणि अशा रीतीनें चैत्यवृक्षाची पूजा करावी. संकट-काळांत रात्रंदिवस 'आम्ही तुम्हाला चरु अर्पण करितों,' असा मंत्र सर्वांनीं जपत असावें.

बाप मुलाचा सांभाळ करितो त्याप्रमाणें राजानें संकटग्रस्त प्रजेचा प्रतिपाळ करावा. मायायोग जाणणारे सिद्ध तापसादि पुरुष दैवी आपत्तींचें निवारण करूं शकतात, यास्तव राजांनीं त्यांस सदैव सन्मानपूर्वक आपल्या राज्यांत ठेवून घ्यावें.

---

# अध्याय ८१ वा.



## संशयास्पदलोकांचा बंदोबस्त.

जमीन महसुलावरील मुख्य अधिकाऱ्यांचीं कर्तव्यें सांगतांना, देशाचें रक्षण कसें करावें हें सांगितलें; आतां, त्यांतील संशयास्पदलोकांचा बंदोबस्त कसा करावा हें सांगतों.

जमीन महसुलावरील मुख्य अधिकाऱ्यानें, देशांतील ठिकठिकाणचे गांवकामगार व लोक यांच्या वर्तनावर टेहळणी ठेवण्याकरितां, सिद्ध, तपस्वी, संन्यासी, जादुगार, भाट, गारुडी, स्वैरसंचारी, ज्योतिषी, भविष्यवादी, शकुन सांगणारा, वैद्य, वेडा, मुका, बहिरा, बावळा, अंधळा, वाणी, कारागीर, सुतार, गवई, नट, गुत्तेवाला, हलवाई, मांस शिजवणारा, आचारी वगैरेंचे निरनिराळे वेष धारण केलेले गुप्तहेर कामगिरीवर पाठवावे; व या हेरांनीं ठिकठिकाणच्या लोकांवर व सरकारी नोकरांवर टेहळणी करावी. एखादे ठिकाणीं अमुक मनुष्य संशयास्पद रीतीनें वागतो असा संशय आल्यास, त्या मनुष्याच्या मागें तशाच धंद्याचा गुप्त हेर लावावा; त्या हेरानें, शंकित मनुष्य न्यायाधीश किंवा प्रांताधिकारी असल्यास, त्याच्या पोटांत शिरून असें म्हणावें—"हा माझा नातलग, यावर फिर्याद आहे; यावर हा संकट प्रसंग पडला आहे, तो दूर करा, आणि त्याबद्दल हें धन घ्या." तो जर तसें घेईल, तर त्यावर लांच खाल्ल्याचा आरोप करून, त्यांस हद्दपार करावें.

प्रांताधिकाऱ्यासंबंधानेंहि असेंच करावें.

अथवा गांवांतील श्रेष्ठ शिष्ट किंवा ग्रामाधिपति यास गांठून त्यास सांगावें—"अमका सावकार मोठा दुष्ट आहे; आज तो चांगला संकटांत गुरफटला आहे, म्हणून त्याजपासून हवें तितकें द्रव्य काढून घ्या." तो शिष्ट किंवा तो ग्रामाधिपति तसें करील, तर त्यांवर जबरदस्तीनें पैसे घेतल्याबद्दल खटला करून हद्दपार करावें.

अथवा कांहीं माणसांस म्हणावें—" मजवर फिर्याद झाली आहे, मी तुम्हांस पुष्कळ पैसे देतों, तुम्हीं मजतर्फे अमुक अमुक साक्ष द्या व मला संकटांतून सोडवा, " असें खोटेंच सांगून त्यांस साक्षी देण्याची विनंति करावी, त्यांनीं जर तसें केलें, तर त्यांवर खोटी साक्ष दिल्याचा खटला करून हद्दपार करावें.

खोटे करारनामे करणाऱ्यांचीहि व्यवस्था अशीच लावावी.

अथवा एखादा मनुष्य स्मशानांत कांहीं मंत्र जपत बसून, किंवा औषधीप्रयोग करून किंवा जादूटोणा करून स्त्रीस मोहवूं शकतो, असें समजल्यास, हेरानें त्याकडे जाऊन म्हणावें—" अमक्या अमक्याच्या बायकोवर, सुनेवर किंवा मुलीवर माझें मन गेलें आहे. ती जर मला वश करून देशील, तर इतकें द्रव्य तुला देईन. " तो जर तसें करील, तर त्यावर वशीकरणाचा खटला करून हद्दपार करावें.

जादूटोणा करून दुसऱ्यांस अपकार करणाऱ्या लोकांचाहि बंदोबस्त असाच करावा.

अथवा—अमुक मनुष्य विषारी औषधाची माहिती सांगतो, विषारी पदार्थ विकतो, विकत घेतो, अथवा औषधांत किंवा अन्नांत मिसळून देतो, असा संशय आल्यास, गुप्त हेरानें त्यास म्हणावें. " अमुक मनुष्य माझा वैरी आहे; त्याला तूं मारशील, तर तुला इतकें द्रव्य देतों. " त्यानें तसें केलें, तर तो विषप्रयोग करणारा म्हणून हद्दपार करावा.

मदन–वृक्षाचे प्रयोग करणाऱ्यांचाहि बंदोबस्त असाच करावा.

अथवा–अमुक मनुष्य वारंवार निरनिराळ्या प्रकारचे धातु, क्षार, कोळसा, भाते, चिमटे, मुशी, भट्या, हातोडे विकत घेत असतो, किंवा अमक्याचे हात व कपडे हमेश मुशीच्या राखेनें व धुरानें भरलेले असतात, किंवा अमक्या जवळ खोटें नाणें करण्यास लागणारीं हत्यारें असतात, यावरून तो खोटीं नाणीं पाडणारा असावा, असा संशय असल्यास, गुप्तहेरानें त्यांजपाशीं धंदा शिकण्याच्या मिषानें राहून त्यास उघडकीस आणावें. अशारीतीनें तो उघडकीस आला म्हणजे तो खोटीं नाणीं पाडणारा म्हणून हद्दपार करावा.

सोन्यांत भेसळ करून सोनें हिणकस करणारे किंवा खोटें सोनें तयार करणारे व विकणारे असतील, त्यांचाहि बंदोबस्त असाच करावा.

याप्रमाणें न्यायाधीश, ग्रामाधिपति, कूटसाक्षी इत्यादि जे तेरा ग्रामकंटक सांगितले ते गांवातील लोकांस पीडा देणारे असल्यानें त्यास हद्दपार करावें किंवा त्यांच्या अपराधाच्या मानानें त्याजकडून दंड घ्यावा.

---

# अध्याय ८२ वा.



## सिद्ध वेषाच्या हेरा करवीं उडाणटप्पूंचा बंदोबस्त.

रात्रीं हेरांनीं बातमी आणिल्यानंतर, सिद्धांचा वेष धारण केलेल्या हेरांनीं आपल्या अंगांत अद्भुत शक्ति आहे, मंत्रप्रभावानें आम्हास हवें तेथें जातां येतें, कडेकोट बंदोबस्तानें बंद केलेलें दार उघडतां येतें, अदृश्य होतां येतें वगैरे थापा मारून चोरास चोरी करण्यास मोह घालावा; त्याचप्रमाणें आम्हांस वशीकरण विद्या येते, असें सांगून बाहेरख्याली माणसासहि मोह घालावा.

अशा प्रकारें उत्कंठित झालेल्या उडाणटप्पूंस अमुक गांवीं जाऊं, असें सांगून रात्रीं भलत्याच गांवांस घेऊन जावें; तेथें स्त्रियांचे व पुरुषांचे वेष घेतलेले हेर असतील, त्यांनीं म्हणावें—' ज्या गांवीं तुम्हास जावयाचें, तें येथून दूर आहे, तेथें जातां येणार नाहीं; तुम्हाला मंत्रप्रभाव येथेंच दिसेल., तदनंतर ज्या मंत्रानें बंद दार उघडतें, तो जपून दार उघडावें; व 'चला, जा आंत ' असें त्यांस म्हणावें. ज्या मंत्रानें अदृश्य होतां येतें, तो म्हणून रखवालदार

जागे असतांना त्यांच्या मधून त्या उनाड लोकांस जावयास सांगावें; ज्या मंत्रानें झोंप आणतां येते, तो जपून त्या उनाडांकरवीं झोंपलेल्या रखवालदाराचें आंथरुण खुशाल फिरवावें; वशीकरण मंत्राचा पाठ करून परस्त्रीचा वेष घेतलेल्या हेरांनीं उनाडांशीं संभाषण करून त्यास खुष करावें.

अशा प्रकारें त्या उनाडांस मंत्र प्रभावाचा अनुभव पटल्यानंतर, हेरांनीं त्यांस ती विद्या व तदनुषंगिक मंत्र शिकवावे. तदनंतर खूण करून ठेवलेलें द्रव्य किंवा खूण केलेलें घर असेल तेथें चोरी करावयास त्यांस सांगावें आणि सांगितल्याप्रमाणें ते चोरी करावयास लागले कीं सर्वांस एकदम पकडावें.

खुणेचें द्रव्य विकावयास, विकत घ्यावयास किंवा गहाण टाकावयास आलें असतां किंवा भांग–गांजा–दारूच्या अमलांत असतां त्यांस पकडावें; आणि पकडल्यानंतर त्यांचा पूर्व इतिहास व सांथीदार यांविषयीं त्याजपासूनच तपास काढावा.

अट्टल दरोडेखोराचें सोंग घेतलेल्या हेरांनींहि दरोडेखोरांत मिसळून वरील उपायानें त्यांस दरोडा घालावयास लावून पकडावें. अशा रीतीनें पकडलेल्या दरोडेखोरांस जमीन महसुलावरील अधिकाऱ्यानें नागरिकांसमोर व इतर गांवांतील लोकांसमोर उभें करावें, आणि म्हणावें—" चोर पकडण्याची विद्या राजास अवगत आहे, त्याच्या सांगण्यावरून या चोरांस पकडलेलें आहे, जो असें करील, त्यांस मी पुनः पकडीन; म्हणून तुमच्या नातलगांपैकीं जर कोणी उडाणटप्पू असेल तर त्याचा चांगला बंदोबस्त करा. "

अमुक माणूस बैलाचे कासरे, चाबूक किंवा शेतीचीं आऊतें चोरीत असतो, असें गुप्त हेरांच्या बातमीवरून कळण्यांत आलें म्हणजे त्यास पकडून सांगावें कीं हा राजाचा अद्भुत प्रभाव आहे.

अट्टल चोर, गवळी, फासेपारधी, कुत्रे ठेवून पारध करणारे पारधी वगैरेंचे वेष धारण करून गुप्त हेरांनीं रानांत लुटणाऱ्या रानटी लोकांत मिसळावें, व त्यांस ज्यांपाशीं खोटीं नाणीं किंवा इतर द्रव्य मुबलक आहे, अशा तांड्यांवर किंवा गांवांवर डाके घालावयास लावावें; डाका घालावयास लागले, म्हणजे लपवून ठेविलेल्या सैन्यानें छापा घालून त्यास ठार करावें; किंवा मदन वृक्षाचा रस मिसळलेला खाद्य पदार्थ खाऊं घालून ठार करावें; अथवा भरपूर लूट मिळवून इकडे तिकडे जाण्या येण्याच्या श्रमामुळें गाढ झोपेंत असतां, किंवा जत्रेच्या दिवसांत भांग–गांजा–दारू–पिऊन धुंद झाले असतां, त्यांस पकडावें.

वर सांगितल्याप्रमाणें जमीनमहसुलावरील अधिकाऱ्यानें त्यांस पकडून प्रांतांतील रहिवाशांसमोर उभें करावें आणि राजाच्या अंगीं सर्व कांहीं जाणण्याची शक्ति आहे ही गोष्ट सर्वांच्या मनावर बिंबवावी.

---

# अध्याय ८३ वा.



## संशयित वृत्तीच्या लोकांचा बंदोबस्त.

सिद्ध हेरांनीं बातमी आणिल्यानंतर संशयित वृत्तीच्या लोकांस पकडावें.

जो तुटपुंज्या वडिलार्जित उत्पन्नावरच कुटुंबाचा चरितार्थ चालवितो, ज्या जवळ सुखसाधनें अल्पमात्र आहेत, जो वरचेवर आपला देश, जाति, गोत्र, नांव व धंदा गुप्त ठेवितो; जो यथेच्छ मांस भक्षण व सुरापान करितो, ज्यास खाण्याचा नाद फार आहे, ज्यास सुगंधी तेलें, अत्तरें, उंची कपडे, दागदागिने वापरण्याचा नाद आहे, जो अतिशय खर्चिक आहे, ज्यास वेश्येचा, जुगारीचा व दारूचा नाद फार आहे, जो निरंतर प्रवासांत आहे, जो मालाची देवघेव करण्याकरितां कोठें जातो, काय विकतो, हें कोणास कळत नाहीं, जो एकांत अरण्यांत दऱ्याखोऱ्यांत भलत्या

वेळीं हिंडतो, जो गुप्तस्थलीं किंवा जेथें कांहीं सावज असेल, अशा ठिकाणीं पुष्कळ लोकांशीं खलबत करावयास जातो, जो नवथर झालेल्या जखमा किंवा गळवें यांवर गुपचुप रीतीनें इलाज करितो, जो निरंतर घरांतील आंतील भागांत लपून बसतो, जो स्त्रीलंपट असतो, जो दुसऱ्याचा संपत्तीची, स्त्रीची, द्रव्याची, घराची निरंतर चौकशी करितो, जो निंद्य धंदा करणाऱ्या किंवा निंद्य विद्या जाणणाऱ्या लोकांशीं संबंध ठेवीत असतो, जो अपरात्रीं भिंती आड किंवा सावलींत लपून भटकत असतो, जो भलत्या ठिकाणीं व भलत्या काळीं खोटा जिन्नस विकीत असतो, जो मनांत वैमनस्य धरून ठेवितो, ज्याचा धंदा व जाति अत्यंत हलकी आहे, जो प्रच्छन्नरूप धारण करितो, जो स्वतःच्या जातीची खूण टाकून भिन्न आचार स्वीकारतो, ज्यानें अनेकदां अपराध केले आहेत, जो गांव कामगार असून हातून अपराध झाल्यामुळें अमात्याकडे जावयास भितो किंवा दडून बसतो किंवा दूरदूर पळतो, जो एकटा बसला तरी घाबरलेला असतो, जो कावराबावरा दिसतो, ज्याचा आवाज बदलला आहे, व तोंड कोरडें व फिकट झालें आहे, जो निरंतर हत्यारबंद माणसाच्या संगतींत असतो, जो दुसऱ्यास घाबरवितो, असे लोक खून करणारे, चोर, किंवा भूमिगत द्रव्य व ठेव यांचा अपहार करणारे, अथवा संशयास्पद रीतिनें उपजीविका करणारे आहेत, असें समजावें.

याप्रमाणें संशयावरून गुन्हेगार कोणते हें सांगितलें आहे.

आतां चोरीचा माल कसा पकडावा हे सांगतों—

चोरीस गेलेली वस्तु सांपडली नाहीं, म्हणजे तशा वस्तूंचा व्यवहार करणाऱ्यांस तें जाहीर करावें; जाहीर केल्यानंतर ती वस्तु कोणाच्या हातीं येऊन तो लपवून ठेवील, तर त्यावर गुन्हा करणाराचा साथीदार म्हणून अपराध लागू होईल. अमक्याची हरवलेली ही वस्तु आहे, असें माहीत नसेल, तेव्हां ती त्यापासून परत घेऊन मालकास परत द्यावी व त्यास सोडून द्यावें. व्यापार खात्यावरील अधिकाऱ्यास जाहीर केल्यांवाचून कोणीही जुना माल गहाण टाकूं नये किंवा विकूं नये. जाहीर केलेली वस्तु जर पकडली गेली, तर ज्या जवळ ती सांपडली असेल, त्यास तुजजवळ ही कशी आली, असें विचारावें. 'मला माझ्या बांधवांनीं दिली, अमक्यानें दिली, विकत घेतली, करविली, मजजवळ गुप्त गहाण आली, अमक्यावेळीं आली, अमक्याठिकाणीं आली, अमकी किंमत, अमुक दलाली, अमुक वजन वगैरे तो सांगेल ती हकीकत अगोदरच्या हकीकतीशीं जुळत असल्यास, त्यास सोडून द्यावें.

ज्या माणसाची वस्तु हरवली, तो हें जर वरीलप्रमाणें शपथेवर सांगूं लागला, तर ज्यानें त्या वस्तूचा बरेच दिवस उपभोग घेतला आहे, ज्याच्या ताब्यांत ती वस्तु बरेच दिवस आहे, व ज्याची शुद्ध वर्तनाबद्दल गांवांतील लोकांत प्रसिद्धी आहे, त्या माणसाची ती वस्तु आहे असें समजावें. " कारण जनावराचे सुद्धां सारखे सारखे रंग असतात, व सारख्या सारख्या खुणा असतात; मग, एकाच ठिकाणीं तयार झालेले, एकाच कारागिरानें तयार केलेले व सारख्याच द्रव्यांचे बनवलेले, पदार्थ किंवा दागिने, यांत सारखेपणा असेल यांत नवल काय ? "

मी ही वस्तु मागून आणिलेली आहे, भाड्यानें किंवा गहाण घेतलेली आहे, मजजवळ मोहोरबंद किंवा उघड ठेव म्हणून आली आहे किंवा परत बोलीवर किरकोळविक्री साठीं आणली आहे असें जेव्हां तो म्हणेल, तेव्हां त्यास कोणी तरी तिऱ्हाइत माणूस साक्षी करतां आणावयास सांगावें; साक्ष त्याच्यासारखी झाल्यास, त्यास सोडून द्यावें; त्या तिऱ्हाइत साक्षीदारानें हवेंतर ' नाहीं ' असें सांगावें.

माल सांपडल्यामुळें जो पकडला गेला, तो जर सदर माल देणगी म्हणून मिळालेला आहे असें सांगेल, तर " अमक्यानें या कारणास्तव देणगी दिली, या कारणास्तव मीं स्वीकारिली, अशी अशी परिस्थिति होती, " वगैरे सिद्ध करण्याकरतां, त्यानें देणगी देणारा व देवविणारा, देणगीपत्र लिहिणारा, देणगी घ्यावयास उत्तेजन देणारा, सल्ला देणारा, किंवा इतर साक्षीदार आणिले पाहिजेत.

फेंकून दिलेली वस्तु, कोणाची तरी रस्त्यावर पडलेली वस्तु, किंवा विसरून राहिलेली वस्तु, मला अमुक ठिकाणीं, अमुक वेळीं, व अमक्या परिस्थितींत सांपडली, असें पुराव्यानिशीं सिद्ध केलें, म्हणजे तो दोषमुक्त होतो. दोष शाबीद झाल्यास, त्यानें ती वस्तु परत देऊन तितका दंड दिला पाहिजे, नाहींतर चोरीची शिक्षा भोगावी.

अशा प्रकारें चोरीस गेलेला माल कसा पकडावा, हें सांगितलें आहे.

आतां गुन्हेगार गुन्हा करीत असतांना, परिस्थिति कशी होती, हें तपासून कसें काढावें, हें सांगतों.

घरफोडीच्या चोरींत, जेथें दार नाहीं तेथून चोर घुसला किंवा निघून गेला असेल, हत्यारानें दाराला भोंक पाडिलें असेल, खिडक्या किंवा जाळ्या फोडल्या असतील, वर जाण्यायेण्याचा जिना फोडला असेल, भिंतीला आरपार भोंक पाडिलें असेल, केवळ माहीतगार माणसावांचून अन्य माणसास माहीत नाहीं, अशी लपवून ठेवलेली ठेव चोरतां येईल अशी युक्ती योजिलेली दिसेल, किंवा घरांतल्या घरांतच उकराउकर झाली असेल, तेव्हां घरांतल्या माणसाचीच शंका घ्यावी; उलट स्थितींत बाहेरच्या माणसाची शंका घ्यावी; दोन्ही स्थिति आढळल्यास दोघांची शंका घ्यावी.

घरांतल्या माणसानें चोरी केली असेल, तेव्हां घरांतील जो पुरुष व्यसनी, क्रूर लोकांच्या संगतींत फिरणारा, व चोरी करणारास उपयोगीं हत्यारें बाळगणारा असेल त्याची तपासणी करावी; किंवा घरांतील जी बाई गरीब घराण्यांतील असेल, किंवा परपुरुषाच्या नादीं असेल, तिची अथवा नोकरांपैकीं जो परस्त्रीच्या नादीं लागला असेल, त्याची तपासणी करावी; अथवा जो झोंपाळू असेल; झोपेनें घेरलेला असेल, थकलेला असेल, घाबरलेला असेल, आवाज बदललेला असेल, ज्याचें तोंड कोरडें व फिकें झालें असेल, जो कावरा बावरा पाहात असेल, फार बडबड करणारा असेल, उंच चढल्यामुळें ज्याचें आंग सुजलें असेल, भोकांतून आंत जातांना आंग खरचटलें असेल, वस्त्र फाटलें असेल, हातापायाला घट्टे पडले असतील, केंस नखें धुळीनें भरलीं असतील, किंवा तुटलीं असतील, नुकतेंच स्नान केलेला असेल, नुकतेंच गंध लावलेला असेल, आंगास तेलाचें मर्दन केलें असेल, नुकतेंच हातपाय साफ केले असतील, आंत जातांना व बाहेर पडतांना जमिनीवर उमटलेल्या पावलांच्या खुणा त्याच्या पावलाशीं जुळत असतील, अशा माणसांची, किंवा ज्याच्या घामाचा किंवा दारूचा किंवा फुलांचा वास तुटून पडलेल्या वस्त्रास येत असेल अशाची तपासणी करावी.

अशाच रीतीनें गांवांतील अमका माणूस परस्त्रीवर नजर ठेवणारा आहे किंवा चोरी करणारा आहे काय हेंहि शोधून काढावें.

आतांपर्यंत सांगितलेल्या लक्षणांवरून प्रांताधिकाऱ्यानें गोप व स्थानीय आधिकाऱ्यांच्या मदतीनें बाहेरचे चोर शोधून काढण्याचे यत्न करावे; आणि नगरांतील अधिकाऱ्यानें तटबंदी गांवांतील चोर शोधून काढावे.

---

# अध्याय ८४ वा.



## अकस्मात् मेलेल्याची परीक्षा.

अकस्मात् मेलेल्या माणसाचें प्रेत तेलानें माखून ठेवावें व तपासावें. प्रेत मूत्रानें व विष्ठेनें भरलेलें असेल, कोठ्यांत वायु धरला असेल, हातपाय सुजलेले असतील, डोळे उघडे असतील, गळ्याला खूण असेल तेव्हां गळा दाबून व श्वास कोंडून खून केला असें समजावें.

हात व पाय आंखडलेले असले ह्मणजे टांगून मारलें असें समजावें.

हात, पाय व पोट सुजलेले असले, डोळे खोल गेलेले असले, आणि बेंबी फुगलेली असली, ह्मणजे सुळावर चढवून मारलें असें समजावें.

डोळे व गुद जड झालेले असले, दांतांनीं जिभ चावली असली कोठा फुगलेला असला म्हणजे बुडवून मारलें असें समजावें.

आंग रक्तानें भरलेलें असलें, अंगावर जखमा असून तें छिन्न विच्छिन्न झालेलें असलें, ह्मणजे काठ्यांनीं किंवा दगडांनीं मार देऊन मारलें असें समजावें.

हात पाय किंवा इतर अवयव मोडलेले असले ह्मणजे आपटून मारलें असें समजावें.

हात, पाय, दांत व नखें काळीं पडलेलीं असलीं, कांतडीं सुरकुतलेली असली, केंस मऊ पडलेले असले, मांस गलित झालेलें असलें, आणि तोंडांत फेंस आलेला असला ह्मणजे विषप्रयोग झाला असें समजावें.

वरील सर्व चिन्हें असून रक्ताळलेला दंश असला तर साप किंवा विषारी प्राणी डसून मेला असें समजावें.

ढाळ व वांत्या होऊन शरीर व वस्त्र अस्ताव्यस्त झालेलें असलें ह्मणजे मदनवृक्षाचा रस पाजून खून केला असें समजावें.

या खेरीज कोणतेंहि लक्षण दिसेल तर वेगळ्या प्रकारानें मारलें किंवा आधीं मारून मग शिक्षेच्या भीतीनें गळफांस लावला अगर गळा कापला असें अनुमान करावें.

विषप्रयोगानें मेलेल्या माणसाचें उरलेलें अन्न दुधांत टाकावें, उरलेलें अन्न न मिळाल्यास पोटांतून अन्न काढून अग्नींत टाकावें. चिट्चिट् असा आवाज झाला किंवा इंद्रधनुष्याचा रंग दिसला, ह्मणजे तें अन्न विषयुक्त आहे असें समजावें.

सर्व शरीर जळलें असून हृदय जळलें नसेल तरीहि विषप्रयोग समजावा.

मयतानें आपल्या नोकरास कधीं मारहाण केली होती किंवा काय याचा तपास करावा. अथवा त्याच्या घराण्यांतील दुःखानें गांजलेल्या व पर पुरुषाच्या नादीं लागलेल्या बाईस, अथवा ज्या स्त्रीस वांटा मिळाला नाहीं तिचा पक्ष घेणाऱ्या बांधवास, त्यासंबंधानें विचारावें.

मेलेल्या माणसास टांगून मारिलें असेल तेव्हांहि असाच तपास करावा.

स्वतः गळफांस घेऊन मेला असेल, तेव्हां मयतानें कधीं कोणास मारलें हाणलें होतें किंवा काय याचा तपास करावा.

अपघाताच्या मरणास पुढील कोणतेंतरी कारण असतें:—

स्त्रीसंबंधीं किंवा जिनगीच्या वांटयासंबंधीं घडलेला दोष, धंद्यांतील चढाओढ, वैऱ्याचा द्वेष, व्यापारी संघ यांतील एक किंवा अनेक कारणामुळें आलेला फिर्यादीचा प्रसंग राग उत्पन्न करण्यास कारण होतो आणि रागापासून प्राणघात होतो.

मारेकऱ्यांनीं सारखेपणा वरून भलताच मनुष्य मारला, किंवा चोरांनीं चोरी करण्याकरितां भलताच मनुष्य मारला, किंवा एखाद्यानें आपला वैरी समजून भलत्याचा प्राण घेतला तर शेजाऱ्या पाजाऱ्यापाशीं विचारपूस करावी कीं, मयताला कोणीं बोलाविलें होतें, त्याजवळ कोण होता, त्याबरोबर कोण गेला, खुनाच्या ठिकाणीं त्यांस कोणीं आणिलें असा तपास करावा. खुनाच्या जागीं जे लोक जवळपास होते त्यांपैकीं प्रत्येकाची निरनिराळी तपासणी करावी. मयताला येथें कोणी आणिलें, हत्यार घेऊन कोणी छपून बसलेला दिसला काय, कोणी घाबरलेला पाहिला काय, वगैरे प्रश्न त्यास विचारावे. ते सांगतील त्या अनुरोधानें पुढें तपास चालवावा.

मयत इसम कोण याचाच पत्ता लागला नसेल तर, अंगावरील जिनसा, प्रवासाचें सामान, धोतर, अंगरखा, दागिने वगैरे तपासून पाहिल्यानंतर त्याशीं संबंध असलेल्या माणसापाशीं मयताचें ठावठिकाण, मित्र, प्रवासास जाण्याचें कारण, धंदा इतर व्यवहार वगैरे बाबींसंबंधानें चौकशी करून पुढें काम चालवावें.

जो पुरुष किंवा स्त्री कामाला किंवा क्रोधाला बळी पडून, अथवा पापबुद्धीनें मूढ होऊन आत्मघात करील किंवा करावयास लावील त्यास किंवा तीस चांडाळाकरवीं राजमार्गावर दोरानें ओढीत आणावें. अशांची उत्तरक्रिया कोणीं करूं नये, किंवा बांधवांनींहि अशांची श्राद्धक्रिया करूं नये. जो बांधव त्याची उत्तर क्रिया किंवा श्राद्ध क्रिया करील त्यास आत्मघाती पुरुषासारखीच गति प्राप्त होईल, अथवा त्यास आपल्या स्वजनांस अंतरावें लागेल. जो अशा पतितापाशीं म्हणजे मना केलेल्या क्रिया करणाराशीं एक वर्षभर सहवास ठेवील आणि याजन, अध्यापन किंवा विवाहादि संबंध ठेवील तो स्वतः पतित होईल आणि अशाशीं संबंध ठेवणाराहि तसाच पतित होईल.

---

# अध्याय ८५ वा.



## आरोपीची चौकशी व समजूत.

ज्याची चोरी झाली असेल त्याच्या समक्ष म्हणजे फिर्यादी समक्ष आणि घरांतील व बाहेरील लोकांच्या समक्ष आरोपीचा देश, जाति, गोत्र, नांव, धंदा, जिनगी, मित्र, रहाण्याचें ठिकाण वगैरे विचारावें. नंतर साक्षीदारांच्या जबान्या आरोपीच्या जबानीशीं ताडून पहाव्या. तदनंतर गुन्ह्याच्या दिवशीं सकाळीं आरोपी कोठें होता; काय करीत होता, रात्रीं कोठें होता, पकडण्यापूर्वी कोठें होता, याची चौकशी करावी. आरोपीचें सांगणें साक्षीदारांच्या सांगण्याशीं जुळलें तर तो निरपराधी ठरवावा. नाहींतर कबूल होईपर्यंत त्याचा छळ करावा.

गुन्हा होऊन तीन रात्री उलटल्या, ह्मणजे शंकितास पकडूं नये, कारण मग प्रश्न विचारावयास सवड रहात नाहीं. परंतु त्याच्या जवळ गुन्हा करण्याकरितां लागणारी सामग्री सांपडल्यास पकडावें. एखादा मनुष्य चोर नसतांना त्याजवर जो चोरीबद्दल फिर्याद करील, त्यास चोरासारखा दंड होईल. खऱ्या चोरास दडवून ठेवणारासहि तसाच दंड होईल.

ज्यावर चोरीचा आरोप आहे, त्यानें जर, फिर्यादीचें व माझें वांकडें आहे, फिर्यादी माझा द्वेष करतो असें पुराव्यानिशीं सिद्ध केलें तर तो दोषमुक्त होईल. निरपराधी माणसास विनाकारण बंदी केल्यास पूर्व ह्मणजे ४८ पासून ९६ पण दंड होईल.

आरोपीवरील अपराधाविषयीं शंका उत्पन्न झाल्यास आरोपीला आपलीं हत्यारें, सल्लागार, साथीदार, चोरीचा माल व मालाची विल्हेवाट लावणारे लोक, हें सर्व सांगण्यास लावावें. आरोपीनें आपल्या जबाबांत अमुक ठिकाणीं गुन्हा केला, अमुक माल चोरला, अमुक माल आह्मीं वांटून घेतला, वगैरे वगैरे जी हकीकत सांगितली असेल तिच्याशीं इतर पुरावा ताडून पहावा. इतर पुरावा नसेल व आरोपी रडत असेल, तर त्यानें चोरी केली नाहीं असें समजावें. कारण निरपराधी मनुष्य सहजगत्या चोरीच्या ठिकाणीं हजर असेल, कर्मधर्मसंयोगानें त्याचा पोषाख, हत्यारें, सामान वगैरे खऱ्या चोरासारखेंच असेल, किंवा चोरीस गेलेल्या मालाच्या आसपास असल्यामुळें तो पकडला गेला असेल आणि ज्याप्रमाणें मांडव्यानें हाल होतील या भीतीनें विनाकारण गुन्हा कबूल केला होता, त्याप्रमाणें निरपराधी असूनहि मी चोरी केली असा कबुली जबाब त्यानें दिला असेल, म्हणून पुराव्याची पुरती छाननी झाल्यावरच शिक्षा करावी.

आरोपीचा गुन्हा क्षुल्लक असेल, किंवा आरोपी लहानमूल, म्हातारा, रोगी, निशा चढलेला, वेडा, प्रवासानें, तहानेनें व भुकेनें व्याकुळ झालेला, फार जेवलेला, आपण होऊन स्वाधीन झालेला किंवा अशक्त असा असल्यास त्यास कबुली करतां छळूं नये.

वेश्या, पाणपोईवाले, गोष्टी सांगणारे, रहावयास जागा देणारे, जेवण घालणारे ( खाणावळवाले ) इत्यादि धंद्यांपैकीं समानशील असे गुप्त हेर आरोपीवर टेहळणी करण्यास नेमावे. अथवा मोहोरबंद ठेव गैरफायदा वापरण्यासंबंधानें जो चौकशीचा प्रकार सांगितला आहे तशी चौकशी करावी.

ज्याच्या अपराधाबद्दल खात्री झाली असेल त्यास सक्तमजुरी करावयास ठावावें; परंतु गर्भवती स्त्री किंवा एक महिन्याच्या आंतील बाळंतीण हिला कामाला लावूं नये.

स्त्रियांच्या बाबतींत कामाचें प्रमाण अर्धें असावें, किंवा त्यास जें काम पाहिजे असेल तें काम द्यावें.

आरोपी ब्राम्हण असला, वेदपारंगत असला किंवा संन्यासी असला तर त्याच्या मागें गुप्त हेर ठेवून द्यावे.

जो या नियमाचें उल्लंघन करील किंवा करवील, किंवा वाजवीपेक्षां जास्ती काम घेतल्यानें ज्याचे हातून कैदी मरेल, त्यास उत्तम दंड म्हणजे ५०० पासून १००० पण पर्यंत दंड करावा.

शिक्षेचे प्रकार चार आहेत; त्यांत दंडाचे प्रकार सहा आहेत. फटक्यांचे सात प्रकार आहेत. खोड्याचे दोन प्रकार आहेत. उदकनलिका एकप्रकारची आहे.

घोर अपराध करणाऱ्याला पुढें दिल्याप्रमाणें अठराप्रकारांनीं शिक्षा करावी. नव्या वेताच्या छडीनें बारा फटके मारावे. दोन प्रकारची दंडाबेडी घालावी. नक्तमाल वेताच्या फोंकाने वीस फटके मारावे. ताडाच्या फोकानें बत्तीस फटके मारावे. दोनप्रकारांनीं विंचवासारखें उलटें वांकवून बांधून ठेवावें, हातांनीं किंवा पायांनीं टांगून ठेवावें. बोटांत सुया टोंचाव्या, कांजी पाजन हाताच्या बोटाचें एक पेरें जाळावें, तेल पाजून एक दिवस उन्हांत बसवावें, हिंवाळ्यांत एक रात्रभर ओल्यागार गवतावर निजवावें.

असे शिक्षेचे अठरा प्रकार आहेत. आरोपीला कोणत्या साधनानें फटके मारावे, उदाहरणार्थ वेतफोक, दोऱ्या इ., शिक्षेचे कमी अधिक प्रमाण, अनेक शिक्षाप्रकारांतून कोणती शिक्षा करावी, केव्हां करावी, केव्हां करूं नये या संबंधाचा निर्णय त्या आरोपीच्या गळ्यांत जो लोखंडाचा बिल्ला असतो त्यावरून करावा. दर दिवसास एकएक प्रकारची शिक्षा द्यावी; एकाच दिवशीं अनेक प्रकारच्या शिक्षा देऊं नयेत.

ज्यानें पूर्वीं तसलाच गुन्हा केला आहे, जो आगाऊ धमकी देऊन दरवडा घालतो, ज्यानें अनेक ठिकाणीं चोऱ्या करून द्रव्यसंचय केला आहे, जो प्रत्यक्ष गुन्हा करतांना पकडला गेला, किंवा चोरीच्या मालासह पकडला गेला, किंवा जो राजाचें द्रव्य लपवून ठेवतांना आढळला असेल, किंवा ज्यानें देहांत शिक्षा देण्यासारखा अपराध केला असेल त्याला राजाच्या हुकमावरून सर्व प्रकारचीं सक्तमजुरीचीं कामें करावयास लावावें, मग तीं कामें करण्याचा त्याला पूर्वींचा अभ्यास असो वा नसो.

ब्राह्मणानें कसलाहि अपराध केला असला तरी त्याचा छळ करूं नये. त्यानें अमुक गुन्हा केला आहे हें कळून इतरांनीं त्याच्याशीं जपून व्यवहार करावा यासाठीं त्याच्या अंगावर चोरीबद्दल कुत्रा, सुनाबद्दल मनुष्याचें धड, गुरुपत्नीसमागमाबद्दल जननेंद्रिय व मद्यपानाबद्दल दारूच्या दुकानाचें निशाण असली खूण कपाळावर डाग देऊन करावी. अपराधी ब्राह्मणाच्या अंगावर अशी खूण केल्यानंतर राजानें त्याची धिंड काढून सर्व लोकांस तें जाहीर करावें व त्यास हद्दपार करावें, किंवा दूर खाणींत काम करावयास लावावें.

# अध्याय ८६ वा.



## सरकारी अधिकारी व त्यांचे अपराध.

जमीन महसुलावरील अधिकाऱ्यानें व प्रांतिक अधिकाऱ्यांनीं अगोदर खात्यांखात्यांवरील अधिकारी व त्यांच्या हाताखालचे कामगार यांच्या वर्तणुकीवर नजर ठेवावी. जो कोणी कामगार खाणीमधून किंवा मौल्यवान् वस्तूंच्या कारखान्यांमधून मूल्यवान् वस्तु किंवा जवाहीर बिन हक्कानें घेऊन जाईल त्यास देहान्त शिक्षा द्यावी.

हलका माल ज्यांत तयार होतो, अशा कारखान्यांमधून कमी किंमतीचा माल किंवा खाण्यापिण्याचे जिन्नस बिन हक्कानें नेल्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड करावा.

बाजारांतन किंवा सरकारी कोठारांतून १ माषा पासून १/४ पण किंमतीचा सरकारी माल नेल्यास बारा पण; १/४ पासून १/२ पण किंमतीचा माल नेल्यास चोवीस पण; १/२ पासून ३/४ पण किंमतीचा माल नेल्यास छत्तीस पण; ३/४ पासून एक पण किंमतीचा माल नेल्यास अठ्ठेचाळीस पण दंड होईल. एक पासून दोन पण किंमतीचा नेल्यास पूर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड; दोनपासून चार पण किंमतीचा नेल्यास मध्यम म्हणजे १०० पासून ५०० पण दंड; चारपासून आठ पण किंमतीचा नेल्यास उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड. आठ पणाहून अधिक किंमतीच्या मालाची चोरी केल्यास वधाची शिक्षा द्यावी.

अंगणांतून, दुकानांतून, कारखान्यांतून किंवा शस्त्रागारांतून कच्चा माल किंवा इतर जिनसा नेल्यास त्या वर सांगितल्याच्या अर्ध्या किंमतीच्या असल्या तरी वरील प्रमाणेंच दंड अथवा शिक्षा करावी.

तिजोरींतून, सरकारी कोठारांतून किंवा कचेरींतून वस्तु नेल्यास त्या पावपट किंमतीच्या असल्यातरी दुप्पट शिक्षा करावी.

चोराशीं जो कोणी अधिकारी संगनमत करील त्यास हाल हाल करून मारावें, हें राजाच्या जनानखान्या-संबंधानें सांगतांना सांगितलेंच आहे.

सरकारी नोकराखेरीज इतर माणसानें दिवसाढवळ्या शेतांतून, घरांतून, किंवा बाजारांतून धान्य, गवत वगैरे कच्चा माल किंवा भांडीं कुंडीं किंवा खाण्यापिण्याचे पदार्थ चोरून नेले तर त्यांस पुढील प्रमाणें शिक्षा करावी. चोरीचा माल १ माषापासून १/४ पणापर्यंत असेल तर तीन पण दंड करावा, किंवा त्याच्या अंगाला शेण चोपडून त्याची धिंड काढावी, १/२ पासून ३/४ पण किंमत असेल तर नऊ पण दंड करावा, अथवा अंगावर शेण किंवा राख फासून अगर कंबरेला मडकें बांधून धिंड काढावी. येकपासून दोन पण किंमत असेल तर चोवीस पण दंड करावा अथवा त्याचें मुंडन करून हद्दपार करावें; २ पासून चार पण किंमत असेल तर ३६ पण, चार पासून पांचपर्यंत ४८ पण, पांच पासून दहापर्यंत पूर्व दंड; दहापासून वीस पर्यंत २०० पण दंड; वीस पासून तीसपर्यंत ५०० पण दंड; तीसपासून चाळीसपर्यंत १००० पण दंड; आणि चाळीसपासून पुढें वधाची शिक्षा द्यावी.

जबरदस्तीनें रात्रीं किंवा दिवसा किंवा संध्यासमयीं वरील अपराध केलेला असेल तेव्हां चोरलेल्या मालाची किंमत अर्धी असली तरी वरच्या दुप्पट दंड करावा; आणि दिवसा किंवा रात्रीं हत्यारबंद होऊन चोरी केली असेल तेव्हां पावपट किंमत असली तरी तोच दंड करावा.

कुटुंबांतील प्रमुख पुरुष, खात्याचा अध्यक्ष किंवा दुसरा एखादा प्रमुख अधिकारी आणि राजा यांच्या नांवाचा खोटा हुकूम किंवा खोटी मोहोर करील तर त्यास अनुक्रमें पर्व म्हणजे ४८ पासून ९६ पण, मध्यम म्हणजे १०१

पासून ५०० आणि उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड अथवा वधाची शिक्षा करावी. अथवा अपराध पाहून त्या मानानें दंड करावा.

न्यायाधीश पक्षकारास धमकी देईल, दरडावील, हांकून देईल, किंवा गप्प बसावयास लावील, तर पहिल्याच अपराधाबद्दल त्यास पूर्व दंड करावा; शिवीगाळ करील तर दुप्पट दंड करावा.

न्यायाधीश जो प्रश्न विचारावयास पाहिजे तो विचारणार नाहीं किंवा विचारावयास नको तो विचारील; प्रश्न विचारून मध्येंच सोडील, उत्तर शिकवील, आठवण देईल किंवा पूर्वीची जबानी दाखवील तर त्यास मध्यम म्हणजे १०० पासून ५०० पण दंड करावा. जर तो प्रस्तुत बाबीसंबंधीं प्रश्न विचारणार नाहीं, अवांतर बाबीसंबंधानें प्रश्न विचारील, अवांतर बाबींत वेळ दवडून वाद पुढें ढकलील, कपटानें खटला पुढें ढकलील, वाद लांबणीवर टाकून पक्षकारास कंटाळा आणून वाद टाकून जावयास लावील, ज्याच्या योगानें निकाल होण्याजोगा आहे असा पुरावा घेण्याची हयगय करील, साक्षीदारास सूचक प्रश्न विचारील, निकालांत निघालेले वाद पुनः घेईल तर त्यास उत्तम म्हणजे ५०० पासून १००० पण दंड करावा. आणि पुनः असा अपराध केल्यास; दुप्पट दंड करून कामावरून दूर करावें.

कचेरींतील लेखक ( कारकून ) बोललेलें लिहून घेणार नाहीं, न बोललेलें लिहून ठेवील, वाईट बोललेलें सुधारून लिहील; चांगलें बोललेले खरडील किंवा त्यांतील अर्थ संदिग्ध करील; तर त्यास पूर्व दंड करावा; किंवा अपराध पाहून दंड करावा.

न्यायाधीश किंवा प्रांताधिकारी निरपराध्याला अन्यायानें सुवर्ण नाण्यांत दंड करील तर त्यास दंडाच्या दुप्पट दंड करावा; किंवा जितका अधिक किंवा कमी दंड केला असेल, तितक्याच्या आठपट दंड करावा. तो जर अन्यायानें शारीरिक शिक्षा देईल, तर त्यासहि शारीरिक शिक्षा भोगावी लागेल किंवा दुप्पट रकम भरपाई द्यावी लागेल. जर तो खऱ्याचें खोटें किंवा खोट्याचें खरें करील, तर रकमेच्या आठपट दंड द्यावा लागेल.

ज्यास दिवाणी तुरुंगांत ठेविलें आहे, त्यास जो अधिकारी सोडील किंवा सोडावयास लावील किंवा तेथें असलेल्या कैद्यांस निजावयास, बसावयास, जेवावयास बोलावयास किंवा हालचाल करावयास हरकत करील किंवा करवील, त्यास तीन पणापासून पुढें दंड करावा.

जो संशयित आरोपीस अटकेंतून सोडील किंवा सोडवील, त्यास मध्यम म्हणजे १०० पासून ५०० पण दंड करावा, व त्यापासून दाव्याची रक्कम घ्यावी. तो जर पक्क्या कैद्यास तुरुंगांतून सोडील किंवा सोडवील तर त्याचें सर्वस्व जप्त करून त्यास वधाची शिक्षा द्यावी.

तुरुंगावरील अधिकाऱ्याला कळविल्याशिवाय जर कोणी कैद्यास हलवील, तर त्यास चोवीस पण दंड; त्याचा छळ करील तर दुप्पट दंड; भलत्याच ठिकाणीं ठेवील किंवा अन्नपाणी बंद करील तर ९६ पण दंड; त्यास फार त्रास देईल किंवा त्यापासून लांच घेईल तर मध्यमदंड; ठार मारील तर १००० पण दंड.

अटकेंत असलेल्या लग्नाच्या बायकोवर, दासीवर किंवा गहाणबाईवर बलात्कार करील, तर त्यास पूर्व दंड; चोराच्या किंवा साथींत मेलेल्या माणसाच्या बायकोवर बलत्कार करील, तर मध्यम दंड; अटकेंत असलेल्या आर्य–स्त्रीवर बलात्कार करील, तर उत्तम दंड.

अटकेंत असलेला मनुष्य अटकेंत असलेल्या आर्य–स्त्रीवर बलात्कार करील, तर त्यास तेथल्या तेथें ठार करावें. अध्यक्षानें आर्य–स्त्रीवर बलात्कार केल्यास वरीलप्रमाणें वधाची शिक्षा; आणि दासीवर बलात्कार केला तर पूर्व दंड म्हणजे ४८ पासून ९६ पण दंड.

कच्च्या अटकेंतून भिंत न फोडतां कैद्यास पळवून लावल्यास वधाची शिक्षा; तुरुंगांतून पळवून लावल्यास, सर्वस्व जप्त करून वधाची शिक्षा द्यावी.

अशा रीतीनें राजानें अगोदर आपल्या नोकरांस शासन करून त्यांना योग्य मार्गास लावावें आणि मग त्यांच्या मदतीनें राज्यांतील लोकांस चांगल्या मार्गावर आणण्याचा प्रयत्न करावा.

---

# अध्याय ८७ वा.



## हस्तपादादि अवयव छेदनाची शिक्षा.

जो कोणी क्षेत्र स्थलांत अत्याचार करील, अथवा खिसे कातरील किंवा त्याहून मोठा अपराध करील त्याचा पहिलाच अपराध असेल, तेव्हां त्याचें बोंट तोडावें, किंवा चोपन्न पण दंड करावा; दुसरा असेल तेव्हां सगळीं बोटें तोडावीं, किंवा शंभर पण दंड करावा; तिसरा असेल, तेव्हां उजवा हात तोडावा किंवा चारशें पण दंड करावा; आणि चवथा असेल, तेव्हां कोणत्याही रीतीनें वध करावा.

जो पंचवीस पणा–खालील किंमतीचे कोंबडे, मुंगुस, मांजरें, कुत्रीं, किंवा डुकरें चोरील किंवा मारील, त्यास चोपन्न पण दंड करावा, किंवा त्याच्या नाकाचा शेंडा तोडावा; चांडाळ किंवा रानांत राहणारे लोक यास या अपराधा-बद्दल अर्धा दंड करावा. फांशांत, जाळ्यांत, किंवा कृत्रिम खड्ड्यांत पकडलेले हरिण, पशु, पक्षी, हत्ती, किंवा मासे जो चोरील, त्यास चोरीचा माल परत द्यायाला लागून वरील प्रमाणें दंड द्यावा लागेल.

ज्या जंगलांत पाळीव पशु किंवा कच्चा माल असतो त्या मधून पशु किंवा कच्चा माल जो बिन हक्कानें नेईल त्यास शंभर पण दंड. घोरपड किंवा मौजेनें पाळावयाचे पशुपक्षी चोरले किंवा ठार केले तर किंमतीच्या दुप्पट दंड.

कारु म्हणजे खेड्यांतील बलुतेदार, कारागीर, गवई किंवा बैरागी, यांनीं क्षुल्लक जिन्नस चोरल्यास शंभर पण दंड, भारी जिन्नस चोरल्यास दोनशें पण दंड, आणि शेतीपैकीं जिनसा चोरल्यासहि तितकाच दंड.

जो परवानगी–वांचून किल्ल्यांत शिरेल, अथवा तटाच्या भोंकांतून आंत ठेविलेलें द्रव्य घेऊन पळून जाईल, त्याची मान छाटावी, अथवा दोनशें पण दंड करावा.

जो गाडी, किंवा नाव, किंवा लहान सहान जनावर, चोरील त्याचा एक पाय तोडावा किंवा तीनशें पण दंड करावा.

द्यूता–करितां भाड्यानें देण्यासाठीं सरकारानें तयार केलेल्या 'काकणी' फांशासारखे बनावट फांसे जो तयार करील, किंवा द्यूतास लागणारें इतर सामान जो बनावट तयार करील, किंवा द्यूतांत जो हात चलाखीनें फसवील, त्याचा एक हात तोडावा, अथवा त्यास चारशें पण दंड करावा.

चोरास आणि परस्त्री गमन करणारास जी स्त्री मदत करील, त्या भ्रष्ट स्त्रीचें नाक व कान कापावें, अथवा पांचशें पण दंड करावा, आणि मदत करणारा पुरुष असल्यास दुप्पट दंड करावा.

जो एक मोठें जनावर, दास अथवा दासी पळवून नेईल, अथवा जो प्रेतावरील कपडे लत्ते किंवा इतर डाग नेऊन विकील, त्याचे दोनी पाय तोडावे, अथवा सहाशें पण दंड करावा.

जो श्रेष्ठ वर्णांतील मनुष्याचे, किंवा गुरूचे, हात पाय हिसकील, किंवा जो राजाच्या गाडींत, अथवा घोडा वगैरे वाहनावर, बसेल, त्याचा एक हात व एक पाय तोडावा, अथवा सातशें पण दंड करावा.

जो शूद्र स्वतःस ब्राह्मण म्हणवील, जो मनुष्य देवास दिलेलें द्रव्य चोरील, अथवा राजा विरुद्ध अप्रीति उत्पन्न करील, अथवा एखाद्याचे दोन्ही डोळे फोडील, त्याचे डोळे विषारी अंजन घालून अंधळे करावे, किंवा आठशें पण दंड करावा.

जो चोरास किंवा परस्त्रीसमागम करणारास सोडवील, जो राजाच्या हुकुमांत कमी जास्त अक्षरें लिहील, जो अविवाहित स्त्रीस अथवा दासीस तिच्या दागिन्यासह पळवून नेईल, जो खोटा किंवा कपटाचा व्यवहार करील, अथवा जो कुजकें मांस विकील, त्याचा डावा हात व दोन्ही पाय तोडावे, अथवा नउशें पण दंड करावा. जो मनुष्याचें मांस विकील, त्याचा वध करावा.

जो देवाच्या मूर्ति किंवा पशू चोरून नेईल, मनुष्यास पळवून नेईल, शेत, घर, सोनें, सुवर्ण नाणीं, रत्नें, किंवा पीक बिन हक्कानें कबज्यांत घेईल, त्यास उत्तम म्हणजे पांचशेंपासून हजार पण दंड करावा, किंवा नुसत्या वधाची शिक्षा करावी.

अपराध्याचा स्वभाव, अपराधाचें स्वरूप, कारणाचें तारतम्य, पूर्वकाळीन व तत्कालीन परिस्थिति, काल व स्थल, याचा विचार करून आणि अपराधी राजघराण्यांतील आहे, किंवा सामान्य जनापैकीं आहे किंवा कनिष्ठ वर्गातला आहे हीं विशेष लक्षांत घेऊन अधिकाऱ्यानें उत्तम, मध्यम, किंवा पूर्व दंड करावा.

---

# अध्याय ८८ वा.



## साध्या वधाची व हाल करून वधाची शिक्षा.

भांडाभांडींत मनुष्याचा खून करणारास हाल हाल करून मारावें; सात रात्रींत तो मनुष्य मेला, तर मारणारास साध्या वधाची शिक्षा करावी; पंधरवड्यांत मेला, तर उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड, आणि एक महिन्यांत मेला, तर पांचशें पण दंड व मयताच्या वारसास औषधोपचाराचा खर्चहि दिला पाहिजे.

शस्त्रानें जखम करणारास उत्तम म्हणजे पांचशेंपासून हजार पण दंड; (दारूच्या) अंमलांत शस्त्रानें जखम करणाराचा हात तोडावा; बेसावधपणें जखम केल्यास दोनशें पण दंड. जखमी मनुष्य तत्काल मेल्यास मारणाराचा वध करावा.

पोटावर प्रहार करून स्त्रीचा गर्भपात करणारास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड, औषध देऊन गर्भपात करणारास मध्यम म्हणजे दोनशें पासून पांचशें पण दंड, आणि त्रास देऊन गर्भपात करणारास पूर्व म्हणजे अठ्ठेचाळीस पासून शहाण्णवपण दंड करावा.

स्त्रीस किंवा पुरुषास हल्ला करून ठार करणारा, जबरीनें वेश्यागमन करणारा, अन्यायानें जनतेला पीडा देणारा दरवड्याची धमकी देणारा, रस्त्यांत लुटणारा किंवा अडविणारा, घरफोडी करणारा, राजाचे हत्ती, घोडे, रथ यांचा विध्वंस करणारा किंवा त्यांची चोरी करणारा—यांस सुळावर चढवावें.

जो मनुष्य वरील माणसाचें प्रेत दहन करील, किंवा दुसऱ्या ठिकाणीं नेईल, त्यासहि तशीच शिक्षा अथव उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड होईल.

जो मनुष्य खुनी माणसास किंवा चोरास अन्न, वस्त्र, सामग्री, अग्नि किंवा सल्ला मसलत देईल अगर इतर रीतीनें त्याची चाकरी करील त्यास उत्तम म्हणजे पांचशेंपासून हजार पण दंड करावा; न समजून देईल, तेव्हां त्यास नुसती ताकीद द्यावी. खुनी माणसाची किंवा चोराचीं बायकामुलें गुन्ह्यांत सामील नसतील, तर त्यांस सोडून द्यावें; सामील असतील, तर पकडावें.

जो सिंहासन मिळविण्याची खटपट करील; राजाच्या जनानखान्यांत अत्याचार करील, रानटी लोकांस किंवा शत्रु राजांस आपल्या राजाविरुद्ध उठवील, अथवा किल्ल्यांत राहणाऱ्या लोकांत किंवा देशांतील लोकांत राजाविषयीं अप्रीति उत्पन्न करील, त्याच्या डोक्यास व हातास पलिते बांधून त्यास जाळून ठार करावें. तो ब्राह्मण असल्यास त्यास अंधार कोठडींत कोंडून ठेवावें.

आई, बाप, मुलगा, भाऊ, गुरु किंवा तपस्वी, यांचा खून करणारास अंग व डोकें पेटवून मारावें; त्यांचा अपमान करणाराची जीभ छाटावी, आणि त्यांस चावणाराचा तो अवयव काढून टाकावा.

यदृच्छेनें मनुष्याचा खून हातून घडल्यास साध्या वधाची शिक्षा, व जनावरांचा कळप चोरणारासहि साध्या वधाची शिक्षा.

कळप म्हणजे दहापर्यंत जनावरें.

पाण्यानें भरलेलें तळें जो फोडील, त्यास त्याच पाण्यांत बुडवावें; कोरडें तळें फोडील, त्यास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड करावा.

विषप्रयोग करणाऱ्या पुरुषास व पुरुषाचा खून करणाऱ्या स्त्रीस ती गर्भिणी नसल्यास पाण्यांत बुडवावें. स्त्री गर्भिणी असल्यास बाळंत होऊन एक महिना झाल्यावर बुडवावें.

जी स्त्री नवऱ्याचा, गुरूचा किंवा अपत्याचा खून करील, अथवा आग लावील, अथवा विषप्रयोग करील, अथवा कोणाचे सांधे कापील, तिला बैलाच्या पायाखालीं तुडवावें.

जो मनुष्य गायरानास, शेतास, खळ्यास, घरास, राखीव जंगलास किंवा हत्तींच्या रानास आग लावील, त्यास आगींत टाकून जाळावें.

जो मनुष्य राजाचा अपमान करील, राजरहस्य फोडील, राजाविषयीं विपरीत कंड्या उठवील अथवा ब्राह्मणाचें अन्न चाखून दूषित करील, त्याची जीभ उपटून टाकावी.

जो शस्त्र अथवा चिलखत चोरील, तो जर लष्करी शिपाई नसेल, तर त्यास बाण मारून ठार करावें; लष्करी शिपाई असेल तर त्यास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड करावा.

जो दुसऱ्याचें जननेंद्रिय कापील, त्याचें जननेंद्रिय कापावें; जीभ किंवा नाक कापील, त्याचीं बोटें तोडावीं.

अशा क्लेशकारक शिक्षा थोर थोर पुरुषांनीं आपल्या शास्त्रग्रंथांत सांगितल्या आहेत; परंतु ज्या अपराध्यानें हाल न करितां खून केला असेल, त्यास साध्या वधाची शिक्षा द्यावी, हें धर्मास अनुसरून आहे.

---

# अध्याय ८९ वा.



## अविवाहित कन्यासमागम.

जिला ऋतु प्राप्त झाला नाहीं, अशा समानवर्णांतील अविवाहित कुमारीवर जो बलात्कार करील, त्याचा हात तोडावा, व त्यास शंभर पण दंड करावा; कुमारी मेल्यास, त्याचा वध करावा.

ऋतु प्राप्त झालेल्या अविवाहित कुमारीवर बलात्कार करणाराचें मधलें बोट तोडावें, व त्यास दोनशें पण दंड करून, कुमारीच्या बापास नुकसान भरपाई द्यावयास लावावें.

कोणीहि स्त्रीच्या इच्छेविरुद्ध तिजशीं समागम करितां कामा नये.

स्त्रीच्या इच्छेनें तिजशीं समागम करणारास चोपन्न पण दंड, व स्त्रीस अर्धा दंड.

ज्यानें स्त्रीला शुल्क अथवा विवाह–धन अगोदर देऊन ठेविलें आहे, तो मीच, असें सांगून फसविणाराचा हात तोडावा, व त्यास चारशें पण दंड करून शुल्क धन द्यावयास लावावें.

कुमारीला विटाळाच्या सात पाळ्या गेल्या असून सुद्धां, ज्या पुरुषाचा तिजबरोबर विवाह ठरला असून झाला नाहीं, त्यानें तिजशीं समागम करण्यास हरकत नाहीं, व तिच्या बापास नुकसानभरपाईहि त्यानें देण्याचें कारण नाहीं. कारण, कुमारीस ऋतु प्राप्त झाला, तरी ज्या अर्थीं त्यानें तिचा विवाह केला नाहीं, त्या अर्थीं तिजवरील त्याची सत्ता नाहींशी झाली असें समजावें.

जिला ऋतु प्राप्त होऊन तीन वर्षें होऊन गेलीं आहेत, अशा कुमारीशीं समान वर्णांतील पुरुषानें गमन केलें, तर तो अपराधी होत नाहीं. त्यापुढें अन्य वर्णांतील पुरुषहि अपराधी होत नाहीं, मात्र त्या कुमारीच्या अंगावर अलंकार नसले पाहिजेत. कारण बापाचे अलंकार हरण केल्यास ती चोरी समजली जाईल.

एकाकरितां ठरविलेल्या कुमारीचा विवाह दुसऱ्याशीं लावणारास दोनशें पण दंड.

अशा स्त्रीच्या इच्छेविरुद्ध त्यानें तिच्याशीं समागम करितां कामा नये.

एक मुलगी दाखवून दुसरीच समान वर्णांतील देणारास शंभर पण, व निकृष्ट वर्णांतील देणारास दुप्पट दंड.

या अपराधांत दाखविल्या जाणाऱ्या कुमारीस चोपन्न पण दंड करावा; आणि वरानें दिलेलें विवाहधन व विवाहासाठीं केलेला खर्च अपराध्याकडून त्यास भरून देववावा.

जी मुलगी देण्याचें वचन गुंतलें आहे, ती मुलगी न दिल्यास वरील दंडाच्या दुप्पट दंड करावा.

ज्या 'रक्ताची' मुलगी देण्याचा करार झाला, त्यावांचून अन्य 'रक्ताची' मुलगी जो लग्नांत आणील, अथवा जो मुलीची खोटी स्तुति करून ती लग्नांत देईल, त्यास दोनशें पण दंड करावा, आणि वराचें विवाह–धन व लग्न–खर्च वरास देववावा.

अशा स्त्रीच्या इच्छेविरुद्ध त्यास तिजशीं समागम करतां येणार नाहीं.

ज्या स्त्रीचा समानवर्णांतील पुरुषाशीं समागम झाला आहे, तिनें जर सदर समागमास संमति दिली असेल, तर तिनें बारा पण दंड दिला पाहिजे; आणि तिला मदत करणाऱ्या स्त्रीनें दुप्पट दंड दिला पाहिजे.

स्त्रीच्या इच्छेविरुद्ध समागम करणाऱ्या पुरुषास जी स्त्री मदत करील, तिला शंभर पण दंड करावा, आणि तिजकडून अपकृत स्त्रीला भरपाई दाखल शुल्क धन देववावें.

जी स्त्री आपण होऊन परपुरुषास वश झाली असेल, तिनें राजाची दासी होऊन राहिलें पाहिजे.

गांवाबाहेर गैर कायदा स्त्रीपुरुष समागम घडला असेल, तेव्हां दुप्पट दंड करावा, त्याच प्रमाणें या अपराधासंबंधीं खोटा अपवाद करणारासहि दुप्पट दंड करावा.

जबरदस्तीनें मुलीस पळवून नेणारास दोनशें पण, आणि मुलीच्या अंगावर दागिने असल्यास, उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड करावा. पुष्कळ लोकांनीं मिळून मुलीस पळवून नेलें असेल, तेव्हां प्रत्येकास वरील प्रमाणें निरनिराळा दंड करावा.

वेश्येच्या मुलीबरोबर समागम करणारास चोपन्न पण दंड करावा, व त्याजकडून मुलीच्या आईस तिच्या प्राप्तीच्या सोळापट रकम देववावी.

दासाची किंवा दासीची मुलगी दासी नसून, तिजशीं समागम करणारास चोवीस पण दंड करावा, व त्याजकडून मुलीस शुल्क–धन, वस्त्रालंकार वगैरे देववावे.

अपराध्यांच्या सांथीदारांस अपराध्यांच्या अर्धा दंड करावा.

ज्या स्त्रीचा नवरा देशांतरास गेला आहे ती जर दुर्मार्गानें जाऊं लागली, तर नवऱ्याच्या आप्तानें किंवा नोकरानें तिला आश्रय द्यावा. त्याच्या आश्रयानें राहून स्त्रीनें नवऱ्याची वाट पहावी. नवऱ्यानें परत आल्यानंतर क्षमा केल्यास, उभयतां दोषमुक्त समजावे; पण त्यानें क्षमा केली नाहीं, तर स्त्रीचे नाककान कापून जाराचा वध करावा.

बलात्कारानें झालेला संभोग, समागम समयीं झालेल्या शरीरावरील खुणेवरून, किंवा तज्ज्ञ माणसांच्या जबानीवरून, किंवा स्त्रीच्या जबानीवरून, ठरवावा.

शत्रूनें किंवा रानटी लोकांनीं हरण करून नेलेली, पुरांत बुडालेली, अरण्यांत चुकलेली किंवा दुष्काळांत मेली समजून टाकून दिलेली परस्त्री, जो संकटमुक्त करील, त्यानें त्या स्त्रीशीं करार झाला असल्यास, तिला भोगावें. सदर स्त्री श्रेष्ठवर्णांतील असून लेंकुरवाळी असेल व समागम इच्छीत नसेल, तर तिनें आपणास संकट मुक्त करण्याबद्दल रक्कम दिली पाहिजे.

चोराच्या हातांतून, नदीच्या प्रवाहांतून किंवा राज्यांतील धामधुमींतून परस्त्रीला जो सोडवील, अथवा, अरण्यांत चुकलेल्या किंवा मेली म्हणून टाकून दिलेल्या परस्त्रीला जो सोडवील, त्या पुरुषानें, करार झाला असेल, तर तिजशीं समागम करावा.

परंतु जी राजाच्या हुकुमावरून टाकिलेली आहे, जी आप्तांनीं टाकून दिलेली आहे, जी श्रेष्ठ वर्णांतील आहे; जी इच्छीत नाहीं; अथवा जिला पूर्वींचीं मुलें आहेत; अशा स्त्रीस रक्कम घेऊन किंवा इतर मोबदला घेऊनहि सोडवूं नये.

---

# अध्याय ९० वा.



## अत्याचार व शिक्षा.

ब्राह्मणास अभक्ष्य भक्षण व अपेयपान करावयास लावणारास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड; क्षत्रियास तसें करावयास लावणारास मध्यम म्हणजे दोनशें पासून पांचशें पण दंड; वैश्यास लावणारास पूर्व म्हणजे अठ्ठेचाळीस पासून शहाण्णव पण दंड; आणि शूद्रास लावणारास चोपन्न पण दंड.

जो आपण होऊन अभक्ष्य भक्षण व अपेयपान करील, त्यास हद्दपार करावें.

जो दुसऱ्याच्या घरांत जबरदस्तीनें दिवसा प्रवेश करील, त्यास पूर्व म्हणजे अठ्ठेचाळीस पासून शहाण्णव पण व रात्रीं प्रवेश करील, त्यास मध्यम म्हणजे दोनशें पासून पांचशें पण दंड करावा; दिवसा किंवा रात्रीं हत्यारबंद होऊन प्रवेश करील, त्यास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड करावा.

भिक्षुक; दारोदार फेरी घालणारा व्यापारी; अंमलांत असलेला मनुष्य; वेडा, किंवा संकटग्रस्त शेजारी बळेंच घरांत प्रवेश करून आला; तरी तो अपराधी होत नाहीं;—मात्र त्यास अन्य कारणावरून बंदी अथवा मनाई नसली पाहिजे.

जो मनुष्य अपरात्रीं घराच्या गच्चीवर किंवा छपरावर चढेल, त्यास, तें घर स्वतःचें असलें तरी, पूर्व म्हणजे अठ्ठेचाळीस पासून शहाण्णव पण दंड; आणि दुसऱ्याचें असेल तेव्हां, मध्यम म्हणजे दोनशें पासून पांचशें पण दंड करावा.

जो मनुष्य गांवाचें किंवा बगीचाचें कुंपण कांपील, त्यासाहि मध्यम म्हणजे दोनशें पासून पांचशें पण दंड करावा.

फिरस्ते व्यापारी गांवांत येतील त्यांनीं, आपल्याजवळ इतका इतका माल किंवा पैसा आहे, हें जाहीर करून मुक्काम करावा. त्यांजवळ असलेल्या मालापैकीं अथवा पैशापैकीं जो भाग परगांवीं गेला असेल, तो रात्रीं चोरला गेला किंवा नाहींसा झाला, तर गांवकामगारानें भरून दिला पाहिजे. दोन गांवांच्या मधील भागांत चोरला गेला असेल, किंवा नाहींसा झाला असेल, तेव्हां गायरानांवरील अधिकाऱ्यानें तो भरून दिला पाहिजे, दोन गांवांच्या मध्यें गायरानें नाहींत, अशा ठिकाणीं चोरिला गेला असेल, किंवा नाहींसा झाला असेल, तेव्हां 'चोररज्जुक'

नामक अधिकाऱ्यानें भरून दिला पाहिजे; परंतु हें ठिकाण संरक्षित नसेल, ( म्हणजे याठिकाणीं ' चोररज्जुक ' अधिकारी नेमलेला नसेल ), तेव्हां सदर मर्यादेंतील लोकांनीं तो भरून दिला पाहिजे; सदर मर्यादेंत वस्तीं नसेल, तेव्हां आसपासच्या पांच गांवांतील किंवा दहा गांवांतील लोकांनीं तो भरून दिला पाहिजे.

जो पडक्या घरास अपाय करील, त्यावर दंड पारुष्याचा म्हणजे अंगावर चालून जाण्याचा अपराध लागू झाला, असें समजावें. जिला कांहीं आधार नाहीं, जिच्यावरील बाजूस लांकडी दांडा किंवा शस्त्र लोंबत आहे, जिला आधार तुटका मोडका आहे, किंवा जिला वर आच्छादन नाहीं, अशा गाडीस अपाय केला, अथवा खड्ड्यांत किंवा विहिरींत ढकलून दिलें, तरहि दंडपारुष्य, म्हणजे अंगावर चालून जाणें, हा अपराध समजावा.

जो झाड तोडील, जो पाळीव जनावराचा कासरा चोरील, जो जनावरास न दावतां भर घांव पळवील, जो गाडीवर किंवा हत्तीवर लांकूड, ढेंकूळ, दगड काठी किंवा बाण फेंकील, अथवा जो गाडी किंवा हत्ती पाहून हातवारे करील, त्यावरहि दंडपारुष्य म्हणजे अंगावर चालून जाणें हा अपराध लागू होतो.

गर्दींत ' दूर व्हा, दूर व्हा ' असें ओरडत चालणाऱ्या मनुष्यावर धक्काबुक्कीचा अपराध लागू होणार नाहीं.

जो मनुष्य स्वतः क्षोभविलेल्या हत्तीच्या पायांखालीं तुडविला गेला, त्यानें एक ' द्रोण ' कमी मापाचा दारूचा घडा, पुष्पमाला, गंध, आणि दांत साफ करण्याकरितां जरूर तेवढें कापड दिलें पाहिजे; कारण; हत्तीच्या पायांखालीं मरण आल्यास, तें अश्वमेध–यज्ञांतील अवभृत स्नानासारखें आहे, म्हणून त्यास पादप्रक्षालन असें म्हटलें आहे.

गैर सावधपणें, अथवा मुकाट्यानें, अथवा हत्तीच्या वाटेस न जातां चालणाऱ्या मनुष्यास हत्तीनें मारिलें, तर माहुतास अथवा हत्ती हांकणारास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड करावा.

शिंगें किंवा तीक्ष्ण दांत असलेल्या जनावरानें माणसास इजा केली असतां, जनावराचा मालक जर त्यास सोडवावयास येणार नाहीं, तर पूर्व म्हणजे अठ्ठेचाळीस पासून शहाण्णव पण दंड करावा; त्यास काकुळतीनें विनविलें असतांना सुद्धां तो तसें करणार नाहीं, तर दुप्पट दंड करावा.

जो मनुष्य शिंगें किंवा तीक्ष्ण दांत असलेल्या जनावरांस एकमेकांस मारूं देईल, त्यानें जनावराची किंमत व तितकाच दंड दिला पाहिजे.

जो मनुष्य देवास वाहिलेल्या जनावरावर, बैलावर, पोळावर किंवा कालवडीवर बसेल, त्यास पांचशेंपण, आणि जो मनुष्य त्यांस दूर हांकून लावील, त्यास उत्तम म्हणजे पांचशेंपासून हजार पण दंड करावा.

ज्यांपासून लोंकर किंवा दूध मिळतें, अथवा जीं ओझ्याला किंवा गाडीला किंवा बसावयास उपयोगी पडतात, अशीं लहानसहान जनावरें चोरिल्यास, जनावर परत केलें पाहिजे. शिवाय जनावराच्या किंमती इतका दंड दिला पाहिजे.

देवकार्यावांचून किंवा पितृकार्यावांचून वरील जनावर निष्कारण हांकून लाविल्यासहि वरीलप्रमाणें शिक्षा.

मानेवरील जूं कायम असून नाकांतील वेसण तुटल्यामुळें गाडीस जोडलेलें जनावर समोर आलेल्या माणसाच्या अंगावर धांवून त्यास इजा करील, किंवा गाडी सुद्धां मागें मागें सरतां सरतां जाणाऱ्या येणाऱ्या माणसांच्या किंवा पशूंच्या गर्दींत एखाद्यास इजा करील, तर त्याबद्दल मालक अपराधी होत नाहीं; परंतु इतर कारणानें इजा झाल्यास मालक मनुष्यास किंवा प्राण्यास झालेल्या अपायाबद्दल शिक्षेस पात्र होतो, व त्यास इतरत्र सांगितल्याप्रमाणें नुकसान भरपाई करून द्यावी लागते, मानवेतर प्राण्यास अपाय झाला असल्यास, तसा प्राणीहि द्यावा लागतो.

हांकणारा अज्ञान असेल, तर गाडींत बसलेला मालक शिक्षेस पात्र होतो; गाडींत मालक नसेल, तर गाडींत बसलेला मनुष्य किंवा हांकणारा, वयांत असल्यास, शिक्षेस पात्र होतो, ज्या गाडींत फक्त अज्ञान मूल आहे; किंवा जींत कोणीहि बसलेला नाहीं; ती राजानें जप्त करावी.

जो मनुष्य जादू टोणा करून दुसऱ्यास अपाय करूं पाहील, त्यास तोच अपाय भोगावा लागेल. परंतु नवरा जर बायकोनें आपणावर प्रेम करावें म्हणून तसें करील, किंवा अमुक मुलगी आपणास बायको मिळावी म्हणून जर कोणी त्या कन्येस जादू टोणा करील, किंवा नवऱ्यानें आपणावर प्रेम करावें म्हणून बायको जादू टोणा करील, तर दोष नाहीं. पण त्यापासून इतरास अपाय घडला, तर मात्र जादू करणारास मध्यम म्हणजे दोनशें पासून पांचशें पण दंड करावा.

मावशी, आत, मामी, गुरुपत्नी, सून, मुलगी किंवा बहीण वश व्हावी म्हणून जादू करणाराचें लिंग कापून त्यास वधाची शिक्षा करावी; त्यास वश होणाऱ्या स्त्रीसहि तशी शिक्षा करावी; दास नोकर, किंवा मजुरीनें ठेविलेला मनुष्य यास वश होणाऱ्या स्त्रीसहि तीच शिक्षा करावी.

असंरक्षित ब्राह्मण स्त्रीस जादूनें वश करूं पाहणाऱ्या क्षत्रियास उत्तम म्हणजे पांचशें पासून हजार पण दंड करावा. वैश्यानें तसें केल्यास सर्वस्व हरण करून घ्यावें; आणि शूद्रास पेटवलेल्या चटईत गुंडाळून जाळावें. अभिषिक्त राजाच्या भार्येशीं गमन करणारास कढईत जाळावें.

श्वपाक अथवा अतिहीन जातींतील स्त्रीशीं समागम करणारास कपाळावर खूण करून हद्दपार करावें, किंवा त्यास त्या जातींत घालावें. शूद्र श्वपाकानें हीन जातींतील परस्त्रीशीं गमन केल्यास, त्याचा वध करावा, व स्त्रीचें नाककान कापावें.

संन्यासिनीशीं गमन करणारास चोवीस पण दंड, व संन्यासिनी आपण होऊन वश झाली असल्यास, तिलाहि तितकाच दंड करावा.

वेश्येवर बलात्कार करणारास बारा पण दंड करावा.

अनेकांनीं एकीवर अत्याचार केला असेल, तेव्हां प्रत्येकास चोवीस पण दंड करावा.

सृष्टी विरुद्ध स्त्रीशीं संभोग करणारास पूर्व म्हणजे अठ्ठेचाळीसपासून शहाण्णव पण; व पुरुषाशीं करणारासहिं तितकाच दंड करावा.

जो मूढ होऊन पशुपक्ष्यादि प्राण्याशीं संभोग करील, त्यास बारा पण दंड करावा, आणि जो देवादिकांच्या मूर्तींवर अत्याचार करील, त्यास दुप्पट दंड सांगितला आहे.

राजानें निरपराधी माणसास दंड केला; म्हणजे त्यानें दंडाच्या तीसपट रक्कम उदकांत वरुण-देवाच्या नांवानें सोडून; तदनंतर ब्राह्मणांस वांटून द्यावी.

अन्यायानें दंड केल्यामुळें राजास लागलेलें पाप याच्या योगानें धुतलें जातें; कारण दुराचारानें वागणाऱ्या लोकांस शासन करणारा वरुण हा आहे.



# कौटिलीय अर्थशास्त्र (उत्तरार्ध) अनुक्रमणिका.





## परिशिष्टें.



## उत्तरार्ध भाग संस्कृत व मराठी भाषांतर.

## अधिकरण ५ वें. गुप्तदंड, अधिकाऱ्यांचें वर्तन.



## अधिकरण ६ वें. साम्राज्याचें मूळस्थान.



## अधिकरण ७ वें. सहाप्रकारचें धोरण.



## अधिकरण ८ वें. संकटांचा तारतम्य विचार.

## अधिकरण ९ वें. शत्रूवर स्वारी.



## अधिकरण १० वें. युद्धाविषयीं.



## अधिकरण ११ वें. संघाचें वर्तन.



## अधिकरण १२ वें. दुर्बलाचें बलसंपन्न होईपर्यंतचें वर्तन.



## अधिकरण १३ वें. किल्ला काबीज करण्याचा उपाय.



## अधिकरण १४ वें. मंत्रतंत्रप्रयोग



## अधिकरण १५ वें. तंत्रयुक्ति.



### चाणक्यसूत्रें, सूची, संस्कृत कोश वगैरे.

॥ श्री ॥

# कौटिलीय-अर्थशास्त्र.

( उत्तरार्ध, मूळ संस्कृत व संपूर्ण मराठी भाषांतर. )

लेखकः—१ रा. रा. जनार्दन सखाराम करंदीकर,
दुय्यम संपादक " केसरी " पुणें.

२ कै. रा. रा. बळवंत रामचंद्र हिवरगांवकर,
नगर.

प्रकाशकः—गजानन रघुनाथ मुळे,
करजत, जि. कुलाबा.

सन १९२९.

किंमत ४ रुपये.

# प्रकाशकाचें हृद्गत.



अनेक आपत्तींना तोंड देऊन या ग्रंथाच्या प्रकाशनाचें जबाबदारीचें काम पुरें झाल्याबद्दल सर्वव्यापी परमेश्वराचे आभार मानणें हें माझें पहिलें कर्तव्य होय.

मुंबईंत " पुरंदरे आणि कंपनी " या नांवानें वडिलोपार्जित पुस्तकविक्रीचा व पुस्तकप्रकाशनाचा सुमारें ३२ वर्षांचा जुना धंदा. सन १९११ सालीं वडील निवर्तल्यावर सुमारें ७–८ वर्षांनंतर भागीदाराचा व आमचा धंद्याबाबत मतभेद झाल्यामुळें, आपसांत भागीदारीचा निकाल करून करजत येथें स्वतःची शेती व घर असल्यामुळें, येऊन राहिलों. शहरांतून खेड्यांत एकदम येऊन राहिल्यामुळें दिवस कंटाळवाणे जाऊं लागले. माझें पूर्वीचें शिक्षण तळेगांव येथील जुने " समर्थ विद्यालयांत " झालेलें. तें बंद झाल्यानंतर नागपूर येथील " महाराष्ट्र " वर्तमानपत्राचे संपादक रा. गोपाळ अनंत ओगले यांचे जवळ दोन वर्षें शिक्षण घेतलें. पोटार्थी शिक्षणाऐवजीं खऱ्या शिक्षणाचा अशा रीतीनें अल्पांश तरी मला लाभल्यामुळें, नोकरीच्या फंदांत न पडतां वडिलोपार्जित धंदाच पुढें चालवावा असें मनानें ठरविलें. डायऱ्या, पचांगें व इतर धार्मिक पुस्तकें छापणें सुरू केलेंच होतें. चांगलीं पुस्तकें प्रकाशित करावींत हा माझा मुख्य हेतु असल्यामुळें कोणकोणत्या पुस्तकांची निवड करावी अशा विचारांत असतां, " चित्रमय जगत " च्या एका अंकांत " कौटिलीय–अर्थशास्त्र" या ग्रंथाचे कांहीं उतारे मराठी भाषांतरासह छापलेले माझ्या वाचण्यांत आले. त्याचवेळीं असा उपयुक्त ग्रंथ छापण्याचा विचार मी कायम केला. सन १९१९ सालीं, पुण्याचे प्रसिद्ध बुकसेलर रा. रा. लक्ष्मण नारायण गोडबोले यांच्याकडे मी गेलों असतां रा. तात्यासाहेब करंदीकर हे पुण्यासच आहेत असें समजल्यावरून मी त्यांचे घरीं भेटण्यासाठीं मुद्दाम गेलों. रा. तात्यासाहेब करंदीकर हे समर्थविद्यालयांतील माझे गुरुवर्य असल्यामुळें बऱ्याच वर्षांनीं भेट झाली म्हणून त्यांनीं माझी घरगुती चौकशी करून "पुढें काय करणार" असा मोठ्या कळकळीनें प्रश्न केला. मी माझी सर्व हकीकत सांगून "कौटिलीय–अर्थशास्त्र" या ग्रंथाचें जर कोणी मराठी भाषांतर करून देईल तर तें छापण्यास मी तयार आहें; भाषांतर करणारा योग्य इसम दाखवा, अगर भाषांतर करण्याचें काम तुम्हीं अंगावर घ्या, असा माझा हेतु सांगितला. हा ग्रंथ छापण्याचा माझा दृढनिश्चय झालेला पाहून, ग्रंथ छापण्याची जबाबदारी पार पाडतां येईल कीं नाहीं अशी शंकाकुशंका न घेतां भाषांतर करून देण्याचें काम त्यांनीं अंगावर घेतलें. या गोष्टीस ९ वर्षें झालीं, मध्यंतरीं बऱ्याच अडचणी आल्या. हा ग्रंथ मी छापणार असें कळतांच अनेकांनीं ग्रंथ केव्हां छापणार याबद्दल आतुरतेनें चौकशी केली, हा ग्रंथ खपणार नाहीं, यांत अडकविलेलें भांडवल मोकळें होणार नाहीं म्हणून या भानगडींत पडूं नये असेंही कित्येकांनीं सुचविलें, त्यामुळें अनेक अमोलिक संस्कृत भाषेंतील ग्रंथरत्नें मराठी भाषांतर करून प्रकाशित करावीं अशी माझी योजना रसातळास जाते कीं काय अशी भीतीही वाटूं लागली. परंतु माझा दृढनिश्चय, व रा. तात्यासाहेब करंदीकरांची चिकाटी या जोडगोळीमुळें हा ग्रंथाच्या भाषांतराचें कठीण काम व प्रकाशन पुरें होऊन वाचकांच्या हातांत हा समग्र ग्रंथ देण्यास अत्यंत आनंद होत आहे. महाराष्ट्रांतील विद्वान् मंडळी, आणि ज्यांच्या कर्तबगारीवर देशाचें भाग्य अवलंबून असतें अशी तरुण पिढी व पुढारी मंडळी या सर्वांनीं या ग्रंथाचा अभ्यास करून आपापल्या कर्तव्यास जागृत राहावें अशी आग्रहाची विनंति करून माझें हृद्गत येथेंच पुरें करितों.

ग. र. मुळे,
प्रकाशक.



# प्रास्ताविक दोन शब्द.



कौटलीय अर्थशास्त्राचें मराठी भाषांतर समग्र पूर्ण होऊन ह्या उत्तरार्थ वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग आला याबद्दल मला अत्यंत आनंद होत आहे. हातीं घेतलेलें कार्य तडीस गेलें ही खरोखरच श्रीसमर्थांची कृपाच होय. भाषांतराचें काम पत्करलें त्यावेळीं कल्पनाहि नव्हती अशा अनेक अडचणी मध्यंतरीं उपस्थित झाल्या. तरीपण केवळ ईश्वरी कृपेनेंच त्यांचें निरसन होऊन या जबाबदारींतून आज मोकळा झालों. या प्रसंगीं माझे सहकारीमित्र **श्रीयुत ब. रा. हिवरगांवकर** हे या आनंदांत वांटा घेण्याला राहिले नाहींत या विषयीं मनाला अत्यंत खेद होत आहे. पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें **श्रीयुत हिवरगांवकर** हे भाषांतरास मदत करावयास पुढें सरसावले म्हणूनच हें कार्य पूर्ण झालें. अर्थातच या कामांत माझ्यापेक्षां त्यांचे परिश्रमच अधिक झाले आहेत. पूर्वार्धांतल्या प्रमाणेंच या उत्तरार्धाचेंहि भाषांतर प्रथम त्यांनींच तयार केलें आणि नंतर तें पाहून माझ्या कल्पनेप्रमाणें त्यांत कांहीं फेरफार करून तें मी छापावयास दिलें. पण या भाषांतराखेरीज या उत्तरार्धास जोडलेली विस्तृत प्रस्तावना **श्रीयुत हिवरगांवकर** यांनींच परिश्रमपूर्वक तयार केली आणि तिच्यांत मी कोणताहि फेरबदल केला नसल्यानें त्या प्रस्तावनेखालीं त्यांचें एकट्याचेंच नांव दिलें आहे. त्या प्रस्तावनेंत प्रथित केलेले विचार मला संमत नाहींत असा याचा अर्थ कोणीहि समजूं नये. प्रस्तावना लिहिण्याची सगळी मेहनत त्यांची एकट्याचीच असल्यामुळें त्यांच्या प्रस्तावनेच्या खालीं माझें नांव घालून त्यांच्या श्रेयांत मी फुकट वांटेकरी होणें अप्रशस्त असल्यानें माझें नांव त्या प्रस्तावनेस जोडलें नाहीं.

या प्रस्तावनेंत **श्रीयुत हिवरगांवकर** यांनीं कौटिलीय अर्थ–शास्त्राचा साकल्येंकरून विचार करून भारतीय राजनीति शास्त्राची कसकशी उत्क्रांति होत गेली याचें विस्तृत विवेचन केलें आहे. ही प्रस्तावना पूर्ण करून ती छापखान्याकडे पाठवून देण्यांत आली. पण तिच्या छपाईस सुरवात करण्याचे वेळींच **श्रीयुत हिवरगांवकर** हे दम्याची व्यथा वाढून एकाएकीं वारले! आपल्या एवढ्या परिश्रमाचें चीज झालेलें पहाण्यास ते जगले नाहींत हा अत्यंत खेदकारक दैवयोग होय. परंतु ईश्वरी सूत्रापुढें कोणाचा कांहीं इलाज चालत नसल्यानें हा दुःखावेग आवरून ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो अशी प्रार्थना करणें एवढेंच आपल्या स्वाधीन आहे व तें कर्तव्य जड अंतःकरणानें करीत आहें. श्रीयुत हिवरगांवकर हे आणखी कांहींकाल जगले वाचले असते तर कामंदकीय नीतिसार, शुक्रनीति, वात्स्यायनाची कामसूत्रें वगैरे ग्रंथांचीं भाषांतरें करण्याचीं सुरू केलेलीं कामें त्यांनीं पुरीं केलीं असतीं हें येथें नमूद करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

हें भाषांतर तयार करवून तें छापविण्याची आर्थिक आणि मानसिक दगदगीची जबाबदारी घेण्यास **श्रीयुत गजानन-रघुनाथ मुळे** हे तयार झाले आणि मूळ संकल्प केल्यावेळेपासून इतका कालावधि गेला व अनेक अडचणी उपस्थित झाल्या तरी त्यांनीं आपला संकल्प तडीस नेण्याचा निश्चय ढळूं दिला नाहीं याबद्दल ते प्रशंसेस पात्र आहेत. पुस्तकाच्या छपाईची आर्थिक जबाबदारी स्वतःवर घेण्याचें त्यांनीं धाडस केलें म्हणूनच संस्कृत वाङ्मयांतला हा एक अपूर्व ठेवा मराठी वाङ्मयाच्या कोशागारांत आणून ठेवतां आला. संस्कृत वाङ्मयांत कौटलीय अर्थशास्त्राची योग्यता किती उच्च दर्जाची आहे याचें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे त्या ग्रंथाच्या अद्भुत अलौकिकत्वाची कल्पना त्या ग्रंथाच्या अभ्यासानेंच येणार आहे. तथापि राजनीति-शास्त्रावर आपल्याकडे ग्रंथ नाहीं अशी जी सर्व साधारण समजूत आहे ती तरी या ग्रंथाच्या वाचनानें दूर होण्यासारखी असल्यानें त्या ग्रंथाचें मराठी भाषेंत अवतरण होणें जरूरीचें होतें व तें कार्य **श्रीयुत मुळे** यांच्या दृढनिश्चयामुळेंच शेवटास गेलें.

या उत्तरार्धाच्याहि भाषांतराच्या कामीं **चि. अनंत** याच्या जर्मनभाषेच्या ज्ञानाचा आणि त्याच्या चिकित्सक बुद्धीचा वेळोवेळीं उपयोग झाला. कित्येक दुर्बोध स्थळांचा उलगडा जर्मन भाषांतर पाहून समाधानकारक रीतीनें करतां आला याचें श्रेय सर्वस्वी त्याच्याकडेच आहे. **सर परशरामभाऊ कॉलेजांतील प्रोफेसर देवधर** यांनीं जर्मन भाषांतराच्या प्रतीचा व इतर पुस्तकांचा या कामाकरितां वेळोवेळीं उपयोग करूं दिला याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

शेवटीं ज्या परमेश्वराच्या कृपेनें हा वाङ्मययज्ञ माझे हातून पूर्ण झाला त्यापरमेश्वराच्या चरणीं त्याच्याच प्रेरणेनें झालेल्या या वाङ्मयोपासनेचें फल समर्पण करून, ही कृति वाचकांनीं गोड करून घ्यावी अशी त्यांची प्रार्थना करून, मीं वाचकांची रजा घेतों.

माघ कृ. ९ शके १८५०.

ज. स. करंदीकर.

# कौटलीय अर्थशास्त्राचें मराठी भाषान्तर.

## प्रस्तावना.



खिस्त पूर्व चवथ्या शतकांत ज्या धूर्त, चाणाक्ष व कारस्थानी पुरुषानें मगध देशांतील नंदवंशाचें उच्चाटन करून चंद्रगुप्त मौर्यास राज्यासनावर बसविलें, त्याचें समग्र चरित्र देण्यास पुरेशीं साधनें आपल्या दुर्दैवानें उपलब्ध नसल्यामुळें, इतिहास-संशोधकांनीं प्रसिद्ध केलेल्या माहितींतच समाधान मानून घेणें भाग आहे. वर्षाऋतूंत मेघांआड दडलेल्या चंद्राची कोर किंचित् प्रकाशमान होऊन अंधारांत चांचपडत चालणाऱ्या माणसास मार्ग दाखविण्यास उपयोगी पडते, तद्वत् हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाच्या अज्ञानांधकारांत इतिहास-संशोधकांचे किरण अलीकडे चमकूं लागल्यामुळें मार्गक्रमण करावयास थोडीतरी सुलभता आली आहे. कौटिल्याचें समग्र चरित्र सांगावयास उपयोगी पडणारीं साधनें उपलब्ध झालीं नसलीं, तरी जीं थोडीं फार प्रसिद्धीस आलीं आहेत, त्यांवरून पाहतां हिंदुस्थानामधील या विख्यात पुरुषानें बावीसशें वर्षांपूर्वी राजकारणांत दाखविलेली अजब कर्तबगारी हल्लींच्या सुधारलेल्या विसाव्या शतकांतील नांवाजलेल्या कारस्थानी मुत्सद्यांच्यापेक्षां अधिक नसली, तरी तोडीची आहे, हें कोणासहि कबूल करणें भाग आहे.

कौटिल्य-ज्यास चाणक्य व विष्णुगुप्त अशींहि नांवें आहेत-हा मौर्य घराण्यांतील चंद्रगुप्त राजाच्या दरबारांत मुख्य अमात्य होता, आणि याचीच मसलत नंदास राज्यभ्रष्ट करून मगधाचें राज्य मौर्य घराण्यास मिळवून देण्यास कारणीभूत झाली.

### इतिहास.

पुराणांत वर्णिलेल्या शिशुनाग नामक राजाच्या वंशांत इ. स. पूर्वी ५०० च्या सुमारास बिंबिसार नांवाचा राजा होऊन गेला. त्याच्या ताब्यांत अर्वाचीन भूगोलांत ज्यास बिहार म्हणतात, तो म्हणजे गयेजवळील पहाडी मुलूख, भागलपूर, मोंगीर प्रांत आला होता. त्यानें कोसल देशाचें राज्य जिंकून आपल्या राज्यांत सामील केलें होतें. बिंबीसारानें बरींच वर्षे अबाधितपणें राज्याचा उपभोग घेतल्यानंतर त्याचा पुत्र अजातशत्रु हा पित्याच्या गादीवर आरूढ झाला. अजातशत्रूस कुनिक अथवा कुनीय असेंहि म्हणत असत. अजातशत्रूनें राज्याचा विस्तार केला. गंगानदीच्या तीरावर त्यानें एक बळकट किल्ला बांधिला, वैसालीच्या राजावर स्वारी करून त्याचें राज्य काबीज केलें, आणि गंगा व हिमालय यांच्यामधला मुलूख आपल्या राज्यांत सामील केला. अजातशत्रु इ. स. पूर्वी ४७५ वर्षी मरण पावला. अजातशत्रूनंतर त्याचा मुलगा दर्शक अथवा हर्षक गादीवर बसला. दर्शकानंतर त्याचा मुलगा उदय इ. स. पूर्वी ४५० वर्षी राज्यावर आला. गंगानदीच्या तीरावर उदयराजाच्या आजानें म्हणजे अजातशत्रूनें जो किल्ला बांधून ठेविला होता, त्याच्या पायथ्याशीं उदय राजानें एक नवीन शहर वसवून, त्यास कुसुमपूर अथवा पुष्पपुर हें नांव त्यानें दिलें. याच शहरास पुढें पाटलिपुत्र असें नांव मिळालें. या नवीन शहरांतच उदय राजानें आपली राजधानी नेली.

उदयानंतर नंदिन, व नंदिनानंतर महानंदिन हा गादीवर बसला. महानंदीनास एका शूद्र स्त्रीपासून मुलगा झाला, त्याचें नांव महापद्मनंद. महानंदीन मृत्यु पावल्यावर गादीच्या खऱ्या वारसास बाजूला सारून, महापद्मनंदच मगधाचें राज्य बळकावून बसला. हाच महापद्मनंद नंदवंशांतील पहिला राजा होय. तो सुमारें इ. स. पूर्वी ३७१ त राज्यारूढ झाला. त्या काळांत अनुलोम विवाह पद्धति प्रचारांत होती, हें ध्यानांत आणिलें, म्हणजे महानंदीन या क्षत्रियास शूद्रस्त्रीपासून झालेला पुत्र महापद्मनंदही क्षत्रियच मानिला पाहिजे. येथपर्यंत नंद-वंश अदूषित होता, असें म्हणावयास हरकत नाहीं पण पुढें मात्र क्षत्रित्वाविषयीं संशय उत्पन्न करणारा दोष त्यांत आला, आणि या दोषामुळेंच 'नंदान्त क्षत्रियकुलम्' असें निदान नंद-क्षत्रियासंबंधानें तरी म्हणण्याची वहिवाट पडली. असो. आतांपर्यंत मगध देशावर अस्सल क्षत्रियराजे राज्य करीत होते असें ओघानेंच म्हणावें लागतें; परंतु पुढें मात्र ती क्षत्रियपरंपरा कायम राहिली नाहीं.

क्षत्रियांच्या वहिवाटीप्रमाणें महापद्मनंदास अनेक वर्णांच्या स्त्रिया होत्या; त्यांपैकीं एका न्हावी स्त्रीपासून त्यास मुलगा झाला, त्याचें नांव धनानंद. या धनानंदानें आपल्या बदफैली आईच्या नवऱ्यास म्हणजे महापद्मनंदास ठार करून मगधदेशाचें राज्य

बळकावलें. धनानंद जुलमी राजा होता. त्याच्या जुलमामुळें त्याच्या प्रजेंत असंतोष उत्पन्न झाला. धनानंदाच्या राज्यांतच चाणक्य या नांवाचा एक विद्वान्, चाणाक्ष व महत्वाकांक्षी ब्राह्मण होता. अक्षत्रस्त्रीपासून जन्मलेल्या धनानंदानें क्षत्रियत्वाचा हक्क बळकावून मगधाचें राज्य चालवावें, हें त्यास सहन झालें नाहीं. राजाकडे तो तिरस्कारानें पाही.

धनानंदापूर्वी महापद्मनंदाची कारकीर्द चालू असतां, नंदघराण्यापैकीं दुसऱ्या एका पुरुषास मुरा नामक शूद्र स्त्रीपासून एक मुलगा झालेला होता; त्याचें नांव चंद्रगुप्त असें होतें. तो मुरेपासून जन्मला म्हणून त्यास मौर्य हें नांव प्राप्त झालें; हाच मौर्य-वंशांतील पहिला राजा होय. कित्येकांच्या मतें धनानंदासच हिमालयांतील मुरा नामक स्त्रीपासुन झालेला पुत्र हा चंद्रगुप्त होय. मुद्राराक्षस नाटकांत अमात्य चाणक्य चंद्रगुप्तास 'वृषल' या विशेषणानें संबोधीत असतो, यावरून चंद्रगुप्त धनानंदासच मुरेपासून झालेला मुलगा असावा, कारण धनानंद स्वतः वृषल म्हणजे क्षत्र स्त्रीला निकृष्ट वर्गांतील पुरुषापासून झालेला होता. मुरा क्षत्रिय असो वा शूद्र असो, महापद्म स्वतः शूद्र स्त्रीचा मुलगा; असें असून, चंद्रगुप्ताच्या क्षत्रियत्वासंबंधानें संशयवृत्ति निदान महापद्मनंदास धरण्याचें कारण नसून त्यानें चंद्रगुप्तास हद्दपार करण्याचा हुकूम सोडून राज्यांतून घालवून दिलें. चंद्रगुप्तानें आपल्या मातृभूमीस नमस्कार करून वनवास स्वीकारला.

धनानंदानें एकदां दरबार भरविला असतां, महत्वाकांक्षी चाणक्य अनाहूतच भर दरबारांत शिरून प्रमुख स्थलीं जाऊन बसला. तें पाहून दरबारांतील सर्व मंडळी चकित होऊन गेली; धनानंद अत्यंत संतापला, आणि आपल्या प्रधानाचें न ऐकतां त्यानें त्या वृद्ध ब्राह्मणास आसनावरून खालीं ओढण्याची आज्ञा केली. राजाच्या सेवकांनीं चाणक्यास ओढून खालीं आणिलें, तेव्हां त्यानें अशी घोर प्रतिज्ञा केली कीं, नंदाचा वंश समूळ उच्छेदून टाकीन, तरच मी चाणक्य; तोंपर्यंत मी शिखा-बंध करणार नाहीं; असें म्हणून तो मगध देशांतून निघून गेला.

चंद्रगुप्त हद्दपारीचे दिवस कंठीत असतां, त्याची व चाणक्याची अकस्मात् गांठ पडली. या भेटींत चंद्रगुप्तानें चाणक्याच्या मसलतीप्रमाणें वागण्याचें वचन देऊन पुढील मार्ग धरिला. उत्तर हिंदुस्थानांतील बऱ्याच मुलखांत प्रवास करून अखेरीस चंद्रगुप्त हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील पहाडी लोकांत येऊन राहिला. तेथें त्यानें पहाडी लोकांस कवाईत शिकवून त्याचें सैन्य तयार केलें.

चंद्रगुप्त वायव्य सरहद्दीवर असतां इकडे यूरोपांतील वैभवशाली अलेक्झांडर बादशाहा, हिंदुस्थानदेश जिंकण्याकरितां आपला पुष्कळ दिवसांचा हेतु तडीस नेण्याच्या इरायानें, इ. स. पूर्वी ३२७ त ५००००-६०००० सैन्य बरोबर घेऊन आला. त्यानें बाक्ट्रिया-म्हणजे काबूल, कंदहार, हिरातटापू-प्रांत जिंकून आपल्या ताब्यांत घेतला. वाटेंतील प्रांत एका मागून एक त्याच्या ताब्यांत येत गेले. तक्षशिला वगैरे प्रांतांचे राजे त्यास शरण आले. अलेक्झांडरनें कित्येक पहाडी लोकांचा पाडाव केला, परंतु चंद्रगुप्ताच्या कवायतींत तयार झालेल्या पहाडी सैन्याचा पराक्रम पाहून तो थक्क झाला. त्यानें चंद्रगुप्तास आपल्या बरोबर यावयास सांगितलें; त्याप्रमाणें अलेक्झांडरच्या स्वारींत कांहीं दिवस राहून, चंद्रगुप्तानें युरोपियन सैन्य-व्यवस्था कशी काय असते, हें निरीक्षून ठेविलें. आलेक्झांडरनें पंजाबचा बराच भाग काबीज करून तेथील लोकांची कत्तल उडविली; जे प्रांत काबीज केले, त्यांत आपल्या तर्फेनें कारभार करावयास आपले सत्रप अथवा सुभेदार नेमिले. तक्षशिला वगैरे ज्या प्रांतांचे राजे शरण आले, त्यांची व्यवस्था मात्र त्या राजाकडेच सोंपविली. अलेक्झांडरच्या मनांत स्वारी चालू ठेवावयाची होती, परंतु सतत तीन वर्षे चाललेल्या स्वारीमुळें त्याचें सैन्य अगदीं थकून गेलें आणि कांहीं केल्या तें बियास नदी पलीकडे जाण्यास तयार होईना. शेवटीं नाइलाज होऊन अलेक्झांडर स्वदेशीं परतला. जिंकलेल्या प्रांतांच्या बंदोबस्ताकरितां त्यानें थोडें सैन्य ठेविलें होतें. बाकीचें सैन्य घेऊन तो बाबीलोन येथें पोंहोंचला व इ. स. पूर्वी ३२३ च्या जून महिन्यांत तेथें तो मृत्यु पावला.

अलेक्झांडरच्या मृत्यूची बातमी चंद्रगुप्त मौर्यास कळतांच, तो आपलें पहाडी सैन्य जमवून परकीयांच्या ताब्यांत गेलेले मुलख परत मिळविण्याच्या खटपटीस लागला. इ. स. पूर्वी ३२२ त त्यानें अलेक्झांडरच्या ताब्यांत गेलेले सर्व प्रांत जिंकून आपल्या ताब्यांत घेतले. चंद्रगुप्त यावेळेस फार तर पंचवीस वर्षांचा असावा.

याप्रमाणें परकीय राजाच्या अंमलाखालीं गेलेले यच्चयावत् प्रांत काबीज केल्यानंतर चंद्रगुप्तानें आपली दृष्टि मगध देशाकडे वळविली; त्यानें आपल्या जवळ पहाडी लोकांचें अफाट सैन्य कवाईत शिकवून तयार ठेविलेलें होतेंच. महापद्म-

नंदानें, चंद्रगुप्त हीन कुळांत जन्मलेला म्हणून, त्यास हद्द पार केलें होतें. ही गोष्ट चंद्रगुप्ताच्या मनांत निरंतर डवचत होती, आणि नंद–राजास मगध–राज्याच्या सिंहासनावरून केव्हां खालीं पाडीन, असें त्यास झालें होतें. या वेळेस मगधाच्या गादीवर धनानंद राजा होता. धनानंद अत्यंत जुलमी राजा असल्यामुळें त्याचे प्रजाजन जुलमानें गांजून गेले होते. चंद्रगुप्तानें मगध–राज्यांतील परिस्थितीचा फायदा घेऊन लोकांचीं मनें आपल्याकडे वळवून घेतलीं, धनानंदावर स्वारी केली, आणि त्यास ठार मारिलें. याप्रमाणें चंद्रगुप्तानें नंदांचा उच्छेद करून मागधाचें राज्य मिळविलें. तो ख्रिस्तपूर्व ३२१ त गादीवर बसला. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक राज्यें त्याच्या ताब्यांत आलीं होतीं. त्याच्याएवढें विस्तीर्ण राज्य पूर्वीच्या कोणत्याच राजांनीं मिळविलें नव्हतें. त्याच्या राज्याचा विस्तार बंगालच्या उपसागरापासून अरबी समुद्रापर्यंत होता, नर्मदेच्या पलीकडील मुलखही त्यानें जिंकिला होता.

येथवर चंद्रगुप्ताचा पराक्रम प्रमुखत्वानें दृष्टीसमोर उभा राहतो. यांत कौटिल्याची अथवा चाणक्याची कारस्थानी कर्तबगारी कोठें दिसते असा प्रश्न उद्भवणें साहजिक आहे. चंद्रगुप्ताची व चाणक्याची गांठ पडल्या दिवसापासून चाणक्य मगधदेशांतील लोकांत असंतोषाचें व राजद्रोहाचें बीज पसरीत चालला; इतकेंच काय पण प्रसंग पडल्यास चंद्रगुप्ताचा पक्ष स्वीकारून धनानंदास राज्य-च्युत करावयास तयार व्हावयास त्यास प्रोत्साहन द्यावयास त्यानें कमी केलें नाहीं. चंद्रगुप्ताच्या हद्दपारींत चाणक्याचाच सल्ला त्यास मिळत गेला. चंद्रगुप्ताच्या पराक्रमास '**कौटिल्य**'—**शक्तीची** जोड मिळाली नसती तर मगधाचें राज्य मौर्य घराण्यांत आलें असतें किंवा नाहीं हें सांगवत नाहीं. चंद्रगुप्त स्वतः पराक्रमी असून त्याजवळ अतुल सैन्य होतें, हें खरें. तथापि सैन्याची बळकटी व तयारी किती जरी चांगली असली, तरी त्यास धूर्त कारस्थानापुढें हात टेकावे लागतात, याचें प्रत्यंतर नुकत्याच संपलेल्या महायुद्धावरून लक्षांत येण्यासारखें आहे. चंद्रगुप्तानें मगधाचें राज्य काबीज केल्यापासून चाणक्य अथवा कौटिल्य राजाचा मुख्य सल्लागार अथवा अमात्य होऊन राहिला.

## समाज–रचना.

आर्यलोक पश्चिम खंडांतील आपलें स्थान सोडून, हिंदु कुश व पामीर पर्वतांच्या मार्गानें हिंदुस्थानांत केव्हां येऊन राहिले, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. तथापि ते आले, तेव्हां त्यांचा समाज सुधारलेला असा होता. हिंदुस्थानांत येण्यापूर्वी त्यांस निरंतर स्थलांतरें करावीं लागत असल्यामुळें, त्यांच्या समाजास स्थिरता आलेली नव्हती, ती त्यांस हिंदुस्थानांत आल्यानंतर प्राप्त झाली. आर्यांची पहिली वसाहत ' सप्तसिंधु ' म्हणजे पंजाब व पश्चिमेकडील प्रदेश या भूभागांत झाली-या भागांत आर्यांचे अनेक ' गण ' अथवा ' जन ' येऊन राहिले. ' गणांत ' अथवा ' जनांत ' अनेक कुळांचा समावेश झालेला होता. परकीय देशांत वसाहत करावयास आल्यामुळें, त्यांस मूळच्या रहिवाश्यांशीं म्हणजे अनार्यांशीं झगडण्याचे प्रसंग आले; तथापि पाश्चात्य लोक नवीन देशांत वसाहत करावयास गेले म्हणजे तेथील मूळच्या रहिवाश्यांचा नायनाट करण्याची त्यांची जशी प्रवृत्ति दिसून येते, तशी विध्वंसक प्रवृत्ति हिंदुस्थानांतील आर्यांनीं केव्हांहि धारण केली नव्हती.

हिंदुस्थानांत आर्यलोक वसाहत करावयास येण्यापूर्वी कोलारियन व द्रविड अनुक्रमें ईशान्य व आग्नेय दिशेकडून येऊन राहिले होते. मूळच्या रहिवाश्यांपेक्षां हे लोक अधिक सुधारलेले होते. द्रविड लोकांनीं आपली वसाहत थेट दक्षिणेपर्यंत नेऊन भिडविली होती. हिंदुस्थानांत आल्यानंतर आर्य लोकांस जसें मूळच्या रहिवाश्याबरोबर झगडावें लागलें, तसेंच कोलारियन व द्रविड समाजांबरोबर झगडून त्यांस आपलें वर्चस्व प्रस्थापित करावें लागलें.

वेदकालीन आर्य–समाजांत जातिभेद रूढ झालेले नव्हते. तत्कालीन समाजरचना अगदीं साधी होती. मनुष्या मनुष्यांमध्यें किंवा समाजा समाजांमध्यें उच्चनीच भेद नव्हता. परंतु आर्यांचे समाज हिंदुस्थानांत आल्यानंतर, येथील मूळचे रहिवासी अनार्य अगदीं रानटी असल्यामुळें, आणि कोलारियन व द्रविड समाज त्यांच्यापेक्षा कमी सुधारलेले असल्यामुळें त्यास या सर्वांपासून अगदीं अलग रहावें लागलें; आर्येतर समाजांशीं संपर्क ठेविल्यास, आपल्या आर्य-संस्कृतीस हीनपणा येईल, अशी त्यांस भीति वाटावयास लागली. म्हणून आर्यांस आपलें बौद्धिक, सामाजिक व राजकीय वर्चस्व कायम ठेवण्याकरितां ' आर्य ' व ' दस्यु ' अथवा ' अनार्य ' असे भेद प्रचारांत आणावे लागले. या भेदांतच अर्वाचीन जातिभेदाचें बीजारोपण झालें, असें म्हणावयास हरकत नाहीं. तथापि आर्य व आर्येतर यांत जो भेद उत्पन्न झाला, तो प्रथमतः वर्णभिन्नत्वावरून अस्तित्वांत आला. आर्यांचा शरीरवर्ण अगदीं गोरा, आणि त्यांच्या उलट दस्यु, कोलारियन व द्रविड यांचा काळा; अशा वर्णभिन्नत्वामुळें भेदभाव उत्पन्न

व्हावे, हें मानवी स्वभावास अनुसरून आहे. भिन्न भिन्न देशांत केवळ शरीराच्या रंगावरून भेद कसे उत्पन्न होतात, हें अलीकडील समतेचें स्तोम माजविणाऱ्या काळांत देखील 'काळा–गोरा,' 'गोरा–पिंवळा' वगैरे वैषम्यसूचक विशेषणांवरून लक्षांत यावयासारखें आहे.

येथवर जी भेदाची उत्पत्ति झाली, ती फक्त आर्य व अनार्य यांमध्येंच झालेली असून, प्रत्यक्ष आर्यांच्या समाजांत भेद उत्पन्न झाले नव्हते. आर्यांचे गण परकीय देशांत वसाहत करावयास आले होते; त्यांस आपल्या समाजास स्थिरता आणावयाची होती, आणि समाजाची उत्तरोत्तर प्रगति करावयाची होती. 'प्रगतीचा नियम म्हटला म्हणजे परिस्थित्यनुरूप वर्तन; कालदेश लक्षांत घेऊन तदनुसार उचित तें कर्तव्य करणें हाच प्रगतीचा नियम होय; यांत विवक्षित व्यक्तीचा हिताहितसंबंध लक्षांत न आणितां समाजाच्या अभिवृद्धीचें ध्येय निरंतर लक्षपूर्वक पहावें लागतें.' आर्यांस नवीन परिस्थितीस अनुसरून समाजांत व्यवस्थित फरक करणें भाग पडलें. त्यांस अनार्यांशीं निरंतर झगडत बसावें लागलें. परंतु समग्र समाज लढाईच्या कामांत गुंतून राहिला, तर त्याची स्थिरता व अभिवृद्धि करण्याकरितां जे व्यवसाय अवश्य आहेत, ते करणारीं माणसें कमी पडून समाज अधोगतीला जाईल. म्हणून समाजांतील कांहीं व्यक्तींच्या समूहास स्वतःला केवळ लढाईच्या कामास वाहून घ्यावें लागलें; कांहींवर शेती, उद्योगधंदे, व्यापार वगैरे व्यवसाय सोंपविण्यांत आले; आणि कांहीं समूहांनीं केवळ बौद्धिककार्य स्वीकारिलें. आतांपर्यंत समाजांतील समग्र जनतेस 'विशः' अशी संज्ञा चालत आलेली होती; परंतु या कार्यविभागणीमुळें समाजांत बौद्धिक कार्यास वाहिलेले ते ब्राह्मण, युद्धकार्य करणारे ते क्षत्रिय अथवा राजन्य, आणि कृषि आदि व्यवसायास वाहिलेले ते वैश्य, असे तीन वर्ण अथवा वर्ग निर्माण झाले. यांशिवाय, आर्य व अनार्य यांच्या झगड्यांत जे अनार्य अथवा दस्यु आर्यांस शरण आले, त्यांस आर्यांनीं आपल्या समाज-रचनेंत समाविष्ट करून, त्यांचा शूद्रवर्ग निर्माण केला. अशा रीतीनें आर्यांच्या समाजांत चातुर्वर्ण्य संस्था अस्तित्वांत आली.

हिंदुस्थानांतील वर्णव्यवस्थेप्रमाणें प्राचीन इराणी लोकांतहि वर्गीकरण झालेलें होतें; या वरून हिंदुस्थानांतील आर्य Indo-aryans व इराणांतील आर्य Perso-aryans यांची फाटाफूट होण्यापूर्वीच आर्यांच्या समाजांत वर्गीकरण झालेलें असावें. तथापि तें झालें असलें तरी सांप्रत स्वरूपांत तें दृढमूल व्हावयास बराच मोठा काळ लोटला असला पाहिजे. अर्वाचीन हिंदुसमाजांतील वर्गभेद जन्मावर आधारलेला असल्यामुळें त्यास 'जाति–भेद' असें अन्वर्थक नांव पडलें आहे. पूर्वकालीन समाजांतील 'गुणकर्म'–तत्वावर आधारलेला वर्गभेद कालांतरानें लुप्त होऊन वर्गभेदांत 'जातीचे' अथवा 'जन्माचें' तत्त्व प्रचारांत आलें, आणि ख्रिस्तपूर्व सातव्या–आठव्या शतकांत हें नवीन तत्व ठाम होऊन बसलें. मौर्यकालीन हिंदुसमाजांत वर्गभेद या नवीन तत्त्वावरच रूढ झालेले होते, हें ग्रीक ग्रंथकार मेग्यास्थेनीसच्या हिंदुस्थानाविषयक वृत्तांतांवरून दिसून येतें–'वर्गभेद जन्मावरून ठरविण्यांत आलेले असून, समाजांतील व्यक्तींस आपला जातिविशिष्ट व्यवसाय सोडून दुसरा करावयास, अथवा परवर्गांतील व्यक्तींशीं वैवाहिक संबंध करावयास सक्त मनाई होती.' मेग्यास्थेनीसचीं वर्णनें कित्येकवेळां अप्रत्यक्ष रीतीनें मिळविलेल्या माहितीवर आधारलेलीं असल्यामुळें सर्वथैव विश्वसनीय अशीं नसतात. ख्रिस्त पूर्व चवथ्या शतकांत, मेग्यास्थेनीस म्हणतो इतका, विवाहाच्या बाबतींत कडक निर्बंध नव्हता, हें कौटिलीय अर्थ शास्त्रांतील (अधि ३, अ. ७) 'पुत्र विभाग' प्रकरणावरून कळून यावयासारखें आहे. समाजांत अनुलोम व प्रतिलोम विवाहपद्धति रूढ असल्यामुळें अंबष्ट, निषाद, पाराशव, उग्र, सूत, वैदेहक, मागध आयोगव, क्षत्त, चांडाल वगैरे जाति अस्तित्वांत आल्या.

आर्यांच्या–समाज रचनेंतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ही वर्गवारी म्हणजे चातुर्वर्ण्य–संस्था (institution of qualitative orders of people) अत्यंत महत्वाचा भाग आहे. धर्मशास्त्रकारांनीं व अर्थशास्त्रकारांनीं चारहि वर्णांचे पृथक् व सामान्य धर्म सांगितले आहेत. अध्ययन, यजन व दान हे तीन धर्म पहिल्या तीनहि वर्णांचे सामान्य धर्म सांगितले असून त्यांचे विशिष्ट धर्म निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळ्या प्रकारांनीं सांगितले आहेत. ब्राह्मणाचे विशिष्ट धर्म अध्यापन, याजन व प्रतिग्रह; क्षत्रियाचे शस्त्रवृत्ति व भूतमात्राचें रक्षण; आणि वैश्याचे विशिष्ट धर्म म्हणजे कृषि; गोरक्षण व वाणिज्य हे होत (कौ. अ. अधि. १, अ. ३). शूद्राचा धर्म ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजातींची सेवा हा सांगितला आहे. शूद्रांच्या विशिष्ट धर्मांत ग्रंथकारांचे मतभेद दृष्टीस पडतात. मनु व महाभारतकार शूद्राकरितां फक्त सेवाधर्म आंखून ठेवितात; पण शुक्राचार्य त्यांस सेवेशिवाय दुसरींहि हलक्ीं कामें करावयास परवानगी देतात; (शुक्र. अ. ४ प्र. ३ श्लो. १८); आणि कौटिल्य तर त्यांच्याहि पलीकडे

जाऊन त्यांस ' वार्ता ' म्हणजे कृषि, पशुपालन व व्यापार करावयास आणि कारागिरीचा अथवा कुशीलवाचा धंदा करावयास परवानगी देतो. चातुर्वर्ण्य-संस्थेतील कार्य विभागणीच्या बाबतींत अर्थशास्त्रकारांची अथवा राजनीतिशास्त्रकारांची मनोवृत्ति धर्मशास्त्रकारांपेक्षां अधिक उदार होती, असें दिसून येतें.

चातुर्वर्ण्य-व्यवस्थेंत ब्राह्मण केवळ बौद्धिक कार्यास वाहिलेले असल्यामुळें त्यांस समाजांत अग्रस्थान मिळालें, आणि त्यांच्या सामाजिक दर्जामुळें व बुद्धिवैभवामुळें त्यांनीं आपलें वर्चस्व कांहीं काळ सुरक्षित ठेविलें. राजकीय कारभारांत त्यांस अमात्याचे, न्यायाधीशाचे, व इतर मोठमोठे हुद्दे मिळूं लागले. परंतु त्यास आपलें वर्चस्व कायम राखण्याकरितां इतरांबरोबर झगडण्याचेहि प्रसंग आले. तथापि अशा झगड्यांत, परशुरामाचें अपवादात्मक उदाहरण सोडून दिल्यास, भांडणाचा निकाल प्रायः रक्तपात न करितांच करण्याची वृत्ति दिसून येते. शतपथ ब्राह्मणांतील ( कांड ४ अ. १ ब्रा. ४ ) मित्रावरुणांच्या कथानकावरून ब्राह्मणक्षत्रियांचा सहकार्याचा संबंध निदर्शनास येतो. ' मित्र ' हा ब्राह्मण वर्गाचा, व ' वरुण ' हा क्षत्रिय वर्गाचा निदर्शक आहे. "मित्र-ब्राह्मण वर्ग-हा ऋतु आहे. मनन करणारा आहे, विचार करणारा आहे. वरुण-क्षत्रियवर्ग-हा दक्ष आहे, मित्रानें सुचविलेला विचार कृतींत आणणारा आहे.

आर्यांच्या समाज-रचनेंतील वर्ण-व्यवस्थेबरोबरच आश्रमव्यवस्थेचाहि विचार केला पाहिजे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांतील प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यांत चार ' आश्रम ' Modes of living करण्यांत आले. या व्यवस्थेप्रमाणें प्रत्येक व्यक्तीनें आयुष्याचा पहिला भाग ब्रह्मचर्याश्रमांत, दुसरा गृहस्थाश्रमांत आणि तिसरा व चवथा अनुक्रमें वानप्रस्थाश्रमांत व संन्यासाश्रमांत घालवावा. परंतु आश्रम व्यवस्था अधिक खडतर असल्यामुळें तिची अंमलबजावणी वर्णव्यवस्थेप्रमाणें सक्तीनें झाली नाहीं; समाजाच्या शिस्तीकरितां व बळकटीकरितां ती अधिक सक्तीनें व्हावयास पाहिजे होती. प्राचीन स्पार्टन समाजांत कांहींअंशीं याच धर्तीवर आश्रमांची व्यवस्था केलेली असून, ती सक्तीनें पाळण्यांत येत होती. ' प्रत्येक स्पार्टन मनुष्यास वयाच्या सातव्या वर्षापासून तो तीस वर्षांचा होईपर्यंत सक्तीनें बौद्धिक व शारीरिक शिक्षण घ्यावें लागत होतें. तिसाव्या वर्षापर्यंत त्यानें ब्रह्मचर्य पाळून सामाजिक व राजकीय हक्क संपादण्याकरितां आपल्या अंगीं पात्रता आणिली पाहिजे. शिक्षण संपल्यानंतर व वयास तीस वर्षें पुरीं झाल्यानंतर, अविवाहित न राहतां त्यानें लग्न अवश्य केलें पाहिजे, आणि साठाव्या वर्षापर्यंत समाजाची व राष्ट्राची सेवा केली पाहिजे; त्यानंतर वाटेल तर त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें कालक्षेप करावा. जोंपर्यंत स्पार्टन समाजांत अशी आश्रम व्यवस्था काळजीनें पाळण्यांत येत होती, तोंपर्यंत समाज अगदीं दृढ राहिला; परंतु तिची अंमलबजावणी ढिली पडल्याबरोबर त्यास विस्खलितपणा आला. हिंदुस्थानांतील आर्यांच्या समाजांतहि असाच प्रकार घडून आला. गृहस्थाश्रमांत पाळावयाचे कुलाचार व देशाचार-म्हणजे सामाजिक व राजकीय कर्तव्यें-बरोबर रीतीनें बजावण्याकरितां समर्थ व्हावयास समाजांतील प्रत्येक घटकानें विवक्षित वयोमर्यादेपर्यंत अविवाहित राहून बौद्धिक व शारीरिक शिक्षण संपादन करावें, हें राष्ट्राच्या दृष्टीनें आवश्यक आहे.

समाजांतील दुसरें महत्त्वाचें अंग म्हणजे कुटुंबसंस्था होय. विवक्षित मनुष्यांचें कुटुंब बनतें, आणि तेंच समाजाच्या प्रगतींतील आद्य घटक होय. कुटुंबापासून समाजाची प्रगति व्हावयास लागते, ती दोन परस्परविरुद्ध अशा दिशांनीं व्हावयास लागते. कुटुंबांचें कुल, कुलांचा जातिसंघ, व जातिसंघांचा ग्राम अशा पायरीपायरीनें समाजाचें अधिकाधिक विस्तृत स्वरूप बनत जाऊन अखेर त्याची परिणति राजकीय समाजांत-राष्ट्रांत-होते. दुसऱ्या दिशेनें पहावें, तों तेंच कुटुंब विभक्त व्हावयास लागतें. ज्या पृथक् पृथक् व्यक्तींचें कुटुंब बनलेलें असतें, त्या व्यक्ति कुटुंबामधून फुटून स्वतंत्र व्हावयास लागतात. अशा प्रकार सर्व समाजांच्या विकासांत आढळून येतो, व तोच आर्यांच्या समाजांत घडून आला. पाश्चात्यदेशांतील ' सामवायिक ग्रामसंस्थेंत ( Communistic Rural Society ) ज्याप्रमाणें प्रत्येक घटकास गांवांतील जमिनींत विवक्षित भाग असतो, त्याचप्रमाणें आर्यांच्या कुटुंबसंस्थेंतील घटकास कुटुंबाच्या मालकीची वतनंवाडी, शेती भाती, सावकारी वगैरे जीं उत्पन्नाचीं साधनें असतील, त्यांवर हक्क असतो. कुटुंबांतील घटक म्हणजे बाप, आई, मुलगे, मुली, सुना, भाऊ, वहिणी व इतर निराधार आप्त हे होत. कुटुंबाचें उत्पन्न व खर्च समाईक असून बाप हा केवळ अविभक्त कुटुंबाच्या तर्फे वहिवाट करणारा पुरुष समजला जातो. बाप सांगेल तें कुटुंबांतील व्यक्तींनीं ऐकिलें पाहिजे, उलट बापानेंहि आपली जबाबदारी सांभाळिली पाहिजे. बाप कुटुंबाची वहिवाट करणारा प्रमुख पुरुष असला, तरी कुटुंबांतील इतर घटकांस राजकीय समाजांत स्वतंत्र स्थान नव्हतें, असें मात्र नाहीं.

कुटुंबांतील घटकाच्या वैयक्तिक कृत्याबद्दल अथवा अपकृत्याबद्दल सरकारदरबारांत बापावर कोणत्याहि प्रकारची जबाबदारी नसून, सरकार स्वतंत्रपणें त्या घटकाशीं व्यवहार करावयास समर्थ होतें. बाप हा कुटुंबाच्या दौलतीचा स्वतंत्र मालक नसून इतर घटकांच्या तर्फे मुखत्यार समजण्यांत येत होता; त्यास आपल्या मर्जीप्रमाणें हवें तें करावयास मुखत्यारी नव्हती. बायकामुलांच्या पोषणाची तरतूद करून ठेविल्याशिवाय संन्यास घेणाऱ्या इसमास कौटिलीय अर्थशास्त्रांत शिक्षा सांगितली आहे! यावरून अर्थशास्त्रकारांनीं बापावर किती जबाबदारी टाकिली आहे, हें दिसून येईल.

प्राचीन काळीं कांहीं देशांत गुलामांची खरेदी–विक्री राजरोस चालत होती. अथेनियन लोकांस गुलाम पाहिजे असतील-तेव्हां ते डेलास, चिआस व बायझांटियम येथील बाजारांत खरेदी करून आणीत होते. अलीकडे गुलामांचा व्यापार कायद्यानें बंद पडेपर्यंत तो बऱ्याच ठिकाणीं राजरोस, व लपून छपून चाललेला होता. परंतु हिंदुस्थानांत असा धंदा चालत नव्हता, अशी पाश्चात्य इतिहासकार साक्ष देतात. ' एकाहि हिंदी मनुष्याच्या घरीं गुलाम सांपडावयाचा नाहीं; हिंदी मनुष्य म्हटला कीं तो स्वतंत्रच असला पाहिजेः—मेग्यास्थेनीसचें विधान आर्यांच्या संबंधानें सर्वथैव सत्य आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. कौटिलीय अर्थशास्त्रांतील ' दासकल्प '–( अधि. ३, अ. १३ )–प्रकरणावरून पाहिलें, म्हणजे ' नत्वेवार्यस्य दासभावः–आर्यवंशांतील मनुष्यास दासपणा केव्हांच येऊं शकणार नाहीं. पण अडचण दूर करण्याकरितां एकानें दुसऱ्यास गहाण टाकिलें, तर तो इसम गुन्हेगार ठरत नव्हता, मात्र त्यानें गहाण टाकिलेल्या इसमास तत्काल सोडविलें पाहिजे. आपण होऊन दासपणा स्वीकारणारा माणूस गुन्हेगार ठरला, तर त्यानें जन्मभर दास्यांत रहावें, असा निर्बंध होता. तथापि हिंदुस्थानांत सौम्य स्वरूपांत प्रचलित असलेला दासपणा व इतर देशांतील निष्ठुर गुलामगिरी यांत अत्यंत फरक आहे. चातुर्वर्ण्य–व्यवस्थेंत ज्यास पूर्ण स्वातंत्र्य नाहीं, असा एक दास–वर्ग हिंदी समाजांत अस्तित्वांत आलेला असून, त्यांत आर्यांस शरण आलेल्या अनार्य लोकांचा समावेश झालेला होता. यांखेरीज न्यायकचेरींत शिक्षा झालेले लोकहि याच वर्गांत समाविष्ट करण्यांत येत होते.

आर्यांच्या समाजांतील दास व प्राचीन स्पार्टन लोकांच्या पदरीं असलेले हेलॉट, यांचा दर्जा कांहीं बाबतींत सारखा आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. हेलॉट लोक जमिनीवर काम करणारे असून त्यांचा जमिनीशीं अतुट असा संबंध समजण्यांत येत होता; म्हणून जमिनीची विक्री झाली, म्हणजे तिजवरील झाड–झाडोरा, काष्ठ, पाषाण इत्यादिकांप्रमाणें त्यांची मालकी जमिनीबरोबर खरेदीदाराकडे जात होती. पण हिंदुस्थानांतील दास हा हेलॉटासारखा लाचार नव्हता; तो स्थावराचा भाग समजला जात नव्हता. हिंदुस्थानांतील दासास स्वतंत्रता मिळवावयाची असल्यास, योग्य तो मोबदला देऊन त्यास आपली मुक्तता करून घेतां येत होती; इतकेंच नव्हे तर, ' मूल्ये न चार्यत्वं गच्छेत् ' या मार्गानें त्यास आर्यांच्या समाजांत प्रवेश करून घेतां येत होता. प्राचीन रोमन राज्यांतील गुलाम म्हणजे मालकीचा जिन्नस असें समजून, मालकानें आपल्या मर्जीप्रमाणें खुशाल त्याची विल्हेवाट लावावी! परंतु आर्य समाजांतील दास हा कुटुंबांतील एक माणूस समजण्यांत येत होता. रोमन राज्यांतील गुलामाचा खून झाला, तरी खून करणाऱ्या इसमानें जणो काय गाय–म्हैस मारिली, इतक्याच प्रमाणांत त्यास शिक्षा व्हावयाची! हिंदुस्थानांतील दासाचा खून करणाऱ्या इसमासच तर काय, पण नुसतें त्यास वाईट रीतीनें वागविणाऱ्या इसमास देखील कडक शिक्षा ठेविलेली होती. दासाला दास्यांतून सोडविणें म्हणजे पुण्य कर्म, अशीच हिंदुस्थानांतील आर्यांची भावना असल्याकारणानें थोड्याच काळांत दासवर्ग नाहींसा झाला.

आर्यांच्या समाजांतील तिसरें महत्त्वाचें अंग म्हणजे ग्राम–संस्था होय. प्राचीनकाळापासून ग्राम हा समाजाचा आधारस्तंभ मानण्यांत आला आहे. गांवामध्यें राहणारीं अनेक कुटुंबें असलीं, तरी त्या सर्वांचें एकमेकांशीं जवळचें नातें असतेंच, असें नाहीं. त्यांत नानाप्रकारचे धंदे करणारे लोक असावयाचे. कांहीं लोक एकमेकांचे निकट आप्त असतील; कांहीं लोकांचे निकट संबंधी दुसऱ्या गांवांत असतील. त्यांचा मूळ पुरुष एकच असतो, असें नाहीं. कांहीं जमिनी समाईक मालकीच्या असतील, व कांहीं एकट्याच्या मालकीच्या असतील. परंतु जंगलें, कुरणें व वनचराईचीं रानें मात्र सर्वांस मोकळीं असावयाचीं. ग्रामसंस्था म्हणजे मर्यादित क्षेत्रांत लहानशी स्वायत्त शासन संस्थाच होती, असें म्हटलें असतां चालेल. गांवांतील जमीन विकावयाची, ती गांवांतील वृद्ध संभावित गृहस्थांच्या अनुमतीनें विकली जात होती; गांवांतील लोकांपासून वसूल झालेला दंड गाव–कामासाठीं राखून ठेवण्यांत येत होता; गांवाकरितां एखादें सार्वजनिक

काम करावयाचें, तर त्यास सर्व गांवकऱ्यांस यथाशक्ति मदत करावी लागत होती; शेतासंबंधीं उपस्थित झालेले तंटे गांवांतील शिष्टांस मिटवावे लागत होते; अनाथ अज्ञानांच्या दौलतीचा सांभाळ गांवांतील सर्वमान्य व संभावित अशा गृहस्थाकडे सोंपविण्यांत येत होता.

मौर्यकालीन सामाजिक स्थिति अर्वाचीन स्थितीहून भिन्न होती, हें कौटिलीय अर्थशास्त्रावरून निदर्शनास येतें. वर्णावर्णांतील अथवा जातीजातींतील विवाहसंबंधांत हल्लींप्रमाणें कडक निर्बंध नव्हते; अनुलोम व प्रतिलोम विवाह त्यावेळीं प्रचारांत असल्यामुळें कौटुंबिक दौलतीच्या विभागणीच्या कायद्यांत फेरफार झाले. तत्कालीन समाजस्थितीचा सूक्ष्म रीतीनें विचार केला असतां असें दिसून येतें कीं, स्त्रियांस स्वयंवर–स्वातंत्र्य व विशिष्ट परिस्थितींत पुनर्विवाह–स्वातंत्र्य ठेविलेलें होतें, त्याचप्रमाणें–' परस्परद्वेषान्मोक्षः–' नवरा-बायको दोघेहि एकमेकांवर नाराज असतील, तर त्यांस सोडचिठी देण्याची मुभा ठेविलेली होती; परंतु ही मुभा आठ विवाहांपैकीं चार विवाहांस लागू होती 'दिवा स्त्री प्रेक्षागमने षट्पणो दण्डः–' दिवसा एखाद्या स्त्रीस भेटण्यास अथवा क्रीडा करण्यास बाहेर गेल्यास तिला सहा पण दंड ठेविलेला होता. यावरून स्त्रियांचा दर्जा कसा होता, याचें अनुमान करितां येईल. मद्यपान व मांसाशन या बाबींत हल्लींप्रमाणेंच क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांस निषेध नव्हता; परंतु ज्या अर्थी–' ब्राह्मणमपेयमभक्ष्यं प्रासयत उत्तमो दण्डः–ब्राह्मणास अपेयपान व अभक्ष्यभक्षण करावयास लावणाऱ्या इसमास सर्वांत अधिक दंड ठेविलेला होता, त्याअर्थी ब्राह्मणांस निषिद्ध मानिलेल्या भक्ष्य व पेय पदार्थांत मांस व मद्य नसेलच, असें निश्चयपूर्वकसांगतां येत नाहीं. धार्मिक स्थितींतहि बरेंच अंतर दिसून येतें. मौर्यकालीन समाजांत धर्मास सार्वजनिक स्वरूप होतें, असें यज्ञसंस्थेच्या अस्तित्वावरून मानावें लागतें. वैयक्तिक कुटुंबांत मूर्तिपूजा प्रचलित होती किंवा नाहीं, हें मानावयास साधन नसलें, तशी कौटिलीय अर्थशास्त्रांत निर्दिष्ट केलेल्या अपराजिता (लक्ष्मी) अप्रतिहत (विष्णु), जयंत (कार्तिकेय), वैजयंत (इंद्र) शिव, कुबेर, अश्विनीकुमार, व चामुंडा इत्यादि देवांच्या देवालयांवरून या देवतांच्या सार्वजनिक पूजेचा प्रघात असावा असें दिसतें. या देवालयाखेरीज ग्रामपालांचीं व दिग्पालांचीं आलयें स्थापण्याचा प्रघात होताच.

## धर्म, अर्थ, काम व मोक्ष.

हिंदुस्थानांतील लोकांची मनोवृत्ति सामान्यतः परमार्थिक असल्यामुळें, ऐहिक अथवा व्यावहारिक विषयांवर लिहिलेले ग्रंथ प्राचीन ग्रंथ संग्रहांत फारच अल्प प्रमाणांत सांपडतात, असा जो आक्षेप हिंदुलोकांवर आजपर्यंत घेण्यांत येत होता, तो आतां बऱ्याच अंशानें निरस्त झाला आहे. विद्यमान काळांत परिचित झालेल्या अनेक शास्त्रांपैकीं बऱ्याच शास्त्रांत प्राचीन हिंदूंनीं प्राविण्य मिळविलेलें असून अनेक ग्रंथांत त्यांनीं आपले अनुभव, विचार, व सिद्धांत ग्रथित करून ठेविले आहेत. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें मनुष्याच्या आयुष्यांतील धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ असून, त्यांतील पहिल्या तीन पुरुषार्थांचा संबंध व्यक्तीशीं व समाजाशीं आहे; मोक्ष हा स्वतंत्र वैयक्तिक अर्थ आहे. व्यक्तीशीं व समाजाशीं संबंध असलेले पुरुषार्थ–म्हणजे धर्म, अर्थ व काम–कसे साध्य करावे, याचें विवेचन करणारे स्वतंत्र ग्रंथ–धर्मशास्त्र, अर्थशास्त्र व कामशास्त्र–प्राचीन हिंदु पंडितांनीं रचून ठेविले आहेत. धर्मशब्दास समानार्थक असा एक शब्द इतर भाषांत सांपडणार नाहीं, असें म्हणावें लागतें. समाजाची धारणा–समाजाची स्थिरता व वृद्धि–जेणें करून होते, तो धर्म; या दृष्टीनें पाहतां धर्मामध्यें अनेक विषय येतात. धर्मशास्त्रावर व तदंगभूत विषयांवर शास्त्रकारांचे अनेक ग्रंथ आहेत. कामशास्त्रावर वात्स्यायनानें स्वतंत्र ग्रंथ लिहिला आहे. काम या शब्दाचा अर्थ सामान्यतः इच्छा असा ऋग्वेदादि प्राचीन ग्रंथांत घेतला आहे, आणि कामशास्त्रकार वात्स्यायनानेंहि कामशब्दाची व्याख्या, ' श्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणानामात्मसंयुक्तेन मनसाधिष्ठितानां स्वेषु स्वेषु विषयेष्वानुकूल्यतः प्रवृत्तिः कामः, ' अशीच केली आहे. या व्याख्येप्रमाणें पाहतां, काम शब्दाचा अर्थ वैषयिक प्रेमभावनेंत मर्यादित करण्याचें कारण नाहीं. पहिल्या तीन पुरुषार्थांस समुच्चयानें त्रिवर्ग, व चारहि पुरुषार्थांस चतुर्वर्ग असें म्हणतात. चतुर्वर्गांतील मोक्ष हा वैयक्तिक असून त्याचा संबंध व्यक्तीच्या पारलौकिक स्थितीशीं आहे. पहिल्या तीन पुरुषार्थांच्या प्राप्तीचें विवेचन करणारे जसे स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाले, तसे मोक्षसाधनासाठीं स्वतंत्र ग्रंथ नाहींत. तथापि धर्मशास्त्रादि त्रिवर्गांत उपदेशिलेल्या नीतिमार्गांनें व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांच्या चिंतनानें व्यक्तीनें मोक्ष साधावा, असा अभिप्राय दिसतो. त्रिवर्गांतील दुसरा पुरुषार्थ म्हणजे अर्थ होय. हा अर्थ प्राप्त करून कसा घ्यावा, यासंबंधानें अनेक ग्रंथ निर्माण झाले आहेत. या शास्त्राचा संबंध प्रमुखत्वानें राष्ट्राशीं, राजकीय समाजाशीं,

असल्याकारणानें यास नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, राजधर्मशास्त्र असेंहि म्हणण्यांत येतें. अर्थशास्त्रांत राष्ट्राची स्थिरता व वृद्धि घडवून आणण्यास आवश्यक असे अनेक विषय येतात.

## नीतिशास्त्रें व धर्मशास्त्रें.

महाभारतांतील शांतिपर्वांतर्गत राजधर्म प्रकरणांत राजधर्माचें, अथवा राजनीतीचें, विस्तरशः विवरण केलें असून, इतरत्र ठिकठिकाणींहि याच विषयासंबंधीं उहापोह केलेला आढळून येतो; रामायणांत महाभारतांतील राजधर्म–प्रकरणाप्रमाणें एखादें स्वतंत्र प्रकरण दिलेलें नसलें, तरी निरनिराळ्या मतवाद्यांचें खंडन-मंडन केलेलें दिसून येतें. अग्निपुराणांतील अध्याय २१८–२४५ यांत महाभारतांतील राजधर्म प्रकरणाच्या अनुरोधानें राजनीतीचें विवरण केलें आहे. बोधायनादि सूत्रग्रंथांत व मन्वादि स्मृतिकारांच्या ग्रंथांत राजधर्म प्रकरणास महत्वाचें स्थान आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथांशिवाय राजनीतिशास्त्रावर अथवा अर्थशास्त्रावर अनेक स्वतंत्र ग्रंथ आहेत. यांत ख्रिस्तपूर्व ३२५ च्या सुमारास रचिलेला कौटिलीय अर्थशास्त्र ग्रंथ हा प्रमुखस्थानीं आहे. तत्पूर्वी अर्थशास्त्रावर ग्रंथ लिहिणारे सतरा ग्रंथकार होऊन गेले असावे, असें या अर्थशास्त्रावरून दिसतें; पण त्यांचे ग्रंथ स्वतंत्रतेनें उपलब्ध नाहींत. यांपैकीं कात्यायन, किंजल्क, घोटमुख व चारायण यांचे, आणि कणिक–भारद्वाज व पिशुनपुत्र या ग्रंथकारांचे उल्लेख एकदांच आलेले दिसतात. कणिक–भारद्वाज हा कदाचित् कणिकनीतीच्या नांवानें मोडणाऱ्या नीतिशास्त्राचा उत्पादक असूं शकेल. अर्थशास्त्रांतील कौणपदंत, पिशुन, भारद्वाज, व वातव्याधि यांचेहि नीतिग्रंथ उपलब्ध नाहींत. कौणपदंत, पिशुन व वातव्याधि यांचा अनुक्रमें भीष्म, नारद व उद्धव यांच्या नांवांशीं संबंध जोडण्यांत येतो; पण यास काय आधार आहे कळत नाहीं ! अर्थशास्त्रांतील 'मानवाः' व 'पाराशराः' या उल्लेखांवरून मनूनें रचिलेल्या अर्थशास्त्राचे, व पराशरानें रचिलेल्या अर्थशास्त्राचे अनुयायी असा बोध होतो. आचार्याः या उल्लेखावरून कौटिल्याच्या गुरूचा बोध होतो. धर्मशास्त्रकार मनु व अर्थशास्त्रकार मनु निरनिराळे असले पाहिजे, हें नीतिवाक्यामृतांतील ' यदाह वैवस्वतो मनुः' या उल्लेखावरून दिसतें. याशिवाय विशालाक्ष, बाहुदंती, बृहस्पति व उशनस् या अर्थशास्त्रकारांचीं वचनें कौटिल्यानें विवादास्तव घेतलीं आहेत. विशालाक्ष ( म्हणजे शिव अथवा रुद्र ) याचीं वचनें संस्कृत वाङ्मयांत सांपडतात, असें महामहोपाध्याय गणपति शास्त्री सांगतात. बाहुदंती ( इंद्र ) याचा पत्ता लागणें कठिण आहे. शांतिपर्वांतील ५९ व्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें अर्थशास्त्राची उत्पत्ति प्रथमतः ब्रह्मदेवानें एक लक्ष अध्यायांत केली, आणि ती विशालाक्ष, बाहुदंती, बृहस्पति व काव्य आचार्य ( अथवा उशनस्, शुक्र ) यांनीं त्याच नीतीचें संक्षिप्त सार अनुक्रमें १००००, ५०००, ३००० व १००० अध्यायांत केलें. पंजाब संस्कृत ग्रंथमालेंत बार्हस्पत्य अर्थशास्त्र या नांवानें एक षडध्यायी ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे; पण हा ग्रंथ महाभारतांत सांगितल्याप्रमाणें ३००० अध्यायांचा नाहीं; यांत फक्त सहा अध्याय, व तेहि सूत्रात्मक अध्याय आहेत, आणि ग्रंथाच्या आरंभींच ' अथ बार्हस्पत्य सूत्रम् ' व प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं ' इति बार्हस्पत्यः' असें सूत्र स्पष्टपणें म्हटलेलें असल्यामुळें, प्राचीन बार्हस्पत्य अर्थशास्त्रांतील फक्त सूत्रेंच याग्रंथांत ग्रथित केलेलीं असतील. सारांश, कौटिल्यानें उल्लिखित केलेलें बार्हस्पत्य अर्थशास्त्र आज उपलब्ध नाहीं, असें म्हणावें लागतें. महाभारतांतील काव्य हा उशनस् व शुक्र या नांवांनींहि प्रसिद्ध आहे. शुक्रनीतिसार या नांवानें प्रसिद्ध असलेला ग्रंथ महाभारतांत सांगितल्या-प्रमाणें सहस्र अध्यायांत नसून, त्यांत चार अध्याय व परिशिष्टादाखल आणखी एक अध्याय, असे पांचच अध्याय आहेत. या ग्रंथाच्या चतुर्थ अध्यायांत असलेलीं सात प्रकरणें अथवा भाग जरी वेगळे अध्याय आहेत, असें मानिलें तरी विशेष विस्तार होत नाहीं. म्हणून सदर ग्रंथ हा प्राचीन काव्याचा असेल, असें म्हणतां येत नाहीं. महाभारतांत आणखी प्राचेतस् मनु व गौरशिरस् यांचा अर्थशास्त्रकारांत निर्देश केला आहे.

कौटिल्याच्या काळांत नीतिशास्त्रावरील अनेक ग्रंथ उपलब्ध होते. कौटिलीय अर्थशास्त्र ख्रिस्तपूर्व ३२५ सुमारास अस्तित्वांत आलें; त्यानंतर इ. स. तिसऱ्या चवथ्याशतकांत कामंदकानें प्राचीन परंपरेला अनुसरून कौटिलीय अर्थशास्त्राच्या आधारेंच **कामंदकीय नीतिसार** लिहिलें. हा समग्र ग्रंथ प्रकाशित झाला आहे. वर सांगितलेले बार्हस्पत्यसूत्र व शुक्रनीतिसार हे ग्रंथ कामंदकानंतर रचिले अथवा संग्रहित केलेले असावे, असें मानण्यांत येतें; एकाकाळीं उपलब्ध असलेल्या प्राचीन ग्रंथांच्या आधारें ते संपादिले असतील, असाहि संभव आहे. ख्रिस्ती शकाच्या आठव्या—दहाव्या शतकांतहि कांहीं नीति–ग्रंथ निर्माण

झाले. याच काळांत वैशंपायनाच्या नांवावर नीतिप्रकाशिका हा ग्रंथ निर्माण झाला. **सोमदेवकृत नीतिवाक्यामृत** व **भोजराजकृत युक्तिकल्पतरु** हे ग्रंथहि याच काळांतील आहेत. नितिवाक्यामृत हा गद्यपद्यात्मक ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्र व कामंदकीय नीतिसार यांस अनुसरून आहे. नीति प्रकाशिका व युक्ति कल्पतरु यांतील विषय प्राधान्येंकरून अनुक्रमें सेना, सेनासामुग्री, आणि वस्तु, रत्नें इत्यादि असून त्यांत राजधर्माचें विवेचन अगदींच संक्षेपानें आलें आहे. या नंतरच्या काळांतहि पंधराव्या शतकापर्यंत राजनितिग्रंथांची रचना होत गेली. चंडेश्वराचा राजनीति रत्नाकर, मित्र मिश्राचा राजनीति प्रकाश अथवा वीरमित्रोदय, आणि नीलकंठ भट्टाचा नीतिमयूख हे ग्रंथ याच सुमारास अस्तित्वांत आले. हे सर्व ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

राजनीतिशास्त्रावर अथवा त्यांत अंतर्भूत होणाऱ्या प्रकरणांवर आतांपर्यंत जे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत, त्याखेरीज अनेक ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहेत. हिंदुस्थानांत या शास्त्रास महत्वाचें स्थान दिलें गेलें असून धर्मशास्त्राच्याबरोबर या शास्त्राचा अभ्यास सार्वत्रिक प्रचारांत होता, यांत शंका नाहीं. अकबराच्या कारकीर्दीतील अबुल फाजलनें रचिलेला 'ऐन-इ-अकबारी' हा राजनीति शास्त्रावरील पारशियन ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांतील रचनेवरून सदर ग्रंथकारास हिंदूंच्या ग्रंथाचें बरेंच ज्ञान होतें, असें दिसतें. मराठेशाहींतील मल्हार रामराव चिटणीसकृत **राजनीति** आणि रामचंद्रपंत अमात्यांचा '**आज्ञा-पत्र**' ग्रंथ हे पूर्वापर चालत आलेल्या राजनीतिशास्त्राच्या अभ्यासाची परंपरा दर्शवीत आहे. आज्ञापत्रांत उपदिष्ट केलेली राजनीति सूक्ष्म दृष्टीनें अवलोकिली, म्हणजे रामचंद्रपंतांचा महाभारत, शुक्रनीति कामंदकीनीतिसार वगैरे प्राचीन नीतिग्रंथांचा परिचय व प्रत्यक्ष राज्यकारभाराचा अनुभव तींत स्पष्टपणें गोचर होतो.

## राजनीतिशास्त्राचा इतर शास्त्रांशीं संबंध.

कौटिलीय अर्थशास्त्रांत पुराणें, बखरी, आख्यायिका, जुने दाखले, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांचा समावेश इतिहासांत केला आहे कौटिल्यपूर्व ग्रंथकारांनीं विद्यांचें वर्गीकरण करितांना अर्थशास्त्राचा समावेश इतिहासांत केल्याचें आढळून येत नसून, कौटिल्यानेंच प्रथमतः इतिहास व अर्थशास्त्र यांचा संबंध दर्शविला आहे. इतिहासांत राजकीय समाजाचे नानाविध व्यवहार निर्दिष्ट केलेले असल्यामुळें, इतिहास व अर्थशास्त्र यांचा निकट संबंध येतो. या दोनहि विषयांचा अभ्यास परस्परांस पूरक व पोषक असा आहे. कौटिल्याच्या मताप्रमाणें अर्थशास्त्र हा इतिहासाचा एक प्रतिभाग मानावयाचा कीं काय, यासंबंधानें पाश्चात्य ग्रंथकारांचा मतभेद असला, तरी त्यांस या दोनहि शास्त्राचा निकट संबंध मान्य आहे; आणि प्रोफेसर सीली आपल्या Introduction to Political science ग्रंथांत म्हणतात, त्याप्रमाणें पाहिल्यास राजनीतिशास्त्र हें इतिहासाचें फळ, आणि इतिहास हें राजनीतिशास्त्राचें मूळ होय. सारांश या दोनहि शास्त्रांचा परस्परांशीं संबंध आहे. अलीकडील परिभाषेंत ज्यास '**अर्थशास्त्र**' अशी संज्ञा आहे, त्यास भारतीय परिभाषेंत '**वार्ताशास्त्र**' असें म्हणतात; याहि शास्त्राचा राजनीतिशास्त्राशीं अनेक प्रकारांनीं संबंध येतो राजकीय समाजाचा योगक्षेम चालवावयास वार्ताशास्त्र उपयुक्त होत असल्याकारणानें राज्यकर्त्यांस या शास्त्राचें अध्ययन अवश्य करावें लागतें. अर्थोत्पादन व अर्थविभाजन योग्य प्रकारें व्हावयास राजसत्तेचा आधार लागतो; म्हणून वार्ता—शास्त्र Political Economy, Economics व राजनीति Political Science यांचा अतुट संबंध आहे. पाश्चात्यग्रंथकारांचें शास्त्रीय विवेचन अडीचहजार वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या कौटिल्यानें आपल्या ग्रंथांत करून ठेविलें आहे. 'चतुवर्णाश्रमो लोको राज्ञा दण्डेन पालितः। स्वधर्मकर्माभिरतो वर्तते स्वेषुवर्त्मसु' या विधानांत कौटिल्यानें केवळ राजसत्तेची आवश्यकता दिग्दर्शित केली नसून, पर्यायानें राजनीतिशास्त्राचा आणि समाजाच्या लौकिक व राजकीय व्यवहाराचें नियमन करणाऱ्या शास्त्राचा-अथवा अर्वाचीन परिभाषेंत सांगावयाचें म्हणजे समाजशास्त्राचा—संबंध ध्वनित केला आहे.

## विद्या व अर्थशास्त्राचें महत्त्व.

अर्थशास्त्र हें अत्यंत महत्त्वाचें शास्त्र आहे. त्यास उपवेद मानण्यांत येत होतें. चारहि वेदांस उपवेद आहेत आणि अथर्ववेदाच्या परिशिष्टांत अर्थ शास्त्र ऋग्वेदाचा उपवेद—'तत्र ऋग्वेदस्यार्थशास्त्रमुपवेदः'—मानिला आहे, तर कित्येक ग्रंथकार अथर्व 'वेदाचा—अथर्व वेदस्य अर्थशास्त्रं उपवेद मानितात. सारांश, प्राचीन काळीं अर्वाचीन काळाप्रमाणें अर्थशास्त्र हें एक महत्त्वाचें शास्त्र मानण्यांत येत होतें. याज्ञवल्क्यादि स्मृतिकारांच्या मतें धर्मशास्त्र व नीतिशास्त्र अथवा अर्थशास्त्र यांत विरोध दिसल्यास

धर्मशास्त्राचा अधिकार मानावा; पण कौटिल्यास हें मत मान्य नसून त्यानें,–'शास्त्रं विप्रतिपद्येत धर्मन्यायेन केनचित्, न्यायस्तत्र प्रमाणं स्यात्...'–धर्मशास्त्र ( sacred law ) व नीतिशास्त्र ( rational law ) म्हणजे राजशासन यांत विरोध दिसल्यास, नीतिशास्त्र प्रमाण मानावें, असें सांगितलें आहे. धर्मशास्त्रावरील आधार–ग्रंथ न्यायाधीशास उपलब्ध व्हावयासारखा नसल्यामुळें, किंवा ज्या आचार–विचारांच्या आधारें धर्मग्रंथ रचिला असेल, ते आचार–विचार तत्कालीन समाजांत प्रचलित नसल्यामुळें, कौटिल्यानें अशा परिस्थितींत नीतिशास्त्रास प्राधान्य दिलें असावें.

महाभारत ( शांतिपर्व अ. ५९, श्लो. ३३ ) ' त्रयी चान्वीक्षिकी चैव वार्ता च भरतर्षभ दण्डनीतिश्च विपुला विद्यास्तत्र निवेदिताः'–आन्वीक्षिकी अथवा ज्ञानकांड, त्रयी अथवा कर्मकांड, वार्ता अथवा कृषिवाणिज्यादि जीविका कांड, आणि दंडनीति अथवा पालन विद्या, अशा चार प्रकारच्या विद्या सांगतें. शुक्रनीति, कामंदकीय नीति व कौटिलीय अर्थशास्त्र यांतहि याच चार विद्या मानिल्या आहेत. शुक्रनीति अ. १ श्लो. १५२ यांत ' आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता, दण्डनीतिश्च शाश्वती ' अशा चार विद्या–'विद्याश्चतस्र एवैता अभ्यसेद् नृपतिः सदा'–राजानें अवश्य अभ्यासिल्या पाहिजेत, असें सांगितलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्र हि–अधि. १, अ. २–'आन्वीक्षिकी, त्रयी वार्ता, दण्डनीतिश्च,' अशा चार विद्या मानितें. प्राचीन उशना कवीच्या अर्थशास्त्राच्या मताप्रमाणें पाहतां दंडनीति ही एकच विद्या असून तींतच सर्व विद्यांचा बीजरूपानें समावेश होतो. मनूचे व बृहस्पतीचे अनुयायी अनुक्रमें तीन व दोन विद्या मानितात. अर्थशास्त्रकारांच्या निरनिराळ्या संप्रदायांत विद्यांच्या गणनांत कितीजरी फरक असला, तरी तींत दंडनीति व वार्ता यांच्या बाबतींत मतभेद नाहीं.

आन्वीक्षिकी म्हणजे काय ? कामंदकीय नीतिसार सर्ग २ श्लो. ११यांत आन्वीक्षिकी म्हणजे 'आत्मज्ञान' असें म्हटलें आहे; परंतु यांतील आत्मशब्दाचा अर्थ आत्मानात्मविचारांतील आत्मा नव्हे; आत्मज्ञान म्हणजे वस्तुस्थितीचें ज्ञान,–जिच्या योगें प्राप्तव्य अर्थापासून सुख प्राप्ति होईल, किंवा दुःखप्राप्ति होईल, हें समजतें, ती विद्या, असेंच कामंदक सांगतो. कामंदकीय नीतिसारा वरील उपाध्याय निरपेक्षानुसारिणी टीकेंत–" प्रत्यक्षपरोक्षाभ्यामीक्षितस्य अर्थस्यानु पश्चाद् ईक्षणं अन्वीक्षा, सा प्रयोजनं यस्या सा ' आन्वीक्षिकी ' **अनुमानविद्या न्यायदर्शनवैशेषिकादिका** " अशी आन्वीक्षिकी विद्येची व्याख्या केली आहे. शुक्रनीति अ. १ श्लो. १५३ यांतहि–' **आन्वीक्षिक्यां तर्कशास्त्रं वेदान्ताद्यं प्रतिष्ठितम्** '– वेदांताला मूलभूत अशा **तर्कशास्त्राचा** समावेश आन्वीक्षिकींत होतो, असें सांगितलें आहे; अर्थात् आन्वीक्षिकींत स्वतंत्र तर्कशास्त्राचा समावेश करणें हि युक्त आहे. कौटिल्यानें देखील याच अर्थानुरोधानें आन्वीक्षिकीची व्याख्या केलेली आहे. कौटिल्य, कामंदक व शुक्र यांनीं तर चारहि विद्यांत आन्वीक्षिकीस आद्यस्थान दिलें आहे. राज धर्माचें विवेचन करितांना महाभारतकार व मानवीय अर्थशास्त्रकार यांखेरीज सर्वच नीतिशास्त्रकारांनीं आन्वीक्षिकी विद्येस अग्रस्थान दिलें आहे, त्रयी, वार्ता, व दंडनीति या हि विद्यांच्या बलाबलाची परीक्षा करणारी जी विद्या ती आन्वीक्षिकी, अशी व्याख्या करण्यांत त्रयीप्रतिपादित धर्माधर्मांचीहि विचक्षणा करावयाची विद्या कौटल्यानें सूचित केली आहे. अग्निपुराण अ. २२५ श्लो. २१–२२ ' नश्येदविनयाद्राजा राज्यं च विनयाल्लभेत् । त्रैविद्येभ्यस्त्रयीं विद्यां दण्डनीतिं च शाश्वतीम् । आन्वीक्षिकीं चार्थविद्यां वार्तारम्भांश्च लोकत...इत्यादि ' यांत त्रयी विद्या वेद जाणणाऱ्या अध्यापकांकडून, आणि आन्वीक्षिकी, अर्थ शास्त्र व वार्ता या विद्या तद्विदांकडून प्राप्त करून घ्याव्या, असें सांगितलें असून, याच अभिप्रायाची पुनरुक्ति अ. २३८ श्लो. ८ यांत आन्वीक्षिकी, त्रयी वार्ता व दंडनीति ' तद्विद्यैस्तत्क्रियोपेतैः '–त्या त्या विद्यांत व प्रयोगांत पारंगत असलेल्या आचार्यांकडून प्राप्त करून घ्याव्या, या शब्दांत स्पष्ट करून ठेविली आहे. अग्निपुराण आन्वीक्षिकी म्हणजे अर्थ विज्ञान अशी व्याख्या पुढील श्लोकांत करितें. सारांश आन्वीक्षिकी म्हणजे तर्क विद्या, अथवा कामंदकाचा टीकाकार सांगतो त्याप्रमाणें तत्वाची विचक्षणा करणारी विद्या, असाच अर्थ राजकीय नीति प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथकारांनीं घेतला आहे.

कौटिलीय अर्थशास्त्र चार प्रकारच्या विद्या सांगतें. त्यांतील त्रयी विद्या म्हणजे ऋक्, यजुस् व सामन् या तीन वेदांचें अध्ययन होय. अर्थशास्त्रविद्येचा स्वतंत्रतेनें उल्लेख विद्यांमध्यें केलेला नाहीं, तथापि वार्ता व दंडनीति या दोन शास्त्रांचा समावेश अर्थशास्त्रांत होतो. वार्ता शास्त्राच्या अध्ययनानें अर्थ ( wealth ) व अनर्थ ( non-wealth ) काय, हें कळतें. राजानें शिकावयाच्या विद्यांत वार्ता ( Economics ) ही अत्यंत महत्वाची विद्या आहे. वार्ता-शास्त्रांत कृषि, गोपालन व व्यापार यांचा समावेश होत असल्यामुळें राष्ट्राची अभिवृद्धि सर्वथैव तिजवर अवलंबून राहते, आणि तिच्याच योगानें राजाला स्वपक्ष व पर

पक्ष कोश व दंड यांच्या धाकानें वश करून घेतां येतो. त्रयी, आन्वीक्षिकी व वार्ता यांचा योगक्षेम चालविण्याचें साधन म्हणजे दंड, आणि तत्संबंधी नियम घालून देणारें शास्त्र म्हणजे दंडनीति ( art of government ) होय, आणि म्हणूनच नय ( policy ) कोणता व अनय ( impolicy ) कोणता, हें दंडनीतीवरून कळतें. ज्याअर्थी वार्ता व दंडनीति यांचा संबंध राष्ट्राशीं अथवा राजकीय समाजाशीं प्रामुख्यानें मानिला जातो, त्या अर्थी या दोनहि विद्यांच्या समुच्चयास **अर्थशास्त्र** अशी स्वतंत्र संज्ञा प्राप्त झाली आहे. महाभारताप्रमाणें पाहतां, दंडनीति व अर्थशास्त्र या संज्ञा प्राचीनकाळांतील उशनस् व बृहस्पति या दोन राजनीतिशास्त्रज्ञांनीं प्रचारांत आणिल्या.

कौटिलीय अर्थशास्त्र अधि. १५ त अर्थशास्त्राची व्याख्या केलेली आहे. " मनुष्यांच्या उपजीविकेचें साधन म्हणजे अर्थ; भूमीवर मनुष्यें (जीवंत) राहतात, म्हणून भूमि अथवा पृथ्वी अर्थ होय; आणि अशा पृथ्वीची, प्राप्ति व पालन कसें करावें, हें शिकविणारें शास्त्र म्हणजे अर्थशास्त्र होय." या व्याख्येप्रमाणें पाहतां वार्ता व दंडनीति या दोनहि विद्यांचा समावेश अर्थशास्त्रात होतो. दंडनीति केवळ "लब्धपरिरक्षणी" म्हणजे काबीज केलेल्या भूमीचें पालन कसें करावें, इतकेंच शिकविणारी विद्या नसून "रक्षितविवर्धनी" म्हणजे तिची उत्तरोत्तर अभिवृद्धि कशी करावी, हें शिकविणारी विद्या आहे. राज्यकर्त्यांस दंडनीतींत समाविष्ट होणाऱ्या या दोनहि विद्यांचें ज्ञान अवश्य संपादन करावें लागतें. म्हणून, अर्थशास्त्र म्हणजे भूमीचें अथवा पृथ्वीचें अर्जन, पालन व अभिवर्धन कसें करावें, हें शिकविणारें शास्त्र, अशी व्याख्या करावयास हरकत नाहीं.

संस्कृत वाङ्मयांत दंडनीति या नांवानें प्रसिद्ध असा एखादा स्वतंत्र ग्रंथ नाहीं, किंवा वार्ताशास्त्रावरहि स्वतंत्र असा ग्रंथ नाहीं. तथापि दंडनीति प्रतिपादन करणारे असे अनेक ग्रंथ आहेत; आणि वार्ताशास्त्रांत अंतर्भूत होणाऱ्या कृषि, पशुपालन, शिल्प, वास्तु, रत्न इत्यादि विविधविषयांवर अनेक प्रकाशित व अप्रकाशित ग्रंथ आहेत. राष्ट्राच्या अभिवृद्धीस कारणीभूत होणाऱ्या ' वार्ता ' या विषयास राजनीतिशास्त्रज्ञांनीं शास्त्रांच्या यादींत गोवावें हें साहजिकच आहे. कौटिलीय अर्थशास्त्रांत राजानें शिकावयाच्या विद्यांमध्यें ' वार्ता ' शास्त्रास जसें महत्त्वाचें स्थान दिलेलें आहे, तसेंच महाभारतकार व कामंदक यांनीहि ' वार्तया धार्यते सर्वम् ' ' वार्ता वै लोकसंश्रया '–सर्व राज्य ( body politic ) वार्तेवर अवलंबून आहे, वार्ता ही समाजाचा आधार आहे, असें सांगून राज्यकर्त्यांनीं या शास्त्राचा चांगला अभ्यास केला पाहिजे, असें प्रतिपादिलें आहे. वार्ता शब्द कौटिलीय अर्थशास्त्रांत दोन अर्थांनीं योजिलेला आहे; वर्णधर्मांमध्यें वैश्याचे विशिष्ट धर्म म्हणजे ' कृषिपाशुपाल्ये वाणिज्याच '–शेतकी पशुपालन व व्यापार सांगितले असून, वार्ता–शास्त्राच्या व्याख्येंत या तीन धंद्यांचा समावेश केला आहे. वर्णव्यवस्थेंत वैश्यवर्गाचे धर्म निश्चित झाल्यानंतरच वार्ता–शास्त्रांत समाविष्ट होणाऱ्या कृषि गोपालन वाणिज्यास शास्त्राचें स्वरूप प्राप्त झालें असावें, आणि कौटिल्यानेंहि वर्णाश्रमधर्म निश्चित केल्यानंतरच ' कृषिपाशुपाल्ये वाणिज्यं च वार्ता ' अशी व्याख्या करण्यांत ही दृष्टि ठेविलेली दिसते.

अर्वाचीन काळांत ज्यास ' अर्थशास्त्र '–Political Economy, Economics–असें म्हणण्यांत येतें, त्यासच प्राचीन भारतीय परिभाषेंत वार्ता–शास्त्र असें नामाभिधान प्राप्त झालें होतें; असें वरील विवेचनावरून उघड होतें. या शास्त्रांत समाविष्ट होणाऱ्या विषयांचें विवेचन प्राचीन ग्रीक ग्रंथकाराच्या ग्रंथावरून केलेलें आढळून येतें, तथापि त्यास शास्त्रीय पद्धतीनें विवेचन करणारा आद्य ग्रंथकार ॲरिस्टॉटल हा होय. त्यानें या शास्त्रास दिलेल्या ग्रीक नांवावरूनच अर्वाचीन काळांतील अर्थ–शास्त्रं Art of wealth हें नांव रूढ झालें आहे.

## अर्थशास्त्राचा कर्ता कौटिल्य.

कौटिलीयअर्थशास्त्र या नांवानें प्रसिद्धीस आलेला प्रस्तुत ग्रंथ कोणी व केव्हां रचिला, या संबंधानें विद्वान् संशोधकांमध्यें बराच वाद चालला आहे. पंजाब संस्कृत ग्रंथमालेंत प्रकाशित झालेल्या अर्थशास्त्रग्रंथास डॉक्टर जॉली यांनीं जी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे, तींत या प्रश्नाची सविस्तर चर्चा करून प्रस्तावनालेखकांनीं असा निष्कर्ष काढिला आहे कीं, प्रस्तुत ग्रंथ चंद्रगुप्ताचा अमात्य कौटिल्य यानें रचिलेला नसून, कोणीं तरी ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकांत तो रचिलेला असावा. जॉली साहेबांनीं काढिलेला निष्कर्ष दंतकथेच्या व ऐतिहासिक वस्तुस्थितीच्या दृष्टीनें ग्राह्य ठरत नाहीं; तथापि त्यांच्याच मताचा अनुवाद डॉक्टर वुईंटर–निट्झ यांनीं केलेला असल्यामुळें या वादास विशेष महत्त्व आलें आहे. अर्थशास्त्र कौटिल्यानें रचिलेलें नाहीं; कौटिल्य ही एक काल्पनिक व्यक्ति असून, तिचा राजनीतिशास्त्राचा प्रणेता या दृष्टीनें उल्लेख करण्यांत केवळ दंतकथेचा भाग आहे, असा निष्कर्ष

ज्या प्रमाणांच्या आधारें या पंडितांनीं काढिला आहे, त्याविषयीं विचार केला म्हणजे, यांनीं रचिलेली इमारत ढिसूळ पायावर आहे, असें निदर्शनास आल्यावांचून राहात नाहीं.

कौटिल्य हा अर्थशास्त्राचा कर्ता नाहीं, असें मानावयास असें एक कारण सांगण्यांत येतें कीं, कौटिल्यासंबंधी ज्या दंतकथा प्रचलित आहेत, त्यांत तो कोणी विद्वान् अध्यापक होता किंवा कोणी विख्यात ग्रंथकार होता, असें कोठेंहि ऐकण्यांत येत नाहीं. पण जॉली साहेबांनीं अर्थशास्त्रास लिहिलेल्या प्रस्तावनेंतच अशा दंतकथा प्रचलित होत्या व त्याप्रमाणें कौटिल्यास राजनीतिशास्त्राचा कर्ता मानण्यांत येत होतें, असें कबूल केलें आहे ( fabulous minister who was looked upon as the master and creator of the art of polity ). जैनांच्या नंदिसूत्रांत कौटिलीय हें एक कुटिलशास्त्र आहे, अशा उल्लेख आहे; कामंदक, दंडी, मेधातिथि, पंचतंत्रकार वगैरे ग्रंथकार कौटिल्याचा स्पष्ट उल्लेख करितात.

चंद्रगुप्त मौर्यांच्या कारकीर्दीत पाटलिपुत्र नगरांत कित्येक दिवस ग्रीक वकील या नात्यानें येऊन राहिलेल्या मेग्यास्थेनी-सचीं जीं हिंदुस्थान विषयक वृत्तें उपलब्ध आहेत, त्यांत त्यानें कौटिल्याचा नामनिर्देश कोठेंहि केलेला नाहीं, हें खरें. पण त्यानें संपादिलेलीं सर्व वृत्तें आज उपलब्ध असतीं, तर त्यांत कौटिल्याचा उल्लेख नाहीं, या विधानास महत्त्व आलें असतें. त्यानें संग्रहित केलेलीं वृत्तें त्रुटित अशीं आहेत; त्यांतील उपलब्ध भागांत समग्र इतिहास येतो, असें नाहीं. मेग्यास्थेनीसचीं त्रुटित वृत्तें इ. सं. १८४६ मध्यें श्वानबेक यांनीं संग्रहीत करून प्रसिद्ध केलीं, आणि त्यांचें इंग्रजी भाषांतर म्याक् क्रिंड्ल् यांनीं Ancient India as described by Megasthenes and Arrian या पुस्तकांत प्रसिद्ध केलें. ग्रीक व रोमन वृत्तकारांनीं कौटिल्याचा उल्लेख केला नाहीं, तरी त्यांचीं सर्व वृत्तें विश्वसनीय आहेत असें नाहीं; त्यांच्या आधारांवर भिस्त ठेवून अनुमान काढणें धोक्याचें आहे. त्यांचीं वृत्तें अनेक स्थलीं दुसऱ्यांपासून मिळविलेल्या माहितीच्या आधारें संग्रहीत केलेलीं असल्यामुळें सर्वैव विश्वसनीय अशीं नाहींत.

मेग्यास्थेनीसच्या वृत्तांत जो इतिहासाचा भाग आला आहे, त्यावरून तो कौटिल्याचा समकालीन होता, असें दिसून येत नाहीं, असा एक मुद्दा काढण्यांत आला आहे. कौटिल्यास मोठ्या साम्राज्याचा परिचय नाहीं, त्यास केवळ लहान राज्याचाच अनुभव आहे, त्याच्या ग्रंथांत लहान राजमंडलें, सामंतराज्यें व लहान लहान संघराज्यें यांचेंच विवेचन आढळून येतें,—असें गृहीत धरून आक्षेपकांनीं वरील मुद्दा काढिला आहे. पण अर्थशास्त्रांतील वस्तुस्थितीवरून पाहतां, हा मुद्दा केवळ कल्पनेच्या आधारावर काढिलेला आहे, असें दिसून येईल. कौटिल्यास ज्या राज्यांतील कारभाराचा विशेष अनुभव होता, त्याचें क्षेत्र विस्तीर्णच होतें. " देशः पृथिवी ! तस्यां हिमवत्समुद्रान्तरमुदीचीनं योजनसहस्रपरिमाणमतिर्यक् चक्रवर्तिक्षेत्रम्"–( अधि. ९, अ. १ ) देश म्हणजे पृथ्वी; तींत उत्तर दिशेस हिमालयपर्वत व महासागर यांमधील हजार योजनें सरळ लांबीचा जो प्रदेश, तो चक्रवर्ती राजाचें क्षेत्र असें म्हणतात. हें राज्य लहान नाहीं. राजमंडलाचें विवेचन करितांना सामंत राज्यांचाहि विचार करावा लागतो. शिवाय इतिहासावरून असें दिसून येतें कीं, चंद्रगुप्ताचा मुलगा बिंदुसार याच्या कारकीर्दीत दक्षिण हिंदुस्थान साम्राज्यांत सामील झालेला होता; चंद्रगुप्तानें ग्रीक लोकांपासून वायव्येकडील प्रांत काबीज केले होते, अशा विस्तीर्ण साम्राज्याचा अनुभव असतां, कौटिल्यास लहानशा राज्याचा कारभार परिचित होता, असें विधान म्हणजे तर्कटच होय. अर्थशास्त्रांतील संघवृत्त प्रकरणांत संघराज्यांविषयीं साम्राज्याचें धोरण कसें असावें, हें सांगितलें आहे. हीं सर्व राज्यें पंजाब, अफगाणिस्थान (कांबोज), पश्चिम हिंदुस्थान व उत्तर बहार या प्रदेशांत वसलेलीं असून त्यांचा समावेश मंडलांत झालेला होता. या संघराज्यांत साम्राज्यास अनुकूल व साम्राज्यास प्रतिकूल, असे दोन पक्ष असल्यामुळें, प्रतिकूल पक्षांत भेदोपायानें फूट पाडण्याचा प्रयत्न करावा, असें सांगितलें आहे. पंजाब, अफगाणिस्थान, पश्चिमहिंदुस्थान व उत्तरबहार हे प्रांत जर कोणत्या राजाच्या मंडलांत समाविष्ट झालेले असतील, तर ते मौर्यवंशांतील पहिल्या पहिल्या राजाच्या कारकीर्दींतच झाले असले पाहिजेत. मौर्य राज्यांतील राजकीय धोरण पुढील काळांत राहिलें नाहीं. कौटिल्यास साम्राज्य हवें होतें, त्याच्या ग्रंथांत विजिगीषु राजानें दिग्विजय करून सर्व राजांस आपल्या छापेखालीं आणावें असा उपदेश केलेला आहे. अर्थशास्त्रांत निर्दिष्ट केलेलें सम्राट राजाचें जें धोरण तेंच मौर्यवंशांतील राजाचें धोरण होतें. शुंगघराण्यांतील राजांच्या कारकीर्दींत हें धोरण राहिलें नाहीं.

येथवर केलेल्या विवेचनावरून अर्थशास्त्र हा ग्रंथ कौटिल्यानेंच लिहिला, यावद्दल शंका राहत नाहीं तथापि तो ग्रंथ ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकांत लिहिलेला असावा, असें सिद्ध करण्याकरितां जीं कारणें दाखविण्यांत येतात तीं कितपत समर्पक आहेत यासंबंधानें विचार करूं.

## अर्थशास्त्र खिस्तपूर्व चवथ्या शतकांत लिहिलेलें

प्रस्तुत अर्थशास्त्रग्रंथ एकाच ग्रंथकारानें लिहिला आहे, हें सर्वांस मान्य आहे. त्यांत आरंभापासून अगदीं शेवट पर्यंत विषयांची मांडणी व्यवस्थित रीतीनें केलेली असून विविधविषयांवरील पूर्वपक्ष व उत्तरपक्ष यांची योजना इतक्या समर्पकतेनें केलेली आहे कीं, तो ग्रंथ एकाच ग्रंथकारानें रचिला आहे, याविषयीं शंका राहात नाहीं. अर्थशास्त्र खिस्तोत्तर चवथ्या शतकांत लिहिलेलें असावें, असें कांहीं संशोधकाचें मत असलें तरी त्या शतकांत सदर ग्रंथ ज्या स्थितींत होता, त्याच स्थितींत तो आज आहे, त्यांत फेरफार झालेला नाहीं, ही गोष्ट त्यांसहि मान्य आहे. म्हणून अर्थशास्त्ररचनेचा काल खिस्तपूर्व चवथें शतक व खिस्तोत्तर चवथें शतक यांत मर्यादित झालेला असल्यामुळें तें या दोन शतकांच्या दरम्यान केव्हां लिहिलें गेलें याच प्रश्नाचा उलगडा करावयाचा आहे. कामसूत्रांचा कर्ता वात्स्यायन, यानें आपलीं कामसूत्रें अर्थशास्त्राच्या अनुरोधानें लिहिलेलीं आहेत. कामसूत्रांत अर्थशास्त्रांतील अनेक वचनें जशींच्यातशीं उद्धृत केलेलीं आहेत. वात्स्यायन इ. स. चवथ्या शतकांत होऊन गेला. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर तर त्याचा काळ इ. स. पहिल्या दुसऱ्या शतकापर्यंत मागें नेतात. म्हणून अर्थशास्त्र कामसूत्रांच्या अगोदर लिहिलेलें असल्यामुळें, तें इ० स० चवथ्या शतकाच्या किंबहुना पहिल्या दुसऱ्या शतकाच्या आधींच लिहिलें असावें, असें मानावें लागतें. जॉली साहेबांनीं त्याचा काळ इ. स. ३०० च्या सुमारास धरिला आहे, आणि आपल्या मताच्या समर्थनार्थ भली मोठी कारणावलि दिली आहे, प्रस्तुतस्थळीं तिचा विचार करणें अवश्य आहे.

अर्थशास्त्र अधिकरण १० अध्याय ३ यांत युद्धांतील वीरांस प्रोत्साहन द्यावयाकरितां " यान् यज्ञसंघैस्तपसाच विप्राः " इत्यादि आणि " नवं शरावं सलिलस्य पूर्णं " इत्यादि असे दोन श्लोक आलेले आहेत; यांपैकीं दुसरा श्लोक इ. स. तिसऱ्या शतकांतील भासकवीच्या प्रतिज्ञायौगंधरायण नाटकांत आढळून येतो. हा श्लोक कौटिल्यानें भासाच्या नाटकांतून उद्धृत केला असावा, असें सांगण्यांत येतें! युद्ध प्रसंगीं वीरांस प्रोत्साहन देण्याचा प्रघात प्राचीन काळापासून चालत आला आहे; तो भासानें किंवा कौटिल्यानें अस्तित्वांत आणिला, असें नाहीं. राजाकरितां धारातीर्थी देह टाकणाऱ्या वीरांस अमुक पुण्य लाभतें, हें सैनिकांच्या मनास पटविण्याकरितां वेदांतील वचनानंतर, ' अपीह श्लोकौ भवतः ' म्हणजे या संबंधानें आणखी दोन श्लोक आहेत, असें म्हणून वर निर्दिष्ट केलेले श्लोक दिले आहेत. वेदवचनांचा आधार दिल्यानंतर दुसरे दोन श्लोक तितक्याच आदरणीय व आप्तप्रमाण ग्रंथांतून दिले असले पाहिजेत. म्हणून अर्थशास्त्रांतील " नवं शरावं " हा श्लोक भासाच्या नाटकांतून उद्धृत केलेला असेल, हें संभवनीय नाहीं. अर्थशास्त्रांतील दोनहि श्लोक नष्टप्राय पूर्वकालीन ग्रंथांतून घेतलेले, अथवा तत्कालीन समाजांत सर्वतः प्रचलित असलेले असतील. वस्तुतः पाहतां भासानें फक्त " नवं शरावं " हा एकच श्लोक घेतला आहे आणि त्यानेंच तो अर्थशास्त्रांतून घेतला असणें अधिक संभवनीय आहे.

अर्थशास्त्रांत धर्मशास्त्रांचा उल्लेख आहे; आणि त्यांतील कायदे व नारद, मनु, याज्ञवल्क्य यांच्या धर्मशास्त्रांतील कायदे, यांत बरेंच साम्य आहे. आणि ज्याअर्थीं याज्ञवल्क्याच्या धर्मशास्त्रांतील कायद्यांचें साम्य अर्थशास्त्रांतील कायद्यांत स्पष्टपणें गोचर होतें, त्याअर्थीं अर्थशास्त्र हें याज्ञवल्क्याच्या धर्मशास्त्राचें सूत्रात्मक रूपांतर आहे, असें आक्षेपकाचें मत आहे! दोनहि ग्रंथांत अनेक स्थलीं साम्य आहे, हें अगदीं बरोबर आहे, पण एवढ्यावरून अर्थशास्त्रकारानें याज्ञवल्क्याच्या धर्मसूत्रांचें रूपांतर केलें, असें अनुमान निघत नाहीं. उभयतांच्या ग्रंथांतील साम्यदर्शक अशीं अनेक उदाहरणें देतां येतील, तथापि दोन तीन उदाहरणांवरून काय निष्पन्न होतें, हें पाहूं:—

१ महाकुलीनो दैवबुद्धिःसत्त्वसम्पन्नो वृद्धदर्शी धार्मिकःसत्यवागविसंवादकःकृतज्ञःस्थूललक्षो महोत्साहोऽदीर्घसूत्रःशक्यसामन्तो दृढबुद्धिरक्षुद्रपरिषत्को विनयकामः—अर्थशास्त्र अधि. ६, अ. १.

महोत्साहस्स्थूललक्षःकृतज्ञो वृद्धसेवकः। विनीतस्सत्त्वसम्पन्नःकुलीनस्सत्यवाक्शुचिः। अदीर्घसूत्रःस्मृतिमानक्षुद्रोऽपरुषस्तथा। धार्मिकोऽव्यसनश्चैव प्राज्ञःशूरोरहस्यवित्। स्वरन्ध्रगोप्ताऽन्वीक्षिक्यां दण्डनीत्यां तथैवच। विनीतस्त्वथ वार्तायां त्रय्यां चैव नराधिपः॥ याज्ञवल्क्य १, ३०८–३१०

२ शापथवाक्यानुयोगमविसृष्टं कुर्वतो युक्तकर्मणि चायुक्तस्य. अर्थशास्त्र आधि. ३, अ. २०.

अयुक्तं शपथं कुर्वन् अयोग्यो योग्यकर्मकृत् याज्ञवल्क्य २, २३३–३५

३ पाणिपाददंतभङ्गे कर्णनासाच्छेदने व्रणविदारणे चान्यत्र दुष्टव्रणेभ्यः अर्थशास्त्र अधि. ३, अ. १९.

करपाददतोभङ्गेछेदनेकर्णनासयोः मध्योदण्डोव्रणोद्भेदेमृतकल्पहतेतथा याज्ञवल्क्य २, २१७.

या उताऱ्यांतील ग्रंथकारांची भाषाशैली आणि कमी अधिक फरक यांचा विचार केला, म्हणजे कोणीं कोणाच्या आधारें ग्रंथरचना केली, याचा उलगडा होईल. अर्थशास्त्रकाराची भाषा सूत्रमय आहे, त्यानें पद्यमय प्रबंधाचा फारसा अवलंब केला नाहीं; त्यानें योजिलेले कांहीं शब्द अर्वाचीन काळांत लुप्त झालेले असून कांहीं शब्दप्रयोग पाणिनीच्या नियमांविरुद्ध आहेत. याज्ञवल्क्याचा ग्रंथ श्लोकबद्ध आहे, आणि त्याची शब्दयोजना अर्वाचीन काळांत प्रचलित असलेली व पाणिनीच्या नियमांस अनुसरून अशी आहे. पहिल्या उदाहरणांत अर्थशास्त्रकारानें "अक्षुद्रपरिषत्कः"–ज्याचें मंत्रिमंडळ क्षुद्र नाहीं–असा सामासिक शब्दप्रयोग योजिला असून, याज्ञवल्क्याच्या ग्रंथांत समास फोडून "अक्षुद्रः" व "अपरुषः" जो क्षुद्र नाहीं व कठोर नाहीं असा–असे दोन निरनिराळे शब्द योजिले आहेत. याज्ञवल्क्यानें "परिषद" शब्द अजीबात गाळलेला आहे. कदाचित् त्याच्या काळांतील राज्यव्यवस्थेंत मंत्रिपरिषद भरविण्याचा प्रघात बंद झालेला असेल, अथवा लेखकाच्या हातून चुकीनें 'अक्षुद्रपरिषत्कः' याऐवजीं "अक्षुद्रः" व "अपरुषः" असे दोन निरनिराळे शब्द पडले असतील. दुसऱ्या उदाहरणांत अर्थशास्त्रकारानें "शापथंवाक्यानुयोगं"–एखाद्याची शपथेवर जबानी–असा शब्दप्रयोग विशिष्ट पारिभाषिक अर्थानें केला असून, याज्ञवल्क्यानें त्याचा अर्थ 'अयुक्तं शपथं'-म्हणजे अयोग्य शपथ-असा केला आहे. शिवाय अर्थशास्त्रांत ज्याठिकाणीं '(कुर्वतो) युक्तकर्म चायुक्तस्य'जो सरकारी नोकर नाहीं, त्या माणसाकडून जो सरकारी कामगाराचें काम करवून घेईल त्यास–असा शब्दप्रयोग आहे, त्याठिकाणीं याज्ञवल्क्यानें योग्य" व "अयोग्य" अशी शब्दयोजना केली आहे. अर्थशास्त्रकारानें "युक्त" व "अयुक्त" हे दोन शब्द "सरकारी नोकर" व "सरकारी नोकर नाहीं असा माणूस" या विशिष्ट अर्थानें योजिले आहेत. या शब्दांचें विशिष्ट अर्थ कालांतरानें लुप्त झाल्यामुळें, याज्ञवल्क्यास अर्थशास्त्रांतील शब्दांचा अर्थ नीट बोध झाला नसेल. म्हणूनच त्यानें "योग्य" व "अयोग्य" असे प्रचारांतील अर्थांचे शब्द योजिले. अशोकाचा शिलालेख क्रमांक ३ यांत प्रादेशिक, राजुक व "युत" या तीन सरकारी अधिकाऱ्यांनीं पांच पांच वर्षांनीं धर्मप्रसारासाठीं व इतर कामासाठीं दौरा काढावा, असें राजशासन लिहिलें आहे. यांतील "युत" शब्द अर्थशास्त्रांतील "युक्त" शब्दच होय. अशोकाच्या शिलालेखाचें प्रकाशन होण्यापूर्वी "युक्त" शब्दाच्या अर्थाविषयीं अनेक तर्क चाललेले होते; आतां त्याचा अर्थ सरकारी नोकर असा निश्चित झाला आहे. जॉली साहेबांच्या मतें याज्ञवल्क्याच्या ग्रंथांतील "अयुक्तं शपथं कुर्वन्" व अर्थशास्त्रांतील "शपथवाक्यानुयोगमनिसृष्टं" यांतील भेद लक्षांत घेण्यासारखा नाहीं. शपथेवर जबानी घ्यावयास लावणें हें अनधिकृत कृत्य असल्यामुळें अयोग्य आहे. पण "अयोग्यो योग्यकर्मकृत्"–योग्य माणसानें करावयाचें काम करणारा अयोग्य माणूस–याचा उलगडा या लटपटीनें कसा होणार ? "युक्त" शब्दाचा पारिभाषिक अर्थ लुप्त झालेला होता. याज्ञवल्क्यासारख्या धर्मशास्त्रकारालाहि त्याचा अर्थ उलगडला नाहीं. याज्ञवल्क्य इ. स. ३०० च्या सुमारास होऊन गेला, हें सर्वतोग्राह्य असल्यामुळें, अर्थशास्त्रकार कौटिल्य इ. स. २००–३०० च्या आधीं बरींच शतकें होऊन गेला असला पाहिजे. तिसऱ्या उदाहरणांत कौटिल्यानें मारामारींत एखाद्याची जखम अथवा गळूं विदारण करणाऱ्या इसमास शिक्षा सांगितली आहे; पण त्याची जखम अथवा गळूं दुष्ट म्हणजे भयंकर असल्यास शिक्षा माफ आहे; परंतु याज्ञवल्क्यानें अपवाद न ठेवितां जखम करणाऱ्यास अथवा गळूं फोडणाऱ्यास सरसकट शिक्षा सांगितली आहे ! यावरून याज्ञवल्क्याचा काळ कौटिल्यानंतरच असला पाहिजे, असें मानावें लागतें.

या सर्व उदाहरणांचा विचार केला, म्हणजे याज्ञवल्क्यानें आपले कायदे कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून संग्रहीत केले, असें ओघानें मान्य करावें लागतें. शिवाय अर्थशास्त्रांत कांहीं ठिकाणीं मात्र श्लोक आहेत; भाषा गद्यमय–सूत्रमय आहे. कौटिल्यास याज्ञवल्क्याच्या ग्रंथाच्या आधारें अर्थशास्त्र रचावयाचें होतें, तर त्यानें पद्यात्मक रचना न करितां सूत्रमय कां केली ? वास्तविक पाहतां, सूत्रांचें पद्यमय रूपांतर करणें हेंच वहिवाटीस धरून आहे, आणि त्याप्रमाणें याज्ञवल्क्यानें अर्थशास्त्राच्या आधारें रचना केली.

अर्थशास्त्र अधि. २ अ. १० यांत संस्कृत व्याकरणांतील पारिभाषिक शब्द आले आहेत, यावरून त्यास पाणिनीच्या अष्टाध्यायी सूत्रांचा परिचय होता; या आधारावर अर्थशास्त्र रचनेचा काळ निश्चित करण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. पण पाणिनी खिस्तपूर्व आठव्या शतकांतील असो, वा जयस्वाल मानितात त्याप्रमाणें पांचव्या शतकांतील असो, त्याच्या व्याकरणाचा परिचय अर्थशास्त्रकाराचा काळ खिस्तपूर्व ३००–३२५ धरावयास कोठें आड येतो ? वास्तविक पाहतां, कौटिल्यानें योजिलेले नाम, आख्यात, उपसर्ग, व निपात हे शब्द पाणिनीच्याहि पूर्वी प्रचारांत होते; यास्कानें

निरुक्तांत हेच शब्द योजिले आहेत. उलटपक्षीं कौटिल्यानें अनेक स्थलीं पाणिनीच्या नियमांविरुद्ध शब्दयोजना केलेली आहे, म्हणून तो पाणिनीच्या आधीं होऊन गेला, असें कां मानूं नये ? पण पाणिनि कौटिल्याच्या अगोदरचा ग्रंथकार, हें निर्विवाद आहे. फार तर असें म्हणतां येईल, कीं पतंजलीच्या काळांत पाणिनीचे शब्दप्रयोग जितके रूढ झाले होते, तितके कौटिल्याच्या काळीं ते रूढ झाले नव्हते.

धर्मसूत्रांत व महाभारतांत प्रतिपादिलेले राजधर्म अगदीं अपक्व स्थितींत आहेत; पण अर्थशास्त्रांतील विस्तारपूर्वक विवेचन पाहिलें म्हणजे त्या शास्त्राची प्रगति अधिक झालेली दिसते; अर्थात् अर्थशास्त्राची रचना अलीकडेच झाली असली पाहिजे, असें आक्षेपकांचें म्हणणें आहे ! धर्मशास्त्राचे विषय निराळे व अर्थशास्त्राचे निराळे; दोनहि शास्त्रांची तुलना करतां येणार नाहीं. धर्मशास्त्रकारांचा उद्देश प्राधान्यानें धर्माचें–नैतिक धर्माचें–विवेचन करण्याचा असून, त्यांस राजकीय धर्म अनुषंगानें प्रतिपादावयाचा असतो; राजधर्म प्रतिपादनास धर्मशास्त्रांत गौण स्थान आहे. अर्थशास्त्रांत राजधर्म व आर्थिक व्यवहार यांस प्रधान-स्थान असून, धर्म–नैतिक धर्म–अनुषंगानें आलेले असतात. अशा विषयभिन्नत्वामुळें दोनहि शास्त्रांच्या तुलनेच्या आधारें कालाचा निश्चय करितां येत नाहीं. महाभारतांतील राजधर्म अपक्व स्थितींतील आहेत हें तरी मान्य कोण करील ? शांतिपर्वांतर्गत राजधर्मपर्वांतील अध्यायांचें अवलोकन केलें, म्हणजे त्यांतील राजधर्म–शास्त्र निदान तात्त्विक दृष्ट्या तरी अर्थशास्त्रापेक्षांहि परिपोष पावलेलें होतें, असें निदर्शनास आल्यावांचून राहत नाहीं. शिवाय कालनिर्णय ग्रंथाच्या श्रेष्ठत्व-कनिष्ठत्वावरून ठरत नाहीं. अमुक ग्रंथ श्रेष्ठ प्रतीचा आहे म्हणून तो, त्याच्यामागून त्याच विषयावरील झालेल्या दुसऱ्या एखाद्या निकृष्ट दर्जाच्या ग्रंथाच्या मागून झाला असें कोण म्हणेल ? कौटिल्याचें अर्थशास्त्र कामंदकाच्या नीतिसाराहून श्रेष्ठ आहे, म्हणून तो कामंदकाच्या मागून झाला, असें सिद्ध होत नाहीं !

अर्थशास्त्रकाराचें भूविषयक ज्ञान दक्षिण हिंदुस्थानापुरतें मर्यादित झालेलें दिसतें, शिवाय त्या ग्रंथाची उपलब्धिहि दक्षिण हिंदुस्थानांत झाली, यावरून तो दक्षिण हिंदुस्थानांतील ग्रंथकार आहे, असें आक्षेपकांचें मत आहे संस्कृत ग्रंथांचीं हस्तलिखितें दक्षिण हिंदुस्थानांत अनेक होतीं व आहेत; तथापि ग्रंथाचें हस्तलिखित तेथें सांपडलें, म्हणून तो तेथेंच लिहिला गेला, असें सिद्ध होत नाहीं. अर्थशास्त्रकाराचें भूविषयक ज्ञान दक्षिण हिंदुस्थानापुरतें मर्यादित नाहीं. व्यापाराकरितां स्थलपथांचें अथवा भूमिमार्गांचें विवेचन करितांना कौटिल्य म्हणतो, ' हिमालयाकडे जाणाऱ्या मार्गापेक्षां दक्षिण हिंदुस्थानाकडे जाणारा मार्ग अधिक किफायतशीर आहे. ' यांतील हिमालयाकडे जाणारा-हैमवत आणि दक्षिण हिंदुस्थानाकडे जाणारा-दक्षिणापथ, म्हणजे अर्थात् उत्तरेकडे जाणारा आणि दक्षिणेकडे जाणारा, हे दोन शब्दप्रयोग ध्यानांत आणिले असतां, अर्थशास्त्रकार या दोन दिग्भागांच्या-मधील प्रदेशांत राहून ग्रंथरचना करीत होता, असें म्हटलें पाहिजे. शिवाय, त्याचें भूविषयक ज्ञान पाहिलें, तर तो उत्तरेकडील उत्तर हिंदुस्थानांतील रहाणारा असावा, असें दिसून येतें. कांबोज, काशी, कुकर, कुरु, लिच्छवी, मद्र, मल्ल, नेपाळ, पांचाळ, सुराष्ट्र इत्यादि देशांच्या निर्देशावरून तर त्याचें वसतिस्थान उत्तर हिंदुस्थानच ठरतें.

अर्थशास्त्रांत ' सुरङ्ग ' शब्द योजिलेला आढळण्यांत येतो; त्याचा अर्थ भुयार, बोगदा, आरपार रस्ता असा असून, त्याची व्युत्पत्ति ग्रीक भाषेंतील Syrinx शब्दापासून झालेली आहे. पण यावरून कौटिल्याचा काळ खिस्तपूर्व तिसरें शतक धरावयास कांहीं बाध येत नाहीं. कौटिल्य हा अलेक्झांडर येण्यापूर्वीं व तो हिंदुस्थान सोडून निघून गेल्यानंतरहि होताच. ग्रीकभाषेपासून व्युत्पन्न झालेला सुरङ्ग शब्द अर्थशास्त्रांत येणें अशक्य नाहीं. अलेक्झांडरच्या स्वारींत Syrinx चा उपयोग कित्येक प्रसंगीं झालेला आहे. अलेक्झांडरच्या स्वारीपूर्वींहि ग्रीक लोक हिंदु लोकांच्या निकट सहवासांत होते, असें इतिहास सांगतो. कुभा अथवा काबूल नदीच्या तीरीं कांहीं ग्रीक लोक अलेक्झांडराच्या स्वारीच्या पुष्कळ अगोदर येऊन राहिले होते, हें लक्षांत आणिलें म्हणजे ग्रीक शब्दांपासून व्युत्पन्न झालेले शब्द हिंदूंच्या तत्कालीन ग्रंथांत प्रविष्ट होणें साहजिक दिसतें.

## अर्थशास्त्रांतील धातुसंबंधाची माहिती.

अर्थशास्त्र अधि २ अ. १२ यावरून असें दिसतें कीं, अर्थशास्त्रकाराच्या पूर्वीं शुल्वधातु–तांबें वगैरे धातु–यासंबंधी क्रियांचें विवेचन करणारे शास्त्रग्रंथ व रसायनशास्त्रावरील ग्रंथ, अस्तित्वांत असावे. प्रो. वुइंटरनिट्झ व डॉ. जॉली यांच्यामतें हिंदुस्थानांत या शास्त्राचा उदय इ. स. नवव्या शतकांत झाला असल्याकारणानें अर्थशास्त्रकारानें हि त्याच शतकांत अर्थशास्त्र लिहिलें असावें ! त्याच प्रमाणें अर्थशास्त्रकारास खाणी, शिल्पकाम, किमया वगैरे वरील ग्रंथहि परिचित होते, आणि त्यासंबंधीं

अशीं पुस्तकें चवथ्या शतकांतच अस्तित्वांत आलीं, त्याअर्थी अर्थशास्त्र रचनेचा काळ मागें नेतां येत नाहीं, असें मानण्यांत येतें. धातुशास्त्र हिंदु लोकांस पुष्कळ आधींपासून परिचित असलें पाहिजे हें मोहेंदाजारो, पाटलिपुत्र वगैरे ठिकाणीं प्राचीनकाळांतील तांब्याचीं, रुप्याचीं, व इतर कांहीं मिश्र धातूंचीं नाणीं व भांडीं संशोधकांस उपलब्ध झालीं, यावरून सिद्ध होत आहे. धातूवर क्रिया करण्याची विद्या चंद्रगुप्त व अलेक्झांडर यांच्या आधींपासून हिंदुस्थानांत चालत आली होती, यांत शंका नाहीं. पाटलिपुत्र येथें मौर्य काळांतील ज्या कांहीं वस्तु उपलब्ध झाल्या आहेत, त्यांत ओतींव लोखंडाच्या वस्तु आहेत; त्याच प्रमाणें ओतींव कांचेच्या कांहीं मुद्रा हस्तगत झाल्या असून त्यावर मौर्य काळांतील व मौर्य पूर्व काळांतील लिपीचीं अक्षरें कोरलेलीं दिसतात, असें संशोधकांचें मत आहे. अर्थशास्त्राच्या काळापूर्वी जर धातुकाम अस्तित्वांत असलें, तर त्यासंबंधी माहिती त्याग्रंथांत आली असल्यास नवल तें काय ?

धातूंचें संशोधन करण्याची विद्या हिंदुस्थानास फार प्राचीनकाळापासून अवगत आहे. कांहीं परदेशस्थ संशोधकांच्या मतें हिंदुस्थानांत धातुसंशोधनशास्त्र Metallurgy ख्रि. पू. १५०० अथवा १००० पासून चालत आलें असावें. काळाचा निश्चितपणा प्रस्थापित करण्यास कितीहि अडचणी असल्या, तरी वैदिक काळांत शास्त्राचें बरेंच ज्ञान होतें, हें वेदांतील अनेक ऋचांवरून स्पष्ट दिसून येतें. परंतु वर निर्दिष्ट केलेल्या संशोधकांच्या मताविरुद्ध मतें प्रतिपादन करणारे कांहीं पश्चिमस्थ विद्वान् आहेतच. " पुरातन काळांतील कांहीं वस्तु अर्वाचीन काळीं उपलब्ध झाल्या असल्या, तरी त्यांवरून प्राचीनकाळीं धातूंचे कारखाने हिंदुस्थानांत होते, असें अनुमान काढतां येत नाहीं; फार तर असें म्हणतां येईल कीं हिंदु लोकांस या वस्तु माहीत होत्या आणि नित्यव्यवहारांत ते या वस्तूंचा उपयोग करीत होते, पण ते स्वतः या वस्तु तयार करीत होते, असें नाहीं. " अशा मताचा पुरस्कार करणाऱ्या संशोधकांस वेदांतील प्रत्यक्ष पुराव्यांवरून आपलें मत बदलावें लागेल. ख्रिस्तपूर्व ३००० वर्षेपूर्वी फिनिशियन लोकांचा हिंदुस्थानाशीं व्यापार चालत असल्याकारणानें धातूंच्या विशेषतः लोखंडाच्या वस्तूंचा प्रसार त्यांच्याच देवघेवीमध्यें झाला असल्याचा संभव आहे, असेंहि कांहीं आक्षेपकांचें मत आहे !

ऋग्वेदांत हिरण्य-सोनें, रजत-रूपें, आणि आयस्-लोखंड, या तीन धातूंचा उल्लेख अनेक स्थलीं आलेला असून, त्यांवरील प्रयोगांचेंहि वर्णन क्वचित् स्थलीं आढळून येतें. हिरण्य व रजत यांच्या अर्थाविषयीं मतभेद नाहीं; पण आयस् या धातूच्या अर्थाविषयीं वाद आहे. कित्येक विद्वान् पंडितांच्या मतें आयस् म्हणजे तांबें, अथवा जस्त असावें. तथापि ऋग्वेदांत आयस् धातूचें जें वर्णन आलें आहे, तें लोखंडासच लागू पडत असल्यामुळें त्याचा अर्थ तांबें, जस्त असा घेतां येत नाहीं. असो ! ऋग्वेदांत हिरण्य धातूचा उल्लेख शंभर ठिकाणीं आला आहे, यास्कानें निरुक्तांत सुवर्णाचे पर्यायशब्द दिले आहेत. यावरून वेदकाळांतील लोकांस हिरण्य या धातूचें बरेंच ज्ञान असून, त्यांस त्याचें अत्यंत महत्त्व वाटत होतें, हें निर्विवाद होय. सिंधु, सरस्वती वगैरे नद्यांत हिरण्य सांपडतें, या विषयीं अनेक स्थलीं उल्लेख आहे; व त्याचें संशोधन कसें करावें, याचेंहि ज्ञान तत्कालीन लोकांस असावें, असें दिसून येतें. जस्त या धातूचा उल्लेख क्वचित्च आलेला आहे; यावरून हा धातु हिरण्यासारखा प्रिय नसला पाहिजे. आयस् या धातूच्या अर्थाविषयीं बराच मतभेद आहे. ऋग्वेदांत या धातूचा उल्लेख चाळीस स्थलीं आलेला आहे आणि ठिकठिकाणीं दिलेल्या वर्णनावरून याचा अर्थ लोखंड, असाच निश्चित होतो. इंद्राच्या अश्वाचें वर्णन करितांना अश्वाचे पाय अयस् धातूने बनविलेले होते ( १.३६३,९ ) असें ऋग्वेद सांगतो; धनुष्याचें वर्णन अयोमुख व अयोग्रया-अयस्चें, लोखंडाचें टोंक असलेलें हत्यार-या शब्दांत केलें आहे; इंद्रास अयस्चीं, लोखंडाचीं, नखें असलेला या शब्दांनीं वर्णिलें आहे; आणि अयस् धातूच्या हत्यारानें अथवा लोखंडी हातोड्यानें ठोकून ठोकून बनविलेल्या भांड्यांत अथवा गृहांत सोम प्रवेश करितो, असें वर्णन आहे; गाईचें दूध साठविण्यासाठीं व तापविण्यासाठीं अयस् धातूंच्या कढया, भांडीं यांचाहि उल्लेख ठिकठिकाणीं आलेला आहे. या सर्व वर्णनावरून अयस् धातु कठिण, कणखर, तीक्ष्ण, व घनवर्धनीय आहे, असें निष्पन्न होत असल्यामुळें, तो लोखंडाचाच वाचक आहे, असें सिद्ध होतें. वेदकालीन समाजांत लोखंडाचीं कामें करणारे व भाता फुंकणारे लोहार, यांचा वर्ग अस्तित्वांत होता, हें वेदांतील कर्मार व ध्मातृ या शब्दांवरून दिसून येतें. अशोधित लोखंडाचें शोधन, लोखंडाचें सांधकाम वगैरे क्रियांचें ज्ञान कर्मार वर्गास चांगलें असलें पाहिजे; या क्रियांचीं वर्णनें वेदांत आलेलीं आहेत. सिंधु, सरस्वती वगैरे नद्यांच्या पात्रांत सांपडणाऱ्या हिरण्यमिश्रित सिकतामधून सोनें शुद्ध करून कसें घ्यावें, याचेंहि शास्त्र तत्कालीन कर्मारास अवगत होतें. लोखंडाचा रस करणें, लोखंडाचें सांधकाम करणें वगैरे क्रिया

करण्याकरितां लोहारांचे निदान लहानसान कारखाने असल्यावांचून त्यांचे विस्तारपूर्वक उल्लेख वेदांत येणें शक्य नाहीं. नद्यांच्या पात्रांत सांपडणारी हिरण्यमिश्रित सिकता आणून ती पाण्यानें स्वच्छ करून, तींतील हिरण्याचे कण वेगळे काढावयाचे, आणि ते मुशींत घालून त्यांच्या लगडी तयार करावयाच्या, वगैरे वर्णनावरून धातुसंशोधनाचें शास्त्र प्राचीन हिंदुसमाजास अवगत होतें, यांत शंका नाहीं. वेदांत वर्णिलेली हिरण्यसंशोधनपद्धति अगदीं साधी जरी असली, तरी ती अर्वाचीन शास्त्रीयपद्धतीहून भिन्न नाहीं.

## रसायन शास्त्राची माहिती.

अर्थशास्त्र हा ग्रंथ खिस्ती शकानंतर बऱ्याच कालावधीनें झाला, हें सिद्ध करण्याकरितां डॉ. वुईटर निटझ यांनीं पर्यायानें हिंदु रसायन शास्त्राचा इतिहास लिहिणारे सुप्रसिद्ध सर पी. सी० राय यांचा आधार दिला आहेः–"किमया शास्त्र हिंदुस्थानचें आहे, असें मानणारे हिंदु रसायन शास्त्राचे कर्ते पी. सी. राय देखील असें मानितात कीं, किमया–शास्त्राचा उल्लेख पांचव्या सहाव्या शतकांतील तंत्र–ग्रंथांत मात्र आढळतो, तत्पूर्वीच्या ग्रंथांत आढळत नाहीं." पण सदर शास्त्र दुसऱ्या शतकांत किंवहुना तत्पूर्वींहि हिंदुस्थानांत प्रचलित होतें, असेंच पी. सी. राय सांगत आहेत. कनिष्काचा समकालीन नागार्जुन नामक रसायनवेत्ता जादू, किमया वगैरे विद्यांत निष्णात होता, असें अनेक पुराव्यांवरून राय यांनीं सिद्ध केलें आहे. शिवाय, अथर्व वेदांत या विद्यांचा उल्लेख अनेक स्थलीं करण्यांत आलेला आहे; आणि अथर्व वेदाच्या काळापासून तंत्र-ग्रंथांच्या काळापर्यंत त्यांचा विकास कसकसा होत गेला, हेंहि पी. सी. राय यांनीं आपल्या ग्रंथांत विशद केलें आहे.

चरकाच्या वैद्यकीय ग्रंथांत व सुश्रुतांत औषधांच्या कामीं पाऱ्याचा उपयोग कित्येक ठिकाणीं सांगितला आहे, परंतु या ग्रंथांच्या आधीं रचिलेल्या ग्रंथांत असा उपयोग कोठेंहि आढळत नाहीं, म्हणून अर्थशास्त्र ग्रंथ तदनंतर झाला असला पाहिजे, असें मानण्यांत येतें. परंतु चरक व सुश्रुत यांच्या पूर्वी पाऱ्याचा उपयोग औषधांच्या कामीं करण्यांत येत नव्हता, यास काय आधार आहे ? आज उपलब्ध असलेल्या इतर ग्रंथांत असा उपयोग आढळण्यांत येत नसेल पण अजूनहि अनेक ग्रंथांचें शोधन व्हावयाचें आहे, आणि त्यांत चरक-सुश्रुतांसारखे पाऱ्याचा असा वैद्यकीय उपयोग सांगणारे ग्रंथ सांपडणार नाहींत, हें तरी कशावरून ? चरक हा कनिष्काच्या पदरीं राजवैद्य होता, हें सर्वश्रुत आहे; म्हणून त्याचा काळ इ. स. दुसऱ्या शतकांत निश्चित करावा लागतो. चरकसंहिता यानांवानें प्रसिद्ध असलेला ग्रंथ हा मूळ ग्रंथ नाहीं. प्राचीन काळांतील आत्रेय पुनर्वसु या ऋषीचा शिष्य अग्निवेश, यानें मूळग्रंथ रचिला; त्याचें संशोधन करून दृढबल नामक ग्रंथकारानें चरकसंहिता रचिली, आणि याच चरकसंहितेचें संशोधन करून चरकानें प्रस्तुतकालीं प्रसिद्ध असलेला ग्रंथ संपादिला, यावरून इ. स. दुसऱ्या शतकांत, किंवहुना तत्पूर्वीहि औषधांच्या कामीं बराच पाऱ्याचा उपयोग होत असावा, असें मानावयास हरकत नाहीं. तथापि या मुद्यावरून अर्थशास्त्राचा काळ निश्चित करितां येत नाहीं. कौटिल्यानें पाऱ्याचा उपयोग औषधांच्या कामीं अर्थशास्त्रग्रंथांत कोठेंहि उल्लेखिलेला नसल्यामुळें हा मुद्दा अगदीं अप्रस्तुत आहे. धातूंवर विवक्षित क्रिया करण्याचे कामीं मात्र कौटिल्यानें पाऱ्याचे प्रयोग सांगितले आहेत. धातूंवरील प्रयोगाचें ज्ञान झाल्यानंतरच वैद्यकीय ज्ञान प्राप्त होतें, असा सामान्य नियम आहे.

अर्थशास्त्र अधिकरण २ अध्याय १३ खाणी व खाणींचा उपयोग, या प्रकरणांत आकराध्यक्षास धातुशास्त्राचें व रसायनशास्त्राचें पूर्ण ज्ञान असलें पाहिजे असें स्पष्ट सांगितलें आहे; शिवाय त्यास खनिज पदार्थांचीं कामें करण्याकरितां साहाय्य करणाऱ्या कामगारांसहि त्या शास्त्रांचा परिचय असावा लागतो. अर्थात् धातुशास्त्रावरील व रसायनशास्त्रावरील ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्राच्या रचना कालापूर्वी अस्तित्वांत असल्यावांचून त्या शास्त्रांत प्रावीण्य संपादन केलेले कामगार समाजांत कसे सांपडतील ?

कौटिलीय अर्थशास्त्रांत प्राचीन अर्थशास्त्रकारांचीं मतें उद्धृत केलीं आहेत, तीं सर्व काल्पनिक आहेत; महाभारतांत त्या शास्त्रकारांचीं नांव आढळत असलीं, तरी ते शास्त्रकार इतर ग्रंथांत उल्लेखिलेले आढळत नाहींत, असें आक्षेपकांचें मत आहे. पण अर्थशास्त्रांत अनेक स्थलीं उल्लेखिलेल्या विशालाक्ष व बृहस्पति शास्त्रकारांचीं वचनें संस्कृत वाङ्मयांत अनेक स्थलीं आढळून येतात, असें महामहोपाध्याय गणपतिशास्त्री यांनीं आपल्या अर्थशास्त्रावरील प्रस्तावनेंत सप्रमाण सिद्ध केलें आहे. दहाव्या शतकांतील सोमदेव सूरिकृत नीतिवाक्यामृत नामक अर्थशास्त्रग्रंथाच्या टीकेंत बृहस्पति व शुक्र ( उशनस् ) या ग्रंथकारांचीं वचनें उल्लिखित केलीं आहेत. शिवाय त्यांतच सोमदेवानें मनूचें सूत्र उल्लिखित केलें असून, सदर सूत्र स्वायंभुव मनूचें म्हणजे धर्मशास्त्रकार मनूचें नसून, अर्थशास्त्रकार मनूचं वचन आहे. सदर वचन मानव अर्थशास्त्रांतील आहे, असें स्पष्ट म्हटलें आहे;–"यदाह वैवस्वतो मनुः । उञ्छषड्भागप्रदानेन वनस्था अपि तपस्विनो राजानं सम्भावयन्ति । तस्यैव तद्भूयात् यस्तान् गोपायति "

( नी. वा. ६ ) अर्थशास्त्रांत उल्लेखिलेल्या प्राचीन शास्त्रकारांचीं वचनें अनेक ग्रंथांत आढळून येत असल्यावर तीं वचनें काल्पनिक आहेत, असें म्हणणें अयुक्त होईल.

अर्थशास्त्र अधिकरण २ अध्याय ३२ यांत " सामूर, चीनसी व सामूली हे तीन ( चामड्याचे ) प्रकार बाल्हवप्रांतांत सांपडतात, " असें सांगून याच अध्यायांत एकास्थलीं मगध, पुंड्र वगैरे देशांतील रेशमाच्या रंगाचें वर्णन " चीनदेशांतील रेशमाला व वस्त्राला लागू पडतें, " असें सांगितलें आहे. यांतील चीन देश म्हणजे अर्वाचीन काळांत चीन या नांवानें प्रसिद्ध असलेला देश होय, अशी कल्पना करून अर्थशास्त्रग्रंथाचा रचनाकाल बराच पुढें ढकलण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. इ. स. पहिल्या शतकापर्यंत हिंदुस्थानचें व हिंदुस्थानापासून हजारों मैल दूर असलेल्या विस्तीर्ण चीन देशाचें दळणवळण सुरू झालें नव्हतें. अशोकानें बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठीं परदेशीं धर्मप्रचारक पाठविले, पण तेहि चीन देशांत गेले नव्हते. अर्थशास्त्रांत निर्दिष्ट केलेला चीन, हा बाल्हवप्रांतांत म्हणजे हिमालयाच्या डोंगराळ भागांतील एका प्रांतांत होता. प्राचीन संस्कृत वाङ्मयांत चीन देशाचा निर्देश हिमालयांतील दरद वगैरे डोंगराळ प्रदेशांबरोबर करण्यांत येतो. काश्मीरप्रांतांत बाल्टीस्तान व दर्दीस्तान असे दोन विभाग आहेत, तेच अनुक्रमें बाल्हव व दरद देश असावे. अजूनहि जिल्जिन Gilgit भागांतील कांहीं समाजांत 'शीन' हें नांव रूढ आहे; या भागांतील लोक शीक वंशांतील आहेत, असें मानितात. तेथील लोकांची भाषा संस्कृत असावी, असें अर्थशास्त्रावरून अनुमान निघतें. यावरून अर्थशास्त्रांतील चीन देश प्राचीन हिंदुस्थानांतच वसलेला असल्यामुळें कौटिल्यास त्याची माहिती असणें शक्य आहे.

कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ इ. स. तिसऱ्या-चवथ्या शतकांत रचिलेला असावा, हें सिद्ध करण्याकरितां जीं कारणें देण्यांत येतात, त्यांचा विचार येथवर झाला; तथापि तो ग्रंथ ख्रिस्तपूर्व तिसऱ्या-चवथ्या शतकांतच रचिला गेला असला पाहिजे, हें सिद्ध करावयास अर्थशास्त्रांतच प्रत्यक्ष पुरावा आहे. अर्थशास्त्रांतील 'युक्त' हा पारिभाषिक शब्द फक्त मौर्य काळांतच प्रचलित होता. अधिकरण ११ संघवृत्त या प्रकरणांतील विवेचन मौर्यांच्या कारकीर्दीसच लागू होतें. अधिकरण २ अध्याय ४१ यांत पांच संवत्सरांचें युग होतें, असें कोष्टक दिलें आहे, तें वेदांग ज्योतिषांत दिलें असून, मानव धर्मशास्त्र आदिकरून प्राचीन ग्रंथांत तें दिलेलें नाहीं. अर्थशास्त्रकाराच्या काळांत श्रावण महिन्यांत वर्षाऋतूस प्रारंभ होत होता, हल्लीं त्यास आषाढांत सुरवात होते; आणि दर शंभर वर्षांनीं ऋतु दीड दिवस मागें जातो, असें धरिल्यास 'अशोकाच्या व अलेक्झांडरच्या काळीं ऋतूचा प्रारंभ हल्लीं पेक्षां एक महिना पुढें झाला पाहिजे'—म्हणजे श्रावण महिन्यांत झाला पाहिजे, हें उघड आहे. याच अध्यायांतलें 'आषाढ महिन्यांत मध्यान्हीं छाया मुळींच नसते,' हें वर्णन उत्तरहिंदुस्थानासच लागू आहे.

बौद्ध धर्म व जैन धर्म यांचें वर्चस्व अशोकराजाच्या कारकीर्दींत जितकें वाढलें, तितकें चंद्रगुप्ताच्या कारकीर्दींत वाढलें नव्हतें. अर्थशास्त्र अधिकरण ३ अध्याय ७७, यांत शाक्य भिक्षु व आजीवक अथवा जैन भिक्षु यांस शूद्रांच्या मालिकेंत गोंविलें आहे. अशोकराजाच्या कारकीर्दींत या भिक्षूंच्या बाबतींत इतका कडक कायदा झाला नसता. अर्थात् अशोकाच्यापूर्वी अर्थशास्त्राची रचना झाली असली पाहिजे. पतंजलीनें मौर्यराजाच्या धनलोभाबद्दल केलेलें विधान अर्थशास्त्रावरून खरें ठरतें; द्रव्यप्राप्तीकरितां 'अर्चा' करण्याचा प्रघात अशोकाच्या किंवा त्याच्या नंतर होऊन गेलेल्या मौर्य राजांच्या कारकीर्दींत चालू असणें संभवनीय नाहीं. अर्थशास्त्रांत उल्लेखिलेली 'अर्चा' अर्थात् चंद्रगुप्त व बिंदुसार यांच्या कारकीर्दींतील असली पाहिजे.

ब्राह्मण-धर्माच्या वाङ्मयांत त्याचप्रमाणें बौद्ध-जैनांच्या वाङ्मयांत कौटिल्य हा चंद्रगुप्ताचा अमात्य होता, असे उल्लेख आहेत. बौद्ध व जैन यांच्या ग्रंथांत कौटिल्याची निंदा केलेली असून, ब्राह्मणधर्मीय ग्रंथ त्याची स्तुति करितात. कौटिल्य ही केवळ काल्पनिक व्यक्ति असती, तर तिजविषयीं असे परस्पर विरुद्ध उल्लेख कां यावे ? कौटिल्य ब्राह्मण-धर्मीय असल्यामुळें अर्थशास्त्रांत पाखंड मतवाद्यांविरुद्ध ग्रंथकाराचा कटाक्ष आढळून येतो, आणि म्हणूनच बौद्ध व जैन ग्रंथकार त्याचा तुच्छतापूर्वक उल्लेख करितात, हें साहजिकच आहे.

विष्णु पुराणांतील 'कौटिल्य एव चंद्रगुप्तं राज्येऽभिषेक्ष्यति' या विधानावरून चंद्रगुप्ताचें अस्तित्व गृहीत धरावयाचें मग कौटिल्याचें कां धरूं नये ? कौटिल्याचें अस्तित्व मान्य केल्यानंतर अर्थशास्त्रांत निवेदन केल्याप्रमाणें त्याचें ग्रंथकर्तृत्वहि मान्य केलें पाहिजे. कामंदकानें नीतिसार ग्रंथांत विष्णुगुप्त, चाणक्य, कौटिल्य या अर्थशास्त्रकाराच्या ग्रंथावरून नीतिसार रचिलें असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून अर्थशास्त्रग्रंथाच्या ज्या प्रती-

वरून कामंदकानें नीतिसार रचिलें, तींत अर्थशास्त्रांतील शेवटचा श्लोक ' दृष्ट्वा ' विप्रतिपत्तिं बहुधा शास्त्रेषु भाष्यकाराणाम्। स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रं च भाष्यं च। ' असल्यावांचून इतकें सविस्तर वर्णन आलें नसतें. कौटिल्यानें चंद्रगुप्ताच्यासाठीं अर्थशास्त्राची रचना केली, यास ' कौटिल्येन नरेन्द्रार्थे,' ( अधि० २ अ. ३१ ) आणि 'कृतनरेन्द्राङ्कं शस्त्रावरणमायुधागारं प्रवेशयेत् ' ( अधि. ५ अ. ९३ ) यांतील ' नरेन्द्र ' शब्दाचा-नांवाचा-आधार आहे. पुराणांतरीं चंद्रगुप्तास ' नरेंद्र ' असें दुसरें एक नांव-विशेष नाम दिलें आहे. मग अर्थातच, प्रस्तुत अर्थशास्त्र कौटिल्यानें लिहिलें नसून तें दुसऱ्याच कोणी ग्रंथकारानें कौटिल्याच्या नांवानें रचिलें असावें, या तर्कास विशेष महत्त्व राहत नाहीं. स्वतःच रचिलेल्या ग्रंथास दुसऱ्याचें नांव द्यावयाचें असल्यास, ग्रंथकर्ता कोणातरी सर्वमान्य आचार्याचें अथवा ऋषीचें नांव देईल. कौटिल्य अथवा चाणक्य याची गणना ऋषींमध्यें कोणी केलेली नाहीं. एखाद्या पंडितानें धर्मशास्त्रावर ग्रंथ रचून त्यास पूर्वकालीन ऋषीचें नांव दिलें, तर त्यांत ग्रंथकाराचा हेतु असूं शकेल, पण अर्थशास्त्रासारखा ग्रंथ रचणारा ग्रंथकर्ता दुसऱ्याच्या नांवावर ग्रंथ कां रचील ?

अर्थशास्त्रांतील कांहीं उल्लेखांवरून तो ग्रंथ चंद्रगुप्त अथवा बिंदुसार या मौर्यराजांच्या कारकीर्दीतील वर्णन करीत आहे, असें दिसून येतें. ' महाविसी ' चामडें, ' सृद्दी ' अथवा ' कामिशा ' देशांत-अफगाणिस्थानच्या ईशान्य भागांत होणाऱ्या काळ्या द्राक्षाचें मद्य, त्याचप्रमाणें ' उत्तरापथ ' म्हणजे ज्याला प्राचीन ग्रंथांत हिंदुस्थानच्या वायव्येकडील प्रांत म्हणतात तो, आणि ' दक्षिणापथ, ' यांचे उल्लेख मौर्यवंशांतील पहिल्या राजांच्या कारकीर्दीस अनुसरून आलेले आहेत. याशिवाय अर्थशास्त्रांतील कायदे अशोक व त्याच्यानंतर होऊन गेलेल्या मौर्यराजांच्या आणि सुंगवंशीय राजांच्या कारकीर्दीस विसंगत आहेत. बायकामुलांच्या पोषणाची तजवीज केल्याशिवाय संन्यास घेणाऱ्या इसमास अर्थशास्त्रांत दंड सांगितला आहे, तो अशोक राजाच्या धोरणास विसंगत दिसतो. राज्याला वारस नसल्यास मृत राजाच्या-' कन्यायां समान जातीयादपत्यमुत्पाद्य वाभिषिञ्चेत्-' कन्येच्या ठायीं समान जातीय पुरुषाकडून अपत्याची उत्पत्ति करवावी, व त्यास राज्याभिषेक करावा, हा कायदे वजा उपदेश अशोक राजाच्या कारकीर्दीस मान्य व्हावयासारखा नाहीं.

## मेग्यास्थेनीस व कौटिल्य

मेग्यास्थेनीसचीं हिंदुस्थानविषयक जीं वृत्तें प्रकाशित झालीं आहेत, त्यांतील कांहीं वृत्तें कौटिलीय अर्थशास्त्रांतील विषयांशीं जुळत असून, कांहीं अगदीं विसंगत अशीं आहेत, आणि जीं वृत्तें जुळणारीं अशीं दिसतात, तीं देखील कौटिल्य कालीन स्थितींशींच तर काय पण कोणत्याहि काळांतील परिस्थितीशीं जुळणारीं अशींच, अत एव सर्व सामान्य आहेत-यावरून कौटिल्य हा मेग्यास्थेनीसचा समकालीन नव्हता, असें अनुमान कांहीं लेखक काढीत असतात. डॉक्टर ओटोस्टीन या पाश्चात्य विद्वान् लेखकानें आपल्या 'मेग्यास्थेनीस व कौटिल्य निबंधांत हें अनुमान काढिलें असून, प्रो. वुइंटरनिट्झ त्याच्याच अनुरोधानें या अनुमानाचें मंडन करीत आहेत. मेग्यास्थेनीसच्या वृत्ताविषयीं प्रथमतः हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, त्याचीं वृत्तें तुटक तुटक असल्यामुळें निश्चित अनुमान काढावयास लागणारी ऐतिहासिक संगति त्यांत आढळून येत नाहीं. मेग्यास्थेनीसचा संगतवार असा एखादा ऐतिहासिक ग्रंथ उपलब्ध असता, तर त्यास कांहीं महत्त्व आलें असतें. स्वतः वुइंटर निट्झसाहेब म्हणतात, त्याप्रमाणें "मेग्यास्थेनीसचीं वर्णनें कांहीं बाबतींत चुकीचीं असतील, अथवा कांहीं बाबतींत स्वतःच्या कल्पनाप्रमाणें रंगविलेलीं असतील." वेदांचीं सूची तयार करणारे प्रो. म्याक्डोनेल व कीथ साहेब यांनीं जमिनीच्या मालकीसंबंधानें उहापोह करितांना ग्रीक ग्रंथकारांच्या हिंदुस्थानविषयक वृत्ताविषयीं जे उद्गार काढिले आहेत, तेहि या प्रसंगीं विचारांत घ्यावयासारखे आहेतः-

" In which unhappily would be dangerous to put much trust, since they were collected by observers who were probably little used to accurate investigations ( of such matters ), and whose statements were based on inadequate information. " त्याच्या वृत्तांवर सर्वथैव विश्वास ठेवणें धोक्याचें आहे, कारण तीं वृत्तें वस्तुस्थितीचें बरबर अवलोकन करून लिहिलेलीं असून पूर्ण चौकशी करून लिहिण्याची वृत्ति त्यांत दिसून येत नाहीं. मेग्यास्थेनीसचीं खंडवृत्तें Megasthenis Indika या नांवानें संपादित करणारे डॉक्टर श्वानबेक सदर वृत्ताविषयीं म्हणतात,-मेग्यास्थेनीसनें कांहीं वृत्तें जरी स्वतः अवलोकन करून लिहिलीं असलीं, तरी बाकीचीं वृत्तें तिऱ्हाईत माणसांकडून मिळालेल्या माहितीवर विश्वास ठेवून लिहिलेलीं आहेत.

मेग्यास्थेनीसचीं टाचणें व अर्थशास्त्र यांत तफावत आहे, हें दाखविण्यासाठीं कित्येक प्रसंगीं भलत्याच गोष्टींस महत्व देण्यांत येतें. राजा मृगयेला निघाला, म्हणजे त्याबरोबर स्त्रियांचा बराच मोठा परिवार असतो, राजा मृगयेला जावो, अथवा लढाईवर जावो, त्याबरोबर सशस्त्र स्त्रिया रथांत, घोड्यांवर अथवा हत्तींवर बसून चाललेल्या असतात. असें मेग्यास्थेनीस सांगतो, पण कौटिल्यहि मृगयेंत राजाबरोबर स्त्रिया असतात असें सांगतो. राजरक्षणार्थ धनुर्धारी स्त्रिया असतात हें अधि. १ अ. २१ वरून स्पष्ट होत आहे. शयनावरून उठल्याबरोबर या स्त्रियांनीं राजाचें स्वागत करावयाचें असतें; शिवाय, 'छत्रभृङ्गारव्यजन-शिबिकापीठिकारथेषु–' अधि. २ अ. ४८ यावरून राजाचें छत्र, सुवर्णपात्र व चवरी धरण्यासाठीं, आणि राजा पालखींत, अथवा सिंहासनावर, अथवा रथांत बसला असतां त्याच्या सन्निध बसण्यासाठीं स्त्रियांची योजना केलेली असते; अधि. १ अ. २१ यांत यात्रेला, समाजोत्सवाला वगैरे ठिकाणीं जावयाचें असेल, तेव्हां राजानें अपल्याबरोबर–'दशवर्गिकाधिष्ठितानि–' दशवर्गिक घ्यावेत, असें म्हटलें आहे. हे 'दशवर्गिक' कोण? राजा आपल्या राजवाड्यांत असो अथवा बाहेर गांवीं गेलेला असो, त्याजबरोबर त्याच्या वैभवाला अनुरूप असा सेवकांचा परिवार असला पाहिजे. या दशवर्गिक सेवकपरिवारांत स्नापक, संवाहक, आस्तरक, रजक, व मालाकार यांचीं कामें करणाऱ्या दासी होत–' तामिरधिष्ठिता वा शिल्पिनः;'–यांशिवाय राजाच्या यान–वाहनावर असणारे पिढीजाद सेवक, नांव, होडी चालविण्याकरितां इमानी नावाडी, सिद्ध तापसांची भेट घेतांना बरोबर लागणारे विश्वासूक व सशस्त्र रक्षक, परराष्ट्रीय वकिलाची भेट घेतांना आवश्यक असणारे मंत्री, आणि पहारेवाले सशस्त्र रक्षक–असे राजाच्या बरोबर दहा प्रकारचे सेवक निरंतर असतात. अर्थात् 'दशवर्गिक' परिवारांत स्त्रियांचा समावेश होतो. लढाईच्या छावणींत राजाच्या अंतःपुराची योजना केलेली–अधि १०, अ. १– दिसते, त्या अर्थी राजाच्या सेवक–परिवारांत स्त्रियांची योजना असलीच पाहिजे. 'यात्रासमाजोत्सवप्रहवणानि' यांतील 'यात्रा' शब्दाचा अर्थ स्वारी, लढाई असाहि आहेच.

मेग्यास्थेनीसनें मौर्यकालीन राज्यपद्धतीचें–अर्थात् चंद्रगुप्त व बिंदुसार या मौर्यराजांच्या कारकिर्दींतील राज्यपद्धतीचें–वर्णन दिलें आहे. तें वर्णन अर्थशास्त्रांतील राज्य पद्धतीशीं कितपत जुळतें, हें पहावयाचें झाल्यास स्थूलमानानेंच पाहिलें पाहिजे. मौर्य राजांच्या कारकिर्दींतील लष्करी कामांची व्यवस्था व इतर कामांची व्यवस्था पाहण्याकरितां तीस माणसांचें मंडळ नेमिलेलें असून निरनिराळ्या कामांची व्यवस्था पांचपांच माणसांचें एक पोट-मंडळ अशा सहा पोट-मंडळांकडे सोंपविलेली होती, असें मेग्यास्थेनीसनें नमूद करून ठेविलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्रांत मंडळांचा निर्देश केलेला नसला, तरी त्यांत निर्दिष्ट केलेल्या अधिकाऱ्यांचीं कामें व मेग्यास्थेनीसनें पोट-मंडळांकडे सोंपविलेलीं कामें यांत फरक नाहीं, असें निदर्शनास आल्यावांचून राहत नाहीं. उलट असेंहि म्हणतां येईल कीं, ज्या अर्थी कौटिलीय अर्थशास्त्रांत निर्दिष्ट केलेलीं सरकारी नोकरांचीं कामें इतक्या बारिकसारिक तपशिलांसह मेग्यास्थेनीसच्या टाचणांत आलेलीं आहेत, त्याअर्थीं अर्थशास्त्रावरूनच मेग्यास्थेनीसनें तीं घेतलीं नसतील कशावरून? असो.

वस्तुतः मेग्यास्थेनीसनें आपल्या टाचणांत वर्णिलेली मौर्यकालीन राजकीय परिस्थिति बहुंशानें अर्थशास्त्रांतील वर्णनाशीं जुळणारी अशीच असून देखील, केवळ किरकोळ फरकांस महत्त्व देऊन अर्थशास्त्र कर्त्याचा काळ पुढें ढकलण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. ऐतिहासिक वृत्तांचें वर्णन करणाऱ्या ग्रंथकारांत बारिकसारिक तपशिलांचा फरक केव्हांहि राहणारच; एवढ्यावरून त्यांच्या समकालीनत्वास बाध येण्याचें कारण नाहीं.

## कौटिल्य व म्याकिएव्हिली.

दोन व्यक्तींची परस्परांशीं तुलना करावयाची म्हणजे परस्परांतील साम्य पूर्णत्वानें अथवा कमी अधिक प्रमाणानें दाखवावें लागतें, आणि त्यांची तुलना करितांना कधीं कधीं गुणदोष विवेचनाच्या ओघांत एकास चढवून दुसऱ्यास उतरविण्याचा प्रसंग स्वीकारावा लागतो. अशीच स्थिति अर्थशास्त्राचा कर्ता कौटिल्य आणि इटलीमधील Prince वगैरे ग्रंथांचा कर्ता म्याकिएव्हिली या उभयतांच्या तुलनेंत प्राप्त झाली आहे. चंद्रगुप्ताचा अमात्य कौटिल्य, हा फ्लारेन्सच्या म्याकिव्हिलीची हुबेहुब प्रतिमा आहे, असें मानणारे कित्येक परदेशस्थ ग्रंथकार तर आहेतच, पण कांहीं अर्वाचीन भारतीय ग्रंथकारहि त्यांच्याच मताचा अनुवाद करीत आहेत. या मताचा पुरस्कार करणाऱ्या विद्वानांनीं काढिलेले सिद्धांत वस्तुस्थितीशीं कितपत जुळतात, हें पहावयाचें आहे.

हिंदुस्थानांतील व्यक्तींची पाश्चात्य व्यक्तींशीं तुलना करतांना कित्येक प्रसंगीं पाश्चात्यांच्या अनुमानपद्धतीनेंच त्यांची तुलना करण्यांत येते. पौर्वात्य व पाश्चात्य समाजांच्या परिस्थितींतील भेद लक्षांत न आणितां त्यांची तुलना सारख्याच दृष्टिकोणानें

केल्यास ती यथार्थ होणार नाहीं. " कौटिल्य हा म्याकिएव्हिलीसारखांच नवीन प्रकारच्या राजनीति तत्वांचा प्रणेता असून राज्यकारभार केवळ ऐहिक दृष्टीनें चालविला पाहिजे, या तत्वाचा पुरस्कार करणाऱ्या शास्त्रवेत्त्यांत त्याचा प्रामुख्यानें निर्देश करण्यांत येतो. कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ, प्रत्यक्ष राज्यव्यवहार कसा चालतो, हें सांगत नसून, तो एक राजनीतिशास्त्राचें तात्विक दृष्ट्या विवेचन करणारा ग्रंथ आहे, असें मानण्यांत येतें,–सारांश, कौटिल्य पंथ म्हणजे म्याकिएव्हिली पंथ होय. " या विधानाचें परीक्षण करून तीं कितपत समर्थनीय आहेत, हें पाहिलें म्हणजे तुलनेंतील साम्य–वैषम्य निदर्शनास येईल.

म्याकिएव्हिली खरोखर जर राजकारणाचीं अगदीं नवीन तत्वें प्रतिपादन करणारा ग्रंथकार असेल, आणि Prince, Dialgues इत्यादि ग्रंथांत जर त्यानें राजकारणासंबंधीं व राजनीतिशास्त्रासंबंधी नवीनच सिद्धांत ग्रथित करून ठेविले असतील, तर अर्वाचीन नीतिशास्त्रज्ञांमध्यें त्याचा अग्रस्थानीं निर्देश करण्यांत यावा, हें साहजिक आहे. पण म्याकिएव्हिलीनें आपल्या ग्रंथांत जीं तत्वें प्रतिपादन केलीं, तीं अगदीं अपूर्व व अननुभूत होतीं असें नाहीं. त्याच्या काळांतील इटालियन लोकांमध्यें नीतीसंबंधी जे विचार रूढ झालेले होते, तेच त्यानें एकत्रित करून तदनुरोधानें आपल्या ग्रंथांत कांहीं सिद्धांत ठरविले, एवढें फारतर म्हणतां येईल. "It is therefore, in the state of moral feeling among the Italians of those times that we must seek for the real explaination of what seems most mysterious in the life and writings of this remarkable man " ही मेकाले ग्रंथकाराची उक्ति म्याकिएव्हिलीच्या ग्रंथांचा विचार करितांना ध्यानांत ठेविली पाहिजे. म्याकिएव्हिलीनें नवीन परंपरा स्थापन केली, असें म्हणणें अयुक्त होईल. याच दृष्टीनें पाहिल्यास कौटिल्यानें नवीन परंपरा स्थापिली, असें नाहीं. कौटिल्याविषयीं सांगावयाचें म्हणजे तो एक प्रख्यात राजनीतिशास्त्रज्ञ होता, इतकेंच नव्हे तर त्यानें हिंदुस्थानांत हिंदूंचें राज्य प्रस्थापित करण्यांत अजब कामगिरी केली, हें इतिहासप्रसिद्ध आहे. तथापि अर्थशास्त्रांत मीं नवीन सिद्धांत काढिले, अथवा राजकारणांचीं नवीन तत्त्वें प्रतिपादन केलीं, असें तो म्हणत नाहीं; उलट पूर्वाचार्यांनीं जे ग्रंथ रचिले त्यांवरून मी अर्थशास्त्राची रचना केली, असें तो म्हणतो. प्राचीनकाळापासून चालत आलेलीच राजकारणाची परंपरा त्यानें आपल्या ग्रंथांत कायम ठेविली आहे. अर्थशास्त्रांत आलेलीं व्यावहारिक तत्त्वें धर्मसूत्रांत व धर्मशास्त्रांत आढळून येतात.

यूरोपखंडांत एकाकाळीं पोपचें वर्चस्व फारच वाढलेलें होतें. यच्चयावत् यूरोपांतील; विशेषतः इटली देशांतील, राजकारणाचीं सूत्रें पोपच्या तंत्रानें हलत होतीं. राजानें कोणाशीं तह करावयाचा, कोणाशीं युद्ध करावयाचें वगैरे व्यवहारांत पोपच्या मतास प्राधान्य होतें. पोप हा सर्व शक्तिमान् परमेश्वराचा प्रतिनिधि असल्यामुळें त्याची आज्ञा म्हणजे परमेश्वराची आज्ञा होय, अशी सार्वत्रिक समजूत झालेली होती. यूरोपांतील कित्येक राजांस व मुत्सद्यांस पोपची आज्ञा मोडिल्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागलें. या धर्मगुरूंनीं किती अनन्वित कृत्यें केलीं हें इतिहासप्रसिद्ध आहे. पण धर्मांत काय किंवा राजकारणांत काय, जुलमाचा अतिरेक व्हावयास लागला, म्हणजे प्रतिक्रिया उत्पन्न झालीच पाहिजे. धर्मगुरूंच्या असह्य जाचामुळें यूरोपांतील राजे एकामागून एक पोपची जुलमीसत्ता अमान्य करूं लागले. या प्रतिक्रियेस म्याकिएव्हिलीच्या काळापासून आरंभ झाला, असें म्हणावयास हरकत नाहीं. म्याकिएव्हिलीनें बंड केलें, तें रोमनक्याथालिक धर्मसंप्रदायाविरुद्ध नसून, पोपच्या–धर्माध्यक्षाच्या–राजकीय सत्तेविरुद्ध होतें. हिंदुस्थानांत अशी स्थिति केव्हांहि उत्पन्न झाली नव्हती. राजकीय क्षेत्रांत धर्माचार्यांनीं अथवा ब्राह्मणांनीं केव्हांहि अतिक्रमण केलें नाहीं. राज्यांतील नोकर–वर्गांत पुरोहितास उच्चस्थान दिलें असलें, तरी राज्याच्या सुरक्षितेकरितां अथवा अभिवृद्धीकरितां आवश्यक मानिलेले मंगलविधि करणें अथवा करविणें हेंच मुख्यतः त्याचें काम होय. पुरोहित राजनीतींत प्रवीण असला पाहिजे, असें अर्थशास्त्र सांगतें; पण यावरून राजकीय व्यवहारांत त्याच्या मतास प्राधान्य दिलें जात होतें, असें नाहीं. अथर्व मंत्रप्रयोगांनीं दैवी आपत्तीचें आणि सामदानादि उपायांनीं मनुष्यकृत आपत्तींचें निवारण करणें, हाच पुरोहिताच्या कर्तव्यांमधील प्रमुख भाग होय. वैयक्तिक ब्राह्मणांनीं विशिष्ट परिस्थितींत राज्यकारभारांत पुढाकार घेतलेला असेल; पण युरोपांतील पोपाप्रमाणें राजांस धिक्कारण्याचा अधिकार त्यांस केव्हांहि आलेला नव्हता. अर्थशास्त्र, शुक्रनीति वगैरे राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांवरून पाहतां राजाच्या प्रधानमंडळांत पुरोहित हा मुख्य प्रधानाच्या खालोखालचा हुद्दा धारण करणारा एक मंत्री होता, असें दिसून येतें. ऐतरेय ब्राह्मणांत पुरोहितास राष्ट्रगोप अशी संज्ञा आहे. सारांश, यूरोपांत एकाकाळीं पोपांस अथवा धर्माध्यक्षांस जी अनियंत्रित सत्ता प्राप्त झाली होती, ती हिंदुस्थानांतील धर्मगुरूंस अथवा ब्राह्मणांस केव्हांही आलेली नव्हती.

म्याकिएव्हिली व कौटिल्य यांची तुलना करितांना, या दोनहि ग्रंथकारांच्या ग्रंथांत राजकीय व्यवहार यशस्वितेनें चालविण्याकरितां प्रसंगविशेषीं सन्मार्गाचा अथवा नीतीचाहि त्याग करण्यास हरकत नाहीं या मताचें मंडन कितपत केलें आहे, हें

पहावयाचें आहे. अभीष्ट हेतु साध्य झाला, म्हणजे तत्प्रीत्यर्थ योजिलेले उपाय अर्थात्च न्याय्य ठरतात, या मताचा पुरस्कार म्याकि-एव्हिलीनें जितक्या प्रमाणानें केला आहे, तितक्या प्रमाणानें कौटिल्यानें आपल्या ग्रंथांत केला नाहीं. असें जरी असलें, तरी या बाबतींत उभयग्रंथकारांचें थोडेंबहुत साम्य आहे, असें म्हणावें लागतें. " We doubt whether it would be possible to find, in all the many volumes of his composition, a single expression indicating that dissimulation and treachery had ever struck him as discreditable "– म्याकिएव्हिलीचे अवघे ग्रंथ धुंडाळून पाहिले, तरी त्यांत कपट व्यवहार व विश्वासघात या गोष्टी संभावितांस लांछनास्पद आहेत असें त्यास कधीं वाटत असेल, हें दर्शविणारें एकतरी वाक्य सांपडेल, याची आम्हांस शंकाच वाटते–हें मेकाले साहेबांचें म्याकिएव्हिलीसंबंधाचें विधान कौटिल्यास साकल्यानें लागू पडत नाहीं. म्याकिएव्हिलीप्रमाणें कौटिल्यानें कपटव्यवहार, विश्वासघात वगैरे दुष्कृत्यांची सार्वत्रिक प्रशंसा केलेली नाहीं. तथापि राज्यांतील राजद्रोही लोकांचा निःपात करण्याकरितां, त्याचप्रमाणें शत्रुराजांचा पाडाव करण्याकरितां प्रसंगीं नीतिमार्गाचें उल्लंघन करावयास हरकत नाहीं, असें त्याचें मत होतें, हें अर्थशास्त्रावरून स्पष्ट दिसून येतें. या दोन विशिष्ट स्थितींचे अपवाद सोडून दिले, तर अवघ्या ग्रंथांत असन्मार्गास उत्तेजन दिलेलें कोठेंहि सांपडणार नाहीं. परराष्ट्रीय व्यवहारांत शत्रु-राजांच्या बाबतींत मात्र दगलबाजी वगैरे सार्वत्रिक व्यवहारांत निंद्य मानिलेले प्रयोग अवलंबण्यास हरकत नाहीं, पण मित्र–राजांशीं यथान्याय व मित्रभावानें वर्तन ठेवावें, असेंच सांगितलें आहे. अर्थशास्त्र अधिकरण ५, अध्याय २, ' कोशाभिसंहरणम् ' यांत द्रव्याचा तुटवडा पडल्यास कोशाची वृद्धि करण्याकरितां राजानें कोणकोणते उपाय योजावे, हें सांगितलें आहे. त्यांत प्रशंसिलेले उपाय सर्वच योग्य आहेत, असें नाहीं; तथापि ते तारतम्यानें योजावे, असाच ग्रंथकाराचा भावार्थ आहे, आणि या अध्यायाच्या शेवटीं तर–' एवं दूष्येष्वधार्मिके वर्तेत नेतरेषु–' अशा प्रकारचें वर्तन करावयाचें, तें राजद्रोही व अधार्मिक लोकांच्या बाबतींत करावें, इतरांच्या बाबतींत करूं नये, असा स्पष्ट शब्दांत ग्रंथकारानें इशारा दिला आहे. राजाचें वर्तन निरंतर प्रजेला हितावह असावें, या उपदेशांतच अर्थशास्त्राचें सार आहे, असें ग्रंथांतील अनेक वचनांवरून दाखवितां येईल. अधिकरण १, अध्याय १२ यांतील ' प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानां च हिते हितं, नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम्–' राजानें स्वतःचें व्यक्तित्व प्रजाजनांशीं इतकें संलग्न केलें पाहिजे कीं, प्रजेचें सुख तेंच आपलें सुख, व प्रजेचें हित तेंच आपलें हित, अशी प्रजाहिततत्परतेची उच्च भावना सदैव जागृत ठेवून राज्यकारभार चालवावा, असा कौटिल्याचा उपदेश आहे. राजाचें अस्तित्व म्हणजे समाजाचें अस्तित्व होय. पण म्याकिएव्हिलीच्या Prince या ग्रंथांत महत्वाकांक्षी मनुष्यानें आपली अभिवृद्धि कशा रितीनें करावी, हें सांगितलें असून, Discourses ग्रंथांत समग्र समाजाच्या अभिवृद्धीची उपाययोजना सांगितली आहे; दोनहि ग्रंथांतील विचार-सरणी सारखीच असल्यानें, वैयक्तिक हितास्तव मनुष्यानें वाम मार्ग स्वीकारिला तरी हरकत नाहीं, असें तो प्रतिपादन करितो. वैयक्तिक सुखाकरितां सन्मार्गाचें उल्लंघन कौटिल्यानें गर्ह्यच मानिलें आहे. राजानें ' न निःसुखः स्यात्–' अगदींच सुखरहित असावें, असें नाहीं, पण ती सुखाची प्राप्ति–' धर्मार्थाविरोधेन–' धर्म व अर्थ यांना विरोध न येईल, अशा रीतीनें करावी असें बजावलें आहे. धर्माचे नियम म्हणजे नैतिक वर्तनाचे नियम होत; त्यांचें उल्लंघन केवळ वैयक्तिक सुखाकरितां कोणी करूं नये, असाच अर्थशास्त्रकाराचा अभिप्राय आहे.

कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ राजनीति शास्त्राचें केवळ तात्विक दृष्टया विवेचन करणारा ग्रंथ नसून, त्यांत प्रत्यक्ष राज्यव्यवहार कसा चालवावा, याचेंहि विस्तरशः उद्घाटन केलें आहे, हें तो ग्रंथ वरवर चाळून पाहणारासहि कळून येईल. म्याकिएव्हिलीनें Prince हा ग्रंथ Lorenzo de Medici इटालीचा राजा यास अर्पण केला; कौटिल्यानेंहि ' नरेंद्रार्थे ' म्हणजे चंद्रगुप्त राजासाठीं ' शासनाची रीत ' घालून दिली. म्याकिएव्हिलीच्या ग्रंथांतील विवेचन केवळ तात्विक असून, अर्थशास्त्रांत राजनीतीचें तात्विक व व्यावहारिक विवेचन केलें आहे. चंद्रगुप्ताच्या राज्यांत कौटिल्य हा श्रेष्ठ दर्ज्याचा अधिकारी असून राजकीय व्यवहार त्याच्याच सल्ल्यानें चालत असल्यामुळें त्यास राज्यव्यवहाराचा अनुभव होता; पण म्याकिएव्हिली इटली मधील एक मध्यम दर्ज्याचा नोकर असल्यामुळें त्यास राज्यव्यवहाराचा प्रत्यक्ष अनुभव अर्थात् मर्यादित स्वरूपाचा होता. अर्थशास्त्र ग्रंथ चंद्रगुप्ताच्या उपयोगाकरितां जरी लिहिलेला असला, तरी त्यांतील तत्त्वें सर्व सामान्य अशींच असल्यामुळें तीं सर्वच राजांस उपयुक्त झालीं आहेत.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत उपदिष्ट केलेला वर्तनक्रम वस्तुतः पाहतां राजकीय व्यवहारांत सार्वत्रिक रीतीनें अनुसरला जातो. असें असतांना प्रसंगविशेषीं राष्ट्रीय हितसाधनार्थ नीतिमार्गाचें उल्लंघन केल्यास हरकत नाहीं, असें प्रतिपादन करण्यांत

कौटिल्यानें चूक केली, असें कां म्हणावें ? अलीकडील काळांतील राजकीय व्यवहारांत देखील न्याय, भूतदया व सुधारणा यांच्या नांवाखालीं कित्येक निंद्य कृत्यें होत असलेलीं अनुभवास येतात. कौटिल्याचीं राजकारणांतील तत्त्वें प्राचीन संप्रदायास अनुसरून असल्यामुळें, आणि विशिष्ट परिस्थितींत राष्ट्रीय हित साध्य करून घ्यावयास उपयुक्त होत असल्यामुळें, कौटिल्योत्तर काळांतहि त्याचा अर्थशास्त्र ग्रंथ राजकारणांत प्रमाण ग्रंथ मानण्यांत येऊं लागला. चंद्रगुप्ताचा नातू अशोकवर्धन यास कलिंगयुद्धानंतर विरक्ति उत्पन्न झाल्यामुळें, त्यानें बौद्ध धर्मांतील अहिंसा तत्त्वानुसार आपला वर्तनक्रम चालविला. असें जरी असलें, तरी राज्यव्यवहारांतील युद्धेतर बाबींत अवलंबिलेली शिस्त अर्थशास्त्राच्याच अनुरोधानें चालली होती, असें म्हणावयास हरकत नाहीं. कौटिल्यानंतर पांच–सहाशें वर्षांनीं कामंदकानें अर्थशास्त्राच्या आधारें नीतिसार लिहिलें, हें त्या ग्रंथाच्या प्रियतेचेंच निदर्शक नाहीं काय ? दहाव्या शतकांतील सोमदेव सूरिकृत नीतिवाक्यामृत हा ग्रंथहि अर्थशास्त्रानुरोधानें लिहिलेला असावा. सारांश, कौटिलीय अर्थशास्त्र राजकीय व्यवहारांत पांच सात शतकें तरी प्रमाणभूत मानण्यांत येत असावें. परंतु म्याकिएव्हिलीचे ग्रंथ राजकीय व्यवहारांत सर्वत्र प्रमाणभूत मानिले नव्हते; त्याच्या हयातींत देखील इटालियन लोकांस त्याच्या ग्रंथांबद्दल आदर वाटत नव्हता, आणि त्याच्या हयातीनंतरहि त्याचीं तत्वें यूरोपखंडांतील बहुतेक मुत्सद्दी तिरस्करणीयच मानीत आले. जर्मनीचा बादशाह फ्रेडरिक दी ग्रेट यानें तर अल्पवयांतच Anti Machiavelli या नांवानें एक ग्रंथ प्रकाशित करून, म्याकिएव्हिलीच्या तत्वांप्रमाणें वर्तन म्हणजे नीतिबाह्य आचरण होय, असें प्रतिपादन केलें. वास्तविक पाहिलें असतां या बादशहाचें राजकीय चरित्र महत्वाकांक्षा, राज्यविस्ताराची हांव व अनियंत्रित सत्ता यांनीं भरलेलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्राविषयीं प्रो. सरकार यांनीं जें म्हटलें आहेः–' Kautalyaism first, Kautalyaism second, Kautalyaism always has remained the motto of the Hindus as of other pillars of the state,'– राज्यकारभार यशस्वितेनें चालविण्याकरितां कौटिलीय संप्रदायास हिंदु राजांच्या व्यवहारांत निरंतर अग्रस्थान मिळत आलें तें अगदीं यथार्थ आहे. कौटिल्यानें अर्थशास्त्रांत उपदेशिलेले राज्यव्यवहार मार्ग–कामंदकीय नीतिसारांत म्हटल्याप्रमाणें–राजकीय व्यवहारांत अत्यंत प्रमाणभूत मानण्यांत येतात.

## राज्य-संस्थेची कल्पना व अर्थशास्त्र.

मानवी समाजांत कोणी तरी शास्ता असावा, ही कल्पना प्रथमतः कशी उद्भवली, याविषयीं सर्व देशांतील शास्त्रज्ञांनीं आपापल्या पद्धतीनें विवेचन केलेलें आहे. हिंदुस्थानांतील प्राचीन राजनीतिशास्त्रकारांनींहि या बाबतींत विचार केला आहे. राज्य-संस्थेच्या उत्पत्तीचें विवेचन करितांना पाश्चात्य शास्त्रकारांनीं स्वीकारिलेली तर्क-पद्धति भारतीय शास्त्रकारांच्या ग्रंथांतहि आढळून येते. अर्वाचीन राजनीतिशास्त्राचा तुलनात्मक दृष्टीनें अभ्यास करावयाचा असल्यास, भारतीय शास्त्रकारांचें विवेचन उपयुक्त झाल्यावांचून राहणार नाहीं. राज्य-संस्थेची उत्पत्ति कशी झाली, हें अर्थशास्त्रकार कौटिल्यानें विस्तारपूर्वक शास्त्रीय पद्धतीनें सांगितलें नाहीं; तथापि तत्संबंधीं परंपरागत व सर्वमान्य झालेल्या कल्पना त्यानें आपल्या ग्रंथांत उल्लिखित केल्या आहेत ( अधिकरण १, अध्याय १३ ). राज्यांतील राजनिष्ठ व राजद्रोही लोकांवर नजर ठेवण्याकरितां नेमिलेल्या गुप्त हेरांच्या संवादांत आलेल्या–' **मात्स्यन्यायाभिभूताः प्रजा मनुं वैवस्वतं राजानं चक्रिरे । धान्यषड्भागं पण्यदशभागं हिरण्यं चास्य भागधेयं प्रकल्पयामासुः । तेन भृता राजानः प्रजानां योगक्षेमवहाः**, आणि ' **इन्द्रयमस्थानमेतद्राजानः प्रत्यक्ष हेंडप्रसादाः**–' या भाषणांवरून राज्य-संस्थेच्या उत्पत्तीच्या पूर्वाचार्यांनीं निश्चित केलेल्या कल्पना सूचित होतात.

महाभारतांतील शांतिपर्वांतर्गत राजधर्मपर्व अध्याय ५९ मध्यें भीष्माचार्यांनीं राजधर्मनिरूपणांत या कल्पनेची उत्पत्ति कशी झाली हें विस्तारानें सांगितलें आहे. प्राचीन काळीं राज्य–संस्था नव्हती, राजा नव्हता, ' दंड ' नव्हता, व दंड चालविणाराहि नव्हता, कारण सर्व प्रजा परस्परांशीं धर्मानें वागून परस्परांचें रक्षण करीत असत. त्यांस राजा नव्हता. परंतु ही स्थिति फार काळ टिकली नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणांतील दुष्ट मनोविकार खळबळावयास लागले; जिकडे तिकडे त्यांचें प्राबल्य माजलें. परस्परांस साहाय्य करण्याची बुद्धि जागृत होती ती एकाएकीं नष्ट झाली, जिकडे तिकडे स्पर्धेचें साम्राज्य झालें. समाज विस्खलित झाला. षड्विकारांतील प्रमुख विकार जो काम, त्यानें मानवी मनास पछाडिल्यामुळें ज्याला त्याला इतरांशीं स्पर्धा करून स्वतःचें हित साधण्याची प्रवृत्ति व्हावयास लागली. स्पर्धेचें साम्राज्य चालल्यामुळें क्रोध-विकारानें मनुष्याच्या मनांत कायमचें ठाणें केलें. याचा परिणाम असा झाला कीं, मनुष्यास कर्तव्याकर्तव्याचा विचार राहिला नाहीं. मनुष्यास कर्तव्य काय व अकर्तव्य काय, याविषयीं

श्रम व्हावयास लागला, म्हणजे तो वाटेल तें करावयास व बोलावयास लागतो; नीति-अनीति, सदाचार-दुराचार याचा विचार त्यास राहत नाहीं. अशा मूढ स्थितीमुळें मनुष्यांच्या समाजांत उत्पन्न झालेली अनवस्था दूर करण्याच्या हेतूनें देवांनीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली. ब्रह्मदेवानें त्यांस 'दंडनीति' सांगितली. परंतु दंडनीति प्रत्यक्ष अंमलांत आणणारी कोणीतरी मूर्त शक्ति असल्याशिवाय, केवळ अमूर्त अशी दंडनीति मनुष्यसमाजांत माजलेली अव्यवस्था दूर करूं शकणार नाहीं, असें देवांस वाटलें. देवांनीं विष्णूकडे जाऊन प्रार्थना केली. विष्णूनें आपल्या तेजोबलानें 'विरजस्' नामक पुरुष उत्पन्न केला. परंतु त्याच्या अंगीं विरक्ति अधिक असल्यामुळें, त्यास राजपद स्वीकारण्याची इच्छा नव्हती. त्या विरजास कीर्तिमान् नामक पुत्र झाला, तोहि विरक्तच राहिला, आणि कीर्तिमानास झालेला कर्दम यानेंहि राज-पद नाकारून तपश्चरण केलें. कर्दमाचा पुत्र अनंग हा दंडनीति शास्त्रांत प्रवीण झाला, आणि त्यानें प्रजेचा संरक्षक या अधिकारानें प्रजेचें रक्षण कार्य स्वीकारिलें. अनंगाच्या पश्चात् त्याच्या अतिबल नामक नीतिमान् पुत्रानें महाराजपदाचा स्वीकार केला. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा वेन हा अत्यंत अनीतीनें वागून प्रजेवर जुलूम करावयास लागला, म्हणून ब्रह्मवादी मुनींनीं त्याचा वध केला. वेनास पृथुनामक पुत्र होता; तो वेदविद्येंत, धनुर्विद्येंत, दंडनीतींत व इतर शास्त्रांत प्रवीण होता. त्यास राजा करावें, असें देवांस व ऋषींस वाटावयास लागलें. परंतु त्यास राज्यावर बसविण्यापूर्वी पृथुराजास त्यांनीं 'प्रतिज्ञा,' अर्थात् राज्यारोहण प्रसंगीं घ्यावयाची शपथ, घ्यावयास लाविली-'पालयिष्याम्यहं भौमं ब्रह्म इत्येव चासकृत् । यश्चात्र धर्मोनित्योक्तो दण्डनीतिव्यपाश्रयः । तमशङ्कः करिष्यामि स्ववशो न कदाचन ।'-भूमि हेंच माझें परब्रह्म असें समजून मी सदैव तिचें पालन करीन, दंडनीति शास्त्रांत उपदिष्ट केलेला जो धर्म, तो मी आचरीन आणि मी स्वच्छंदानें केव्हांहि वागणार नाहीं-अशी प्रतिज्ञा केल्यावर पृथुराजास राज्यप्राप्ति झाली.

जगाच्या इतिहासांत एककाळीं धर्मराज्य होतें. अशी समजूत सार्वत्रिक प्रचलित होती. जर्मन कायदेपंडित ब्लूंट्श्ली यानें आपल्या Theory of state ग्रंथांत अशा काळाचा उल्लेख करून महाभारताप्रमाणेंच काल्पनिक स्वर्गीय सुवर्ण-युगाचें वर्णन केलें आहे. अशा युगांत सर्वत्र सदाचार नांदत असल्यामुळें, अर्थात् राजा, न्यायाधीश, सैन्य इत्यादि शासन करणाऱ्या शक्ति अस्तित्वांत येण्याचें कारणच नव्हतें. परंतु कृतयुगांतील अथवा सुवर्णयुगांतील धर्मराज्य निरंतर टिकणारें नसल्यामुळें मनुष्य समाजांत दुष्ट मनोविकारांच्या प्राबल्यानें उत्पन्न झालेली अनवस्था दूर करण्याकरितां बलवत्तर शक्तीची आवश्यकता भासावी, हें साहजिकच आहे.

मनुष्यांच्या समाजांत राजा अवश्य असला पाहिजे, असा महाभारतांतील अभिप्राय आहे. राजधर्मपर्व अध्याय ६७ मध्यें अराजक राष्ट्राची अत्यंत निंदा केलेली आहे. अशा राष्ट्रांत धर्माचरण होत नसल्यामुळें 'मात्स्यन्याय' (जलाशयांतील मोठे मासे लहान माशांस खाऊन टाकितात तद्वत्) सुरू होऊन राष्ट्रांतील प्रबल लोक दुर्बलांस गांजूं लागतात. सारांश बळी तो कान पिळी हाच न्याय चालतो. अराजकाः प्रजाः पूर्वं विनेशुरिति नः श्रुतं परस्परं भक्षयन्तो मत्स्यानिव जले कृशान् । समेत्य तास्ततश्चक्रुः समयानिति नः श्रुतं......अराजक स्थितीमुळें समाजांत अनवस्था उत्पन्न झाली, तेव्हां सर्व प्रजाजनांनीं आपसांत एकचित्तानें करार करून अधर्मानें वागणाऱ्या मनुष्यांस बहिष्कृत करावयाचें, असें ठरविलें. परंतु हाहि करार फार काळ टिकला नाहीं, म्हणून यच्चयावत् लोकांनीं वैवस्वत मनूस शेतीच्या उत्पन्नाचा $\frac{१}{६}$ भाग, व व्यापारांतील नफ्याची $\frac{१}{१०}$ रोख देण्याचा करार करून त्यास राजा केलें. महाभारतांत दिलेल्या व कौटिल्यानें उल्लिखित केलेल्या उपपत्तीवरून, राजा व प्रजा यांमध्यें करार होऊन राज्यसंस्थेची उत्पत्ति झाली, असें स्पष्ट दिसून येतें. राजानें प्रजेचा योगक्षेम चालवावा, आणि त्याकरितां प्रजेनें आपल्या मिळकतीचा भाग अथवा कर द्यावा असा हा दुहेरी करार होता.

महाभारतांत वर्णन केलेल्या कृतयुगाचें अथवा सुवर्णयुगाचें अस्तित्व केवळ काल्पनिक असून, त्यांत वर्णिलेल्या समाजास ऐतिहासिक महत्व नाहीं, असें पाश्चात्य ग्रंथकारांप्रमाणेंच कौटिल्याचें मत आहे, असें वरील उपपत्तीवरून दिसून येतें. हॉब्स व स्पायनोझा या पाश्चात्य शास्त्रकारांस सुवर्णयुगाची कल्पना मान्य नसून, यांच्यामतें जीवनार्थ कलह हाच सृष्टीचा स्वभावसिद्ध नियम मनुष्यसमाजांतहि प्रचलित असल्यामुळें, त्यांत स्पर्धा, विरोध व कलह यांचें प्राबल्य आहे. "मनुष्य प्राणी सृष्टीच्या नियमानें बांधिलेला आहे; तथापि त्याची नैसर्गिक स्थिति म्हणजे पूर्ण स्वातंत्र्याची स्थिति होय. या स्थितींतच त्यास सृष्टीच्या कायद्याच्या मर्यादेंत आपलीं कर्तव्यें करावयास व स्वतःच्या माणसांची व मालमत्तेची सुरक्षितता राखावयास पूर्ण स्वातंत्र्य असतें. मनुष्यप्राणी स्वभावतः स्वतंत्रताप्रिय व प्रभविष्णुताप्रिय आहे,-त्यास स्वतःच्या तंत्रानें वागण्याची व दुसऱ्यावर

अधिकार चालविण्याची प्रवृत्ति असते. असें आहे, तरी, तो आपण होऊन आपल्या मानेवर राज–सत्तेचें जोखड लादून घेतो, तें केवळ समाजांत आपल्याला सुखानें नांदतां यावें, म्हणून होय. जगांत सामान्यतः कलह चाललेले आहेत; आणि मनुष्य जर स्वतंत्रताप्रिय नसता, तर त्यासहि सर्व साधारण सृष्टिनियमास बळी पडून निरंतर झगडत रहावें लागलें असतें. तथापि प्रत्येक मनुष्य जर स्वतःच्या तंत्रानेंच वागावयास लागला, तर तो मनोविकारांच्या आधीन होऊन समाज अधोगतीला नेईल; म्हणून सर्वांचें नियमन करून त्यांस आपापलीं कर्तव्यें करावयास व सृष्टीचे नियम पाळावयास लावणारी वरिष्ठ सत्ता असली पाहिजे."

महाभारतांत दिलेली किंवा पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांत दिलेली राज्यसंस्थेची उत्पत्ति पाहिली, म्हणजे समाजास वरिष्ठ सत्तेची आवश्यकता भासूं लागली, म्हणून ती अस्तित्वांत आली, असें म्हणावें लागतें. शिवाय महाभारतांतील उपपत्तीवरून असेंहि म्हणावें लागतें कीं, राजा हा देवानें निर्माण केलेला आहे. भारतीय शास्त्रकारांच्या ग्रंथांत, राजा हा देवांश आहे, ही कल्पना सामान्यतः प्रामुख्यानें मांडिलेली असली, तरी त्यास 'देवदत्त हक्क अथवा अधिकार' Divine rights दिलेले नसून, देवांच्या गुणानुसार धर्म आचरण्याचा, अथवा लोकोपकारक कर्तव्यें Divine functions करण्याचा अधिकार दिलेला आहे. 'जो राजा धर्मपर तोच देवांश' आणि त्या व्यतिरिक्त जो धर्मलोपी व प्रजापीडाकर असेल, तो राक्षसांचा अंशभूत समजावा' असें शुक्रनीति (अध्याय १–७०) सांगते. '**इन्द्रानिलयमार्काणामग्नेश्च वरुणस्यच, चन्द्रवित्तेशयोश्चापि मात्रा निर्हृत्य शाश्वतीः। जङ्गमस्थावराणांच हीशः स्वतपसा भवेत्**' (शुक्र अ. १–७२, ७३) इंद्र, वायु, यम, सूर्य, अग्नि, वरुण, चंद्र व कुबेर या देवांच्या अंशांपासून देवानें प्रजेच्या रक्षणाकरितां राजाची निर्मिति केली. सृष्टीच्या व्यवहारांत इंद्रादि देवांस त्यांच्या गुणानुसार जीं कर्तव्यें सोंपविलेलीं आहेत, तींच कर्तव्यें प्रजेच्या रक्षणाकरितां राजानें आचरावीं, असाच शुक्रनीतीचा अभिप्राय आहे, हें पुढील श्लोकांवरून स्पष्ट दिसून येतें:–' इंद्र ज्याप्रमाणें भाग अथवा हविर्भाग घेऊन लोकरक्षण कर्मांत दक्ष असतो, त्याप्रमाणें राजानें आपला 'भाग' अथवा सारा, कर–घेऊन रक्षण कर्मांत दक्ष असावें; गंधाची–सुगंधाची व दुर्गंधाची–कल्पना देणाऱ्या वायूप्रमाणें राजानेंहि प्रजाजनांस सत् कर्म कोणतें व असत् कर्म कोणतें याची कल्पना द्यावी, अंधकाराचा नाश करून प्रकाश देणाऱ्या सूर्याप्रमाणें राजानें अधर्माचा नाश करून धर्माचरणास प्रोत्साहन द्यावें; पापकृत्यांबद्दल दंड करणाऱ्या यमाप्रमाणें राजानेंहि प्रजेच्या दुष्कर्मांबद्दल शिक्षा करावी; अग्नि जसा सर्व हविर्भाग भक्षण करून निरंतर शुचि असतो, तद्वत् राजानें प्रजारक्षणार्थ सर्व प्रकारचे कर घेऊन शुचिता राखावी; वरुण ज्याप्रमाणें आर्द्रतेनें समग्र सृष्टीचें पोषण करितो, त्याप्रमाणें राजानें स्वतःच्या धनानें प्रजेचें संवर्धन करावें; मनुष्यमात्रास शीतल किरणांनीं आनंदित करणाऱ्या चंद्राप्रमाणें राजानें आपल्या सद्गुणांनीं व सत्कर्मांनीं प्रजाजनांस आल्हाद द्यावा; कुबेराप्रमाणें राजानें आपला खजिना, आपली संपत्ति सुरक्षित ठेवण्यांत दक्ष असावें! इंद्रादि सर्व देवतांचे गुण राजाच्या अंगीं असले पाहिजेत; चंद्र जर सर्व कलांनीं युक्त असा प्रकाशत असेल, तरच तो पूर्ण आल्हादकारक होतो; त्याचप्रमाणें सर्व गुणसंपन्न असाच राजा प्रजाजनांस प्रिय होतो. म्हणून राजाच्या अंगीं देवांच्या गुणांपैकीं एकहि गुण कमी असतां कामा नये. राजा हा 'पिता, माता, गुरु, भ्राता, बंधु, वैश्रवण (धनद) व यम (यथान्याय दंड करणारा) आहे, असें शुक्रनीति सांगते. महाभारत शांतिपर्वांतहि असेंच म्हटलें आहे.

कौटिलीय अर्थशास्त्रांत राज्य–संस्थेच्या उत्पत्तीच्या दोनहि कल्पना ध्वनित केल्या आहेत, तथापि राज्य–संस्था ही मानवी कल्पना आहे, याच मताचा पुरस्कार कौटिल्यानें केला आहे. समाजांत अनवस्था माजत चालली, असें आढळून आल्यावर मनुष्यांनीं आपण होऊनच मनूस राज्याधिकार दिला. दुसऱ्या एका गुप्त हेराच्या भाषणांत जरी–'**इन्द्रयमस्थानमेतद्राजानः– प्रत्यक्ष हेडप्रसादाः**–राजाला इंद्र–यमांची उपमा दिलेली आहे, तरी त्यांत राजाच्या देवप्राप्त हक्काची कल्पना मांडण्याचा अर्थशास्त्रकाराचा उद्देश नसून, केवळ राजद्वेषी प्रजाजनांच्या मनांत राजासंबंधीं प्रेम उत्पन्न करण्याचा अथवा दरारा बसविण्याचा हेतु दिसतो. राज्यसंस्था मनुष्यकृत आहे, हेंच मत कौटिल्यानें प्रतिपादिलें आहे, असें–'**मात्स्यन्यायाभिभूताः प्रजा वैवस्वतं मनुं राजानं चक्रिरे**–' या विधानावरून स्पष्ट होतें. कौटिल्याच्या मतें राजा व प्रजा यांमध्यें कांहीं करार होऊनच राज्यसंस्था अस्तित्वांत आली; आणि प्राचीन काळापासून असेंच मत चालत असल्यामुळें त्याचा स्वीकार त्यानें आपल्या ग्रंथांत केलेला आहे.

पाश्चात्य शास्त्रकारांत सामाजिक कराराच्या आधारावर राज्यसंस्थेची उत्पत्ति Theory of social Contract लावणाऱ्यांमध्यें हॉब्स्, लॉक व रुसो या तीन शास्त्रकारांची प्रामुख्यानें गणना होते. तथापि या तिघांच्याहि विचारसरणींत अंमळ फरक

आहे. हॉब्सच्या मतें जगांतील सर्व व्यवहार स्पर्धा, भय इत्यादि मनोविकारांच्या प्राबल्यानें चाललेले असल्यामुळें मनुष्यांनीं आपण होऊन समाजाचें अधिपतित्व एका विवक्षित सत्ताधाऱ्याकडे सोंपविलें. परंतु या योजनेंत सत्ताधारी राजावर कराराच्या अटींची जबाबदारी नसल्यामुळें राजाला अनियंत्रित सत्ता Absolutism, despositism प्राप्त झाली. हॉब्सला अनियंत्रित सत्ता धारण करणाऱ्या स्टुअर्ट राजाचें अनियंत्रित वर्चस्व कायम ठेवावयाचें होतें! महाभारतांत या उपपत्तीचें उदाहरण वेन राजाच्या अनियंत्रित सत्तेंत आढळून येतें. मनुष्यांनीं वेनास व त्याच्या पूर्वजांस आपसांत करार करून प्रजेचें अधिपातित्व दिलें, पण त्या करारानें त्यांच्यावर कोणतीहि अट लादली नसल्यामुळें वेन राजा अनियंत्रित सत्तेनें जुलूम करूं लागला. इंग्लंड देशांत अनियंत्रित राजसत्तेच्या असह्य जाचामुळें अखेर त्या सत्तेचा अंत झाला. जॉन लॉक याच्या मतें सृष्टीची कलहप्रधानता सार्वत्रिक नाहीं; तथापि सृष्टिव्यवहाराचे नियम मनुष्यास यथार्थतेनें आकलन झालेले नसल्यामुळें समाजांत अनवस्था माजते, म्हणूनच तो स्वतःची नैसर्गिक स्वतंत्रता गमावण्यास व नागर समाजाचें-civil society चें-नियंत्रण स्वीकारण्यास आपण होऊन तयार होतो-लॉकच्या उपपत्तीप्रमाणें राजा व प्रजाजन या उभय पक्षांत विवक्षित करार होऊन राजसत्तेचा उदय झाला, असें दिसून येतें; आणि या उपपत्तीवरून नियंत्रित राजसत्ता Limited monarchy अस्तित्वांत आली. इंग्लंडचा राजा दुसरा जेम्स यानें कराराच्या अटी मोडिल्यावरून त्यावर आरोप ठेवण्यांत आला. प्राचीन भारतीय इतिहासावरून पाहतां अशा नियंत्रित राजसत्तेचा उदय पृथुराजापासून अथवा वैवस्वत मनूपासून झाला. शांतिपर्वांत सांगितल्याप्रमाणें प्रजाजनांनीं पृथूला राज्याभिषिक्त करण्यापूर्वी त्यापासून 'प्रतिज्ञा' अथवा शपथ Coronation oath घेवविली होती, आणि वैवस्वत मनूसहि प्रजेचा योगक्षेम चालविण्याच्या अटीवर राज्यपद दिलें होतें. राज्याभिषेकाचा प्रघात वैदिक काळापासून चालत आलेला आहे, आणि महाभारतांत उल्लिखित केलेला पृथु हाच मनुष्यांचा पहिला अभिषिक्त राजा होय, **पृथुर्ह वै वैन्यो मनुष्याणां प्रथमोऽभिषिषिचे**—असें शतपथ ब्राह्मण कांड ५ अध्याय ३ वरून स्पष्ट होतें. राज्याभिषेकांतील प्रतिज्ञा हा अत्यंत महत्वाचा भाग असल्यामुळें प्रतिज्ञाभंगाचे दुष्परिणाम राजास भोगावे लागल्याचीं उदाहरणें प्राचीन भारतीय इतिहासांतहि आढळून येतात. मौर्यवंशांतील शेवटचा राजा बृहद्रथ, यानें राज्याभिषेक प्रतिज्ञा मोडिल्यामुळें, त्याच्या पुष्यमित्र नामक सेनापतीनें त्याचा वध केला,—**प्रतिज्ञादुर्बलं सेनानीरनार्यो मौर्यं बृहद्रथं पिपेष पुष्यमित्रः स्वामिनम्**-असें बाणानें लिहून ठेविलें आहे. भारतीय नीतिशास्त्रकारांनीं अनियंत्रित राजसत्ता केव्हांहि उपदेशिली नाहीं. फ्रेंच ग्रंथकार रुसो याच्या उपपत्तींतील विवेचन हाब्स व लॉक या दोघांच्याहून अगदीं भिन्न आहे. रुसो यांच्या उपपत्तीवर प्रजाधीन राज्यसंस्थेचा पाया उभारण्यांत आला आहे. रुसोच्या मतें प्राथमिक अवस्थेंतील असंस्कृत मनुष्यप्राणी निरोगी व बलसंपन्न असून त्यास अर्वाचीन काळांतील सुधारणेचे दुष्परिणाम भोगण्याचा प्रसंगच नसल्यामुळें आपला संसार सुखानें करितां येत होता. परंतु मनुष्यांची संख्या जसजशी अधिक व्हावयास लागली, मनुष्यांचा समाज जसजसा विस्तृत व्हावयास लागला, तसतसे त्याच्या स्वतंत्र सारून आपल्या व इतर व्यक्तींच्या जीविताचें व मालमत्तेचें संरक्षण करण्याच्या उद्देशानें मनुष्यप्राण्यांनीं एकत्रित होऊन समाज-राजकीय समाज Body politic,-बनविला. समाजाची उत्पत्ति अर्थात् करार होऊन झालेली आहे; या करारान्वयें समाजांतील प्रत्येक घटकावयवाचें रक्षण समग्र समाजानें करावयाचें; असें असल्यामुळें प्रत्येक घटकावयव व समग्र समाज यांमध्यें हा करार झालेला असतो. व्यक्ती व समग्र समाज यांमधील हा करार असतो. या करारान्वयें एखाद्या व्यक्तीस अमुक अटींवर राजा नेमण्याची योजना नसल्यामुळें समाजांतील व्यक्तींचा योगक्षेम चालविण्याकरितां नेमिलेला राजा अथवा अधिकारी हा केवळ समाजनियुक्त समजला जातो. अशा राजाची अथवा अधिकाऱ्याची योजना समाजाच्या इच्छेवर अवलंबून असल्यामुळें, राजसत्ता समग्र समाजाच्या इच्छेंत अधिष्ठित झालेली असते. रुसोच्या या उपपत्तींत लोकाधीन राजसत्तेचें बीजारोपण झालेलें आहे.

इंग्रजी भाषेंत जीस अराजक स्थिति anarchy असें म्हणतात, तिचा वाचक असा भारतीय शास्त्रकारांनीं योजिलेला यथार्थ शब्द 'अराजकता' हा नसून, 'मात्स्यन्याय' हा आहे. ज्या शासनपद्धतींत राजा नसतो, तीस अराजक शासनपद्धति असें सामान्यतः सर्व शास्त्रकार म्हणत आले आहेत. त्याच्या व्याख्येप्रमाणें लोकायत्त राज्य अर्थात् या पद्धतींत समाविष्ट करतां येतें. अराजकता म्हणजे बेबंदशाही anarchy नव्हे. महाभारतकारांच्या मतें,-'**राजा चेन्न भवेल्लोके पृथिव्यां दण्डधारकः। जले मत्स्यानिवाभक्ष्यन् दुर्बलान्बलवत्तराः**-'समाजांतील अव्यवस्था मोडून त्यास व्यवस्थित स्वरूप देण्याकरितां कोणी दंडधारक नसला, म्हणजे प्रबळ लोक दुर्बलांस छळूं लागतात, या स्थितीस महाभारतकारांनीं अराजकता असें नांव दिलेलें आहे; तथापि या वर्णनावरून 'मात्स्यन्याय-स्थिति' हेंच नामाभिधान अन्वर्थक होय. रामायण

' अयोध्याकांड सर्ग ६७ श्लोक २२ मध्यें मात्स्यन्यायस्थितीचें वर्णन ' **बभूवाराजकं तीक्ष्णं मात्स्यन्यायकवर्थितम्** ' या शब्दांत केलें आहे. कामंदकीय नीतिसारांत (सर्ग २ श्लोक ४०) देखील हाच आशय आहे-'**परस्परामिषतया जगतो भिन्नवर्त्मनः, । दण्डाभावे परिध्वंसी मात्स्यन्यायो प्रवर्तते** '–जग हें स्वभावतःच असन्मार्गानें चालणारें असल्यामुळें, त्यांत परस्परांस भक्षण करण्याची प्रवृत्ति आढळून येते; अशा जगाचें नियमन करणारी अशी एखादी शक्ति नसल्यास, सर्वनाशक मात्स्यन्याय–स्थिति अर्थातच चालू होते. प्राचीन भारतीय राज्यव्यवहारांत शासनपद्धतींचे जे अनेक प्रकार आढळण्यांत येतात, त्यांत अराजक राज्यपद्धतीचा प्रकार समाविष्ट झालेला आहे. महाभारतांतील कृतयुगाच्या वर्णनाप्रमाणें पाहतां, अशा शासनपद्धतीचा प्रयोग करण्यांत आलेला होता, असें म्हणावयास हरकत नाहीं. या पद्धतींत राष्ट्राचें नियमन करणारी शक्ति म्हणजें धर्म (law) होय. लोकायत्त शासनपद्धतीचा अत्यंत जहाल असा प्रकार कोठें पाहावयाचा असेल, तर तो या शासनपद्धतींत सांपडेल. महाभारतांत वर्णिलेली ही शासन पद्धति कदाचित् काल्पनिक वाटण्याचा संभव आहे. परंतु जैनांच्या आचारांगसूत्रांत या पद्धतीचा निर्देश इतर ऐतिहासिक पद्धती बरोबर केलेला असल्यामुळें, प्राचीन भारतीय इतिहासांत याहि शासनपद्धतीचा प्रयोग करण्यांत आलेला असावा, असें दिसतें. ' **अरायाणि वा गणरायाणी वा जुवरायाणी वा दोरज्जाणि वा वेरज्जाणि वा विरुद्ध रज्जाणि वा** ' यांतील सर्व शासनप्रकारांस ऐतिहासिक आधार आहेत; म्हणून ज्या पद्धतींत समाजाचें नियमन करणारी एखादी मूर्त शक्ति अस्तित्वांत नसून, केवळ धर्म ( law ) या अमूर्त शक्तीनें समाजाचें नियमन होतें, अशी ' अराय ' अथवा अराजक शासनपद्धतिहि एकाकाळीं अस्तित्वांत होती, असें म्हणावें लागतें. मानवी समाज उच्छृंखल मनोवृत्तींच्या प्राबल्यानें अधर्मानें वागणारा असल्यामुळें, त्यास सन्मार्गावर आणावयास अमूर्त अशा धर्माची शक्ति निष्फळ आहे, असें दिसून आल्यावरून महाभारतकारांनीं अराजक समाजाचा ठिकठिकाणीं निषेध केलेला असावा.

प्राचीन भारतीय इतिहासांत एकाकाळीं लोकसत्ताक व राजसत्ताक अशा दोनहि शासनपद्धति प्रचारांत होत्या. तथापि शासनपद्धति कोणत्याहि स्वरूपाची असली, तरी तिचें मुख्य लक्षण एकच म्हणजे सत्ता अथवा अधिकार होय. राज्यांत सत्ता गाजविणारा शास्ता अथवा राजा, आणि ज्यांवर सत्ता गाजवावयाची, ते शासित अथवा प्रजाजन अवश्य असावे लागतात. राजा आपली सत्ता अथवा अधिकार चालवितो, तो शक्तीवर अथवा '**दंडावर** ' चालवितो; ज्याच्या योगानें राज्य चालतें, तें साधन म्हणजे दंड होय. अधिकाराच्या किंवा सत्तेच्या पाठीशीं असलेली ही शक्ति नेहमीं सशस्त्र सैन्याची शक्तिच असली पाहिजे, असें नाहीं. लोकसत्ताक राज्यांत ती शक्ति लोकांच्या इच्छाशक्तींत अधिष्ठित झालेली असते; पण कांहीं झालें तरी अंमल चालविण्याकरितां प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष शक्ति अवश्य असावी लागते. पाश्चात्य शास्त्रकारांनीं राज्यसंस्थेच्या उत्पत्तीची उपपत्ति लावतांना Force म्हणजे दंड याहि एका कारणाचा निर्देश केला आहे. राज्यसंस्था, सरकार, म्हणजे अंमल चालविण्याकरितां संघटित केलेली शक्ति अशी एक व्याख्या करण्यांत येते. मनु, अध्याय ५ श्लोक १८ प्रमाणें प्रजेवर अंमल चालविण्याचें व प्रजेचें रक्षण करण्याचें कार्य दंडावर अवलंबून असल्यामुळें, शहाणे लोक दंडशक्तीसच धर्म समजतात. ' **राजदण्डभयाल्लोकः स्वस्वधर्मपरोभवेत्**–(शुक्र अ. १, २३ ) राष्ट्रांतील लोक आपआपल्या धर्माप्रमाणें आचरण करितात, तें केवळ त्यास राजदंडाची भीति असते म्हणून होय. कौटिलीय अर्थशास्त्रांत याच उपपत्तीचा पुरस्कार केलेला आहेः–**चतुर्वर्णाश्रमोलोको राज्ञा दण्डेन पालितः, स्वधर्मकर्माभिरतो वर्तते स्वेषु वर्त्मसु** ( अधि. १, अ. ४ )–सारांश राजा जर चतुर्वर्णाश्रमयुक्त प्रजाजनांचें दंडाच्या योगानें पालन करील, तरच ते आपापल्या धर्माचें व कर्माचें आचरण करून निरंतर मर्यादेंत राहतील.

पाश्चात्य शास्त्रकारांचें विवेचन प्राचीन भारतीय शास्त्रकारांनीं कित्येक शतकें अगोदरच सूचित करून ठेविलें होतें, हें आतां सिद्ध झालें आहे. उभयतांच्या विवेचनांत बहुंशीं साम्य असलें, तरी भारतीय शास्त्रकारांनीं राजाच्या ठायीं देवत्व केव्हांहि मान्य केलेलें नाहीं; पण सुधारलेल्या पाश्चात्य खंडांतील कांहीं राजे व बादशाह आतांपर्यंत देखील स्वतःला ' Lord's annointed ' The living images of Him, who is all holy and all powerful ' इत्यादि उपपदांनीं गौरवीत असत.

## संघ आणि गण.

अर्थ शास्त्रांत संघ शब्द दोन अर्थांनीं योजिलेला आहे. अधिकरण ३ अध्याय १४ ' **तेन संघभूता व्याख्याताः** ' यांतील संघ शब्द मजूरसंघ कामगारसंघ या अर्थानें योजिलेला असून, अधिकरण १ अध्याय १७ ' **कुलसंघोहि दुर्जयः** ' यांतील आणि ' **संघवृत्त** ' प्रकरणांतील संघ शब्द राजकीय पद्धतीचा निदर्शक अशा अर्थानें योजिलेला आहे.

संघ व गण हे दोनहि शब्द राजकीय संस्था व राष्ट्र अशा अर्थांचे वाचक असून, दोनहि शब्द कांहीं काळानें लोकसत्ताक राज्यपद्धतीचे निदर्शक या अर्थानें रूढ झाले. गण या शब्दाचा अर्थ कांहीं यूरोपीय संशोधक Tribe जातिसंघ, व कांहीं Corporation of tradesmen or workmen व्यापारी–संघ अथवा कामगार संघ असा करीत आहेत. वैदिक काळांत हिंदुस्थानांत जरी एकराज अथवा राजाधीन शासनपद्धति चालू होती, तरी बुद्धाच्या देशांत व त्याच्या आसपासच्या भागांत प्रजासत्ताक शासनपद्धति चालू होती, असें बौद्ध ग्रंथांचा व जैन–ग्रंथांचा अभ्यास करणारे यूरोपीय पंडित सांगत आहेत. जैनांच्या आचारांगसूत्रांत द्वैराज्यें व गणराज्यें या शासनपद्धतींचा उल्लेख आल्यावरून गणराज्य म्हणजे गणानें अथवा लोक-समुदायानें चालविलेलें राज्य होय. बौद्धभिक्षूंच्या संघांतील मतें कशीं मोजावयाचीं, असें एका भिक्षूनें बुद्धास विचारिलें असतां, बुद्धानें त्यास '**गणमार्गेण**'–म्हणजे गणराज्यांत ज्याप्रमाणें शलाका–पद्धतीनें मोजतात त्याप्रमाणें–मतें मोजावीं, असें सांगितलें. गणांतील समासदांची गणना झाल्यानंतर कामास सुरवात व्हावयाची, अशी पद्धति होती. यावरून गण म्हणजे सभा अथवा पार्लमेंट असा अर्थ प्रचारांत आल्यामुळें गणराज्य म्हणजे लोक–सत्ताक राज्य असें निश्चित झालें.

## अलेक्झांडर व भारतीय गण अथवा संघ राष्ट्रें.

अलेक्झांडरच्या हिंदुस्थानावरील स्वारींत हिंदुस्थानांत वरींच " free, autonomous, independent " राष्ट्रें आढळलीं, असें ग्रीक इतिहासकार सांगतात. या राष्ट्रांस त्यांनीं Republics म्हटलें आहे; तथापि ग्रीक भाषेंतील ग्रंथांचें इंग्रजी भाषांतर करणारे इंग्रज ग्रंथकार असें सांगतात कीं, हिंदुस्थानामधील ग्रामपंचायतींसच ग्रीक इतिहासकारांनीं Republics असें नांव दिलें आहे! प्राचीन काळांतील ग्रीक इतिहासकारांस ग्रामपंचायती व Republics यां मधील तफावत कळत नव्हता, असें म्हणणें अत्यंत धाडसाचें होईल. मेग्यास्थेनिसला या Republican प्रजासत्ताक राज्यांची पूर्ण माहिती होती. हिंदुस्थानांतील राष्ट्रें राजतंत्री व लोकतंत्री अशीं आहेत, असें त्यानें स्पष्ट नमूद करून ठेविलें आहेः–" ज्या देशांत राजा असतो, तेथील लोक राजाकडे जाऊन दाद मागतात आणि ज्या राष्ट्रांतील शासन लोकतंत्रानें चाललेलें असतें, तेथील लोक म्याजिस्ट्रेट्सच्या–consuls च्या अथवा प्रमुख पुरुषांच्या अध्यक्षाच्या कानावर आपल्या तक्रारी घालतात." सारांश, अलेक्झांडरच्या स्वारीच्या सुमारास व नंतरहि अनेक लोकसत्ताक राज्यें हिंदुस्थानांत होतीं. अलेक्झांडरला अनेक लोकसत्ताक राष्ट्रांशीं सामना करावा लागला; त्यांत कौटिलीय अर्थशास्त्रांत निर्दिष्ट केलेल्या क्षत्रिय व श्रेणी–kathroi व Agcsinar – या राष्ट्रांखेरीज Kathoi कठ, Adraistai अरिष्ट, sopbytes सौभूति, oxydrakai क्षुद्रक, malloi मालव, siboi शिबि, Brachmaoi ब्राह्मणक' Patala पटल वगैरे राष्ट्रांचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे. हीं राष्ट्रें प्रबल होतीं. क्षुद्रक व मालव यांचा संयुक्त संघ स्थापन झालेला होता. त्यांनीं अलेक्झांडरच्या सैन्यास माघार घ्यावयास लाविली. दुसऱ्याहि कांहीं राष्ट्रांनीं अलेक्झांडरास यशस्वितेनें सामने दिले.

## राजा.

राज्य-संस्था स्थापन झाल्यानंतर समाजाचें नियमन करणाऱ्या व्यक्तीचें अथवा राजाचें कर्तव्य काय, असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. भारतीय शास्त्रकारांनीं राजाच्या कर्तव्याविषयीं चिकित्सक दृष्टीनें विचार केलेला आहे. राजाला आपलीं कर्तव्यें कोणतीं हें जाणण्या करितां दंडनीतीचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे. दंडनीति ही–**अलब्धलाभार्था, लब्धपरिरक्षणी, रक्षितविवर्धनी, व वृद्धस्य तीर्थेषु प्रतिपादिनी**–अशी चतुर्गुणात्मक विद्या आहे. नवीन अर्थ संपादन कसा करावा, संपादित अर्थाचें अथवा भूमीचें, राष्ट्राचें, रक्षण कसें करावें, रक्षित राष्ट्राची उत्तरोत्तर अभिवृद्धि कशी करावी, आणि अभिवर्धित द्रव्याचा विनियोग सत्कर्मी, योग्य कार्यांत, कसा करावा याविषयींचें यथार्थ ज्ञान दंडनीतीच्या परिशीलनानें प्राप्त होतें. आरंभीं आरंभीं राजसत्तेचें-सरकारचें-राजाचें-कर्तव्यक्षेत्र अत्यंत मर्यादित असलें पाहिजे. परदेशिकांनीं हल्ला केल्यास आपल्या राज्यांतील जनांचें संरक्षण करणें, किंवा राज्यांतच शांतता भंग झालेला असल्यास दंगा करणाऱ्यांस आपल्या सामर्थ्यानें शासन करून पुनश्च शांतता प्रस्थापित करणें, हींच कायतीं पहिल्या पहिल्या अवस्थेंतील राजसत्तेचीं कर्तव्यें होत. राष्ट्रावर परचक्र आलें असतां (**संग्रामेष्वनिवर्तित्वं**) "राजाने संग्रामामध्यें केव्हांहि पाठ फिरवितां कामा नये," आणि हरप्रयत्नानें " (**प्रजानांचैवपालनं**) प्रजाजनाचें संरक्षण केलें पाहिजे. " ( मनु अ. ७, ८८ ) ( **विक्रोशन्त्यो यस्य राष्ट्राद् ह्रियन्ते दस्युभिः प्रजाः। संपश्यतः सभृत्यस्य मृतः स न तु जीवति** ) " चोरटे लोक देशांत शिरून प्रजाजनांचें सर्वस्व हरण करीत आहेत, व प्रजाजन धाय मोकलून

रंडत आहेत, असा देखावा जो राजा किंवा ज्या राजाचे नोकर स्वस्थपणें पहात बसतात, तो जीवमान असूनहि मेल्याप्रमाणेंच म्हटला पाहिजे ( मनु. अ. ७, १४३ )

ठोकळ मानानें राजाच्या कर्तव्यांचे दोन वर्ग पाडितां येतील; वुडरो वुइल्सन या पाश्चात्य ग्रंथकाराच्या मताप्रमाणें कांहीं कर्तव्यें Constituent सूलभूत अथवा स्वाभाविक या वर्गांत, आणि कांहीं Ministrant पोषक अथवा संवर्धक या वर्गांत घालतां येतील. पहिल्या वर्गांत जीवित, स्वातंत्र्य व मालमत्ता यांचें संरक्षण, आणि समाजस्थिति कायम राखण्याकरितां आवश्यक अशा क्रिया यांचा समावेश होतो. या वर्गांतील कर्तव्यें आवश्यक असून, तीं राजाला केव्हांहि टाळतां यावयाचीं नाहींत. भारतीय शास्त्रकारांनींहि राजकर्तव्यांचे वर्ग अशाच धोरणानें पाडिलेले असून, ' चतुर्वर्णाश्रमो लोकः '–समाजांतील वर्णव्यवस्था व आश्रमव्यवस्था चिरंतन सुस्थिर राखणें हें राजाचें प्रमुख कर्तव्य सांगितलें आहे. वस्तुतः पाहतां या प्रमुख कर्तव्यांतच राष्ट्राच्या योगक्षेमाची व अभिवृद्धीची जबाबदारी समाविष्ट झालेली आहे. राजाला, अत्यंत आवश्यक अशी जी दंडनीति, ती ' लब्ध परिरक्षणी ' व ' रक्षित विवर्धनी ' आहे असें वर्णन करण्यांत कौटिल्यानेंहि राजकर्तव्यांचे ' परिरक्षण ' Constituent व ' विवर्धन ' Ministrant असेच वर्ग पाडिले आहेत. वैयक्तिक जीवित, स्वातंत्र्य व मालमत्ता यांचें संरक्षण, आणि समाजाचें रक्षण हीं राजाचीं आवश्यक कर्तव्यें होत. दुसऱ्या वर्गांतील म्हणजे ' विवर्धन ' Ministrant वर्गांतील कर्तव्यांत समाजाची उत्तरोत्तर अभिवृद्धि करणाऱ्या कर्तव्यांचा प्रामुख्यानें समावेश करण्यांत येतो. राजाच्या कर्तव्यांचे अथवा राजधर्मांचे हे दोन वर्ग केवळ स्थूलमानानें पाडले असल्यामुळें, कदाचित् दुसऱ्या वर्गांत येणारीं कांहीं कर्तव्यें पहिल्या किंवा आवश्यक वर्गांत हि समाविष्ट करितां येतील. या वर्गांतील कर्तव्यें वैकल्पिक अशीं मानण्यांत येतात, तीं राजाच्या मनोवृत्तीवर, अथवा राज्याच्या धोरणावर, आवश्यकतेवर, अवलंबून राहणार. राष्ट्राची प्रगति जसजशी होत जाते, तसतसें राजसत्तेचें अथवा सरकारचें कार्यक्षेत्र विस्तार पावत जातें. समाजाचे व्यवहार अधिकाधिक गुंतागुंतीचे व्हावयास लागले, म्हणजे त्यांचा निर्णय लावण्याचें काम सरकारावर येऊन पडतें. अशा रीतीनें मनुष्याचें वैयक्तिक व सामाजिक आयुष्य राजसत्तेच्या नियमांनीं अथवा कायद्यांनीं बांधिलें जातें, व राजसत्तेचें कार्यक्षेत्र, विशेषतः सुधारलेल्या राष्ट्रांत, अत्यंत विस्तृत होतें; याचें प्रत्यंतर मौर्य वंशीय चंद्रगुप्ताच्या व अशोकाच्या कारकीर्दीत पहावयास सांपडतें.

राजसत्तेचें कार्य–क्षेत्र वाढलें, म्हणजे तिचे अधिकार आपोआप वाढतात. तथापि भारतीय राजांची सत्ता अनियंत्रित अशी केव्हांहि नव्हती. वैयक्तिक राजांच्या उच्छृंखल वृत्तीमुळें क्वचित् प्रसंगीं त्यांच्या हातून अतिरेक झाल्याचीं उदाहरणें प्राचीन इतिहासांत आढळून येत असलीं, तरी तीं अपवादात्मक समजलीं पाहिजेत. राजानें '**धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत**' (कौ. अ. अधि. १ अ. ७) धर्मशास्त्रांतील व अर्थशास्त्रांतील नियमांस बाध येणार नाहीं, अशा रीतीनें आपली इच्छा तृप्त करावी, आणि तिला देखील '**मर्यादां स्थापयेत्**' मर्यादा ठेविली पाहिजे. राजाच्या हातून दिवसा किंवा रात्रीं दुर्विनीततेचा अतिरेक होऊन राजकर्तव्यांत दुर्लक्ष व्हावयास लागलें तर त्यास सावध करण्याकरितां अमात्याची व आचार्यांची योजना कौटिलीय अर्थशास्त्रांत केलेली आहे. '**य एनमपायस्थानेभ्योवारयेयुः छायानालिकाप्रतोदेन वा रहसिप्रमाद्यन्तमभितुदेयुः**–' अमात्य व आचार्य अहितकारक कृत्यांपासून राजाचें निवारण करतील; शिवाय, राजा एकांतांत बसून मद्यपान, स्त्रीसहवास, द्यूतक्रीडा, निरर्थक कथालाप इत्यादि व्यसनांत अत्यासक्त होऊन कर्तव्यविमुख झाला, तर त्यास छायायंत्रावरून अथवा नालिकायंत्रावरून म्हणजे–कालनिदर्शक यंत्रावरून अमुक कार्याची वेळ झाली आहे हें सुचविण्यासाठीं पटहादि वाद्यांनीं सतावून सोडण्याचें कामंहि अमात्यास व आचार्यांस करावें लागे। कौटिलीय अर्थशास्त्रांतील '**रहसिप्रमाद्यन्तम्**' या शब्दसमुच्चयाचा अर्थ अंमळ संदिग्ध आहे; तथापि कौटिलीय अर्थशास्त्रावरून रचिलेल्या कामन्दकीय नीतिसारांतील सर्ग ५ श्लोक ५२–**पानस्त्रीद्यूतगोष्ठीषु राजानमभितश्चराः, बोधयेयुः प्रमाद्यन्तमुपायैर्नालिकाविभिः**–या श्लोकावरून तो स्पष्ट होत आहे. ' रहसि प्रमाद्यन्तं ' म्हणजे अर्थात् मद्यपान, स्त्री–सहवास, द्यूतक्रीडा व निरर्थक कथालाप इत्यादि व्यसनांत आसक्त होऊन राजकर्तव्यांत दुर्लक्ष करणारा, असा स्पष्ट अर्थ होत आहे. या व्यवसनांत गुंगलेल्या राजास उपस्थित कार्याची जाणीव उत्पन्न करण्याकरितां कौटिल्यानें '**छायानालिकाप्रतोदा**' ची योजना सुचविली आहे. प्रतोद या शब्दाचा अर्थ छायायंत्र असा कांहीं कोशांत दिलेला आढळतो ( माधवचंद्रोबा-यांचा शब्दरत्नाकर ); या अर्थाप्रमाणें छायायंत्र व नालिकायंत्र अशा या शब्दसमुच्चयाच्या अर्थांत द्विरुक्ति येते. आणि कामंदकीय नीतिसारावरील टीकाकार शंकरार्य यानें आपल्या जयमंगलाख्य टीकेंत '**नालिकाविभिः उपायैः**' या शब्दप्रयोगावर जें स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून प्रतोद या शब्दाचा अर्थ पटह असाहि अर्थ असावा असें वाटतें.

कामंदकानें नालिका उपाय सुचविले आहेत; आणि आदिशब्दांत अर्थात् छाया उपाय सूचित आहे, असें टीकाकार सांगतो. पण प्रतोद व अभितुद्र हे दोनहि शब्द तुद् म्हणजे व्यथित करणें, पीडणें, बडवणें, ठोकणें–या धातूपासून व्युत्पन्न झाले असल्याकारणानें, प्रतोद शब्दाचा अर्थ इषारा देणारें कोणतेहि साधन असा करतां येईल.

अमात्य व आचार्य यांच्या नियंत्रणाशिवाय वृद्धसंयोग प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें राजावर वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व अनुभववृद्ध अशा गृहस्थांचें नैतिक नियंत्रणहि होतें. शिवाय राजाला हरएक बाबतींत धर्मशास्त्राचें व नीतिशास्त्राचें बंधन असल्यामुळें, त्यास आपली राजसत्ता अनिरुद्धपणें चालवितां येत नव्हती. म्हणूनच अशा बंधनाखालीं राज्यकारभार चालविणारे प्राचीन भारतीय राजे प्रजासुखे सुखं राज्ञः या उपदेशानुरूप वागण्यांतच आपलें इतिकर्तव्य मानीत होते.

मेग्यास्थेनीसनें हिंदुस्थानविषयक जीं खंड–वृत्तें लिहून ठेविलीं आहेत, त्यांत ' sovereignty was dissolved and democratic governments set up असें एक विधान आहे. वैदिक काळांत आरंभीं आरंभीं राजाधीन राज्यपद्धति अथवा एकराट् monarchy प्रचारांत होती. महाभारतांतहि याच पद्धतीचा उल्लेख आहे, आणि अथर्ववेदांतील कांहीं ऋचांवरूनहि राजाधीन राज्यपद्धतिच आरंभीं प्रचलित होती, असें दिसतें. आर्यग्रंथांतील उल्लेखांवरून व मेग्यास्थेनीसच्या विधानावरून लोकसत्ताक राज्यपद्धति कालांतरानें अस्तित्वांत आली, असें सिद्ध होतें.

पाश्चात्य देशांमध्यें लोकसत्ताक पद्धतीला ' सुधारणा '–Reformation–काळापासूनच खराखरा प्रारंभ झाला.

सुधारणा–काळानंतरदेखील कित्येक शतकें राजकीय व्यवहारांत लोकसत्तेचें तत्त्व प्रत्यक्ष कृतीमध्यें उतरलें नव्हतें, असें इतिहास सांगतो. स्वित्झरलंड देशाखेरीज इतर देशांत राजसत्ता नांदतच होती. फ्रान्स देशांत तीन वेळां राज्यक्रांतीचे प्रसंग घडले, व अखेर लोकसत्ता स्थापित झाली खरी; परंतु प्रत्येक प्रसंगीं बुर्बोन्स, आर्लीअंस व बोनापार्ट या घराण्यांचे पक्षपाती लोक त्या त्या घराण्यांतील वंशजास सिंहासनावर स्थापण्याची खटपट करावयास चुकले नाहींत. यूरोपीय राष्ट्रांत लोकसत्तेला जें बळ आलेलें आहे, तें केवळ गेल्या एकदोन शतकांतच होय. अमेरिका व स्वित्सरलंड या देशांत राजसत्तेची पूर्व परंपरा नसल्यामुळेंच, राजसत्तेचे पुरस्कर्ते त्या देशांत झाले नाहींत. सारांश, लोकसत्तेची कल्पना यूरोपीय राष्ट्रांस अलीकडेच मानवूं लागली.

वैदिककाळांत राजाधीन शासनपद्धति प्रथमतः प्रचलित होती, तरी राजा हा स्वयंभूत असा नसून, तो राष्ट्र–पालनार्थ लोकनियुक्त असा अधिकारी होता, हें ऐतरेय ब्राह्मणांतील–' देवासुरा वा एषु लोकेषु समयतन्त......तांतोऽसुरा अजयन्.........देवा अब्रुवन्नराजतया वै नोजयन्ति, राजानं करवामहा इति तथेति–' या विधानावरून स्पष्ट होत आहे. देवासुरांच्या युद्धांत देवांस राजा नसल्यामुळें देवांच्या विरुद्ध असुरांस विजय मिळवितां आला, ही गोष्ट नजरेस येतांच देवांनींहि आपल्या समाजासाठीं राजा नेमण्याचा निश्चय केला. अलेक्झांडरच्या स्वारीच्या अथवा मेग्यास्थेनीसच्या काळांत कांहीं भरतखंडांतील भागांत राज्यक्रांतीचे लहानसान प्रसंग घडून लोकसत्ता प्रस्थापित झाली, असें इतिहासावरून दिसतें. परंतु ऐतरेय–ब्राह्मण–काळांत मध्य–देशांत म्हणजे गंगा–यमुनांच्या मधील कुरुक्षेत्रापासून प्रयागापर्यंत आर्यांच्या ताब्यांत असलेल्या प्रांतांत राजसत्ताच चालत होती–' एतस्यां ध्रुवायां मध्यमायां प्रतिष्ठायां दिशियेकेच कुरुपाञ्चालानां राजानः सवशोशीनराणां राज्यायैवतेऽभिषिच्यन्ते। राजेत्येनानभिषिक्तायाचक्षते।' प्रजासत्ताक शासनपद्धति अर्थात् कालांतरानें कांहीं देशांत स्थापना झाली, राजाची निवडणूक समिति–नामक लोकसभेकडून एकमतानें होत असे; समिति त्यास राष्ट्रपालनाचें काम सांगून त्याची निवडणूक कायम करित असे–' ध्रुवायते समितिः कल्पनामिहः......त्वां विशो वृणतां राज्याय ( अथर्व वेद. ) वेदांतील ऋचांवरून राजाला प्रजेकडून कर घेण्याचा हक्क आहे. वैदिककाळांतील राज्याभिषेक समारंभावरून सेनानी Commander of the army, पुरोहित Court chaplain, राजन्य the King-elect, महिषी Queen, सूत Court-minstrels or chronicler, ग्रामणी Head of the township, क्षत्तृ Chamberlain, संग्रहीता ( अथवा अर्थशास्त्रांतील सन्निधाता ) भागदुक् ( अथवा अर्थशास्त्रांतील समाहर्ता ) The collector of revenue, अक्षावाप ( अथवा अर्थशास्त्रांतील अक्षपटल-प्रमुख ) The accountant-general, गोविकर्ता Master of forests-Literally destroyer of forests, आणि पालागल ( तक्ष व रथकार ) यांस रत्न–हवि अर्पण करण्यांत आल्यानंतर ' राजन्या ' ची राज–पदीं निवडणूक करण्यांत येत होती.

वैदिक काळापासून चालत आलेली राजाच्या निवडणुकीची परंपरा पौराणिक काळांत अंशतः प्रचारांत असून कौटिल्यादिक ग्रंथकारांच्या ग्रंथांतहि त्याच तत्त्वाचा अनुवाद केलेला आहे. या तत्त्वाप्रमाणें राजा हा राष्ट्राच्या पालनासाठीं नेमिलेला भृत्य आहे; कौटिल्यानें राजास भृत्य–वर्गांतच समाविष्ट केलें आहे; (कौ. अधि. ५, अ. ३), 'दुर्गजनपदशक्त्या भृत्यकर्म समुदयपादेन स्थापयेत्, कार्यसाधनसहेन वा भृत्यलाभेन शरीरमवेक्षेत '–यांतील भृत्य–वर्गांत राजाचाहि समावेश होतो. या अध्यायांत नोकरांचे वर्ग व त्यांचे पगार दिलेले असून राजाचाहि पगार सांगितला आहे, ' समान विद्येभ्यः त्रिगुणवेतनो राजा–समानविद्य नोकरांच्या तिप्पट वेतन राजास असावें, असें सांगितलें आहे. हे समानविद्य कोण व त्यांचे पगार किती ? आपस्तंभ सूत्रांत–गुरूनमात्यांश्च नाति जीवेत्–राजाचें वेतन गुरु व अमात्य यांच्यापेक्षां अधिक असूं नये–असें म्हटलें आहे. अर्थशास्त्रांतील पुरोहित, ऋत्विक् व आचार्य हे आपस्तंब सूत्रांत उल्लेखिलेले गुरु, आणि अर्थशास्त्रांतील मंत्री, सेनापति व युवराज म्हणजे राजाचे समानविद्य भृत्य हे अमात्य होत. अर्थशास्त्रकारानें यांच्या तिप्पट राजाचा पगार ठरविला आहे.

राज्याभिषेक समारंभांत राजास ' इयं ते राट् ' असें सांगण्यांत येतें; राष्ट्र हें राजाच्या हवालीं केलेला निक्षेप–निधि trust असल्याकारणानें त्याची हर प्रकारें अभिवृद्धि करण्याची जबाबदारी राजावर सोंपविली असते. ' कृष्यै त्वा क्षेमाय त्वा रयै त्वा पोषाय त्वा '–राष्ट्रांतील शेती वाढवावी, सर्वत्र शांतता व सुरक्षितता राखावी, ऐश्वर्य वाढवावें, आणि राष्ट्राची सर्व बाजूंनीं भरभराट करावी, याकरितां राजाच्या हवालीं राष्ट्र हें ठेव म्हणून केलेलें असतें. राष्ट्रावर त्याचें स्वामित्व नाहीं; पण नीति शास्त्र दृष्ट्या जरी त्यास राष्ट्राचा भृत्य अथवा अथवा शुक्राच्या मतें दास Constitutional servant–असें म्हणतां येईल, तरी ज्या अर्थी राजपदाची जबाबदारी योग्य रितीनें बजावण्याकरितां आणि राष्ट्र–हित साधनार्थ वैयक्तिक सुखहि अनेक प्रसंगीं बाजूस सारावें लागतें त्याअर्थी नैतिक दृष्ट्या तो राष्ट्राचा स्वामी आहे असें मानण्यास हरकत नाहीं. राजाला प्रजेचें पालन करितांना पराकाष्ठेचा स्वार्थत्याग करावा लागतो, म्हणूनच त्याची पदवी 'ना विष्णुः पृथिवीपतिः' या महत्वास पोंचली आहे.

राजाच्या निवडणुकीसंबंधानें कौटिलीय अर्थशास्त्रांतील उल्लेखावरून असें अनुमान काढावें कीं, राजाची निवडणूक करण्याचा प्रघात कालांतरानें नष्ट झाला असावा. राज्यपद वारसदारीच्या हक्कानें चालू झालें. मयत राजाचा मुलगा गादीवर बसविण्याचा प्रघात सुरू झाला. परंतु बौद्धकाळीं राजाच्या निवडणुकीच्या प्रघाताची आठवण नव्हती अ नाहीं. " बोधिसत्त्वास राज्यपद अर्पण केल्याचा दाखला पंचगुरुजातक या बौद्ध ग्रंथांत आहे; सिलोनमधील महावंश ग्रंथांत व तिबेटमधील दुल्व ग्रंथांत राजाचा निर्देश ' महासंमत ' या पदानें केला आहे; यावरून राजाची निवडणूक करण्यांत येत असली पाहिजे, असें अनुमान करावयास हरकत नाहीं. " तथापि मौर्यांच्या काळांत मृत राजाच्या वारसास राज्यपद देण्यांत येत होतें, असें कौटिलीय अर्थशास्त्रांतील अधि ५, अध्याय ६ वरून दिसून येतें. आत्मसंपन्न राजपुत्रास राज्यावर स्थापावें; परंतु असा संपन्न राजपुत्र नसल्यास ' व्यसनिनं कुमारं राजकन्यां गर्भिणीं देवीं वा पुरस्कृत्य महामात्रान् संन्निपात्य ब्रूयात् । अयं वो निक्षेपः । पितरमस्यावेक्षध्वं सत्वाभिजनमात्मनश्च । ध्वजमात्रोयं भवन्त एव स्वामिनः । कथं वा क्रियतामिति ।–' व्यसनी पुत्रास, तो नसल्यास राजकन्येस व तीहि नसल्यास गर्भवती राजपत्नीस राज्याधिकृत करावें, असें कौटिल्य सांगतो; सारांश, राज्याचा हक्क मृतराजाच्या घराण्यांतून अन्यत्र जाऊं नये, असा त्याचा कटाक्ष दिसतो.

चातुर्वर्ण्य–व्यवस्थेप्रमाणें राज्याचा अधिकार क्षत्रियांस असावयाचा, तरी इतर वर्णांतील पुरुषांनींहि राज्यें चालविल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. नंदवंशांतील महापद्मनंद ( ख्रि. पू. ३६१ ) हा अस्सल क्षत्रिय नव्हता. मौर्यवंशांतील चंद्रगुप्तहि अभिजात क्षत्रिय नव्हता. पुढील काळांतील शुंग राजे ब्राम्हण–वर्णीय होते. शुंगांच्या नाशानंतर वासुदेव नामक काण्व–शाखीय ब्राम्हणानें राज्य केलें. मगध देशांतील कांहीं भाग वैश्य वर्णीय राजांच्या ताब्यांत कांहीं काळ होता, असें कांहीं इतिहासविशारद सांगतात. मणिपूरची गादी शूद्रवंशीय राजांच्या ताब्यांत होती.

राजा हा प्रत्यक्ष देवाचा अवतार आहे, हें तत्त्व भारतीय इतिहासांत मान्य नव्हतें, हें मागें सांगितलेंच आहे. राजाची पदवी एक राजकीय हुद्दा आहे. तो स्वतःच्या राज्यांत असलेल्या प्रदेशाचा एकटा मालक नसून, राष्ट्रामधील प्रमुख पुरुष असा मानिला जातो. राजा व प्रजा यांमधील संबंध ' समयानें '–करारानें बांधिला आहे. प्रजाजन राजास कर देतात, व त्याचें शासन पाळितात, याचें कारण राजा प्रजेची नोकरी करितो म्हणून होय. राजा–' गोपाजनस्य '–प्रजेचा रक्षणकर्ता, प्रजेचा नोकर–हें पुरातन काळापासून चालत आलेलें महत्तमतत्व भारतीय नीतिशास्त्रांत चिरस्थायी होऊन बसलें आहे.

राज्यांत जे निराश्रित असतील, त्यांचें रक्षण करणें हें राजाचें कर्तव्य आहे. 'बालवृद्ध. व्यथित–व्यसन्यनाथांश्च राजा बिभृयात्–लहान मुलें, म्हातारे, रोगी, संकटग्रस्त व असहाय असे असतील, त्यांस राजानें पोशिलें पाहिजे (कौ. अ. अधि. २ अ. १); त्याचप्रमाणें वांझ स्त्रिया व पुत्रवती स्त्रियांचे पुत्र–(अर्थात् असहाय असल्यास) यांच्या पोषणाची जबाबदारीहि राजावर आहे.

राजाच्या अंगीं राज्याची जबाबदारी समाधानकारक रीतीनें बजाविण्याकरितां कोणकोणते गुण अवश्य पाहिजेत, यासंबंधी कौटिल्यानें विस्तारपूर्वक विवेचन केलें आहे. त्याप्रमाणें सर्वच राजाच्या अंगीं गुणसमुच्चय असेल असें नाहीं; तथापि त्यानें दर्शविलेल्या गुणांची सोपानपरंपरा प्रत्येक राजास शक्य तितकी चढून जावयासारखी आहे. राजांकरितां आंखून ठेविलेल्या दैनिक कार्यक्रमांत राष्ट्ररक्षण, जमाखर्च व पौरजानपदांच्या तक्रारी या कामांस अत्यंत महत्व दिलेलें असल्यामुळें 'प्रजासुखे सुखं राज्ञः–इत्यादि' हें तत्व राजानें निरंतर डोळ्यापुढें ठेविलें पाहिजे, असें कौटिल्य पुनः पुनः सांगत आहे.

अर्वाचीन राजनीति शास्त्राप्रमाणें राजाच्या कर्तव्यांचें वर्गीकरण केलें, तर तीं सामान्यतः तीन वर्गांत पडतील. राजा हा कार्यकारी Executive, न्यायदाता Judicial, व सेनाधिकारी military प्रमुख पुरुष होय. भारतीय राजाच्या धर्मांचे वर्गहि असेच पाडितां येतील. राजा जरी प्रत्यक्ष काम करीत नसला, तरी राज्याचीं कामें सुयंत्रित चालविण्याकरितां जे अधिकारी नेमण्यांत येतात, त्या सर्वांमध्यें राजा हाच 'कूटस्थानीय'–सर्व राजकीय सत्ता चालविणारा मध्यवर्ती प्रमुख अधिकारी असल्यामुळें, राज्यांत शांतता व सुरक्षितता राखणें, हें त्याचें आद्यकर्तव्य होय. अधिकारी लोक राज्यांतील कामें करितात, प्रजाजनांस कायद्यानें वागावयास भाग पाडितात, व राज्यांत गुन्हे वगैरे होऊं देत नाहींत, तरी तें राजाचे नोकर या नात्यानें कामें करितात. अधिकारी नेमावयाचा किंवा बडतर्फ करावयाचा असेल, तेव्हां राजालाच तें काम करावें लागतें. अधिकारी लोक राजाचे हुकूम बिनतक्रार पाळून त्यास आपल्या कामांचा अहवाल सादर करितात. अधिकारी लोक आपलीं कामें लोकहिताच्या दृष्टीनें करितात, किंवा नाहीं, हें प्रतिवर्षी राजानें पहावें, असें शुक्रनीति सांगते–'ग्रामान् पुराणि देशांश्च स्वयं संवीक्ष्य वत्सरे, अधिकारिगणैः काश्च रञ्जिताः काश्च कर्षिताः। प्रजास्ताः साधुभूतेन व्यवहारं विचिन्तयेत्; न भृत्यपक्षपातीस्यात् प्रजापक्षं समाश्रयेत्। (शुक्रनी. अ. १ श्लो. ३७४–५)–राजानें दर वर्षी दौरा काढून खेडीं, मोठमोठीं शहरें व प्रांत यांतील प्रजाजनां पैकीं अधिकारी लोकांनीं कोणास फाजील सवलती दिल्या व कोणास निष्कारण छळिलें यांचें निरीक्षण स्वतः करावें; आणि नंतर नोकरशाहीचा पक्ष न धरितां केवळ प्रजाहिततत्परतेच्या भावनेनें त्याचा यथातथ्य निवाडा करावा.

राजाच्या कर्तव्यांपैकीं नीतिशास्त्रकारांनीं धर्म–रक्षण हें एक महत्त्वाचें कर्तव्य ठरविलें आहे. धर्म या शब्दाचा अर्थ इंग्रजींत Religion या शब्दानें करितात, परंतु ते समानार्थक शब्द नाहींत. भारतीय धर्मशास्त्रांत व नीतिशास्त्रांत येणाऱ्या धर्म या शब्दाचा अर्थ कायदा Law, कर्तव्य Duty व न्याय justice असा होतो. प्राचीन भारतीय राजांकडे कायदे करण्याचें काम फार करून नव्हतें. कायदे व नियम धर्मशास्त्रकारांनीं अगोदरच करून ठेविलेले होते. कायद्यांचीं पुस्तकें म्हणजे धर्मशास्त्रावरील व राजनीतीवरील ग्रंथ होत. त्यांतील कायदे लोकांकडून पाळविणें व त्यांच्या व्यवहारांचा निवाडा करणें हें राजानें करावयाचें असतें. न्यायाधीश वस्तुतः निवाडा देत असला, तरी तो राजाच्या मुखत्यारीनें देतो. कधीं कधीं राजा देखील न्यायासनावर बसून निवाडा करितो, व निवाड्याप्रमाणें अंमलबजावणी होते, तीहि राजाच करितो. अपराध्यास दया दाखवावयाची, ती राजाच दाखवूं शकतो. राजाकडे कायदे करण्याचें काम जरी नसलें, तरी त्यास प्रसंगविशेषीं 'शासनें' काढावीं लागतात; अशीं शासनें कायद्याच्याच सदराखालीं मोडतात.

राजा हा सेनाधिकारी–युद्धाधिकारी आहे. लष्करी खात्याचा सर्व अधिकार राजाकडे आहे. सैन्यावर मुख्य अधिकारी नेमलेला असला, तरी कधीं स्वतः राजाहि संग्राम भूमीवर जातो. रणांगणावर विजय मिळवावा आणि आपली कीर्ति सर्वत्र दुमदुमत ठेवावी, म्हणून क्षत्रियानें पराकाष्ठा केली पाहिजे; यदाकदाचित् संग्रामभुवर मृत्यु आलाच, तर तो क्षत्रियास प्रत्यक्ष स्वर्गप्राप्ति करून देतो. असाच उपदेश भारतीय राजांस करण्यांत येत होता. अलीकडील लष्करी धोरणाप्रमाणें स्वतः राजानें समरभूमीवर जाऊन आपला जीव धोक्यांत घालणें श्रेयस्कर नाहीं; तथापि प्राचीन भारतीय राजांप्रमाणें यूरोपांतील प्राचीन व मध्ययुगीन राजांनीं समरभूमीवर सेनापतीचीं कामें केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत.

इंग्लंड देशच्या राजास Defender of faith धर्मसंरक्षक असा किताब आहे, व तदनुसार त्यास विशिष्ट धर्म-संप्रदाय पाळावा लागतो. हिंदुस्थानांतील प्राचीन आर्य राजाहि 'धर्म-रक्षक' असा मानिला जातो; आणि त्यास राज्यामधील कार्यकारी-मंडळाचा एक प्रमुख अधिकारी या नात्यानें राज्यांतील लोक आपापले वर्णाश्रमधर्म यथायोग्य पाळितात किंवा नाहीं, हेंच पहावयाचें असतें.

राजाला स्वतःच्या प्राणांची व राष्ट्राची काळजी अत्यंत घ्यावी लागते. राजनीतिशास्त्रांतील 'न विश्वसेत्' हें बृहस्पतीचें सूत्र राज्यव्यवहारांत अत्यंत महत्वाचें होऊन बसलें आहे. चाणक्यानें राजाच्या स्वतःच्या संरक्षणार्थ 'आत्मरक्षितकम्' प्रकरणांत व राज्य संरक्षणार्थ इतरत्र सुचविलेले विचार व प्रयोग पाहिले म्हणजे राजनीतीच्या कुटिलपणाचें समर्थन करावें लागतें. प्रत्यक्ष माता, पत्नी, पुत्र इत्यादि प्रेमळ स्वजनांविषयीं देखील राजानें निरंतर साशंक राहिलें पाहिजे ! परकीय शत्रुराजे आणि राज्यांतील राजद्रोही लोक राजावर व राष्ट्रावर संकट केव्हां आणितील, याचा नियम नाहीं; म्हणून अशा लोकांविषयीं राजानें निरंतर साशंक असावें; त्यांचे बेत जाणण्याकरितां अथवा फसविण्याकरितां गुप्त हेरांच्या मदतीनें नाना प्रकारचे गुप्त प्रयोग करावे. शिवाय दुसरे राजेहि अशाच प्रयोगांनीं आपणांस जाचक होतील, म्हणून कौटिल्यानें राजाला— '**यथा च योगपुरुषैरन्यान् राजाधितिष्ठति, तथायमन्यबाधेभ्यो रक्षेदात्मानमात्मवान्**' (कौ. अ. अधि. १ अ. २१)—असा उपदेश केला आहे. कौटिल्याचा शिष्य कामन्दक यानेंहि आपल्या गुरूनें उपदेशिलेला अशाच आशयाचा बोध–'**येन प्रकारेण परानुपेयात्, परावरज्ञः स्वसमृद्धिहेतोः । तमात्मनि स्वस्यमतिश्च-तज्ज्ञैः प्रयुज्यमानं च परेण विद्यात्**–' (का. नी. सर्ग १३ श्लोक ५१) बरें वाईट जाणणाऱ्या राजानें स्वस्थपणें मनामध्यें एवढें लक्षांत असूं द्यावें कीं, स्वतःच्या अभिवृद्धीसाठीं आपण शत्रूंच्याविरुद्ध जे प्रयोग करूं, तेच प्रयोग शत्रुहि चतुर माणसांच्या साहाय्यानें आपल्याविरुद्ध करील, अशा शब्दांत केला आहे. इतिहासकारांनीं भारतीय राजांविषयीं जें "The king's life was so constantly threatened by plots that he dared not take the risk either of sleeping in the day time, or occupyiug the same room two nights in succession" म्हटलें आहे, तें खरें असावें.

शुक्रनीतिसाराप्रमाणें राजा हा 'युगप्रवर्तक' आहे; राष्ट्रांत धर्माचें शिक्षण प्रसृत होऊन जी परिस्थिति उत्पन्न होते, तिचें श्रेय, किंवा अधर्मप्रसारानें उद्भवणाऱ्या पारिस्थितीचा दोष कालाकडे नाहीं व प्रजेकडेहि नाहीं–फक्त राजाकडे आहे. राजा हा आचारप्रेरक असल्यामुळें प्रजाजन त्याची मर्जी संपादन करण्यासाठीं 'यथा राजा तथा प्रजा' या धोरणानें वागूं लागतात; याकरितां राजानें स्वधर्म पाळणें अत्यंत आवश्यक आहे. शुक्रनीति अ. १ श्लो. २२ मध्यें–'**आचारप्रेरको राजा ह्येतत् कालस्य कारणम्, यदिकालः प्रमाणं हि कस्माद्धर्मोस्ति कर्तृषु**–म्हटल्याप्रमाणें राजा हा '**कालाचें कारण**' म्हणजे नवीन परिस्थिति उत्पन्न करणारा आहे; त्याचा आचार असेल, त्याप्रमाणें चांगली किंवा वाईट परिस्थिति उत्पन्न होईल. कालच जर आचारप्रेरक मानिला, तर शुभाशुभ फल भोगण्याचे प्रसंग कर्त्याला कां यावेत ? राजानें स्वधर्मपालनाची अत्यंत काळजी घेतली पाहिजे. प्रजाजन आपापले धर्म पाळितात किंवा नाहीं, हें तपासण्यासाठीं जे गुप्तहेर नेमिलेले असतात, त्यांनीं राजाच्या राजकीय धोरणासंबंधानें लोकमत काय आहे, याची चौकशी करून राजाच्या कानावर घालावें, असें शुक्रनीति सांगते. '**लोको निन्दन्ति राजं त्वां चारैः संश्रावितो यदि । कोपं करोति दौरात्म्यादात्मदुर्गुणलोपकः**' (शु. नी. अ. १ श्लो. १३४–५) लोक आपली निंदा करितात, सरकार, असें राजाचे गुप्त नोकर बजावून सांगत असतांना देखील, जो राजा दुष्टपणानें लोकांवर संतापत बसतो, त्यास केवळ स्वतःचे दोष झांकावयाचे असतात झालें !

## युवराज.

राजाच्या पश्चात् राज्यावर बसणारा जो पुरुष, त्यास राज्यकारभाराची माहिती मिळविण्याकरितां कांहीं काळपर्यंत सरकारी कामें करावयास लावण्याचा प्रघात होता. अशा रीतीनें कांहीं काळ उमेदवारी केल्यानंतर, '**यौवराज्याभिषेक**' होऊन त्यास '**युवराज**' हें पद मिळत होतें. '**राजपुत्रस्य रक्षा च कर्तव्या पृथिवीभृता, धर्मार्थकामशास्त्राणि धनुर्वेदं च शिक्षयेत्**'–(अग्नि. अ. २२५ श्लो. १–३) राजानें राजपुत्राचें पालन करावें, त्यास धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, धनुर्विद्या इत्यादि विद्यांचें शिक्षण देण्याची व्यवस्था करावी, गादीवर बसल्यानंतर राज्यकारभार अगदींच अपरिचित असा भासूं नये, म्हणून

अगोदरच युवराजास व राजकुमारास शिक्षण देण्याची व्यवस्था करावी असें झटलें आहे. कौटिल्यानें राजा व्हावयास युवराजास व राजकुमारांस उपयुक्त पडणारें कोणतें शिक्षण कशा रीतीनें द्यावें, याविषयीं विस्तारपूर्वक विवेचन अधि. १ अ. ५ मध्यें केलेलें आहे. युवराज कोणास नेमावें, या संबंधानें शुक्रनीति अधिक स्पष्ट नियम देते–' मुद्रां विनाखिलं राजकृत्यं कर्तुं क्षमं सदा। कल्पयेद् युवराजार्थमौरसं धर्मपत्निजम् । स्वकनिष्ठं पितृव्यं वानुजं वाऽग्रजसम्भवम् । पुत्रं पुत्रीकृतं दत्तं यौवराज्येभिषेचयेत् । क्रमादभावे, दौहित्रं स्वप्रियं वा नियोजयेत् स्वहितायापि मनसा नैतान् सङ्कर्षयेत् क्वचित् । (शुक्र नी. अ. २ श्लो. १४–१६)–युवराज नेमावयाचा झाल्यास धर्मपत्नीच्या औरस कुमारास, त्याच्या अभावीं धाकट्या भावास, तदभावीं वयानें लहान अशा चुलत्यास, तो नसल्यास वडील भावाच्या पुत्रासमान मानिलेल्या पुत्रास, यौवराज्यपदीं अभिषेक करावा, कदाचित् यापैकीं कोणीच नसल्यास मुलींच्या मुलांत जो आवडता असेल, त्यास युवराज करावें. युवराजाची नेमणूक झाली, म्हणजे तो राज्यामधील अमात्याच्या बरोबरीचा अधिकारी होतो. त्यास राज्यांतील जबाबदारीचीं कामें करावीं लागतात, तथापि शुक्रनीतींत सांगितल्याप्रमाणें ज्या कामांत राजमुद्रा आवश्यक असते, तीं खेरीजकरून इतर कामांची जबाबदारी त्याकडे सोंपविण्यांत येते. युवराजाचें शिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यास पाळीपाळीनें सर्व कामें करावयास लावावी,–अधिकारेषु च सर्वेषु विनीतं विनियोजयेत्'–( अग्नि. अ. २२५ श्लो. ४ ) असा राजनीति ग्रंथकारांचा अभिप्राय आहे.

युवराज हा कित्येकदां राज्यांतील महा–सभेचा प्रमुख अथवा अध्यक्ष, एखाद्या प्रांताचा मुख्य अधिकारी अथवा सेनापति नेमण्यांत येत होता. अशोक–वर्धन हा आपल्या बापाच्या म्हणजे बिंदुसार राजाच्या कारकीर्दींतच सुशिक्षित व राजकारणदक्ष झालेला असून कित्येक दिवसपर्यंत वायव्येकडील सरहद्दीच्या प्रांतावर व पश्चिम हिंदुस्थानावर ' राष्ट्रीय ' viceroy या हुद्यावर त्याची नेमणूक झालेली होती. शुंग घराण्यांतील अग्निमित्र युवराज असतांना, नर्मदा नदीपर्यंतच्या प्रांतावर राष्ट्रीय अथवा उप–राजा नेमलेला होता; आणि अग्निमित्र युवराजाचा पिता पुष्यमित्र हा राज्यकारभार स्वतः चालवीत असतां, त्यानें आपल्या वसुमित्र नामक नातवाचा,–म्हणजे अग्निमित्राच्या पुत्राचा–पराक्रम पाहून त्यास सेनापतीचे अधिकार देऊन लढाईवर पाठविलें होतें. युवराजाची बुद्धिमत्ता, कार्यक्षमता, पराक्रम इत्यादि गुणांवरून, त्यास कधीं कधीं ' उप–राजा ' ही पदवी व विवक्षित क्षेत्रापुरते राज्याचे सर्व अधिकार देण्यांत येत होते.

राजा राज्याधिरूढ व्हावयाचा, तो प्रजेच्या संमतीनें व्हावयाचा–प्रजेनें त्याची निवडणूक करावयाची–हें भारतीय राजनीतींतील प्राचीनतमतत्व युवराजाला अभिषेक करण्याच्या बाबतींतहि लागू करण्यांत येत होतें. दशरथानें रामचंद्राला यौवराज्याभिषेक करावा, या हेतूनें ' सर्व ब्राह्मण, जनमुख्य, पौर, जानपद, नैगम वगैरे संस्थांचे सभासद ' दशरथाकडे जाऊन आपापल्या संस्थांचीं मतें निवेदन करूं लागले, आणि त्यांच्या मतानुसार दशरथानें रामास यौवराज्याभिषेक केला. कालांतरानें राजाच्या निवडणुकीच्या बाबतींत ज्याप्रमाणें सार्वजनिक मताचें महत्व नाममात्र राहिलें, त्याच प्रमाणें याहि बाबतींत राहिलें. निवडणुकीचें प्राचीनतमतत्व एकाकाळीं सर्वथैव पाळिलें जात होतें, याबद्दल कौटिलीय अर्थशास्त्रांतहि ( अधि. ५, अ. ६ ) पुरावा मिळावयासारखा आहे. आत्मसंपन्न राजकुमाराच्या अभावीं दुर्वृत्त राजकुमारास अभिषेक करण्याकरितां–सरळ मार्गानें म्हणा किंवा वाम मार्गानें म्हणा–महामात्रांची संमति मिळविण्याचें काम कोणा तरी अमात्यास करावें लागत होतें, असें दिसतें.

अधिकारि–वर्गांत युवराजाचा दर्जा फार मोठा आहे; तथापि तो अमात्य जरी असला, तरी तो मंत्रि मंडळाचा सभासद असतोच असें नाहीं. त्यास राष्ट्रांतील कांहीं भागाचा मुख्य अधिकारी म्हणून स्वतंत्रतेनें राज्यकारभार करण्याची परवानगी देण्यांत येत होती. क्वचित् प्रसंगीं युवराजाच्या अल्प अनुभवामुळें किंवा अन्यकारणामुळें त्यास प्रांतिक अधिकाऱ्यांच्या सल्लयानें कारभार करावा लागत होता, असें इतिहासावरून दिसतें.

## दुर्वृत्त राजपुत्र.

' नविश्वसेत् ' हें राजकीय नीतींतील एक प्रमुख तत्त्व असल्याकारणानें, राजानें जन्मापासून राजपुत्रांस वचकून असावें, असा उपदेश राजशास्त्रांत केलेला आहे; कारण त्यांच्यामतें राजपुत्र कर्कटकाच्या वळणावर जाऊन प्रत्यक्ष जनकास देखील गट्ट करून टाकतील! राजकुमार ढळढळीत राजाच्या विरुद्ध वर्तन करीत असल्यावर, त्याच्या बाबतींत राजानें किती सावध असा

वयास पाहिजे, हें सांगावयासच नको. अधिकरण १ अध्याय १७ **राजपुत्ररक्षणम्** या मध्यें दुर्वृत्त राजपुत्राचा बंदोबस्त कसा करावा, या संबंधी अनेक प्रयोग सांगितले आहेत. राजाचें व राजकुमाराचें कधीं कधीं इतकें वैर असतें कीं, राजकुमार बापावर हल्ला करावयासहि प्रवृत्त होतो. अशा प्रसंगीं राजानें नेमलेल्या गुप्त हेरांनीं राजकुमारास उघडपणें समजावून सांगावें–'**अप्रार्थनीयोराजा, विपन्ने घातः, संपन्ने नरकपातः** इत्यादि'–राजावर हल्ला करूं नये, चढाई करूं नये, चालून जाऊं नये, तुटून पडूं नये; ( कारण ) फसल्यास मरण हें ठेविलेलें, ( आणि कदाचित् ) काम साधलें, तर नरकपात इत्यादि '**अप्रार्थनीय** शब्दांतील '**प्रार्थ**' धातूचा अर्थ ओढाताण करून '**अभिलाष करणें**' असा लावण्याचें कारण नाहीं. रघुसर्ग ९ श्लो. ५६ '**तत्प्रार्थितं जवनवाजिगतेन राज्ञा**' या श्लोकांतील '**तत्प्रार्थितं**' वर मल्लिनाथानें '**प्रार्थितम्**, म्हणजे '**अभियातं**' अशी टीका केली असून सर्ग १५ मधील...'**विशूलः प्रार्थ्यतामिति**' या श्लोकांतहि प्रार्थ् धातु याच अर्थानें योजिला आहे; मालविकाग्निमित्र नाटकांतहि–'**असौ अश्वानीकेन यवनानां प्रार्थितः**—' हाच अर्थ आहे. मल्लिनाथानें पंधराव्या सर्गांत, **यात्रायामभियानेच प्रार्थना कथ्यते बुधैः**'–प्रार्थना शब्द **यात्रा न अभिनया** या दोन अर्थांनीं योजितात, असा केशव कोशकाराचा आधार दिला आहे. यात्रा व अभियान या दोन शब्दांचे अर्थ अगदीं भिन्न आहेत. याचा करणें व अभिलाष करणें यांचे अर्थ–मागणें व अभिलाष करणें–हे एकमेकांच्या जवळ जवळ येऊं शकतील; दोनहि शब्दांनीं इच्छेचें अस्तित्व ध्वनित होतें. येथें याच्या अर्थ जसा अप्रशस्त आहे, तसा अभिलाषहि आहे. **अप्रार्थनीयः अनभियातव्यः** असाच अर्थ अधिक प्रशस्त आहे. **अप्रार्थनीयो राजा** याचा अर्थ **अनभिलषणीयो राजा**–राजाचा अभिलाष करितां येत नाहीं, असा अर्थ करणें अगदीं अप्रशस्त आहे. राजपुत्रास राजाच्या हयातींत राज्याचा अभिलाष उत्पन्न होईल, कारण राज्य त्याच्या आवडीची वस्तु आहे म्हणून; पण **अभिलषणीयो राजा** यांत राजा स्वतः राजपुत्रास आवडत नाहीं, मग त्याचा अभिलाष करणें म्हणजे आवडीची वस्तु म्हणून हस्तगत करणें असा अर्थ अगदींच अप्रशस्त होतो, शिवाय धातूच्या व्युत्पत्तीचा द्राविडीप्रणायामानें खटाटोप करून **अनभिलषणीय=द्वेष्य**, आणि **अप्रार्थनीय अद्वेष्य** असा अर्थ व्युत्पत्तिशास्त्रविशारद पंडितांनीं वाटल्यास ग्राह्य मानावा. आमच्या मतें अप्रार्थनीयः म्हणजे अनभियातव्यः, असा कोशकारांनीं दिलेला व कालिदासादि कवींनीं मान्य केलेला अर्थ प्रशस्त आहे.

## मंत्री व मंत्रिपरिषद.

राज्याचा गाडा एका चक्रानें चालावयाचा नाहीं, त्यास साहाय्याची आवश्यकता असते; म्हणून राजानें मंत्र्यांची, अमात्यांची, सचिवांची नेमणूक करावी, आणि त्यांच्या मतानें राजकार्य करावें, असा सर्व शास्त्रकारांचा अभिप्राय आहे. '**अपियत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करं, विशेषतोऽसहायेनकिंमुराज्यं महोदयम्**'–( मनु. अ. ७, ५५ ) अगदीं सुलभ काम देखील ( कधीं कधीं ) एकट्या माणसाच्या हातून तडीस जात नाहीं, मग ज्याचें उत्पन्न पुष्कळ आहे, असें राज्य एकट्याच्यानें चालविलें जाईल, हें तर बोलावयालाच नको ! '**सहायसाध्यं राजत्वं चक्रमेकं न वर्तते कुर्वीत सचिवांस्तस्मात्तेषांचशृणुयान्मतम्**' ( कौ. अ. अधि १, अ ७ )–कौटिल्यानें राजकार्यांत राजाला मंत्र्याच्या सहाय्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. शुक्रनीतींत तर मंत्र्याची आवश्यकता अधिक स्पष्ट शब्दांत सांगितली आहे. '**सर्व विद्यासु कुशलो नृपो ह्यपि सुमन्त्रवित्, मन्त्रिभिस्तु विनामन्त्रं नैकोऽर्थं चिन्तयेत्क्वचित्। सभ्याधिकारिप्रकृतिःसभासत्सुमते स्थितः, सर्वदास्यान्नृपः प्राज्ञः स्वमते न कदाचन। प्रभुः स्वातन्त्र्यमापन्नोह्यनर्थायैव कल्पते, भिन्नराष्ट्रो भवेत्सद्यो भिन्नप्रकृतिरेवच।**' ( शु. नी. अ. २ श्लो २–४ ) राजानें सर्व विद्यांत प्रावीण्य मिळविलेलें असलें, आणि त्यास राजकारण कितीजरी माहित असलें, तरी त्यानें मन्त्र्यांची मदत न घेतां एकट्यानें बसून राजकार्याचा विचार ठरवितां कामा नये; राजा शहाणा असेल, तर त्यानें अध्यक्ष, कार्यकारी अमात्य, प्रजाजन व सार्वजनिक सभांचे सभासद यांच्या मताप्रमाणें राजकार्य चालवावें;–त्यानें आपला आग्रह धरूं नये; मंत्रिमंडळाचें मत धाब्यावर बसवून जो राजा आपल्या छंदानें चालतो, तो आत्मनाशाचीच तयारी करितो, असें समजावें.

प्राचीन भारतीय राजा हा स्वयंनिष्ठ अथवा स्व-तंत्र असा नव्हता, हें दाखविण्यासाठीं राजकार्यांत त्याला साहाय्य करण्याकरितां अस्तित्वांत आलेल्या **मंत्रि-परिषदेचा** मूळउद्भव कोठें झाला, हें पाहिलें पाहिजे. नीतिशास्त्रकारांच्या ग्रंथांत उल्लेखिलेली मंत्रिपरिषद ही प्राचीन वेदकालांतील राष्ट्रीय सभेपासून–**समितीपासून** रूपांतर पावून अस्तित्वांत आली.

प्राचीन काळीं राज्याभिषेक समारंभांत भावी राजानें बारा विवक्षित मुख्यांस ' रत्नहवि ' द्यावें, असा प्रघात होता. त्यांचीं नांवें मागें एका प्रकरणांत आलेलीं आहेतच. या मुख्यांस ' रत्नी ' अथवा ' राजकृत अथवा 'राजकर्तारः' King-makers अशी संज्ञा होती; हे मुख्य म्हणजे राज्यांतील मुख्य अधिकारी पुरुष होत. रत्नी अथवा राजकर्ते हे लोकांचे प्रतिनिधि असे समजले जात असून राजाकडूनहि त्यांस याच नात्यानें मान मिळत होता; ते राजाचे वंशवद नोकर नव्हते. बृहदारण्यक उपनिषदांत समितीस परिषद असेंच नांव आहे. रामायणांत व इतर कांहीं ग्रंथांतहि वैदिक काळांतील रत्नींस राजकर्ते व रज्जुकराजुक अशीं नांवें आहेत; राजुक या शब्दाचा अर्थ ' रज्जुभिर्नियन्ता ' राज्याची सूत्रें धारण करणारा मंत्री असा करण्यांत येतो. भारतीय शासन पद्धतींतील अत्यंत महत्त्वाचें तत्व म्हटलें म्हणजे राजाला मंत्र्यांच्या सल्ल्यावांचून व सहकारितेवांचून एकहि राजकार्य करितां येत नाहीं.

अर्थशास्त्रांत सचिव, मंत्री, अमात्य, महामात्र, मंत्रिपरिषद इत्यादि शब्द आलेले असून, दुसऱ्या नीतिशास्त्रग्रंथांतहि हे किंवा तत्सदृश शब्द आलेले आहेत. अर्थशास्त्रांतील भृत्यभरणीय प्रकरणांत दिलेल्या नोकरांच्या यादींत सचिव नाहीं, म्हणून पहिल्या अधिकरणांतील सातव्या अध्यायांत 'कुर्वीत सचिवान्' आलेला सचिव शब्द सामान्य अर्थानें घेतला पाहिजे. दुसऱ्या कांहीं नीतिशास्त्रकारांनीं सचिव हा प्रधान मंडळांत निर्दिष्ट केलेला असून त्याचें कामहि व्याख्यात केलें आहे. यांतील भेद काय आहेत, हें आपण पाहूं. अमात्य, मंत्री इत्यादि जबाबदार प्रधान कोणास नेमावें, याविषयीं कौटिल्यानें दिलेले नियम पाहिले म्हणजे प्लेटोनें Guardians of the State च्या राष्ट्रपालकांच्या अंगीं जे गुण आवश्यक प्रशंसिले आहेत, त्यांची आठवण होतेः— " Truth was his leader whom he followed, always and in all things, and his clear virtues were courage, magnificience, apprehension and memory. " आरिस्टाटलनें हेच गुण प्रशंसिले आहेतः–" " These are the qualifications required in those who have to fill the highest offices–(1) first of all loyalty to the established constitution; (2) the Greatest administrative policy; (3) virtue and justice of the kind proper to each form of Government. "

अमात्य ही संज्ञा कौटिलीय अर्थशास्त्रांत खात्यावरील वरिष्ठ अधिकारी अशा सामान्य अर्थानें योजिलेली दिसते अमात्य कोणास नेमावें या संबंधांत कौटिल्यानें पूर्वकालीन ग्रंथकारांचीं मतें सांगून स्वतःचा निर्णय दिला आहे–' सर्वमुपपन्नमिति कौटिल्यः । कार्यसामर्थ्याद्धि पुरुषसामर्थ्यं कल्प्यते सामर्थ्यतश्च । '–सारांश कार्यसामर्थ्य पाहून व विशेषतः बुद्धिसामर्थ्य पाहून अमात्यांची नेमणूक करावी; पण अनेक अमात्य नेमावे लागले, तरी त्यांस मंत्री नेमूं नये. मंत्र्याच्या अंगीं कोणते गुण अवश्य पाहिजे, हें स्वतंत्र सांगितलें आहे. मंत्री हा कौटिलीय अर्थशास्त्रांतील मुख्य प्रधान Prime minister म्हटला पाहिजे. प्रधानांचीं नांवें निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळीं दिलीं आहेत. मानव धर्मशास्त्रांत सचिव–सहकारी मदतनीस हा सामान्य अर्थ घरिला आहे. अर्थशास्त्राप्रमाणें पाहतां मुख्य प्रधानास मंत्री ( मंत्र म्हणजे सल्लामसलत देणारा ) असें नांव असून, सर्व प्रजाजनामध्यें त्याचा दर्जा पहिला आहे; त्यानंतर पुरोहित, नंतर सेनापति व नंतर युवराज येतात. मनु मुख्य प्रधानास अमात्य असें नांव देतो; शुक्र मंत्री म्हणतो; अशोकाच्या मुख्य प्रधानास ( राधागुप्तास ) अमात्य असें म्हणत होते; आणि अजातशत्रूच्या मुख्य प्रधानास अग्र महामात्र असें नांव होतें; गुप्तांच्या काळांत तर हीं सर्व नांवें जाऊन त्यास महादंडनायक असें नांव आलें. असो !

शुक्रनीतींत ( अ. २ श्लो. ७२–७४ ) सुमंत्र, पंडित, मंत्री, प्रधान, सचिव, अमात्य, प्राड्विवाक, व प्रतिनिधि यांचें राष्ट्रकार्यांत राजास साहाय्य करणारें प्रधान मंडळ सांगितलें असून, यांतच पुरोधा ( पुरोहित ) व दूत ( वकील ) यांचाहि समावेश केला आहे; यांचीं इंग्रजी नांवें अनुक्रमें Minister of finance, Minister of Law, Home minister, President of Council, Minister of War, Minister of Revenue or Agriculture, Chief justice, and Ambasador (प्रतिनिधि) Minister of Religion, व Consul अशीं देतां येतील; शुक्रनीतींत आलेल्या कामाच्या वर्णनावरूनच हीं नांवें दिलीं आहेत. मंत्रि परिषदेंत सभासद किती असावेत, याविषयीं मतभेद आहे, तथापि राजाला ज्या मंत्र्यांशीं विशेष कारणांस्तव खलबत करावयाचें असतें,

त्यांचें मंडळ अगदीं लहानच असावें, असा बहुतेक शास्त्रकारांचा अभिप्राय आहे. 'आत्ययिके कार्ये मन्त्रिणो मन्त्रिपरिषदं चाहूय ब्रूयुः। तत्र, यद्भूयिष्ठाः कार्यसिद्धिकरं वा ब्रूयुस्तत्कुर्यात्।' (कौ. अ. अधि १, अ१५) अत्यंत निकडीचें काम असेल, तेव्हां राजानें मंत्र्यांस (Cabinet of ministers) व मंत्रिपरिषद् (Council of state) भरवून कार्य निवेदन करावें, आणि नंतर बहुमतानें जें ठरेल, त्याप्रमाणें करावें. अर्थशास्त्रावरून मंत्रिमंडळ नांवानें विवक्षित कार्यकारी मंत्र्यांचें खास मंडळ असून, शिवाय जींत मंत्र्यांशिवाय इतर सरकारी नोकरांचा व बिनसरकारी माणसांचा समावेश होऊं शकतो, अशा लोकांचीहि मंत्रिपरिषद् म्हणजे Council of state किंवा Royal Assembly असली पाहिजे, असें दिसतें. बड्या मंत्रिपरिषदेंत यावयाचीं कामें खास मंत्रिमंडळांत अगोदर शिजवून तयार होऊन यावयाचीं. मंत्रिपरिषदेंत बहुमतानें मंजूर झालेला ठराव अमान्य करावयास भारतीय राजांस अधिकार नव्हता, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

मंत्रिमंडळाचें नियंत्रण राजाच्या आचरणावर किती होतें, हें दाखविण्याकारितां आपस्तंब सूत्रांतील–'भृत्यानामनुपरोधेन क्षेत्रं वित्तं च ददद्ब्राह्मणेभ्यो यथार्हमनन्तांल्लोकानभिजयति–' मंत्र्यांना मान्य नसेल, तर राजाला ब्राह्मणांस कांहीं देणगी द्यावयाची असेल, तरी देखील त्यानें देऊं नये. निर्बंध पुरेसा होईल. भृत्य शब्द कौटिलीय अर्थ शास्त्रांत–'मंत्रिपुरोहितादि भृत्य वर्गम्'–सांगितल्याप्रमाणें मंत्र्यांचा वाचक आहे. चंद्रगुप्त मौर्यांचा नातू अशोक, याच्या कारकीर्दींत निदान एका प्रसंगीं तरी राजानें स्वतः मान्य केलेला ठराव मंत्रिपरिषदेंत चर्चेस्तव आला असतां, बरीच भवति न भवति झाली, म्हणून त्यास या संबंधांत 'महामात्रांस' खलिता पाठवावा लागला, असा अशोकाचा शिलालेख ६ मध्यें स्पष्ट उल्लेख आहे:–
"And when in respect of anything that I personally order by word of mouth, for being issued or proclaimed, or again, (if) in respect of any emergent work that may superimpose itself on the Mahamatras, there is any division or rejection in the council, I have so commanded that it shall be forthwith communicated to me at all places and at all hours." (D. R. Bhandarkar-Ashoka. p. 289). 'सुदर्शन' तलावाच्या दुरुस्तीसाठीं सरकारी तिजोरींतून रकम मंजूर व्हावी अशी स्वतःरुद्रदामन राजाची मागणी असतांना देखील, मंत्र्यांनीं मंजुरी न दिल्यामुळें, राजानें आपल्या खाजगी शिल्केंतून तलावाची दुरुस्ती केली.

मंत्रिमंडळ Cabinet व मंत्रिपरिषद् Council of State या दोन निरनिराळ्या संस्था होत्या. कौटिल्याच्या अभिप्रायाप्रमाणें मंत्रिमंडळ जरूरी प्रमाणें शक्य तितकें लहान असावें, पण राजाची मंत्रिपरिषद् लहानसान असतां कामा नये–राजा 'अक्षुद्र परिषत्क' असा असला पाहिजे. शुक्रानें मंत्र्यांमध्यें पुरोहित व दूत यांचाहि समावेश केला आहे. कौटिल्यानें पुरोहिताचा दर्जा मंत्र्यांच्या बरोबर ठेविला असून, त्यास षडंगसहित वेदांचें ज्ञान, शांति–पुष्टि–कर्मविधि, अथर्ववेद प्रयोग इत्यादि ज्ञानाची आवश्यकता ठेविली आहे. शुक्रनीति याहि पलीकडे जाऊन पुरोहितास नीतिशास्त्र, शस्त्रास्त्रविद्या व व्यूह कल्पना यांचेंहि ज्ञान आवश्यक मानिते. शुक्रनीतींतील अष्ट प्रधानांचें मंडळ शिवाजी महाराजांनीं स्वराज्यांत अस्तित्वांत आणिलें; पुरोहित व दूत यांची योजना मंडळामध्यें विकल्पें करून येत असावी. कौटिलीय अर्थशास्त्र दूताची गणना मंत्रिमंडळांत करीत नाहीं, याचें आश्चर्य वाटतें; कदाचित् दूताचें काम अत्यंत जबाबदारीचें असल्यामुळें मंत्र्यालाच तें काम करावें लागत असेल. मनुस्मृति अ. ७ श्लो ६५–६६ मध्यें–'दूते संधिविपर्ययौ। दूत एव हि संधत्ते भिनत्त्येव च संहतान्। दूतस्तु कुरुते कर्म भिद्यन्ते येन वा न वा।' परराष्ट्रांशीं युद्ध किंवा तह ठरविण्याचा, किंवा तह मोडण्याचा अधिकार या अधिकाऱ्यास सर्वस्वी दिलेले असतात, असें सांगितलें आहे. मनु, शुक्र, रामायण वगैरे ग्रंथांत दूत हा मंत्रिमंडळांतील एक प्रमुख अधिकारी मानिला आहे. राष्ट्रांतील उत्पन्नाच्या बाबी, राज्यांतील खजिना वगैरेंच्या कामांची जबाबदारी मनुस्मृतीप्रमाणें–'नृपतौकोशराष्ट्रेच'–राजाकडे आहे; पण राजाची गणना मंत्र्यांत नाहीं. अर्थशास्त्रांत 'सन्निधाता' नामक जो अधिकारी, त्याकडेच राष्ट्रीय उत्पन्नाच्या बाबी सोंपविल्या होत्या; त्यासच प्राचीन ब्राह्मण ग्रंथांत 'संग्रहीता' the Master of the Treasury असें नांव होतें; याच अधिकाऱ्यास दुसऱ्या कांहीं ग्रंथकारांनीं 'अर्थसंचयकृत्' असें नांव दिलें आहे. भृत्यांच्या यादींत सेनापतीचें नांव तिसरें आलें असल्यामुळें, चंद्रगुप्ताच्या राज्यांत सेनापति हा फार उच्च दर्ज्याचा प्रधान असला पाहिजे. शुक्रनीतींत यास 'सचिव' असें नांव आहे; सचिव म्हणजे सेनावित्=सैन्यविज्ञानवान् स सचिवः अशी व्याख्या केलेली आहे. रामायणांत संग्रामभूमीवर सेना घेऊन युद्धास जाणारा अधिकारी आणि अर्थशास्त्रांत निर्दिष्ट केलेला सेनापति, या उभय-

त्यांची कामें कदाचित् एकच असतील. परंतु कौटिल्यानें निर्देशिलेला **सेनापति** हा प्रत्यक्ष समरभूमीवर जाणारा नसून, War-Minister युद्धमंत्री म्हणून आहे. कौटिलीय अर्थशास्त्रांत चतुरंगदलासह समरभूवर जाणाऱ्या अधिकाऱ्यास **नायक** Generalissims असें स्वतंत्र नांव आहे.

चंद्रगुप्त मौर्याच्या भृत्यवर्गांतील **युवराज** हा मोठा अधिकारी आहे. वर निर्दिष्ट केलेले चार पांच मंत्री व युवराज या सर्वांचें मिळून झालेलें मंडळ म्हणजे मंत्रिमंडळ Cabinet होय. राज्यकारभार या मंडळावरच सोंपविलेला असतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. युवराजाचा समावेश मंत्रिमंडळांत झाला, तो वेदकालानंतर झाला असावा. महाभारतांत व शुक्रनीतींत या मंत्रिमंडळास मंत्रि–गण असें म्हटलें आहे. तथापि या मंडळांतील सर्वच व्यक्तींशीं राजा खलबत करीत होता, असें नाहीं, या मंडळांतहि पुनःदोनतीनच मंत्र्यांचें अंतःस्थ मंडळ होतेंच; यांतील व्यक्तींबरोबर मात्र राजाच खलबतें करून निश्चय ठरवीत होता. मंत्री यास कांहीं ग्रंथांत मंत्रधर व मंत्रग्राह अशीं नावें आहेत,—राज्याचा मंत्र, राज्याचें धोरण ज्यांच्या हातीं असतें, त्यांस मंत्री, मंत्रधर, मंत्रग्राह म्हणतात. या मंडळांत एकच मंत्री असतां कामा नये, असें सर्व शास्त्रकारांचें मत आहे. राज्यकारभार एकाच्या तंत्रानें चालणें सर्वदा हितकर नसतें. तथापि यांतील निर्णय बहुमतानें ठरवावयाचा असल्यानें सदस्यांचीं संख्या विषम असली पाहिजेः—'**एको मन्त्री न कर्तव्यः। एको निरवग्रहश्चरति मुह्यति च कार्यकृच्छ्रेषु। द्वावपि मन्त्रिणौ न कर्तव्यौ, तौ संहतौ चरन्तौ भक्षयन्तौ गृहीतौच विनाशयतः। त्रयः पञ्च सप्त वा मन्त्रिणः कार्याः**' (नीतिवाक्यामृत) एकच मंत्री केव्हां नेमूं नये; त्यास रान सर्व मोकळें सांपडलें म्हणजे वाटेल तसा 'चरतो,' आणि अवघड कामांत गोंधळून जातो! त्याचप्रमाणें दोनच मंत्री करूं नये; ते दोघे एक झाले, म्हणजे वाटेल तसे वागावयास व चरावयास लागतील; वरें त्यांस ताब्यांत घेतलें किंवा पकडलें, तर राष्ट्रांत नाश करूं लागतील. (म्हणून) तीन, पांच अथवा सात मंत्री नेमावे. नीतिवाक्यामृतकाराच्या मताप्रमाणें या अंतःस्थ मंत्रिमंडळाची सदस्य संख्या सर्वांस मान्य आहे. सदस्यांची संख्या निरनिराळ्यां काळांत कमी अधिक होत होती, तथापि ती कमींत कमी ठेवण्याची प्रवृत्ति कायम होती.

वर निर्दिष्ट केलेल्या मंत्रिमंडळावर कार्यांची जबाबदारी असल्यामुळें त्यास Executive Council असेंहि म्हणतां येईल. या छोटेखानी मंडळाशिवाय **मंत्रपरिषद्** अथवा **मंत्रिपरिषद्** या नांवाची आणखी एक सभा होती, तिचा निर्देश अर्थशास्त्रांत अनेक स्थलीं आलेला आहे; या सभेंत नुसते मंत्रीच सभासद नसून, दुसऱ्या कित्येकांचाहि तींत समावेश होत होता. या मंत्रिपरिषदेंत १ कार्यकारी मंत्रिमंडळाचे सभासद (अथवा मंत्रधर), २ (मंत्रिमंडळाच्या बाहेरील) जबाबदार खात्यांवरील प्रमुख अधिकारी (अध्यक्ष), ३ मोठ्या हुद्यांवरील सरकारी नोकर, आणि ४ दुसरे-इतर लोक. या सभेंत बरेच सभासद असावयाचे. कौटिल्यानें तर इंद्राच्या सभेंत हजार सभासद होते, म्हणून त्यास हजार मार्गदर्शक असल्यामुळें सहस्राक्ष नांव प्राप्त झालें, असें म्हटलें आहे. यावरून ही परिषद जितकी मोठी असेल तितकी चांगली असा अभिप्राय दिसतो.

मंत्रिपरिषदेंत इतर जनांचा समावेश होतो. तथापि हे इतर जन कोण असावेत यासंबंधानें निश्चियानें सांगतां येत नसलें, तरी त्यांत कोण ध्वनित होतात, याचें अनुमान अनेक पुराव्यांवरून काढितां येतें. अशोकानें स्वतः देऊं केलेल्या देणगीस मंत्रिपरिषदेनें मंजुरी दिली नव्हती, असें मागें सांगितलेंच आहे. सदर परिषदेंत अमात्य आणि पौर होते, असें इतिहास सांगतो. यावरून पुर व जनपद यांचे प्रतिनिधि या परिषदेंत असले पाहिजेत. महाभारत शांतिपर्व अ. ८३ व शुक्रनीति अ २, श्लो. ३ यांतील पुराव्यांवरून या प्रघातास बळकटी येते. राजानें–'**सभ्याधिकारिप्रकृतिसभासत्सु मते स्थितः। सर्वदा स्यान्नृपःप्राज्ञः-स्वमते न कदाचन।**' शुक्रनीतींतील उपदेशाप्रमाणें सभ्य म्हणजे मंत्रपरिषद अथवा सभाध्यक्ष, अधिकारी, आणि प्रकृति अर्थात् प्रजाजनांचे प्रतिनिधि, यांच्या मताप्रमाणें निरंतर वागलें पाहिजे. राजकार्यांचें धोरण राजानें स्वतःच्या छंदानें न चालवितां मंत्रपरिषदेंतील सभासदांच्या मताप्रमाणें ठरविलें पाहिजे. या नियंत्रणामुळें राजाला स्वैराचरण करावयास संधि मिळत नव्हती. ही मंत्रिपरिषद म्हणजे दिवाणांचें मंडळ नसून एका प्रकारें Council of state होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं.

## नोकर–वर्ग

कौटिलीय अर्थशास्त्रांतील '**भृत्यभरणीयम्**, प्रकरणांत अनेक नोकरांची व त्यांच्या वेतनांची यादी दिलेली आहे. अधि. १ अ. १२ मधील श्लोकांत '**अष्टादशेषु तीर्थेषु**, असा उल्लेख आल्यावरून राज्यकारभाराच्या सोयीसाठीं अठरा

तीर्थं अथवा खातीं पाडिलेलीं होतीं असें दिसतें. रामायणामध्येंहि तीर्थ याच अर्थानें योजिलेला आहे; कौटिल्यानेंहि तीर्थ म्हणजे खातें अथवा खात्याचा मुख्य अधिकारी–महामात्र या अर्थानें योजिलेला आहे. तीर्थ शब्दाचा मूळ अर्थ म्हटला म्हणजे उतार-वाट, उतरून पार जातां येईल असा रस्ता, अर्थात् ज्याच्या द्वारें जावयाचें, तो पुरुष अथवा तें खातें. नीति वाक्यामृत अध्याय २ मध्यें-'**धर्मसमवायिनः कार्यसमवायिनश्च पुरुषाः तीर्थम्**'–धर्मानुशासनाचीं व कार्यकारी मंडळाचीं कामें करणारे-Legislative, Judicial व Excecutive functions करणारे, त्यांस तीर्थ म्हटलें आहे. अर्थशास्त्र अधि. १ अ. १२ व आ. ५ अधि. २ वरून तीर्थांची अथवा खात्यांची कल्पना होतेः १ मंत्री, २ पुरोहित; ३ सेनापति, ४ युवराज, ५ दौवारिक Lord Mayor of the Palace, ६ अंतर्वेशिक Lord Chamberalin, ७ प्रशास्ता Chief Magistrate ( and Minister in charge of prisons ), ८ समाहर्ता Revenue Minister, ९ सन्निधाता Minister in charge of Treasary, १० प्रदेष्टा Commissioner ? ११ नायक Generalissims, १२ पौर Governor of ths Capital, १३ व्यावहारिक Judge or Chief Judge, १४ कार्मांतिक Officer in charge of mines and manufactories, १५ मंत्रिपरिषदध्यक्ष President of the council of State, १६ दंडपाल officer in charge of supply and transport, १७ दुर्गपाल Officer in charge of fortifications and defences, आणि १८ अंतपाल ( अथवा राष्ट्रांतपाल ) Frontier Officer.

नोकर वर्गाच्या वरील यादींत आलेला सेनापति Commander-in chief नसून युद्धमंत्री War-Minister आहे. नायक हा सेनेचा अधिपति होय. अर्थशास्त्रांतील व्यावहारिक व मंत्रिपरिषदध्यक्ष हे शुक्रनीतींतील प्राड्विवाक Chief Judge व प्रधान होत. प्रशास्ता या अधिकाऱ्याच्या कामाचा निश्चय केलेला दिसत नाहीं; तथापि कांहीं ग्रंथांत या अधिकाऱ्यास 'कारागार–अधिकृत' असें नांव दिलेलें आढळून येत असल्यामुळें, तुरुंगांची देखरेख करणाऱ्या मुख्य अधिकाऱ्याचें कामहि त्याकडे असावें. त्याच प्रमाणें प्रदेष्टा या अधिकाऱ्याचें निश्चित काम कोणतें, हें कळत नाहीं; याचा अमात्यांमध्यें समावेश होत नाहीं, असें–' प्रदेष्टारस्त्रयो वामात्याः कण्टक शोधनं कुर्युः ' ( अधि. ४ अ १ ) यावरून स्पष्ट होतें. तथापि रामायणाचा टीकाकार गोविंदराज यानें अष्टादशतीर्थांवर टीका करितांना या अधिकाऱ्यास 'कार्यनियोजक' असें नांव दिलेलें असून, त्याचें स्पष्टीकरण–'**राजाज्ञायाः बहिः प्रचार कर्ता**'–राजाचे हुकूम पाठविणारा–या शब्दांत केलें आहे.

## मंत्रिमंडळाची कार्यपद्धति.

अर्थशास्त्राप्रमाणें अत्यंत निकडीचें अथवा जरुरीचें काम असेल, तेव्हां थोरली मंत्रिसभा अथवा मंत्रिपरिषद भरविण्यांत येत होती. यावरून रोजचीं कामें धाकट्या मंत्रिमंडळाकडूनच चालत होतीं, असें ओघानेंच म्हणावें लागतें; आणि याकरितां अर्थात् सदर कामें लेखी प्रकरणांमध्येंच असलीं पाहिजेत हेंहि उघड आहे. अशोकाच्या एका शिलालेखांत राजाच्या तोंडी हुकुमांसंबंधीं उल्लेख आहे, यावरूनहि राजकीय प्रकरणांचे लेख असले पाहिजेत असें अनुमान निघतें. अर्थशास्त्र अधि १, अ. १५ यांत–'**अनासन्नैः सह पत्रसंप्रेषणेन सह मन्त्रयेत्**–' जे मंत्री गैरहजर असतील, त्यांचीं मतें पत्रद्वारें मागवून घ्यावीं, असें लिहिल्यावरून मंत्रीलोक आपापल्या कामांची लेखी नोंद करून ठेवीत होते, असें दिसतें. मंत्रिमंडळाच्या कार्यपद्धतीविषयीं शुक्रनीतींत सविस्तर वर्णन आहे. कामांचीं प्रकरणें अधिकाऱ्याकडून मंत्र्यांकडे व राजाकडे कशीं जातात व नंतर मंत्रिमंडळाच्या बैठकींत त्यांस ठरावाचें स्वरूप अथवा मंजुरी कशी येते, याचें विवेचन शु. नी. अ. २ श्लो. ३६२–६७ मध्यें केलेलें आहेः—

**राजा स्वलेख्यचिन्हं तु यथाभिलषितं तथा। लेखानुपूर्वं कुर्याद्धि दृष्ट्वा लेख्यं विचार्य च। मंत्री च प्राड्विवाकश्च पंडितो दूतसंज्ञकः। स्वाविरुद्धं लेख्यमिदं लिखेयुः प्रथमं त्विमे। अमात्यः साधु लिखनमस्त्येतत् प्राग्लिखेदयम्। सम्यग्विचारितमिति सुमंत्रो विलिखेत् ततः। सत्यं यथार्थमितिच प्रधानश्च लिखेत् स्वयम्। अंगीकर्तुं योग्यमिति ततः प्रतिनिधिर्लिखेत्। अंगीकर्तव्यमितिच युवराजो लिखेत् स्वयम्। लेख्यं स्वाभिमतं चैतद् विलिखेच्च पुरोहितः। स्वस्वमुद्राचिन्हितं च लेख्यांते कुर्युरेवहि ॥ अंगीकृतमिति लिखेन्मुद्रयेच्चततो नृपः ॥**

राज्यांतील प्रकरणें लेखी चालवयाचीं. मंत्री Home minister, प्राड्विवाक Chief Judge, पंडित Minister of Law, व दूत Minister of diplomacy यांनीं आलेल्या प्रकरणावर–'**स्वाविरुद्धं**'–आह्मांस अथवा आमच्या

खात्यास अमान्य नाहीं, हरकत नाहीं, असा शेरा मारावा, अमात्यानें Minister of Revenue and Agriculture नें 'साधु लिखितम्'–ठीक आहे, सुमंत्रानें Minister of finance नें –'सम्यग्विचारितं'–सांगोपांग विचार करून झालेलें आहे, असा आपला शेरा लिहावा. नंतर अध्यक्षानें यथार्थ आहे असा शेरा मारून मंजुरी द्यावी. अध्यक्षानंतर प्रतिनिधी युवराज व पुरोहित यांनीं अनुक्रमें स्वीकारण्यास योग्य आहे, अवश्य स्वीकारावें, व पसंत आहे असे शेरे मारून मंजुरी द्यावी. प्रत्येक शेऱ्याखालीं शेरा मारणाऱ्याचें शिक्कामोर्तब असावयाचें. इतका सर्व विधि झाल्यानंतर राजाची सही व शिक्कामोर्तब व्हावयाचें. नंतर जो ठराव व्हावयाचा, त्यावर पुन्हां सर्व मंत्र्यांच्या मंडळाचे सभासद या नात्यानें सह्या व मंडळाचें शिक्कामोर्तब झालें, म्हणजे तो पक्का झाला. राजास त्यासंबंधीं पुन्हां चर्चा करण्याचा अथवा फिरविण्याचा अधिकार राहिला नाहीं. मंडळांतील बहुमतानें मंजूर झालेल्या ठरावावर राजाला हरकती काढण्याचा अधिकार नाहीं, असा अर्थशास्त्रकाराचा अभिप्राय आहे.

राज्याचीं सूत्रें मंत्र्यांच्या हातीं असल्यामुळें, राजाची सत्ता मंडळाचा सभासद या नात्यानें जितकी असूं शकेल, तितकीच होती, असें स्पष्ट होतें. शुक्रनीतींत मंत्रिमंडळास दिलेले अधिकार कौटिल्याच्या काळीं अस्तित्वांत नसतील, अशी शंका कदाचित् उभी राहील. परंतु मेग्यास्थेनीसनें आपल्या वृत्तांत जें कांहीं नोंदून ठेविलें आहे, त्यावरून तत्कालीन राज्यांत देखील असाच क्रम चाललेला होता, असें दिसून येईल:...

The seventh caste consists of the Councillors and Assessors of those who deliberate on public affairs. It is the smallest class looking to number, but the most respected, on account of the high character and wisdom of its numbers."

" In point of numbers this is a small class, but it is distinguished by superior wisdom and justice and hence enjoys the prerogative of choosing Governors, Chiefs of provinces, Deputy Governors, Superintendents of the Treasury, Generals of the Army, Admirals of the Navy, Controllers and commissioners who superintend agriculture. " ( Megasthenes–quoted by K. P. Jayaswal ).

कौटिलीय अर्थशास्त्र अधि. ८, अ. १ प्रकृति व्यसन वर्ग–या प्रकरणांत राजाचें व्यसन अथवा कमजोरपणा, आणि अमात्याचें व्यसन अथवा कमजोरपणा यांपैकीं राज्याला विघातक कोणता, या संबंधांत कौटिल्यानें भारद्वाज नामक पूर्वकालीन अर्थशास्त्रकाराचें मत दिलें आहे:—'स्वाम्यमात्यव्यसनयोरमात्यव्यसनं गरीय इति। मंत्रो, मंत्रफलावाप्तिः, कर्मानुष्ठानमायव्ययकर्म, दंडप्रणयनममित्राटवीप्रतिषेधो राज्यरक्षणं व्यसनप्रतीकारः कुमाररक्षणमभिषेकश्चकुमाराणामायत्तममात्येषु।' भारद्वाजाचें मत कौटिल्यास सर्वस्वी ग्राह्य नाहीं. परंतु भारद्वाजानें निर्दिष्ट केलेलीं बरींचशीं कामें अमात्यांवर अवलंबून आहेत, हें कौटिल्यासहि मान्य आहे. मेग्यास्थेनीसनें 'सातव्या जाती' चीं कामें व भारद्वाजानें निर्देशिलेलीं अमात्याचीं कामें सारखींच आहेत. असें म्हणावयास हरकत नाहीं. म्हणून जी कार्यपद्धति शुक्रनीतींत निर्दिष्ट केलेली आढळते, ती कौटिल्याच्या काळांतहि प्रचारांत असावी, असें अनुमान काढावयास हरकत नाहीं.

ब. रा. हिवरगांवकर, नगर.

इतकी प्रस्तावना लिहून झाल्यावर रा. हिवरगांवकर हे दम्याच्या विकारानें मृत्यु पावले. प्रस्तावनेचा पुढील भाग रा. ज. स. करंदीकर यांनीं लिहून पुरा केला आहे.

प्रकाशक.



# ग्रंथ परिचय.



## अधिकरण पांचवें.

कौटलीय अर्थशास्त्राचें हें भाषांतर छापून काढतांना केवळ छापण्याच्या सोईच्या दृष्टीनें त्याचें पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग पाडण्यांत आले. ते भाग पाडतांना पूर्वार्धांत पहिलीं चार अधिकरणें समाविष्ट करण्यांत आलीं आणि आतां या उत्तरार्धांत ५ ते १५ अखेर म्हणजे अकरा अधिकरणांचा समावेश केला जात आहे. अधिकरणांच्या संख्येंत मोठें अंतर दिसलें तरी ग्रंथविस्तारांत तितकेसें अंतर नाहीं. पूर्वार्धांत मूळग्रंथ वेगळा आणि भाषांतर वेगळें छापलें गेलें असलें तरी त्या भागाची पृष्ठसंख्या मूळ व भाषांतर मिळून ६९+१३२=२०१ झालीं आणि या उत्तरार्धांत मूळ व भाषांतर एकत्रच छापलें असून त्याची पृष्ठसंख्याहि बरोबर तितकीच म्हणजे २०१ झाली आहे. विस्तृत प्रस्तावना, सूची, कठिण शब्दांचा कोश व परिशिष्टें यामुळें मात्र हा उत्तरार्धाचा भाग पूर्वार्धापेक्षां बराच मोठा झाला आहे व तें स्वाभाविकच आहे.

पृष्ठसंख्येच्या दृष्टीनें जशी पूर्वार्ध व उत्तरार्ध ही विभागणी अगदीं बरोबर झाली तशीच ती विभागणी आणखी दुसऱ्याहि एका दृष्टीनें यथाशास्त्र झाल्याचें दिसून येईल. कौटलीय अर्थशास्त्रांत मुख्यत्वें करून राज्यकारभार चालविण्याच्या राज्ययंत्राचा विचार केला आहे. त्या राज्ययंत्राचे स्वाभाविकपणें अंतर्गत कारभार आणि परराष्ट्रीय राजकारण असे दोन मुख्य विभाग पडतात. त्यांतल्या अंतर्गत राज्यकारभाराचें विवेचन पूर्वार्धांत पूर्ण झालें आणि या उत्तरार्धांत परराष्ट्रीय राजकारणाचाच बहुतांशीं विचार केलेला आढळून येईल. बहुतांशीं म्हणण्याचें कारण एवढेंच कीं शेवटचें ' तंत्रयुक्ति ' हें प्रकरण केवळ ग्रंथ लेखन पद्धतीचें दर्शक असल्यानें त्याचा अंतर्गत किंवा परराष्ट्रीय कसल्याच राजकारणाशीं संबंध नाहीं; आणि पांचव्या अधिकरणांत जे विषय आले आहेत त्यांचा संबंध मुख्यतः अंतर्गत राजकारणाशींच आहे. एवढा अपवाद सोडून बाकीचा सगळा उत्तरार्ध परराष्ट्राशीं किंवा परराष्ट्रांतील प्रजेशीं राजकारण कसें लढवावें या विषयाच्या विवेचनानेंच भरला आहे.

पांचव्या अधिकरणाला 'योगवृत्त' असें नांव दिलेलें आहे याचा अर्थ 'अधिकाऱ्यांचें वर्तन' असा आहे. अधिकाऱ्यांच्या खासगी वर्तनाचा यांत विचार नसून राजा व राज्यकारभार यासंबंधीं त्यांचें वर्तन कसें असावें व तें तसें नसल्यास त्यांना शिक्षा कशी करावी याचा विचार या प्रकरणांत आहे. धर्मस्थीय व कंटक शोधन या अधिकरणांत खासगी दिवाणी व फौजदारी गुन्हेगारीचा विचार झाला; आतां या अधिकरणांत 'ऑफेन्सेस अगेन्स्ट धी स्टेट' (राजा व राज्य यांच्या विरुद्ध केल्या जाणाऱ्या गुन्हेगारी)चा विचार ग्रथित केला गेला आहे. आणि त्यांतहि मुख्यत्वेंकरून सरकारी कामगार असून जे राजाविरुद्ध फंद फितुरी करूं पाहतील त्यांचा बंदोबस्त कसा करावा याचा विचार सांगितला आहे. ही चौकशी न्यायासनासमोर व्हावयाची नसून केवळ गुप्त हेरांच्या बातमीवरून गुन्हेगारांना दंड केला जावा अशी यांत योजना आहे आणि तो दंडहि थोडा थोडका नसून बहुतेक ठिकाणीं देहदंडच सांगण्यांत आला आहे. हल्लींदेखील ज्या गुन्ह्यांची चौकशी उघड रीतीनें करणें इष्ट वाटत नाहीं त्या गुन्हेगाराकरितां बेंगाल रेग्युलेशन्ससारखे गुप्त चौकशीचे व शिक्षेचे कायदे आहेतच; परंतु त्यांत वधाची शिक्षा सांगितलेली नाहीं आणि कौटलीय अर्थशास्त्रांत वधाचीच शिक्षा बहुतेक सर्वत्र सांगितली आहे हा विशेष फरक होय.

ही गुप्तवधाची पद्धतीहि नुसती क्रौर्याची नसून कपटाचीहि आहे आणि तिचा प्रयोग जसा एखाद्या यःकश्चित् माणसावर करावा तसाच अत्यंत श्रेष्ठ अशा मंत्र्यांवरहि करण्यांत यावा असें सांगितलें आहे! या कपटाचें व क्रौर्याचें वर्णन पुढील ग्रंथांत असल्यानें त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. पण एकंदरींत हा भाग वाचणाऱ्यास उद्वेगजनक वाटतो यांत शंका नाहीं.

खजिन्यांत द्रव्याचा तुटवडा भासूं लागल्यास कोशसंग्रह कसा करावा याविषयीं ज्या युक्त्या सांगिल्या आहेत त्याहि बऱ्याच मासल्याच्या आहेत. परंतु या अध्यायांत कर कोणत्या वस्तूवर किती घ्यावा याविषयींचे नियम तुलना करण्याजोगे आहेत.

ज्याठिकाणचें पीक पावसावर अवलंबून नसेल तेथील धान्याचा तिसरा किंवा चवथा हिस्सा घेणें हें हल्लींच्या बागाइतीच्या जमीन महसुलाच्या मानानें कमीच म्हटलें पाहिजे. प्राप्तीवरील कराचें प्रमाण शेंकडा २ ते २॥ सांगितलें आहे व तें हल्लींच्या दराहून कमीच आहे. नट व वेश्या यांच्यावर मात्र कराची आकारणी जबर म्हणजे ५० टक्के आहे. हे धंदे हलक्या दर्जाचे व अनीतिपोषक म्हणून त्यावर एवढा जबर कर ठेवला असावा,

देवालयाचें किंवा संघाचें गणद्रव्य आपणच चोरावयाची युक्ति यांत दिली आहे! तथापि त्यापेक्षां अधिक मनोरंजक व नित्य अनुभवास येणारी युक्ति वर्गणी जमविण्यासंबंधाची होय. एखाद्या सार्वजनिक आपत्तीची सबब सांगून "दुःखनिवारण-ठेव" (रिलीफ-फंड) सुरू करावा आणि इतरांना ओशाळगत वाटण्यासाठीं आपल्या हस्तकांकडून मोठमोठाले आंकडे घालवावेत, म्हणजे इतरांना आपली मर्यादा व दर्जा राखण्याकरितां त्या मानानें बरीच मोठी रक्कम द्यावी लागते! सर्वांत ज्यास्त वर्गणी देणाऱ्यांना पदव्यांनीं भूषविण्याची पद्धति कौटिल्याच्या वेळेपासून आतांपर्यंत अव्याहत चालत आली असल्यानें त्यांत कोणीच कोणास नांवें ठेवावयास नकोत.

'भृत्य भरणीयं' या प्रकरणांत नोकरशाहीच्या पगाराचें प्रमाण (स्केल) सांगितलें आहे व तें बरेंच सढळ दिसतें. सर्वांत जास्तींत ज्यास्ती वेतन दरमहा ४ हजार पण आहे. त्यावेळच्या स्वस्ताईच्या व साध्या राहणीच्या मानानें पाहतां हा पगार कंजूषपणाचा नसून भरपूर व समाधानकारक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कमींतकमी पगार खेडेगांवांतील किरकोळ कामगार व कारागीर यांना दरमहा २० पण सांगितला आहे तोहि गैरवाजवी म्हणतां येत नाहीं. नोकरी करीत असतां सरकारी नोकर मयत झाल्यास त्याच्या बायकामुलांच्या व वृद्ध आप्तांच्या चरितार्थासाठींहि वेतन दिलें जात असे. त्याचप्रमाणें आजार व प्रसूति या संबंधांतहि आर्थिक सहाय्य देण्यांत येई हें वाचकांनीं नोंदून ठेवण्यासारखें आहे. जमीन सहसा बक्षीस देऊं नये असा कौटल्याचा कटाक्ष दिसतो व तो योग्यच आहे. नोकराची तशी इच्छा असल्यास वेतनाच्या ऐवजीं धान्य देण्यांत येई. या खेरीज विशेष कामगिरीबद्दल जादा भत्ता देण्यांत येत असे. युद्धाच्या वेळीं लष्कराला सरकारी कोठींतून माल पुरविला जाई, त्यामुळें सरकारी मालाची विक्री व नोकरांची सोय असा दुहेरी कार्य भाग साधत असे. हे सगळे सूक्ष्म नियम वाचले म्हणजे त्या वेळची राज्यपद्धति किती सुव्यवस्थित होती तें कळून येतें.

राजासंनिध राहणाऱ्यांची वागणूक आणि प्रसंगानुरूप वर्तन या दोन अध्यायांत दरबारी लोकांच्या वर्तनासंबंधी नियम आहेत. त्यांची दरबारांत वागणाऱ्याकडून आजमितीलाहि हुबेहुब तशीच तालीम उठविली जाते; यावरून हजारों वर्षांनीं देखील मानवी स्वभावांत बिलकुल अंतर पडत नाहीं हेंच सिद्ध होतें. राजाची गैरमर्जी झाल्याचें तर्कानें जाणून आपली सुटका करून घेणाऱ्या दूरदर्शी दरबाऱ्यांच्या कांहीं कथा या अध्यायाच्या शेवटीं दिल्या आहेत. त्यांचा उल्लेख इतर कोठें आढळल्यास त्यावरून कौटल्याच्या कालनिश्चयास अधिक दृढता येईल. पण त्या संबंधीचे ऐतिहासिक उल्लेख कोठें आढळल्याचें माहीत नाहीं.

राजा आजारी पडला, लढाईंत मारला गेला किंवा बंदिवान झाला तर अमात्यानें राजपुत्रास पुढें करून त्याची एकमुखी सत्ता प्रस्थापित करावी असें कौटिल्य म्हणतो. भारद्वाजाचें मत असें कीं, सगळी सत्ता अमात्यानेंच आपल्या हातीं घ्यावी! कौटल्याला हा वाममार्ग मान्य नाहीं. राजपुत्राचा हक्क अमात्यानें बुडवूं नये; उलट त्याचें योग्य संगोपन करून रीजंट या नात्यानें राज्य कारभार चालवावा आणि राजपुत्र स्वतः राज्ययंत्र चालविण्यास लायक झाला म्हणजे सर्व सत्ता त्याच्या स्वाधीन करावी असा कौटल्याचा सल्ला आहे. राजपुत्राच्या हातीं अधिकार आल्यावर त्याला जर जुन्या अमात्याचें दडपण नकोसें वाटावयाला लागेल तर अमात्यानें अरण्यवास पत्करावा व यज्ञयाग करूं लागावें अशी कौटिल्याची सूचना आहे. या ठिकाणीं सगळा राज्य कारभार सवाई माधवरावाच्या हवालीं करून काशीवासार्थ जाण्याची परवानगी मागणाऱ्या नाना फडनविसाचें चित्र इतिहासज्ञांच्या मनश्चक्षूपुढें उभें राहील.

## अधिकरण सहावें—साम्राज्याचें मूळस्थान.

या अधिकरणापासून निव्वळ परराष्ट्रीय राजकारणाच्या विवेचनास सुरवात झाली आहे. पहिल्या अध्यायांत राजा, अमात्य, देश, किल्ला, खजिना, लष्कर आणि मित्र हे साम्राज्य शरीराचें अवयव आहेत असें सांगून त्यांच्या गुणदोषांचें वर्णन आलें आहे. ही सप्तप्रकृतींची कल्पना प्राचीन राजशासन शास्त्रांत सर्वत्र दिसून येते. मनुस्मृति, महाभारत इत्यादि ग्रंथांत तिचा उल्लेख आहे. तथापि ते ग्रंथ केवळ राजकारण विषयक नसल्यामुळें त्यांतील वर्णन त्रोटक आहे. कौटल्यानें याचा विचार अधिक सविस्तर केला आहे. चांगल्या राजाच्या अंगीं कोणते गुण असावे, देश कोणता चांगला, चांगलें लष्कर कोणतें या संबंधाचें कौटल्याचें विवेचन फारच मार्मिक आहे व तें मुळांतूनच समग्र वाचण्याजोगें आहे. शत्रूच्या अंगीं कोणते दुर्गुण असले म्हणजे त्याचा उच्छेद करणें सुकर होतें याचें वर्णन वाचून राजे लोकांनीं त्यापासून अवश्य बोध घ्यावा,

या नंतरच्या ९८ व्या अध्यायांत शांतता राखण्याचें महत्व आणि उत्कर्षापकर्षांची दैवकृत व मनुष्यकृत कारणें यांचा विचार केला असून पुढें विजिगीषु राजाचें लक्षण दिलें आहे. विजगीषु राजाच्या सभोंवार ज्यांचीं राज्यें असतील त्या राजांचे विजिगीषूशीं येणारे स्वाभाविक म्हणजे नित्य आणि प्रसंगप्राप्त म्हणजे नैमित्तिक संबंध लक्षांत घेतल्यास मित्र, शत्रू, मध्यस्थ व उदासीन अशीं चार मंडलें होतात. या प्रत्येक मंडलांत तीन तीन राजे येतात. असे बारा राजे आणि त्यांची पंचविध प्रकृति अशा एकंदर बहात्तर घटकांचा मंडलयोनींत विचार करावा लागतो. यांतील महत्वाच्या घटकांचा विचार कौटल्यानें सात ते तेरा पर्यंतच्या अधिकरणांत केला आहे.

## अधिकरण सातवें—षड्विध धोरण

पूर्वार्धांत जसें दुसरें अधिकरण सर्वांत मोठें व महत्वाचें आहे तसेंच उत्तरार्धांत हें सातवें अधिकरण सर्वांत मोठें व महत्वाचें आहे. यांत राजानें परराजांशीं युद्ध केव्हां करावें, तह केव्हां व कसा करावा, तटस्थपणा केव्हां राखावा, सैन्याच्या हालचाली कशा धोरणानें कराव्या, दोस्ती कोणाशीं करावी आणि एकाशीं शत्रुत्व करून दुसऱ्या एखाद्याशीं त्याच वेळीं मित्रत्व कसें व कां जोडावें या सहा प्रकारच्या परराष्ट्रीय धोरणांचा विचार विस्तरशः केला आहे. हें विवेचन अतिशय क्लिष्ट व भानगडीचें असल्यानें त्याची यथार्थ कल्पना थोडक्याशा सारांशानें येऊं शकणार नाहीं. याकरितां राजकारणी पुरुषांनीं व मुत्सद्द्यांनीं हें विवेचन मूळग्रंथ व त्याचें दिलेलें भाषांतर यांतूनच वाचावें. उत्कर्ष साधणें, अपकर्ष टाळणें आणि किमानपक्ष आहे त्याच स्थितींत राहणें हें प्रत्येक राजाचें साध्य असतें व त्याकरितां त्याला कधीं मैत्री जोडावी लागते तर कधीं ती तोडावी लागते, कधीं दुसऱ्याचा आश्रय घ्यावा लागतो तर कधीं तो झुगारून द्यावा लागतो, कधीं युद्धार्थ सज्ज व्हावें लागतें तर कधीं युद्ध बंद करून तह मान्य करावा लागतो. हे विविध प्रकार कां करावे लागतात व त्यांतलें कोणतें धोरण आपल्याला श्रेयस्कर होईल हें ठरविणें ज्याच्या त्याच्या दृष्टिकोणावर व परिस्थितीवर अवलंबून आहे. तथापि या संबंधानें जीं सर्वसाधारणपणें सर्वांना लागू होतील अशीं सामान्य तत्वें आहेत तीं कौटल्यानें या अधिकरणांत सांगितलीं आहेत. हीं तत्वें सांगत असतां विजयेच्छु राजाचा प्रतिपक्षी अगदींच भोळसट किंबहुना विवेकशून्य आहे असें गृहीत धरलें तरच या उपदेशाचा उपयोग होईल असा एक आक्षेप या विवेचनावर येऊं शकतो. पण असें कांहीं तरी अधिष्ठान स्वीकारल्याखेरीज असल्या विषयांचें विवेचनच होऊं शकत नाहीं हें एक उत्तर त्या आक्षेपास देतां येईल. पण यापेक्षांहि अधिक समर्पक असें दुसरेंहि एक उत्तर आहे. तें असें कीं, इतके भोळसट किंवा विवेकशून्य राजे किंवा अमात्य असतात आणि म्हणूनच राजकारणाच्या आखाड्यांत विचित्र घडामोडी चालल्याचा देखावा आपल्यास हरहमेष पहावयास सांपडतो. एकदां दिलेलें वचन न पाळल्यापासून, प्रजाजनांना छळण्यापासून, परस्त्रीच्या नादीं लागल्यापासून कोणतें अरिष्ट उद्भवतें याची जाणीव असून देखील वचनभ्रष्ट झाल्यामुळें, प्रजेला छळल्यामुळें, किंवा स्त्रियांच्या नादीं लागल्यामुळें राज्यभ्रष्ट झालेले राजे पुनः पुनः पहावयास सांपडतात! यावरून राजे अगर मुत्सद्दी यांनाहि स्वहित देखील साधतां येतेंच असें नाहीं व त्याकरितां त्यांना असल्या सामान्य उपदेशाची देखील अत्यंत आवश्यकता आहे ही गोष्ट सिद्ध होते.

अध्याय १०१ यांत विविध प्रकारच्या संधीचें (तहांचें) जें विवरण करण्यांत आलें आहे तें मंत्र्यांना अवश्य अभ्यसनीय आहे. इतिहासांत निरनिराळ्या राष्ट्रांत किंवा राजांत घडून आलेल्या तहांच्या अटी सविस्तर दिलेल्या असतात. ते तहनामे हातांत घेऊन त्यांतील कोणता तह कौटल्याच्या कोणत्या तहाच्या वर्णनाशीं जुळतो हें इतिहासाच्या अभ्यासकांनीं पाहिल्यास कौटिल्याच्या वर्णनाचें यथार्थत्व व सर्वंकषत्व मनावर बिंबेल आणि इतिहासाचा आपला अभ्यासहि दृढ होईल. ही सूचना नुसत्या तहांच्या नांवा-पुरतीच नसून सगळ्याच षाड्गुण्य विचाराला लागू आहे. आपापल्या आवडीनिवडी प्रमाणें हिंदुस्थानांतील कोणत्यातरी एका काळां-तील ऐतिहासिक राजे आपल्या नजरेसमोर आणून त्यांतला एक राजा विजयेच्छु कल्पून त्याचा सहज शत्रु कोण, सहज मित्र कोण, नैमित्तिक शत्रुमित्र कोण, पार्ष्णिग्राह, आक्रंद व आसार कोण हे निश्चित करून संधिविग्रहासनयानसंश्रयद्वैधीभावादि षाड्गुण्याचा कोणी केव्हां कसकसा अवलंब केला तें पहावें आणि अशारीतीनें प्रत्यक्ष इतिहासांत घडलेल्या गोष्टींचा कौटल्याचा विवेचनाशीं कितपत मेळ बसतो आणि त्याच्या परिणामांत कितपत संगति दिसून येते तें पहावें; म्हणजे कौटलीय अर्थशास्त्रांतील तात्विक विवेचन वाचकाच्या बुद्धीवर अधिक स्पष्टपणें ठसेल आणि कौटल्याच्या सुदूरदर्शी बुद्धिमत्तेचें प्रत्यंतरहि वाचकांस येईल. महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांनीं अशा पद्धतशीर रीतीनें मराठ्यांच्या इतिहासाची चिकित्सा केली तर त्यांच्या

ऐतिहासिक विवेचनाला शास्त्रीय ज्ञानाची जोड मिळून त्यांचे सिद्धान्त निर्दोष होतील व ते वाचकांना पटवून देण्याला त्यांना हें एक उत्तम साधन होईल.

अनेक शत्रूंपैकीं कोणत्या शत्रूवर प्रथम चालून जावें याचा सारासार विचार अध्याय १०३ मध्यें केला असून त्यांतील निर्णयात्मक सिद्धान्त सांगण्यांत आर्य चाणक्याची कुशाग्र बुद्धि आणि व्यवहारचातुर्य दिसून येतें. या प्रकरणांतच **'प्रजाजनांची प्रीति हा राजांचा सर्वोपकारक आधार असतो'** हें राजकारणांतलें अमोलिक तत्व कौटल्यानें प्रथित करून ठेवलें आहे. त्याचप्रमाणें राजाच्या किंवा वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या कोणत्या दोषामुळें प्रजेंत दारिद्य वाढतें, प्रजा कशामुळें लोभी बनते आणि प्रजाजनांत असंतोष कसा फैलावतो याचें अचूक निदान करून कौटल्यानें तें राजे लोकांच्या हितार्थ नमूद करून ठेवलें आहे. तरीपण राजांच्या व अधिकाऱ्यांच्या हातून तिकडे दुर्लक्ष होऊन प्रजेंत असंतोष पसरतो व तेणें करून अधिकाऱ्यांवर त्यांचीं आसनें डळमळण्याचा व राजेलोकांवर पदच्युत होण्याचा प्रसंग येत असलेला दिसून येतोच.

ज्याप्रमाणें कोणत्या शत्रूवर अधीं स्वारी करावी हा विचार ठरविणें महत्वाचें आहे त्याचप्रमाणें कोणत्या राजाशीं आधीं मित्रत्व जोडावें हाहि विचार महत्वाचा असून त्याचाहि उहापोह तितक्याच सूक्ष्मरीतीनें याच अध्यायांत करण्यांत आला आहे.

दोस्ती करावयाचा विचार ठरल्यावर ती कोणत्या अटीवर करावी हा विचार ओघानेंच पुढें येतो व त्याची चर्चा अध्याय १०४ मध्यें केलेली आहे. या दोस्तीकरितांहि तहनामे करावे लागत असल्यानें या अध्यायांत दोस्ताशीं करावयाच्या विविध प्रकारच्या संधींचें विवरण केलें आहे. आपलें बळ वाढविण्याकरितां दुसऱ्याशीं दोस्ती करण्याच्या विचाराबरोबरच आपल्या पक्षांतील जे प्रबळ लोक फुटून जाऊन शत्रूस मिळाले असतील पण कांहीं कारणानें आतां परत येऊं इच्छित असतील त्यांच्याशीं कोणत्या धोरणानें वागावें याची चिकित्साहि याच अध्यायांत करण्यांत आली आहे. आणि ती नुसत्या राजे लोकांसच नव्हे तर व्यवहारांत पुढारीपणानें वागणाऱ्या सर्वच राजकारणी पुरुषांस उपयुक्त वाटण्याजोगी आहे.

यानंतरच्या दोन अध्यायांत एकाशीं सख्य व दुसऱ्याशीं शत्रुत्व अशा दुहेरी धोरणाची आवश्यकता सांगून त्यांत ज्याच्यावर स्वारी करावयाची त्याचे गुणावगुण आणि ज्याच्याशीं दोस्ती करावयाची त्याच्या अंगचे गुणदोष यांचें विवेचन केलेलें आहे. अशा रीतीनें दोस्तांचा एक संघ बनल्यावर त्या संघानें शत्रुसंघावर स्वारी केली असतां विजयेच्छु राजानें शत्रुसंघांतील कोणत्या राजावर चालून जावें, केव्हां कसें चालून जावें आणि मुख्यतः त्यांच्यांतील एखाद्या राजाला फोडून त्याच्याशीं वेगळाच तह कसा करावा याचें विवेचन अध्याय १०७ पासून सुरू झालें आहे आणि अशा रीतीनें तहनामा करून त्या मार्गानें भूमिलाभ, द्रव्यलाभ, दुर्गलाभ कसा करून घ्यावा याचें वर्णन तीनचार अध्यायांत करण्यांत आलें आहे. अध्याय १११ मध्यें विजिगीषु राजा एका शत्रूशीं लढण्यांत गुंतला असतां आपल्या पिछाडीवर कोणी स्वारी करूंनये या विषयीं त्यानें कसा बंदोबस्त करावा याची माहिती दिली आहे. ११२ व्या अध्यायांत दुर्बल राजांनीं आपलें बल वाढविण्याकरितां कोणत्या उपायांची योजना करावी याचा उहापोह असून त्यांत भेदनीतीचा उपयोग कोणावर कशाप्रकारें करावा या विषयीं मार्मिक सूचना केलेल्या आहेत. या प्रकरणाचा विचार करीत असतां विद्यार्थ्यानें अलीकडच्या इतिहासांतून दृष्टान्तवजा उदाहरणें शोधून काढून या विवेचनाला ऐतिहासिक अनुभवाची जोड देणें श्रेयस्कर होईल.

प्रबल राजाशीं शत्रुत्व उद्भवलें असतां आत्मसंरक्षणाकरितां कोणत्याप्रकारच्या राजाचा किंवा कसल्या किल्ल्याचा आश्रय घ्यावा याचा विचार ११३व्या अध्यायांत सांगितलेला असून, हारखाण्याची पाळी आली असतां, जित राजानें अनुकूल संधीची वाट पाहात कसें वागावें या विषयींच्या सूचनाहि याच अध्यायांत सांगितल्या आहेत. अशा प्रकारें जितांचा विचार झाल्यावर जेत्यानें आपला उत्कर्ष होण्यासाठीं कोणत्या राजनीतीचें अवलंबन करावें याचा विचार करण्यांत आला आहे. त्यानंतर ११६ व्या अध्यायांत तहकरणें व तह मोडणें या विषयीं सामान्य विचार सांगण्यांत आले असून त्यांत तहाच्या वेळीं राजपुत्रादिकांना ओलीस ठेवावें लागल्यास कोणत्या राजपुत्रास ओलीस ठेवावें आणि स्वतःच केव्हां ओलीस रहावें याचा तारतम्यानें विचार करण्यांत आला आहे.

याप्रमाणें शत्रु मित्र यांचा विचार झाल्यानंतर मध्यस्थ व उदासीन राजे आणि राजमंडलांतील आक्रंद, आसार इत्यादि अन्य राजे यांच्याशीं विजयेच्छूनें कसें वर्तन करावें याविषयीं प्रसंगानुरूप अनेक प्रकारच्या सूचना चिकित्सक बुद्धीनें करून हें सातवें षाड्गुण्यविचाराचें महत्वाचें अधिकरण संपविण्यांत आलें आहे.

## आठवें अधिकरण—संकटांचा तारतम्यविचार

आठव्या अधिकरणांत राज्यावर येऊन कोसळणाऱ्या विविध संकटांचा तारतम्यानें विचार करून त्यांतलें कोणतें संकट अधिक भयप्रद, कोणतें कमी भयप्रद, कोणत्या संकटाचा प्रतीकार कसा करावा, एकाच वेळीं अनेक बाजूंनीं अनेक संकटें ओढवणार असलीं तर त्यांत कोणत्या संकटास तोंड द्यावें व कोणतें संकट टाळावें इत्यादि अनेक अंगांचा विचार करण्यांत आला आहे. त्यांत प्रथम प्रकृतीच्या सप्तांगांचा विचार असून स्वामी, अमात्य, जनपद, दुर्ग, कोश, दंड आणि मित्र या सप्तांगासंबंधींच्या संकटांचा भयंकरपणाहि याच क्रमानें उतरत्या भाजणी प्रमाणें कमी कमी तापदायक होतो असें सिद्ध करण्यांत आलें आहे.

सार्वजनिक स्वरूपाच्या संकटांचा विचार झाल्यानंतर अध्याय ११९ मध्यें वैयक्तिक दुर्गुणांचा विचार करण्यांत आला आहे. त्यांत प्रथम क्रोधापासून उद्भवणारे त्रिविध दोष व कामापासून उद्भवणारे चतुर्विध दोष यांची तुलना असून क्रोधमूलक दोष अधिक हानिकारक होत असा निर्णय देण्यांत आला आहे. कामापासून उद्भवणारीं जीं मृगया, स्त्री, पान व द्यूत अशीं चार व्यसनें त्यांच्यांत मृगया हें व्यसनच नव्हे असा शेरा मारून इतर तिहींत द्यूत हें व्यसन सर्वांत अतिगर्हणीय होय असें म्हटलें आहे. कौटल्यानें मृगयेपासून जो लाभ होतो असें वर्णिलें आहे त्याचाच अनुवाद कालिदासानें शाकुंतल नाटकांत '**मेद—च्छेदकृशोदरं लघुभवत्युत्थानयोग्यं वपुः**' या श्लोकांत केला आहे. त्या श्लोकांतील जुळती विचारसरणीच कौटिल्याच्या विचारसरणीशीं जुळती अशी आहे असें नसून त्यांतील शब्दयोजनेंतहि साद्दश्य आहे. यावरून व इतरहि अनेक ठिकाणीं दृग्गोचर होणाऱ्या साद्दश्यावरून कालिदासाचे वेळीं कौटलीय अर्थशास्त्राचें अध्ययन-अध्यापन जारीनें प्रचारांत असावें असें स्पष्ट सिद्ध होतें.

असो. वैयक्तिक व्यसनानंतर सार्वजनिक स्वरूपाच्या आधिभौतिक व आधिदैविक संकटांची तुलना करण्यांत आली आहे. त्यांत आगीपेक्षां महापुराचें संकट आणि सांथीच्या रोगापेक्षां दुष्काळाचें संकट अधिक हानिकारक होय असें आपलें मत कौटिल्यानें स्पष्टपणें नमूद केलें आहे. त्याचप्रमाणें देशांतील बंडाळी व परदेशच्या राजाची स्वारी, प्रमुख पुढाऱ्याचा नाश व अनेक क्षुद्रपुरुषांचा नाश, प्रजाजनांतील कलह व राजाराजांतील कलह, राजकन्येचा जुलूम व राजपुत्राचा जुलूम, रानटी लोक व दरोडेखोर इत्यादिकांपासून होणाऱ्या उपद्रवांची तुलना करून त्यांतील पहिलें संकट दुसऱ्या संकटाहून अधिक तापदायक असतें असा अभिप्राय दिला आहे.

१२१ व्या अध्यायांत सैन्यांत दिसून येणाऱ्या दोषांचा आणि सैन्यावर कोसळणाऱ्या अडचणींचा उहापोह सविस्तरपणें करून हें प्रकृतिव्यसनाधिकरण समाप्त केलें आहे.

## नववें अधिकरण—शत्रूवर स्वारी

नवव्या अधिकरणांत सैन्याची उभारणी, सैन्याचें शिक्षण, सैन्याच्या हालचाली, व्यूहरचना, शत्रूवर घालावयाचे गुप्त छापे व उघड चढाई, युद्धाच्या वेळीं सैन्याचें प्रोत्साहन, जखमी सैनिकांची शुश्रूषा, या शुश्रूषेच्या कामीं होणारी स्त्रियांची व वैद्यांची मदत इत्यादि विविध विषयांचा विचार करण्यांत आला आहे. आर्य चाणक्य हा केवळ शास्त्राध्ययन करणारा ब्राह्मण असून प्रसंगवशात् त्याला राजकारणांत पडावें लागलें. असें असतां या ग्रंथांत त्यानें युद्धशास्त्रासंबंधानेंहि विवेचन केलें असून युद्धशास्त्रांतील तज्ज्ञांना व आधुनिक काळच्या रणपंडितांनाहि यांतील विवेचन ग्राह्य वाटेल इतकें तें शास्त्रशुद्ध व सारासारविचारयुक्त आहे हें पाहून कौटिल्याच्या सर्वंकष व विवेचक बुद्धीचें अत्यंत कौतुक वाटतें.

या भागांतील विवेचनांतहि विविध तुलना आहेत व त्या सर्व मार्मिक असून वाचकांना पटण्यासारख्या आहेत. यांत प्रारंभीं बलसंपन्नता व उत्साह यांची तुलना असून पुढें शक्ति, देश व काल यांचा विचार करण्यांत आला आहे आणि मग स्वारीवर निघण्यास योग्य काल कोणता याचें तारतम्य बुद्धीनें विवेचन केलें आहे. या प्रकरणांत कोणत्या ऋतूंत कोणत्या उद्देशानें स्वारीस निघावें याचा जो उहापोह आहे त्यावरून त्या वेळीं उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा कोणकोणत्या महिन्यांत सुरू होत असे तें अंदाजानें ठरवितां येतें व त्यावरून आर्य चाणक्यानें हा ग्रंथ इ. स. पूर्वी तिसऱ्या चौथ्या शतकांतच लिहिला असावा असें अनुमान करतां येतें; कारण अगदीं जवळच्या लढाईस ज्येष्ठ व आषाढ यांच्या दरम्यान निघावें असें त्यांत म्हटलें आहे त्यावरून त्यावेळीं श्रावणाच्या आधीं पावसाळ्यास सुरवात होत नव्हती असें दिसतें.

त्यावेळच्या सैन्यांत पिढीजाद सैन्य, पगारी सैन्य व सरंजामी सैन्य असे तीन मुख्य प्रकार असून त्यांतलें पहिल्या दोन प्रकारचें सैन्य श्रेष्ठ व विश्वासार्ह मानण्यांत येत असे. याखेरीज दोस्ताकडून युद्धापुरती आलेलीं पथकें आणि प्रसंगवशात् शत्रूशीं दोस्ती घडून त्याजकडून आलेलीं पथकें यांचाहि युद्धांत उपयोग केला जाई. त्याशिवाय युरोपांत मध्ययुगीन कालांत जसें रानटी लोकांचें भाडोत्री सैन्य जो कोणी पगार देई त्याच्या बाजूनें लढण्यास तयार असे त्याप्रमाणें चाणक्याच्या वेळींहि आटाविक सैन्य वाटेल त्याच्यावतीनें लढण्यास सज्ज असे. पेशवाईच्या अखेरच्या काळांत पेंढाऱ्यांच्या सैन्याचें जें प्रस्थ माजलें होतें त्या पेंढाऱ्यांच्या सैन्याचा उगम कौटलीय अर्थशास्त्रावरून आर्य चाणक्याच्या काळापर्यंत मागें नेतां येतो. किंबहुना आधुनिक काळच्या पेंढाऱ्यांच्या सैन्याची पूर्वपीठिका भारतीय युद्धांतील संशप्तकादि रानटी लोकांशींहि जोडतां येईल.

त्या वेळच्या सैन्यांत हत्तींना विशेष महत्व होतें आणि युद्धांतील जय हत्तीवर अवलंबून असल्यानें ज्या देशांत हत्तींचीं वनें असतील तो देश सर्वांत बलिष्ठ मानण्यांत येत असे; तथापि घोड्यांचेंहि महत्व आर्य चाणक्याच्या वेळीं सर्वमान्य झालें होतें. गनिमी काव्याच्या युद्धाची पीठिकाहि निदान चाणक्याच्या काळा इतकी तरी जुनी दिसते; कारण या पुस्तकांत युद्धाच्या विविध प्रकारांत गनीमी काव्याच्या युद्धाची महती वर्णन केली आहे. सैन्यांत हत्ती, घोडे, बैल उंट यांच्या बरोबरच गाढवांचाहि उल्लेख आहे. हीं गाढवें म्हणजे खेचरें का शुद्ध गाढवें हें निश्चितपणें ठरवितां येत नाहीं. भारतीय युद्धांतहि घटोत्कचाच्या रथास गाढवें ( खेचरें ) जोडलेलीं होतीं असें वर्णन आहे !

सैन्यानिशीं चाल करून एकीकडे प्रत्यक्ष युद्धाची खणाखणी सुरू असली तरी भेदनीतीचे प्रयोग चालूच असत. म्हणून या युद्धप्रकरणांतहि स्वदेशांतील फितुरांचा नाश व परदेशांतील फितुरांचें वशीकरण कसें करावें या विषयींचे उपाय सांगितले आहेत. त्यांत असल्या फितुरीला आळा बसण्याकरितां फितुर होणाऱ्या लोकांचा आधीं बंदोबस्त करावा कां फितुरी खेळविणाऱ्यांचा आधीं समाचार घ्यावा या विषयींचे चाणक्याचे विचार मननीय आहेत.

अध्याय १२५ मध्यें लाभाचे बारा प्रकार सांगितले असून त्यांतल्या कोणत्या लाभाची केव्हां अपेक्षा करावी किंवा कोणत्या लाभावर केव्हां संतुष्ट राहावें याचा सूक्ष्म विचार राजकीय पुढाऱ्यांना मननीय असा आहे. ज्या प्रमाणें लाभाचा विचार सांगितला आहे त्याचप्रमाणें अनर्थाचा म्हणजे हानीचाहि विचार अध्याय १२८ मध्यें सांगितला आहे. या प्रमाणें लाभ व हानि यांचें वर्गीकरण व त्यांतील तारतम्यभाव सांगितल्यांनंतर लाभ कसा जोडावा आणि अनर्थ कसा टाळावा याविषयीं उपाय योजना सांगून हें नववें 'अभियास्यत' अधिकरण पूर्ण केलें आहे.

## दहावें अधिकरण—युद्धाविषयीं.

दहावें अधिकरण प्रत्यक्ष युद्धासंबंधीचें असून त्यांत छावणी कशी, कोठें असावी, कूच करतांना सैन्याची रचना कशी असावी, लष्कराला लागणाऱ्या धान्यादि वस्तूंचा व हत्यारांचा पुरवठा कसा करावा, शत्रूचें सैन्य थकून गेलें असतां त्यास अकस्मात् गांठून त्याजवर छापा कसा घालावा, युद्धाचे वेळीं राजानें कोठें उभे रहावें, योध्यांना उत्तेजन कसें द्यावें, सैन्याच्या हालचाली संज्ञांना अनुसरून कशा कराव्या, लढाईत चतुरंग सैन्याची कामगिरी कोणकोणती, शिलकी सैन्य किती व कोठें ठेवावें, व्यूहांचे विविध प्रकार आणि त्यांची एकमेकावर तोड, सैन्यांतील अधिकाऱ्यांच्या श्रेणी व त्यांचीं कामें इत्यादि विषयासंबंधीं समग्र आणि साधार माहिती दिली आहे. यांतील विवेचनावरून त्यावेळीं देखील युद्धशास्त्राची आणि युद्धांतील डावपेंचांची किती प्रगति झाली होती तें कळून येतें. त्यावेळच्या युद्धांत वापरल्या जाणाऱ्या हत्यारांची माहिती पूर्वार्धे अध्याय ३९ यांत सांगितली आहे.

## अकरावें अधिकरण—संघांचें वर्तन.

या अधिकरणांत संघा संघांत आणि एकाच संघांतील अनेक व्यक्तींत फूट कशी पाडावी आणि कोणत्याहि संघांत जो कोणी विशेष पराक्रमी असेल त्याचा कांटा कसा काढून टाकावा याविषयींचें विवेचन आहे. व्यक्तिमात्रावर जे जे भेदनीतीचे प्रयोग योजावयाचे त्यांचा तर उपयोग या कामीं होतोच; पण त्याखेरीज संघासंघांत वितुष्ट उत्पन्न करण्याला इतरहि कित्येक कारणें उपयोगी पडतात व त्यांचा उपयोग करण्याविषयीं या अधिकरणांत शिफारस केलेली आहे. उदाहरणार्थ, खालच्या वर्णांतील लोकांना, उच्च वर्णांतील लोक तुम्हाला तुच्छ लेखतात, तुमच्याशीं रोटीबेटी व्यवहार करीत नाहींत, असें म्हणून चिडवून द्यावें; त्याचप्रमाणें उच्च वर्णांतील लोकांना तुम्ही एवढे थोर असून या हलकटांशीं संबंध कसला ठेवतां, असें म्हणून हरभ-

त्याच्या झाडावर चढवावें ! म्हणजे मग त्या संघांत फूट पडते. अशी फूट पडली असतां राजानें नेहमीं कमजोर पक्षाचीच कड घ्यावी असेंहि सांगून ठेवलें आहे ! कौटलीय अर्थशास्त्रांतील हा भाग वाचला आणि सध्याचे ब्राह्मण–ब्राह्मणेतर, स्पृश्य–स्पृश्येतर, ब्राह्मणांतीलच जुन्या मताचे लोक व नव्या मताचे लोक यांच्यांतील फूट पाहिली म्हणजे जणू काय आमच्या सरकारनें कौटिलीय अर्थशास्त्राचें वाचन व अध्ययन करूनच हें राजकीय धोरण निश्चित केलें आहे कीं काय असें वाटूं लागावें इतकें त्या वर्णनांत व प्रस्तुतच्या परिस्थितींत साम्य आहे !

## बारावें अधिकरण—दुर्बलांचें बलसंपन्न होईपर्यंतचें वर्तन

या अधिकरणांत दुर्बलानें बलाढ्यापुढें मान वाकवून आपला बचाव कसा करून घ्यावा आणि नंतर आपलें बल कसें वाढवावें याचा विचार सांगितला आहे. विजयी राजाचे चार प्रकार वर्णिले असून त्यांत जो ज्या कोणत्या देणग्यांनीं वश्य होतो त्या देणग्या त्यास याव्या असें सांगितलें आहे व त्यांतच "ज्या राजाची तृप्ति शत्रूची भूमि, द्रव्य व बायकामुलें लुटल्यानें व जित राजाचा प्राण हरण केल्यानेंच होते त्याला **'असुर विजयी'** असें म्हणून संबोधिलें आहे. अशा प्रकारच्या शत्रूशीं गांठ पडली व सामदामादि उपाय थकले तर दुर्बलराजानें भेदनीति व गुप्तवध यांचा मार्ग अवलंबावा अशा प्रकारच्या कपटनीतीचा उपदेश यापूर्वीहि कांहीं ठिकाणीं आला आहे; पण या प्रकरणांत कपटाचा व क्रौर्यांचा विधिनिषेध मुळींच ठेवलेला दिसत नाहीं, कारस्थानीयुद्ध, लष्करी आधिकाऱ्यांचा वध, जाळपोळ व विषप्रयोग यासंबंधाच्या १३७ ते १४० या चार अध्यायांत जे गुप्तवधाचे मार्ग सांगितले आहेत ते वाचूनच अंगावर शाहारे येतात; परंतु यांतील बहुतेक सर्व प्रयोगांची हल्लींच्या प्रबल मानल्या जाणाऱ्या राष्ट्रांनीं हल्लींच्या कालांत देखील क्षिति बाळगलेली दिसत नाहीं. तथापि असलीं भयंकर कृत्यें करण्याविषयींचा उपदेश ग्रंथांत उघडपणें लिहून ठेवलेला पाहिला म्हणजे उद्वेग वाटतो. याच दृष्टीनें महायुद्धाच्या वेळीं जर्मनीच्या बर्नेहार्डी नांवाच्या एका सेनाधिकाऱ्यानें लिहिलेल्या अशाच एका ग्रंथासंबंधीं दोस्त राष्ट्रांनीं मोठा गवगवा केला. पण जर्मन ग्रंथकारानें ज्या गोष्टी उघडपणें लिहिल्या त्याच मासल्याचीं भयंकर कृत्यें इतर राष्ट्रांच्याहि हेरांकडून घडलीं आहेत व घडत आहेत. मात्र कोणी त्यांचा उघड पुरस्कार करतो तर कोणी त्यांचा प्रयोग स्वतः करीत असून देखील तोंडानें मात्र त्याचा निषेध करीत असतो, इतकाच कायतो फरक !

## आधिकरण तेरावें–दुर्गलंभोपाय

या अधिकरणांत शत्रूचा प्रांत काबीज कसा करावा याविषयींच्या उपायांची चर्चा आहे. तींत अग्रपूजेचा मान **'उपजाप'** म्हणजे शत्रुपक्षांत फाटाफूट करणें या उपायाला देण्यांत आलें आहे. कपटानें शत्रूचें उच्चाटन कसें करावें या संबंधीं १४२ व १४३ या दोन अध्यायांत जे उपाय सांगितले आहेत त्यांत साधु, बैरागी, जटिल, मांत्रिक इत्यादिकांच्या वेषानें करावयाचे कपट प्रयोग सांगितले आहेत. असल्या उघड उघड लबाडीच्या देखाव्यानें शत्रु कसा फसेल, आणि जर तो फसेल तर तो अगदींच वेडसर किंवा मंद बुद्धीचा असावा असें वाटतें. परंतु प्रत्यक्ष इतिहासांतल्या घडामोडी पाहिल्या तर असले कपट-प्रयोग करणारे कावेबाज मांत्रिक जसे जगांत असतात. तसेच त्यांच्या जाळ्यांत सांपडणारे भोळे लोकहि कांहीं कमी नसतात असें वाटूं लागतें इतर दृष्टीनें जगाची उत्क्रान्ति किंवा अवक्रान्ति कशीहि होत असो, मानवी स्वभावांत कांहीं दोन अडीच हजार वर्षांत फारसा फरक पडला असेल असें वाटत नाहीं. अध्याय १४४ मध्यें शत्रूच्या छावणीला किंवा किल्ल्याला घेरा कसा घालावा, वेढा घातलेल्या किल्ल्यांत किंवा छावणींत जाळपोळ कशी करावी आणि प्रत्यक्ष चढाई करून शत्रूची दाणादाण कोणत्या प्रकारें करावी याचें विवेचन आहे. त्यांत शत्रूचा नाश करण्याचीं पौरुषादि अन्य साधनें योजण्याजोगीं असल्यास अग्निप्रयोग करूं नये, कारण त्यापासून निष्कारण घातपात होतो असा इषारा चाणक्यानें दिला आहे तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

या अधिकरणांतला **'लब्धप्रशमनं'** म्हणजे जिंकलेला मुलूख पचनीं कसा पाडावा या संबधाचें विवेचन करणारा अध्याय १४५ हा सर्व मुत्सद्यांना अवश्य अभ्यसनीय असा आहे. आणि आजमितीला देखील ज्यांना साम्राज्य टिकवावयाचें असेल त्यांच्या धोरणांत कौटल्याच्या या उपदेशाची छटा दिसून येते इतका तो उपदेश त्रिकालोपयुक्त असा आहे. उत्तरार्ध पृ. १७९ वर याचें भाषांतर दिलें आहे तें अभ्यासकांनीं समग्रच वाचून पाहावें, कारण त्याचा सारांश सांगण्यानें त्यातलें स्वारस्य जातें. त्यांत पूर्वीच्या राजाची निंदा कशी करावी, स्वतःची बडेजावी कशी वाढवावी, जिंकलेल्या प्रजाजनांना खुष ठेवण्याकरितां त्यांची भाषा, वेष, आचारविचार यांची स्तुति कशी करावी, त्यांच्या उत्सवांत व समारंभांत स्वतः भक्तिपूर्वक भाग कसा घ्यावा, आपल्या पक्षास जे अगोदर येऊन मिळाले असतील त्यांना देणग्या व जहागिरी देऊन कसे खुष ठेवावें, अनाथांनें परिपालन

कसें करावें, जुने अधिकारी काढून टाकून नवे कसे नेमावे, अधिकाऱ्यांच्या वारंवार बदल्या कशा कराव्या इत्यादि अनेक मार्मिक सूचना आहेत. ज्या अधिकाऱ्या विरुद्ध लोकांची ओरड होईल त्याची बदली करावी व त्यास वाईट हवेच्या ठिकाणीं पाठवून द्यावें ही आर्य चाणाक्याची शिकवण इतक्या दीर्घ कालानंतरहि आजकालच्या राज्यकर्त्यांकडून जशाची तशी अमलांत येत असल्याचीं कांहीं उदाहरणें पाहून कौटल्याच्या मुत्सद्दीपणाचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे.

## अधिकरण चौदावें—मंत्रतंत्रप्रयोग

या अधिकरणांत मंत्रतंत्रादि जादूटोण्याचे प्रयोग सांगितले आहेत. त्यांत वनस्पतींचीं व प्राण्यांचीं जीं नांवें आलीं आहेत तीं सर्वच प्रचालित भाषेंत प्रचारांत आहेत असें नाहीं. या कारणामुळें या भागाचें भाषांतर करणें अत्यंत अवघड आहे. कित्येक ठिकाणीं हा शब्द प्राणिवाचक आहे का वनस्पतिवाचक आहे अशी शंका येते. कारण चूर्ण करणें हा शब्दप्रयोग वनस्पती वाचक शब्दालाच सुसंगत असल्यानें जेथें चूर्ण करण्याच्या पदार्थांच्या यादींत एकाद्या प्राण्याचें नांव येतें तेथें त्या नांवाची वनस्पति असावी कीं काय अशी शंका साहजिकच उद्भवते. या खेरीज यांतील बरेचसे प्रयोग अश्रद्धेय असल्यामुळें हें 'औपनिषदिकं' अधिकरण चाणक्यानें लिहिलें नसून प्रक्षिप्त असावें अशीहि कल्पना मनांत येतें. परंतु कांहीं प्रयोग विश्वास न बसण्याजोगे असले तरी इतर' कित्येक प्रयोग महत्वाचे व श्रद्धेय असे दिसतात आणि त्यावरून त्यावेळीं आपल्या देशांत रसायन शास्त्राची व वैद्यकीची प्रगति किती झाली होती तें कळून येण्याजोगें आहे. याकरितां प्रक्षिप्तत्वाची शंका बाजूस सारून याहि अधिकरणाचें भाषांतर देऊन टाकावें असें वाटून भाषांतर दिलें आहे. यांत ज्या वनस्पति वाचक व प्राणिवाचक शब्दांचा अर्थ नीटसा लागला नाहीं ते शब्द जशाचे तसे संस्कृतच ठेऊन दिले आहेत. या जारणमारण विधींत म्हणावयाचे जे मंत्र मूळांत आहेत ते मंत्र जशाचे तसेच म्हटले पाहिजेत यास्तव त्या मंत्राचें मात्र भाषांतर दिलें नाहीं. ज्या वैद्यांना किंवा ज्या रसायनशास्त्रज्ञांना यांतले कांहीं प्रयोग करून पाहावेसे वाटतील त्यांनीं भाषांतरावर न विसंबतां मूळ संस्कृतभागच वांचून पाहावा. तथापि सामान्य वाचकांना या मंत्रतंत्रांत कोण कोणते चमत्कार वर्णिले आहेत त्याची माहिती व्हावी व त्या योगानें त्यांची जिज्ञासा वाढावी एवढ्यासाठीं त्यांतील कांहीं प्रयोगांचा उल्लेख येथें करीत आहे.

आकाशसंचाराचा प्रयोग उघड उघड अश्रद्धेय दिसतो; अदृश्य होण्याचे आठहि प्रयोग त्याच मासल्याचे होत. न विझणारा अग्नि, रात्रीं दिसावयास लागणारें अंजन, झोप आणणारे मोहनास्त्र, दरवाजा आपोआप उघडणारा मंत्र, शत्रूचे धनुष्याची दोरी तोडण्याचा किंवा यंत्र बंद पाडण्याचा तोडगा, पदार्थ कधींहि न संपणें व दुसऱ्याच्या घरचें लोणी किंवा झाडावरचीं फळें आपल्या घरीं येणें. हे हि अशाच अश्रद्धेय कोटींतच घालावे लागणार. त्याचप्रमाणें शत्रूचे डोळे जावे, त्याचें मलमूत्र बंद पडावें, त्याचा वृत्तिच्छेद व्हावा किंवा कुलाचा घात व्हावा इत्यादि प्रकारचे जादूटोण्याचे प्रकारहि त्याच सदरांत येतील. पण या खेरीज निरनिराळीं विषें तयार करण्याचे जे पाठ दिले आहेत ते विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. शत्रुसैन्यांचा नाश करण्याकरितां विषारी धूर तयार करून तो वाऱ्याबरोबर शत्रूवर सोडण्याचा प्रयोग जर्मनयुद्धानंतर तरी कोणीहि अविश्वसनीय मानणार नाहीं. त्याचप्रमाणें निरनिराळे रोग उत्पन्न करणाऱ्या व त्यांचा प्रतीकार करणाऱ्या ज्या औषधी यांत सांगितल्या आहेत त्यांचा अनुभव डॉक्टर व वैद्य यांनीं घेऊन पाहण्यासारखा आहे. एखाद्या इसमावर कृष्णसर्पांची नुसती दृष्टि पडली कीं तो मनुष्य दगावतो असें यांत म्हटलें आहे आणि **महर्षि अण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्रांत कृष्णसर्पांच्या दृष्टीमुळें त्यांच्या जिवावर असें संकट आलें होतें त्याचें वर्णन आहे. त्या दोहोंचा परस्पराशीं बरोबर मेळ बसून दोनहि विधानांची सत्यता एकसमयावच्छेदें करून मनास पटते. एक एक महिना भूक न लागणारे औषधी प्रयोग यांत सांगितले आहेत व ते विश्वसनीय असावेत असें मानून चालण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें गोऱ्या माणसास काळा व काळ्यास गोरा बनविण्याचें प्रयोगहि खरे असावेत. स्कॉटच्या 'टॅलिस्मन नामक कादंबरींत रिचर्डच्या पदरच्या एका गोऱ्या सरदारास सॅलाडिननें अशाच औषधींच्या मिश्रणानें नीग्रोसारखा काळा बनविलें होतें असें वर्णन आहे; त्यावरून असले प्रयोग पूर्वी रूढ असावेत असें वाटतें. वस्तु ज्वालाग्राही बनविणें व अग्नि पेटविणारे अग्नीचे बाण तयार करणें इत्यादि प्रयोग तर अगदींच सामान्य प्रतीचे असल्यानें त्यांत विश्वास न बसण्यासारखें कांहींच नाहीं.

## पंधरावें अधिकरण—विवेचन पद्धति

पंधरावें अधिकरण हें शेवटचें असून यांत प्रस्तुतच्या ग्रंथांत जी विवेचन पद्धति स्वीकारली आहे तिचें सोदाहरण स्पष्टीकरण केलें आहे. अर्थातच हा अध्याय म्हणजे केवळ पारिभाषिक पद्धतींची फोड होय. या पारिभाषिक शब्दांच्या स्पष्टीकरणाचा

उपयोग केवळ या ग्रंथापुरताच होणारा नसून इतर ग्रंथांचा अर्थ करतांना देखील हें स्पष्टीकरण उपयोगी पडण्यासारखें आहे. परंतु तो केवळ तज्ज्ञांचा विषय आहे. त्यांत सामान्य वाचकांना उपयुक्त असा भाग कांहींच नाहीं. तथापि पूर्वीची ग्रंथलेखन पद्धति किती शास्त्रीय स्वरूपाची व कांटेखोर असें तें या प्रकरणावरून दिसून येतें. यांतले पूर्वपक्ष, उत्तरपक्ष, अर्थापत्ति, अतिदेश, व्याख्यान असें कांहीं थोडे पारिभाषिक शब्द बहुतेकांच्या परिचयाचे आहेत. एकंदर ३२ पारिभाषिक शब्द या शेवटच्या अधिकरणांत दिले असून वाङ्मय सेवकांस ते सर्व परिचित असणें जरूर आहे.

## चाणक्यसूत्रें.

कौटलीय अर्थशास्त्राचीं पंधराहि अधिकरणें समाप्त झाल्यानंतर शेवटीं चाणक्यसूत्रें म्हणून एक परिशिष्ट सदर ग्रंथास जोडलेले आहे. हीं चाणक्यसूत्रें कांहीं स्वतः आर्य चाणक्यानें रचलेलीं नसावीं. ज्या अर्थी पंधराव्या अधिकरणाच्या शेवटीं ग्रंथसमाप्तीचा शेरा मारल्यानंतर मग हें परिशिष्ट जोडण्यांत आलें आहे त्याअर्थी हें दुसऱ्या कोणीतरी तयार केलें असावें असें वाटतें. पंधराव्या अधिकरणाच्या शेवटीं ' स्वयमेवविष्णु गुप्तश्चकार सूत्रंच भाष्यंच ' यांत जो सूत्रशब्द आला आहे तो या सूत्रांना लागू शकत नाहीं. गणपती शास्त्री यांच्या संटीक पुस्तकांत हीं सूत्रें दिलेली नाहींत; मग त्यावर टीका नाहीं हें सांगणें नलगे. शामशास्त्री यांनीं संस्कृत प्रतीच्या शेवटीं हीं सूत्रें छापलीं आहेत, परंतु इंग्रजी भाषांतर देतांना सूत्रांचें भाषांतर दिलें नाहीं. लाहोरास प्रसिद्ध झालेल्या हिंदी भाषांतरांत सूत्रांचेंहि भाषांतर दिलें आहे. असो.

हीं सूत्रें स्वतः आर्य चाणक्यानें लिहिलीं नसलीं तरी त्याच्या ग्रंथांतील आधारावरूनच मागाहून तीं कोणी तरी रचलीं असावीं. तीं कोणीहि केव्हांहि रचलीं असलीं तरी त्यांत प्रदर्शित केलेले विचार कौटल्याच्या विचाराशीं जुळत असल्यानें विचार सादृश्यावरून तीं सूत्रें कौटल्याचींच आहेत असें मानून चालण्यास हरकत नाहीं. चाणक्याच्या ग्रंथांत जे विचार इतस्ततः पसरलेले आहेत. तेच विचार एकत्र करून व त्यांना अल्पाक्षरांत बह्वर्थबोध होईल असें स्वरूप देऊन हीं सूत्रें तयार केलीं असल्यानें त्यांत ग्रथित झालेले विचार चाणक्याचेच आहेत यांत शंका नाहीं. एवढेंच नव्हे तर हीं सूत्रें रचतांना शक्यतोंवर अर्थशास्त्रांतील शब्दसरणीहि तशीच कायम ठेवली आहे. तीमुळें प्रत्येक सूत्राचें मूळबीज मूळ ग्रंथांतील कोणत्या भागांत असावें या विषयीं अनुमान बांधतां येतें.

हीं सूत्रांची संख्या ५७१ असून त्यांत अर्थशास्त्रांतील बहुतेक प्रमुख सिद्धान्तांचा थोडक्यांत अनुवाद करण्यांत आला आहे. सूत्रांची भाषा होतां होईल तो चाणक्याच्या भाषेसारखीच ठेवली असून पाल्हाळ अगदीं टाळला आहे. त्यामुळें कित्येक ठिकाणीं या सूत्रांचा अर्थबोध होण्यास प्रयास पडतो आणि कांहीं थोड्या सूत्रांच्या अर्थाविषयीं निश्चित मत देतां येत नाहीं. तथापि एकंदरींत या सूत्रांच्या सहाय्यानें कौटिल्याचें मत कोणत्याहि एखाद्या विषयावर काय आहे तें चटकन थोडक्यांत सांगतां येतें. हीं सूत्रें म्हणीसारखीं वापरतां येण्याजोगीं आहेत आणि मराठीभाषेंतल्या म्हणींची पूर्व पीठिका या चाणक्य सूत्रांपर्यंत मागें नेतां येईल ! अर्थशास्त्रांत ज्या विषयांवर चाणक्यानें आपलें मत प्रकट केलें नाहीं अशा विषयांवर देखील कांहीं सूत्रें यांत सांपडतील. परंतु तसले अपवाद सोडून सामान्यतः विचार केला असतां अर्थशास्त्रांतील विविध सिद्धान्तच या सूत्रांत थोडक्यांत सांगितले आहेत असें मानण्यास हरकत नाहीं.

या सूत्रांतील बरींच सूत्रें विद्यार्थ्यांनीं मुखोद्गत करण्याच्या योग्यतेचीं आहेत. त्या योगानें कोणत्याहि एखाद्या महत्वाच्या मुद्द्यावर चाणक्याचें मत काय तें चटकन थोडक्यांत सांगतां येईल आणि आपल्या लेखांत व भाषणांतहि आधार म्हणून त्या सूत्रांचा म्हणीसारखा उल्लेख करतां येईल. चाणक्याचें सर्वच लिखाण प्रयत्नवादाला पोषक असें असल्यामुळें या सूत्रांतील विचारसरणी कार्यकर्त्यांना प्रोत्साहक अशीच आहे. त्याचप्रमाणें या विचारसरणीस व्यावहारिक अनुभवाची जोड मिळालेली असल्यामुळें त्यांतील बहुतेक वचनें केवळ तत्वदृष्ट्याच नव्हे तर व्यावहारिक दृष्ट्याहि सर्वांस मार्गदर्शक होण्यासारखीं आहेत. याकरितांच या सूत्रांचें मराठींत भाषांतर या पूर्वीच अंमळनेरचे वकील **श्रीयुत चिंचाळकर** यांनीं प्रसिद्ध केलें आहे आणि त्या पुस्तकाचा या सूत्रांचें भाषांतर देतांना मला बराच उपयोग झाला.

या सूत्रांतून स्त्रियांच्या संबंधाचे जे विचार प्रदर्शित केले गेले आहेत ते बरेच अनुदारपणाचे आहेत. त्यावरून तेवढीं सूत्रें तरी चाणक्याच्या कालानंतर बऱ्याच कालावधीनें लिहिलीं असावीं असें अनुमान निघतें. कारण साधारणतः असा नियम सांगतां येईल कीं, स्त्रियांच्या संबंधानें जितका अधिक कठोरपणा किंवा अनुदारपणा अधिक जितका तो ग्रंथ स्मृतीशकाच्या अलीकडचा असला पाहिजे.

# कौटलीय अर्थशास्त्राची थोरवी.

आर्य चाणक्याचें 'अर्थशास्त्र' हा एक ग्रंथ नसून तो एक ग्रंथसंग्रहच आहे असें कित्येक टीकाकारांनीं म्हटलें आहे व तें अगदीं यथार्थ आहे. या एका ग्रंथांत तत्कालीन अशा किती तरी ग्रंथांतल्या ज्ञानाचा समावेश झाला आहे! कौटिलीय अर्थशास्त्रांत ज्याचा समावेश झाला नाहीं असा राजनीतीचा विषय क्वचितच आढळेल. यांत राज्यकारभाराच्या विविध अंगांचा यथाशास्त्र विचार केलेला आहे. आणि अभ्युदय व निःश्रेयस हीं जीं धर्मांचीं दोन अंगें त्या पैकीं ऐहिक अभ्युदयाचा विचार या ग्रंथांत साकल्यानें केला आहे. राजनीतिशास्त्र हें व्यवहारोपयोगी शास्त्र असल्यानें या ग्रंथांत व्यवहाराला प्रधानत्व देऊन '**व्यवहारानुलोमो धर्मः**' म्हणजे धर्म हा व्यवहाराला अनुसरून असला पाहिजे असें म्हटलें आहे. हिंदु लोकांची बुद्धि तत्वज्ञानांत व अध्यात्मविद्येंत कितीहि अकुंठित चालत असली तरी व्याहारिक शास्त्रांत त्याची बुद्धि चालत नाहीं त्यामुळें हिंदी पंडितांनीं व्यवहारोपयोगी शास्त्राकडे प्रारंभापासून दुर्लक्षच केलें आहे असा पाश्चात्यांचा पौरस्त्यावर मोठा आक्षेप आहे. कौटिलीय अर्थशास्त्रानें त्या आक्षेपाचें समूळ निरसन केलें आहे. या ग्रंथांत राजनीतीचा व व्यवहाराचाच अथपासून इती पर्यंत विचार केला आहे. यांतील आरंभींचें वंदन देखील कोणत्याहि देवतेला नसून शुक्र व बृहस्पति या दोन प्राचीन अर्थशास्त्रांच्या प्रणेत्यांनाच उद्देशून चाणक्यानें प्रारंभीं नमन केलें आहे; आणि या समग्र ग्रंथांत राज्यकारभाराच्या विविध अंगांचेंच यथाक्रम वर्णन केलें आहे. सारांश धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांपैकीं '**अर्थ**' या पुरुषार्थाचेंच प्रतिपादन करण्याकरितांच हा ग्रंथ लिहिला गेला आहे आणि म्हणूनच त्यास '**अर्थशास्त्र**' हें नांव अन्वर्थक आहे.

## अर्थशास्त्राची अविच्छिन्न परंपरा.

या अर्थशास्त्राचा कर्ता **आर्य चाणक्य** हा इ. स. पू. ३२५ च्या सुमारास होऊन गेला आणि त्यानें चंद्रगुप्ताच्या अमात्यांच्या उपयोगासाठीं हा ग्रंथ तयार केला हें **रा. हिवरगांवकर** यांच्या प्रस्तावनेंत साधार दर्शविलेंच आहे. पण प्राचीन ग्रंथभांडारांत आर्य चाणक्याचें अर्थशास्त्र हा कांहीं राजनीतिशास्त्रावरचा एकच एक ग्रंथ नसावा. चाणक्याच्या पूर्वी अनेक अर्थशास्त्रकार होऊन गेले आणि "त्यांच्या ग्रंथांचा उपयोग करून त्यावरूनच हा ग्रंथ मी लिहीत आहे" असें स्वतः चाणक्यानेंच म्हटलें आहे. यावरून तत्पूर्वी तरी या शास्त्राची परंपरा अविच्छिन्न चालत आली होती हें सिद्ध आहे. कौटिलीय अर्थशास्त्रांत राजनीतीच्या सर्वच अंगांचा योग्य परामर्श घेतलेला असल्यामुळें आचार–व्यवहार व प्रायश्चित्त अशा त्रिस्कंधात्मक ज्या स्मृती त्या स्मृतींतील व्यवहाराध्यायाचा अर्थशास्त्रांतील कित्येक प्रकरणाशीं विशेष निकट संबंध येतो. त्यामुळें अर्थशास्त्राची प्राचीन परंपरा चाणक्य प्राक्कालीन आणि चाणक्य पश्चात्कालीन स्मृतीशीं निगडित झाली असल्यानें चाणक्याच्या ग्रंथाचा विचार करतांना जुन्या व नव्या स्मृतींतील वचनांचाहि विचार अवश्य केला पाहिजे. अशारीतीनें मागमूस काढीत मागें मागें गेले असतां चाणक्याच्या अर्थशास्त्राची तत्पूर्वकालीन स्मृतींतून उत्क्रान्ति कशी होत आली असावी तें लक्ष्यांत येतें.

विद्यमान स्मृतींत गौतम, वसिष्ठ, नारद व मनु या स्मृति आणि आश्वलायन व बोधायन हीं धर्मसूत्रें चाणक्याच्या आधींची दिसतात. आणि याज्ञवल्क्य, विष्णु, हारीत इत्यादि स्मृति चाणक्याच्या काळाच्या नंतरच्या दिसतात. तेव्हां गौतम–वसिष्ठादि स्मृतींतून चाणक्यानें कोणकोणते भाग घेतले त्यांत कोणता फेरबदल केला आणि पुढें चाणक्याच्या सूत्रांचेंच रूपांतर याज्ञवल्क्यादिकांच्या स्मृतींत कसें झालें हें पाहण्यासारखें आहे.

वादविवादाच्या विषयाचेंच पहिलें उदाहरण घेऊं:–चाणक्यानें व्यवहारांतील विवादाचे १८ प्रकार नारदस्मृतीवरूनच घेतले आहेत असें दिसतें. कारण या उभयतांनीं दिलेला क्रम जवळ जवळ सारखाच आहे. नारदस्मृतींत अशुश्रूषा हा भाग स्वतंत्र आहे पण कौटलीय अर्थशास्त्रांत अशुश्रूषा हें स्वतंत्र प्रकरण मानलेलें नाहीं. एवढा एक भाग वगळला तर बाकीचीं सर्व प्रकरणें नारदस्मृतींत जशीं आढळलीं तशींच चाणक्यानें घेतलीं असें म्हणावयास हरकत नाहीं. मनुस्मृतींतला क्रम थोडासा वेगळा असून त्यांत 'अशुश्रूषा' व 'प्रकीर्णक' हीं प्रकरणें मुळींच नाहींत. त्याऐवजीं 'स्तेयं' व 'स्वामिपालयोः विवादः' हीं दोन प्रकरणें अधिक आहेत. यावरून चाणक्यानें आपल्या वर्गीकरणाला मनुस्मृतीचा आधार न घेतां नारदस्मृतीचा आधार

घेतला असावा असें दिसतें. परंतु षाड्गुण्यविचार, व्यूहांचें भेद, विवाद पद्धति इत्यादि भाग कौटल्यानें मनुस्मृतीवरून घेतलें असावें. मनुस्मृतींतील सातव्या अध्यायांतील विचारांचें प्रतिबिंब चाणक्याच्या अर्थशास्त्रांत उमटलेलें स्पष्ट दिसतें.

चाणक्याच्या कालानंतर कित्येक शतकांनीं याज्ञवल्क्य स्मृति अस्तित्वांत आली. तींत चाणक्याच्या अर्थशास्त्रांतील व्यवहाराविषयींचा भाग बहुतेक जशाचा तसाच आला आहे. अर्थशास्त्रांतील विवेचन याज्ञवल्क्याच्या स्मृतींतील या भागाच्या विवेचनाशीं तंतोतंत जुळतें. यावरून एकतर याज्ञवल्क्यानें चाणक्याच्या ग्रंथाचाच आपल्या स्मृतिग्रंथाला आधार घेतला असावा किंवा मध्यंतरीं इतर कोणत्यातरी स्मृतिकारानें चाणक्याच्या सूत्ररूपी विवेचनाला पद्याचें स्वरूप दिलें असावें आणि याज्ञवल्क्यानें त्या पद्यमय वर्णनाचा स्वतः उपयोग केला असावा. कसेंहि असलें तरी चाणक्याच्या ग्रंथांतील व्यवहारप्रकरणाला याज्ञवक्य स्मृतीनें चिरस्थायी रूप दिलें.

या दृष्टीनें चाणक्याचें अर्थशास्त्र आणि याज्ञवल्क्य स्मृति यांच्यांतील साम्य ताडून पाहण्यासारखें आहे. याज्ञवल्क्य स्मृतींतील वाक्पारुष्य, दण्डपारुष्य, साहस, विक्रीय असंपादन इत्यादि प्रकरणांतील बहुतेक श्लोक कौटिल्याच्या ग्रंथावरून घेतलेले दिसतात. राजाच्या हुकमांत त्याच्या आज्ञेशिवाय कमी अधिक फरक करणें, चोर व जार यांना हातचे सोडून देणें, ब्राह्मण-क्षत्रियादिकांना अभक्ष्य भक्षण करावयास भाग पडणें इत्यादि अपराधांचा विचारहि याज्ञवल्क्य स्मृतींत व चाणक्याच्या अर्थशास्त्रांत एकसारखाच आढळतो. कांहीं ठिकाणीं याज्ञवल्क्यानें पद्यरचनेच्या सोईसाठीं दण्डाच्या रकमेच्या आकड्यांत किंचित् फरक केलेला आहे. उदाहरणार्थ, दासीशीं बलात्कारानें समागम केला असतां कौटिल्यानें द्वादश पण दंड सांगितला आहे पण याज्ञवल्क्यानें त्याच गुन्ह्याला दहा पण दंड सांगितला आहे. अशींच आणखी कांहीं उदाहरणें सांगतां येतील. या सर्व उदाहरणांवरून याज्ञवल्क्याच्या विधानांची संगति अर्थशास्त्राशीं जितपत जुळते तितपत ती मनु किंवा नारद यांच्या विधानांशीं जुळत नाहीं. असें म्हणण्यास हरकत नाहीं. कौटलीय अर्थशास्त्रांत आशुमृतकपरीक्षा नांवाचें प्रकरण सविस्तर दिलें आहे. याज्ञवल्क्यानें तें प्रकरण गाळलें असून त्यांतील महत्वाच्या भागाचा एकाच श्लोकांत संक्षेप केला आहे. तथापि तेवढ्यावरून देखील याज्ञवल्क्याच्या विधानांचें मूळ कौटलीयअर्थशास्त्रांत असावें असें तेव्हांच लक्षांत येतें. कित्येक ठिकाणीं शामशास्त्री यांच्या अर्थशास्त्राच्या प्रतींत दिलेला पाठ चुकीचा असतो. अशा स्थळीं याज्ञवल्क्याच्या तत्समान श्लोकांतील पाठ पाहून त्यावरून शामशास्त्रयाच्या ग्रंथांतील पाठ शुद्ध करतां येतो. उदाहरणार्थ—'श्वपाकस्य भार्यागमने वधः' असा पाठ शामशास्त्री यांच्या पुस्तकांत आहे! याज्ञवल्क्य स्मृतींत 'श्वपाकस्य आर्यागमने वधः' असा पाठ असून तोच शुद्ध आहे. त्याचप्रमाणें 'कूटसुवर्णे व्यवहारिणः' असा जो शामशास्त्री यांच्या पुस्तकांत पाठ आहे त्याच्या जागीं 'कूटव्यवहारिणः' असा पाठ पाहिजे हें याज्ञवल्क्य स्मृतींतील पाठ पाहून ठरवितां येतें.

वरील विवेचनावरून कौटिलीय अर्थशास्त्राचा पूर्वीच्या मन्वादि स्मृतींशीं बीजरूपानें कसा संबंध आहे आणि पुढील याज्ञवल्क्यादि स्मृतींत अर्थशास्त्रांतील व्यवहारपद्धतीचा सररास कसा समावेश केला गेला आहे हें वाचकांच्या निदर्शनास आलेंच असेल. आतां स्मृतिग्रंथांखेरीज अन्यग्रंथांशीं कौटिलीय अर्थशास्त्राचा संबंध कितपत आला आहे तें पाहूं. कौटिल्यानें ज्या चार विद्यांचें अध्ययन अवश्य म्हणून सांगितलें आहे त्या चार विद्यांत वार्ता व दंडनीति या दोन विद्यांचा समावेश आहे आणि याच दोन विद्या मिळून चाणक्याचें अर्थशास्त्र बनलेलें आहे. या अर्थशास्त्रांत वार्ताशास्त्राचा जो भाग आहे त्याचा विशेष उपयोग प्रत्यक्ष राज्यकारभार चालविणाऱ्या मंत्रिवर्गासच होणारा असल्यामुळें त्याचें अध्ययन विशिष्ट वर्गांतच चालू असेल. पण दंडनीतीचा जो भाग अर्थशास्त्रांत आहे त्याचा परिचय प्रत्येक सज्ञान व्यक्तीस असणें, अवश्यक समजलें जात असावें. कारण कायद्याचें उल्लंघन घडलें असतां 'कायद्याच्या अज्ञानाची सबब ऐकली जात नाहीं' हें तत्व सांप्रत जसें रूढ आहे तसेंच तें त्या काळींहि रूढ असेलच. वास्तव कोणत्या कृत्यांचा गुन्हेगारींत समावेश होतो याचें सामान्य ज्ञान व्यवहारांत वागणाऱ्या सर्व माणसांस असावेंच लागतें. आणि त्या दृष्टीनें कौटलीय अर्थशास्त्राचा त्या वेळीं अभ्यास केला जात असेल असें मानण्यास हरकत नाहीं. एवढेंच नव्हे तर इतर शास्त्रांच्या अध्ययनाची जशी परंपरा चालू असते तशीच परंपरा या शास्त्राचीहि चालू असावी असें अनुमान कौटलीय अर्थशास्त्रांतच 'इति मानवाः', 'इति बार्हस्पत्याः' 'इत्याचार्याः' अशा शब्दांनीं पूर्वीच्या प्रचलित मतांचा पूर्वपक्ष म्हणून उल्लेख केला आहे त्यावरून निघतें. श्रीशंकराचार्यांनीं ज्या प्रमाणें आपल्या भाष्यांत पूर्वीच्या सर्व मतांचा उल्लेख करून त्यांचें खंडण केलें त्याचप्रमाणें चाणक्यानेंहि आपल्या पूर्वीच्या शास्त्रकारांचा समाचार

घेतला आहे; आणि त्याचा परिणामहि आचार्यांच्या भाष्याच्या परिणामासारखाच झालेला दिसतो. श्रीशंकराचार्यांचें भाष्य प्रचलित झाल्यापासून पूर्वीचीं भाष्यें जशीं लुप्त झालीं तशींच आर्य चाणक्याचें अर्थशास्त्र पुढें आल्या वेळेपासून जुनीं अर्थशास्त्रांचीं पुस्तकें लुप्त झालीं असावींत. त्यामुळेंच आपल्याला तत्पूर्वीच्या बहुतेक ग्रंथांचा सांप्रत ठाव ठिकाणाहि लागत नाहीं.

सूर्योदय होतांच नक्षत्रांचा जसा लोप होतो तसा कौटिल्याचा ग्रंथ पुढें येतांच जुने अर्थशास्त्रकार मागें पडले हें स्वाभाविक आहे. पण कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतल्या समग्र भागांचें अध्ययन–अध्यापन रूढ झालें असावें कां नाहीं याविषयीं संशयच येतो. कारण कौटिल्याच्या नंतरच्या काळांत अर्थशास्त्रांतील अध्यक्ष प्रचारादि प्रकरणांचा उल्लेखहि कोठें आढळत नाहीं मग त्या ज्ञानाची उत्क्रान्ति किंवा विस्तार होणें तर दूरच राहिलें.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत परातिसंधानासाठीं जे कांहीं कपटप्रयोग सांगितले आहेत त्यांच्याकडे मात्र समाजाचें विशेष लक्ष वेधलें असेल असें दिसतें, कारण त्यासंबंधाचे उल्लेख त्या काळानंतरच्या ग्रंथांतून आढळतात. आणि ही गोष्ट स्वाभाविकहि आहे. उद्योग करून निढळाच्या घामानें द्रव्यप्राप्ति करून घेण्यापेक्षां जुगार, सोडत, सट्टेबाजी असल्या वाममार्गांनीं एकदम एखादें घबाड मिळविण्याच्या नादास जसें अनेक लोक लागतात तसेंच राजकारणांतहि कोणत्या तरी शास्त्रांत प्रावीण्य प्राप्त करून घेऊन प्रख्यात होण्यापेक्षां कपटप्रयोगानें दुसऱ्याचा पाडाव करून आपलें वर्चस्व स्थापित करण्याचीच हाव समाजांत अधिक वावरत राहाणें मनुष्य–स्वभावाला अनुसरूनच आहे. त्यामुळेंच कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतले इतर उपयुक्त भाग बाजूस पडून त्याच्या ग्रंथांतल्या गूढ पुरुष प्रणिधि, दुर्गलंभोपाय, योगवामन, उपजाप, अपसर्पप्रणिधि इत्यादि भागांकडेच जनतेचें अधिक लक्ष वेधलें असेल आणि तसें तें वेधलें असावें असें अनुमान करण्याला आधारहि सांपडतो.

भासकवीचीं नाटकें सूक्ष्मदृष्टीनें परीक्षिलीं असतां त्याच्या नाटकांत कौटलीय अर्थशास्त्रांत नमूद केलेल्या विविध विविध उपायांची बजावणी करण्यांत आल्याचें दिसून येतें. भास कवि, आमच्या मतें, आर्यचाणक्य आणि कालिदास यांच्या दरम्यानच्या काळांत होऊन गेला असावा. तो चाणक्याच्याहि पूर्वीचा असावा असें प्रतिपादन करणारे कांहीं थोडे लेखक आहेत. परंतु भासाच्या नाटकावर कौटिल्याच्या ग्रंथाची केवढी छाप पडली होती तें पुढील उदाहरणावरून पाहिलें म्हणजे या कालानुक्रमाच्या प्रश्नाचा आपोआपच निर्णय होतो.

युद्धाच्या वेळीं सैनिकांना प्रोत्साहन देण्यासाठीं 'नवं शरावं सलिलस्य पूर्णं' इत्यादि श्लोक मंत्री व पुरोहित यांनीं म्हणावेत असें चाणक्यानें आपल्या अर्थशास्त्राच्या १० व्या अधिकरणांत लिहिलें आणि भासानें आपल्या **प्रतिज्ञायौगंधरायण** नाटकांत त्या श्लोकाचा उपयोग करूनहि, दाखविला. अर्थांतच यांत कौटिल्याच्या उपदेशाची अंमलबजावणी झाली असेंच कोणीहि चिकित्सक टीकाकार मानील. परंतु ज्यांना हा श्लोक कौटिल्यानेंच भासाच्या नाटकांतून घेतला असा भास होतो त्यांच्या करितां भासाच्या नाटकांतून आणखी कांहीं उदाहरणें देऊं. अर्थशास्त्राच्या १३ व्या अधिकरणांतील दुसऱ्या अध्यायांत मृगयेचा नाद असलेल्या राजाला कसें पकडावें हें सांगतांना "**हस्तिकामं वा नागवनपालहस्तिना लक्षण्येन प्रलोभयेयुः। प्रतिपन्नं गहनमेकायनंवाऽतिनीय घातयेयुः। बध्वा वाऽपहरेयुः**" अशी कपटयुक्ति सांगितली आहे. आणि **प्रतिज्ञायौगंधरायण** नाटकांत भासानें हुबेहूब त्याच युक्तीचा उपयोग करवून वत्स राजास पकडविलें आहे. येथें भासानें चाणक्याच्या युक्तीचा अवलंब केला असें न मानतां भासाच्या नाटकांतील हा कपटप्रयोग वाचून पाहून मग चाणक्यानें आपल्या अर्थशास्त्रांत त्याचा समावेश केला असें मानणें सयुक्तिक व संमजस ठरेल काय ?

दुसरें उदाहरण भासाच्या **अविमारक** नाटकांतून घेऊं. अविमारक हा रात्रीच्या वेळीं राजवाड्यांत प्रवेश करण्याकरितां तटाच्या भिंतीवरील दगडाला दोराचा सरकफांस अडकवून तो दोर धरून चढतो. तटाच्या भिंतीवर एका कडेनें जे दगड अंतरा अंतरावर रोवलेले असतात त्यास **कपिशीर्षक** म्हणतात. **कपिशीर्षकाचा** उल्लेख कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत **दुर्गविधानं** नामक २४ व्या अध्यायांत आला आहे. आणि हा शब्द सामान्य वाङ्मयांत येणारा नसल्यानें भासकवीनेंच कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून हा शब्द घेतला असावा व कपिशीर्षकावर दोर टाकून चढण्याची कल्पनाहि त्यावरूनच सुचली असावी असें अनुमान निघतें. आणि या अनुमानाचें दृढीकरणहि **अविमारकाच्या** त्याच ठिकाणच्या भाषणावरून होतें. तटावर चढून जाण्याच्या वेळीं सर्व पाहरेकरी गाढ निद्रावश व्हावे याकरितां तो 'बली, वैरोचन, शंबर सर्व सिद्धपुरुष, कात्यायनीदेवी' इत्यादिकांची प्रार्थना करितो. चाणक्याच्या अर्थशास्त्राच्या **१४ व्या** अधिकरणात मंत्रतंत्रांचे जे प्रयोग सांगितले

आहेत त्यांत प्रस्वापनाचा जो मंत्र सांगितला आहे त्यांतहि बली, वैरोचन, शंबर, सिद्धपुरुष इत्यादिकांनाच अभिवादन असून मार्गांतील अडथळे सगळे दूर होवोत असें म्हटलें आहे. या दोहोंची तुलना केली असतां अर्थशास्त्रांतील मंत्रतंत्रांच्या प्रयोगाचीच छाया अविमारक नाटकांतील या भागावर पडली आहे असें स्पष्ट दिसतें.

या खेरीज अविमारक नाटकांतील पहिल्या अंकांत 'सौवीरराजे कोठें नाहींसे झाल्यानें अमात्य सर्व कारभार पाहतात व राजशय्येंत प्रवेश कोणालाहि नाहीं' असें ऐकून तेथें राजा जी कारणचिकित्सा करितो ती अर्थशास्त्रांतील ५ व्या अधिकरणांतील राजव्यसन व अमात्याचें कर्तव्य यांत सांगितलेल्या उपायाशीं तंतोतंत जुळते. तसेंच 'दहा घटिका दिवस आला' असा पाहरेकऱ्याकडून इशारा येतांच स्नानाची वेळ झाली असें भूतिकाचें भाषण हेंहि अर्थशास्त्रांतील राजाच्या दिनचर्येलाच धरून आहे व यावरतीहि भासानें अर्थशास्त्राचा उपयोग केलेला दिसतो. अविमारकाला विद्याधरानें एक अंगठी दिली. ती उजव्याहाताच्या बोटांत घालतांच तो अदृश्य झाला. त्यावेळीं त्याची सावली देखील दिसेनाशी झाली, या वर्णनाचें अर्थशास्त्रांतील 'नष्टच्छायारूपश्चरति' या वर्णनाशीं अत्यंत साम्य आहे. त्याचप्रमाणें अविमारक, प्रतिज्ञा–यौगंधरायण वगैरे नाटकांतील हेरांची योजना व वेषांतर, पंचरात्र व अभिषेक या नाटकांतील सैन्याच्या छावणींतील व्यवस्था, सैनिकांची हजेरी व त्यांच्या पराक्रमाची नोंद इत्यादि अनेक गोष्टी भासाचा चाणक्यकृत अर्थशास्त्राशीं अतिनिकट परिचय दर्शवितात.

भासाच्या नंतर कालिदासाच्या काळाचा विचार करूं. कवि कुलगुरु कालिदासालाहि कौटलीय अर्थशास्त्राचा पूर्ण परिचय होता हें त्याच्या वर्णनांतील शब्द सादृश्यावरून व अर्थसादृश्यावरून सिद्ध होतें. मृगया हें व्यसन नव्हे या विषयींचा 'मेदच्छेदकृशोदरम्' हा शाकुंतलांतील श्लोक प्रसिद्धच आहे. या श्लोकांतील कल्पना कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतून घेतल्यासारखी दिसते. कारण अर्थशास्त्रांत 'श्लेष्मपित्तमेदस्वेदनाशश्चले स्थिरेच काये लक्ष्यपरिचयः कोपभयस्थाने हितेषु च मृगाणां चित्तज्ञानमनित्ययानं चेति' असें जें वाक्य आहे त्यांतील मेदच्छेद, चलस्थिरलक्ष्य, कोपभय, चित्तज्ञान इत्यादि शब्द व त्यांतील कल्पना जशाची तशीच कालिदासाच्या श्लोकांत आढळते. स्वारीवर निघण्यापूर्वी राजानें उपवास करून रथांत शस्त्रें ठेवून शयन करावें असें कौटिल्यानें 'सांग्रामिकम्' या अधिकरणांत सांगितलें आहे. रघुवंशाच्या ५ व्या सर्गांत कालिदासानें याच नियमाचें रघूनें पालन केल्याचें वर्णन दिलें आहे. तपस्वी लोकांच्या कामाचा विचार अग्निशालेंत बसून करावा असें पहिल्या अधिकरणांत 'अग्न्यगारगतः कार्यं पश्येद् वैद्यतपस्विनाम्। पुरोहिताचार्यसखः प्रत्युत्थायाभिवाद्य च॥' या श्लोकांत सांगितलें आहे. शाकुंतल नाटकाच्या पांचव्या अंकांत ऋषिपुत्र भेटीकरतां आले असें कळतांच राजा 'वेत्रवति, अग्निशरणमार्गमादेशय' असें म्हणतो व पुरोहितासहि आपल्याबरोबर घेतो. यांत कौटिल्याच्या ग्रंथांतील नियमाचें अनुसरण स्पष्ट दिसतें. रघुवंशांतील राजांच्या वर्णनांत 'यथापराधदण्डानां' असें जें वर्णन झालें आहे तेंहि अर्थशास्त्रांतील 'यथापराधं दण्डयितव्यः' या चाणक्याच्या वचनाचेंच प्रतिबिंब दिसतें. राजाच्या सभोंवतीं धनुष्यबाण घेणाऱ्या स्त्रिया असतात असें अर्थशास्त्रांत 'आत्मरक्षितकम्' या प्रकरणांत सांगितलें आहे व दुष्यंताचें वर्णनहि याच प्रकरणास अनुसरून शाकुंतलाच्या दुसऱ्या अंकांत केलेलें आहे. अशाच प्रकारचीं आणखी कित्येक सादृश्यें दाखवितां येतील. त्यावरून कालिदासाला अर्थशास्त्राचा पूर्ण परिचय होता हें तर सिद्ध होतेंच; पण कालिदासाच्या काळापर्यंत अर्थशास्त्रांतील नियम आचारविचार पाळले जाण्याइतकी अर्थशास्त्राची मान्यता व प्रतिष्ठा कायम होती हेंहि सिद्ध होतें.

परंतु कालिदासाच्या काळापासूनच अर्थशास्त्राच्या लोकप्रियतेला ओहोटी लागूं लागली असावी व त्याचें अध्ययन मागें पडत चाललें असावें असें अनुमान करण्यास जागा आहे. कालिदासानें शकुंतलेच्या तोंडीं 'परातिसंधानमधीयते यैः विद्येवते सन्तु किलाप्तवाचः' यांत जो अर्थशास्त्राचा उल्लेख आणिला आहे तो त्या शास्त्राला गौरवपर असा नसून निंदाव्यंजकच आहे. अर्थशास्त्राला **परातिसंधानशास्त्र** म्हणजे दुसऱ्याला ठकविण्याचें शास्त्र असें यांत म्हटलें आहे. यांतील परातिसंधान हा शब्द अर्थशास्त्रांतीलच ठकविणें या अर्थी नेहमीं उपयोगांत येणारा शब्द आहे व त्या शब्दावरूनच परातिसंधान हीच विद्या समजून तिचें जे अध्ययन करतात तेच सत्यवादी समजले जावोत असा यांत टोमणा आहे! यावरून कौटल्याच्या अर्थशास्त्रांतील कुटिलनीती विषयीं लोकांत चांगलें मत राहिलें नव्हतें असें सिद्ध होतें. कालिदासानंतर झालेल्या बाणभट्टानेंहि 'किंवा तेषां सांप्रतं येषां पराभिसंधानपरा मन्त्रिणः उपदेष्टारः' असें म्हणून कौटिल्याच्या कुटिल कारस्थानाचा अप्रत्यक्षपणें निषेध केला आहे. यांतील पराभिसंधानपर हें पदहि अर्थशास्त्राला अनुलक्षूनच योजिलेलें आहे. अशा रीतीनें अर्थशास्त्राची योग्यता मागें पडत चालली होती असें

दिसतें. पंचतंत्रांत व दण्डीच्या काव्यांत अर्थशास्त्राचा उल्लेख आढळतो पण तेवढ्या उल्लेखांवरून त्या काळांत त्या शास्त्राचें अध्ययन चालू राहिलें होतें असें म्हणतां येत नाहीं. दंडीच्या नंतरच्या कोणत्याहि महत्त्वाच्या ग्रंथांत कौटिल्याच उल्लेख आढळून येत नाहीं. **विशाखदत्तानें** आपल्या **मुद्राराक्षस** नाटकांत मात्र चाणक्याच्या अर्थशास्त्रांतील कपटप्रयोगाचें हुबेहूब चित्र रेखाटलें. आणि त्यावेळेपासूनच **कौटल्य** या नांवाचा **कौटिल्य** असा अपभ्रंश रूढ झाला असावा. पण मुद्राराक्षस नाटकानें अर्थशास्त्राची परंपरा पुनरुज्जीवित न होतां ती कायमची लुप्त झाली. मराठेशाहींतील प्रसिद्ध मुत्सद्दी रामचंद्रपंत अमात्य आणि बखरकार मल्हार रामराव चिटणीस यांनीं राजनीतिशास्त्रावर छोटेसे निबंध लिहिले आहेत. परंतु त्यांचें बीज कौटिलीय अर्थशास्त्र हें नसून शुक्रनीति किंवा कामंदकीय नीतिसार या ग्रंथांत तें असावें असें वाटतें. अलीकडील काळांत राजनीतिशास्त्रावरील त्याच दोन ग्रंथांतून सामान्य तत्त्वें घेऊन लेखकांनीं आपले ग्रंथ तयार केल्याचीं अनेक उदाहरणें आढळून येतात आणि कामंदकीय नीतिसार ही कौटिलीय अर्थशास्त्राचीच छोटी आवृत्ति असल्यामुळें त्यांतला फरक फारसा कोणास कळून येत नाहीं. त्यामुळें रामचंद्रपंत अमात्य व मल्हार रामराव यांनीं चाणक्याचें अर्थशास्त्र पाहिलें असलें पाहिजे अशी कित्येकांची समजूत झालेली आहे. ती खरी असती तर मग या ग्रंथाचा शोध मद्रास इलाख्यांत लागेपर्यंत वाट पाहावीच लागली नसती.

बाणभट्टाच्या काळापासून चाणक्याचें अर्थशास्त्र लुप्तप्राय होण्याचें कारण काय याचा विचार केला असतां तीन भिन्नभिन्न कारणें संभवतात. अर्थशास्त्रांत वार्ताशास्त्र व दण्डनीति अशा दोन विभागांचा समावेश होत असे हें पूर्वीच सांगितलें आहे. या दोहोंतून वार्ताशास्त्राचें अध्ययन–अध्यापन फारच थोडे दिवस प्रचारांत असेल. दंडनीतीची जरूरी मंत्री अमात्य इत्यादि सर्वांनाच भासत असल्यामुळें तेवढ्या भागाचें अध्ययन दीर्घकालपर्यंत चालू राहिलें असेल. परंतु लोकांच्या व्यवहारांत थारेपालट झाला कीं जुने ग्रंथ मागें पडून नवे पुढें येतात. अर्थातच या वेळेपासून अर्थशास्त्र म्हणजे दुसऱ्याला ठकविण्याची विद्या असा समज रूढ होत चालला व ही निंदाच अर्थ–शास्त्राचा लोप होण्यास कारणीभूत झाली असावी.

चाणक्याचें अर्थशास्त्र मागें पडण्याला दुसरें खरें व पटण्याजोगें कारण याज्ञवल्क्य स्मृतीची लोकप्रियता हें होय. चाणक्याच्या अर्थशास्त्रांतला वार्ताशास्त्राचा महत्वाचा भाग त्यावेळच्या समाजाच्या निष्काळजीपणामुळें आधींच लुप्तप्राय झाला. दुसरा भाग उरला दंडनीतीचा. पण दंडनीतीची बजावणी ज्या ग्रंथावरून करावयाची त्या ग्रंथाची योग्यता समाजास निर्विवादपणें पटली पाहिजे. त्या दृष्टीनें पाहतां याज्ञवल्क्य स्मृति तयार होऊन जनतेपुढें आल्यावेळेपासून स्वाभाविकपणेंच त्या स्मृतिग्रंथाला बहुमान मिळूं लागला व चाणक्याचा ग्रंथ केवळ व्यवहारविषयक असल्यानें त्याच्याविषयीं अनादर वाटूं लागला. त्यांतून चाणक्य हा **व्यवहारानुलोभो धर्मः** असें म्हणून धर्माला गौणत्व देणारा, तर उलटपक्षीं याज्ञवल्क्य हा **धर्मानुलोभो व्यवहारः** असें म्हणून धर्माला अग्रस्थान देणारा. अशाप्रकारें दोन भिन्न ग्रंथ जनतेपुढें असतांना धार्मिक उत्कर्षाच्या परमावधीच्या काळांत चाणक्याचा ग्रंथ मागें पडून याज्ञवल्क्याच्या स्मृतीसारखा ग्रंथ पुढें यावा व तोच सर्वांना आदरणीय वाटावा हें साहजिकच आहे. वास्तविक पाहतां याज्ञवल्क्य स्मृतींत दण्डनीतीचा जेवढा भाग आला आहे तेवढा बहुतकरून चाणक्याच्या अर्थशास्त्रावरूनच घेतलेला आहे. पण अर्थशास्त्रांतील परराष्ट्रीय संबंधाचा भाग गाळून टाकून त्याच्या ऐवजीं याज्ञवल्क्यानें आपल्या स्मृतींत आचार, व्यवहार व प्रायश्चित्त अशा त्रिस्कंधात्मक धर्मशास्त्राचा समावेश केलेला पाहतांच त्याच्या ग्रंथावर सर्वांच्या उड्या पडाव्या, त्यावर मिताक्षरासारख्या विद्वत्वप्रचुर अशा टीका व्हाव्या, हें ओघानेंच प्राप्त झालें. आणि त्यामुळें चाणक्याचा ग्रंथ जो एकदां दृष्टीआड झाला तो अगदीं अलीकडे उजेडांत येत आहे.

अशा रीतीनें पुनरुज्जीवित होऊन पुढें आलेल्या या अपूर्वग्रंथाचें सांप्रतच्या काळांत विशेष महत्व हें कीं, त्यांत प्राचीन काळची राज्यपद्धति सांगोपांग दिली असल्यानें हिंदीलोक स्वराज्य चालवूं शकतात कां नाहीं हा प्रश्न भूतकालापुरता तरी निर्विवादपणें सुटतो. वेदान्त व अध्यात्मशास्त्र यांच्या शिवाय अन्यत्र हिंदी पंडितांच्या बुद्धीची मजल जात नाहीं हा आक्षेप या अर्थशास्त्रानें सपशेल खोडून काढला आहे. या ग्रंथांत केवळ व्यावहारिक ज्ञान भरगच्च भरलें आहे. किती भात करावयास किती सर्पण लागतें असल्या अगदीं क्षुल्लक विषयापासून तो राष्ट्रावरील भयंकर आपत्तींत राष्ट्राला तरणोपाय कोणता व तो कसा अमलांत आणावा असल्या गहन प्रश्नापर्यंतच्या सर्व विषयांचें अर्थशास्त्रांत विवरण आहे. त्यांतील कांहीं ठळक ठळक गोष्टी घेऊन त्यांची हल्लींच्या राज्यपद्धतीशीं तुलना करून कौटलीय अर्थशास्त्रांत नमूद केलेली राज्यपद्धति किती परिणतावस्थेस पोंचली होती तें पाहूं.

## चातुर्वर्ण्यव्यवस्था

चाणक्याच्या वेळीं चातुर्वर्ण्यव्यवस्था भारतवर्षांत रूढ झालेली होती. ही वर्णव्यवस्था चाणक्याच्या आधीं किती शतकें सुरू झाली हें ठरविण्याचें हें स्थळ नव्हे. पण चाणक्यकालापूर्वी बरींच शतकें तीं अस्तित्वांत असल्यामुळें आपल्या समाजाचीं चातुर्वर्ण्य ही सहजस्थिति किंबहुना ती प्रकृतीच होय आणि चातुर्वर्ण्याचा विघाड करणें म्हणजे समाजांत विकृति उत्पन्नकरणें होय असें समजून व ती गोष्ट मान्य करूनच चाणक्यानें आपले सर्व सिद्धान्त तदनुरोधानें बसविले आहेत हें उघड आहे. ' एषत्रयीधर्मश्चतुर्णां वर्णानामाश्रमाणांच स्वधर्मस्थापनादौपकारिकः ' असें म्हणून प्रत्येक वर्णाचीं व आश्रमाचीं कर्तव्यें चाणक्यानें दिलीं आहेत; आणि हें धर्मपालन न केल्यास संकर होऊन समाजाचा नाश होईल यास्तव राजानें प्रत्येकाला आपापला धर्म पाळायाला लावावें, कोणालाहि धर्म सोडण्यास लावूं नये, असें चाणक्यानें बजावलें आहे. दंडनीतीचा उपयोग सांगतांना 'चतुर्वर्णाश्रमो लोको राजा दण्डेन पालितः। स्वधर्मकर्माभिरतो वर्तते स्वेषु वर्त्मसु ' असें म्हणून दंडाच्याच जोरावर वर्णाश्रमधर्म पाळला जातो असें सांगितलें आहे. चौदाव्या अधिकरणाच्या प्रारंभीं मंत्रतंत्रादि प्रयोगांचा उपयोग ' चातुर्वर्ण्यरक्षार्थं अधर्मिष्ठेषु प्रयुंजीत ' अशा शब्दांत सांगितलें आहे. समाज म्हणजेच चातुर्वर्ण्य असें या दोनहि शब्दांचें समानत्व त्या ठिकाणीं मानलें असल्याचें दिसून येतें.

जरी चारवर्ण व चार आश्रम ही समाजाची नैसर्गिक स्थिति मानली गेली तरी त्यावेळीं अनुलोम विवाह मान्य केले जात असत. तथापि हलक्या वर्णाच्या स्त्रीची संततिहि हलकीच मानली जात असे आणि त्या संततीस दायविभागांत हिस्साहि कमी मिळत असे. प्रतिलोम विवाहाचा तर सर्वस्वी निषेधच केला जात असे. मिश्रविवाहापासून झालेल्या विविध प्रकारच्या संततीचीं कांहीं नांवें चाणक्यानें दिलीं आहेत. मनुस्मृतींत व याज्ञवल्क्यादि स्मृतींतहि मिश्रविवाहाच्या संततीचीं नांवें दिलीं आहेत; त्यांत जशीं अनुलोम विवाहाच्या संततीचीं तशींच प्रतिलोम विवाहापासून झालेल्या संततीचींहि नांवें दिलीं आहेत. पण तेवढ्यावरून त्याकाळीं मिश्र विवाह मान्य किंवा निदान रूढ तरी असतील असें म्हणतां येत नाहीं. समाजांत ज्या जाति अस्तित्वांत आहेत व ज्यांची उत्पत्ति शक्य कोटींतली आहे त्यांच्या संबंधाची कांहीं तरी व्यवस्था समाज व्यवस्थेंत करावीच लागते आणि शास्त्रकारांना तर आपला ग्रंथ सर्वोपयोगी व्हावा व त्यांत अनुक्त असें कोणतेंहि शंकास्थान राहूं नये असें वाटत असल्यानें शास्त्रकार शक्य व संभवनीय अशा सर्व गोष्टींचा विचार आपल्या ग्रंथांत लिहून ठेवतात. पण तेवढ्यावरून त्याकाळीं ती रूढि सरास चालू होती असें मानतां येत नाहीं. चाणक्यानें नियोगविधीचा उल्लेख केला आहे व त्याविषयीं नापसंतीहि दर्शविली नाहीं. याज्ञवल्क्यानेंहि नियोगविधीचा उल्लेख केला आहे पण त्या बरोबरच त्याचें हीनत्व दर्शविलें आहे. यावरून या उभयतांच्याहि ग्रंथांत नियोग पद्धतीचा उल्लेख असला तरी दरम्यानच्या काळांत ती रूढि नाहींशी होत चालली होती असें दिसतें. ह्याच विचार विवाहाच्या आठ प्रकारासहि लागू आहे. चाणक्याच्या ग्रंथांत आठहि प्रकारच्या विवाहांचीं नांवें दिली असलीं तरी पहिले चार प्रकारचे विवाह धर्म्य होत व बाकीचे चार धर्म्य या सदरांत येत नाहींत असा स्पष्ट फरक त्या वेळींच पडला होता. पुत्रांचे जे बारा प्रकार सांगितले आहेत त्यालाहि ह्याच विचार लागू आहे. जुना इतिहास म्हणून पुत्रांचे बारा प्रकार नमूद केले असले तरी त्यांतले बहुतेक प्रकार त्यावेळीं देखील ग्रंथाच्या बाहेर क्वचितच अस्तित्वांत असतील. या संबंधांत एक महत्वाचा फरक मात्र लक्षांत ठेवण्या जोगा आहे. पूर्वीच्या ग्रंथांतून दत्तक पुत्राला महत्व अगदींच नव्हतें, दत्तक पुत्र अगदींच गौण मानण्यांत येत असे. परंतु पुढें याज्ञवल्क्याच्या काळापासून औरस पुत्राच्या खालोखालची पदवी दत्तक पुत्रानें पटकावली. एवढेंच नव्हे, तर हल्लीं तर औरसेतर सर्व पुत्रांचा लोप होऊन दत्तक पुत्रानें त्या सर्वांची जागा भरून काढली आहे.

असो. सामाजिक चालीरीतींची ही उत्क्रान्ति मनोरंजक व अभ्यसनीय आहे. परंतु प्रस्तुत एवढेंच सांगावयाचें कीं, चाणक्याच्या काळीं चातुर्वर्ण्य संस्था पक्की रूढ झाली होती. सवर्ण विवाहाखेरीज इतर विवाह गौण मानले जात. पहिले चार विवाहच धार्मिक दृष्टीनें ग्राह्य मानीत. बाकीच्या चार प्रकारचे विवाह तसे धर्म्य नसल्यानें त्यांत घटस्फोटासहि संमति मिळत होती अर्थातच ते विवाह कराराहून अधिक योग्यतेचे मानले जात नसत. पुनर्विवाहाला हल्लींच्या सारखी बंदी नसून बरीच सवलत होती. तथापि विवाहविधीनें एका घराण्यांत स्त्रीचा समावेश झाल्यावर तिनें आपल्या घराण्यांतून अन्य घराण्यांत जाऊं नये याकरितां पुनर्विवाह करावयाचा झाला तर तो दिराशींच करावा, निदान त्या गोत्रांतीलच अन्य पुरुषाशीं विवाह करावा, असा निर्बंध रूढ होऊं लागला होता हें चाणक्याच्याच ग्रंथावरून सिद्ध होतें.

## चाणक्यकालीन राज्यव्यवस्था

भारतवर्षांत राज्याधिकाराची व राजाची कल्पना कशी उत्क्रांत झाली याचा विचार **रा. हिवरगांवकर** यांच्या प्रस्तावनेंत आलाच आहे. पौर्वात्य राष्ट्रांतून राज्यपद्धति नेहमीं अनियंत्रितच असते ही कल्पना चुकीची असून ऋग्वेदकालापासून लोकसभांचें अस्तित्व आणि त्यांचें राजावर नियंत्रण असल्याचा पुरावा सांपडतो. एवढेंच नव्हे तर समितीकडून राजाची निवड होत असे, न्ययदानाचें काम लोकसभेकडेच असे, कांहीं राज्यांत राजे मुळींच नसून तेथील राज्यकारभार राज्यांतील श्रेष्ठ लोकांच्या किंवा संघांच्या स्वाधीन असे आणि जुलमी राजांना लोक पदच्युत करीत असत अशाविषयीं पुष्कळ पुरावा सांपडतो. विदेहांचें राज्य प्रथम राजसत्ताक होतें परंतु पुढें तें लोकशाहीचें संयुक्त राष्ट्र झालें. सिंधु नदीच्या मुखाजवळील पाटल नगराची राज्यघटना ग्रीसमधील नगरराष्ट्रासारखी होती असें ग्रीक ग्रंथकारांनींच लिहून ठेविलें आहे. एकट्या राजाची सत्ता चालण्यापेक्षां संघाची सत्ता चालणें चांगलें, कारण **'लोकसंघ हा दुर्जय व चिरस्थायी'** असतो असा अभिप्राय चाणक्यानेंच नमूद करून ठेवला आहे.

इ. स. पूर्वीच्या ४ थ्या शतकापर्यंत इकडील राज्यें छोट्या आकाराचीं असत. पण त्यावेळेपासून मोठमोठालीं साम्राज्यें स्थापन होऊं लागलीं. मौर्यांचें साम्राज्य हें या नव्या कल्पनेचेंच एक उदाहरण होय. चंद्रगुप्ताच्या वेळीं या साम्राज्याचा विस्तार उत्तर हिंदुस्तानांत बराच झाला होता. तथापि अशोकाच्या वेळीं त्याची जी सत्ता पसरली त्यामानानें चंद्रगुप्ताचा राज्यविस्तार अगदींच लहान म्हणावा लागेल. त्यामुळेंच चाणक्यानें आपल्या अर्थशास्त्रांत ज्या राज्यपद्धतीचें वणन केलें आहे ती राज्यपद्धति साम्राज्याच्या विस्ताराला जुळणारी अशी नसून छोट्या राष्ट्रांच्या समूहाला जुळण्यासारखी आहे. तथापि राज्य छोटें का मोठें हा प्रश्न परराष्ट्रीय धोरणांत विशेष विचारांत घ्यावा लागत असला तरी अंतर्गत राज्यकारभाराचा जो विचार करावयाचा तो छोट्या व मोठ्या राष्ट्रांत साधारणतः सारखाच होतो. आणि आपल्याला चाणक्याच्या वेळची अंतर्गत राज्यपद्धति कशा स्वरूपाची होती याचाच मुख्यतः विचार करावयाचा असल्यामुळें कौटिल्याच्या वेळीं मोठीं साम्राज्यें अस्तित्वांत होतीं कीं नाहीं या उहापोहाचें आम्हांस तूर्त प्रयोजन नाहीं.

कौटिल्यानें अर्थशास्त्रांत वर्णिलेली राजपद्धति तत्वाच्याच दृष्टीनें पाहूं गेल्यास अनियंत्रित पद्धतीची दिसते. तथापि राजाला अमात्य व मंत्री यांचा सल्ला घेतल्याखेरीज केवळ स्वेच्छेनें कांहीं करतां येत नसे आणि न्यायदानाचे बाबतींत तर त्याला मंत्रिपरिषदेचें मत अवश्य घ्यावें लागत असे. शिवाय 'प्रजेचें सुख तेंच राजाचें सुख आणि प्रजेचा संतोष हीच राज्याची बळकटी' हें तत्त्व त्या काळींहि प्रचलित असल्यामुळें राजाचा कारभार अगदींच अनियंत्रित चालत नसे. राज्यावर संकट आलें आणि लढाई उपस्थित झाली तर राजाला सैनिकांपुढें असें सांगावें लागे कीं " मी तुमच्यासारखाच पगारी नोकर आहें या राज्यावर तुमचा व माझा सारखाच हक्क आहे." अर्थातच् राजाला लोकांच्या इच्छेविरुद्ध सतत चालणें त्यावेळींहि शक्य नव्हतें. बाह्य कोपापेक्षां अभ्यन्तर कोप अधिक भयंकर असें कौटिल्य वारंवार सांगतो व त्याचा अनुभव त्यावेळच्या राजांना येत असावा. त्यामुळें राजाच्या अनियंत्रित सत्तेस आपोआपच आळा बसत असे.

कौटिल्याच्या वेळीं प्रत्यक्ष राज्यकारभार कसा चालत असे याविषयींचें अनुमान अर्थशास्त्रावरून काढतां येतें. अमात्य, मंत्री, पुरोहित, सेनापति इ. वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या नेमणुकी राजाकडूनच होत असत. या नेमणुकी आनुवंशिक नसून गुणांवर अवलंबून होत्या आणि या अधिकाऱ्यांना कामाबद्दल कायमची जमीन इनाम नसून रोख पगार मिळत असे. मंत्री, पुरोहित, सेनापति वगैरेंना दरमहा ४००० पण पगार असे आणि फडणीस, खजिनदार वगैरेंना दरमहा २००० पण पगार असे. यावरून त्यावेळच्या पगाराची व बजेटाची कांहींशी कल्पना येईल.

नोकरांची नेमणूक गुणांची कसोटी पाहून त्यावरून कशी केली जात असे; आणि त्यांना त्या त्या खात्याच्या माहितीचें शिक्षण कसें दिलें जात असे याविषयीं उल्लेख कोठेंच नाहीं. चाणक्यानें इतर अनेक क्षुल्लक गोष्टींचा तपशील दिला आहे परंतु शिक्षण व्यवस्थेसंबंधीं त्याच्या या सबंध ग्रंथांत कोठेंहि उल्लेख आढळत नाहीं !

नोकरांच्या नेमणुका व बदल्या कोणी कराव्या, कोणत्या नोकरांच्या बदल्या वारंवार करूं नये, सरकारी कामगार नोकरी करीत असतां मेल्यास त्याच्या कुटुंबाच्या चरितार्थासाठीं काय तजवीज करावी, कोणी नोकर आजारी पडल्यास अथवा स्त्री-

नाकर प्रसूत झाल्यास द्रव्यद्वारा मदत किती द्यावी याविषयींचे नियम चाणक्यानें 'भृत्यभरणीयम्' या अधिकरणांत दिले आहेत आणि त्यावरून त्या वेळच्या राज्यांतील नोकरशाहीची कल्पना करतां येते. प्रजेची कागाळी एखाद्या अधिकाऱ्या विरुद्ध कानीं आल्यास त्याची बदली वाईट हवेच्या ठिकाणीं करावी ही सूचना हल्लींच्या सरकारनें विचार करण्या जोगी आहे. राज्यांतील मुल्की राज्यकारभाराकरितां निरनिराळीं खातीं पाडलेलीं असत आणि त्यांतील प्रत्येक खात्यावर योग्य अधिकारी नेमून त्याच्या मार्फत त्या खात्याचा सर्व कारभार चालत असे. या खात्यांचा व त्यावरील अधिकाऱ्यांचा कामाचा तपशील दुसऱ्या अधिकरणांत **अध्यक्षप्रचार** या सदराखालीं दिला आहे; त्यावरून इतक्या प्राचीन काळीहि राज्ययंत्राची ही घडी हल्लीं सारखीच बसलेली होती असें दिसून येईल.

सरकारी नोकर सरकारी पैशाची अफरातफर करितात व प्रजेकडून लांच खातात या दोन्हीहि गुन्ह्यांची चाणक्याला पूर्ण जाणीव होती. पण त्यावर कांहीं इलाज चालू शकत नाहीं या विचारानें तो देखील हताश झालेला दिसतो! सरकारी वसूल जमा झाला असतां त्याची अफरातफर करण्याकरितां खोटा जमाखर्च किती प्रकारांनीं करितात त्याचें चाणक्यानें मोठें मार्मिक व चटकदार वर्णन दिलें आहे. लांच खाणाऱ्याविषयीं तर तो असें म्हणतो कीं, पाण्यांतले मासे पाणी केव्हां पितात हें शोधून काढणें एकवेळ सोपें असेल, पण लांचखाऊ मनुष्य लांच केव्हां कसा खातो तें शोधून काढणें कठिण आहे! यावर अर्थातच गुप्त हेर ही एकच मात्रा चालण्याजोगी असल्यानें तिचाच उपयोग करावा आणि हा लांचलुचपतीचा प्रकार बंद करावा असें त्यानें सांगितलें आहे. पण मनुष्यस्वभाव येथून तेथून सारखाच आणि स्वभावाला औषध नाहीं हें निर्विवाद असल्यानें गुप्त हेर हा तरी आपलें काम प्रामाणिकपणानें करील अशी खात्री कोण देऊं शकेल?

## राज्याचा महसूल.

नोकरांच्या रजेसंबंधाचे किंवा पेन्शनीसंबंधाचे नियम यांत आढळत नाहींत. परंतु इतक्या बारीक तपशिलाची अपेक्षा करणें हें वाजवी होणार नाहीं. नोकरशाही व तिचें नियंत्रण याच्या विचारानंतर राज्याच्या वसुलीचा विचार साहजिकपणें पुढें येतो. पण कौटलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ कांहीं **ऐने अकबरी** सारखा विशिष्ट राजाच्या कारभाराच्या माहितीचा ग्रंथ नसून राजशासनपद्धतीच्या तत्वांचा उहापोह करणारा तो ग्रंथ आहे. यामुळें चंद्रगुप्ताच्या राज्याचा एकंदर वसूल किती होता, कोणत्या खात्यांत उत्पन्न किती येत असे व कोणत्या खात्याकडे किती खर्च पडत असे याचा आकडेवार तपशील या ग्रंथांत दिलेला नाहीं. यामुळें त्याचा कांहींच अंदाज करतां येत नाहीं. तथापि राज्याच्या वसुलाचे मार्ग कोणते होते तेवढें या ग्रंथावरून सांगतां येईल.

उत्पन्नाची पहिली बाब शेतसारा ही होय. लागवडीस येणाऱ्या सर्व जमिनीवर उत्पन्नाच्या मानानें $\frac{१}{६}$ पासून $\frac{१}{४}$ पर्यंत वसूल घेण्यांत येत असे. कालव्याचें पाणी दिलें किंवा पाण्याची दुसरी कांहीं तरी सोय केली तर वसुलीचा हिस्सा $\frac{१}{३}$ पर्यंतहि घेतला जात असे. हा वसूल अर्धारोखीच्या रूपानें व अर्धा मालाच्या रूपानें घेतला जात असल्यामुळें अवर्षणामुळें पीक कमी अधिक आल्यास त्याचा नफातोटा सरकार व रयत या उभयतांतहि विभागला जात असे. यामुळें सारा वसुलीच्या जुलमास किंवा असह्य भारास आपोआपच आळा बसत असे. उत्पन्न येवो वा न येवो, नफा होवो वा न होवो सरकारी कर हा भरलाच पाहिजे असा प्रकार त्यावेळीं नसे.

वसुलाची दुसरी बाब मालावरील जकात ही होय. आपल्या राज्यांतून परराज्यांत जाणारा माल आणि परराज्यांतून आपल्या राज्यांत येणारा माल या दोहोंवरहि जकात घेतली जात असे या जकातीचे दर हल्लींसारखे वर्षानुवर्षे निश्चित केलेले नसून वारंवार बदलत असत आणि व्यापाऱ्यांचें नुकसान न होईल आणि मालाची आयात निर्गत बंद न होईल अशा बेतानें कर वसूल केला जात असे. यामुळें संरक्षित व्यापार का मुक्तद्वार व्यापार असला वाद उत्पन्नच होत नसे. व्यापाऱ्यांनीं कट करून मालाची महागाई करूं नये याविषयीं जशी दक्षता बाळगण्यांत येत असे त्याप्रमाणेंच अतिशय दूरच्या देशांतून किंवा अतोनात खर्च करून आणिलेल्या मालास उत्तेजन मिळावें म्हणून त्यास जकातीची पूर्ण माफीहि मिळत नसे. सारांश, त्या वेळची जकात पद्धति हल्लींच्यासारखी निष्ठुर यंत्रासारखी बनलेली नसून तिच्यांत लवचिकपणा राखण्यांत येत असे आणि जकातीपासून कोणाचेंहि नुकसान होऊं नये अशी खबरदारी घेतली जात असे. मिठासारख्या आवश्यक पदार्थांवरहि कर त्यावेळीं घेतला जाई, पण स्वतःच्या कुटुंबाच्या जरूरी पुरतें मीठ कोणीहि तयार केल्यास त्याला जकातीची माफी असे, उपनयनादि अवश्य संस्कार आणि यज्ञयागादि सार्वजनिक उत्सव

आणि राजाला द्यावयाची देणगी इत्यादि कार्यांकरितां आणलेल्या कोणत्याहि मालावर जकात घेतली जात नसे. ही सवलत अर्थातच मोठी महत्त्वाची आहे. तथापि जे कोणी जकात चुकविण्याविषयीं प्रयत्न करतील व तावडींत सांपडतील त्यांच्याकडून त्या लबाडीबद्दल भरपूर दंड घेण्यांत येत असे. ज्या मालावर किंमतीच्या प्रमाणांत जकात आकारावयाची असेल त्या मालाची किंमत व्यापाऱ्यानें मुद्दाम कमी सांगितल्यास तेवढी किंमत देऊन सगळा माल सरकारच्या ताब्यांत घेण्याची हल्लींच्या कस्टम-खात्याची पद्धतीहि त्यावेळीं अंमलांत असे, त्यामुळें मालाची किंमत कमी दाखवून जकात चुकविण्यास व्यापारी धजत नसत.

शेतीची सारावसुली आणि आयातनिर्गत जकातींचें उत्पन्न यांखेरीज खनिज द्रव्यांच्या खाणी हा एक सरकारी उत्पन्नाचा मोठा झरा असे. सगळ्या खाणी सरकारी मालकीच्या असून त्यांतून खनिज द्रव्यें बाहेर काढण्याचें व विकण्याचें काम स्वतः सरकार करीत असे. म्हणूनच ज्या खाणींतल्या मालाला गिऱ्हाईक भरपूर असतें त्या खाणी चांगल्या असा चाणक्यानें अभिप्राय दिला आहे. जंगलचें उत्पन्न हीहि एक मोठी उत्पन्नाची बाब असे. जंगलांच्या शेजारीं जंगलांतील कच्च्या मालाचा पक्का माल करण्याचे कारखाने असत व ते स्वतः सरकारच कुप्याध्यक्षामार्फत चालवीत असे. त्यामुळें कारखान्यापासून होणारा नफाहि सरकारच्याच पदरांत पडत असे. घोडे बैल वगैरे जनावरांची पैदास सरकार करीत असे. जंगलांतून हत्ती पकडून विकणें, किंवा हस्तिदंत विकणें, ही त्यावेळीं मोठी उत्पन्नाची बाब असे. त्यावेळीं युद्धांतील जय हत्तीवर अवलंबून असल्यामुळें हत्तीला किंमतहि चांगली येत असावी. हिंदुस्थानांत खनिज द्रव्यें फार नाहींत. तरीपण त्यावेळच्या वर्णनांत बहुतेक सर्व धातूंचीं नांवें आलीं आहेत. हल्लीं म्हैसूर संस्थाना खेरीज इतर कोठेंहि हिंदुस्थानांत सोन्याच्या खाणी नाहींत. पण त्यावेळच्या वर्णनांत खाणींतील सोन्याचा तर वारंवार उल्लेख येतोच; त्या शिवाय कित्येक नद्यांच्या वाळवंटांतून सोन्याचे कण सांपडत असत असेंहि वर्णन आढळतें. अशोधित धातु शुद्ध करण्याची कला त्यावेळीं अवगत होती. त्याचप्रमाणें मोत्यांची परीक्षा करणें, त्यांना वेजें पाडणें, त्यांना उत्तम पाणी देणें, त्यांचे विविध हार गुंफणें, रत्नांना पैलू पाडणें इत्यादि कामेंहि मोठ्या प्रमाणांत चालत. त्यावरून त्यावेळीं व्यापाराची व उद्योगधंद्याची भरभराट केवढी असे त्याचें अनुमान करतां येतें.

परदेशाशीं व्यापाराचें दळणवळण वाढलें तर आपल्या मालाला गिऱ्हाईक वाढून फायदा होतो हें लक्षांत घेऊन व्यापाऱ्यांना शक्य तितक्या सवलती देण्यांत येत. परंतु परदेशच्या मालाची गर्दी उसळून आपल्या देशांतले कारखाने बंद पडावेत हें श्रेयस्कर नसल्यामुळें तसल्या मालाच्या व्यापारास बंदी करण्यांत येत असे. त्याच प्रमाणें व्यापारीलोक संघ करून मालाच्या किंमती भलत्याच वाढवितील तर त्यांना दंड होई. महायुद्धाचे वेळीं सरकारला सुचलेली मूल्य–नियंत्रणाची कल्पना चाणक्यकालाइतकी तरी जुनी आहे. सरकारी मालाची विक्री किंवा जप्तीच्या मालाची विक्री लिलावानेंहि होई. आणि त्यावेळींहि तीनवार लिलाव पुकारून अखेरीस वरिष्ठ अधिकाऱ्याच्या संमतीनें लिलाव कायम करण्यांत येत असे.

## मुलकी राज्यव्यवस्था.

**ग्रामसंस्था** हा राज्यव्यवस्थेचा पाया आहे आणि भारतीय आर्यांत ग्रामसंस्था ही इतकी पुरातन कालापासून चालत आली आहे कीं, जसा आमचा वैदिक धर्म अनादि आहे तशीच आमची ग्रामसंस्थाहि अनादि म्हणतां येईल. अर्थातच अर्थ-शास्त्रांत आर्य चाणक्यानें वर्णिलेली मुलकी राज्यव्यवस्था ग्रामसंस्थेच्या पायावरच उभारली असेल हें न सांगताहि वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल.

चाणक्यानें राज्यव्यवस्थेच्या सोयीसाठीं **जनपदविभाग** आणि **नागरविभाग** असे दोन विभाग कल्पिले आहेत. हल्लींच्या शहर म्युनिसिपालिटया आणि ग्रामपंचायती, तालुकाबोर्डें व जिल्हा बोर्डें या सारखीच ही विभागणी आहे. खेड्यांची क्षेत्रमर्यादा एक किंवा दोन कोसांची असे व खेडेगांवांत वस्ती ५०० ते ३–४ हजारां पर्यंत असे. त्यांत शेतकऱ्यांचा भरणा अधिक असावा असें चाणक्यानें लिहून ठेविलें आहे. प्रत्येक खेड्याची हद्द ठळक खुणांनीं दर्शविली असे आणि हद्दीबद्दल तंटा उपस्थित झाल्यास शेजारच्या पांचदहा खेड्यांतले प्रतिष्ठित पंच जमून खाणाखुणा पाहून निकाल देत. हद्दीच्या खुणा बदलणाऱ्यास किंवा नाहींशा करणाऱ्यास शिक्षा करण्यांत येई. गांवांतील लोकांच्या वहिवाटीचे आणि जनावराकरितां राखलेले रस्ते अडविणाऱ्यांसहि शिक्षा होई. प्रत्येक गांवाला गुरांच्या चाऱ्याकरितां गायरान असे. गांवांत जोशी, उपाध्ये, पाटील, कुळकर्णी, देशपांडे, वैद्य, जासूद इत्यादिकांना इनाम जमिनी असत. नवीन गांव वसविणाऱ्याला जमीन इनाम मिळत असे, पडित जमीन नवीन लागवडीस आणणाऱ्याला कित्येक वर्षें कराची माफी मिळत असे,

गांवांतील सार्वजनिक कामें संघामार्फत करण्यांत येत व तसल्या सार्वजनिक कृत्यांत प्रत्येकानें कांहींना कांहीं तरी कामाचा बोजा उठविलाच पाहिजे असा नियम असे. देवळें, विहिरी, तलाव सार्वजनिक असल्यास सार्वजनिक वर्गणींतून त्यांची दुरुस्ती होत असे. जर कोणी आपली जमीन उगाच पडित टाकील तर त्याच्याकडून ती जमीन काढून घेण्यांत येई. प्रत्येक गांवांत आल्या गेल्याची व जन्म-मृत्यूची नोंद असे आणि गांवची खानेसुमारीहि करण्यांत येई व तींत नुसत्या माणसांचीच नव्हे तर जनावरांचीहि नोंद होई. त्याच-प्रमाणें स्थावर जमिनीच्या मालकीचीहि नोंद असे. ज्या अनाथाला कोणी पालनकर्ता नसेल त्याची इस्टेट गांवच्या वृद्ध पुढाऱ्यांच्या नजरेखालीं देण्यांत येई. चोरीच्या मालाचा माग एखाद्या गांवापर्यंत लागला व पुढें त्याचा माग लागेनासा झाला तर त्या गांवकऱ्यांना चोरीचा माल भरून द्यावा लागे. नदीनाल्याला धरण बांधून पाट काढण्याचें काम सरकार करीत असे. जर हें काम इतर कोणी करील तर त्यास माती, लांकडें वगैरें सामान फुकट देण्यांत येई. अनाथांच्या पोषणाची जबाबदारी राजाकडे असे. चैनीच्या गोष्टी, खेळ, नाटकें वगैरें पासून शेतीच्या कामाला हरकत येते सबब अशा लोकांना खेड्यांत राहूं देऊं नये असा चाणक्याचा अभिप्राय आहे.

दहा गांवांचें एक संग्रहण, वीस संग्रहणांचें एक खार्वटिक, दोन खार्वटिकांचें एक द्रोणमुख आणि दोन द्रोणमुखांचें एक स्थानीय अशी ही खेड्यापासून जिल्ह्यापर्यंतची चढती श्रेणी असे. खेडेगांवचा वसूल पाटील कुलकर्ण्यांनी करून त्याचा भरणा मुख्य खजीन्यांत करावयाचा असा नियम असे. आणि दरवर्षी आषाढी पौर्णिमा झाली कीं, गांवोगांवचे कुलकर्णी आपलीं दप्तरें घेऊन राजधानींत येत आणि दप्तरदार कचेरींत जाऊन आपापले हिशेब रुजू करीत. हीच पद्धति थोड्या बहुत फरकानें अद्यापिहि चालू आहे. आषाढी पौर्णिमेची कालमर्यादा ३१ जुलैला आणून ठेवण्यांत आली आहे एवढाच काय तो फरक. शहराची रचना खेडेगांवाहून अधिक पद्धतशीरपणानें केली जात असे. खेड्यांत कोणी कोठें राहावें याविषयीं निर्बंध सांगण्यांत आलेले नाहींत. पण शहरांत वस्ती करण्यापूर्वी हल्लींच्या 'टाऊन प्लॅनिंग' प्रमाणें रस्ते आंखण्यांत येत आणि सरकारी राजवाड्याची आणि कचेऱ्यांची जागा टरवून नंतर त्याच्या सभोंवतीं अर्थशास्त्रांत वर्णिलेल्या क्रमानें वस्ती करण्यांत येई. शहराच्या भोंवतीं तट आणि तटाच्या भोंवतीं खंदक असे. खंदकावर कांहीं पक्के पूल व कांहीं घालते–काढते पूल असत. गांवांतील घाण पाणी वाहून नेणारीं गटारें असत; गुप्तपणें बाहेर पडण्यास भुयारें असत; तटावर बंदोबस्ताकरितां पाहरा असे आणि परकी मनुष्य परवान्याशिवाय आंत येऊं शकत नसे. शहरांत सोयीच्या ठिकाणीं पण्यवीथिका असे आणि तेथील मालविक्रीवर व वजनामापावर सरकारची देखरेख असे. खोटीं वजनें मापें ठेवणाऱ्यास दंड होई. शहराच्या रस्त्यांत केरकचरा टाकणारास अगर मलमूत्रविसर्जन करणाऱ्यास दंड करण्यांत येत असे. प्रेतें गांवाबाहेर नेतांना अमुकच वेशींतून तीं बाहेर न्यावीं असा नियम असे. स्मशानाखेरीज भलते ठिकाणीं प्रेताचें दहन केल्यास शिक्षा होई. उच्चवर्णांकरितां व इतरवर्णांकरितां वेगवेगळीं स्मशानें असत. अस्पृश्यांची व पाखंडी लोकांची वस्ती शहराबाहेर स्मशानाच्या पलीकडे असे! हल्लींसारखे पाण्याचे नळ त्यावेळीं नसत. परंतु प्रत्येक आळीला किंवा दहादहा घरांना एकेक सार्वजनिक विहीर असावी असा नियम असे. हल्लींच्या प्रमाणें रात्रीच्यावेळीं रस्त्यावर दिवे लावण्याची तरतूद त्यावेळीं नसून काळोख्या रात्रीं बाहेर हिंडणाऱ्यानें स्वतःचा दिवा बरोबर घ्यावा असा नियम असे सहा घटका रात्र झाल्यानंतर आणि सहा घटका रात्र शिल्लक राहीपर्यंत जो दरम्यानचा वेळ आहे त्या वेळांत रस्त्यांतून हिंडण्यास मनाई असे. मात्र अगदीं जरूरीच्या व आकस्मिक कारणाकरितां बाहेर पडल्यास हरकत करण्यांत येत नसे. आग विझविण्याकरितां हल्लीं सारखे बंब त्यावेळीं नव्हते. परंतु प्रत्येक रस्त्यांतून आणि प्रत्येक घराच्या दरवाज्यांत आग विझविण्याकरितां म्हणून अनुक्रमें पाण्याचे मोठाले हौद व घडे भरून ठेवण्यांत येत आणि आगीवर पाणी शिंपण्याकरितां व आगींतली माणसें व माल बाहेर काढण्याकरितां लागणारीं शिड्या, दोऱ्या, टोंकास आंकडे असलेल्या काठ्या वगैरे साधनें जय्यत तयार ठेवण्यांत येत आणि आगीचा बोभाटा होतांच जो कोणी आग विझविण्याला जाणार नाहीं त्यास दंड होई. मुद्दाम आकसानें आग लावणाऱ्यास त्या पेटलेल्या आगींतच टाकून जाळून ठार करावें असला भयंकर देहदंड सांगितला आहे. हें एकप्रकारचें अमेरिकेंतल्या 'लिंच लॉ'चेंच भावंड होय! पण असली क्रूर शिक्षा अंमलांत येत असेल का नाहीं याची शंकाच वाटते. असो. आगीची भीति कमी करण्याकरितां सोनार, लोहार इत्यादि ज्या कारागिरांचा विस्तवाशीं संबंध येई त्यांची वस्ती एकत्र वेगळ्या मोहल्यांत असावी असा नियम असे त्या खेरीज उन्हाळ्याच्या दिवसांत ठराविक जागेशिवाय व ठराविक वेळेव्यतिरिक्त चूल पेटविण्यासहि बंदी असे.

## शेतकी खातें.

हिंदुस्थान हा कृषिप्रधान देश असल्यानें अत्यंत प्राचीन कालापासून या देशांतील लोकांचें लक्ष शेतकीकडे वेधलें आहे आणि त्या योगानें त्यांची त्या विषयांत प्रगतीहि कौतुकास्पद आहे. पाश्चात्यांनीं हिंदी शेतकऱ्यांना शिकविण्याजोगें कांहीं नाहीं असे उद्गार अलीकडील पाश्चात्य तज्ज्ञांच्याच तोंडून बाहेर पडले आहेत. ही प्रगति हिंदी शेतकऱ्यांनीं अलीकडे केली असून चाणक्याच्या वेळीं देखील शेतकींत अशीच सुधारणा झाली होती. जमिनीचा मगदूर आणि पावसाचा अंदाज पाहून कोणत्या जमिनींत काय पेरावें हें त्या वेळच्या शेतकऱ्यांना बरोबर समजत असलें पाहिजे. चाणक्यानें या संबंधीं त्यावेळीं प्रकट केलेले विचार आजच्या परिस्थितींत देखील लागू पडतील. कोणतें पीक उत्तम, या प्रश्नाला साळीचें पीक उत्तम, भाजीपाल्याचें मध्यम आणि उंसाचें पीक कनिष्ठ असें उत्तर चाणक्य देतो. ऊंस वाईट कां, तर उंसाचें पीक काढण्यास खर्च अधिक येतो आणि रोगामुळें पीक बिघडण्याची भीति अधिक असते असें कारणहि तो देतो. तेवीसशें वर्षांपूर्वींचा चाणक्याचा हा अभिप्राय हल्लींच्या शेतकी खात्यांतील तज्ज्ञांनाहि मान्य करावा लागेल.

शेतकी खात्यावरील अधिकाऱ्याला शेती, बागाईत व वनस्पति शास्त्र यांची चांगली माहिती असावी; आणि सर्व प्रकारच्या धान्यांचें, फळांचें, फुलझाडांचें उत्तम बीं त्यानें जतन करून ठेवावें असें चाणक्यानें सांगितलें आहे. चाणक्य हा जरी मगध देशांत राहणारा ब्राह्मण असला तरी त्याला हिंदुस्थानच्या सर्व भागांत कोठें किती वृष्टि होते त्याची माहिती होती व कोंकणांत बिनमाप वृष्टि होते असें त्यानें त्यावेळीं नमूद करून ठेवलें आहे. वृष्टीचें 'द्रोण' म्हणून जें त्यानें माप दिलें आहे तें हल्लींच्या दोन ते तीन इंचा इतकें मोठें असावें असें वाटतें. कपाशीचें बीं पेरण्यापूर्वी त्यास शेण चोपडावें असें चाणक्यानें सांगितलें आहे व ही परंपरा अद्यापि चालू आहे. खतांत हाडांचें खत, मासळीचें खत व शेणाचें खत यांचा उल्लेख आहे. आणि हीं खतें हल्लीं देखील उत्कृष्ट मानलीं जातात. कालवे, पाटबंधारे, नदी, तलाव, विहिरी यांच्या पाण्याच्या उपयोगाचा उल्लेख आहे; आणि पाटाच्या पाण्याची सोय असली म्हणजे ढगाकडे पाहात बसावें लागत नाहीं असा शेराहि चाणक्यानें तेथें मारला आहे. पण सर्वांत विशेष आश्चर्याची व कौतुकाची गोष्ट ही कीं, पर्जन्यवृष्टि कमी अधिक होणें हें **शुक्राच्या अस्तावर** आणि **सूर्यावरील डागावर** अवलंबून आहे हा शोध चाणक्याच्यापूर्वीच आर्यावर्तांत लागला होता व तो त्यानें अर्थशास्त्रांत नमूद करून ठेवला आहे आणि हल्लींच्या वातावरणशास्त्रज्ञांना अद्यापि त्याचें महत्व देखील कळलेलें नाहीं !

## न्यायपद्धति.

चाणक्यानें त्यावेळच्या न्यायदानपद्धतीचें विस्तृत वर्णन केलें असल्यामुळें तत्कालीन न्यायपद्धति व सांप्रतची न्यायपद्धति यांची तुलना बोधप्रद होण्याजोगी आहे. चाणक्यानें वर्णिलेल्या न्यायपद्धतीचाच विस्तार पुढें याज्ञवल्क्यस्मृतींत केलेला असून त्यांतील दायविभागादि प्रकार मिताक्षरादिपद्धतीनें अद्यापि व्यवहारांत रूढ आहेत. असो. पूर्वी कायदे थोडक्यांत सूत्ररूपानें सांगितल्यामुळें त्या पद्धतींत हल्लींच्या विविध कायद्यांच्या मूलतत्वांचा बीजरूपानें मात्र समावेश केलेला दृष्टीस पडतो. अलीकडे प्रत्येक पोटविभागाचाच विस्तार एवढा मोठा होऊं लागला आहे कीं, वडाच्या झाडाची एकेक पारंबीच एकेक झाडा एवढी व्हावी त्याप्रमाणें कायद्याची एकेक पोटशाखाच एकेक स्वतंत्र शास्त्र बनत चालली आहे. अर्थातच हल्लींच्या असल्या अफाट पसरलेल्या विस्ताराची पूर्वीच्या बीजस्वरूप न्यायपद्धतीशीं तुलना करणें योग्य होणार नाहीं. तथापि या विस्तारांतला अवांतर भाग बाजूस सारून मूलभूत कल्पनांच्या दृष्टीनें विचार करूं लागल्यास जुन्या न्यायपद्धतींत हल्लींच्या सर्व कायद्यांचीं बीजें सूक्ष्म रूपानें होतीं व त्यांचाच हा एवढा विस्तार अलीकडे माजला आहे असें दिसून येईल. चाणक्य कालीन न्यायपद्धतींत दिवाणी—फौजदारी कायद्यांचीं कोड्स व प्रोसीजर्स या दोहोंचाहि समावेश झाला असून त्याशिवाय टॉर्ट, कॉंट्रॅक्ट, लिमिटेशन, ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टी, स्पेसिफिक रिलीफ अॅक्ट इत्यादि कायद्यांतील तत्वांचाहि त्यांतच समावेश झालेला आहे. न्याय करण्याचें काम एकट्यानें करूं नये, तीन न्यायाधीश असावेत, किंवा एका न्यायाधीशास दुसरे दोघे सल्लागार असावेत ही कल्पना चाणक्याच्या काळापेक्षांहि जुनी आहे. साक्षीचें महत्व, साक्षीदाराची लायकी—नालायकी, उलट तपासणी, साक्षीदारांना पोटगी भत्ता देणें, खोटी साक्ष दिल्याबद्दल शिक्षा इत्यादि विषयांसंबंधी विवेचन अर्थशास्त्रांत आहे. मुदतीच्या कायद्याचें भारूड हल्लीं सारखें माजलें नसलें तरी तें तत्व त्यावेळींहि राजमान्य झालें होतें आणि वेगवेगळ्या हक्कांच्या संबंधानें ५ ते २० वर्षांपर्यंतची मुदतीची अट सांगितलेली आहे. त्यावेळीं कोर्टाचा खर्च मात्र स्टांपाच्या रूपानें अगाऊ भरावा लागत नसून खटल्याचा निकाल झाल्यानंतर जो हरेल त्याजकडून कोर्ट खर्च घेण्यांत येई.

न्यायाचें कार्य हल्लींसारखें दिरंगाईनें चालत नसून झटपट निकाल देण्यांत येई. आणि स्थावर मिळकतीचा वाद असल्यास मूळ ठिकाणावर जाऊन तेथल्या माहितगारांच्याच साक्षी घेण्याची पद्धति असे.

वडलार्जित धनाचे हिस्से, वारसांचा अनुक्रम, स्त्रीधनाचे हक्कदार, वैवाहिक बंधनें, घटस्फोट, पोटगीचा हक्क इत्यादि संबंधांत त्यावेळचे कायदे जशाचे तसेच आतापर्यंत चालत आले आहेत. दत्तक पुत्राला त्यावेळीं हल्लींच्या सारखें महत्व प्राप्त झालें नसल्यानें हल्लींच्या दिवाणी दाव्यांतले जसे अर्धे अधिक दावे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें दत्तकाशीं संलग्न असतात तसा मात्र प्रकार चाणक्यकालीं नव्हता. फौजदारी गुन्ह्याबद्दल दिल्या जाणाऱ्या त्यावेळच्या शिक्षेंत हल्लींचे बहुतेक सर्व प्रकार असून शिवाय खोडा घालून ठेवणें, आगींत टाकून जाळणें, तापलेल्या कढईत टाकणें, पाण्यांत बुडवून मारणें, हात पाय तोडणें, अंगावर गुन्ह्याच्या निदर्शक असें चिन्ह डाग देऊन उमटविणें इत्यादि प्रकार अधीक असत. तथापि हल्लींच्या कायद्यानें केवळ दंडाची शिक्षा फारच थोड्या गुन्ह्यांना ठेवली असून बहुतेक सर्व गुन्ह्यांना कैदेची शिक्षा सांगितली आहे; तसा प्रकार त्यावेळीं नसून केवळ दंडाची शिक्षा सांगितलेल्या गुन्ह्यांचेंच प्रमाण त्यावेळीं निम्याहून अधिक होतें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं जितकी स्मृति जुनी तितकी वधाची किंवा कैदेची शिक्षा कमी. याचें कारण असें दिसतें कीं, पूर्वी प्रत्येक गुन्ह्याला प्रायश्चित्त असे. पुढें प्रायश्चित्ताचें शिक्षेंत रूपांतर होतांना त्याला प्रथम नुसत्या द्रव्यदंडाचेंच स्वरूप आलें आणि जसजशी गुन्हेगारी वाढत चालली तसतसा द्रव्यदंड अपुरा वाटून द्रव्यदंडाला देहदंडाची जोड देण्यांत येऊं लागली आणि नंतर देहदंडालाच प्राधान्य येऊन द्रव्यदंड मागें पडत चालला.

जुन्या न्यायपद्धतींत हल्लींच्या सारखें वकिलाचें प्राबल्यं दिसून येत नाहीं. साक्षीदारांची तपासणी न्यायाधीश स्वतःच करीत. वकिलांचा जसा यांत सुळसुळाट नाहीं त्याचप्रमाणें अपीलाचाहि सुळसुळाट नाहीं. विशेष अन्याय झाल्याचा संशय आल्यास राजाकडे पुनर्न्यायाची याचना करण्यांत येत असे. परंतु हा 'पुनर्न्याय' (appeal) हा शब्द देखील स्मृतींतून फारसा रूढ नाहीं. 'पुनर्न्याय' करावयाचाच झाला तर वादी पुनः खोटा ठरल्यास दुप्पट दंड देण्याची त्याजकडून हमी घेऊन मग पुनर्न्याय करावा असें मनूनें म्हटलें आहे. याज्ञवल्क्यानें एकदा केलेला न्याय बदलूं नये असेंच म्हटलें आहे आणि चाणक्यानें पुनर्न्यायाचा उल्लेखच केला नाहीं. यावरून त्यावेळीं ही पद्धति फार रूढ नव्हती किंवा ग्राह्य मानली जात नव्हती असें दिसतें.

अर्थशास्त्रांत जसा पुनर्न्यायाचा उल्लेख नाहीं तसाच दिव्य करण्यासंबंधाचाहि उल्लेख नाहीं. यावरून चाणक्याला न्याय तोडण्याची ती पद्धति मान्य नव्हती असें दिसतें. स्मृतिग्रंथांतून दिव्य करण्याच्या पद्धतीचा उल्लेख आहे. पण तो चाणक्याच्या पूर्वकालीनस्मृतींत अगदीं त्रोटक असून अलीकडील स्मृतींत अधिक दिसून येतो. याज्ञवल्क्यस्मृतींत दिव्य करण्याच्या पद्धतीचे विविध प्रकार देऊन त्यांचें वर्णनहि केलें आहे. यावरून चाणक्याच्या कालानंतरच या पद्धतीचें प्रस्थ वाढत चाललें आणि याज्ञवल्क्याच्या कालापर्यंत ती बद्धमूल होऊन बसली आणि तिचा अवलंब ब्रिटिश कोर्टांची स्थापना होईपर्यंत केला जात असे असें दिसतें, चाणक्याचा तीवर विश्वास नसेल म्हणूनच त्यानें आपल्या ग्रंथांत तिचें वर्णन दिलें नसावें.

गुन्ह्यांच्या वर्गीकरणांत कित्येक ठिकाणीं चाणक्यानें अलीकडील कायदेपंडितांपेक्षां अधिक दूरदर्शीपणा दाखविला आहे. एखाद्याच्या देशाची, धर्माची किंवा समाजाची बेअब्रू होण्यासारखें कोणी बोललें किंवा लिहिलें तरी त्याबद्दल हल्लींचा कायदा कांहीं करूं शकत नाहीं. पण चाणक्याच्या वेळचा कायदा असा हलगर्जीपणाचा नव्हता. कोणाच्याहि देशाला, धर्माला, जातीला किंवा समाजाला उद्देशून उपमर्दकारक किंवा धिक्कारदर्शक वाक्य उच्चारिलें असतां त्या गुन्हेगारास त्यावेळीं शिक्षा होत असे. हल्लींच्या कायद्यानें जिवंत व मूर्तिमंत व्यक्तींची तेवढी अब्रुनुकसानीपासून बचाव करण्याची तजवीज केली आहे; पण कोणाच्याहि देशास, समाजास किंवा मृत पूर्वजांस उद्देशून कोणी कसलेहि उपमर्दकारक शब्द वापरले तरी त्याचा बंदोबस्त करतां येत नाहीं हें हल्लींच्या कायद्याचें स्पष्ट वैगुण्य होय।

चाणक्याच्या वेळीं कित्येक गुन्ह्यांना हल्लींच्यापेक्षां अत्यंत कडक अशी शिक्षा सांगितली होती. राजद्रोहाबद्दल व रानास आग लावल्याबद्दल जाळून ठार मारण्याची शिक्षा सांगितली आहे. राजाचा अपमान केल्यास जीभ छाटून टाकीत. राजाच्या वाहनांचा नाश करणाऱ्यास सुळावर चढविण्याची शिक्षा असे. कुमारीवर बलात्कार केल्यास वधाची शिक्षा सांगितलेली आहे. शूद्र स्वतःस ब्राह्मण म्हणवील तर त्यास आंधळा करून सोडावें असली भयंकर शिक्षा सांगितली आहे. द्यूतांत फसविणाऱ्याचे हात तोडण्यांत येत असत. हीं कडक शिक्षांची उदाहरणें झालीं. याच्या उलट हल्लींच्यापेक्षां अत्यंत सौम्य शिक्षा सांगितल्याचींहि उदाहरणें आहेत.

कित्येक पदार्थांच्या चोरीला अवघा १२ पासून ९६ पणापर्यंत दंड केला जात असे. जबरदस्तीनें एकाद्याला बंधनांत ठेविलें तरी त्याला १००० पणांहून अधिक दंड सांगितलेला नाहीं. बेअदबी करणाऱ्या भाषणाबद्दल तर अवघा १२ पण दंड असे. सांधी दुखापत करणारास २४ पण दंड, जबर दुखापतीस ९६ पणापर्यंत दंड आणि जीव जाईल अशी दुखापत केली तरी ५०० पणापर्यंतच दंड सांगितला आहे ! वैद्याचे हातून रोगी मेल्यास त्याला ५०० पणापर्यंत दंड सांगितला आहे हें विशेष होय. सरकारी अधिकाऱ्यांनीं केलेल्या गुन्ह्याबद्दल इतरांपेक्षां त्यांना अधिक कडक शिक्षा दिली जात असे. काम सोडून निघून जाण्याबद्दल १२ पण दंड सांगितला असून ऋतुकाळीं समागम न करण्याबद्दलहि ९६ पण दंड ठेवला आहे हें त्या वेळच्या धार्मिक समजुतीचें एक गमक होय. बौद्ध धर्माचा प्रसार वाढत चालल्यामुळें जो उठला सुटला तो संन्यास घेऊं लागला होता. याकरितां जो कोणी आपल्या बायका मुलांच्या व आप्तांच्या पोषणाची तरतूद न करितां संन्यास घेईल त्यास चाणक्यानें शिक्षा सांगितली आहे. ही शिक्षा टाळण्याकरितां जर कोणी सकुटुंब संन्यास घेईल तर पत्नीच्या इच्छे विरुद्ध तिला संन्यास दिल्याबद्दलहि चाणक्यानें दंड सांगून ठेवला आहे !

## लष्करी व्यवस्था.

चाणक्यानें सैन्याचे सहा प्रकार सांगितले आहेत, त्या सहा प्रकारांत मित्राचें सैन्य व शत्रूचें सैन्य यांचाहि समावेश त्यानें केला आहे. मित्रांचें सैन्य प्रसंगविशेषीं तरी आपल्या उपयोगी पडूं शकेल; पण शत्रूचें सैन्य आपल्या कार्याला उपयोगी पडण्याचा प्रसंग क्वचितच यावयाचा. तथापि कारणपरत्वें एखाद्या युद्धाच्या प्रसंगीं शत्रूहि मित्र होऊन तिसऱ्या एखाद्यावर जुटीनें हल्ला करितात अशीं प्रत्यक्ष उदाहरणें कित्येक दाखवितां येतील. पेशवे व हैदर हे शत्रू असून देखील त्या उभयतांनीं मिळून इंग्रजावर स्वारी केली. युरोप खंडांत इंग्लंड, फ्रान्स, इटाली, जर्मनी व रशिया यांच्यांतील दोन दोन राष्ट्रांत एकदां दोस्ती तर एकदां वैर असे प्रकार कैक वेळां घडले आहेत. म्हणूनच कारस्थानपटु चाणक्यानें शत्रूच्या सैन्याचाहि स्वतःच्या सैन्यांत समावेश केला असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

रानटी जातींचें सैन्य हेंहि सैन्याचा एक भाग चाणक्यानें मानलें आहे. हें सैन्य म्हणजे पेंढाऱ्यांचीच पूर्वपीठिका असावी. जो कोणी पगार देईल किंवा ज्याच्या बाजूनें लढल्यास लूट करावयास सांपडेल त्याच्या बाजूनें लढण्याला पेंढारी हे नेहमीं सज्ज असत. युरोपखंडांतहि मध्ययुगांत अशाच भाडोत्री सैन्याच्या टोळ्या असत व जो कोणी अधीक लालूच दाखविल त्याच्या बाजूनें लढावयास त्या तयार होत. अशाच प्रकारचें भाडोत्री सैन्य चाणक्याच्या वेळीं हिंदुस्थानांत मुबलक असे असें वाटतें. हल्लींच्या वायव्य सरहद्दीवरील रानटी टोळ्या हा पूर्वींच्या आटविकांचाच अवशेष होय. आणि इंग्रज सरकारच्या लष्करांत या अटविकांचाच भरणा बराच मोठा आहे.

सैन्याचे हे तीन प्रकार सोडून दिल्यास आणखी तीन प्रकार शिल्लक राहतात. यांतला पहिला प्रकार म्हणजे परंपरागत किंवा पिढीजाद सैन्य होय. या सैन्यांत वरिष्ठ वर्गांतील क्षत्रियांचा भरणा असे व त्यांची राजनिष्ठा अढळ असल्यामुळें हें सैन्य सर्वांत उत्तम मानण्यांत येत असे. याच्या खालोखाल दर्जा पगारी सैन्याचा मानण्यांत येई. हें सैन्य म्हणजे पेशव्यांची खास हुजूरपागच म्हणण्यास हरकत नाहीं. या सैन्याचा दर्जा पिढीजाद सैन्यापेक्षां किंचित् कमी पण सरंजामी सैन्यापेक्षां अधिक मानण्यांत येई. तिसरें पथक सैन्य म्हणजे सरंजामीं सरदारांनीं आपल्या पदरीं ठेविलेलें सैन्य. या सैन्यावर राजाची प्रत्यक्ष हुकमत चालत नसून ज्या सरदाराच्या पदरीं तें सैन्य असेल त्या सरदाराचीच त्यावर हुकमत चाले. त्यामुळें जोंपर्यंत सरदार राजनिष्ठ व हुकमतींत वागणारे असतील तोंपर्यंतच या सैन्याचा उपयोग. पण सरदार बिथरला कीं हें सैन्यहि त्याच्याबरोबर बिथरून राजाला उपकारक होण्याऐवजीं अपकारकच होई. मराठेशाहींत याचा कटु अनुभव आलेला सर्वांस माहीत आहेच. चाणक्यानेंहि याचमुळें या सरंजामी सैन्याचा दर्जा पहिल्या तिहींत शेवटचा ठरविला आहे.

या सर्व प्रकारच्या सैन्यांत रथ, हत्ती, घोडे व पायदळ असे पुनः चार विभाग असत आणि या चारींत चाणक्याच्या वेळीं हत्तींचें दळ श्रेष्ठ मानण्यांत येत असे. ज्याच्या पदरीं हत्तींचा भरणा अधिक त्याचा जय हटकून ठेवलेला अशीच समजूत त्या काळीं होती. तरीपण शिकंदराच्या वेळीं त्यास प्रतिकार करण्याला हत्तीचा उपयोग न होतां उलट त्यापासून अपायच झाला. तथापि त्या नंतरहि बराच काळपर्यंत युद्धाच्याकामीं हत्तीला बरेंच महत्व होतें. बंदुकीच्या दारूची युक्ति निघाल्यावेळेपासून मात्र हत्तींचें हें महत्व नाहींसें झालें. असो. पायदळ सैन्यांत दहा शिपायांवर एक पदिक, दहा पदिकांवर एक सेनापति, दहा सेनापतींवर

एक नायक अशी श्रेणी असे. सेनापति, हा शब्द त्यावेळीं सैन्यावरच्या मुख्याधिकाऱ्याला लावीत नसत. नायक हा एक हजार पायदळावरचा अधिकारी असे व हल्लीच्या 'रेजिमेंट' वरील अधिकाऱ्याशीं त्याची तुलना करितां येईल. या खेरीज सेनाध्यक्ष म्हणून लष्करी खात्यावरचा मुख्याधिकारी असे. त्यास हल्लींच्या भाषेंत वॉरमिनिस्टर (युद्ध-मंत्री) म्हणतां येईल. लढाईचें मुख्य धोरण तोच ठरवी व त्याची वजावणी सेनानायक करीत.

छावणी कोणत्याजागीं कशी करावी, छावणीच्या रक्षणाची तजवीज काय करावी, सैन्याच्या हालचाली होण्याकरितां ज्या खुणा करावयाच्या त्या निशाणांच्या ठराविक संज्ञांवरून आणि तुताऱ्यांच्या वेगवेगळ्या आवाजाच्या संज्ञांवरून सगळ्या सैनिकांस कशा कळवाव्या, सैन्याचे व्यूह कसे रचावे, कोणता व्यूह केव्हां अधिक प्रभावी होतो, शत्रूचा व्यूह फोडण्याकरितां कोणत्या व्यूहावर कोणत्या व्यूहाचा पेंच टाकावा, खबूतरांच्या गळ्यांत चिठ्ठी बांधून बातमी पोचविण्याची व्यवस्था कशी करावी, चतुरंग सैन्यांतून कोणत्या सैन्याचा उपयोग कोणत्या ऋतूंत व कोणत्या युद्धभूमींत विशेष होतो, मौलभूतकादि षड्विध सैन्यांतून कोणत्या सैन्याची केव्हां उभारणीकरणें अधिक प्रशस्त आणि कोणत्या परिस्थितींत कोणतें सैन्य हमखास विजयी होईल इत्यादि विविध लष्करी धोरणांची सूक्ष्म माहिती अर्थशास्त्रांत वाचली म्हणजे चाणक्याच्या कुशाग्र व सर्वंकष बुद्धीचें कौतुक वाटतें आणि इतक्या प्राचीन कालींहि आपल्या देशांत युद्धकलेची किती परिणति झाली होती आणि बंदुकीच्या दारूचा उपयोग; तेवढा वगळल्यास इतर बाबतींत गेल्या तेवीससे वर्षांत चाणक्य कालीन युद्धकलेंत व लष्करी ज्ञानांत किती अल्प भर पडली आहे याचा विचार मनांत येऊन प्राचीन भारतीयांच्या संस्कृतीविषयींचा आदर अत्यंत वाढतो.

सैन्यास कवाईत शिकविली तरच तें सैन्य खरें उपयुक्त होतें हें तत्व आर्यचाणक्य पूर्णपणें जाणत होता व त्याकरितां पावसाळ्या खेरीज इतर ऋतूंत पर्वणीचे दिवस सोडून सैन्याची नित्य कवाईत घ्यावी असा नियम त्यानें घालून दिला आहे; आणि ही कवाईत कशी चालते हें राजानें वारंवार कवाइतीच्या मैदानावर जाऊन पाहावें असेंहि त्यानें सांगितलें आहे. त्यावेळीं हत्यारें कोणकोणतीं होतीं, घोड्यांना व हत्तींना कोणकोणत्या प्रकारचें शिक्षण देत, सैन्याचे गुण कोणते, दोष कोणते, युद्धाचे वेळीं लष्कराला उत्तेजन कसें यावें, छावणीची रचना कशी असावी, युद्धावर निघाल्या वेळीं सैन्यास धान्याचा व शस्त्रादिकांचा पुरवठा कसा करावा, सैन्यांत शिस्त राहण्याकरितां द्यूत, मद्यपान वगैरेना बंदी किती कडक रीतीनें करावी वगैरे बारीक सारीक गोष्टींचा तपशील त्या त्या अधिकरणांत दिलेला आहे तो मुळांतूनच वाचकांनीं पहावा. पण एक महत्वाचा मुद्दा मुद्दाम नमूद करून ठेवण्यासारखा आहे तो येथें सांगतों. युद्धाच्या वेळीं जे सैनिक जखमी होत त्यांना लगेच छवणींत उचलून नेण्यांत येऊन मलमपट्टी करण्यांत येई. अशा औषधोपचार करण्याकरितां लष्करा बरोबर वैद्य असावेत हें चाणक्यानें सांगितलें असेल यांत कांहीं नवल नाहीं; परंतु जखमी लोकांची शुश्रूषा करण्याला, त्यांना अन्नपाणी देण्याला व सैनिकांनीं नाउमेद होऊं नये म्हणून त्यांना प्रोत्साहन देण्याला छावणीबरोबर **स्त्रिया** असाव्यात असें त्यानें म्हटलें आहे.

"**चिकित्सकाः शस्त्रयंत्रागदस्नेहवस्त्रहस्ताः स्त्रियश्चान्नपानरक्षिण्यः पुरुषाणामुद्धर्षणीयाः पृष्ठतस्तिष्ठेयुः**" (अधिकरण १० अ. १३१) या वचनावरून वैद्यांच्या जवळ सर्जरीचीं हत्यारें, मलमें, बँडेजेस वगैरे सर्व साधनें असत आणि शुश्रूषा करण्याला **नर्सेस** असत हें उघडसिद्ध आहे. युरोप खंडांत क्रिमियाच्या युद्धाच्या वेळींच प्रथम **नर्सेस**ची कल्पना निघाली आणि अगदीं अलीकडे तिला मान्यता मिळाली; पण चाणक्याच्या वेळीं ती पद्धति आर्यावर्तांत बद्धमूल झालेली होती. यावरून त्यावेळच्या स्त्रियांना समाजांत वावरण्याला बंदी नसे आणि त्यांना योग्य प्रकारचें शिक्षणहि दिलें जात असे असेंहि अनुमान यावरून निघतें.

लष्करी व्यवस्थेच्याच योजनेंत दुर्गरचनेचाहि विचार केला पाहिजे. पूर्वार्धांतील अध्याय २४ मध्यें दुर्गरचनेचा सविस्तर विचार दिला आहे, तो वाचला असतां किल्ले बांधण्याची कला त्यावेळीं किती पूर्णावस्थेस पोचली होती तें कळून येईल. हिंदुस्थानांत जुन्या पुराण्या किल्ल्यांचे जे अवशेष अद्यापि राहिले आहेत त्यांचें संशोधन केलें, किंवा जुन्या पद्धतीनें बांधलेल्या मराठेशाहींतील किल्ल्यांची रचना पाहिली तर त्यांत चाणक्यकालीन दुर्गरचनेच्या नियमांचेंच अनुकरण केलेलें दिसून येईल. रायगडचा किल्ला हा चाणक्याच्या दुर्गरचनेच्या नियमानुसार बांधलेला आहे असा थोर बंगाली इतिहास लेखक **प्रो. सेन** यानें आपल्या मराठ्यांच्या इतिहासांत नमूद केला आहे. आणि अर्थशास्त्रांतील दुर्गरचनेच्या अध्यायाचा बोध होण्याकरितां पुण्यांतील शनवार वाड्याची रचना समक्ष पाहावी असा अभिप्राय आधुनिक शिल्पशास्त्रज्ञ **श्रीयुत कृ. वि. वझे** यांनीं दिला आहे, यावरून दुर्गरचनेच्या बाबतींतहि चाणक्यकालीन वास्तुशास्त्र किती पूर्णावस्थेस पोचलें होतें तें दिसून येईल.

## परराष्ट्र संबंध

राजकीय व्यवहारांत प्रत्येक राष्ट्राचा इतर अनेक राष्ट्रांशीं कोणत्याना कोणत्या तरी बाबतींत संबंध यावयाचाच. याकरितां राजनीतिशास्त्रांत परराष्ट्राशीं करावयाच्या व्यवहाराचा समावेश अवश्य होतो. किंबहुना परराष्ट्रसंबंधाचा विचार वगळल्यास राजनीतिशास्त्राला महत्वच येऊं शकत नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. या करितांच कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रांत परराष्ट्रीय संबंधांचें विस्तृत वर्णन केलें आहे. अर्थशास्त्राचा अर्धाधिक भाग परराष्ट्रीय राजकारणानेंच व्यापलेला असल्यामुळें अंतर्गत राज्यकारभाराला चाणक्यानें गौणत्व दिलें असाहि आक्षेप त्यावेवर येऊं शकेल. पण चंद्रगुप्ताचें राज्य वाढत जाऊन समुद्रवलयांकित पृथ्वीचें साम्राज्य त्यास कसें प्राप्त होईल याची अहर्निश चिंता वाहणाऱ्या चाणक्याला परराष्ट्रीय स्नेहसंबंधांचें महत्व अधिक वाटावें हें स्वाभाविकच आहे.

केंद्रस्थानीय विजिगीषु राजाचा ज्या ज्या परराष्ट्रांशीं संबंध साहजिकपणेंच येतो त्या सर्वांचा समावेश करून चाणक्यानें त्यांचें एक मंडल कल्पिलें आहे आणि मग त्यांत नैसर्गिक शत्रु, मित्र, मध्यम व उदासीन कोण आणि प्रसंगप्राप्त शत्रु, मित्र, मध्यम व उदासीन कोण आणि त्यांच्याशीं केंद्रां कसा संबंध ठेवावा याचें विवेचन **मंडलयोनि** आणि **षाड्गुण्यविचार** या अधिकरणांतून विस्तारपूर्वक केला आहे. मंडलयोनीची कल्पना येण्याकरितां **परिशिष्ट अ** मध्यें या विषयाचा स्वतंत्रपणें विचार केला आहे तो वाचकांनीं तेथें पाहावा.

षाड्गुण्य विचारांत संधि, विग्रह, यान, आसन, संश्रय व द्वैधीभाव या सहा प्रकारच्या धोरणांचा विचार चाणक्यानें केला आहे. त्यांत संधि म्हणजे तह. विग्रह म्हणजे लढाई आणि संश्रय म्हणजे दुसऱ्याचा आश्रय करणें हीं तीन धोरणेंच मुख्य असून बाकीचीं तीन धोरणें या तिहींना आनुषंगिक अशींच आहेत. लढाई करावयाची असा निश्चय झाला म्हणजे मग प्रत्यक्ष संग्रामाची तयारी कशी करावी व युद्ध कसें करावें इत्यादि प्रश्न उद्भवतात; पण त्यांचा समावेश अंतर्गत राज्यव्यवस्थेंतील लष्करी खात्याच्या विचारांत होतो व तेवढ्याकरितां **लष्करी व्यवस्था** या प्रकरणांत सैन्याची उभारणी, लष्कराच्या हालचाली, व व्यूहरचना इत्यादि पोटभागांचा विचार केला आहे. आणि म्हणून येथें फक्त परराष्ट्राशीं स्नेहसंबंध कसे राखले जात एवढ्याच प्रश्नाचा विचार करावयाचा आहे.

राज्य लहान असो वा मोठें असो राजाला आपले शेजारी कोणकोण आहेत ते कसे आहेत, त्यांचें आपल्याविषयीं काय मत आहे आणि त्यांची हालचाल कशी काय चालली आहे, याची सदोदित चौकशी करणें व बित्तंबातमी काढणें जरूर आहे. अशी माहिती जो मिळविणार नाहीं त्याचें राज्य, निदान या कलियुगांत तरी, टिकावयाचें नाहीं. मराठ्यांनीं या धोरणाकडे दुर्लक्ष्य केलें आणि म्हणूनच त्यांचें राज्य नाहींसें झालें. असली सर्व माहिती वेळच्या वेळीं व बिनचूक मिळावी यांकरितांच हेरांची योजना चाणक्यानें सांगितली आहे. चाणक्याच्या राजनीतिशास्त्रांत हेरांचें फार मोठें प्रस्थ माजलेलें दिसतें. परंतु कोणत्याहि विजिगीषु राजाचा व्यवहार पाहिला तरी त्यांत हेरांची संस्था अशीच आढळेल. त्यांत कोणी चाणक्याप्रमाणें, किंवा बर्नहार्डीप्रमाणें, तिचा ग्रंथांतून स्पष्टपणें निर्देश करील तर इतर कोणी तिचा उच्चार बिलकुल न करितां सर्व व्यवहार बिनबोभाट करीत असेल. तथापि '**तटस्थःस्वानर्थान् घटयतिच मौनंच भजते**' अशी मूकवृत्ति जरी कोणी धारण केली तरी हेरांच्या कामगिरीशिवाय त्यांचा राज्यकारभार सुरळीत चालतो असें मानणें ही भोळेपणाची कमाल होय.

परराष्ट्रीय राजकारणांत जे उघड संबंध यावयाचे व राजरोस व्यवहार घडावयाचे ते दूतांमार्फत चालत असत; आणि गुप्त व्यवहार तेवढे हेरामार्फत चालत. यापैकीं दूत हे त्या त्या कामाच्या स्वरूपाप्रमाणें हल्लींचे परराष्ट्रीय वकील, प्लेनिपोटेंशियरी किंवा कॉन्सल होत. गुप्त हेरांत चाणक्यानें अनेक बारीक सारीक भेद सांगितले आहेत. त्यांचीं लक्षणें व त्यांचे कामाचे प्रकार मूळांतूनच वाचणें बरें. या हेरांच्या कामगिरीवर राज्याचा उत्कर्षापकर्ष अवलंबून असला तरी त्यांचा सामाजिक दर्जा हलक्या प्रतीचा असे आणि त्यांच्या नीतीविषयीं तर बोलावयासच नको ! आपल्या राज्याचा उत्कर्ष आणि शत्रूचा पाडाव घडवून आणण्याकरितां त्यांच्या हातून कोणकोणतीं भयंकर कृत्यें घडत असतील याचें विवेचन करण्यापेक्षां कोणतें भयंकर कृत्य त्यांच्या हातून होत नसेल याचाच विचार करणें सोपें. कारण तें एकाच वाक्यांत सांगतां येईल व तें असें कीं, चाणक्यानें त्यांना अमुक एक पाप वर्ज्य म्हणून सांगितलें असेल तर शपथ ! चिनी माणसाला ज्याप्रमाणें अभक्ष्य असें कांहींच नाहीं त्या प्रमाणें या हेरांना '**अकृत्य**' असें कांहींच नाहीं. अधिकरण ११, १२ व १३ यांत मुख्यत्वेंकरून या हेरांच्या मार्फत

घडवून आणावयाच्या कारस्थानांचाच विचार सांगितला असून तो सगळा भागच मनाला विलक्ष आणणारा आहे. त्यामुळेंच या हेरांच्या कामगिरीविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली आणि पुढें ही हेरांची संस्थाच जवळजवळ बंद झाली. शिवाजी महाराजांच्या पदरचे बहिरजी सारखे गुप्त माहिती काढून आणणारे हेर आणि चाणक्याच्या वेळचे घातपात करणारे हेर यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे हें वांचकांनीं लक्ष्यांत वागवावें. वेषांतर करून शत्रूच्या राज्यांत जाऊन तेथील इत्थंभूत माहिती काढून आणून ती आपल्या राजास विदित करण्यांत घातपात नसल्यानें त्यांत कांहीं अघोरीपणा नाहीं. परंतु चाणक्याच्या अर्थशास्त्रांतले हेर हे नुसते बातम्या काढून आणणारे गुप्तवातमीदार नसून प्रत्यक्ष घातपात करणारे असत व तेवढ्यासाठींच ते निंद्य वाटतात. पण हा सूक्ष्म भेद लक्षांत न राहिल्यानें हेरांच्या संस्थेविरुद्ध सुरू झालेली प्रतिक्रिया इतक्या परमावधीला गेली कीं, आपल्या शहराबाहेर काय चाललें आहे याचीहि राजे लोकांना दाद नाहींशी झाली आणि त्यामुळेंच गिझनीच्या महंमदा-सारख्याची किंवा अल्लाउद्दीन खिलजी सारख्याची टोळधाड आपल्या राजधानीच्या शेजारीं येऊन धडकली तरी तिचा प्रतिकार करण्याची तयारी नसल्यानें हिंदूंचीं राज्यें एकामागूनएक नामशेष झालीं.

दूत हा परराष्ट्राशीं संधिविग्रहादि धोरणाविषयीं वाटाघाट करावयास जाणारा प्रतिनिधी किंवा वकील असल्यानें त्याचा दर्जा मंत्रिपरिषदेंतल्या मंत्र्याप्रमाणें उच्च मानण्यांत येत असे. या दूतानें शत्रूच्या दरबारांत गेल्यावर कसें वागावें याचें मार्मिक वर्णन अर्थशास्त्राच्या पहिल्या अधिकरणांत १६ व्या अध्यायांत केलें आहे. उघड निरोप सांगावयास येणारा दूत अवध्य आहे ही कल्पना प्राचीन काळापासून आतांपर्यंत कायम असून अत्यंत दुष्ट राजे देखील हा शिष्टाचार अव्याहत पाळीत आले आहेत. परंतु या शिष्टाचाराचा दुरुपयोग करून शत्रूच्या राज्यांत फितुरी खेळविण्याचीं कारस्थानें करण्याची परंपराहि तितकीच अव्याहत चालू आहे आणि जोंपर्यंत मनुष्यस्वभाव बदलला नाहीं तोंपर्यंत केवळ नीतिशास्त्रांतील नियमांनीं या वागणुकींत फरक पडेल असें वाटत नाहीं.

राष्ट्राराष्ट्रांत तह घडवून आणणें किंवा तह मोडून युद्ध उपस्थित करणें हें या दूतांच्या कर्तृत्वावर अवलंबून असतें. एकदां एखाद्याशीं तह किंवा बिघाड झाला म्हणजे तो वज्रलेप झाला असें मानण्याइतका आर्यचाणक्य भोळसर नाहीं. शत्रुत्व किंवा मित्रत्व हें हेतूमुळें घडून येतें. हेतु बदलला कीं पूर्वीचें धोरण बदलणारच. तेव्हां एकदा एखाद्याशीं तह झाला कीं तो कायमचा असें चाणक्य मानीत नव्हता व इतरहि कोणी मुत्सद्दी तसें मानीत असेल असें वाटत नाहीं. जर्मन महायुद्धाच्या वेळीं बेल्जमशीं केलेल्या तहाला हेतुपुरस्सर नसतें महत्व देण्यांत आलें. पण आजपर्यंतची इतिहासाची परंपरा पाहिली तर कोणत्याहि दोन राष्ट्रां-तला तह, परिस्थिति बदलली तरी, तसाच कायम राहिला असें आढळून येत नाहीं. अर्थांतच चाणक्याला त्यानें प्रतिपादन केलेल्या तत्वाबद्दल दोष देतां येत नाहीं. जी गोष्ट उघड न बोलतां सर्वत्र आचरली जाते ती चाणक्यानें निःशंकपणें लिहून ठेविली एवढाच फारतर त्याचा दोष म्हणतां येईल. पण तो देखील दोष न मानतां गुण समजण्यास तरी काय हरकत आहे ? कारण मनुष्यस्वभाव कसा आहे हें उघड सांगण्यानेंच कित्येक अनर्थ टळतात.

परराष्ट्रीय संबंधांत जित राष्ट्रांशीं ठेवली जाणारी भारतीयांची वागणूक खरोखरच अत्यंत प्रशंसनीय होती. परराष्ट्राशीं युद्धप्रसंग घडून त्यांत त्याचा पराभव केला तरी त्याच्या राज्याचा सर्वस्वी अपहार करावा ही कल्पनाच भारतीय आर्यांना पापमूल वाटत असल्यामुळें जित शत्रूला ठार न मारतां किंवा बंदिवासांत कुजत न ठेवतां त्याजकडून खंडणी कबूल करून घेऊन व आपलें सार्वभौमत्व मान्य करून घेऊन त्याची परत आपल्या राज्यांत पाठवणी केली जाई. युद्धांत प्रतिपक्षीय राजा मृत झाल्यास त्याच्या वारसास गादीवर बसविण्यांत येई. शत्रूच्या राज्याचा, त्याच्या स्त्रियांचा किंवा कोशाचा अपहार करण्याची बुद्धि मनांत बाळगूं नये—" न चास्य भूमिद्रव्यदारानभिमन्येत " अधि. ७ अ. ११४—असें चाणक्यानें सांगितलें आहे. आणि भरतखंडांतील राजे आजपर्यंत ही राजनीति पाळीत आले आहेत म्हणूनच भरतखंडांत केव्हांहि एकच्छत्री राज्य न होतां छपन्नदेश व छपन्न राज्यें कायम राहिलीं. ज्या त्या घराण्याच्या उत्कर्षापकर्षाप्रमाणें सम्राटपद बदलत असे. परंतु मांडलिकांच्या राज्यांत ढवळाढवळ होत नसे. जो कोणी सम्राट ठरेल त्याला खंडणी तेवढी द्यावयाची. बाकीचा आपला अंतर्गत व्यवहार पूर्वीसारखाच चालू ठेवावयाचा अशी स्थिति मुसलमानांच्या स्वाऱ्या या देशांत सुरू होईपर्यंत चालू होती. आणि त्यामुळेंच परकीय अम्मल कसा असह्य असतो याची कल्पनाच हिंदी लोकांना येऊं शकली नाहीं आणि म्हणूनच त्यांनीं परकीयांच्या स्वाऱ्यांचा निकरानें प्रतीकार केला नाहीं. चाणक्यकालीन परराष्ट्रीय संबंधांत राज्यापहाराचे जित राष्ट्रांत कसे घोर परिणाम घडतात याचा विचार नव्हता हें कबूल करणें प्राप्त आहे.

## तेव्हां आणि आतां.

येथपर्यंत एकंदर ग्रंथाचें जें विहंगमदृष्टीनें पर्यालोचन केलें आहे त्यावरून 'कौटलीय अर्थशास्त्र' हा ग्रंथ कशा स्वरूपाचा आहे आणि राजनीतिशास्त्रांत त्याची केवढी थोरवी आहे त्याची वाचकांस थोडीबहुत तरी कल्पना आली असेल. वाचकांच्या मनांत या ग्रंथाच्या वाचनाविषयीं जिज्ञासा उत्पन्न व्हावी एवढ्याच पुरता हा सारांश दिला आहे. जागृत झालेली जिज्ञासा तृप्त करून घेण्याकरितां समग्र ग्रंथाचेंच अध्ययन केलें पाहिजे, कारण मूळ ग्रंथाची साकल्येंकरून कल्पना या सारांशांत येऊं शकणार नाहीं. का तर या ग्रंथांत एखाद्या किरकोळ विषयाचें विवेचन नसून हा ग्रंथ म्हणजे **ज्ञानकोशच** आहे. 'यांत जे नाहीं तें इतर कोठेंहि सांपडावयाचें नाहीं' हें विधान **महाभारताप्रमाणेंच** या ग्रंथालाहि शोभण्यासारखें आहे. कारण यांत ज्याचा अल्पांशानेंहि विचार नाहीं असा कोणताच विषय राहिला नाहीं.

या ग्रंथाचें सूक्ष्म दृष्टीनें परिशीलन केल्यानंतर वाचकांच्या मनांत असा एक प्रश्न उद्भवतो कीं, जग हें नेहमीं प्रगतिपर आहे असें म्हणतात पण ही प्रगति जगांतील एकंदर व्यवहाराच्या केवळ्या अल्पभागांत चालू असते व तीहि किती मंद गतीनें चालू असते! राज्यपद्धतीसंबंधाचा हा ग्रंथ सरासरी **साडेबावीसशें** वर्षांपूर्वी लिहिला गेला; त्यावेळेपासून किती तरी घडामोडी झाल्या, जुनीं राज्यें—साम्राज्यें गेलीं, नवीं उभारण्यांत आलीं; कित्येक जुन्या भाषा मृत झाल्या नव्या उदयाला आल्या आधिभौतिक शास्त्रांची कल्पनातीत वाढ झाली; तरी पण राज्यपद्धतींत म्हणजे **'वार्ताशास्त्रांत' व 'दंडनीतींत'** कितीसा फरक पडला? कौटल्यानें सांगितलेली राज्यपद्धति व घालून दिलेले नियम जुने पुराणे झणून ते निरुपयोगी झाले कीं काय? याचा तात्त्विक दृष्टीनें विचार करूं गेल्यास असेंच झणावें लागेल कीं, बाह्य साधनांत थोडाबहुत फरक झाला असेल; परंतु राज्ययंत्राच्या आवश्यकतेंत, त्याच्या उद्दिष्ट हेतूंत आणि तें राज्ययंत्र चालविण्याच्या पद्धतींत आणि चालविणारांच्या मनोरचनेंत सांगण्यासारखा कांहीं फेरबदल झाला नाहीं. अराजक अशा समाजस्थितींत मात्स्यन्याय प्रचलित होऊन समाजाचा संहार होऊं नये झणून राजाची किंवा तत्पदाधिष्ठित दुसऱ्या एखाद्या दंडधारी व्यक्तीची जरूरी समाजाला पूर्वीइतकीच हल्लींहि भासत आहे आणि तें राज्ययंत्र चालविणाऱ्या संस्था, त्यांचें उद्दिष्ट आणि त्यांचे सूक्तासूक्त मार्ग यांतहि कांहीं विशेष फरक पडला नाहीं. जो कांहीं फरक पडला आहे तो साधनांच्या संबंधांत होय. साधनें बदललीं पण साध्य तेंच कायम आहे आणि साधकाची मनोभावनाहि तीच कायम आहे. अर्थातच तेव्हांच्या व आतांच्या राज्ययंत्रांची तुलना करावयाची झाल्यास ती साधनांच्या फेरफारापुरतीच करतां येईल तशी तुलना करून उभयतांत कोठें सादृश्य आहे व कोठें अंतर पडलें आहे त्याचें सिंहावलोकन करून हें प्रकरण आटोपतें घेऊं.

चाणक्य कालीन राज्यपद्धतीची आधुनिक कालांतील राज्यपद्धतीशीं तुलना करतांना चाणक्यानें वर्णिलेली राज्यपद्धति लोकायत्त, किंवा लोकप्रतिनिधिनियंत्रित अशी नसून अनियंत्रित राज्यपद्धतीच त्याच्या कालांत सर्वत्र रूढ असावी असें दिसतें. मंत्रिपरिषदेचें किंवा जनतेंतील पुढाऱ्यांचें मत राजानें विचारांत घेणें श्रेयस्कर असल्यानें तसें मत घेण्यांत येत असलें तरी राजावर तत्संबंधीं कायदेशीर नियंत्रण कांहींच नव्हतें. मात्र अंतःकोप उद्भवल्यास दुष्टराजाची त्यांत आहुती पडते ही भीति राजांना असे-पण तूर्त आपल्याला राज्यकारभारांतील निरनिराळ्या खात्यांची व्यवस्था त्यावेळीं किती परिणतावस्थेस पोचली होती एवढेंच पहावयाचें आहे, व त्या दृष्टीनें तेवढ्यापुरताच विचार केल्यास चाणक्यकालीन राज्यपद्धतींत आणि अलीकडील राज्यपद्धतींत अंतर अगदींच थोडें असल्याचें दिसून येईल. एकोणिसाव्या शतकांतील आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें आणि तत्पूर्वीच्या कांहीं शतकांतील छापण्याची कला व बंदुकीची तोफांची दारू एवढे अर्वाचीन शोध वगळल्यास आर्यचाणक्य कालीन राज्यपद्धति आधुनिक राज्यपद्धतीहून कोणत्याहि बाबतींत हिणकस ठरूं शकणार नाहीं. हल्लींचा दिवाणी कोर्टांतला न्याय किती कालहरण व द्रव्यहरण करणारा आहे हें पाहिलें असतां चाणक्यकालीन न्यायपद्धतीच हल्लींच्याहून सरस ठरेल. आयातनिर्गत मालावर जकात कोणत्या धोरणानें घ्यावी; तसेंच मुक्तद्वार व्यापार चांगला का संरक्षक जकात पद्धति चांगली या विषयीं अद्यापिहि आधुनिक अर्थशास्त्रज्ञांत वाद चालू आहे आणि इंग्लंडसारख्या सुधारणेच्या कळसास चढलेल्या राष्ट्रांतहि आज एक पद्धति तर उद्यां दुसरीच पद्धति पुढें येऊन अनिश्चितपणा पसरलेला आहे. परंतु जकातपद्धतींत राजानें आपल्या राष्ट्रांतील उद्योगधंद्यास व व्यापारास अनुकूल होतील असेच नियम करावे हें **जर्मन अर्थशास्त्रज्ञ लिस्ट** याचें मत चाणक्यानें बावीसशें वर्षांपूर्वीच नमूद करून ठेवलें आहे.

खाणीसारखे महत्वाचे व उत्पादक धंदे खासगी मालकीचे न ठेवतां ते सरकारी मालकीचे असावे, मजुरांना काम करतांना अपघात झाल्यास नुकसानभरपाई मिळावी, कामकऱ्यांच्या आजारीपणांत व स्त्रियांच्या बाळंतपणांत त्यांना द्रव्यसहाय्य मिळावें, बेकार व अनाथ यांचें पालनपोषण करण्याची जबाबदारी राजावर आहे इत्यादि समाजसत्तावाद्यांचीं तत्वेंहि त्यावेळीं अमलांत होतीं. मजुरी घेऊन काम न करणाऱ्यांना कडक शिक्षा देण्यांत येत असे हें खरें. पण शिक्षेच्या कडकपणाचा हा दोष केवळ चाणक्यकालीन राज्यपद्धतींतच दिसून येत नसून इंग्लंडसारख्या देशांतहि गेल्या शतकापर्यंत ' कांकडीच्या चोरीला फांशीची शिक्षा ' असला कठोर न्याय अंमलांत होता. तेव्हां त्या बाबतींत आर्य चाणक्यालाच कांहीं दोष देतां येणार नाहीं.

शेतीकरितां पाटबंधाऱ्यांची व्यवस्था, दुष्काळांत सूट व तहकुबी, दुष्काळांत रिलीफ कामें व सांथीच्या रोगाचे वेळीं प्रजाजनांचें स्थलांतर, दुभतीं जनावरें व वासरें यांच्या वधाला बंदी, मद्यपानाला आळा, गायरानांची मुबलक सोय, जनावरांचे दवाखाने, द्यूत व शर्यती यांना कडक निर्बंध, चोरांचा बंदोबस्त व चोरीस गेलेल्या मालाची भरपाई, सरकारी अधिकाऱ्यावर कडक नजर आणि लोकांची तक्रार कानीं येतांच नोकरशाहीची भीडमुर्वत न धरतां जुलमी अधिकाऱ्याची वाईट हवेच्या जागीं बदली इत्यादि बाबतींत तुलना केल्यास त्या वेळची राज्यपद्धति हल्लींच्या राज्यपद्धतीपेक्षां अधिक लोकहितकारक व लोकप्रिय ठरेल. सांपत्तिक स्थितीच्या मानानें पाहिल्यास त्या वेळचीं प्रजा हल्लींच्या पेक्षां सधन असावी असें दिसतें. '**कोशप्रवेश्यरत्नपरीक्षा**' नांवाच्या पूर्वार्धातील ३२ व्या अध्यायांत मोत्यांच्या व रत्नांच्या दागिन्यांचीं जीं नांवें दिलीं आहेत त्यावरून त्या वेळच्या संपत्तीचें अनुमान करितां येतें. २० सरांपासून तो १००८ सरां पर्यंतचे मोत्याचे दागिने त्यांत सांगितले आहेत. इतक्या सरांचा हार या देशांत हल्लींच्या अत्यंत धनाढ्य व्यापाऱ्याजवळ तरी पहावयास मिळेल का नाहीं याची वानवाच आहे. त्या वेळच्या हारांच्या व रत्नांच्या नांवाचा देखील अलीकडे विसर पडला व ते शब्द भाषेंतून देखील लुप्तप्राय झाले यावरून त्यावेळच्या स्थितींत व आजच्या स्थितींत पडलेलें अंतर स्पष्ट दिसून येईल.

अर्थशास्त्रांत शिक्षणपद्धतीबद्दल व शिक्षणाच्या व्यवस्थेबद्दल मात्र सविस्तर विवेचन आढळत नाहीं. उपनयनानंतर ब्रह्मचाऱ्यांस शिक्षण देण्यासंबंधाचे उल्लेख आढळतात आणि राजपुत्रास कोणकोणती शास्त्रें शिकवावीं या विषयींहि उल्लेख सांपडतात. परंतु शिक्षणाकरितां राजेलोक काय करीत याचा खुलासा कोठेंच आढळत नाहीं. यावरून शिक्षणाची सोय करणें हें राजाच्या कर्तव्यांत येत नसून गुरुगृहींच सर्व अध्ययन होत असे व त्याबद्दल सरकारला कांहींच प्रत्यक्ष खर्च करावा लागत नसे असें अनुमान निघतें. पण शिक्षणाची व्यवस्था सरकारमार्फत न होतां तिची जबाबदारी समाजावरच टाकण्यांत आली यानेंच तर सर्व बिनसलें. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत बारीक सारीक किरकोळ खात्यांच्याहि अध्यक्षांची योजना सांगितली असून त्यांच्या कामाचा तपशीलहि वर्णिला आहे. पण त्या यादींत **शिक्षणाधिकारी** कोठेंच आढळत नाहीं. तो एक त्यांत असता तर हिंदुस्थानाची चाणक्यकालीन उन्नतस्थिति अखंड राहिली असती. पाश्चात्य राष्ट्रांतील सार्वत्रिक व सक्तीचें शिक्षण आणि त्याचबरोबर **पेटंट** देण्याच्या दूरदर्शी कायद्यामुळें कल्पकतेला मिळालेलें प्रोत्साहन या दोन कारणांमुळें पाश्चात्य राष्ट्रांनीं अलीकडे आघाडी मारली असून त्या दूरदर्शीपणाच्या अभावामुळें आर्यावर्त हल्लींच्या शर्यतींत मागें पडला. मी जें ज्ञान संपादन करीन किंवा जी अजबयुक्ति शोधून काढीन तिचा फायदा मलाच मिळावा, इतरांनीं मजपासून तो हिरावून घेऊं नये, पण त्याबरोबरच माझें ज्ञान माझ्या पश्चात् लुप्त होऊं नये, या परस्परविरोधी भावनांची सांगड कशी घालावी याची कल्पना हिंदी लोकांस सुचली नाहीं. त्यामुळें प्रत्येक कलेचें व शास्त्राचें ज्ञान गुप्त ठेवावें, आपल्या शिष्यशाखे पलीकडे त्याची परिस्फुटता होऊं देऊं नये, अशी प्रवृत्ति इकडे सुरू झाली. तीमुळें कित्येक नवेनवे शोध त्या त्या संशोधकाच्या देहाबरोबरच सहगमन करते झाले ! आणि ज्याप्रमाणें कोंडलेल्या हवापाण्यांतलें झाड फोफावण्याच्या ऐवजीं दिवसेंदिवस खुरटत जातें त्याप्रमाणें आपल्या देशांतलें प्राचीन कलाकौशल्य वृद्धिंगत होण्याच्या ऐवजीं संकुचित होत चाललें. भरतखंडाची चाणक्य कालीन समाजस्थिति त्या वेळच्याच नव्हे तर त्यानंतरच्या दीड हजार वर्षेंपर्यंतच्या कोणत्याहि देशांतल्या समाजस्थितीहून यत्किंचितहि कमी दर्जाची नव्हती. असें असून पूर्वजांची एवढी अद्भुत पुण्याई आणि भरतखंडासारख्या सुवर्णभूमीचा आपल्या ताब्यांत आलेला प्रत्यक्ष ठेवा आपण राखूं शकलों नाहीं याला कारण ज्ञानाची अभिवृद्धि खुंटली हेंच होय. आर्यचाणक्याचें अर्थशास्त्र गेलीं दहा शतकें लुप्त राहिलें यावरूनच व्यावहारिक विद्याभिवृद्धीची आपण केवढी हेळसांड केली तें दिसून येतें. असो. आपल्या पूर्वजांच्या ज्ञानाचा व त्यांच्या थोरवीचा जो हा अमोलिक ठेवा सुदैवानें आपणास लाभला आहे त्याच्या अध्ययनानें जर प्राचीन आर्यांच्या पराक्रमाची आणि अगाध बुद्धिमत्तेची यथार्थ कल्पना आपणास येईल व तीमुळें आपल्या महत्वाकांक्षेस चालन मिळेल तर आर्यचाणक्यानें हा अपूर्व ग्रंथ लिहून ठेवल्याचें सार्थक झालें असेंच म्हणतां येईल.

ज. स. करंदीकर, पुणें.

# कांहीं वादग्रस्त स्थलांचें विवेचन

प्रस्तुतच्या ग्रंथाचा जो पूर्वार्ध प्रसिद्ध झाला त्यांत कांहीं वादग्रस्त स्थलांच्या अर्थाविषयीं चर्चा केली होती. हेतु हा कीं त्या दुर्बोध स्थळांची दुर्बोधता दूर व्हावी. परंतु एक दोन अपवाद सोडून इतर कोणाकडूनहि विशेष सरस असे अर्थ सुचविले गेले नाहींत. अर्थांची सर्वांत अधिक अशी चर्चा '**लोकशिक्षण**' मासिकांत **पंडित बाळाचार्य खुपेरकर** यांनीं केली आहे. त्यांतला कोणता भाग मला अग्राह्य वाटतो आणि कोणता ग्राह्य वाटतो याचा उहापोह पुढें यथाक्रम येणारच आहे. परंतु **पंडित बाळाचार्य** यांच्या एकंदर टीकेचा जो रोख आहे त्यासंबंधीं मला एवढेंच सांगावयाचें कीं, त्यांनीं प्रस्तुत पुस्तकाच्या भाषांतराविषयीं प्रथम भलतीच, म्हणजे माझ्या हेतूच्या व आंवाक्याच्याहि बाहेरची, अपेक्षा मनांत बाळगली आणि म्हणून त्यांना निराशेच्या दुःखांत पडावें लागलें, त्यास माझा नाइलाज आहे. चाणक्याच्या अर्थशास्त्राचें मराठी भाषांतर करण्यास मी कसा व कां प्रवृत्त झालों याचें मी पूर्वार्धांत आत्मनिवेदन केल्यानंतर त्या मुद्दयाचा पं. खुपेरकर यांनीं इतका कीस काढावयास नको होता.

तथापि त्यांनीं पाठभेद व भाषांतर यांच्या मध्यें कांहीं ठिकाणीं विसंगतता आहे असें जें दाखविलें आहे त्याचा खुलासा करणें प्राप्त आहे. पूर्वार्धांतील '**आत्मनिवेदन**' हा भाग ज्यांनीं वाचला असेल त्यांना हें विदित झालें असेल कीं, प्रथमतः या ग्रंथाचें मूळ न देतां **नुसतेंच मराठी भाषांतर** प्रसिद्ध करण्याचा हेतु होता. आतांपर्यंत इंग्रजी, हिंदी, जर्मन इत्यादि भाषांतून जीं भाषांतरें प्रसिद्ध झालीं तींहि वेगळ्या पुस्तकरूपानेंच प्रसिद्ध झालीं आहेत; वर संस्कृत व खालीं भाषांतर अशीं तीं प्रसिद्ध झाली नाहींत. अर्थातच हिंदी वाचकांना जसें हिंदी भाषांतर उपलब्ध झालें तसें केवळ मराठी वाचकांनाहि चाणक्याच्या ग्रंथाचें मराठीभाषांतर उपलब्ध व्हावें हाच मनांतला मुख्य हेतु होता. मराठी वाचकांना चाणक्याच्या अर्थशास्त्राची थोडीबहुत कल्पना यावी आणि मराठी भाषेंत त्या विषयावरील एका ग्रंथाची भर पडावी याच दृष्टीनें भाषांतर केलें गेलें व छापलेंहि गेलें. अर्धें अधिक भाषांतर छापून निघाल्यावर मग मूळ संस्कृतहि या भाषांतराबरोबरच द्यावें अशी कल्पना उद्भवली आणि त्यानंतर मूळ संस्कृत छापण्यास सुरवात झाली. संस्कृत भाग छापण्याचा पूर्वी बेत नसल्यामुळें भाषांतर करितांना शामशास्त्री यांनीं दिलेल्या अनेक पाठभेदांपैकीं कोणता पाठभेद स्वीकारला व कोणता सोडला याची शब्दशः चिकित्सा करण्याचें व नोंद ठेवण्याचें कारण पडलें नव्हतें. पण पाठीमागून मूळग्रंथ छापण्याकरितां प्रत तयार करण्याचेवेळीं ती अडचण भासूं लागली. कारण तींत केवळ शामशास्त्र्यांचे सगळे पाठ स्वीकारतां येईनात व केवळ गणपतिशास्त्री यांचेहि सगळे स्वीकारतां येईनात. कारण कांहीं ठिकाणीं शामशास्त्र्यांचे पाठभेद सरस वाटले तर कांहीं ठिकाणीं गणपति शास्त्री यांचे पाठभेद सरस वाटले व ते ते भाषांतरांत स्वीकारण्यांत आले होते. अशा रीतीनें पाठभेदांची गल्लत झाली असल्याकारणानें छपाई करितां संस्कृत प्रत तयार करतांना क्वचित्स्थलीं पाठ एक व भाषांतर वेगळें असें झालें असल्याचा संभव आहे.

पण उत्तरार्धांत मूळ संस्कृत देण्याचा विचार पूर्वीपासूनच ठरला असल्यामुळें पाठभेदाच्या बाबतींत पूर्वार्धाहून अधिक काळजी घेतली आहे. शिवाय या भागांत छपाईची रचनाच वर संस्कृत व खालीं मराठी अशी केली असल्यामुळें तेथल्या तेथें पाठभेद ताडून पाहतां आले. तरीपण वाचकांना इतकें सुचवून ठेवावेसें वाटतें कीं, क्वचित स्थळीं पाठभेदांत अंतर पडलें असल्याचा अगर एखाद दुसरा शब्द गळलेला असण्याचा संभव आहे. पण त्याकडे विशेष लक्ष न देतां एकंदर वाक्यांच्या अर्थाकडेच नजर द्यावी. '**संपूर्ण**' भाषांतर याचा अर्थ '**शब्दशः**' किंवा '**अक्षरशः**' भाषांतर असा नसून ग्रंथाचा कोणताहि भाग न सोडतां केलेलें भाषांतर एवढाच अर्थ मी समजतों. आणि त्यालाहि एक अपवाद म्हणून वाचकास अगाऊच कळवून ठेवतों कीं, जारणमारणादि प्रयोगांत जे मंत्र म्हणावयाचे असतात ते मंत्र जसाचे तसे म्हणावयाचे असल्यानें त्या मंत्रांचें भाषांतर दिलेलें नाहीं. असो. चाणक्याच्या अर्थशास्त्रांतील विषयाचा परिचय संस्कृत न जाणणाऱ्या मराठी वाचकांनाहि व्हावा एवढाच हेतु हें भाषांतर करण्यांत असल्यामुळें त्याहून अधिक अपेक्षा मनांत धरून कोणीहि निराश होऊं नये म्हणून ही सूचना अगाऊ करून ठेवीत आहे.

असो. आतां पूर्वार्ध प्रसिद्ध झाल्यानंतर अर्थांच्या संबंधानें ज्या कित्येक सूचना नजरेस आल्या त्यांचा विचार करूं.

## कांहीं सूचनांचा परामर्श.

पुस्तक वाचून सद्भावनेनें पहिली सूचना करणारे सद्गृहस्थ नाशीकचे वैद्यराज दि. कृ. देवधर हे होत. त्यांनीं पहिल्या अधिकरणांतील 'निशान्तप्रणिधि' भागांतील 'पृष्ठतः कक्ष्याविभागे स्त्रीसन्निवेशो गर्भव्याधीवैद्यप्रख्यातसंस्था वृक्षोदकस्थानं च' याचा अर्थ 'गर्भिणी, व्याधिग्रस्त ( राजाचे आप्त ) आणि वैद्य यांचे करितां पाठीमागील भागांत मंदिरें बांधावीं' असा सुचविला आहे; आणि त्याला वाग्भटाच्या ग्रंथांतला आधारहि दाखविला आहे. वाग्भट एवढेंच सांगतो कीं, राजवाड्याच्या शेजारीं वैद्याची राहण्याची जागा असावी. पण तेवढ्यावरून अंतःपुरांत राजस्त्रिया राहण्याच्या जागेजवळ वैद्यांना राहण्याला स्थान मिळेल असें म्हणवत नाहीं. आणि प्रस्तुतच्या वाक्यांत अंतःपुरातल्या अगदीं आंतल्या भागाचेंच वर्णन आहे. शिवाय गर्भ म्हणजे गर्भिणी, व्याधि म्हणजे व्याधिग्रस्त इत्यादि अर्थ करतांना शब्दांची उघड उघड ओढाताण करावी लागते; सबब तो अर्थ ग्राह्य मानतां येत नाहीं.

**मदिरागृह** म्हणज देवीचें देवालय नसून '**दारूचा गुत्ता**' च होय असा अर्थ एका आक्षेपकांनीं दिला आहे. पण तो अर्थ ग्राह्य मानतां येत नाहीं. शिव, वैश्रवण, अश्विनी कुमार यांच्या जोडीनें दारूच्या गुत्त्याचा उल्लेख असणें असंभाव्य होय. मदिरा म्हणजे काली किंवा चामुंडा देवी असा अर्थ तंत्रग्रंथांतून प्रसिद्ध आहे आणि जर्मन भाषांतरकार मेयर यानेंहि तंत्रग्रंथांतील आधार देऊन तोच अर्थ दिला आहे.

'**ब्रह्मचर्यमाषोडशाद्वर्षात्**' यांतील ब्रह्मचर्याची १६ वर्षांची कालगणना, कोठून करावयाची ? जन्मापासून कां उपनयनापासून ? कौटिल्यानें ही कालगणना उपनयनापासून केली आहे असें मी समजतों. पं. खुपेरकर हे मेधातिथि, विज्ञानेश्वर, मल्लिनाथ इत्यादिकांचा आधार देऊन ही मुदत जन्मापासून मोजावयाची असें म्हणतात. ब्रह्मचर्य जें पाळावयाचें तें उपनयन विधिपासूनच पाळतां येणार; उपनयनापूर्वी मुलाला कोणीहि ब्रह्मचारी समजत नाहीं. अर्थांतच ब्रह्मचर्याची जी कोणती मुदत दिली असेल ती उपनयना पासूनच घेणें युक्त होय. प्रत्येक वेदाच्या अध्ययनाकरितां द्वादश वर्षे, निदान पांचवर्षे तरी ब्रह्मचर्य पाळावें असा जो कालावधि सांगितला आहे तो कोठून मोजावयाचा ? जन्मापासून कां उपनयनापासून ? तो जर जन्मापासून मोजावयाचा नाहीं, तर त्याच श्लोकांतला गोदानविधीचा कालावधि तेवढा जन्मापासून कां मोजावयाचा ? प्रत्येक वेदांचें अध्ययन बारा वर्षे करणाऱ्यास ३६ वर्षे ब्रह्मचर्य ( उपनयनापासून ) पाळावें लागतें. बारा वर्षांच्या ऐवजीं प्रत्येक वेदाचें अध्ययन ५ च वर्षे करणाऱ्यास १५ वर्षे ब्रह्मचर्य ( उपनयनापासून ) पाळावें लागतें. हे अर्थ करतांना कालावधि उपनयापासूनच मोजण्यांत येतो.

कौटिल्याचें मूळ वचन '**ब्रह्मचर्यं आ षोडशाद् वर्षात् । अतः गोदानं दारकर्मच**' असें आहे. यांत सोळावर्षेपर्यंत ब्रह्मचर्य पाळावें असें सांगितलें आहे. आणि उपनयनाशिवाय ब्रह्मचर्य व्रतास प्रारंभच होत नसल्यानें हीं सोळा वर्षे उपनयनापासून मोजावयाचीं हें उघड आहे. पुढें '**अतः**' म्हणजे **तदनंतर** असें पद घालून गोदानविधि व विवाहविधि यांचा मागील कालावधीशीं संबंध जोडला आहे. ब्रह्मचर्याची मुदत सोळावर्षे असा स्पष्ट निर्देश करून त्यानंतर जो विधि सांगितला तो ब्रह्मचर्याच्या प्रारंभापासून सोळा वर्षांनीं घेतला पाहिजे. कारण '**जन्मापासून**' असा अर्थ ज्या पदांतून निघेल असें पद तेथें मुळींच नाहीं. मनुस्मृतींत किंवा याज्ञवल्क्यस्मृतींतहि '**ब्रह्मचर्या**'च्या प्रारंभापासूनच सर्व कालमर्यादा सांगितल्या आहेत; **जन्मापासून** सांगितल्या नाहींत. मेधातिथि, विज्ञानेश्वर, मल्लिनाथ वगैरेंनीं मुळांत नसलेला अर्थ त्यावर लादला असेल; कारण त्यांच्या वेळीं बालविवाहाची पद्धति रूढ झाली होती. पण आम्हाला अलीकडच्या टीकाकारांच्या वेळची पद्धति पहावयाची नसून चाणक्याच्या वेळची पद्धति पहावयाची आहे आणि चाणक्याच्या वेळीं बालविवाह सुरू झाला होता असें जें रा. टिपणीस यांनीं विधान केलें आहे तें मुळाला धरून नाहीं एवढेंच आम्हांस दाखवावयाचें आहे.

"**तस्योपकरणं प्रमाणं...खरपट्टादागमयेत्**" ( अधि. ४ अ० ८५ ) यांत कैद्याला जी शिक्षा द्यावयाची ती कोणत्या साधनांनीं, कोणत्या वेळीं, किती प्रमाणांत द्यावयाची हें शिक्षा देणाऱ्यानें बजावणी कामगारास ( जेलरास ) कैद्याच्या लोखंडी बिल्ल्यावर लिहून कळवावें असें सांगितलें आहे. यांतील **खरपट्ट** याचा अर्थ लोखंडी बिल्ला असा न करितां खरपट्ट यांनीं लिहिलेल्या **ग्रंथावरून** या शिक्षा ठरवाव्या असा अर्थ गणपति शास्त्री वगैरेंनीं केला आहे, खरपट्ट नांवाचा ग्रंथकार होता या विषयीं किंवा तो ग्रंथ पाहिल्या विषयीं कोठेंच पुरावा उपलब्ध नाहीं. शिवाय ज्या चाणक्यानें इतर सर्व बारीक सारीक

१०

तपशील स्वतःच्या ग्रंथांत दिला तो या एकाच ठिकाणीं शिक्षेची बजावणी कशी करावी तें अमकऱ्याच्या ग्रंथावरून समजून घ्या असा हवाला देईल हें संभवनीय दिसत नाहीं. असा हवाला इतरत्र कोणत्याहि बाबतींत चाणक्यानें दिला नाहीं. अर्थातच या ठिकाणीहि तसा हवाला दिल्याचा अर्थ घेण्याचें कारण नाहीं. **खरपट्ट** म्हणजे लोखंडाचा पत्रा असा अर्थ कोशांत आहे. आणि आरोपीला फटके केव्हां किती मारावे, चक्की किती दळून घ्यावी, दंडाबेडी किती दिवस घालावी इत्यादि शिक्षेच्या **बजावणीचे** प्रकार **न्यायाधीशानें जेलरला** कळण्याकरितां लोखंडी बिल्ल्यावर लिहून कळवावे व ते पाहून जेलरनें त्याची बजावणी करावी हा अर्थ सीधा व सुसंगत दिसतो.

**छायानलिकाप्रतोदेन** याच्या अर्थाची चर्चा कै. रा. हिवरगांवकरांनीं आपल्या प्रस्तावनेंत केली आहे. म्हणून तिची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. '**अप्रार्थनीयो राजा विपन्ने घातः संपन्ने नरकपातः**' (अधि. १ अध्या. १७) याचाहि नवाच अर्थ रघुवंशाच्या आधारें त्यांनीं सुचविला आहे. तो अर्थ **अप्रार्थनीय** म्हणजे **अद्वेष्य** या अर्थापेक्षां सरस असून मान्य होण्याजोगा आहे. पण इतका द्राविडी प्राणायाम करण्यापेक्षां '**अप्रार्थनीयो राजा** याचा अर्थ '**राजाजवळ भीड चालावयाची नाहीं**' हाच मला अधिक सुसंगत वाटतो. कारण त्यांत '**विपन्ने घातः**' या भीतीचें सकारणत्व दर्शविलें जातें. राजाला ठार मारण्याचा बेत जर फसला तर घात होईल; कां तर राजा कांहीं कोणाचीहि भीड ऐकून शिक्षा माफ करणार नाहीं. अशी भीति राजपुत्राच्या मनांत बिंबवून त्यास अकार्यापासून परावृत्त करणें हेंच अधिक व्यवहार्य आहे. आणि 'अप्रार्थनीय' याचा अर्थ अद्वेष्य असा कोठल्याच कोशांत सांपडत नाहीं.

## नवीन वादग्रस्त स्थलें.

पूर्वार्धांतील ज्या वादग्रस्त स्थलांविषयीं थोडीबहुत चर्चा माझ्यानजरेस आली तिचा विचार येथवर झाला. आतां उत्तरार्धांतील कांहीं वादग्रस्त स्थलांची चर्चा करावयाची. परंतु पूर्वार्धांत शंकित स्थलांचें जें विवेचन केलें त्यावर वाचकांकडून जशी चर्चा होईल अशी अपेक्षा होती तशी चर्चा झाली नाहीं. आणि मुख्यतः नवीन अर्थ कोणी सुचविला नाहीं. गणपतिशास्त्री काय अर्थ करितात हें टीकाकारांनीं सांगण्यापूर्वीच मी स्वतः पाहिलेलें आहे. परंतु तो अर्थ कोणत्या तरी कारणामुळें तेथें जुळत नाहीं असें वाटल्यावरूनच मी तें शंकास्थल वाचकांपुढें मांडलें होतें. उद्देश हा कीं, शामशास्त्री, गणपतिशास्त्री इत्यादिकांहून नवा एखादा सरस व सुसंगत अर्थ कोणी तरी कळवावा. तो उद्देश सिद्धीस गेला नाहीं. तथापि उत्तरार्धांतील कांहीं विशेष वादग्रस्त स्थलांचें विवेचन करण्याचा हेतु अगदींच सोडून न देतां दोनतीन शंका थोडक्यांत पुढें मांडीत आहे. या किंवा मूळ ग्रंथांतील अन्य कोणत्याहि वाक्याचा नवा अर्थ जर कोणास कळवावयाचा असेल तर त्यांनीं तो अगत्य कळवावा. गणपतिशास्त्री किंवा शामशास्त्री यांचाच अर्थ वाचकांस ग्राह्य वाटत असल्यास तो मी पाहिलेला असल्यानें त्याच्या पुनरुक्तीची मात्र अपेक्षा नाहीं.

अध्याय १२७ च्या शेवटचा श्लोक "**वितंसगिलवच्चारीन् योगैराचरितैः शठः । घातयेत् परमिश्रायां विश्वासेनामिषेणच**" असा गणपतिशास्त्री यांनीं दिला आहे. शामशास्त्री यांनीं 'पीतं सगलवच्चारीन्' असा पाठ छापला आहे आणि दुसरें पाठांतर कांहींच दिलें नाहीं. शामशास्त्री यांच्या पाठापासून कांहींच बोध होत नाहीं जर्मन भाषांतरकार मेयर 'वीतं सगलवच्चारीन् योगैराचरितैः शठान्' असा पाठ देतो. पण त्याचाहि अर्थबोध नीटसा होत नाहीं. गणपतिशास्त्री यांचा पाठ स्वीकारल्यास 'जाळ्यामध्यें पक्ष्याचें चित्र व आमिष ठेवून पक्ष्यांना विश्वास दाखवून व भुलवून जसें पकडतात त्याप्रमाणें शठ राजानें शत्रूंना कपट प्रयोगांनीं विश्वास दाखवून व फसवून त्यांचा घात करावा' असा अर्थ निष्पन्न होतो व तो संदर्भालाहि जुळतो. पण ज्या अर्थी शामशास्त्री दुसरा पाठभेद देतच नाहींत त्याअर्थी मूळ ग्रंथांत 'पीतं' असावें कां 'वीतं' असावें कां 'वितंस' असावें; त्याचप्रमाणें 'गलवत्' का 'गिलवत्', 'शठः' कां 'शठान्' अशा अनेक शंका उद्भवतात. तेव्हां शामशास्त्री यांचा 'पीतं सगलवच्चारीन्' हा पाठ खरा धरून जर कोणास संदर्भाला जुळेलसा अर्थ बसवितां येत असेल तर तो अधिक ग्राह्य होईल.

अध्याय १३६ मध्यें '**सर्वत्रानुप्रणतः कुलैडक इव निराशो जीविते वसति**' असें वाक्य आहे, दुर्बळ राजानें शत्रूपुढें सदोदित मान वाकवून त्याच्या मर्जीप्रमाणें वागावें असा पूर्वपक्ष करून त्याचा दोष प्रस्तुतच्या वाक्यांत दर्शविला आहे. सर्वांच्याच पुढें मान वाकवून दीनपणानें वागणाऱ्या राजाला **कुलैडका** प्रमाणें स्वतःच्या जीविताची निराशाच वाटत असते असा अर्थ सर्वांनींच केला आहे. पण—**कुलैडक** म्हणजे काय ? 'कळपांतून चुकलेला मेंढा' असा अर्थ गणपति शास्त्री

यांनीं केला आहे. जर्मन भाषान्तरकार मेयर यानें प्रथम ' कूलैडकः ' असा पाठ घेऊन ' समुद्राच्या किनाऱ्यावर चुकून राहिलेला मेंढा ' असा अर्थ दिला होता. पाठीमागून ' अकुलैडक' असा पाठ घेऊन, ' कळपांतून चुकलेला ' असा अर्थ त्यानें केला. परंतु ' अकुलैडकः ' असा पाठ गणपतिशास्त्री देत नाहींत. पण–' कुलैडकः' असाच पाठ स्वीकारून अर्थमात्र ' कळपांतून चुकलेला ' असा देतात. ' कुलैडकः' यांतून 'कळपांतून चुकलेला' असा अर्थ कसा निघतो ? अध्याय १४१ मध्येंहि हाच 'कुलैलक' किंवा 'कुलैडक' शब्द पुनः आला आहे. तेथेंहि अकुलैलक असा पाठभेद नाहीं व ' अकुलैलक ' असा पदच्छेदहि करतां येत नाहीं. तेव्हां याचा अर्थ काय करावयाचा ? माझ्या मतें ' कुलैडक ' म्हणजे ' घरांत वाळगलेला मेंढा ' असा अर्थ घ्यावा. हा अर्थ पदाला धरून आहे आणि संदर्भालाहि जुळतो. घरांत पाळलेला मेंढा जीविताविषयीं निराश असणारच; कारण केव्हां ना केव्हां तरी त्याच्या मानेवर सुरी बसणार ! सदोदित शत्रूपुढें मान लववून राहणाऱ्याला तो शत्रु आपल्या मानेवर केव्हां घाव घालील याचा भरंवसा नसल्यामुळें जीवाची निराशाच वाटत असते; म्हणूनच घरीं पोसलेल्या मेंढ्यांशीं त्याचें साम्य जुळतें. तेव्हां अध्याय १३७ व १४१ या दोनहि ठिकाणीं ' **कुलैडक** ' याचा अर्थ बळी देण्याचे उद्देशानें ' घरांत पाळलेला मेंढा ' असा करावा. यूथभ्रष्ट असा अर्थ केल्यास त्यांत ' शत्रूशीं नमून वागणाऱ्या राजाच्या वृत्तीशीं ' साम्य मुळींच जमत नाहीं.

अध्याय १४१ मध्यें ' **साधारणगर्दभेन दक्षान्** ' येथपासून **गर्दभीक्षीराभि मंथनेन ध्रुवापकारिणः** ' येथपर्यंतचा सर्वच परिच्छेद चाणक्याच्या सूत्ररूप भाषेचें एक नमुनेदार उदाहरण आहे. पण या सूत्ररूपभाषेमुळेंच अर्थकरण्याला हा परिच्छेद अति कठिण आहे. यांत दोन दोन किंवा तीन तीन शब्दांचें एकेक वाक्य अशीं अनेक वाक्यें केवळ उपमेकरितां एकापुढें एक आलीं आहेत. शत्रूच्या पक्षांतल्या निरनिराळ्या माणसांना कसें चिडवावें व त्यांच्यांत फूट कशी पाडावी याचा यांत उपाय सांगितला आहे. ' साधारणगर्दभेन दक्षान् ' असें पहिलेंच वाक्य आहे. यांत '**उत्साहयेत्**' हें क्रियापद प्रत्येक वाक्यापुढें अध्याहृत आहे असें समजावयाचें. तेव्हां शत्रुपक्षांतील जीं माणसें दक्ष असतील, म्हणजे राजासाठीं जिवापाड श्रम करीत असतील, त्यांना तुम्ही गाढवासारखे फुकट राबतां असें म्हणून गाढवाची उपमा देऊन चिडवावें; त्याचप्रमाणें जीं माणसें उद्विग्न झालीं असतील त्यांना ' राजा तुम्हांस मेंढ्यासारखा आज पोसीत आहे, पण प्रसंग येतांच तो तुम्हांस बळी देऊन आपण आपलें कार्य साधील असें म्हणून चिडवावें, असें म्हटलें आहे. यांतलें शेवटचें वाक्य ' **पीलुविखादनेन करकया उष्ट्र्या गर्दभीक्षीराभिमंथनेनेति ध्रुवापकारिणः** ' असें आहे. यांत शत्रुपक्षाचे जे लोक कांहीं कारणामुळें राजावर रुष्ट झाले असतील त्यांना कशा रीतीनें चिडवावें तें सांगितलें आहे. पण ' पीलुविखादनेन करकया ' आणि ' उष्ट्र्या गर्दभीक्षीराभिमंथनेन ' या दोन उपमांचें स्वारस्य काय ? याचा अर्थ कोणीहि समाधानकारक दिला नाहीं. मी याचा अर्थ असा करितों, राजाचा नाश करावयास जे टपले असतील त्याना म्हणावें कीं, करका नांवाचें एक लहानसें पाखरूं असतें व तें पीलु नांवाचे कवठासारखें अत्यंत कठिण फळ फोडूं पाहतें; पण त्या प्रयत्नांत त्या पक्षाचेच दांत पडतात पण फळ फुटत नाहीं; त्याप्रमाणें तुमची अवस्था होईल. किंवा मातीचें मडकें घेऊन गाढवीची धार काढण्यासारखेंच हें घातक आहे, कारण गाढवीनें लाथ मारल्यास मातीचें भांडें फुटून पूर्वीचें काढलेलें दूध देखील वायां जाणार ! तेव्हां तुमच्या प्रयत्नाला सिद्धि मिळण्याकरितां तुम्हांला त्या राजाचा आश्रय सोडून आमच्या राजाकडे येणेंच सुरक्षिततेचे व हिताचें होईल. असा अर्थ घेतल्यास तो त्या वाक्यांच्या संदर्भास जुळतो. हा अर्थ जर अग्राह्य वाटत असेल तर कोणीहि याहून दुसरा सरस अर्थ कळविण्याची कृपा करावी.

अशीं शंकास्थळें आणखी किती तरी आढळतील. किंबहुना या ग्रंथाचें असें एकहि पान आढळणार नाहीं कीं ज्यांत असलें एखादें तरी कोडें नाहीं किंवा ज्यावर हटकून मतभेद होणार नाहीं. या ग्रंथाचें जो सूक्ष्म दृष्टीनें अध्ययन करील त्यास असले नमुनें जागोजाग आढळतील. त्यांतलीं हीं दोन तीन मासलेवाईक उदाहरणें दिलीं आहेत. पण चिकित्सक वाचक हीं किंवा अशींच कित्येक कूटवाक्यें शोधून काढून त्यांच्यावर पूर्वीच्या टीकेंत किंवा भाषांतरांत नसलेला नवा प्रकाश पाडतील तर त्यांचा मी आभारी होईन.



# परिशिष्टें.

## १ कौटलीय अर्थशास्त्रांतील राजमंडलाची कल्पना.

कौटलीय अर्थशास्त्राच्या ६ व्या अधिकरणांत राजमंडलाचें वर्णन दिलेलें आहे. तें वर्णन मूळ संस्कृतांतून वाचून किंवा त्याचें भाषांतरहि वाचून राजमंडलाची वाचकांस नीटशी कल्पना येत नाहीं. याकरितां आकृति काढून ती कल्पना स्पष्ट करण्यांत येत आहे.

कोणत्याहि काळाचा कोणत्याहि देशाचा किंवा खंडाचाहि नकाशा घेतला तरी त्यांत मध्यंतरीं विजिगीषु व अरि यांचीं राज्यें आणि त्याच्या खालीं व वर पार्ष्णिग्राह, आक्रंद, पार्ष्णिग्राहासार, व आक्रंदासार आणि मित्र, अरिमित्र, व अरिमित्रमित्र, आणि त्याचप्रमाणें बाजूस मध्यम व उदासीन अशाच शास्त्रोक्त क्रमानें राज्यें आढळतील हें शक्य नाहीं. म्हणून आपल्याला इतिहासांतील प्रत्यक्ष नांवें देऊन या मंडळाचें स्पष्टीकरण करतां येत नाहीं. याकरितां इतिहासांतील विशेष नावें न देतां अर्थशास्त्रांतील सामान्य नामांचाच उपयोग करून या राजमंडलाचा खुलासा करूं.

ज्या एखाद्या विशिष्ट राजाला उद्देशून आपण हें विवेचन करीत असूं त्या राजाचें जें राज्य तें राजमंडलाचें केंद्र, त्या केंद्रातल्या राजाला विजिगीषु असें अर्थशास्त्रकार संबोधतात. त्या राजाच्या चारहि बाजूला दुसऱ्या कोणाच्या तरी राज्याची सरहद्द लागली असणार; त्यांत विजिगीषूच्या राज्याच्या अघाडीस ज्याची सरहद्द लागली असेल तो **अरि** आणि पिछाडीस ज्याची सरहद्द लागली असेल तो पार्ष्णिग्राह. यांत आघाडी कोणती मानावी व पिछाडी कोणती मानावी हें त्या त्या राजाच्या भौगोलिक रचनेवरून किंवा शेजारच्या राजाच्या परिस्थितीवरूनच ठरवावें लागणार. आगगाडींत ज्याप्रमाणें '**अप**' ट्रेन कोणती व '**डाऊन**' ट्रेन कोणती हें कांहीं तरी कल्पित संज्ञेवरून ठरवितात तसाच हा प्रकार आहे. सोबतच्या आकृतींत विजिगीषूच्या डोक्यावर अरि व खालीं पार्ष्णिग्राह लिहिला आहे पण तो क्रम उलटा लिहिला असता तरी चाललें असतें. व्यवहारांत मात्र परिस्थितीनें या गोष्टी ठरून जातात. उदाहरणार्थ, **मराठे** हे विजिगीषु आणि **पुणें** हें त्यांचे केंद्र मानलें तर **दिल्लीचा** बादशहा औरंगजेब हा अरि आणि **विजापूरचा** सुलतान हा पार्ष्णिग्राह होईल. पुढें दिल्लीचें महत्व नष्ट होऊन हैदरचें महत्व वाढलें तर हैदर हा अरि आणि दिल्लीचा बादशहा पार्ष्णिग्राह होईल. किंबहुना अरि किंवा पार्ष्णिग्राह हे प्रसंगविशेषीं दोस्तहि होणार नाहींत कशावरून ! परंतु शास्त्रकारांना कांहीं गोष्टी गृहीत धरूनच नियम सांगावे लागतात व ते नैसर्गिक स्थितींत खरे असतात. विशिष्ट परिस्थितीचा विचार प्रसंगोपात्त ज्याचा त्यानें करावा; पण तोहि सामान्य नियमाला अनुसरून केला तरच तो खरा ठरतो.

विजिगीषु व अरि हे दोन राजे कोणते ते निश्चित झाल्यावर अरीच्या सरहद्दीपासून पुढें क्रमाक्रमानें मित्र, अरिमित्र, मित्रमित्र व अरिमित्रमित्र असे चार राजे आणि विजिगीषूच्या पिछाडीच्या बाजूस पार्ष्णिग्राह, आक्रंद, पार्ष्णिग्राहासार व आक्रंदासार असे चार मिळून आठ राजे होतात. यांच्या नांवावरूनच त्यांतला कोण **विजिगीषूच्या** बाजूचा व कोण **अरीच्या** बाजूचा तें लक्षांत येईल. तथापि तें निश्चित ओळखण्याला गमक म्हणून मित्र, मित्रमित्र, आक्रंद व आक्रंदासार या चौघांना विजिगीषू प्रमाणें विषम संख्येचे आंकडे दिले आहेत. अर्थातच मधल्या रांगेंतले विषम संख्येचे राजे तेवढे परस्परांचे मित्र आणि समसंख्येनें दर्शविलेले राजे तेवढे परस्परांचे मित्र असा हा पांच पांच राजांचा एकेक संघ मानावा.

आतां आजूबाजूच्या राजांचा विचार करूं. विजिगीषूच्या अघाडीला व पिछाडीला जसे शत्रु असणार तसेच दोनहि बगलांनाहि शत्रु असणार. परंतु विवेचनाच्या सोईसाठीं जशी एक विशिष्टबाजू अघाडी कल्पिली व दुसरी पिछाडी मानली गेली त्याचप्रमाणें आजूबाजूच्या बगलांकडील राज्येंहि अघाडी-पिछाडीच्या राज्याप्रमाणेंच विजिगीषूच्या राज्याच्या सरहद्दीस तशींच लागून असतील तर तेथले राजेहि त्याच संज्ञेस पात्र होतील. पण त्यामुळें शास्त्रीय विवेचन अपुर्णे राहील यास्तव शास्त्रकारांनीं अशी कल्पना केली आहे कीं आजूबाजूचे राज्याची सरहद्द विजिगीषू व अरि या दोघांच्याहि सरहद्दींना लागली आहे. त्यामुळें तो राजा जसा **विजिगीषूचा** शत्रु तसा तो त्याच्या **अरीचाहि** शत्रु पण अरीचा शत्रु म्हणजे मित्र. म्हणजे एकदा तो शत्रु झाला व एकदा मित्र झाला. एवंच तो निश्चित शत्रु किंवा मित्र नसल्यानें त्यास **मध्यम** ही संज्ञा प्राप्त झाली. आणि ही स्थिति दोहोबाजूंच्या बगलांस सारखीच

११ अरिमित्रमित्र नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

राज्याच्या सरहद्दी.

९ मित्रमित्र नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

८ अरिमित्र नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

५ मित्र नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

४ उदासीन नृप.
१ अमात्य
२ जनपद
३ दुर्ग
४ कोश
५ दंड

३ मध्यम नृप.
१ अमात्य
२ जनपद
३ दुर्ग
४ कोश
५ दंड

२ अरि नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

१ विजिगीषु नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

३ मध्यम नृप.
१ अमात्य
२ जनपद
३ दुर्ग
४ कोश
५ दंड

४ उदासीन नृप.
१ अमात्य
२ जनपद
३ दुर्ग
४ कोश
५ दंड

६ पार्ष्णिग्राह नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

७ आक्रंद नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

१० पार्ष्णिग्राहासार नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

११ आक्रंदासार नृप.
१ अमात्य २ जनपद ३ दुर्ग
४ कोश ५ दंड

प्राप्त होत असल्यामुळें दोहीकडच्याहि उभयसामान्य शेजाऱ्यास मध्यम ही एकच संज्ञा देण्यांत आली आहे व तसें समानत्व दर्शवि-ण्याकरितां दोहोंकडे ३ हीच विषम संख्या योजण्यांत आली आहे. मध्यमाच्या पलीकडे असलेला जो राजा त्याच्या मुलखाची सरहद्द विजिगीषु किंवा अरि या दोहोंतून कोणाच्याच सरहद्दीस भिडलेली नाहीं अर्थातच त्यास उदासीन ही संज्ञा देण्यांत आली व त्याचा निर्देश ४ या संख्येनें केला आहे. अशा रीतीनें हें बारा राजांचें राजमंडल झालें. सामान्यतः कोणत्याहि राजास आपल्या परिस्थितीचा विचार करावयाचा झाल्यास या बारा राजांहून अन्य राजांचा विचार क्वचितच करावा लागतो.

या बारा राजांच्या बलाबलाचा सापेक्ष विचार करतांना प्रत्येकाच्या प्रकृतिसंपदेचा विचार केला पाहिजे व तो विचार म्हणजे अमात्य, जनपद, कोश, दुर्ग व दंड या पंच प्रकृतींचा विचार होय. बारा राजांपैकीं प्रत्येकाच्या विचारांत त्याची पंचधा प्रकृति येत असल्यानें १२×५=६० इतक्या प्रकृतींचा विचार करावा लागतो. मूलप्रकृति सात सांगितल्या आहेत. पण त्या सातांत खुद्द राजाचा समावेश केला गेला आहे. पण येथें आपण राजमंडळांतलेच १२ राजे महत्वाचे म्हणून त्यांचा विचार स्वतंत्रपणें केला आहे आणि अरीचाहि विचार स्वतंत्रच होणार असल्यानें सप्त प्रकृतींपैकीं पंचधा प्रकृतीच बाकी राहिली. अर्थातच बारा राजे व त्या प्रत्येकाची अमात्यादि पंचधा प्रकृति यांचा विचार म्हणजे मंडलाचा विचार झाला.

शास्त्रीय विवेचनाच्या पूर्णतेसाठीं जरी १२×५=६० इतक्या घटकांचा विचार राजमंडळांत कौटिल्यानें सांगितला असला तरी अरि, मित्र, मध्यम व उदासीन या चौघांचाच विचार महत्वाचा आहे. कित्येक शास्त्रकारांनीं तर विजिगीषु व अरि या दोघांचाच कायतो विचार खरा महत्वाचा आहे व त्यांच्या पोटांत इतर सगळे येतात असें म्हटलें आहे, उलटपक्षीं कित्येकांनीं वरील बारा मूलभूत राजांत उभयतांचे मित्र तीन व उभयतांचे शत्रु तीन अशा आणखी ६ राजांची भर घालून १८ राजांचें मंडळ सांगितलें आहे आणि प्रत्येकाचे घटक ६ धरून एकंदर १०८ घटकांचा विचार राजमंडलाच्या विचारांत करावा लागतो असें म्हटलें आहे. आणि विशालाक्षानें तर या अठरा राजांना पुनः प्रत्येकाचे शत्रु व मित्र असे दोन दोन राजे जोडून ५४ राजे आणि प्रत्येकाचे अमात्यादि ६ घटक मिळून ३२४ घटक सांगितलें ! या ३२४ च्याहि पुढें कोणाची मजल गेली नाहीं हें तरी नशीबच समजावयाचें.

याच राजमंडलावर कामंदकीय नीतिसारांत वृक्षाचें रूपक करून त्यांत विजिगीषु, अरि, मध्यम, उदासीन असे चार मूलभूत राजे हे राजमंडलाचे बुंधे, या प्रत्येकाला शत्रु व मित्र अशा दोन दोन मिळून ८ शाखा, चारबुंधे व आठ शाखा मिळून बारांना अमात्यादि पांच प्रकृति धरल्यास होणारी ६० संख्या हीं पानें, त्या प्रत्येक पानाला दैव व प्रयत्न अशीं दोन दोन दलें, संधिविग्रहादि षाड्गुण्य हीं फुलें आणि उत्कर्ष, अपकर्ष व गतिराहित्य अशीं तीन फळें असून या वृक्षाचें ज्ञान ज्याला साकल्यानें झालें तोच नीतिज्ञ असें म्हटलें आहे.

## २ अर्थशास्त्रांतील कांहीं तुलना.

'उपमा कालिदासस्य' हें वचन जसें सर्वत्र रूढ व सर्वमान्य झालें आहे, तसेंच 'तुलना आर्यचाणक्यस्य' असेंहि वचन सर्वत्र रूढ व सर्वमान्य होण्याजोगें आहे. आर्यचाणक्यानें आपल्या ग्रंथांतील विषयाचें प्रतिपादन करतांना ठिकठिकाणीं सरसनिरस गोष्टींची तुलना करून त्यावर इतरांचीं मतें दिलीं आहेत आणि तो पूर्वपक्ष खोडून काढून आपला निर्णय सिद्धान्तरूपानें सांगितला आहे. यांत जशी ग्राह्य गोष्टींत तशी त्याज्य गोष्टींतहि तुलना होऊं शकते. कोणता उपाय अधिक चांगला अशा-विषयींची तुलना ती ग्राह्य वस्तूंची तुलना होय; कारण जो उपाय अधिक चांगला तो स्वीकारावयाचा असतो; आणि कोणती आपत्ति अधिक भयंकर अशा विषयींची जी तुलना ती त्याज्य वस्तूंची तुलना कारण ती आपत्ति आपणास टाळावयाची असते. अशा रीतीनें आर्यचाणक्यानें आपल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं अशी तुलना करून कोणता मार्ग ग्राह्य व कोणता अग्राह्य हें सांगितलें आहे. हा तुलनात्मक निर्णय सर्वत्रांस केव्हांना केव्हां तरी उपयुक्त होणारा असल्यानें आणि वाचकांची जिज्ञासा व चौकस बुद्धि वाढविणारा असल्यामुळें त्यांतील विशेष महत्वाच्या तुलना पुढें दिल्या आहेत. या तुलना देतांना इतरांचीं जीं मतें चाणक्यानें खोडून काढलीं आहेत तो पूर्वपक्ष येथें दिलेला नाहीं. त्याचप्रमाणें चाणक्यानें आपल्या निर्णयाला जीं कारणें सांगितलीं आहेत तींहि विस्तारभयास्तव दिलीं नाहींत. पण प्रत्येक तुलनेचा स्थलनिर्देश केला असल्यामुळें पुस्तकांतून तो अध्याय व तें पृष्ठ काढून पाहतां येण्याची सोय केलेली आहे. अध्याय ९० पर्यंतचा भाग या ग्रंथाच्या पूर्वार्धांतला असून अध्याय ९१ पासूनचा भाग उत्तरार्धांतला समजावा,

## पूर्वार्ध भाग.

| तुलनेचे विषय. | कौटिल्याचें मत | अध्याय. पृष्ठ. |
| --- | --- | --- |
| सर्व विद्यांत श्रेष्ठ विद्या कोणती ? | आन्वीक्षिकी विद्या श्रेष्ठ | २—३ |
| समाजाचें रक्षण कशावर अवलंबुन आहे ? | समाजाचें रक्षण दंडनीतीवर अवलंबून आहे | ४—४ |
| धर्म, अर्थ व काम यांत श्रेष्ठ काय ? | अर्थ हाच श्रेष्ठ होय कारण धर्म व काम अर्थावर अवलंबून असतात | ७—६ |
| मंत्रिपरिषदेंत मंत्री किती असावेत ? | जरूरीप्रमाणें मंत्र्यांची संख्या ठरवावी | १५—१४ |
| राजपुत्राचा बंदोबस्त कसा करावा ? | राजपुत्रांना उत्तम शिक्षण द्यावें | १७—१७ |
| शेतांत कोणतें पीक करणें फायदेशीर ? | साळीचें पीक सर्वांत उत्तम | ४५—६० |

## उत्तरार्ध भाग.

| तुलनेचे विषय. | कौटिल्याचें मत. | अ. पृ. |
| --- | --- | --- |
| सारख्या संकटांत असलेल्या बलहीन शत्रूवर आधीं स्वारी करावी कीं बलाढ्य शत्रूवर आधीं करावी ? | बलाढ्य शत्रूवरच आधीं चालून जावें. | १०३—३६ |
| बलहीन शत्रूचीं संकटें अधिक व बलाढ्य शत्रूचीं संकटें कमी, असें असेल तेव्हां कोणावर आधीं स्वारी करावी ? | कमी संकटांत असलेल्या बलाढ्य शत्रूवर आधीं स्वारी करावी. | १०३—३६ |
| धर्मनिष्ठ व न्यायनिष्ठ पण अधिक अडचणींत आणि अधर्मी व अन्यायी पण कमी अडचणींत यांतून कोणावर आधीं स्वारी करावी ? | अधर्मी व अन्यायी याजवर करावी. | १०३—३६ |
| ज्याचे प्रजाजन लोभी व दरिद्री आहेत त्याजवर आधीं स्वारी करावी किंवा ज्याचे प्रजाजन जुलमानें गांजलेले आहेत त्याजवर करावी ? | ज्याची प्रजा गांजलेली असेल त्यावरच स्वारी करावी. | १०३—३७ |
| बलाढ्य पण अधर्मी व अन्यायी आणि बलहीन पण धर्मनिष्ठ व न्यायनिष्ठ यांतून कोणावर स्वारी करावी ? | बलाढ्य पण अधर्मी व अन्यायी राजावर स्वारी करावी. | १०३—३७ |
| दरिद्री प्रजा आणि लोभी व असंतुष्ट प्रजा यांतून वाईट कोणती ? | लोभी व असंतुष्ट प्रजा वाईट. | १०३—३८ |
| एका वरिष्ठ राजाशीं तह करून शत्रूवर स्वारी करावी का समान दर्जाच्या दोन राजांशीं तह करून स्वारी करावी ? | दोन समान दर्जाच्या राजांशीं तह करून स्वारी करावी. | १०३—३९ |
| बरोबरीच्या एका राजाशीं दोस्ती करावी का दोन कनिष्ठ राजांशीं दोस्ती करावी ? | दोन कनिष्ठ राजांशीं संयोग करणें चांगलें. | १०३—३९ |
| चिरकाल मित्रत्वानें वागणारा पण आपल्या कह्यांत न राहणारा आणि नेहमीं मित्रत्वानें नसणारा पण आपल्या कह्यांत राहणारा यांतून कोणाशीं मैत्री करावी ? | जो आपल्या तंत्रानें वागणारा असेल त्याशीं मैत्री करावी. | १०७—५१ |
| अपरिमित संपत्तीचा पण हंगामी मैत्री करणारा आणि अल्पसंपत्तिमान् पण मैत्री कायम टिकणारा यांतून चांगला कोण ? | कायम टिकणारा जो मित्र तोच चांगला. | १०७—५१ |
| दुर्बळ पण झटपट कार्य करणारा आणि बलाढ्य पण उठावणी करावयास कठीण यांतून चांगला कोणता ? | दुर्बळ पण झटपट कार्य करणारा चांगला. | १०७—५१ |

| तुलनेचे विषय. | कौटिल्याचें मत. | अ. पृ. |
| --- | --- | --- |
| ज्याचें सैन्य एकत्र आहे पण हुकमतींत नाहीं आणि ज्याचें सैन्य हुकमतींत आहे पण पांगलेलें आहे, यांतून चांगला कोण ? | ज्याचें सैन्य एकत्र आहे पण हुकमतींत नाहीं तो चांगला. | १०७—५२ |
| पुष्कळ व शूर सैन्य असलेला आणि पुष्कळ संपत्ति असलेला, यांतून चांगला मित्र कोणता ? | ज्याजवळ भरपूर संपत्ति आहे तो चांगला | १०७—५२ |
| भरपूर संपत्ति असलेला मित्र चांगला का पुष्कळ जमिन असलेला चांगला ? | ज्याजवळ जमीन आहे तो चांगला. | १०७—५२ |
| तात्काळ मिळणारा थोडा फायदा चांगला का कालांतरानें मिळणारा मोठा फायदा चांगला ? | कालांतरानें मिळणारा मोठा फायदा चांगला. | १०७—५४ |
| सुपीक पण शेजारी कायमचा शत्रु असलेली जमीन चांगली का नापीक पण शेजारीं हंगामी शत्रु असलेली जमीन चांगली ? | नापीक पण हंगामी शत्रु असलेली जमीन चांगली. | १०८—५५ |
| दुर्बळाकडून जिंकलेली जमीन चांगली का बलाढ्यास जिंकून मिळविलेली चांगली ? | दुर्बळास जिंकून मिळविलेली चांगली | १०८—५५ |
| लहान पण जवळची आणि मोठी पण दूरची यांतून चांगली जमीन कोणती ? | लहान पण जवळची चांगली. | १०८—५५ |
| जो प्रदेश स्वतःचें संरक्षण करूं शकतो तो चांगला का ज्याचें रक्षण बाह्य उपायांनीं करावें लागतें तो चांगला ? | जो प्रदेश स्वतःचें रक्षण करूं शकतो तो चांगला. | १०८—५५ |
| मूर्खापासून मिळविलेली जमीन चांगली का शहाण्यापासून मिळविलेली चांगली ? | मूर्खापासून मिळविलेली चांगली | १०८—५५ |
| भुईकोट किल्ला मिळविणें सोपें का जंजिरा किल्ला मिळविणें सोपें ? | भुईकोट किल्ला मिळविणें सोपें. | १०८—५६ |
| जंजिरा किल्ला मिळविणें सोपें का डोंगरी किल्ला मिळविणें सोपें ? | जंजिरा किल्ला मिळविणें सोपें. | १०८—५६ |
| खंदकांत बसून लढणाऱ्यास जिंकणें सोपें का आकाशांतून लढणाऱ्यास जिंकणें सोपें ? | खंदकांतून लढणाऱ्यास जिंकणें सोपें. | १०८—५७ |
| जिराईत जमीन चांगली का बागाईत चांगली ? | बागाईत जमीन चांगली. | १०९—५७ |
| खाणींचा प्रदेश चांगला का धान्य पिकणारा देश चांगला ? | धान्य पिकणारा देश चांगला. | १०९—५७ |
| नाना प्रकारचीं झाडें असलेलें जंगल चांगलें का हत्ती असलेलें जंगल चांगलें ? | हत्ती असलेलें जंगल चांगलें. | १०९—५८ |
| जलमार्ग चांगला का स्थलमार्ग चांगला ? | स्थलमार्ग चांगला. | १०९—५८ |
| खेड्यांत वस्ती असलेला प्रदेश चांगला का शहरांत वस्ती असलेला प्रदेश चांगला ? | खेड्यांत वस्ती असणारा प्रदेश चांगला. | १०९—५८ |
| वरिष्ठ वर्णांची वस्ती अधिक असणें चांगलें का कनिष्ठ वर्णांची वस्ती अधिक असणें चांगलें ? | कनिष्ठ वर्णांची वस्ती अधिक असणें चांगलें. | १०९—५८ |
| ज्यांत पुष्कळ किल्ले आहेत तो प्रांत चांगला का ज्यांत मोठी लोकसंख्या आहे तो चांगला ? | मोठी लोकसंख्या असलेला चांगला. | १०९—५८ |

| तुलनेचे विषय. | कौटिल्याचें मत. | अ. पृ. |
| --- | --- | --- |
| बाहेरून पाणी येणारा कालवा व अंतर्गत झरा असलेला कालवा यांतून चांगला कोणता ? | अंतर्गत झरा असणारा चांगला. | ११०--६० |
| पुष्कळ पण दुर्बल हत्ती असलेलें रान चांगलें का थोडे पण शूर हत्ती असलेलें चांगलें ? | पुष्कळ हत्ती असलेलें रान चांगलें | ११०--६१ |
| मोठ्या किंमतीचीं द्रव्यें निघणारी पण लहान खाण व सामान्य द्रव्यें निघणारी मोठी खाण यांतून चांगली कोणती ? | सामान्य द्रव्यें असणारी मोठी खाण चांगली. | ११०--६१ |
| भर समुद्रांतला जलमार्ग व किनाऱ्या-किनाऱ्यानें जावयाचा जलमार्ग यांतून चांगला कोणता ? | किनाऱ्याकिनाऱ्यानें जाणारा मार्ग चांगला. | ११०--६१ |
| उत्तरेचा हिमालयाकडचा मार्ग चांगला का दक्षिणेकडचा मार्ग चांगला ? | दक्षिणेकडचा मार्ग चांगला. | ११०--६१ |
| मैदानावरील लढाई चांगली का गनिमी काव्याची लढाई चांगली ? | मैदानावरील लढाई चांगली. | १११--६५ |
| तह्रांत मुलगा ओलीस यावा कीं मुलगी ? | मुलगी ओलीस यावी | ११५--७५ |
| सत्कुलीन पण शहाणा नसलेला आणि शहाणा पण सत्कुलीन नसलेला यांतून राजा होण्याला लायक कोणता ? | शहाण्या मुलापेक्षां कुलीन मुलगा अधिक लायक | ११५--७६ |
| शहाणा राजपुत्र चांगला कीं शूर चांगला ? | शहाणा चांगला | ११५--७६ |
| सप्तप्रकृतीपैकीं अमात्य व राजा यांतून कोणावरची आपत्ति अधिक वाईट ? | राजावरची आपत्ति अधिक वाईट | ११७--८४ |
| प्रजा व अमात्य यांपैकीं कोणती आपत्ति अधिक वाईट ? | अमात्याची आपत्ति अधिक वाईट | ,, ,, |
| दुर्ग व प्रजा यांतून कोणावरची आपत्ति अधिक वाईट ? | प्रजेवरची आपत्ति अधिक वाईट | ,, ,, |
| कोश व दुर्ग यांतून कोणती आपत्ति वाईट ? | दुर्गावरील आपत्ति अधिक वाईट | ११७--८५ |
| सेना व कोश यांतून कोणती ,, ,, | कोशाची आपत्ति अधिक वाईट | ११७--८५ |
| मित्र व सेना ,, ,, ,, | सेनेची आपत्ति अधिक वाईट | ११७--८६ |
| बाह्य ताप व अंतस्थ ताप यांतून अधिक भयंकर कोणता ? | अंतस्थ ताप अधिक भयंकर | ११८--८७ |
| दुहेरी राज्यकारभार व परकीय राज्यकारभार ,, | परकीय राज्यकारभार वाईट | ,, ,, |
| शास्त्रदृष्टि नसणारा राजा व शास्त्रविरुद्ध वागणारा राजा यांतून वाईट कोणता ? | शास्त्रविरुद्ध वागणारा | ,, ,, |
| रोगी राजा बरा का नवा राजा बरा ? | रोगी राजा बरा | ११८--८८ |
| बलहीन पण उच्च कुळांतला राजा व बलाढ्य पण नीच कुळांतला राजा | बलहीन पण उच्चकुळांतला चांगला | ,, ,, |
| शत्रूच्या स्वारीनें होणारा धान्यनाश व दुष्काळानें होणारा धान्य नाश | दुष्काळ अधिक वाईट | ,, ,, |
| अतिवृष्टि व अनावृष्टि | अनावृष्टि ,, ,, | ,, ,, |
| कोप अधिक वाईट का काम अधिक वाईट ? | कोप ,, ,, | ११९--८९ |
| द्रव्यहानि व शत्रुत्व यांतून कोणतें वाईट ? | शत्रुत्व ,, ,, | ,, ,, |
| अनिष्ट माणसांचा सहवास व दुर्गुणांचा सहवास... | दुर्गुणांचा सहवास अधिक वाईट | ,, ,, |
| द्रव्यदंड व देहदंड ,, ,, ,, | देहदंड अधिक वाईट | ११९--९० |
| द्यूत व स्त्रीव्यसन ,, ,, ,, | स्त्री व्यसन ,, ,, | ११९--९१ |

| तुलनेचे विषय. | कौटिल्याचें मत. | अ. पृ. |
| --- | --- | --- |
| द्यूत व मृगया यांतून कोणतें वाईट | द्यूत अधिक वाईट | ११९—९१ |
| स्त्री व्यसन व मद्यपान व्यसन ,, ,, | मद्यपान व्यसन | ११९—९१ |
| द्यूत व मद्य ,, ,, | द्यूत व्यसन | ११९—९२ |
| आगीचें संकट व महापुराचें संकट ,, ,, | महापुराचें संकट | १२०—९२ |
| सांथीचा रोग व दुष्काळ ,, ,, | दुष्काळ | १२०—९३ |
| सामान्य माणसांचा नाश व प्रमुख पुरुषांचा नाश ,, | प्रमुख पुरुषांचा नाश | १२०—९३ |
| सैन्यांतील बंडाळी व शत्रूची स्वारी ,, ,, | शत्रूची स्वारी | १२०—९३ |
| प्रजाजनांतील कलह व राजाराजांतील कलह ,, ,, | राजाराजांतले कलह | १२०—९४ |
| लोकांची क्रीडा व राजांची क्रीडा ,, ,, | राजांची क्रीडा | ,, ,, |
| राजकन्येचा जुलूम व राजपुत्राचा जुलूम ,, ,, | राजकन्येचा जुलूम | ,, ,, |
| संघ व पुढारी यांतून अधिक बाधक कोण ? | पुढारी अधिक बाधक | १२०—९५ |
| खजीनदार व वसूल कामगार यांतून अफरातफर अधिक कोण करूं शकतो ? | वसूल कामगार अधिक अफरातफर करूं शकतो | १२०—९५ |
| करोडगिरीचे अधिकारी व व्यापारी यांतून जनतेला अधिक कोण लुबाडतो ? | व्यापारी अधिक लुबाडतो | ,, ,, |
| जमिनीची जरूर पडल्यास शिकारीकरितां राखलेली जमीन घ्यावी कां गुरचराईची घ्यावी ? | शिकारीची जमीन घ्यावी | १२०—९६ |
| दरोडेखोर व रानटी लोक यांतून अधिक तापदायक कोण ? | रानटी लोक अधिक तापदायक | ,, ,, |
| पशूंचें रान व हत्तींचें रान यांत फायदेशीर कोणतें ? | पशूंचें रान फायदेशीर | ,, ,, |
| गौरव न केलेलें सैन्य व पाणउतारा केलेलें सैन्य यांतून लवकर समजूत कोणाची होते ? | गौरव न केलेल्या सैन्याची | १२१—९७ |
| खवळलेलें सैन्य व अंतस्थ फूट पडलेलें सैन्य यांतून कोणतें सैन्य उपयोगी पडूं शकेल ? | खवळलेल्या सैन्याची समजूत केल्यास तें उपयोगी पडेल | १२१—९८ |
| उत्साह व बलसंपन्नता यांतून अधिक फायदेशीर काय ? | बलसंपन्नता अधिक फायदेशीर | १२२-१०२ |
| बलसंपन्नता व कारस्थान यांत श्रेष्ठ काय ? | कारस्थान श्रेष्ठ | १२२-१०३ |
| देश, काल व शक्ति यांत श्रेष्ठ काय ? | देश, काल व शक्ति हे तीनहि परस्परापेक्षी आहेत | १२२-१०४ |
| शत्रु संकटांत असेल तेव्हां त्यावर स्वारी करावी का आपली जय्यत तयारी असेल तेव्हां करावी ? | आपली जय्यत तयारी असेल तेव्हां स्वारी करावी | १२२-१०४ |
| पिढीजाद सैन्य व पगारी सैन्य यांतून सरस कोणतें ? | पिढीजाद सैन्य सरस | १२३-१०८ |
| पगारी सैन्य व सरंजामी सैन्य ,, ,, ,, | पगारी सैन्य सरस | ,, ,, |
| सरंजामी सैन्य व मित्राचें सैन्य ,, ,, ,, | सरंजामी सैन्य सरस | ,, ,, |
| मित्राचें सैन्य व शत्रूचें सैन्य ,, ,, | मित्राचें सैन्य सरस | ,, ,, |
| शत्रूचें सैन्य व रानटी लोकांचें सैन्य ,, ,, | शत्रूचें सैन्य सरस | ,, ,, |
| चातुर्वर्ण्यांतून कोणत्या वर्णाचें सैन्य सरस ? | क्षत्रियांचें सैन्य सरस | ,, ,, |
| कारस्थान उभारणारे व कारस्थानांत सामील होणार यांतून कोणास वळविणें सुलभ ? | कारस्थानांत सामील होणाऱ्यास वळविणें सुलभ. | १२५-११६ |
| कारस्थान उभारणारे व कारस्थानांत सामील होणारे यांतून कोणाचा बंदोबस्त करणें श्रेयस्कर ? | कारस्थान उभारणाऱ्यांचा बंदोबस्त करणें श्रेयस्कर. | १२५-११७ |

## ३ चाणक्यकालीन सरकारी वसूल.

**सरकारी वसुलाच्या बाबीः**—( १ ) जकात ( २ ) दंड ( ३ ) वजनें मापें वापरण्याबद्दल कर ( ४ ) नाणें पाडण्याबद्दल कर ( ५ ) अबकारी खातें ( ६ ) कत्तलखान्याची फी ( ७ ) धंद्यांच्या प्राप्तीवरील कर ( ८ ) वेश्यागृहें व जुगारांचे अड्डे यांच्यावरील कर ( ९ ) सरकारी शेतीचें उत्पन्न ( १० ) शेतसारा ( षड्भाग ) ( ११ ) यात्रेकरूंवरील कर ( १२ ) तीर्थांवरील कर ( १३ ) तरी, नांवा वगैरेंचें भाडें ( १४ ) गायरानाची फी ( १५ ) रस्त्यावरील दस्तुरी ( १६ ) खाणींतील माल ( १७ ) जंगलांतील मालाची विक्री ( १८ ) जंगलांतील पशूंची विक्री ( १९ ) व्याज ( २० ) नजराणा ( २१ ) सरकारी कारखान्यांचें उत्पन्न ( २२ ) संतोषपट्टी ( २३ ) कोंडवाडापट्टी ( २४ ) तलाव व राजमार्ग यांवरील झाडांचें उत्पन्न ( २५ ) पाणीपट्टी ( २६ ) करमणुकीवरील कर ( २७ ) सरकारी इमारतींचें भाडें ( २८ ) बिनवारसी माल ( २९ ) कोर्ट फी ( ३० ) भूमिगत द्रव्य ( ३१ ) जादा कर.

**खर्चाचीं खातींः**—( १ ) राजा व राजघराणें यांचा खर्च ( २ ) मंत्री, अमात्य व इतर नोकर यांचा पगार ( ३ ) दानधर्म व अरिष्ट शांति वगैरे ( ४ ) परराज्यांत ठेवलेले वकील ( ५ ) कोठी ( ६ ) शस्त्रागार ( ७ ) पदार्थसंग्रहालय ( ८ ) वनस्पतिसंग्रहालय ( ९ ) सरकारी कारखाने ( १० ) चतुरंग लष्कर ( ११ ) सरकारीखिल्लारें ( १२ ) पशुपक्षिसंग्रहालय.

## ४ चाणक्याच्या वेळच्या कराची आकारणी.

१ परदेशांतून येणाऱ्या मिठावर किंमतीच्या एक षष्ठांश कर.

२ बाजारांत विक्री होणाऱ्या मालावर मापावर सोळा टक्के; वजनावर वीस टक्के व मोजून घ्यावयाच्या पदार्थांवर अकरा टक्के कर घेण्यांत येई.

३ वजनें व मापें यांची परीक्षा करून शिक्के मारण्याबद्दल दर मापाला चार माष फी घेण्यांत येई.

४ वजनामापांची तपासणी होई त्याबद्दल प्रत्येक तपासणीला एक काकणी फी घेण्यांत येई.

५ सरहद्दीवरील दस्तुरी ( अ ) एका जनावरावरील मालास १ पण ( आ ) एका गाडीला सव्वापण ( इ ) डोक्यावरील मालास एक माष ( ई ) जनावराबद्दल दस्तुरी अर्धा पण; शेळ्यामेंढ्याबद्दल पाव पण.

६ आयात व निर्गत मालावर जकात ( अ ) सामान्य दर शेंकडा २० टक्के ( आ ) फुलें फळें, धान्य, सुकेमासे, मांस इत्यादींवर १६$\frac{2}{3}$ टक्के ( इ ) रेशीम, लोंकर, कापड, हरताळ, मनशील, चंदन, मद्यें हस्तिदंत चामडीं कांबळीं, वगैरेंवर शेंकडा ६$\frac{2}{3}$ ते १० पर्यंत ( ई ) गूळ, साखर, मीठ, लांकडें, सूत, कापूस, जनावरें, औषधें, वगैरेंवर शेंकडा ४ ते ५ टक्के कर.

७ वेशींतून शहरांत माल आणण्याबद्दल जादा कर सामान्य जकातीच्या $\frac{1}{5}$.

८ पाणीपट्टी उत्पन्नाच्या $\frac{1}{5}$ ते $\frac{1}{3}$ माल देणें.

९ नाटकमंडळ्या, गवई, बजवय्ये, कथेकरी, बहुरूपी, जादुगार, भाट, वगैरे इसम परदेशांतून आले असल्यास त्यांनीं आपले खेळ करण्यास किंवा कार्यक्रम करण्यास पांच पण परवाना फी भरली पाहिजे.

१० वेश्या स्त्रियांनीं दरमहा दोन दिवसांचें उत्पन्न कर–म्हणून द्यावें.

११ मासे पकडणाऱ्या कोळ्यांनीं आपल्या प्राप्तीचा सहावा हिस्सा कर द्यावा.

१२ बंदरावरील व्यापाऱ्यांनीं परदेशांतून आलेल्या मालावर एकषष्ठांश ते एकपंचमांश जकात द्यावी. ( पाण्यानें माल खराब झाला असल्यास जकात माफ. )

१३ नावेवरील भाडें माणसास १ माष; लहान जनावरास १ माष; गाय, बैल, घोडा, दोन माष; उंट व म्हैस ४ माष; एक बैलाची गाडी ५ माष; दोन बैलांची गाडी ६ माष; मोठा गाडा ७ माष; व्यापारी मालाच्या १ ढोर ओझ्यास पाव माष घ्यावा. मोठी नदी तरून जाण्यास वरील दराच्या दुप्पट दर.

१४ गवळ्यांनीं सरकारास दरवर्षी ८४ कुडव तूप, ठराविक कर, मेलेल्या जनावरांचें कातडें ही द्यावीत,

१५ जनावरांच्या विक्रीवर विक्रीच्या पावपट किंमत कर म्हणून सरकारांत द्यावी.

१६ देशांतून बाहेर जाणाऱ्या येणाऱ्यास परवान्याबद्दल फी दर माणशीं १ माष.

१७ गायरानांत चरण्याबद्दल फीचे दरः—

( अ ) उंट व म्हशी १/४ पण ( आ ) बैल, गाय, घोडे व गाढव १/८ पण ( इ ) इतर क्षुद्र पशु १/१६ पण.

टीपः—जनावरें चरून तेथेंच बसून राहिल्यास दुप्पट फी. जीं गुरें गायरानांतच राहतील त्याबद्दल चौपट दर घ्यावा. देवास सोडलेले पोळ, म्हातारे बैल, वळू बैल व नुकतीच व्यालेली गाय यांना चराई माफ.

१८ भूमिगत द्रव्य ज्यास सांपडेल त्यास १/६ ते १/५ पर्यंत किंमत मिळेल; बाकीचा हिस्सा राजास दिला पाहिजे. १००००० पणांहून अधिक किंमतीचें द्रव्य सांपडलें तर तें सर्वच राजास दिलें पाहिजे. रत्न कितीहि किंमतीचें असलें तरी ज्यास तें सांपडेल त्यानें तें राजास नेऊन दिलें पाहिजे.

## ५ नाणीं.

**चांदीचीं नाणींः**—चार भाग तांबें एक भाग लोखंड कथील किंवा शिसे व अकरा भार रुपें मिळून पण नांवाचें चांदीचें नाणें तयार होई. त्याचे अर्धापण, पावपण, व एक अष्टमांशपण अशींहि नाणीं पाडीत.

**तांब्याचीं नाणींः**—माष; अर्धमाष; काकणी; व अर्धकाकणी हीं तांब्याचीं नाणीं पाडण्यांत येत. तांब्याच्या नाण्यांत एक चतुर्थांश हलक्या धातूची भेसळ असे.

नाणीं पाडण्याबद्दल शेंकडा आठ मजुरी; शेंकडा पांच सरकारी कर; व शेंकडा एक अष्टमांश नाणें पारखण्याची फी घेण्यांत येत असे.

पण या नाण्याचें नक्की वजन जरी कोठें या पुस्तकांत दिलें नाहीं, तरी पण हें नाणें साधारणतः हल्लींच्या रुपयाच्या तोडीचेंच असावें आणि माष हें नाणें जुन्या शिवराई पैशा एवढें असावें असें वाटतें.

**चाणक्यकालीन वजनें मापें**—पूर्वार्ध अध्याय ४० व ४१ यांत चाणक्यानें आपल्या वेळच्या वजनामापांची व देशकालमानांची कोष्टकें दिलीं आहेत. त्यांतील कालमानाचीं कोष्टकें अद्यापि जशाचीं तशींच चालू असल्यानें तीं समजण्यास अडचण पडत नाहीं. चांद्रमास, सौरमास, अधिक मास इत्यादि काल गणना वेदांग ज्योतिषास अनुसरून असल्यानें तीहि दुर्बोध नाहीं. मल्लवाह, अश्ववाह, हत्तिवाह यांचे जे अनुक्रमें ३२, ३५ व ४० दिवसांचे महिने दिले आहेत त्यांचा मात्र उलगडा अद्यापि झाला नाहीं.

लांबी, रुंदी, उंची मोजण्याचें माप अंगुलावर ठरविलेलें आहे, आणि २४ अंगुले म्हणजे एक हात हेंही प्रमाण हल्लींच्या प्रमाणाशीं मिळतें असेंच आहे. या मानानें १६ हजार हातांचें एक योजन मोजल्यास त्याची लांबी हल्लींच्या मानानें ४१/२ मैल होते. १९२ अंगुलांचें एक धनु असें एक वेगळें कोष्टक आहे तें घेतल्यास ९ मैलांचें एक योजन होतें. हें प्रमाण ८ मैल म्हणजे एक योजन या कल्पनेशीं जवळ जवळ जुळतें.

वजनाच्या कोष्टकांत हल्लीं आपण ८ गुंजा = १ मासा आणि १२ मासे = १ तोळा असें प्रमाण घेतों. ९६ गुंजांचा एक तोळा होतो. अर्थशास्त्रांत ५ गुंजा म्हणजे माष आणि १६ माष म्हणजे १ कर्ष असें कोष्टक दिलें आहे. त्यावेळीं कर्ष म्हणजेच तोळा मानण्यांत येत असे व त्याचें वजन ८० गुंजा होतें. म्हणजे हल्लींच्या ९६ गुंजांच्या मानानें हा ८० गुंजांचा तोळा १/६ कमी भरतो. कदाचित् त्या वेळच्या गुंजा हल्लींच्या गुंजांच्या वजनाहून अधिक असतील ! पण असले कल्पनातरंग सोडून प्रत्यक्ष कोष्टकाची तुलना केल्यास त्यावेळचा एक तोळा हल्लींच्या तोळ्याच्या ५/६ भरतो. याहून अधिक भाराचीं वजनें पाहिल्यास त्यांत ४ कर्ष = १ पल, १०० पल = १ तुला व २० तुला = १ भार असें कोष्टक आहे. अर्थातच त्यावेळचे ८००० कर्ष किंवा तोळे = एक भार झाला. यांत ८० तोळ्यांचा शेर धरल्यास १ भार म्हणजे शंभर शेर होतात. पण प्रत्येक तोळा हल्लींच्या ५/६ असल्यानें हे १०० शेर आतांच्या १०० × ५/६ = ८३१/३ शेर भरतात. यावरून ढोकळ मानानें त्यावेळचा भार म्हणजे हल्लींचे बंगाली पक्के दोन पण म्हणण्यास हरकत नाहीं

धान्य मोजण्याच्या मापांत $\frac{1}{2}$ कुडव हें सर्वांत लहान माप सांगितलें आहे; आणि वह हे सर्वांत मोठें परिमाण सांगितलें आहे. एका वहांत १० कुंभ किंवा २०० द्रोण किंवा ८०० आढक होतात. एक आढक म्हणजे १६ कुडव असें कोष्टक असल्यानें एका वहांत १२८०० कुडव होतात. एक कुडव म्हणजे १६ तोळे वजन असें कोष्टक कांहीं जुन्या ग्रंथांतून दिलें आहे. चाणक्यानें सांगितलेलें कुडव व हें कुडवसारखेंच मानल्यास एक वह म्हणजे हल्लींच्या बंगाली मापाचे पक्के ५० मण होतात. यावरून चाणक्यकालीन कुडव तरी लहान असावें किंवा दिलेल्या कोष्टकांत तरी कांहीं चुकी असावी असें वाटतें. यांतून चाणाक्याच्या वेळचें कुडव १६ तोळ्याचें नसून लहान असावें हेंच खरें. कारण अध्यांय ३७ मध्यें एका माणसाच्या आहाराला एक प्रस्थ तांदूळ सांगितले आहेत. कुडव म्हणजे १६ तोळे घेतल्यास एकप्रस्थ म्हणजे ६४ तोळे होतात. एका माणसाचा नुसत्या तांदळाचा आहार ६४ तोळे असेल असें वाटत नाहीं. यावरून त्या वेळचें कुडव ४ किंवा ५ तोळ्यांचें असावें असें वाटतें. हत्ती, घोडे, बैल वगैरेंचाहि जो आहार सांगितला आहे त्यावरूनहि कुडव म्हणजे ४ तोळेच असावे असें वाटतें. उत्तम घोड्याला आहार दोन द्रोणांचा आणि मोठ्या हत्तीला ७ द्रोणांचा आहार सांगितला आहे. कुडव म्हणजे १६ तोळे मानल्यास घोड्याचा आहार २×६४×१६ इतके तोळे आणि हत्तीचा ७×६४×१६ इतके तोळे होतो. हें प्रमाण अर्थातच शक्य दिसत नाहीं. कुडव म्हणजे ४ तोळे मानल्यास घोड्याचा आहार २×६४×४=५१२ तोळे म्हणजे हल्लीचे सुमारें सहा शेर आणि हत्तीचा २१ शेर होता. आणि तो संभवनीय दिसतो. यावरून कुडव म्हणजे ४ तोळे धरल्यास तें प्रमाण हल्लींच्या निटव्या एवढें होईल, द्रोण हें माप हल्लींच्या अधोलीच्या दीड पटीचें होईल आणि कुंभ हे कैली सोळोली मापाच्या मणाच्या बरोबरीचें होईल. सर्वांत मोठें माप वह हें असून तें १० ते १२ मणाच्या वजना इतकें होईल.

अध्याय ९३ मध्यें शिपायांना रोख पगार देण्याच्या ऐवजीं साठ पणाला एक आढक या हिशेबानें धान्य यावें असें सांगितलें आहे. त्या ठिकाणीं पण म्हणजे सुमारें एक रुपाया आणि अढाक म्हणजे १६ कुडव यांचा मेळ बसत नाहीं. त्यावरून त्या पाठांत कांहीं तरी चुकी असावी असें वाटतें. दररोज एक आढक प्रमाणें ३० दिवसांचे ३० आढक धान्याची किंमत ६० पण असणें संभवनीय नाहीं. यावरून भृत्यभरणीय या प्रकरणांत सांगितलेलें पगाराचें मान चांदीच्या नाण्यांतलें नसून तांब्याच्या नाण्यांतलें असावें असा संशय येतो. सर्वच ठिकाणीं पण हें नाणें तांब्याचें मानल्यास गुन्हेगारीबद्दल जी दंडाची शिक्षा सांगितली आहे ती अगदींच हलकी वाटूं लागते. यामुळें त्यावेळचा धान्याचा भाव काय असावा व नाणीं व वजनें मापें हल्लींच्या मापाशीं कोणत्या प्रमाणांत असावींत याविषयीं निश्चित मत देणें अवघड आहे.

## ६ दागिन्यांचीं नांवें.

शीर्षक; उपशीर्षक; प्रकांडक; अवघाटक; तरल प्रतिबंधक; इंद्रच्छंद; विजयच्छंद; देवच्छंद; राशिकलाप; गुच्छ; नक्षत्रमाला माणवक; एकावली; रत्नावली; अपवर्तक; सोपानक; ( हे मोत्यांच्या दागिन्यांचे प्रकार होत ).

**रत्नांचीं नांवें:**—सौगंधिक ( माणिक ); वैडूर्य; इंद्रनील; स्फटिक; चंद्रकांत; सूर्यकांत; विमलक; सस्यक; अंजनमूलक; पित्तक; सुकलभ; लोहितक; अमृतांशुक; ज्योतिरसक; मैलेयक; आदिच्छत्रक; कूर्प; क्षीरपक; पुलक; प्रवालक; समाराष्ट्रक; मध्यराष्ट्रक; कातीयराष्ट्रक; श्रीकटनक; मणिमंतक; इन्द्रवानक. आलकंदक व वैवर्णिक असे प्रवाळाचे प्रकार आहेत.

यांची माहिती पूर्वार्ध अध्याय ३२ यांत दिली आहे ती पाहावी.

## ७ घोड्यांच्या वेगवेगळ्या गति.

१ औपवेणुक २ वर्धमानक ३ यमक ४ आलीढप्लुत ५ पृथग ६ त्रिकचाली ७ प्रकीर्णक ८ प्रकीर्णोत्तर ९ निषण्ण १० पार्श्वानुवृत्त ११ उर्मिमार्ग १२ शरभक्रीडित १३ शरभप्लुत १४ त्रिताल १५ बाह्यानुवृत्त १६ पंचपाणि १७ सिंहायत १८ स्वाधूत १९ क्लिष्ट २० श्लाघित २१ बृंहित २२ पुष्पाभिकीर्ण २३ नारोष्ट्र २४ वलगन २५ कपिप्लुत २६ भेकप्लुत २७ एणप्लुत २८ एकपादप्लुत २९ कोकिल संचारी ३० उरस्य ३१ बकचारी ३२ कांक ३३ वारिकांक ३४ मायूर ३५ अर्धमायूर ३६ नाकुल ३७ अर्धनाकुल ३८ वाराह ३९ अर्धवाराह ४० नीचैर्गत ४१ लंघन ४२ धोरण

यांची माहिती पूर्वार्ध अध्याय ५१ यांत दिली आहे.

## ८ व्यूहांचे विविध प्रकार.

१ दंडव्यूह, २ प्रदर, ३ दृढक, ४ असह्य, ५ श्येनाकार, ६ चाप, ७ चापकुक्षि, ८ प्रतिष्ठ, ९ सुप्रतिष्ठ, १० संजय, ११ विजय, १२ विशाल विजय, १३ चमूमुख, १४ झषास्य, १५ सूचि, १६ वलय, १७ दुर्जय, १८ सर्पसारी, १९ गोमूत्रक, २० शकट, २१ मकर, २२ पारिपतंतक, २३ सर्वतोमुख, २४ सर्वतोभद्र, २५ अष्टानीक, २६ असंहत, २७ वज्र, २८ गोधा, २९ उद्यानक, ३० काकपदी, ३१ अर्धचंद्रक, ३२ कर्कोटक शृंगी, ३३ अरिष्ट, ३४ अचल, ३५ अप्रतिहत.

टीपः—या व्यूहांच्या रचनेची माहिती उत्तरार्ध पृ. १४४ अध्याय १३४ मध्यें दिली आहे.

## ९ वें परिशिष्ट.

**पूर्वार्ध अध्याय २४ दुर्ग रचना**—या अध्यायाच्या भाषांतराच्या भागाची एक कॉपी चुकून तशीच राहिली होती. तो राहिलेला भाग येथें दिला आहे. तो पूर्वार्धाच्या २४ व्या अध्यायाच्या शेवटीं जोडून वाचावा.

वाड्याचें जेवढें क्षेत्र असेल त्याचे पांच भाग करावे. त्यांत मध्यें विहीर बांधावी, तिच्या दोनहि बाजूस दीर्घ चौरसाकार असे दोन सोपे बांधावे आणि त्या दोन्ही सोप्यांच्या दोनहि टोकांस एकेक कोठी बांधावी. प्रत्येक सोप्यांच्या बाहेरच्या बाजूस घुमट युक्त असे दोन दोन उंच ओटे बांधावे. त्या ओट्यांच्या दरम्यान जाण्या येण्याला लहानसा दरवाजा ठेवावा. वरच्या बाजूस दुमजला करावा. त्याची उंची तळमजल्याच्या अर्ध्यानें असावी व त्याचे खांब फार जाडी असूं नयेत. तिसऱ्या मजल्याचा विस्तार तळमजल्याच्या क्षेत्रफळाच्या एक द्वितीयांश किंवा एक तृतीयांश एवढा असावा. त्याच्या भिंती विटाच्या असाव्या. दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यावर चढण्याकरितां डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत वाटोळा जिना असावा. इतर बाजूंना भिंतींतून काढलेले गुप्त जिने असावे.

वेशीच्या दरवाजाच्या वरचें आडवें लांकूड दोन हात जाडीं असावें. दरवाजाच्या बाजूचे उभे स्तंभ ¾ हात जाडीचे असावे. दरवाजा बंद करण्यासाठीं दोन अडसर असावे. दरवाजाचें कुसूं मुंढां हात लांबीचें असावें. दरवाज्याच्या मधली दिंडी पांच हात उंचीची असावी. आणि हत्तीला शिरण्याला प्रतिबंध करणारे असे चार अडसर असावे.

गोपुराजवळ दरवाजाच्या अर्ध्या रुंदी इतका आणि दरवाजाच्या उंची इतका मातीचा बुरूज असावा. किल्याच्या सभोंवतीं फेरी घालण्याची वाट मोडतां न येण्यासारखी पक्की असावी. जेथें किल्ल्याभोंवतीं पाणी नसेल तेथें ती वाट भुईंतून असावी.

तटाला शोभेल असा मुख्य वेशीचा दरवाजा करून त्याशिवाय त्या दरवाजाच्या एकतृतीयांश एवढें सुसरीच्या तोंडासारखें द्वार ठेवलेलें असें गोपुर बांधावें. तटाच्या आंत वावडी बांधावी व तींत उतरण्याला पुष्करिणीद्वार ठेवावें. वेशीच्या दिंडीच्या दीडपट आकाराचे दरवाजे असलेले आणि चार सोपे असलेलें असें कुमारीपुर बांधावें. तें दुमजली असावें; त्याचा दरवाजा कमानीच्या आकाराचा असावा व त्याला शिखर किंवा गोपुर असूं नये.

जागेचा विस्तार आणि हत्यारें वगैरे सामानाची अनुकूलता असेल त्या बेतानें किल्ल्यांत लागणारें सामान व शस्त्रें हत्यारें इत्यादि ठेवण्याकरितां गुप्त तळघरें करावीं. तीं उंचीच्या मानानें एक तृतीयांश अधिक लांबी रुंदीचीं असावीं त्या तळघरांत गोटे, कुदळी, कुऱ्हाडी, बाण, गजादिकांचे शृंगार, गदा, मुद्गर, दण्ड, चक्रें, यंत्रें, शेकडो लोकांचा एकदम घात करणारीं शतघ्नी नांवाचीं यंत्रें, लोहारांनीं बनविलेलीं किरकोळ हत्यारें, त्रिशूल, भाले, उंटाच्या मानेसारख्या वाकड्या वांबूच्या काठ्या, आगीचे बाण आणि कुप्याध्यक्ष प्रकरणांत सांगितलेले अनेक पदार्थ यांचा संग्रह करावा.

## १० विविध प्रकारचे तहनामे.

१ आत्मामिष संधि २ पुरुषांतर संधि ३ अदृष्टपुरुष संधि ४ परिक्रय संधि ५ उपग्रह संधि ६ सुवर्ण संधि ७ कपाल संधि ८ आदिष्ट संधि ९ उच्छिन्नसंधि १० अपक्रय संधि ११ परदूषणसंधि १२ स्थलावच्छिन्नसंधि १३ कालावच्छिन्नसंधि १४ कार्यावच्छिन्नसंधि १५ अकृतचिकीर्षा १६ कृतश्लेषणं १७ कृतविदूषणं १८ अवशीर्ण क्रिया १९ समसंधि २० विषमसंधि २१ अतिसंधि २२ भूमिसंधि २३ अनवसित संधि २४ कर्मसंधि.

या संधींच्या अर्थांचा उलगडा उत्तरार्ध अध्याय १०१, १०४, १०५, १११ यांत पहावा.

## ११ कौटिलीय अर्थशास्त्रांत सांगितलेल्या शिक्षा.

| गुन्ह्यांचे प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| गुप्त मसलतीचा भेद करणें | ठार मारणें. |
| स्त्रिया व मुलें यांच्या पोषणाची तजवीज न करतां संन्यास घेणें | २५० पण दंड. |
| भार्येला संन्यास घ्यावयास लावणें | " " " |
| खोटीं नाणीं खजिन्यांत आणून देणें | " " " |
| कोठींकडील धान्याचें माप खोटें दिल्यास | धान्याच्या किंमतीच्या दुप्पट दंड. |
| कामावर देखरेख न ठेवल्यामुळें नुकसान झाल्यास | नुकसानीच्या मानानें दंड. |
| हिशेब द्यावयास वेळेवर न आल्यास | हिशेबाच्या रकमेच्या दसपट दंड. |
| तपासणीस हिशेब न तपासील तर | ४८ ते ९६ पण दंड. |
| शिल्लक आणून भरणा करावयास उशीर लावल्यास | दर महिन्यास २०० पण दंड. |
| हिशेबांत भलताच जमाखर्च दाखविणें | ४८ ते ९६ पण दंड. |
| हिशेब पद्धतशीर न लिहिल्यास | १२ पण दंड. |
| शिल्लक लिहितांना चुकी केल्यास | २४ पण दंड. |
| अफरातफर केल्यास | रकमेच्या ८ पट दंड. |
| शिल्लक गहाळ झाल्यास | रकमेचा भरणा करून घेऊन शिवाय ५ पट दंड. |
| मागाहून रकम लिहिल्यास | २४ पण दंड. |
| वसुलास प्रतिबंध करणें | दसपट दंड. |
| खजिन्यांतील द्रव्य व्याजानें दिल्यास | नफ्याच्या दुप्पट दंड. |
| खजिन्यांतील रत्नांचा उपभोग घेणें | देहान्त शिक्षा. |
| मूल्यवान् वस्तूंचा उपयोग करणें | २५० पण दंड. |
| हलक्या किंमतीच्या वस्तूंचा उपभोग घेणें | किंमतीच्या दुप्पट दंड. |
| सरकारी वस्तु घेऊन दुसरी त्याजागीं ठेवणें | उपभोगाप्रमाणेंच शिक्षा. |
| वसुलाचा अपहार केल्यास | १२ पट दंड. |
| आरोपीबरोबर संगनमत करणाऱ्यास | देहांत शिक्षा. |
| खाणींतील लोकांनीं चोरी केल्यास | किंमतीच्या ८ पट दंड. |
| नाणीं पाडण्याच्या नियमांचा भंग केल्यास | २५ पण दंड. |
| मिठावरील कर चुकविल्यास | ६०० पण दंड. |
| मिठांत भिसळ करणें | ५०० ते १००० पण दंड. |
| परवान्यावांचून मीठ तयार करणें | " " " |
| अधिकारावांचून टांकसाळींत जाणारास | सर्वस्वाची जप्ती. |
| टांकसाळीच्या कामावरील अधिकाऱ्याजवळ सोनें रुपें सांपडल्यास | सांपडलेला माल जप्त. |
| कारागिरानें कामाचा वायदा टाळल्यास | वेतनाच्या दुप्पट दंड. |
| सांगितलेल्या प्रकाराहून विपरीत प्रकारानें काम केल्यास | " " " |
| सोनारानें सोन्याचा कस बदलला किंवा सोनें कमी केलें तर | २५० पण दंड. |
| खोटें वजन दिलें असतां | ५०० पण दंड. |
| खोटी तागडी वापरल्यास | १००० पण दंड. |

| गुन्ह्यांचे प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| शुद्ध धातूंत हिणकस मिसळल्यास | ,, ,, ,, |
| सरकारी परवानगीखेरीज इतरत्र नाणीं करविणारास | १२ पण दंड. |
| इतरत्र नाणें पाडणाऱ्याला | २४ पण दंड. |
| तराजू व वजनें त्या कामावरील अध्यक्षाजवळूनच विकत न घेतल्यास | १२ पण दंड. |
| परदेशांतून येणाऱ्या मालावर शिक्कामोर्तब नसल्यास | जकातीच्या दुप्पट दंड. |
| मालावर खोटा छाप मारलेला असल्यास | जकातीच्या ८ पट दंड. |
| सरकारी मालावरील शिक्का बदलल्यास | बंदींत टाकणें व मालाच्या प्रत्येक गट्ट्याबद्दल ११ पण दंड. |
| जकात कमी पडण्याकरितां मालाची किंमत कमी सांगितल्यास | ८ पट जकात घेणें. |
| कमी प्रतीचा नमुना दाखवून भारी किंमतीचा माल लपवून ठेविल्यास | जकातीच्या आठपट दंड. |
| जकात न देतां नाक्याचें निशाण ओलांडून गेल्यास | ,, ,, ,, |
| जकात न भरलेला माल जकात भरलेल्या मालांत घुसडणें | मालाच्या किंमतीच्या दुप्पट दंड. |
| एका मालाचा परवाना दाखवून दुसराच माल नेणें | ,, ,, ,, ,, |
| नाकेदारास फसवून माल घेऊन जाणारास | ५०० ते १००० पण दंड. |
| हलका माल लपविल्यास | जकातीच्या ८ पट दंड. |
| भारी किंमतीचा माल छपविल्यास | सर्व माल जप्त करणें. |
| खाणींमधून धातूचा माल घेतल्यास | ६०० पण दंड. |
| फळबागेंतून किंवा फुलबागेंतून फुलेंफळें घेणारास | ५४ पण दंड. |
| बागेंतून किंवा मळ्यांतून भाजीपाला घेणारास | ५१ ३/४ पण दंड. |
| शेतांतील सगळें पीक घेणारास | ५३ पण दंड. |
| कारखान्यांतील स्त्रियांकडे वाईट नजरेनें पाहणारास | २५० पण दंड. |
| मजुरी देण्यास विलंब केल्यास | ५०० पण दंड. |
| काम पुरें झाल्यावांचून मजुरी दिल्यास | ,, ,, ,, |
| मजुरी घेऊन काम पुरें न करणाऱ्या स्त्रीचा | आंगठा कापणें. |
| कारागिरीकरतां दिलेला माल गडप करणें किंवा चोरून ठेवणें किंवा कामांत अडथळा उत्पन्न करणें | आंगठे कापून टाकणें. |
| ठराविक जागेहून इतर ठिकाणीं दारू गाळणें अगर खरेदी विक्री करणें. | ६०० पण दंड. |
| दारू पिऊन निजलेल्या गिऱ्हाइकांच्या अंगावरील दागिने, वस्त्रें वगैरे नाहींसे झाल्यास गुत्तेवाल्याला | मालाच्या किंमती इतका दंड. |
| राखीव जंगलांतील किंवा राखून ठेवलेले पशुपक्षी मारणारास | १००० पण दंड. |
| हिंसा न करणाऱ्या पशुपक्ष्यास पकडणाऱ्या किंवा मारणाऱ्या इसमास | २६ ३/४ पण दंड. |
| हरिणास पकडणाऱ्यास किंवा मारणाऱ्यास | ५३ १/२ पण दंड. |
| वासरूं, गाय, बैल मारणाऱ्यास | ५० पण दंड. |
| मना केलेल्या प्रकारचें मांस विकणारास | १२ पण दंड. |
| गणिकेनें भलत्या इसमाजवळ दागिने ठेवल्यास | ४ १/४ पण दंड. |
| गणिकेनें जिनगी विकली किंवा गहाण टाकली तर | ५४ १/४ पण दंड. |
| गणिकेची बेअदबी केल्यास | २४ पण दंड. |
| गणिकेला मारहाण केल्यास | ४४ पण दंड. |

| गुन्ह्यांचे प्रकार | शिक्षा. |
|---|---|
| गणिकाकुमारीच्या इच्छेविरुद्ध बळजबरी केल्यास | १००० पण दंड. |
| संमतीनें केल्यास | २५० पण दंड. |
| गणिकेला कोंडून ठेवणें, पळवून नेणें, कुरूप करणें | १००० पण दंड. |
| गणिकेस ठार मारणारास | ७२००० पण दंड |
| गणिकामाता वगैरेंना मारणारास | ५०० पासून १००० पण दंड. |
| राजाची आज्ञा मोडणाऱ्या गणिकेस | १००० फटके अथवा ५००० पण दंड |
| पुरुषाचा खून करणाऱ्या गणिकेस | अग्नींत किंवा पाण्यांत टाकणें. |
| गणिकेचे दागदागिने हरण करणारास | ८ पट दंड |
| गणिकेचें वेतन न देणारास | ८ पट दंड. |
| वेतन घेऊन काम करण्यास नाकारणाऱ्या गणिकेस | दुपटीपासून ८ पट दंड. |
| जनावराच्या अंगावर सरकारी खूण किंवा छाप मारून अदलाबदल करणारास | ४८ पासून ९६ पण दंड. |
| शिशिर, वसंत व ग्रीष्म ऋतूंत दोन वेळ धार काढणाऱ्याचें | बोट कापून टाकणें. |
| धार काढण्याची वेळ टाळणारास | १ दिवसाची मजुरी दंड. |
| बैलाची झुंज लावणारास | ४८ पासून ९६ पण दंड. |
| झुंज लावल्यानें बैल जखमी झाल्यास | ५०० पासून १००० पण दंड. |
| औषधोपचार करण्याकरितां बांधून ठेवलेला घोडा बसावयास घेतल्यास | १२ पण दंड. |
| औषधामुळें जनावराचा आजार वाढल्यास | खर्चाची दुप्पट भरपाई. |
| शुश्रूषेतील किंवा औषधांतील दोषामुळें जनावर मेल्यास | किंमतीइतका दंड. |
| गजशाळेची किंवा हत्तीची व्यवस्था चांगली न ठेवल्यास | दंड. |
| देशांत येण्याचा परवाना नसेल तर | १२ पण दंड |
| खोटा परवाना दाखविणारास | ४८ ते ९६ पण दंड |
| परदेशांतल्या इसमाचा परवाना दाखविल्यास | ५०० ते १००० पण दंड |
| घराच्या मालकानें पाहुण्याची वर्दी न दिल्यास | ३ पण दंड. |
| उन्हाळ्यांत दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरांत विस्तव पेटविणाऱ्यास | १/८ पण दंड. |
| ज्याजवळ आग विझविण्याचीं साधनें नसतील त्यास | १/४ पण दंड. |
| आग विझविण्यास न जाणाऱ्या घराच्या मालकास | १२ पण दंड. |
| ,, ,, भाडेकऱ्यास | १० पण दंड |
| ज्याच्या निष्काळजीपणामुळें आग लागली असेल त्यास | ६८ पण दंड |
| मुद्दाम आग लावणारास | आगींत टाकून ठार मारणें. |
| रस्त्यावर कचरा टाकणारास | १/८ पण दंड |
| चिखलानें किंवा पाण्यानें रस्ता अडविणारा | १/४ पण दंड. |
| राजमार्गावरील रस्ता अडविणारास | १/२ पण दंड. |
| मेलेलें मांजर वगैरे शहरांत टाकल्यास | ३ पण दंड |
| मेलेलें गाढव, घोडें टाकल्यास | ६ पण दंड |
| मनुष्याचें प्रेत टाकणारास | ५० पण दंड |
| भलत्याच रस्त्यानें किंवा वेशीनें प्रेत बाहेर नेल्यास | ४८ पासून ९६ पण दंड |
| असें प्रेत जाऊं दिल्यास वेशीवरील रखवालदारास | १०० पण दंड |
| स्मशानावांचून भलत्याच ठिकाणीं प्रेत पुरल्यास किंवा जाळल्यास | १२ पण दंड |

| गुन्ह्यांच प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| रात्रीं मनाई केलेल्यावेळीं भटकण्याबद्दल | १¼ पण दंड |
| राजवाड्याच्या आसपास मधल्या प्रहरांत भटकल्याबद्दल | २½ पण दंड |
| बाहेर निघून न गेल्यास | ५ पण दंड |
| राजवाड्यांत किंवा राजाच्या बागेंत प्रवेश केल्यास | २०० ते ५०० पण दंड |
| तटबंदी चढून गेल्यास | ,, ,, ,, |
| रात्रीच्या वेळीं हत्यारें घेऊन हिंडल्यास | गुन्हेगाराप्रमाणें दंड |
| हद्दपार झालेले लोक वेष पालटून शहरांत आल्यास | ,, ,, |
| भलत्याच इसमास अटकाव केल्यास किंवा अटकाव करावयास पाहिजे त्यास अटकाव न केल्यास | ५ पण दंड. |
| पराधीन स्त्रीवर बलात्कार केल्यास | ४८ पासून ९६ पण दंड. |
| परतंत्र नसणाऱ्या गणिकेवर बलात्कार करणारास | २०० पासून ५०० पण दंड |
| स्त्री या नात्यानें एखाद्याच्या ताब्यांत असलेल्या स्त्रीवर बलात्कार केल्यास | ५०० पासून १००० पण दंड. |
| लग्न झालेल्या स्त्रीवर बलात्कार करणारास | देहांत शिक्षा. |
| शहर कामगाराच्या हलगर्जीपणाबद्दल | नुकसानीच्या मानानें दंड. |
| परोक्ष अपराधाबद्दल | दाव्याच्या रकमेच्या ८ पट दंड. |
| साक्षीदार न मिळाले व वादांत हरला तर | दाव्याच्या रकमेच्या १० पट दंड. |
| वादांत हरणारास | दुसऱ्या बाजूचा कोर्टखर्च देणें. |
| वेळेवर साक्षी पुरावा न दिल्यास | १२ पण दंड. |
| १॥ महिन्यांत प्रतिवादीनें उत्तर न दिलें तर | ३ ते १२ पण दंड. |
| खोटे साक्षीदार आणल्यास | दाव्याच्या मानानें दंड. |
| भर्त्यानें दुसरा विवाह करण्यापूर्वी कालप्रतीक्षेचा नियम मोडल्यास | २४ पण दंड व नुकसानभरपाई. |
| ऋतुकालीं समागम न केल्यास | ९६ पण दंड. |
| स्त्रीनें भर्त्याची आज्ञा मोडल्यास | १२ पण दंड. |
| भर्त्यानें करार मोडल्यास | २४ पण दंड. |
| स्त्रीला शिक्षण देण्याविषयीं सांगितलेल्या नियमाचा भंग केल्यास नवऱ्यास | इतर गुन्हेगाराच्या अर्ध्यानें दंड. |
| स्त्रीवरील गैरचालीचा आरोप खोटा ठरल्यास नवऱ्याला | १२ पण दंड. |
| नवऱ्यानें मनाई केलेल्या गोष्टी करण्याबद्दल | ३ पण दंड. |
| बाहेर कोणास भेटावयास गेल्यास स्त्रीला | ६ ते २४ पण दंड. |
| झोपेंत असलेल्या स्त्रीला काढून आणल्याबद्दल | १२ ते २४ पण दंड. |
| स्त्रीपुरुषांनीं एकांताचा संकेत ठरविल्यास | २४ ते ४८ पण दंड. |
| संशयित स्थळीं संभाषण करणाऱ्या स्त्रीस | ५ फटके किंवा ५ पण दंड. |
| स्त्रीपुरुषांनीं आपसांत देवघेव केल्यास | १२ ते १०८ पण दंड. |
| नवऱ्याच्या घरांतून कारणावांचून पळून जाणाऱ्या स्त्रीस | ६ ते २४ पण दंड. |
| पळून आलेल्या स्त्रीला घरांत थारा देणें | १०० पण दंड. |
| स्त्रीला माहेरीं जाण्यास हरकत करणाऱ्यास | १२ पण दंड. |
| घरांत मोरी पायखाना वगैरे सोय न केल्यास | १००० पण दंड. |
| दुसऱ्याच्या भिंतीचें नुकसान होईल अशा रीतीनें मोरीचें पाणी वगैरे सोडल्यास | १२ ते २४ पण दंड. |
| घाण पाणी बाहेर वाहून जाण्याचें गटार न बांधल्यास | १२ पण दंड. |

| गुन्ह्यांचे प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| घर रिकामें करावयास सांगून जो न करील त्यास | १२ पण दंड. |
| भाडेकऱ्यास विनाकारण घालवून देईल त्यास | १२ पण दंड. |
| समाईक उपभोगास हरकत करील त्यास | १२ पण दंड. |
| समाईक इमारतीचें नुकसान करणाऱ्यास | २४ पण दंड. |
| लिलाव पुकारल्यानंतर खरेदी घ्यावयास नाकबूल झाल्यास | २४ ते २०० पण दंड. |
| मालक नसतां लिलांव केल्यास | २४ पण दंड. |
| गांवाची सीमा लबाडीनें खोटी सांगितल्यास | १००० पण दंड. |
| सीमेचें अतिक्रमण करणाऱ्यास | १००० पण दंड. |
| सीमेची खूण मोडणाऱ्यास | २४ पण दंड. |
| पाणी घेण्याच्या पाळी खेरीज भलत्या दिवशीं पाणी घेणाऱ्यास | ६ पण दंड |
| दुसऱ्याच्या शेतांत जावयाचें पाणी वाटेंत अडविल्यास | ६ पण दंड |
| शेतकामासाठीं बांधलेल्या पाटास अडथळा करणाऱ्यास | १००० पण दंड |
| गांवांतील जनावरांची किंवा माणसांची वाट बंद करणाऱ्यास | १२ ते १००० पण दंड. |
| पेरणीस हरकत करणाऱ्यास | १२ पण दंड. |
| गांवकरी एखाद्या इसमास निष्कारण गांवांतून हांकून देतील तर | २४ते १००० पण दंड |
| जनावरांनी शेतातलें पीक खाल्लयास | नुकसानीच्या दुप्पट दंड. |
| मालकाच्या परवानगीशिवाय गुरें चारल्यास | १२ पण दंड. |
| दुसऱ्याच्या शेतांत गुरें सोडून निघून गेल्यास | २४ पण दंड. |
| सार्वजनिक कामांत हुकूम न पाळल्यास | १२ पण दंड. |
| सार्वजनिक काम बिघडविल्यास | २४ पण दंड. |
| मुदतीपूर्वी व्याज मागितल्यास | मागणीच्या चौपट दंड. |
| चक्रवाढ व्याजानें व्याज मागितल्यास | मागणीच्या चौपट दंड |
| कर्जाची फेड करावयास ऋणको आला असतां तें न घेणाऱ्यास | १२ पण दंड. |
| साक्षीदारानें खरी गोष्ट न सांगितल्यास | २४ पण दंड. |
| ठेवीचा उपभोग घेतल्यास | २४ पण दंड. |
| ठेवीचें स्थलांतर केल्यास | २४ पण दंड. |
| गहाण सोडवावयास आला असतां तें न देणाऱ्यास | १२ पण दंड. |
| गुप्त ठेव देण्याचें नाकारल्यास | चोरीप्रमाणें शिक्षा. |
| अज्ञानी मूल विकणें किंवा गहाण टाकणें | १२ ते १००० पण दंड. |
| गहाण ठेवलेल्या दासीशीं समागम करण्याबद्दल | ४८ ते ५०० पण दंड. |
| गरोदर दासीस विकणें किंवा गहाण टाकणें | ४८ ते ९६ पण दंड. |
| मोबदला घेऊन दास्यांतून मुक्तता न करणाऱ्यास | १२ पण दंड |
| मजुरी घेऊन काम न करणारास | १२ पण दंड किंवा मजुरीच्या ५ पट दंड |
| मजुरी बुडविणाऱ्यास | ६ पण दंड किंवा मजुरीच्या दसपट दंड |
| मजुरानें कामाचे नियम मोडल्यास | २४ पण दंड |
| यजमानानें ऋत्विजास किंवा ऋत्विजानें यजमानास मध्येंच सोडल्यास | ४८ ते ९६ पण दंड |

| गुन्ह्यांचे प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| मालाच्या खरेदी विक्रीच्या नियमांचें उल्लंघन करणारास | २४ पण दंड किंवा किंमतीचा दशांश दंड |
| वराच्या अंगचा दोष न कळवितां लग्न करणारास | १९२ पण दंड |
| कन्येचे दोष न कळवितां तिचें लग्न लावणारास | ९६ पण दंड |
| रोगानें पीडलेलें जनावर निरोगी म्हणून विकणारास | १२ पण दंड |
| धमकी देऊन देणगी घेणाऱ्यास | चोरीप्रमाणें शिक्षा |
| दुसऱ्यास अपाय करण्याकरितां द्रव्य देणाऱ्यास | ५०० पासून १००० पर्यंत दंड |
| राजाशीं मगरुरीनें वागणाऱ्यास | ५०० पासून १००० पर्यंत दंड |
| हरवलेली वस्तु परवानगी वांचून घेऊन गेल्यास | ४८ पासून ९६ पण दंड |
| भूमिगत द्रव्य सांपडलेल्याची वर्दी न दिल्यास | १००० पण दंड |
| फुलें, फळें, भाजीपाला वगैरे चोरल्यास | बारापणांपासून चोवीस पणांपर्यंत दंड. |
| लोखंड, लाकूड, क्षुद्र पशु कापड „ | चोवीसपासून अठ्ठाचाळीस पण दंड. |
| तांबें पितळ कांसें वगैरे धातु „ | ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड. |
| मोठें जनावर, मनुष्य, शेत, घर. „ | २०० पसून ५०० पणां पर्यंत दंड. |
| जबरदस्तीनें एकाद्या स्त्रीला अथवा पुरुषाला बंधनांत ठेवणें किंवा ठेवविणें अथवा बंधनांतून सोडण्याचें नाकारणें. | ५०० पणांपासून १००० पणां पर्यंत दंड. |
| तुच्छतापूर्वक लावून बोलणें | ३ पण दंड. |
| तुच्छतापूर्वक खोटें लावून बोलणें. | ६ पण दंड. |
| आंधळ्या लंगड्याची व्याजस्तुतीनें निंदा. | १२ पण दंड. |
| एकाद्यावर बाष्कळ आरोप. | १२ पण दंड. |
| समस्थितींतील मनुष्यास अपशब्द उच्चारल्यास | १२ पणांपेक्षां अधिक दंड. |
| वरिष्ठास अपशब्द उच्चारल्यास | २४ पणांपेक्षां अधिक दंड. |
| कनिष्ठास अपशब्द उच्चारल्यास | ६ पणांपेक्षां अधिक दंड. |
| क्रिया करण्यास असमर्थ होऊन खोटी सबब सांगणें. | १२ पण दंड. |
| जन्मभूमिबद्दल अपशब्द बोलणें | ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड |
| समाजाबद्दल अपशब्द बोलणें. | २०० पासून ५०० पणांपर्यंत दंड. |
| देवासंबंधानें अपशब्द बोलणें. | ५०० पासून १००० पणांपयत दंड. |
| बेंबीच्या खालच्या शरिराच्या भागास हातानें स्पर्श करणें किंवा धूळ फेंकणें. | ३ पण दंड. |
| अंगावर थुंकणें | ६ पण दंड. |
| अंगावर मुत्र किंवा विष्ठा टाकणें. | १२ पण दंड. |
| बेंबीच्या वरील भागावर थुंकणें किंवा विष्ठा टाकणें | २४ पण दंड. |
| डोक्यावर थुंकणारास | ४८ पण दंड. |
| पाय, कपडा, केंस धरणें | ६ पणांवर दंड. |
| आंवळून धरणें, ढकलणें | ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड. |
| हातानें मारणें | ३ पासून १२ पण दंड. |
| पायानें मारल्यास | ६ पासून २४ पणांपर्यंत दंड. |
| अवयव सुजेपर्यंत मारल्यास | ४८ पासून ९६ पणापर्यंत दंड, |

| गुन्हांचे प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| जीव जाईल अशी इजा केल्यास | २०० पासून ५०० पणांपर्यंत दंड. |
| लांकूड व लोखंडी कांब यांनीं मारल्यास व रक्त न निघाल्यास | २४ पण दंड. |
| लांकडानें रक्त येईपर्यंत मारल्यास | ४८ पण दंड. |
| हातपाय मोडणें. | ४८ पासून ९६ पणांपर्यंत दंड |
| मांडी किंवा मान मोडणें, डोळा फोडणें | २०० पासून ५०० पण दंड. |
| कटवाल्यास | दुप्पट दंड |
| गर्दींत मारामारींत चोरी | ६ पण दंड |
| मालाची नुकसानी | नुकसानीची किंमत व दुप्पट दंड |
| भिंतीस नुकसान | ६ पण दंड व नुकसानी |
| जनावरांस दुखापत | १–२ पण दंड व खर्च |
| झाडें तोडल्यास | ५०० पणांपर्यंत दंड |
| देवळांतील झाडें | अर्धा दंड |
| सीमेवरचीं झाडें | दुप्पट दंड. |
| जुगारीबद्दल | ४८ पासून ५०० पणांपर्यंत. |
| कपट द्यूत | ९६ पण दंड |
| बनावट फासे किंवा कवड्या वापरणारास | १२ पण दंड |
| ठेव नाकबूल करणें वगैरे | १०० पण दंड. |
| आसाना टाकणें | ९६ पण दंड |
| अज्ञान मुलास कोंडून ठेवणें | १००० पण दंड |
| कायदेशीर नाणें नाकारणें | १२ पण दंड. |
| खोटें नाणें पाडणें | १००० पण किंवा वध. |
| भूमिगत द्रव्य चोरून ठेवणें | १००० पण दंड. |
| वैद्याचे हातून रोग्याचें मरण | ४८ पासून ५०० पणांपर्यंत दंड. |
| खोटें वजन माप | ९६ पण दंड. |
| हलका माल भारी किंमतीस विकणें | ५४ पण दंड. |
| व्यापारांचा कट | १००० पण दंड. |
| खोटा मापाड्या. | २०० पण दंड. |
| मालांत भेसळ. | १२ पण दंड. |
| बेताल नफा घेणें. | २०० पण दंड. |
| खोटा खटला. | ४८ ते ९६ पण दंड. |
| जेलरच्या हातून कैद्याचा मृत्यु. | ५०० पासून हजार पण दंड. |
| सरकारी अधिऱ्यांचे अपराध | देहान्त. |
| चोरी ४० पणांपासून | वधाची शिक्षा. |
| कैद्यास तुरुंगांतून सोडविणें | जप्ति व वध. |
| कैद्याचा छळ | मध्यम दंड. |
| कच्च्या कैदेंतून कैदी सोडविणें | वध. |
| क्षेत्रांतील चोरी | हात तोडणें. |
| राजाच्या वतनांचा उपभोग. | हात पाय तोडणें. |

| गुन्ह्यांचे प्रकार. | शिक्षा. |
|---|---|
| कुसकें मांस विकणें | हात पाय तोडणें. |
| नर मांस विकणें | वध. |
| खून | हाल हाल करून मारणें. |
| जबर दुखापत | हजार पर्यंत दंड |
| गर्भपात करणें | ९६ पासून १००० पण दंड. |
| लुटारूपणा | सुळावर चढविणें. |
| खोटा पर्वाना ( पासपोर्ट ) | ५०० पासून १००० पर्यंत दंड किंवा जकतीच्या ८ पट. |
| व्यभिचार | चोरी इतका दंड |
| विवाहीत स्त्री काढून नेणें | १०० पण दंड. |
| अभक्ष्य व अपेय पदार्थ जुलमानें चारणें | ५४ पणापासून १००० पण दंड |
| सशस्त्र रात्रीं घरांत शिरणें. | १००० पण दंड. |
| भलत्या वाटेनें घरांत प्रवेश करणें | ४८ पण दंड. |
| जनावरांच्या तडाक्यांतून न सोडविणें | ४८ पण दंड |
| आप्तस्त्रियांचा व्यभिचार | वध |
| दुसऱ्याच्या नांवचा खोटा हुकूम किंवा खोटी मोहोर करणारास | ४८ पासून १००० पणापर्यंत दंड. |
| राजाच्या नांवचा खोटा हुकूम किंवा खोटी मोहोर करणारास. | वधाची शिक्षा. |
| न्यायाधिशानें खटला चालवितांना योग्य वर्तन न केल्यास | ५०० पासून १००० पण दंड. |
| कोर्टांतील लेखक भलतेंच लिहून घेईल तर | ४८ पासून ९६ पण दंड. |
| अटकेंत असलेल्या स्त्रीवर बलात्कार | देहांत शिक्षा. |
| दासीवर बलात्कार | ४८ ते ९६ पण दंड. |
| परवानगी वांचून किल्ल्यांत शिरणें | वध किंवा २०० पण दंड. |
| जो शूद्र स्वतःस ब्राह्मण म्हणवील त्यास | डोळ्यांत अंजन घालून आंधळें करणें. |
| देवाच्या मूर्ती चोरून नेणें | ५०० पासून १००० पण दंड. |
| खुनी माणसास किंवा चोरास अन्नवस्त्र देईल त्यास | ५०० पासून १००० पर्यंत दंड. |
| राजाविरुद्ध बंड करणें | डोक्यास व हातास पलुते बांधून जाळून ठार करणें. ( ब्राह्मण असल्यास अंधार कोठडींत कोंडून ठेवणें ) |
| गुरू तपस्वी किंवा आप्त यांचा खून करणें | जाळून ठार मारणें |
| गुरू तपस्वी व आप्त यांचा अपमान करणें | जीभ छाटून टाकणें |
| पाण्यानें भरलेलें तळें फोडणें | पाण्यांत बुडवून मारणें |
| कोरडें तळें फोडल्यास | ५०० पासून १००० पण दंड |
| गायरानास शेतास जंगलास वगैरे आग लावणें | आगींत जाळून टाकणें |
| राजाविरुद्ध विपरीत कंड्या उठविणें, राजरहस्य फोडणें, ब्राह्मणाचें अन्न चाखून दूषित करणें | जीभ उपटून टाकणें. |
| शस्त्रें व चिलखतें यांची चोरी करणाऱ्या लष्करी शिपायास | ५०० पासून १००० पण दंड. |
| शस्त्रें व चिलखतें चोरणाऱ्या इतर गुन्हेगारास | ठार मारणें. |
| अवयव छेदणाऱ्यास | तोच अवयव छेदून टाकणें, |

| गुन्ह्यांचे प्रकार. | शिक्षा. |
| --- | --- |
| कुमारीवर बलात्कार | हात तोडणें |
| बलात्कार-करताना कुमारी मयत झाल्यास | वधाची शिक्षा. |
| परस्त्रीच्या इच्छेनें समागम करणारास | ५४ पण दंड. |
| विवाहास उभा रहाणारा तोतया | हात तोडणें. |
| एकाशीं विवाह ठरवून दुसऱ्याशीं विवाह करणें | २०० पण दंड |
| एक मुलगी दाखवून दुसरी मुलगी देणारास | १०० ते २०० पण दंड. |
| कुंटणपणा करणाऱ्या स्त्रीस | १०० पण दंड. |
| व्यभिचारासंबंधीं खोटा आरोप करणारास | २०० पण दंड. |
| मुलीस पळवून नेणारास | २०० पण दंड |
| पळविलेल्या मुलीच्या अंगावर दागिने असल्यास | ५०० पासून १००० पण दंड. |
| हत्तीनें वाटेंतील इसमास मारल्यास | माहुतास ५०० पासून १००० पण दंड |
| जनावर चोरल्यास | जनावराच्या किंमती इतका दंड. |
| जादू टोणा वगैरे करणें | २०० पासून ५०० पण दंड |
| आप्त स्त्री वश व्हावी म्हणून जादू करणारास | वधाची शिक्षा |
| ब्राह्मण स्त्रीवर जादूचा प्रयोग केल्यास | ५०० पासून १००० पण दंड किंवा कढईंत टाकून जाळणें |
| अस्पृश्य जातींतील स्त्रीशीं समागम करणारास | कपाळावर खूण करून हद्दपार करणें |
| सृष्टीविरुद्ध संभोग करणारास | ४८ ते ९६ पण दंड |

टीपः—सर्व गुन्ह्यांच्या बाबतींत गुन्हा पहिला असेल तेव्हां वरील यादींतल्याप्रमाणें शिक्षा करावी. दुसऱ्या खेपेस दुप्पट व तिसऱ्या खेपेस तिप्पट दंड करावा. चौथ्या खेपेस गुन्हा होईल तर वाटेल तितका दंड करावा.

मुख्य गुन्हे करणाराला जेवढी शिक्षा सांगितली आहे त्याच्या अर्धी शिक्षा साथीदारास करावी.








# योगवृत्तं-पञ्चममधिकरणम् ।

C. M. V. Sharma Kolhapur

## अध्याय ९१ दाण्डकर्मिकम् ।

दुर्गराष्ट्रयोः कण्टकशोधनमुक्तम् । राजराज्ययोर्वक्ष्यामः । राजानमवगृह्योपजीविनः शत्रुसाधारणा वा ये मुख्यास्तेषु गूढपुरुषप्रणिधिः कृत्यपक्षोपग्रहो वा सिद्धिः । यथोक्तं पुरस्तादुपजापोऽपसर्पो वा यथा च पारग्रामिके वक्ष्यामः । राज्योपघातिनस्तु वल्लभाः संहता वा ये मुख्याः प्रकाशमशक्याः प्रतिषेद्धुं दूष्याः, तेषु धर्मरुचिरुपांशुदण्डं प्रयुञ्जीत । दूष्यमहामात्रभ्रातरं सत्कृतं सत्री प्रोत्साह्य राजानं दर्शयेत् । तं राजा दूष्यद्रव्योपभोगातिसर्गेण दूष्ये विक्रमयेत् । शस्त्रेण रसेन वा विक्रान्तं तत्रैव घातयेत् भ्रातृघातकोऽयम् इति । तेन पारशवः परिचारिकापुत्रश्च व्याख्यातौ ।

दूष्यं महामात्रं वा सत्रिप्रोत्साहितो भ्राता दायं याचेत । तं दूष्यगृहप्रतिद्वारि रात्रावुपशयानमन्यत्र वा वसन्तं तीक्ष्णो हत्वा ब्रूयात्—हतोऽयं दायकामुकः इति । ततो हतपक्षं परिगृह्येतरं निगृह्णीयात् ।

दूष्यसमीपस्था वा सत्रिणो भ्रातरं दायं याचमानं घातेन परिभर्त्सयेयुः । तं रात्राविति समानम् ।

---

## अधिकरण ५ वें, गुप्तदंड आणि अधिकाऱ्यांचे वर्तन

### अ० ९१ गुप्त वधाचा प्रयोग

दुर्ग आणि राष्ट्र यांना त्रास देणाऱ्या अपराध्यांचा म्हणजे सामान्य जनतेला त्रास देणाऱ्या अपराध्यांचा बंदोबस्त कसा करावा हें गेल्या अधिकरणांत सांगितलें. आतां राजा व राज्य यांना घातक होणाऱ्या अपराध्यांची वासलात कशी लावायाची तो प्रकार सांगतो.

उपजीविकेसाठीं राजावर अवलंबून असणारे पण राजापासून अलग ( तुटक ) राहणारे प्रमुख पुरुष आणि दोन्ही देशांकडून वेतन मिळत असल्यामुळें जे शत्रूला अनुकूल असण्याचा संभव आहे असे अधिकारी, यांच्यावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें गुप्त हेरांची योजना करून त्यांची सर्व बातमी काढावी; किंवा ‘ पारग्रामिक ’ प्रकरणांत सांगण्यांत येईल त्याप्रमाणें कलहबीज पेरण्यांत कुशल अशा हेरांची त्यांच्यावर योजना करावी.

राज्याचा नाश करणारे अध्यक्ष व राजसत्ता नामशेष करण्याच्या हेतूनें संगनमत करणारे अमात्यादि प्रधान पुरुष यांना उघड शिक्षा करणें अशक्य असल्यास धर्मनिष्ठ राजानें त्यांना गुप्त देहदंड करावा.

राजद्रोही प्रधानाचा एखादा अगदीं मागें पडलेला बंधु असल्यास त्याला सत्रि हेरानें उत्तेजन देऊन राजाकडे आणावें व राजानें त्याला राजद्रोही प्रधानावर पराक्रम गाजवावयास उद्युक्त करावें. त्यानें शस्त्रानें किंवा विषानें प्रधानाचा निकाल लावल्यावर भ्रातृवधाचा आरोप ठेऊन त्याला त्यांच ठिकाणीं मारून टाकावें.

प्रधानाला पारशव म्हणजे शूद्रस्त्रीपासून झालेला पुत्र असेल किंवा परिचारिका पुत्र म्हणजे इतर लेकवळे असतील तर त्यांच्याशींहि वर सांगितल्याप्रमाणें वर्तन करावें.

अथवा राजद्रोही प्रधानाच्या भावानें सत्रि हेराच्या चिथावणीवरून प्रधानापाशीं संपत्तीचा वांटा मागावा. त्यानें प्रधानाच्या दारीं धरणें धरलें असतां किंवा तो इतरत्र रहात असतांनाहि तीक्ष्ण हेरांनीं त्याचा वध करून पुकारा करावा कीं वाटा मागत होता म्हणून प्रधानानें याला मारलें. नंतर राजानें मेलेल्या माणसाचा पक्ष स्वीकारून राजद्रोही प्रधानाचें पारिपत्य करावें.

किंवा बंधु वांटा मागत असतां सत्रि हेरांनीं त्याला ठार मारण्याची धमकी द्यावी. मग त्याचा रात्रीं खून करणें वगैरे गोष्टी वर सांगितलेल्या क्रमानें पार पाडाव्या.

दूष्यमहामात्रयोर्वा यः पुत्रः पितुः, पिता वा पुत्रस्य दारानधिचरति भ्राता वा भ्रातुस्तयोः कापटिकमुखः कलहः पूर्वेण व्याख्यातः । दूष्यमहामात्रपुत्रमात्मसम्भावितं वा सत्री—'राजपुत्रस्त्वं शत्रुभयादिह न्यस्तोऽसि' इत्युपचरेत् । प्रतिपन्नं राजा रहसि पूजयेत्—प्राप्तयौवराज्यकालं त्वां महामात्रभयान्नाभिषिञ्चामि इति । तं सत्री महामात्रवधे योजयेत् । विक्रान्तं तत्रैव घातयेत्—पितृघातकोऽयम् इति । भिक्षुकी वा दूष्यभार्यां सांवननिकीभिरोषधीभिः संवास्य रसेनातिसन्दध्यात् । इत्याप्यप्रयोगः । दूष्यमहामात्रमटवीं परग्रामं वा हन्तुं, कान्तारव्यवहिते वा देशे राष्ट्रपालमन्तपालं वा स्थापयितुं, नागरस्थानं वा कुपितमवग्रहीतुं, सार्थातिवाह्यं प्रत्यन्ते वा सप्रत्यादेयमादातुं फल्गु बलं तीक्ष्णयुक्तं प्रेषयेत् । रात्रौ दिवा वा युद्धे प्रवृत्ते तीक्ष्णाः प्रतिरोधकव्यञ्जना वा हन्युः । अभियोगे हतः इति ।

यात्राविहारगतो वा दूष्यमहामात्रान् दर्शनायाह्वयेत् । ते गूढशस्त्रैस्तीक्ष्णैः सह प्रविष्टा मध्यमकक्ष्यायामात्मविचयमन्तःप्रवेशनार्थं दद्युः । ततो दौवारिकाभिगृहीतास्तीक्ष्णा 'दूष्यप्रयुक्ताः स्मः' इति ब्रूयुः । ते तदभिविख्याप्य दूष्यान् हन्युः । तीक्ष्णस्थाने चान्ये वध्याः । बहिर्विहारगतो वा दूष्यान् आसन्नावासान् पूजयेत् । तेषां देवीव्यञ्जना वा दुःस्त्री रात्रावावासेषु गृह्येतेति समानं पूर्वेण ।

---

एकाच कुटुंबांतील दोन राजद्रोही प्रधानांमध्यें पिता जर पुत्राच्या स्त्रीशीं किंवा पुत्र जर पित्याचा संबंध असलेल्या स्त्रीशीं किंवा एक भाऊ दुसऱ्या भावाच्या स्त्रीशीं पापसंबंध ठेवीत असेल तर त्यांच्यांत कापटिक हेरांमार्फत कसा कलह उत्पन्न करावा हें वरील उदाहरणावरून ठरवावें.

राजद्रोही प्रधानाला अहंमन्य पुत्र असेल तर त्या पुत्रास सत्रि हेरानें 'वास्तविक तूं राजपुत्र आहेस, शत्रूच्या भीतीनें तुला येथें ठेवण्यांत आलें आहे' असें सुचवावें. या गोष्टीवर त्याचा विश्वास बसल्यावर राजानें त्याचा एकांतांत सन्मान करून सांगावें कीं, तुला यौवराज्याचा अधिकार देण्याचा काळ आला आहे खरा पण प्रधानाच्या भीतीमुळें अभिषेक करितां येत नाहीं. नंतर सत्रि हेरानें त्याला प्रधानाचा वध करण्यास सांगावें. अमात्याचा अंत झाल्यावर अमात्यपुत्राला पितृघातक म्हणून मारून टाकावें.

अथवा हेर भिक्षुकीनें आपल्याला वशीकरणाच्या औषधींची माहिती असल्याचा प्रधानपत्नीला परिचय करून द्यावा व तिच्याकडून प्रधानाला वशीकरणाच्या औषधाच्या मिषानें विष घालवावें. याला 'आप्यप्रयोग' म्हणतात ( २ ) अथवा राजानें अपुरें सैन्य देऊन व शिवाय त्याच्यावर तीक्ष्ण हेरांची योजना करून राजद्रोही प्रधानाला शत्रूंची गांवें मारण्यासाठीं, रानांवनांनीं गजबजलेल्या देशांत राष्ट्रपालाचा अथवा सीमापालाचा अधिकार प्रस्थापित करण्यासाठीं, बंडखोर शहरांत अंमल बजाविण्यासाठीं, दोन राष्ट्रांच्या सरहद्दीवरील व्यापाऱ्यांच्या समुदायांना दळणवळणाला उपयोगी पडणारें स्थळ शत्रूकडून परत घेण्यासाठीं पाठवावें आणि रात्रीं किंवा दिवसा तीक्ष्ण हेरांनीं लटकेंच बंड उठवून त्याला मारावें व लढाईंत मेला असें उठवावें.

राज्य कार्यासाठीं फिरतीवर असतांना राजानें राजद्रोही प्रधानांस भेटावयास बोलवावें. गुप्तरीतीनें शस्त्रें बाळगणाऱ्या तीक्ष्ण हेरांनीं त्याजबरोबर त्याचे चाकर म्हणून यावें व राजाकडे जातांना मधल्या दिवाणखान्यांत रखवालदारांना आपली झडती द्यावी. द्वारपाळांनीं धरल्यावर 'राजाला मारण्यावर' प्रधानानें आमची योजना केली होती असा जबाब द्यावा. या जबान्या जाहिर करून अनिष्ट प्रधानांचा वध करावा. तीक्ष्ण हेरांच्या ऐवजीं दुसरे देहांतशासनाचे अपराधी मारून टाकावे.

अथवा राजानें क्रीडा करण्याचे मिषानें नगराबाहेर मुक्काम करावा व आपल्या निवासा शेजारीं अनिष्टप्रधानांस मोठ्या गौरवानें राहावयास जागा द्यावी. रात्रीं राजमहिषीचा वेष धारण केलेल्या एखाद्या दुराचारी स्त्रीला त्याच्या जागेंत पकडण्यांत यावें, बाकी व्यवस्था वरील कलमाप्रमाणें लावावी.

दूष्यमहामात्रं वा 'सूदो भक्षकारो वा ते शोभनः' इति स्तवेन भक्षभोज्यं याचेत, बहिर्वा क्वचिदध्वगतः पानीयम्। तदुभयं रसेन योजयित्वा प्रतिस्वादने तावेवोपयोजयेत्। तदभिविख्याप्य 'रसदावि'ति घातयेत्। अभिचारशीलं वा सिद्धव्यञ्जनो गोधाकूर्मकर्कटककूटानां लक्षण्यानामन्यतमप्राशनेन मनोरथानवाप्स्यसीति ग्राहयेत्। प्रतिपन्नं कर्मणि रसेन लोहमुसलैर्वा घातयेत् कर्मव्यापदा हत इति। चिकित्सकव्यञ्जनो वा दौरात्मिकमसाध्यं वा व्याधिं दूष्यस्य स्थापयित्वा भैषज्याहारयोगेषु रसेनातिसन्दध्यात्। सूदारालिकव्यञ्जना वा प्रणिहिता दूष्यं रसेनातिसन्दध्युः। इत्युपनिषत्प्रतिषेधः।

उभयदूष्यप्रतिषेधस्तु। यत्र दूष्यः प्रतिषेद्धव्यस्तत्र दूष्यमेव फल्गुबलतीक्ष्णयुक्तं प्रेषयेत्। गच्छामुष्मिन् दुर्गे राष्ट्रे वा सैन्यमुत्थापय हिरण्यं वा, वल्लभाद् वा हिरण्यमाहारय, वल्लभकन्यां वा प्रसह्यानय। दुर्गसेतुवणिक्पथशून्यनिवेशखनिद्रव्यहस्तिवनकर्मणामन्यतमं वा कारय, राष्ट्रपाल्यमन्तपाल्यं वा। यश्च त्वा प्रतिषेधयेन्न वा ते साहाय्यं दद्यात् स बन्धव्यः स्यात् इति। तथैव इतरेषां प्रेषयेत् 'अमुष्याविनयः प्रतिषेद्धव्यः' इति। तमेतेषु कलहस्थानेषु कर्मप्रतिघातेषु वा विवदमानं तीक्ष्णाः शस्त्रं पातयित्वा प्रच्छन्नं हन्युः। तेन दोषेणेतरे नियन्तव्याः। पुराणां ग्रामाणां कुलानां वा दूष्याणां सीमाक्षेत्रखलवेश्ममर्यादासु द्रव्योपकरणसस्यवाहनहिंसासु प्रेक्षाकृत्योत्सवेषु वा

---

किंवा अनिष्ट प्रधानाच्या आचाऱ्याची प्रशंसा करून राजानें त्याजकडे फराळाचे निमंत्रण लावावें किंवा शिकारीवर असल्यास एखादें पेय मागावें. मग खाद्य पेयांत गुप्तरीतीनें विष मिसळून तें त्यांनाच चाखायला लावावें ( विष चाखूनहि जगलेच तर ) मग विषप्रयोग करण्याच्या अपवादावरून प्रधान व त्याचा सेवक यांना मारून टाकावें.

प्रधान मंत्रतंत्राच्या नादीं लागणारा असेल तर मांत्रिक वेषधारी गुप्त हेरानें मगर, कासव, खेकडा, शिंग मोडलेला हरिण यांचा स्मशानाग्नींत होम करून त्यांची रक्षा प्राशन केली असतां सर्व मनोरथ पूर्ण होतील अशी समजूत करून द्यावी. होम चालू असतां विषानें किंवा लोखंडी मुसळानें त्याचा घात करावा आणि मंत्रतंत्रांत दोष घडल्यानें भुतांनीं त्याला मारलें असें प्रसिद्ध करावें.

वैद्य झालेल्या हेरानें प्रधानास असाध्य आणि दुर्वृत्तापासून उद्भवणारा रोग जडला आहे असें भासवून त्यांस औषधांत आणि पथ्यांत विष मिसळून मारून टाकावें.

मांसान्न व पक्वान्न विकणाऱ्या हेरांनींहि अनिष्ट लोकांवर संधि साधून विषप्रयोग करावेत.

येथपर्यंत गुप्त रीतीनें अनिष्ट अधिकाऱ्यांची विल्हेवाट लावण्याच्या उपायाचें विवरण झालें. आतां अनिष्ट अधिकाऱ्यांचा अनिष्ट अधिकाऱ्याकडूनच कसा प्रतिकार करवावा हें सांगतोंः—

एका अनिष्ट अधिकाऱ्याचा बंदोबस्त करावयाचा असेल तेव्हां त्यावर दुसऱ्या अनिष्ट अधिकाऱ्याचींच थोडेसें सैन्य बरोबर देऊन व त्याच्यावर तीक्ष्ण हेरांची योजना करून पाठवणी करावी व त्यास आज्ञा करावी कीं अमुक किल्ल्यावर किंवा प्रांतावर जाऊन सैन्य जमा कर अथवा द्रव्य मिळव, स्थानिक अधिकाऱ्याकडून द्रव्य उघळ किंवा प्रांताधिकाऱ्याची कन्या पळवून आण, किल्ला बांध, पूल तयार कर, व्यापारी सडका उघड, ओसाड प्रदेशांत वस्ती करीव, खाणी खोद, पाळीव हत्तींचें जंगल तयार कर, उपयुक्त वनद्रव्यांचे जंगल राख, प्रांताचें आणि सरहद्दींचें दंग्या धोप्यापासून संरक्षण कर, आणि या कामांत तुला जो कोणी अडथळा करील किंवा मदत करणार नाहीं त्याला कैद करण्यांत येईल. त्याचप्रमाणें 'याचा पुंडावा मोडून टाका' असा मंत्र देऊन दुसऱ्या लोकांना त्याच प्रांतांत पाठवावें. मग तो अधिकारी आपली कार्यें पार पाडण्याला निघाला असतांना उत्पन्न होणाऱ्या भांडणांत किंवा त्या अधिकाऱ्याचा अधिकारच नाकारल्यामुळें होणाऱ्या भांडणांत तीक्ष्ण हेरांनीं शस्त्रें चालवून त्याचा वध करावा व तो अपवाद लावून इतरांना बंधनांत टाकावें.

राजद्रोही शहरांत, गांवांत अथवा कुटुंबांत जेव्हां सीमा, शेत, पीक अथवा घराची हद्द व मालकी यांवरून

समुत्पन्ने कलहे तीक्ष्णैरुत्पादिते वा तीक्ष्णाः शस्त्रं पातयित्वा ब्रूयुः—एवं क्रियन्ते येऽमुना कलहायन्ते इति । तेन दोषेणेतरे नियन्तव्याः ।

येषां वा दूष्याणां जातमूलाः कलहाः तेषां क्षेत्रखलवेश्मान्यादीपयित्वा बन्धुसम्बन्धिषु वाहनेषु वा तीक्ष्णाः शस्त्रं पातयित्वा तथैव ब्रूयुः—अमुना प्रयुक्ताः स्मः इति । तेन दोषेणेतरे नियन्तव्याः ॥

दुर्गराष्ट्रदूष्यान् वा सत्रिणः परस्परस्यावेशनिकान् कारयेयुः । तत्र रसदा रसं दद्युः, तेन दोषेणेतरे नियन्तव्याः । भिक्षुकी वा दूष्यराष्ट्रमुख्यं दूष्यराष्ट्रमुख्यस्य भार्या स्नुषा दुहिता वा कामयत इत्युपजपेत् । प्रतिपन्नस्याभरणमादाय स्वामिने दर्शयेत्—असौ ते मुख्यो यौवनोत्सिक्तो भार्यां स्नुषां दुहितरं वाभिमन्यते इति । तयोः कलहो रात्रौ । इति समानम् । दूष्यदण्डोपनतेषु तु युवराजः सेनापतिर्वा किञ्चिदपकृत्यापक्रान्तो विक्रमेत । ततो राजा दूष्यदण्डोपनतानेव प्रेषयेत् फल्गुबल-तीक्ष्णयुक्तानिति समानाः सर्व एव योगाः । तेषां च पुत्रेष्वनुक्षिपत्सु यो निर्विकारः स पितृदायं लभेत । एवमस्य पुत्रपौत्राननुवर्तते राज्यमपास्तपुरुषदोषमिति ।——

स्वपक्षे परपक्षे वा तूष्णीन्दण्डं प्रयोजयेत् । आयत्यां च तदात्वे च क्षमावानविशङ्कितः ।

इति कौटलीयार्थशास्त्रे योगवृत्ते पञ्चमाधिकरणे प्रथमोऽध्यायः दाण्डकार्मिकम्, आदित एकनवतितमः ।

---

कलह उत्पन्न होईल, किंवा एकानें दुसऱ्याच्या वस्तूंस, उपजीविकेच्या साधनांस, पिकांस किंवा वाहनास इजा केल्यावरून कलह होईल किंवा करमणुकीच्या अथवा उत्सवाच्या प्रसंगीं कलह होईल किंवा स्वतः तीक्ष्णांच्या चिथावणीवरून कलह होईल तेव्हां तीक्ष्ण हेरांनीं शस्त्रें चालवून अनिष्ट लोकांपैकीं कांहींचा खून करावा व 'प्रस्तुत वादांत कलह करणाऱ्यांनीं हा अघोर प्रकार केला' असें जाहीर करावें. त्या अपवादावरून इतरांना बंदींत टाकावें.

ज्या राजद्रोही माणसांचें वंशपरंपरेनें वैमनस्य चालत आलें आहे त्यांच्यापैकीं कोणाच्या तरी शेतास, खळ्यास किंवा घरास आग लावून व त्यांच्या आप्तांवर अथवा वाहनपशूंवर शस्त्रांचा आघात करून तीक्ष्णांनीं सांगावें कीं अमक्याच्या सांगण्यावरून मी असें केलें. त्या जबानीवरून दुसऱ्यांना शिक्षा ठोठावाव्या.

किल्ल्यांत किंवा प्रांतांत राहणारे, परस्परांशीं शत्रुत्वानें वागणारे, असे जे राजद्रोही असतील त्यांना संधिमिषानें एकत्र आणून सत्रिहेरांनीं त्यांना एकमेकांचा पाहुणचार स्वीकारण्यास लावावें व तेथें विषप्रयोग करणाऱ्यांनीं त्यांपैकीं कुणाला तरी विष द्यावें व त्या दोषावरून दुसऱ्याला अटकेंत टाकावें.

भिक्षुकी वेषधारी हेर स्त्रीनें प्रांतांतील राजद्रोही पुढाऱ्यांपैकीं एखाद्या प्रमुखाकडे जाऊन त्यांस सांगावें कीं, प्रमुख पुरुषाच्या पत्नीचें, सुनेचें अथवा मुलीचें मन तुझ्यावर गेलें आहे. यांवर भरंवसा ठेऊन पहिल्या प्रमुखानें दिलेले अलंकार घेऊन तिनें ते त्या स्त्रीच्या पालनकर्त्याला दाखवावेत आणि सांगावें कीं, अमुक प्रमुख तारुण्यामुळें मदोन्मत्त होऊन तुझ्या पत्नीचा, सुनेचा अथवा कन्येचा अभिलाष करीत आहे. रात्रीं या उभयतांचा कलह झाला असतां काय करावयाचें तें वरील कलमावरून समजेल.

कडक शिक्षा करून नमविलेल्या राजद्रोही प्रांताचा युवराज किंवा सेनापति यांनीं कुरापत काढावी व तिला प्रत्युत्तर देण्याचा तत्रस्थ लोकांनीं प्रयत्न केला तर त्यांच्यावर अनिर्बंधपणें पराक्रम गाजवावा. मग त्यांच्यासारखेच इतर दबलेले राजद्रोही असतील त्यांना तीक्ष्ण हेर व अल्पमात्र सैन्य बरोबर देऊन त्या प्रांतांत शांतता स्थापण्यासाठीं पाठवावें पुढील व्यवस्था पूर्वीं सांगितल्याप्रमाणें करावी.

अशा रीतीनें नाहींसे केलेल्यांच्या पुत्रांनीं बंड केलें असतां त्यांच्यामध्यें जर कोणी निर्विकार राहील तर त्याला मात्र त्याच्या पित्याची संपत्ति द्यावी.

अशा रीतीनें बेदिलीचा बीमोड केला म्हणजेच तें राज्य राजाच्या पुत्रपौत्रादिकास अनुक्रमानें मिळत जातें.

याप्रमाणें राजानें वर्तमान व भविष्य काळाच्या सुरक्षिततेसाठीं क्षमाशील मनानें स्वपरपक्षांतील लोकांना निःशंकपणें गुप्त शासन करावें.

# अध्याय ९२ कोशाभिसंहरणम् ।



कोशमकोशः प्रत्युत्पन्नार्थकृच्छ्रः सङ्गृह्णीयात् । जनपदं महान्तमल्पप्रमाणं वा देवमातृकं प्रभूतधान्यं धान्यस्यांशं तृतीयं चतुर्थं वा याचेत, यथासारं मध्यमवरं वा । दुर्गसेतुकर्मवणिक्पथशून्यानिवेशखनिद्रव्यहस्तिवनकर्मोपकारिणं प्रत्यन्तमल्पप्रमाणं वा न याचेत । धान्यपशुहिरण्यादि निविशमानाय दद्यात् । चतुर्थमंशं धान्यानां बीजभक्तशुद्धं च हिरण्येन क्रीणीयात् ।

अरण्यजातं श्रोत्रियस्वं च परिहरेत् । तदप्यनुग्रहणे क्रीणीयात् । तस्याकरणे वा समाहर्तृपुरुषा ग्रीष्मे कर्षकाणामुद्वापं कारयेयुः । प्रमादावस्कन्नस्यात्ययं द्विगुणमुदाहरन्तो बीजकाले बीजलेख्यं कुर्युः । निष्पन्ने हरितपक्वादानं वारयेयुः अन्यत्र शाककटभङ्गमुष्टिभ्यां देवपितृपूजादानार्थं गवार्थं वा । भिक्षुकग्रामभृतकार्थं च राशिमूलं परिहरेयुः । स्वसस्यापहारिणः प्रतिपातोऽष्टगुणः । परसस्यापहारिणः पञ्चाशद्गुणः, सीतात्ययः स्ववर्गस्य, बाह्यस्य, तु वधः । चतुर्थमंशं धान्यानां षष्ठं वन्यानां तूललाक्षाक्षौमवल्ककार्पासरौमकौशेयकौषधगन्धपुष्पफलशाकपण्यानां काष्ठवेणुमांसवल्लूराणां च गृह्णीयुः । दन्ताजिनस्यार्धम् । अनिसृष्टं विक्रीणानस्य पूर्वः साहसदण्डः ।

इति कर्षकेषु प्रणयः । सुवर्णरजतवज्रमणिमुक्ताप्रवालाश्वहस्तिपण्याः पञ्चाशत्कराः । सूत्र-

---

## कोशसंग्रह.

अल्पकोश असलेल्या राजानें अनपेक्षित खर्चाचे प्रसंग उपस्थित झाले असतां त्यांचा फायदा घेऊन कोशसंग्रह करावा.

राज्यांतील लहानमोठा कोणताहि प्रांत जर केवळ आकाशांतील पावसावर अवलंबून नसेल व धान्यसमृद्ध असेल तर त्या प्रांतापासून धान्याचा तिसरा अथवा चौथा हिस्सा मागून घ्यावा.

मध्यम व कनिष्ठ प्रांतांतील मागणीचें प्रमाण पिकांवरून ठरवावें. किल्ले, सेतू, व्यापारी रस्ते यांचें संरक्षण करणारे, नवीन वसाहत करणारे, खाणींतून अगर जंगलांतून काम करणारे, सरहद्दीवर राहणारे व दरिद्री लोक अशांच्या जवळ या जादा मागण्या करूं नयेत. नवीन वसाहत करणाऱ्यांना धान्य, पशु व द्रव्य यांची मदत करावी. लागवडीसाठीं व उदरंभरणासाठीं लागेल तितकें धान्य वजा करून बाकीच्या धान्याचा चवथा हिस्सा त्यांजकडून द्रव्य देऊन खरेदी करावा. अरण्यांत उत्पन्न झालेलें धान्य व श्रोत्रियब्राम्हणाचें धान्य मागून घेऊं नये. वाटल्यास वरच्याप्रमाणें विकत घ्यावें. असें करणें जमलें नाहीं तर वसुलीखात्यांतील नोकरांनीं शेतकऱ्यांना ग्रीष्म ऋतूंत पिकें काढावयास लावावीं. चुकीमुळें पीक बुडाल्यास दुप्पट दंड होईल असें जाहीर करून त्याचवेळीं बीं किती पेरलें हें लेखनिविष्ट करून ठेवावें. पीक उगवल्यावर हिरवें पीक मोडण्याची मनाई असावी, मात्र मूठभर हिरवापाला अगर धान्य कोणी घेतल्यास त्याला हरकत करूं नये देवांच्या किंवा पितरांच्या पूजेसाठीं, आणि गाईसाठींहि अशी हरकत नसावी. रास होऊन गेल्यावर मातींत मिसळलेलें धान्य भिकाऱ्यासाठीं व गांवच्या बलुतेदारासाठीं राखून ठेवावें.

आपणच पिकविलेल्या धान्याचा जो अपहार करील त्याला धान्याच्या आठपट दंड करावा. दुसऱ्यानें पिकविलेलें धान्य पळविणाऱ्याला तो त्याच गांवचा असेल तर ५० पट दंड व परगांवचा असेल तर देहांतशिक्षा.

धान्याचा चवथा हिस्सा, रानांतील जिनसांचा, त्याचप्रमाणें कापूस, लाख, ताग, वल्कल, अंबाडी, लोकर रेशीम, चंदन, फुलें, भाजीपाला वगैरे पदार्थांचा आणि लांकडें, वेळू, मांस व सुके मासे यांचा सहावा हिस्सा घ्यावा. जनावरांचे दांत व कातडीं यांचा अर्धा हिस्सा घ्यावा. जो बिगर परवानगीनें या वस्तू विकील त्यांना पूर्व साहसदंड करावा.

अशा रीतीनें शेतकऱ्याबरोबर ‘ व्यवहार ’ करावा.

सोनें, रुपें, हिरे, मोत्यें, पोंवळीं, हत्ती व घोडे यांचा व्यापार करणाऱ्यांपासून उत्पन्नाचा पन्नासावा भाग परवान्या-

वस्त्रताम्रवृत्तकंसगन्धभैषज्यशीधुपण्याश्चत्वारिंशत्कराः । धान्यरसलोहपण्याः शकटव्यवहारिणश्च त्रिंशत्कराः । काचव्यवहारिणो महाकारवश्च विंशतिकराः । क्षुद्रकारवो बन्धकीपोषकाश्च दशकराः । काष्ठवेणुपाषाणमृद्भाण्डपक्वान्नहरितपण्याः पञ्चकराः । कुशीलवा रूपाजीवाश्च वेतनार्धं दद्युः । हिरण्यकरमकर्मण्यानाहारयेयुः । न चैषां कञ्चिदपराधं परिहरेयुः । ते ह्यपरगृहीतमभिनीय विक्रीणीरन् ।

इति व्यवहारिषु प्रणयः । कुक्कुटसूकरमर्धं दद्यात् । क्षुद्रपशवः षड्भागम् । गोमहिषाश्वतरखरोष्ट्राश्च दशभागम् । बन्धकीपोषका राजप्रेष्याभिः परमरूपयौवनाभिः कोशं संहरेयुः ।

इति योनिपोषकेषु प्रणयः । सकृदेव न द्विः प्रयोज्यः । तस्याकरणे वा समाहर्ता कार्यमपदिश्य पौरजानपदान् भिक्षेत । योगपुरुषाश्चात्र पूर्वमतिमात्रं दद्युः । एतेन प्रदेशेन राजा पौरजानपदान् भिक्षेत । कापटिकाश्चैनानल्पं प्रयच्छतः कुत्सयेयुः । सारतो वा हिरण्यमाढ्यान् याचेत । यथोपकारं वा स्ववशा वा यदुपहरेयुः । स्थानच्छत्रवेष्टनविभूषाश्चैषां हिरण्येन प्रयच्छेत् । पाषण्डसङ्घद्रव्यमश्रोत्रियभोग्यं देवद्रव्यं वा कृत्यकराः प्रेतस्य दग्धगृहस्य वा हस्ते न्यस्तमित्युपहरेयुः ।

देवताध्यक्षो दुर्गराष्ट्रदेवतानां यथास्वमेकस्थं कोशं कुर्यात् । तथैव चाहरेत् । दैवतचैत्यं सिद्धपुण्यस्थानमौपपादिकं वा रात्रावुत्थाप्य यात्रासमाजाभ्यामाजीवेत् । चैत्योपवनवृक्षेण वा देवताभिग-

---

दाखल कर घ्यावा. सूत, कापड, तांबें, ( पितळ ), कांसे, सुगंधी व औषधीं द्रव्यें आणि दारू याचा व्यापार करणाऱ्यापासून ४० वा "भाग" घ्यावा. धान्य प्रवाही पदार्थ व लोखंड यांचा व्यापार व गाड्यांचा धंदा करणारे यांपासून तिसावा 'भाग' घ्यावा. कांचेचा धंदा करणारे व बडे कारागिर यांपासून २० वा 'भाग' घ्यावा. क्षुद्र कारागीर व सुताराकडून कारखाना चालविणारे ( वर्धकीपोषकाः ) यांजकडून १० वा 'भाग' घ्यावा. लांकूड, वेळू, दगड मातीची भांडीं, पक्वान्न व हारित यांचा व्यापार, करणाऱ्यापासून ५ वा 'भाग' घ्यावा. नट व वेश्या यांजपासून त्यांच्या उत्पन्नाचा अर्धा भाग वसूल करावा. कांहींच धंदा न करणाऱ्यांना एक हिरण्य 'कर' द्यायाला लावावें. जर ते स्वतःचा माल दुसऱ्याचा असें भासवून विक्री करतील ( व कर चुकवितील ) तर यांच्यावर मुळींच दया करूं नये. अशा रीतीनें व्यापारी वर्गाशीं 'व्यवहार' करावा.

कोंबडी व डुकरें ज्यांपाशीं असतील त्यांनीं त्यांचा अर्धा हिस्सा द्यावा. क्षुद्रपशू बाळगणाऱ्यांनीं सहावा व गाई, म्हशी, खेचरें, गाढवें व उंट बाळगणाऱ्यांनीं त्यांचा दहावा हिस्सा द्यावा. वेश्यागृहें चालविणाऱ्यांनीं राजाच्या नोकरींतील अत्यंत सुंदर व तरुण वेश्यांच्या मदतीनें ( राजासाठीं ) अपार द्रव्य मिळवावें. अशा रीतीनें कळप पाळणाऱ्याशीं 'व्यवहार' करावा.

वर सांगितलेली जादा मागणी ही एकदांच करायची असते, हिचा द्विवार प्रयोग करावयाचा नाहीं. अशी मागणी करतां येत नसेल तेव्हां वसुली खात्यावरील मुख्य अधिकाऱ्यानें एखाद्या ( लोकोपयोगी ) कार्याची सबब सांगून पौरजानपदापाशीं वर्गणी मागावी. सरकारच्या बगलबच्चांनीं सर्वांच्या आधीं खूप मोठ्या रकमा द्याव्या. त्यांचें उदाहरण दाखवून स्वतः राजानें पौर जानपदांपाशीं फिरून याचना करावी. कमी पैसे देणाऱ्यांची कापटिक म्हणजे विद्यार्थी हेरांनीं कुत्सा करावी. अथवा संपत्तीच्या प्रमाणानें श्रीमंत लोकांपाशीं द्रव्य मागावें. त्या कार्याचा स्वतःला उपयोग होणार असल्यामुळें अथवा केवळ स्वयंस्फूर्तीनें जे लोक द्रव्य देतील त्यास त्या द्रव्याच्या मोबदला मनसब, छत्री, पागोटें, अलंकार इत्यादि अर्पण करावेत.

पाखंडी लोकांच्या संघाचें द्रव्य व श्रोत्रियाखेरीज इतरांच्या उपयोगाकडे जाणारें देवद्रव्य याचा अधिकाऱ्यांनीं हें द्रव्य अमुक मनुष्याच्या स्वाधीन केलें होतें पण तो मरून गेला अथवा अमक्या घरीं ठेवलें होतें व तें घर जळून गेलें असें सांगून राजाकरितां अपहार करावा.

देवताध्यक्षानें किल्ल्यांतील व प्रांतांतील देवालयांचें द्रव्य सोईसोईनें एकत्र जमवावें व वर सांगितल्याप्रमाणें ( राजाकरितां ) त्याचा अपहार करावा. अथवा रात्रीच्या वेळीं एखाद्या देवतेची वेदी, एखाद्या सिद्धाचा पवित्र आश्रम,

मनमनार्तवपुष्पफलयुक्तेन ख्यापयेत् । मनुष्यकरं वा वृक्षे रक्षोभयं प्ररूपयित्वा सिद्धव्यञ्जनाः पौरजानपदानां हिरण्येन प्रतिकुर्युः । सुरुङ्गायुक्ते वा कूपे नागमनियतशिरस्कं हिरण्योपहारेण दर्शयेत् । नागप्रतिमायामन्तश्छिद्रायाम् । चैत्यच्छिद्रे वल्मीकच्छिद्रे वा सर्पदर्शन आहारेण प्रतिबद्धसंज्ञं कृत्वा श्रद्दधानानादर्शयेत् । अश्रद्दधानानामाचमनप्रोक्षणेषु रसमवपाय्य देवताभिशापं ब्रूयात् । अभित्यक्तं वा दंशयित्वा । योगदर्शनप्रतीकारेण वा कोशाभिसंहरणं कुर्यात् ।

वैदेहकव्यञ्जनो वा प्रभूतपण्यान्तेवासी व्यवहरेत । स यदा पण्यमूल्ये निक्षेपप्रयोगैरुपचितः स्यात् तदैनं रात्रौ मोषयेत् । एतेन रूपदर्शकः सुवर्णकारश्च व्याख्यातौ । वैदेहकव्यञ्जनो वा प्रख्यातव्यवहारः प्रवहणनिमित्तं याचितकमवक्रीतकं वा रूप्यसुवर्णभाण्डमनेकं गृह्णीयात् । समाजे वा सर्वपण्यसन्दोहेन प्रभूतं हिरण्यसुवर्णमृणं गृह्णीयात्, प्रतिभाण्डमूल्यं च । तदुभयं रात्रौ मोषयेत् ।

साध्वीव्यञ्जनाभिः स्त्रीभिर्दूष्यानुन्मादयित्वा तासामेव वेश्मस्वभिगृह्य सर्वस्वान्याहरेयुः ।

दूष्यकुल्यानां वा विवादे प्रत्युत्पन्ने रसदाः प्रणिहिता रसं दद्युः । तेन दोषेणेतरे पर्यादातव्याः ।

---

किंवा भूमींतून निघालेलें स्वयंभू लिंग निर्माण करून तत्प्रीत्यर्थ यात्रा किंवा उत्सव करण्याच्या निमित्तानें द्रव्य गोळा करावें. अथवा एखाद्या पुण्यस्थाना भोंवतालच्या बागेंतील वृक्षाला मोसम नसूनाहि त्या वृक्षाच्या ठायीं देवतेचें आगमन झाल्यामुळें फुलें, फळें आलीं आहेत असें उठवावें, किंवा सिद्ध हेरांनीं एखाद्या वृक्षावर राक्षस बसला आहे व तो रोजचा एक मनुष्य खायला मागतो असें पौरजानपदांना भय दाखवावें व मग त्यांची पीडा दूर करण्याच्या निमित्तानें त्यांच्याकडून द्रव्य उकळावें. अथवा एखाद्या विहीरींत आंतून चोरवाट करून अनंत फड्यांचा नाग बसवावा आणि सुवर्ण दक्षिणा घेऊन लोकांना त्याचें दर्शन करवावें. छिद्रयुक्त अशा नागाच्या मूर्तींत, पवित्र वृक्षांचे ठिकाणीं अथवा वारूळाच्या भोकांतून अमली पदार्थ खाऊन निश्चेष्ट झालेला नाग ठेवून तो श्रद्धाळू लोकांना दाखवावा. श्रद्धाहीन लोकांच्या अंगावर विषारी तीर्थ शिंपडावें व तेच त्यांना प्यायला द्यावें व त्यांच्यावर देवतेचा क्रोध झाला असें जाहीर करावें. एखाद्या दुष्ट मनुष्याला साप चाववून हाच पुकारा करावा. किंवा अद्भुत दर्शनांचा प्रतिकार करण्याच्या मिषानें द्रव्य उकळावें.

अथवा वैदेहक म्हणजे व्यापारी बनलेल्या हेरानें पुष्कळ माल व नोकर ठेवून कारभार चालवावा. मालविक्रीचें अगर ठेवीचें अगर इतर व्यवहाराचें पुष्कळसें द्रव्य सांठल्यावर त्यानें तें रात्रीं चोरवावें.

नाणीं तपासून देणाऱ्या अधिकाऱ्यानें व सोनारानें याचप्रमाणें वागावें.

अथवा व्यापारांत प्रसिद्धीस आलेला असा जो व्यापारी हेर ( वैदेहक ) असेल त्यानें तुष्टिभोजनाच्या निमित्तानें अनेक प्रकारचीं सोन्यारुप्याचीं भांडीं व इतर जिनसा मागून किंवा भाड्यानें आणाव्या, अथवा यात्रेच्या प्रसंगीं आपला सर्व माल दाखवून त्याच्या तारणावर पुष्कळ कर्ज काढावें; शिवाय आपला माल विकत घेऊं इच्छिणाऱ्यांकडून विसार म्हणून किंमतीची ( मिळेल तितकी ) रक्कम घ्यावी ( माल दुसरें दिवशीं पूर्ण किंमत मिळाल्यावर स्वाधीन करण्याच्या अटीवर ) आणि हें सर्व द्रव्य रात्रीं चोरवावें.

साध्वी स्त्रियांचें सोंग घेतलेल्या स्त्रीहेरांनीं राजद्रोही माणसास आपल्या नादीं लावून घरीं आणवावें व ते घरीं आले म्हणजे पकडून ( साध्वी स्त्रिया भ्रष्टविण्याचा प्रयत्न करण्याच्या अपवादांतून ) आपली सुटका करून घेण्याकरितां त्यांना सर्वस्व ओकायला लावावें.

राजद्रोही कुटुंबांत कलह उत्पन्न झाला असतां हेरांनीं एकास विषप्रयोग करून व तो अपवाद इतरांवर घालून त्याचें प्रायश्चित्त म्हणून इतरांचें सर्वस्व हरण करावें.

दूष्यमभित्यक्तो वा श्रद्धेयापदेशं पण्यं हिरण्यनिक्षेपमृणप्रयोगं दायं वा याचेत । दासशब्देन वा दूष्यमालम्बेत । भार्यामस्य स्नुषां दुहितरं वा दासीशब्देन भार्याशब्देन वा । तं दूष्यगृहप्रतिद्वारि रात्रावुपशयानमन्यत्र वा वसन्तं तीक्ष्णो हत्वा ब्रूयात्–हतोऽयमित्थं कामुक इति । दोषेणेतरे पर्यादातव्याः ।

सिद्धव्यञ्जनो वा दूष्यं जम्भकविद्याभिः प्रलोभयित्वा ब्रूयात्—अक्षयं हिरण्यं राजद्वारिकं स्त्रीहृदयमारिव्याधिकरमायुष्यं पुत्रीयं वा कर्म जानामि इति । प्रतिपन्नं चैत्यस्थाने रात्रौ प्रभूतसुरामांसगन्धमुपहारं कारयेत्, एकरूपं चात्र हिरण्यं पूर्वनिखातम् । प्रेताङ्गं प्रेतशिशुर्वा यत्र निहितः स्यात् ततो हिरण्यमस्य दर्शयेदत्यल्पमिति च ब्रूयात् । 'प्रभूतहिरण्यहेतोः पुनरुपहारः कर्तव्य इति, स्वयमेवैतेन हिरण्येन श्वोभूते प्रभूतमौपहारिकं क्रीणीही'ति । तेन हिरण्येनौपहारिकक्रये गृह्येत । मातृव्यञ्जनया वा 'पुत्रो मे त्वया हत' इत्यवरूपितः स्यात् । संसिद्धमेवास्य रात्रियागे वनयागे वनक्रीडायां वा प्रवृत्तायां तीक्ष्णा विशस्याभित्यक्तमतिनयेयुः । दूष्यस्य वा भृतकव्यञ्जनो वेतनहिरण्ये कूटरूपं प्रक्षिप्य प्ररूपयेत् ।

कर्मकारव्यञ्जनो वा गृहे कर्म कुर्वाणः स्तेनकूटरूपकारकोपकरणमपनिदध्यात् । चिकित्सकव्यञ्जनो वा गरमगरापदेशेन । प्रत्यासन्नो वा दूष्यस्य सत्री प्रणिहितमभिषेकभाण्डममित्रशासनं च कापटिकमुखेन आचक्षीत कारणं च ब्रूयात् ।

---

अथवा वध्य पुरुषानें राजद्रोही पुरुषांकडे जाऊन एखाद्या संभाव्य व विश्वास पटेल अशा सबबीवर त्यांजकडे ठेविलेली ठेव, कर्जाऊ दिलेली रक्कम, अथवा वडिलोपार्जित मालमत्तेचा वांटा मागावा किंवा त्याला दास या शब्दानें संबोधावें, किंवा त्याची पत्नी स्नुषा अथवा कन्या आपली दासी किंवा भार्या आहे असें घोषवावें. इतका प्रकार करून रात्रीं त्या राजद्रोही प्रधानाच्या दाराशीं अथवा इतरत्र तो निजला असतां तीक्ष्ण हेरांनीं त्याला मारून टाकावें आणि या प्रमाणें 'या कामलंपटाचा खून झाला' असें प्रसिद्ध करावें. हा अपराध दुसऱ्यांच्या माथीं लादून त्यांचें सर्वस्व हरण करावें.

अथवा सिद्ध हेरानें राजद्रोही माणसास जादूविद्येसंबंधीं अनेक थापा मारून मोहित करावें आणि मला अक्षय द्रव्यनिधि मिळवून देण्याची विद्या माहीत आहे, राजद्वारीं प्रवेश, स्त्रियांचें वशीकरण, शत्रूंना असाध्य रोग लावणें, दीर्घायुष्य अथवा पुत्रप्राप्ति इत्यादि विद्या मला अवगत आहेत वगैरे सांगावें. मग रात्रीं स्मशानादि एकांतस्थानीं एखाद्या पवित्र वृक्षापाशीं त्याला पुष्कळशी दारू, मांस व सुगंध अर्पण करायला लावावें. त्या वृक्षापाशीं आधींच विशिष्ट खुणेचीं नाणीं पुरून ठेवावीं व मोठ्या माणसाच्या प्रेताचा एखादा अवयव किंवा अर्भकाचें प्रेत ज्या ठिकाणीं दिसेल तिथें तुला द्रव्य सांपडेल असें सांगावें. द्रव्य फारच थोडें म्हणून कुरकुरल्यावर सांगावें कीं हेंच द्रव्य खर्चून फिरून एकवार देवतेला मद्यमांसादिकांचा नैवेद्य देशील तेव्हां तुझी इच्छा तृप्त होईल तर तूं स्वतः हें द्रव्य घेऊन याचा उद्या विपुल नैवेद्य विकत घेऊन ये. याप्रमाणें तो तें द्रव्य घेऊन खरेदी करायला गेला असतां त्याला पकडण्यांत यावें. अथवा हेरपत्नीनें वरील मेलेल्या मुलाच्या मातेचें मिष करून या माणसानें माझा मुलगा मारला म्हणून ओरडत सुटावें.

या राजद्रोही माणसाचा रात्रियाग, वनयाग किंवा वनक्रीडा चालू असतां तीक्ष्ण हेरांनीं एखाद्या पूर्वींच तयार झालेल्या वध्य पुरुषाचा वध करून त्या राजद्रोही माणसाची क्रीडा अगर याग जिथें चालू असेल तिथें गुप्तरीतीनें टाकून द्यावा.

राजद्रोही माणसाच्या घरीं नोकर म्हणन राहिलेल्या गुप्त हेरानें आपल्या पगारांत एखादें खोटें नाणें मिसळून तो अपवाद धन्यावर घालावा.

कामकऱ्याच्या रूपानें घरीं काम करणाऱ्या हेरानें राजद्रोही माणसाच्या घरांत चोरीचीं व खोटीं नाणीं पाडण्याचीं उपकरणें लपवून ठेवावींत.

वैद्याचा वेष घेतलेल्यानें रोग उत्पन्न करणारीं विषें औषधें म्हणून त्याच्या घरीं प्रविष्ट करवावीं.

राजद्रोही माणसाच्या सन्निध राहणाऱ्या सत्रि हेरानें त्याच्या घरांत राज्याभिषेकाची सामुग्री लपवून ठेवावी किंवा शत्रुराजाचें एखादें पत्र लपवून ठेवावें व त्याची कापटिक हेरांमार्फत वाच्यता करावी, या वस्त त्याच्या घरांत येण्याचें कारण रचून सांगावें.

एवं दूष्येष्वधार्मिकेषु च वर्तेत। नेतरेषु।

पक्वं पक्वमिवारामात् फलं राज्यादवाप्नुयात्। आत्मच्छेदभयादामं वर्जयेत् कोपकारकम्।

इति कौटलीयार्थशास्त्रे योगवृत्ते पञ्चमाधिकरणे द्वितीयोऽध्यायः कोशाभिसंहरणम्, आदितो द्विनवतितमः।

---

# अध्याय ९३ भृत्यभरणीयम्।

दुर्गजनपदशक्त्या भृत्यकर्म समुदयपादेन स्थापयेत्, कार्यसाधनसहेन वा भृत्यलाभेन। शरीर मवेक्षेत, न धर्मार्थौ पीडयेत्। ऋत्विगाचार्यमन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजराजमातृराजमहिष्योऽष्टचत्वारिंशत्साहस्राः। एतावता भरणे नानास्वाद्यत्वमकोपकं चैषां भवति। दौवारिकान्तर्वंशिकप्रशास्तृसमाहर्तृसन्निधातारश्चतुर्विंशतिसाहस्राः। एतावता कर्मण्या भवन्ति।

कुमारकुमारमातृनायकपौरव्यावहारिककार्मान्तिकमन्त्रिपरिषद्राष्ट्रपालान्तपालाश्च द्वादशसाहस्राः। स्वामिपरिबन्धबलसहाया ह्येतावता भवन्ति। श्रेणीमुख्या हस्त्यश्वरथमुख्याः प्रदेष्टारश्च अष्टसाहस्राः। स्ववर्गानुकर्षिणो ह्येतावता भवन्ति। पत्त्यश्वरथहस्त्यध्यक्षाः द्रव्यहस्तिवनपालाश्च चतुस्साहस्राः। रथिकानीकस्थचिकित्सकाश्वदमकवर्धकयो योनिपोषकाश्च द्विसाहस्राः।

---

याप्रमाणें राजद्रोही व अधार्मिक लोकांशींच वागावें, इतरांशीं नव्हे. बागेंतील पिकलेल्या फळाप्रमाणें पापी माणसांचें द्रव्य राजानें गिळंकृत करावें. आपलें उच्चाटन व्हावयाच्या भीतीनें निर्दोष माणसांचें द्रव्यहरण करूं नये. तसें केल्यास लोकक्षोभ होतो.

---

## भृत्य पोषण.

राजानें किल्लें व प्रांत यांच्या व्यवस्थेसाठीं जरूर तितके नोकर वसुलाच्या एक चतुर्थांश खर्चानें ठेवावेत. किंवा कार्याचा भार सोसण्याला समर्थ असे नोकर मिळवायला लागेल तो खर्च करावा. उत्पन्नाच्या बाबींची काळजी घ्यावी धार्मिक बाबींतील व व्यापाराच्या सोयीसाठीं करावयाचा खर्च कमी करूं नये. यज्ञांतील ऋत्विज, आचार्य ( विद्यागुरु ) मंत्री ( मुख्य ), पुरोहित, सेनापति, युवराज, राजमाता, राजमहिषी यांस प्रत्येकीं ४८००० पण वर्षासन द्यावें, इतक्या द्रव्यानें त्यांना अनेक उपभोग भोगतां येतील व असंतोष व्हायचा नाहीं. मुख्य द्वारपाळ, अंतःपुरावरील अधिकारी, छावणी वरील अधिकारी, फडणीस ( समाहर्ता ), भांडारावरील मुख्याधिकारी यांना प्रत्येकीं २४००० एवढ्या प्राप्तीवर हे कार्यतत्पर होतील.

राजकुमार, राजकुमाराची आई, पायदळावरील मुख्यनायक, व्यापारावरील अधिकारी, औद्योगिक खात्याचा मुख्य, मंत्रिपरिषदेंतील सभासद, प्रांतांचे मुख्य व सीमापाल यांना १२००० पण मिळावेत. एवढ्यावर ते राजनिष्ठ राहतील व राजाला मदत करण्यालाहि समर्थ होतील.

कारागीर संघांचे मुख्य; हत्ती, घोडे व रथ यांच्या दळाचे प्रमुख व शासनाधिकारी यांना ८००० पण मिळावेत. एवढ्या पगारावर त्यांना आपापल्या वर्गाला अनुकूल करून घेतां येईल.

पायदळाचे मुख्यांधिकारी, अश्वाध्यक्ष, रथाध्यक्ष, हस्त्यध्यक्ष, राखलेल्या जंगलावरील अधिकारी व हस्तिवनचो संरक्षक यांना ४००० पण मिळावेत. रथ चालविण्याचे शिक्षण देणारे, हत्ती चालविण्याचे शिक्षण देणारे, वैद्य ( जनावरांचे ), चाबुकस्वार, मुख्य सुतार व कळप पोसणारे यांना २००० पण द्यावेत.

कार्तान्तिकनैमित्तिकमौहूर्तिकपौराणिकसूतमागधाः पुरोहितपुरुषाः सर्वाध्यक्षाश्च साहस्राः । शिल्पवन्तः पादाताः सङ्ख्यायकलेखकादिवर्गः पञ्चशताः । कुशीलवास्त्वर्धतृतीयशताः । द्विगुणवेतनाश्चैषां तूर्यकराः । कारुशिल्पिनो विंशतिशतिकाः । चतुष्पदद्विपदपरिचारकपारिकर्मिकौपस्थायिकपालकविष्टिबन्धकाः षष्टिवेतनाः । आर्ययुक्तारोहकमाणवकशैलखनकाः सर्वोपस्थायिन आचार्या विद्यावन्तश्च पूजावेतनानि यथार्हं लभेरन् पञ्चशतावरं सहस्रपरम् ।

दशपणिको योजने दूतः मध्यमः । दशोत्तरे द्विगुणवेतन आयोजनशतादिति ।

समानविद्येभ्यस्त्रिगुणवेतनो राजा राजसूयादिषु क्रतुषु, राज्ञः सारथिः साहस्रः ।

कापटिकोदास्थितगृहपतिकवैदेहकतापसव्यञ्जनाः साहस्राः । ग्रामभृतकसत्रितीक्ष्णरसदभिक्षुक्यः पञ्चशताः । चारसञ्चारिणोऽर्धतृतीयशताः । प्रयासवृद्धवेतना वा । शतवर्गसहस्रवर्गाणामध्यक्षा भक्तवेतनलाभमादेशं विक्षेपं च कुर्युः । अविक्षेपे राजपरिग्रहदुर्गराष्ट्ररक्षावेक्षणेषु च । नित्यमुख्याः स्युरनेकमुख्याश्च । कर्मसु मृतानां पुत्रदारा भक्तवेतनं लभेरन् । बालवृद्धव्याधिताश्चैषामनुग्राह्याः । प्रेतव्याधितसूतिकाकृत्येषु चैषामर्थमानकर्म कुर्यात् । अल्पकोशःकुप्यपशुक्षेत्राणि

---

भविष्यवादी, शकुन सांगणारा, मुहूर्त सांगणारा, पुराण सांगणारा व भाट यांस, त्याचप्रमाणें कुलगुरूचे नोकर, व निरनिराळ्या खात्यांचे अधिकारी यांस प्रत्येकीं १००० पण द्यावेत.

शिल्पज्ञ, जासूद, हिशेबनीस, कारकून इत्यादि वर्गांतील नोकर यांस ५०० पण द्यावेत.

वाजंत्र्यास २५० पण द्यावे; त्यांमध्यें जे तुतारीवाले असतील त्यांस इतरांपेक्षां दुप्पट पगार असावा.

खेडेगांवांतील कामगार व कुशल कारागीर यांस १२०, चतुष्पाद किंवा द्विपाद प्राण्यांची निगा राखणारे, हरकाम्ये नोकर, राजासन्निध असणारे नोकर, गुरांची निगा राखणारे, मजूर मिळवून देणारे नोकर यांस ६० पण द्यावे.

राजाचे कुमाराचे खेळगडी, त्यांस घोड्यावर बसण्यास शिकविणारे, जादूगार, पर्वतांतील खाणीवर काम करणारे, हरकामे नोकर, शिक्षक व विद्वान यांस त्याच्या मगदुराप्रमाणें ५०० पासून १००० पर्यंत सत्कार द्रव्य मिळावें. सामान्य दूतास दर योजनास १० पण द्यावे, दहा पासून शंभर योजन जावयाचें झाल्यास त्याच्या दुप्पट वेतन द्यावें.

राजसूयादियज्ञांत काम करणाऱ्या ब्राम्हणास त्याच्या सारख्या विद्वानास एरवीं जें वेतन मिळतें, त्याच्या तिप्पट वेतन मिळावें, व राजाच्या सारथ्यास १००० पण मिळावें.

कापटिक, उदास्थित, गृहपतिक, वैदेहक व तापस हेरांस १००० पण वेतन द्यावें.

गांवांतील क्षुद्र नोकर, सत्रि, तीक्ष्ण ( गुंड ) व रसद ( विषप्रयोग करणारे ) हेर व भिक्षुकी हेर यांस ५०० पण द्यावे.

गुप्तहेरांबरोबर फिरणारे नोकरांस २५० पण किंवा प्रवास करतील त्यामानानें वेतन द्यावें.

शंभर पण मिळणाऱ्या किंवा हजार पण मिळणाऱ्या वर्गांतील लोकांवर नेमलेल्या अधिकाऱ्यानें आपल्या हाताखालील नोकरांचे पगार, मजुरी, बदली ठरवावी, त्याचप्रमाणें त्यांच्या नेमणुका किंवा बदल्याहि कराव्या. राजाचे वाडे वगैरे इमारतींतील नोकर, किंवा किल्लेदार किंवा प्रांतांचें रक्षण करण्याकरितां नेमलेले अधिकारी अथवा नोकर, यांच्या बदल्यां करूं नयेत. राजवाड्याचे किंवा किल्ल्यांचें किंवा प्रांतांचें संरक्षण करण्याकरितां मुख्य अधिकारी पुष्कळ नेमण्यांत यावेत, व त्यांच्या नेमणुका कायम तेथेंच असाव्या.

नोकरींत असतां नोकर मेल्यास, त्याच्या बायकोस व मुलांस चरितार्थासाठीं वेतन मिळावें, व त्याच्या कुटुंबांत जे अज्ञान किंवा म्हातारे किंवा रोगी असतील त्यांचा समाचार घ्यावा. कोणी मेल्यास, आजारी पडल्यास अथवा प्रसूत झाल्यास द्रव्यद्वारा मदत द्यावी आणि समाचारहि घ्यावा.

तिजोरींत पैसा थोडा असेल, तेव्हां राजानें धान्य, जनावरें, शेत व थोडेसें द्रव्य द्यावें.. जर एखादा मनुष्य

दद्यात्, अल्पं च हिरण्यम् । शून्यं वा निवेशयितुमभ्युत्थितो हिरण्यमेव दद्यात्, न ग्रामं ग्रामसंजातव्यवहारस्थापनार्थम् । एतेन भृतानामभृतानां च विद्याकर्मभ्यां भक्तवेतनविशेषं च कुर्यात् । षष्टिवेतनस्याढकं कृत्वा हिरण्यानुरूपं भक्तं कुर्यात् । पत्त्यश्वरथद्विपाः सूर्योदये बहिः सन्धिदिवसवर्जं शिल्पयोग्याः कुर्युः । तेषु राजा नित्ययुक्तः स्यात् । अभीक्ष्णं चैषां शिल्पदर्शनं कुर्यात् । कृतनरेन्द्राङ्कं शस्त्रावरणमायुधागारं प्रवेशयेत् । अशस्त्राश्चरेयुरन्यत्र मुद्रानुज्ञातात् । नष्टं विनष्टं वा द्विगुणं दद्यात् । विध्वस्तगणनां च कुर्यात् । सार्थिकानां शस्त्रावरणमन्तपाला गृह्णीयुः, समुद्रमवचारयेयुर्वा । यात्रामभ्युत्थितो वा सेनामुद्योजयेत् । ततो वैदेहकव्यञ्जनाः सर्वपण्यान्यायुधीयेभ्यो यात्राकाले द्विगुणप्रत्यादेयानि दद्युः । एवं राजपण्यविक्रयो वेतनप्रत्यादानं च भवति । एवमवेक्षितायव्ययः कोशदण्डव्यसनं नावाप्नोति । इति भक्तवेतनविकल्पः।

सत्त्रिणश्चायुधीयानां वेश्याः कारुकुशीलवाः । दण्डवृद्धाश्च जानीयुः शौचाशौचमतन्द्रिताः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे योगवृत्ते पञ्चमाधिकरणे तृतीयोऽध्यायः भृत्यभरणीयम्, आदितस्त्रिनवतितमः ॥

---

वस्ती नाहीं अशा नव्या ठिकाणीं वसाहत करूं इच्छील तर त्यास द्रव्यच द्यावें. एकाच गावांत जो व्यवहार चाललेला आहे तसाच व्यवहार नवीन वसाहतींत सुरू करण्याकरितां गांव बक्षीस देणें युक्त आहे.

याप्रमाणें राजानें आपल्या नोकरांचा व इतरांचा चरितार्थ चालवावा आणि त्यांच्या हुशारीप्रमाणें व कामाप्रमाणें त्यांस भत्ताहि द्यावा.

साठ पणांस एक आढक, या प्रमाणांत नोकरांचा पगार हवा तर धान्य रूपानें द्यावा.

अमावास्यादि पर्व दिवस सोडून प्रत्येक दिवशीं सकाळीं पायदळ, घोडदळ, रथदळ व हत्तीदळ यांची कवाईत करविण्यांत यावी. सदर प्रसंगीं राजानें हमेश हजर राहून कवाईत कशी चालते तें पहावें.

कवाईत संपल्यावर शस्त्रें व चिलखतें यांवर राजाचें चिन्ह करून तीं शस्त्रागारांत ठेवण्यांत यावीं.

राजाच्या परवान्यावांचून माणसानें सशस्त्र हिंडतां कामा नये. शस्त्रशाळेंतलें शस्त्र मोडलें किंवा नाहींसें झालें, तर तेथील अधिकाऱ्यानें दुप्पट भरून दिलें पाहिजे.

मोडलेलीं शस्त्रेंहि मोजून ठेविलीं पाहिजेत.

फिरस्त्या व्यापाऱ्यांजवळ शस्त्रें किंवा चिलखतें असतील तीं हद्दींवरील अधिकाऱ्यानें त्यांपासून काढून घ्यावीं पण त्यांस परवाना असेल तर तीं काढून न घेतां त्यांस समुद्रपार करावें.

स्वारीवर निघतांना सैन्याची तयारी जय्यत करावी.

राजा स्वारीवर निघाला म्हणजे वैदेहक हेरांनीं ( फिरस्ते व्यापारी–हेरांनीं ) दुप्पट परत करण्याच्या बोलीनें सैन्यांतील शिपायांस नाना प्रकारचा माल पुरवावा. या योगानें राजाचा माल विकला जातो, नोकराचे पगार दिले जातात आणि मोबदलाहि मिळतो.

या प्रमाणें जमा व खर्च यांची नीट काळजीपूर्वक व्यवस्था लाविली म्हणजे तिजोरींत टंचाई होत नाहीं आणि लष्करी अडचणहि उपस्थित होत नाहीं.

गुप्तहेर, वेश्या, कारागीर, गवई आणि वृद्ध लष्करी अमलदार यांनीं सैन्यांतील लोकांच्या शुद्धाशुद्ध वर्तनावर कडक नजर ठेवावी.

# अध्याय ९४ अनुजीविवृत्तम् ।

लोकयात्राविद् राजानमात्मद्रव्यप्रकृतिसम्पन्नं प्रियहितद्वारेणाश्रयेत । यं वा मन्येत—यथाहमाश्रयेप्सुरेवमसौ विनयेप्सुराभिगामिकगुणयुक्त इति, द्रव्यप्रकृतिहीनमप्येनमाश्रयेत । न त्वेवानात्मसम्पन्नम् । अनात्मवान् हि नीतिशास्त्रद्वेषादनर्थ्यसंयोगाद्वा प्राप्यापि महदैश्वर्यं न भवति ।

आत्मवति लब्धावकाशः शास्त्रानुयोगं दद्यात् । अविसंवादाद्धि स्थानस्थैर्यमवाप्नोति । मतिकर्मसु पृष्टः तदात्वे च आयत्यां च धर्मार्थं संयुक्तं समर्थं प्रवीणवदपरिषद्भीरुः कथयेत् । ईप्सितः पणेत—धर्मार्थानुयोगम् अविशिष्टेषु बलवत्संयुक्तेषु दण्डधारणं मत्संयोगे तदात्वे च दण्डधारणमिति न कुर्याः । पक्षं वृत्तिं गुह्यं च मे नोपहन्याः । संज्ञया च त्वां कामक्रोधदण्डनेषु वारयेयम् इति ।

आयुक्तः प्रदिष्टायां भूमावनुज्ञातः प्रविशेत् । उपविशेच्च पार्श्वतः सन्निकृष्टविप्रकृष्टः परासनं । विगृह्यकथनमसभ्यमप्रत्यक्षमश्रद्धेयमनृतं च वाक्यमुच्चैरनर्मणि हासं वातष्ठीवने च शब्दवती न कुर्यात् । मिथः कथनमन्येन, जनवादे द्वन्द्वकथनं, राज्ञो वेषमुद्धतकुहकानां च, रत्नातिशयप्रकाशाभ्यर्थनम्,

---

## राजा संनिध राहणाऱ्यांची वागणूक.

लौकिक व्यवहार जाणणाऱ्या चतुर मनुष्यास राजाश्रय हवा असल्यास, त्यानें आपल्या इष्ट व हितकर मित्राच्या मार्फत सत्त्वगुणयुक्त व राजैश्वर्ययुक्त अशा राजाच्या पदरीं आश्रय घ्यावा. अथवा त्यांस जो योग्य वाटेल त्याच्या पदरीं " जसा मला आश्रय हवा तसा यालाहि विनय शिकविण्याला मंत्री पाहिजे आहे म्हणून याजवळ रहावयास हरकत नाहीं, बरा आहे " असा मनांत विचार करून रहावें.

असा राजा राजैश्वर्ययुक्त नसला तरी त्याजवळ आश्रय करून रहावयास हरकत नाहीं, पण तो सत्त्वगुणयुक्त नसेल तर मात्र त्यापाशीं राहूं नये. कारण राजाच्या अंगीं सत्त्वगुण नसला म्हणजे तो नीतिशास्त्रद्वेष्टा असल्यामुळें व दुराचाराकडे त्याची साहजिक प्रवृत्ति असल्यामुळें किती जरी ऐश्वर्य त्याजवळ असलें तरी ते टिकूं शकत नाहीं.

सत्त्वगुणयुक्त राजाच्या पदरीं आश्रय मिळाल्यावर, त्यानें हळूहळू राजास शास्त्राचें शिक्षण द्यावयास लागावें, राजानें आक्षेप घेतले नाहींत, म्हणजे आपली जागा कायम आहे, असें समजावें. राजानें प्रस्तुत किंवा भावी प्रकरणासंबंधीं मत विचारिल्यास, पटाइत–माणसाप्रमाणें, सभाजनांची यत्किंचितहि भीति न धरितां–निःशंकपणें धर्मशास्त्रास व राजनीतिशास्त्रास अनुसरून मत द्यावें. राजाला हे गुण पटून त्यानें अमात्य होण्याविषयीं इच्छा प्रकट केली असता राजाशीं पुढील प्रकारें करार करावा–" जो त्या शास्त्रांत प्रवीण नाहीं अशाला धर्म व अर्थ या विषयींचें मत विचारूं नये, ज्याला बलिष्ठाचा पाठिंबा आहे अशा शत्रूविरुद्ध किंवा ज्याच्याशीं माझा संबंध आहे अशाविरुद्ध युद्ध उपस्थित करूं नये, युद्धाची तयारी केल्याशिवाय एकाएकीं युद्ध पुकारूं नये, माझ्या पक्षाचे लोक व माझी वृत्ति यांच्यावर घाला घालूं नये आणि माझ्या रहस्याच्या स्फोट करूं नये. ज्या ज्या वेळेस तूं कामाला किंवा क्रोधाला बळी पडून अन्यायानें शासन करण्याच्या बेतांत असशील, त्या त्या वेळेस मी सूण करून तुझें निवारण करीन तें तूं मानावें. "

राजानें रहावयास परवानगी दिली म्हणजे तो सांगेल त्या जागेवर त्याच्या हुकमानें जाऊन रहावें. दरबारांत बसावयाचें असेल तेव्हां राजाच्या बाजूस जवळच पण दुसऱ्या माणसापासून दूर श्रेष्ठासनावर बसावें, दुसऱ्याशीं वर्दळीवर येऊं नये. स्वतः पाहिल्याशिवाय कोणती गोष्ट सांगूं नये, असभ्य किंवा ज्यावर विश्वास ठेवितां येणार नाहीं असें किंवा असत्य भाषण करूं नये, मोठ्यानें बोलूं नये, हंसावयासारखें कांहीं झालें नसतां हंसूं नये, मोठ्यानें ढेकर देऊं नये, खांकरूं नये, अधोवायु सोडूं नये, दुसरा बोलत असतां त्याचें बोलणें संपल्याशिवाय बोलूं नये, सार्वजनिक चर्चा चालली असतां परस्परांत बोलणें करूं नये, राजासारखा पोषाख करूं नये, चढेल किंवा विदूषकी पोशाख करूं नये, चारमंडळींत रत्न किंवा बढती मागूं नये, डोळा मिचकवूं नये, ओंठ चावूं नये, भिंवई

एकाक्ष्योष्ठनिर्भोगं भ्रुकुटीकर्म, वाक्यावक्षेपणं च ब्रुवति। बलवत्संयुक्तविरोधं स्त्रीभिः स्त्रीदर्शिभिः सामन्तदूतैर्द्वेष्यापक्षावक्षिप्तानर्थ्यैश्च प्रतिसंसर्गमेकार्थचर्यां सङ्घातं च वर्जयेत्।

अहीनकालं राजार्थं स्वार्थं प्रियहितैः सह। परार्थं देशकाले च ब्रूयाद् धर्मार्थसंहितम्।
पृष्टः प्रियहितं ब्रूयान्न ब्रूयादहितं प्रियम्। अप्रियं वा हितं ब्रूयाच्छृण्वतोऽनुमतो मिथः।
तूष्णीं वा प्रतिवाक्ये स्याद् द्वेष्यादींश्च न वर्णयेत्। अप्रिया अपि दक्षाः स्युस्तद्भावाद् ये बहिष्कृताः।
अनर्थ्याश्च प्रिया दृष्टाश्चित्तज्ञानानुवर्तिनः। अभिहास्येष्वभिहसेद् घोरहासांश्च वर्जयेत्।
परात् सङ्क्रामयेद् घोरं न च घोरं स्वयं वदेत्। तितिक्षेतात्मनश्चैव क्षमावान् पृथिवीसमः।
आत्मरक्षा हि सततं पूर्वं कार्या विजानता। अग्नाविव हि संप्रोक्ता वृत्ती राजोपजीविनाम्।
एकदेशं दहेदग्निः शरीरं वा परं गतः। सपुत्रदारं राजा तु घातयेद् वर्धयेत वा॥

इति कौटलीयार्थशास्त्रे योगवृत्ते पञ्चमाधिकरणे चतुर्थोऽध्यायः अनुजीविवृत्तम्, आदितश्चतुर्नवतितमः।

---

# अध्याय ९५ समयाचारिकम्।

नियुक्तः कर्मसु व्ययविशुद्धमुदयं दर्शयेत्। आभ्यन्तरं बाह्यं गुह्यं प्रकाश्यमात्ययिकमुपेक्षितव्यं वा कार्यम् 'इदमेवम्' इति विशेषयेच्च। मृगयाद्यूतमद्यस्त्रीषु प्रसक्तं चानुवर्तेत प्रशंसाभिः।

चढवूं नये, कोणी बोलत असतां त्यास हटकूं नये, बलाढ्यांशीं वैर करूं नये, स्त्रिया, स्त्री–मध्यस्थ पुरुष, परराष्ट्राचे दूत, राजाचे शत्रू, कामावरून दूर झालेले लोक व दुष्ट या लोकांबरोबर सहवास ठेवूं नये, अगदीं एकलकोंडे राहूं नये; पण उलट मोठा जमावहि आपल्या भोंवतीं जमवूं नये.

योग्य संधी न दवडतां राजाच्या हिताविषयीं बोलत असावें. स्वतःच्या हिताची गोष्ट बोलावयाची, ती आपलें हित इच्छिणारे मित्र जवळ असतील तेव्हां काढीत जावी. दुसऱ्याच्या हिताची गोष्ट काळ व स्थळ पाहून व धर्मशास्त्रास व नीतिशास्त्रास अनुसरून बोलावी.

राजानें विचारल्यास जें गोड व हितकर असेल तें सांगावें, अहितकर गोड असलें तरी बोलूं नये. हितकर वचन गोड नसेल तरी राजा ऐकण्यास तयार असेल तेव्हां त्यांस एकांतांत सांगावें.

राजानें आक्षेप घेतला असतां उत्तर न देतां स्तब्ध बसावें. राजाला नावडत्या गोष्टी केव्हांहि वर्णूं नयेत. राजाच्या मर्जी विरुद्ध वर्तन करणारे लोक आपल्या कामांत किती दक्ष असले तरी ते राजाला अप्रिय होतात. उलटपक्षीं राजाच्या छंदानें वागणारी माणसें अनर्थकारक असलीं तरी तीं राजाला प्रियच वाटतात.

राजा हंसला म्हणजे आपण हंसावें, पण मोठ्यानें हसूं नये. दुसऱ्याची निंदा कोणी करावयास लागला तर आक्षेप घ्यावा. स्वतः आपण परनिंदा करूं नये. आपल्यास केलेल्या अपकाराची क्षमा करावी. पृथ्वीसारखें क्षमाशील असावें.

सुज्ञ माणसानें प्रसंगीं स्वतःचें रक्षण अगोदर करावें. राजाश्रयाखालीं राहणाऱ्या माणसाचें जीवित म्हणजे अग्नींतील जीवितासारखें होय.

अग्नि शरीराचा कांहीं भाग किंवा सगळें शरीर फार तर जाळील, परंतु राजा रुष्ट झाल्यास मनुष्यास बायकां पोरांसुद्धां मारील, पण संतुष्ट झाल्यास वैभवास चढवील.

---

## प्रसंगानुरुप वर्तन.

राजाकडून अधिकार प्राप्त झाल्यानंतर, त्या अधिकाऱ्यानें खर्च वजा जातां किती वसूल राहिला हें दाखवीत जावें. काम स्वदेशांतील असो, परदेशांतील असो, गुप्त असो, उघड असो, तांतडीचें असो अथवा सावकाशीचें असो प्रत्येक कामाचा " असा असा " तपशील आहे हें विदित करीत जावें.

आसन्नश्चास्य व्यसनोपघाते प्रयतेत । परोपजापातिसन्धानोपधिभ्यश्च रक्षेत् । इङ्गिताकारौ चास्य लक्षयेत् । कामद्वेषहर्षदैन्यव्यवसायभयद्वन्द्वविपर्यासामिङ्गिताकाराभ्यां हि मन्त्रसंवरणार्थमाचरन्ति प्राज्ञाः । दर्शने प्रसीदति । वाक्यं प्रतिगृह्णाति । आसनं ददाति । विविक्ते दर्शयते । शङ्कास्थाने नातिशङ्कते । कथायां रमते । परज्ञाप्येष्वपेक्षते । पथ्यमुक्तं सहते । स्मयमानो नियुङ्क्ते । हस्तेन स्पृशति । श्लाघ्येनोपहसति । परोक्षे गुणं ब्रवीति । भक्ष्येषु स्मरति । सह विहारं याति । व्यसनेऽभ्यवपद्यते । तद्भक्तीन् पूजयति । गुह्यमाचष्टे । मानं वर्धयति । अर्थं करोति । अनर्थं प्रतिहन्ति इति तुष्टज्ञानम् ।

एतदेव विपरीतमतुष्टस्य । भूयश्च वक्ष्यामः—सन्दर्शने कोपः, वाक्यस्याश्रवणप्रतिषेधौ, आसनचक्षुषोरदानं, वर्णस्वरभेदः, एकाक्षिभ्रुकुट्योष्ठानिर्भोगः, स्वेदश्च, श्वासस्मितानामस्थानोत्पत्तिः; परमन्त्रणम्, अकस्माद् व्रजनं, वर्धनम् अन्यस्य, भूमिगात्रविलेखनम्, अन्यस्योपतोदनं, विद्यावर्णदेशकुत्सा, समनिन्दा, प्रतिदोषनिन्दा, प्रतिलोमस्तवः, सुकृतानवेक्षणं, दुष्कृतानुकीर्तनं, पृष्ठावधानम्, अतित्यागः, मिथ्याभिभाषणं, राजदर्शिनां च तद्वृत्तान्यत्वम् । वृत्तिविकारं चावेक्षेताप्यमानुषाणाम् ।

अयमुच्चैः सिञ्चतीति कात्यायनः प्रवव्राज ।

---

राजा मृगयेंत, द्यूतांत, मद्यपानांत अथवा स्त्रीप्रेमांत रममाण झाला असला तरी त्याची प्रशंसा करीत करीत त्याच्या जवळपास रहावें. संकटप्रसंगीं संकटाचें निवारण करण्याचे प्रयत्न करावे, शत्रूंचीं खलबतें व डावपेंच व कपटप्रयोग यांपासून राजाचें संरक्षण करावें. राजाच्या मनांतील गोष्टी व अंगचेष्टा नीट समजून घ्याव्या. शहाणे लोक आपल्या मनांतील गुप्त गोष्ट बाहेर पडूं नये म्हणून जो प्रयत्न करतात त्या योगानें त्यांच्या चेहऱ्यांत व अंगचेष्टांत आवड व नावड, आनंद व दुःख, निर्धार व शंका असे परस्पर विरोधी विकार दर्शविले जातात; त्यावरून मनांतील इंगित ताडतां येतें. उदाहरणार्थ दर्शन घडल्यानें राजा खूष होतो, भाषण ऐकतो, आसन देतो, एकांतांत भेट घेतो, शंका घेण्याजोगी असली तरी शंका घेत नाहीं, दुसऱ्यानें ऐकण्याजोगें मनांतलें गुज ऐकण्याची अपेक्षा करितो, संभाषणांत आनंद मानितो, हितकर भाषण कसेंहि असलें तरी ऐकून घेतो; आज्ञा करावयाची ती हंसून करितो, हातानें स्पर्श करितो, आपल्या पूज्य गोष्टींचा उपहास करीत नाहीं, पाठीमागें गुण वर्णितो; जेवतांना आठवण करितो, बरोबर घेऊन क्रीडेस जातो, संकटकालीं सल्ला विचारतो, अनुयायांस सन्मानितो; रहस्य सांगतो, मान वाढवितो; संपत्ति वाढवितो, संकट निवारण करितो. असें असलें म्हणजे राजाची मर्जी आहे असें समजावें आणि उलट असलें म्हणजे मर्जी नाहीं असें समजावें. तथापि स्पष्टीकरणार्थ पुन्हा सांगतों—

पाहिल्याबरोबर रागावतो, भाषण ऐकत नाहीं, भाषणास मनाई करितो, आसन देत नाहीं, पाहत नाहीं, तोंडाचा रंग व स्वर बदलतो; वांकड्या नजरेनें पाहतो, भिवंई चढवितो, ओंठ चावतो, कारण नसतां घाम येतो, सुस्कारा टाकितो किंवा हंसतो, आपल्याशीं पुटपुटतो, एकाएकीं वांकतो, दुसऱ्या कोणाचें तरी अभिनंदन करितो, जमीन उकरतो, अंग खाजवितो, दुसऱ्या कोणाला तरी उपद्रव देतो, विद्या, जाति, देश यांची निंदा करीत बसतो, आपल्या बरोबरीच्यांची निंदा करितो; दुसऱ्या कोणाच्या अंगीं तसेच दोष असतील त्याची निंदा करितो; आपल्या वैऱ्याची स्तुति करितो; चांगलीं कृत्यें असतील त्याकडे लक्षहि देत नाहीं, दुष्कृत्यें वारंवार आठवतो, आपल्याकडे पाठ करून बसतो, भेट झाली कीं लगेच निरोप देतो, खोटीच सबब सांगतो, याप्रमाणें स्थिति असेल तेव्हां राजाची मर्जी नाहीं असें समजावें.

राजाच्या सांनिध असणाऱ्या लोकांच्या वागण्यांत आपल्याविषयीं काय फेरबदल होतो, हें नेहमीं सूक्ष्म तऱ्हेनें लक्षांत आणावें. माणसाच्याच तर काय पण मनुष्येतर प्राण्यांच्याहि वागणुकीकडे लक्ष असावें. अशा प्रकारें लक्ष ठेवून विचार केल्यावरून अनेकांची संकटांतून सुटका झाली आहे. त्यांतील कांहीं उदाहरणें आढळतात तीं अशीः—

पौंड्र देशांतील कात्यायन नांवाच्या प्रधानानें राजाच्या बागेंतील माळ्यानें बेपर्वाईनें अंगावर पाणी उडविलेलें पाहून आपणांवर राजाचा कोप झाला आहे हें जाणून राजवाड्यांतून पाय काढिला.

क्रौञ्चोऽपसव्यम् इति काणिङ्को भारद्वाजः।
तृणमिति दीर्घश्चारायणः। शीता शाटीति घोटमुखः। हस्ती प्रत्यौक्षीदिति किञ्जल्कः।
रथाश्वंप्राशंसीदिति पिशुनः। प्रतिरवणे शुनः पिशुनपुत्रः। इति। अर्थमानावक्षेपे च परित्यागः। स्वामिशीलमात्मनश्च किल्बिषमुपलभ्य वा प्रतिकुर्वीत। मित्रमुपकृष्टं वास्य गच्छेत्।
तत्रस्थो दोषनिर्घातं मित्रैर्भर्तरि चाचरेत्। ततो भर्तरि जीवेद्वा मृते वा पुनराव्रजेत्।

इति कौटलीयार्थशास्त्रे योगवृत्ते पञ्चमाधिकरणे पञ्चमोऽध्यायः समयाचारिकम्, आदितः पञ्चनवतितमः।

---

क्रौंच पक्षी रोजच्याप्रमाणें न जातां उलटा गेला एवढ्यावरून कोसल देशांतील कणिंक नांवाच्या भारद्वाज गोत्रांतील पंडितानें राजाची मर्जी खप्पा झाली आहे, हें ओळखून राजवाड्यांत जाण्याचें सोडून दिलें.

मगध देशांतील बालराजाचा दीर्घचारायण नांवाचा वृद्ध मंत्री होता. त्याला वायनदान देतांना राजानें त्यांवर गवतांची काडी ठेवून वायन दिलें, एवढ्यावरून राजाच्या मनांत अनादरबुद्धि उत्पन्न झाली असें समजून त्या वृद्ध मंत्र्यानें राजवाडा वर्ज्य केला.

अवंती देशाच्या राजपुत्राचा घोटमुख नांवाचा अध्यापक होता. त्याच्यावर कांहीं कारणानें राजाचा कोप झाला असतां, राजपुत्रानें गुरूजींना रोजच्याप्रमाणें आसन न देतां आज छाटी वाळलीच नाहीं असें सांगितलें. तेवढ्यावरून राजाची गैरमर्जी झाल्याचें तर्कानें ओळखून त्यानें आपलें काम सोडून दिलें.

वंग देशांतील राजाचे पदरीं किंजलक नांवाचा आचार्य होता. तो एके दिवशीं नित्याप्रमाणें राजवाड्यांत येत असतां, हत्तीनें आपल्या सोंडेंतील पाण्याचा फवारा त्यांजवर सोडिला; त्यांवरून राजाचें मन आपल्याविषयीं कलुषित झालें आहे असा तर्क करून किंजलकानें घरची वाट धरली.

पिशुन नांवाचा आचार्य उज्जयिनींच्या प्रद्योतराजाच्या पालक नामक पुत्राला नीतिशास्त्र पढवीत असे. त्याच्या विषयीं राजाचे मनांत कुबुद्धि उपजल्याचें पाहून, तो अध्यापनासाठीं नित्याप्रमाणें आला असतां राजपुत्रानें आपल्या रथाच्या घोड्याच्या चपलतेची प्रशंसा सुरू केली. तेव्हां त्याचा हेतु ओळखून तो पिशुन त्या वेळेपासून राजवाड्यांत येईनासा झाला. याच पिशुनाचा मुलगा राजाचे पदरीं राहिला असतां, एके दिवशीं वाड्यांत येत असतां दारांतला नेहमींचा कुत्रा त्यांजवर एकाएकीं भुंकूं लागला. त्यावरून राजाच्या मनांत कांहीं काळेबेरें आलें आहे, असें अनुमान करून पिशुनपुत्रानें घरची वाट धरली.

( अशा अनेक कथा त्यावेळीं रूढ असून चाणक्यानें त्या सूत्ररूपानें येथें दिल्या आहेत. )

राजानें पदवी काढून घेतली किंवा वेतन कमी केलें तर अमात्यानें राजाचा त्याग करावा. राजाचा कोप कशामुळें झाला व आपलें कोठें चुकलें याचा शोध करून आपलें वर्तन सुधारावें, किंवा राजाच्या एखाद्या मित्राचा आश्रय करावा. असा आश्रय घेऊन राहिल्यावर मित्रांच्या साहाय्यानें आपल्या अंगचे व राजाच्या अंगचे दोष दूर करण्याचा प्रयत्न करावा. राजाच्या हयातींतच त्याचें मन साफ झाल्यास त्यांजकडे पुनः रहावें. तसें न झाल्यास राजाच्या मृत्यूनंतर परत राजवाड्यांत यावें.

---

# अध्याय ९६ राज्यप्रतिसन्धानमेकैश्वर्यं च ।



राजव्यसनमेवममात्यः प्रतिकुर्वीत । प्रागेव मरणाबाधभयाद्राज्ञः प्रियहितोपग्रहेण मासद्विमासान्तरं दर्शनं स्थापयेत् । 'देशपीडापहममित्रापहमायुष्यं पुत्रीयं वा कर्म राजा साधयति' इत्यपदेशेन राजव्यञ्जनमनुरूपवेलायां प्रकृतीनां दर्शयेत्, मित्रामित्रदूतानां च । तैश्च यथोचितां सम्भाषाम् अमात्यमुखो गच्छेत् । दौवारिकान्तर्वंशिकमुखश्च यथोक्तं राजप्रणिधिमनुवर्तयेत् । अपकारिषु च हेडं प्रसादं वा प्रकृतिकान्तं दर्शयेत् । प्रसादमेवोपकारिषु । आप्तपुरुषाधिष्ठितौ दुर्गप्रत्यन्तस्थौ वा कोशदण्डावेकस्थौ कारयेत्, कुल्यकुमारमुख्यांश्चान्यापदेशेन । यश्च मुख्यः पक्षवान् दुर्गाटवीस्थो वा वैगुण्यं भजेत तमुपग्राहयेत्, बह्वाबाधां वा यात्रां प्रेषयेत् मित्रकुलं वा । यस्माच्च सामन्तादाबाधं पश्येत्, तमुत्सवविवाहहस्तिबन्धनाश्वपण्यभूमिप्रदानापदेशेन अवग्राहयेत्, स्वमित्रेण वा । ततः सन्धिमदूष्यं कारयेत् । आटविकामित्रैर्वा वैरं ग्राहयेत् । तत्कुलीनमवरुद्धं वा भूम्येकदेशेनोपग्राहयेत् ।

---

## राज्याधिकारसंक्रमणकाल व एकमुखी सत्ता.

राजा आजारी पडला असतां, अमात्यानें पुढें सांगितल्याप्रमाणें उपाय करावे.

राजाचा अंतकाळ होण्याचा संभव आहे अशी भीति वाटूं लागण्याच्या आधींपासूनच राजाच्या मित्रमंडळांस वश करून घेऊन, अशी पद्धती सुरू करावी कीं प्रजाजनास राजाची भेट महिन्यांतून एकदां किंवा दोन महिन्यांतून एकदां होत जाईल. " राष्ट्रीय संकट दूर व्हावें, शत्रूंचा उपद्रव दूर व्हावा, आयुष्य वाढावें, अथवा पुत्रसंतति व्हावी " म्हणून कांहीं धार्मिक कृत्य करण्यांत राजा गुंतला आहे, असा बहाणा करून भेटीचा प्रसंग येईल तेव्हां प्रजाजनास तोतया राजाचें दर्शन देत जावें. राजाच्या भेटीस मित्रराजांचे किंवा शत्रुराजांचे दूत येतील त्यांसहि बनावट राजाचेंच दर्शन द्यावें. त्यांबरोबर संभाषण करण्याचा प्रसंग येऊन पडलाच, तर अमात्याच्या मुखानें संभाषण व्हावें. राजानें अमात्यास जो हुकूम करावयाचा तो द्वारपाळावरील मुख्य अधिकाऱ्याच्या तोंडून वदवावा. अपकार करणाऱ्या माणसावर अवकृपा किंवा दया दाखवावयाची ती लोकसंमत होईल अशीच दाखवावी. उपकार करणाऱ्यावर कृपाच करावी.

राज्यांतील द्रव्यनिधि व लष्कर किल्ल्यांत किंवा सरहद्दीवरील ठिकाणांत एकत्र आणून ठेवावें व त्यांवर मुख्य अधिकारी विश्वसनीय व प्रतिष्ठित गृहस्थ असावे.

बरोबरीचे जे राजकुमार किंवा प्रमुख पुरुष असतील त्यांसहि कांहीं मिषानें अशाच सुरक्षित स्थळीं ठेवून द्यावें. किल्ल्यावरील जो अधिकारी अथवा जो रानटी लोकांचा पुढारी लोक जमवून राजाविरुद्ध मसलत करीत असेल, त्यांस पकडून आणवावें, अथवा अत्यंत अडचणीच्या स्वारीवर त्यांस पाठवावें, अथवा राजाच्या एखाद्या आप्त मित्रांच्या घरीं पाठवावें.

एखाद्या मांडलिक राजापासून विघ्न येण्याचा संभव असल्यास त्यांस उत्सवाच्या किंवा विवाहाच्या निमित्तानें बोलवावें. हत्ती पकडण्याकरितां किंवा घोडे खरेदी करण्याकरितां बोलवावें, अथवा अमुक प्रांत तुम्हांला देतो त्याचा ताबा घ्यावयास यावें असें लिहून बोलवावें आणि तो आल्यानंतर त्यास स्वतः पकडून कैदेंत ठेवावें. अथवा त्यांस मित्र राजाकरवीं प्रतिबंधांत ठेववावें. तदनंतर आपल्या राजास यत्किंचितहि हानिकारक होणार नाहीं असा तह त्याबरोबर करावा. अथवा जेणेंकरून रानटी पुढाऱ्यांबरोबर किंवा शत्रुराजांबरोबर त्याचें वैर अधिक वाढेल असें करावें. अथवा त्यांच्या घराण्यांतील जो कोणी पुरुष प्रतिबंधांत ठेविलेला असेल त्यांस अमुक एक प्रांत देतों असें अभिवचन देऊन आपल्या बाजूस वळवून कार्यभाग साधावा.

कुल्यकुमारमुख्योपग्रहं कृत्वा वा कुमारमभिषिक्तमेव दर्शयेत्। दाण्डकर्मिकवद् वा राज्यकण्टकानुद्धृत्य राज्यं कारयेत्। यदि वा कश्चिन्मुख्यः सामन्तादीनामन्यतमः कोपं भजेत, तम् 'एहि राजानं त्वा करिष्यामि' इत्यावाहयित्वा घातयेत्। आपत्प्रतीकारेण वा साधयेत्। युवराजे वा क्रमेण राज्यभारमारोप्य राजव्यसनं ख्यापयेत्।

परभूमौ राजव्यसने मित्रेणामित्रव्यञ्जनेन शत्रोः सन्धिमवस्थाप्यापगच्छेत्। सामन्तादीनामन्यतमं वास्य दुर्गे स्थापयित्वापगच्छेत्। कुमारमभिषिच्य वा प्रतिव्यूहेत। परेणाभियुक्तो वा यथोक्तमापत्प्रतीकारं कुर्यात्।

एवमेकैश्वर्यममात्यः कारयेदिति कौटल्यः। नैवमिति भारद्वाजः। प्रम्रियमाणे वा राजन्यमात्यः कुल्यकुमारमुख्यान् परस्परं मुख्येषु वा विक्रामयेत्। विक्रान्तं प्रकृतिकोपेन घातयेत्। कुल्यकुमारमुख्यानुपांशुदण्डेन वा साधयित्वा स्वयं राज्यं गृह्णीयात्। राज्यकारणाद्धि पिता पुत्रान् पुत्राश्च पितरमभिद्रुह्यन्ति; किमङ्ग पुनरमात्यप्रकृतिर्ह्येकप्रग्रहो राज्यस्य। तत् स्वयमुपस्थितं नावमन्येत। स्वयमारूढा हि स्त्री त्यज्यमानाभिशपतीति लोकप्रवादः।

कालश्च सकृदभ्येति यं नरं कालकाङ्क्षिणम्। दुर्लभः स पुनस्तस्य कालः कर्म चिकीर्षतः॥

प्रकृतिकोपकमधर्मिष्ठमनैकान्तिकं चैतदिति कौटल्यः। राजपुत्रमात्मसम्पन्नं राज्ये स्थापयेत्। संपन्नाभावे व्यसनिनं कुमारं राजकन्यां गर्भिणीं देवीं वा पुरस्कृत्य महामात्रान् सन्निपात्य ब्रूयात्—

---

राजा मृत झाला असतां कुलीन राजकुमार व राज्यांतील प्रमुख पुरुष यांचें साहाय्य मिळवून, अमात्यानें राजकुमारास राज्याभिषेक करावा व मग प्रजाजनांस त्याचें दर्शन करवावें. अथवा 'दांडकर्मिक' प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आपल्या मार्गांतील विघ्नकर्ते काढून टाकून स्वतःच राज्यकारभार चालवावा.

शेजारच्या राजांपैकीं एखादा प्रमुख राजा यदा कदाचित विरुद्ध जाऊं लागेल तर "ये, मी तुला राजा करितों" असा निरोप पाठवून त्यांस बोलावून आणावें व ठार करावें, अथवा त्याच्यावरील विघ्न दूर करून त्यांस वश करून घ्यावें. किंवा आस्ते आस्ते युवराजाकडे राज्यकारभार सोंपवून मग राजनिधन प्रसिद्ध करावें.

राजा शत्रूच्या देशांत मरण पावला असतां, अमात्यानें आपल्या राजाचा खराखरा मित्र, पण वरून वैरी असें दाखविणारा जो राजा असेल त्याचा व शत्रूचा तह घडवून आणून नंतर आपण त्या मांडलिकावर चालून जावें. अथवा शेजारच्या राजांपैकीं एखाद्या राजास आपल्या राजाच्या किल्ल्यांत स्थापित करून, आपण लढाईवर निघावें. अथवा राजकुमारास अभिषेक करून मग शत्रूंशीं लढाई द्यावी. शत्रूनीं हल्ला केल्यास योग्य त्या मार्गानें प्रतिकार करावा.

याप्रमाणें अमात्यानें राजपुत्राची सत्ता एकमुखी करावी असें कौटिल्य सांगतो. पण भारद्वाज म्हणतो—"असें नव्हे. राजा मरावयास टेंकला म्हणजे अमात्यानें राजघराण्यांतील कुमारांस व प्रमुख पुरुषांस आपआपसांत किंवा प्रमुख पुरुषा विरुद्ध लढण्यास चिथवून द्यावें. त्यांची धामधूम सुरू झाली म्हणजे प्रजेंत क्षोभ उत्पन्न झाला या निमित्तानें त्यांस ठार मारावें. अथवा अमात्यानें राजघराण्यांतील कुमारास व प्रमुख पुरुषांस गुप्तपणें शासन करून स्वतःच्या ताब्यांत राज्य घ्यावें. कारण राज्याच्या पायीं बाप मुलाचा द्वेष करितो, मुलगा बापाचा द्वेष करतो. मग जें राज्य एकट्या अमात्याच्या ताब्यांत आहे त्यांतील अमात्याचा द्वेष केला जाईल यांत काय नवल आहे ? म्हणून जें आपण होऊन चालून आलें आहे तें झिडकारूं नये. कारण स्त्री पायांनीं चालत आली असतां तिचा अव्हेर केला तर ती शाप देते असें म्हणतात.

जो मनुष्य वेळेची वाट पाहात बसला असतो त्यास केव्हां तरी एकदांच वेळ येते, आणि तिचा योग्य उपयोग न केल्यास काम करण्याची इच्छा होईल तेव्हां पुन्हा तशी वेळ यावयाची नाहीं.

कौटिल्य म्हणतो—प्रजेंत क्षोभ जेणेंकरून उत्पन्न होईल असें कृत्य धर्माविरुद्ध आहे; शिवाय हा हटकून यशस्वी होणारा मार्गहि नव्हे. यास्तव अमात्यानें सत्त्वगुण संपन्न राजपुत्रास राज्यावर बसवावें हेंच चांगलें. सत्त्वगुण-

अयं वो निक्षेपः, पितरमस्यावेक्षध्वं सत्त्वाभिजनमात्मनश्च, ध्वजमात्रोऽयं, भवन्त एव स्वामिनः, कथं वा क्रियताम् इति।

तथा ब्रुवाणं योगपुरुषा ब्रूयुः—कोऽन्यो भवत्पुरोगादस्माद् राज्ञश्चातुर्वर्ण्यमर्हति पालयितुम् इति। तथेत्यमात्यः कुमारं राजकन्यां गर्भिणीं देवीं वाधिकुर्वीत, बन्धुसम्बन्धिनां मित्रामित्रदूतानां च दर्शयेत्। भक्तवेतनविशेषममात्यानामायुधीयानां च कारयेत्। भूयश्चायं वृद्धः करिष्यतीति ब्रूयात्। एवं दुर्गराष्ट्रमुख्यानाभाषेत, यथार्हं च मित्रामित्रपक्षम्। विनयकर्मणि च कुमारस्य प्रयतेत। कन्यायां समानजातीयादपत्यमुत्पाद्य वाभिषिञ्चेत्। मातुश्चित्तक्षोभभयात् कुल्यमल्पसत्त्वं छात्रं च लक्षण्यमुपनिदध्यात्। ऋतौ चैनां रक्षेत्। न चात्मार्थं कञ्चिदुत्कृष्टमुपभोगं कारयेत्। राजार्थं तु य न-वाहनाभरणवस्त्रस्त्रीवेश्मपरिवापान् कारयेत्।

यौवनस्थं च याचेत विश्रमं चित्तकारणात्। परित्यजेदतुष्यन्तं तुष्यन्तं चानुपालयेत्॥
निवेद्य पुत्ररक्षार्थं गूढसारपरिग्रहान्। अरण्यं दीर्घसत्रं वा सेवेतारुच्यतां गतः॥
मुख्यैरवगृहीतं वा राजानं तत्प्रियाश्रितः। इतिहासपुराणाभ्यां बोधयेदर्थशास्त्रवित्॥
सिद्धव्यञ्जनरूपो वा योगमास्थाय पार्थिवम्। लभेत लब्ध्वा दूष्येषु दाण्डकर्मिकमाचरेत्॥

इति कौटलीयार्थशास्त्रे योगवृत्ते पञ्चमाधिकरणे षष्ठोऽध्यायः राज्यप्रतिसन्धानम् एकैश्वर्यम्, आदितः षण्णवतितमः॥

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य योगवृत्तं पञ्चममधिकरणं समाप्तम्॥

---

संपन्न राजपुत्र नसल्यास व्यसनीपुत्र किंवा राजकन्या, किंवा गर्भवती राणी पुढें करून सर्व अमात्यांस व प्रधानास एकत्र जमवून असें म्हणावें कीं—" ही तुमच्या हवालीं केलेली ठेव आहे, याच्या बापाकडे लक्ष द्या, तुम्ही आपलें शील व थोर कुल मनांत आणा, हा केवळ कुळाचें निशाण होय, आपणच खरे मालक; तेव्हां आतां कसें काय करावयाचें तें आपण सांगा. "

यानंतर अमात्याच्या मसलतींत असलेल्या पुरुषांनीं म्हणावें—" आपणच पुढारीपण स्वीकारिलें पाहिजे. आपल्याखेरीज दुसऱ्या कोणाला पुढें करून हा राजा राज्यांतील चातुर्वर्ण्यांचें यथायोग्य पालन करण्यास समर्थ होईल ? " त्यावर ठीक आहे असें म्हणून अमात्यानें कुमाराला, राजकन्येला, अथवा गर्भवती राणीला राज्यावर बसवून बंधु, इष्टमित्र, आप्त, मित्र, राजाचे दूत व शत्रूराजाचे दूत यांस राजांस भेटवावें. इतर अमात्यांना व सैन्यांतील नोकरांना पगारांत बढती द्यावी आणि " या राजाची भरभराट झाल्यास हा आणखी बढती देईल " असें सांगावें. किल्ल्यांतील अधिकाऱ्यास व राष्ट्रांतील म्हणजे प्रांतांतील अधिकाऱ्यास असेंच सांगावें आणि मित्र मंडळीस किंवा वैरी मंडळीसहि असेंच आश्वासन द्यावें. कुमारास योग्य तें शिक्षण देण्याची व्यवस्था करावी अथवा कन्येला समानवर्णांतील पुरुषांपासून जो पुत्र झाला असेल तो राज्यावर बसवावा. आईच्या मनाची चलबिचल होऊं नये म्हणून त्या अर्भक-कुमाराचें काम पाहाणारा मुखत्यार ठेवावयाचा तो कुलशीलवान पण अल्प पराक्रमी असा एखादा शिष्य ठेवावा. कालानुरूप तिचें शिक्षण करावें. आपण स्वतः कधीं ऐषआराम करूं नये, पण राजासाठीं गाडी, घोडे, अलंकार, वस्त्रें, स्त्रिया, वाडे वगैरे हर हमेश तयार असावे.

राजा वयांत आल्यानंतर, अमात्यानें आतां मला मानसिक त्रासांतून मुक्त करून विश्रांति द्यावी अशी त्यांस विनंती करावी. राजाची गैरमर्जी दिसेल तेव्हां त्यांस सोडून जावें, मर्जी असेल तर जवळ रहावें.

कामाचा कंटाळा आला असेल तर पुत्राच्या रक्षणाकरितां काय काय गुप्त पण पक्की व्यवस्था केली आहे व कोण-कोणते लोक नेमले आहेत हें राजमातेस विदित करून अमात्यानें अरण्यांत जावें अथवा यज्ञ-सत्र करावयास लागावें.

राज्यांतील प्रमुख पुरुषांच्या अनुरोधानें राजा वागत असेल तेव्हां त्याच्या प्रेमांतील मित्रांच्या आश्रयानें राह-णाऱ्या अर्थशास्त्रज्ञ गुरूनें इतिहासांतील व पुराणांतील उदाहरणांनीं राजास नीतिशास्त्राचीं तत्वें शिकवावीं.

अथवा अमात्यानें महातपस्वी पुरुषाचा वेष घेऊन राजाचे संनिध राहण्याची संधि साधावी आणि सर्वत्र नजर ठेवून राजद्रोही लोक शोधून काढावेत आणि जेथें जेथें ते आढळतील तेथें तेथें त्यांचें पारिपत्य करावें.

## पांचवें अधिकरण समाप्त.

# मण्डलयोनिः—षष्ठमधिकरणम् ।

## अध्याय ९७ प्रकृतिसम्पदः ।

स्वाम्यमात्यजनपददुर्गकोशदण्डमित्राणि प्रकृतयः । तत्र स्वामिसम्पत् । महाकुलीनो दैवबुद्धिसत्त्वसम्पन्नो वृद्धदर्शी धार्मिकः सत्यवागविसंवादकः कृतज्ञः स्थूललक्षो महोत्साहोऽदीर्घसूत्रः शक्यसामन्तो दृढबुद्धिरक्षुद्रपरिषत्को विनयकाम इत्याभिगामिका गुणाः ।

शुश्रूषाश्रवणग्रहणधारणविज्ञानोहापोहतत्त्वाभिनिवेशाः प्रज्ञागुणाः । शौर्यममर्षः शीघ्रता दाक्ष्यं चोत्साहगुणाः । वाग्मी प्रगल्भः स्मृतिमतिबलवानुदग्रः स्ववग्रहः कृतशिल्पो व्यसने दण्डनाय्युपकारापकारयोर्दृष्टप्रतिकारी ह्रीमानापत्प्रकृत्योर्विनियोक्ता दीर्घदूरदर्शी देशकालपुरुषकारकार्यप्रधानः सन्धिविक्रमत्यागसंयमपणपरच्छिद्रविभागी संवृतोऽदीनाभिहास्यजिह्मभ्रुकुटीक्षणः कामक्रोधलोभस्तम्भचापलोपतापपैशुन्यहीनः शक्लः स्मितोदग्राभिभाषी वृद्धोपदेशाचार इत्यात्मसम्पत् ।

अमात्यसम्पदुक्ता पुरस्तात् ।

---

### अधिकरण सहावें, साम्राज्याचें मूळस्थान

### अध्याय ९७ साम्राज्य शरीराचे उत्तम गुण

राजा, अमात्य, देश, किल्ला, खजिना, लष्कर आणि मित्र हे साम्राज्य शरीराचे अवयव होत. यांपैकीं राजाच्या अंगचे गुण कोणते श्रेष्ठ आणि राजाचें पूर्णत्व कशांत असतें, हें आतां सांगतों.

थोरकुलांत जन्मलेला, थोर नशीबाचा, बुद्धिमान, सत्त्वगुणयुक्त, अनुभवी माणसांच्या अनुरोधानें चालणारा, धर्मनिष्ठ, सत्यवक्ता, पूर्वापरसंगती ठेवणारा, उपकार जाणणारा, संधान ठेवणारा, मोठा उत्साही, विलंब न लावणारा, लगत असलेल्या राजांस दाबांत ठेवणारा, दृढनिश्चयी, मंत्रिमंडळांत क्षुद्रांस थारा न देणारा, शिस्त मानणारा असा राजा सर्वांत श्रेष्ठ होय. कारण या गुणामुळें तो सर्वांस आपल्याकडे आकर्षून घेतो.

श्रवण करण्याची इच्छा, ती इच्छा झाल्यानंतर श्रवण, श्रवणानंतर मनांत धरणें म्हणजे ग्रहण, ग्रहण झाल्यानंतर धारणा, धारणेनंतर ज्ञान, ज्ञानातंतर चर्चा, चर्चेनंतर तत्त्वबोध, तत्त्वबोधानंतर कृतनिश्चय–हे बुद्धिचे गुण राजाच्या अंगीं असावे.

शौर्य, दुसऱ्याच्या अंगीं चांगला गुण पाहून तो आपल्या अंगीं असावा म्हणून मनांत वाटणारा मत्सरभाव, चपलता, दक्षता असे उत्साहाचे गुण राजाच्या अंगीं असावे.

वक्तृत्वशाली, ज्ञानानें प्रौढ, दांडग्या स्मरणशक्तीचा, खंबीर मनाचा, प्रतिष्ठित, सुस्वभावी, कलाभिज्ञ, संकटांस तोंड देणारा, उपकार किंवा अपकार करणारास प्रत्युपकार किंवा शासन करणारा, स्वतःचा मान कायम ठेवणारा, संकटसमयीं योग्य ते उपाय योजणारा, काल व स्थल या बाबतींत लांबवर नजर देणारा, काल, स्थल व पराक्रम पाहून अनुरूप कार्य करण्यास तयार असणारा, शत्रूशीं तह केव्हां करावा, लढाई केव्हां करावी, तह केव्हां मोडावा, लढाई केव्हां बंद करावी, दबाधरून केव्हां बसावें, तहाच्या अटी कशा व केव्हां घालाव्या व मोडाव्या, शत्रूचे दोष अथवा छिद्रें कोठें आहेत हें जाणणारा, आपली मानखंडना होऊं न देतां हळूच हास्य करणारा, भिंवया वांकड्या न करणारा किंवा वांकड्या नजरेनें न पाहणारा, काम, क्रोध, लोभ, वृथा गर्व, अस्थिरपणा, घाई, किंवा निंदकपणा यांपासून मुक्त, सस्मित मुखानें मधुर व प्रतिष्ठितपणें भाषण करणारा आणि अनुभवी माणसांच्या शिकवणीप्रमाणें वागणारा असा आत्मसंपन्न राजा असावा.

अमात्याची संपत्ति कोणती अथवा अमात्याचें पूर्णत्व कशांत असतें हें ग्रंथाच्या पूर्व भागांत दिलें आहे तें पहावें.

मध्ये चान्ते च स्थानवानात्मधारणः परधारणश्चापदि स्वारक्षः स्वाजीवः शत्रुद्वेषी शक्यसामन्तः पङ्कपाषाणोषरविषमकण्टकश्रेणीव्यालमृगाटवीहीनः कान्तः सीताखनिद्रव्यहस्तिवनवान् गव्यः पौरुषेयो गुप्तगोचरः पशुमान् अदेवमातृको वारिस्थलपथाभ्यामुपेतः सारचित्रबहुपण्यो दण्डकरसहः कर्मशीलकर्षकोऽबालिशस्वाम्यवरवर्णप्रायो भक्तशुचिमनुष्य इति जनपदसम्पत् ।

दुर्गसम्पदुक्ता पुरस्तात् । धर्माधिगतः पूर्वैः स्वयं वा हेमरूप्यप्रायश्चित्रस्थूलरत्नाहिरण्यो दीर्घामप्यापदमनायतिं सहेतेति कोशसम्पत् । पितृपैतामहो नित्यो वश्यस्तुष्टभृतपुत्रदारः प्रवासेष्वपि सम्पादितः सर्वत्राप्रतिहतो दुःखसहो बहुयुद्धः सर्वयुद्धप्रहरणविद्याविशारदः सहवृद्धिक्षयिकत्वाद्द्वैध्यः क्षत्रप्राय इति दण्डसम्पत् । पितृपैतामहं नित्यं वश्यमद्वैध्यं महल्लघुसमुत्थमिति मित्रसम्पत् ।

अराजबीजी लुब्धः क्षुद्रपरिषत्को विरक्तप्रकृतिरन्यायवृत्तिरयुक्तो व्यसनी निरुत्साहो दैवप्रमाणो यत्किञ्चनकार्यगतिरननुबन्धः क्लीबो नित्यापकारी चेत्यमित्रसम्पत् । एवंभूतो हि शत्रुः सुखः समुच्छेत्तुं भवति ।

---

ज्यांत शत्रूविरुद्ध चढाई करितां येईल किंवा स्वतःचा बचाव करतां येईल अशीं शहरें किंवा गांवें सर्वत्र आहेत, जो संकटसमयीं स्वतःचे रक्षण करावयास व स्वतःचे पोषण करावयास समर्थ आहे, शत्रूस ज्याचा दरारा वाटतो, लगत असलेल्या राजास जो दाबांत ठेवूं शकतो, ज्यांत दलदलीची, खडकाळ व बरड जमीन नाहीं, ज्यांत कांटेरी झांडाच्या किंवा झुडपांच्या रांगा अथवा विघ्न–परंपरा नाहींत, ज्यांत वाघ, रानटी जनावरें व ओसाड रानें नाहींत, जो रमणीय आहे, ज्यांत दुभतीं जनावरें आहेत, जो लागवडीस आलेला आहे, ज्यांत चोरवाटा आहेत, ज्यांत शेतीची जमीन, खनिज द्रव्यें, खाणी, हत्तींचीं व वनस्पतींचीं जंगलें आहेत; ज्यांत जलमार्ग आहेत, ज्यांत खुष्कीचे रस्ते आहेत, ज्यांत नानाप्रकारचा व्यापारी माल येतो, लष्करीबोजा व कराचा बोजा सोसावयास जो समर्थ आहे, ज्यांत उद्योगशील शेतकरी आहेत, ज्यांत मालक आणि सेवक दोघेहि संभावित आहेत आणि ज्यांत प्रजाजन राजनिष्ठ व सुवृत्त आहेत, असा देश असेल तो चांगला म्हणावा.

उत्तम किल्ल्याचे गुण कोणते हें मागें सांगण्यांत आलें आहे.

स्वतः किंवा पूर्वजांनीं धर्माचरणानें संपादन केलेलें सोन्यारुप्याचें द्रव्यभांडार ( अथवा तिजोरी ) नानाप्रकारच्या भारीं भारी रत्नांनीं व सोन्याच्या नाण्यांनीं भरलेलें आणि कितीहि दिवसांची आपत्ति असली तरी तिला जें दाद देत नाहीं असें ( भांडार ) राजाजवळ असावें.

बापापासून किंवा आज्यापासून नोकरींत असलेले, कायम असलेले, आज्ञा पाळणारे, संतोषानें बायकापोरांचा प्रतिपाळ करणारे, कितीहि प्रवास करावा लागला तरी कुरकुर न करणारे, सर्व ठिकाणीं पराक्रम गाजविणारे, कष्ट सहन करणारे, नानाप्रकारचीं युद्धें जाणणारे, सर्व प्रकारच्या शस्त्रविद्येंत तयार असलेले, भरभराटीच्या किंवा उतरत्या काळांत सहानुभूतीनें वागत आल्यामुळें राजाशीं प्रतारणा न करणारे आणि बहुतांशीं क्षत्रियाचे गुण असलेले असे शिपाई लष्करांत असले म्हणजे तें लष्कर चांगलें म्हणावें.

बापापासून किंबहुना आज्यापासून मंत्रिभावानें वागत आलेला, स्थिर, आपली मसलत मानणारा, प्रतारणा न करणारा आणि महत्वाच्या कार्याकरितां तत्काळ मदत करणारा असा मित्र असला म्हणजे तो चांगला असें समजावें.

जो क्षत्रिय वंशांत जन्मलेला नाहीं, लोभी आहे, आपल्या मित्रमंडळांत क्षुद्र माणसें ठेवितो, ज्यांवर प्रजाजन प्रेम करीत नाहींत, जो अन्यायी आहे, धर्मनिष्ठ नाहीं, व्यसनी आहे, उत्साहहीन आहे, दैवावर भरंवसा ठेवणारा आहे, धरसोडीनें व उद्देशांवांचून कांहीं तरी करितो, षंढ आहे, सदैव दुसऱ्यास अपकार करणारा आहे असा शत्रू असावा म्हणजे त्याचा समूळ नाश करतां येतो.

अरिवर्जाः प्रकृतयः सप्तैताः स्वगुणोदयाः । उक्ताः प्रत्यङ्गभूतास्ताः प्रकृता राजसम्पदः ॥
सम्पादयत्यसम्पन्नाः प्रकृतीरात्मवान् नृपः । विवृद्धाश्चानुरक्ताश्च प्रकृतीर्हन्त्यनात्मवान् ॥
ततः स दुष्टप्रकृतिश्चातुरन्तोऽप्यनात्मवान् । हन्यते वा प्रकृतिभिर्याति वा द्विषतां वशम् ॥
आत्मवांस्त्वल्पदेशोऽपि युक्तः प्रकृतिसम्पदा । नयज्ञः पृथिवीं कृत्स्नां जयत्येव न हीयते ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे मण्डलयोनौ षष्ठाधिकरणे प्रथमोऽध्यायः प्रकृतिसम्पदः, आदितः सप्तनवतितमः ॥

---

# अध्याय ९८ शमव्यायामिकम् ।



**शमव्यायामौ योगक्षेमयोर्योनिः । कर्मारम्भाणां योगाराधनो व्यायामः । कर्मफलोपभोगानां क्षेमाराधनः शमः । शमव्यायामयोर्योनिः षाड्गुण्यम् । क्षयः स्थानं वृद्धिरित्युदयास्तस्य । मानुषं नयापनयौ । दैवमयानयौ । दैवमानुषं हि कर्म लोकं यापयति । अदृष्टकारितं दैवम् । तस्मिन्निष्टेन फलेन योगोऽयः । अनिष्टेनानयः । दृष्टकारितं मानुषम् । तस्मिन् योगक्षेमनिष्पत्तिर्नयः । विपत्तिरपनयः । तच्चिन्त्यम् । अचिन्त्यं दैवमिति ।**

---

शत्रू वगळून वर वर्णन केलेल्या उत्कृष्ट गुणांनीं युक्त असे हे सात घटक साम्राज्य शरीराचे पृथक् पृथक् अवयव होत असें म्हणतात. आत्मसंपन्न अथवा धर्मनिष्ठ राजा सद्गुणरहित घटकांस समृद्ध करूं शकतो, पण आत्मबलहीन अथवा अधर्मी राजा भरभराटीस पावलेल्या व राजनिष्ठ घटकांसहि नाशाप्रत पोहोंचवितो म्हणून दुर्वर्तनी व अधर्मी राजा दिगंत पृथ्वीवर राज्य करीत असला तरी तो प्रजेकडून मारिला जातो अथवा शत्रूच्या ताब्यांत जातो.

धर्मनिष्ठ व सद्गुणसंपन्न राजा लहान देशावर राज्य करीत असला, तरी तो राजनीतिशास्त्रांत प्रवीण असल्यामुळें सर्व पृथ्वी जिंकतो आणि कधींहि पराभव पावत नाहीं.

---

## शांतता आणि उद्योग.

संपत्तीची प्राप्ति व निर्विघ्न ( अबाधित ) उपभोग शांततेपासून व उद्योगापासून उगम पावतात.

उद्योग म्हणजे आरंभिलेल्या कार्यांचें फल साध्य करण्याकरितां करावा लागणारा प्रयत्न, आणि शांतता म्हणजे कार्यफलाचा अबाधित उपभोग घेता येण्यासारखी सुस्थिति.

शांतता व उद्योग राजकारणाच्या षड्विध धोरणावर अवलंबून असतात.

उत्कर्ष, अपकर्ष व गतिराहित्य अशीं स्थितीचीं तीन स्वरूपें असतात. नीति व कुनीति या मनुष्यकृत कारणांमुळें, आणि दैव व दुर्दैव या देवकृत कारणामुळें या स्थितींत फेरबदल होत असतात. जगांतील सर्व व्यवहार मनुष्यकृत किंवा दैवकृत कारणांनीं प्रेरित असतात.

जें घडून येण्यापूर्वी समजलें जात नाहीं तें दैवकृत म्हणावें; त्यांत इष्टफळाची प्राप्ति म्हणजे सुदैव, आणि अनिष्ट फलाची प्राप्ति म्हणजे दुर्दैव.

जें घडून येण्यापूर्वी तर्कानें जाणलें जातें तें मनुष्यकृत म्हणावें. त्यांत अपेक्षित असलेल्या इष्ट फळाची प्राप्ति व त्याचा अबाधित उपभोग म्हणजे नीति असें समजावें. अनिष्ट फलाची प्राप्ति म्हणजे कुनीति असें म्हणावें. ही अनिष्ट फलप्राप्ति अगोदर समजण्यांत येते; पण दैव मात्र समजण्यांत येत नाहीं.

जो राजा सत्वगुणसंपन्न व ऐश्वर्ययुक्त असून राजनीतीचा आधारस्तंभ आहे, तो विजिगीषु अथवा विजयेच्छु म्हणावा.

राजा आत्मद्रव्यप्रकृतिसम्पन्नोनयस्याधिष्ठानं विजिगीषुः । तस्य समन्ततो मण्डलीभूता भूम्यनन्तरा अरिप्रकृतिः । तथैव भूम्येकान्तरा मित्रप्रकृतिः ।

अरिसम्पद्युक्तः सामन्तः शत्रुः । व्यसनी यातव्यः । अनपाश्रयो दुर्बलाश्रयो वोच्छेदनीयः । विपर्यये पीडनीयः कर्शनीयो वा इत्यरिविशेषाः ।

तस्मान्मित्रमरिमित्रं मित्रमित्रम् अरिमित्रमित्रं चानन्तर्येण भूमीनां प्रसज्यते पुरस्तात् । पश्चात् पार्ष्णिग्राह आक्रन्दः पार्ष्णिग्राहासार आक्रन्दासार इति ।

भूम्यनन्तरः प्रकृत्यमित्रः तुल्याभिजनः सहजः । विरुद्धो विरोधयिता वा कृत्रिमः ।

भूम्येकान्तरं प्रकृतिमित्रं मातापितृसम्बन्धं सहजं, धनजीवितहेतोराश्रितं कृत्रिममिति ।

अरिविजिगीष्वोर्भूम्यनन्तरः संहतासंहतयोरनुग्रहसमर्थो निग्रहे चासंहतयोर्मध्यमः ।

अरिविजिगीषुमध्यानां बहिः प्रकृतिभ्यो बलवत्तरः संहतासंहतानामरिविजिगीषुमध्यमानामनुग्रहे समर्थो निग्रहे चासंहतानामुदासीनः । इति प्रकृतयः ।

---

विजयेच्छु राजाच्या प्रदेशवलयास लागून असलेल्या प्रदेशाचा राजा अरि अथवा शत्रू समजावा. त्याचप्रमाणें आपल्या शत्रुप्रदेशापलीकडील व शत्रुप्रदेशास लागून असलेला राजा आपला मित्र समजावा.

स्वतःच्या प्रदेशवलयास लागून असलेला राजा बलवान असल्यास तो आपला शत्रू होतो. तो व्यसनी असेल किंवा संकटांत असेल तेव्हां त्यावर चालून जावें; आणि त्यांस कोणाचें सहाय्य नसेल, किंवा अपुरतें सहाय्य असेल, तेव्हां त्याचा मोड करून टाकावा. नाहींतर त्याचा पिच्छा पुरवून त्यांस वठणीस आणावें.

याप्रमाणें शत्रूच्या प्रकारासंबंधानें सांगितलें आहे.

विजयेच्छु राजाच्या समोर व शत्रुदेशास लागून जो राजा तो मित्र, त्यापलीकडे शत्रूचा मित्र, त्यापलीकडे ( विजयेच्छूच्या ) मित्राचा मित्र, त्यापलीकडे शत्रूच्या मित्राचा मित्र, अशी परंपरा असते.

विजयेच्छु राजाच्या पिछाडीस जो राजा तो पार्ष्णिग्राह म्हणजे पिछाडीचा शत्रू, त्यापलीकडे पिछाडीचा मित्र म्हणजे ' आक्रंद ', त्यापलीकडे ' पार्ष्णिग्राहासार ' म्हणजे पिछाडीच्या शत्रूचा मित्र, त्यापलीकडे पिछाडीच्या मित्राचा मित्र म्हणजे ' आक्रंदसार ' अशी परंपरा असते.

विजयेच्छु राजासारखाच थोर कुळांत जन्मलेला व लगतच्या देशावर राज्य करणारा राजा स्वाभाविक अथवा ' सहज ' शत्रू होय, आणि केवळ वैरभावानें वागणारा व दुसऱ्यास वैरभावानें वागावयास उत्तेजन देणारा, तो कृत्रिम अथवा अस्वाभाविक शत्रु म्हणावा.

विजयेच्छु राजाच्या आईबापांपासून मित्रभावानें राहात आलेला व त्याच्या ' सहज ' अथवा स्वाभाविक शत्रूच्या प्रदेशास लागून असलेला जो राजा तो ' सहज ' अथवा स्वाभाविक मित्र होय; आणि धन व जीवित रक्षणकरण्याकरितां ज्याचें सहाय्य घ्यावें लागतें तो ' कृत्रिम ' मित्र होय.

विजयेच्छु राजाच्या व शत्रूच्या प्रदेशास लागून असलेला जो राजा उभयता संयुक्त झाले असतां साहाय्य करावयास समर्थ असतो अथवा उभयता वियुक्त झाले असतां दडपण्यास समर्थ असतो तो ' मध्यस्थ ' राजा होय.

विजयेच्छु राजा, शत्रु राजा, व मध्यस्थ राजा यांच्या पलीकडे असलेला जो राजा सर्वांहून बलाढ्य असून विजयेच्छु, शत्रु व मध्यम संयुक्त झाले असतां किंवा वियुक्त झाले असतां साहाय्य करावयास समर्थ असतो अथवा तिघे वियुक्त झाले असतां दडपण्यास समर्थ असतो, तो ' उदासीन ' राजा होय.

वर निर्दिष्ट केलेले–बारा–राजे प्रकृति राजे अथवा मूलभूत राजे होत.

राजमंडळांत विजयेच्छु, मित्र व मित्राचा मित्र, या तीन प्रकृतिराजांचा अथवा मूलभूत राजांचा समावेश

विजिगीषुर्मित्रं मित्रमित्रं वास्य प्रकृतयास्तिस्रः । ताः पञ्चभिरमात्यजनपददुर्गकोशदण्डप्रकृतिभिरेकैकशः संयुक्ता मण्डलमष्टादशकं भवति । अनेन मण्डलपृथक्त्वं व्याख्यातम् अरिमध्यमोदासीनानाम् । एवं चतुर्मण्डलसङ्क्षेपः । द्वादश राजप्रकृतयः, षष्टिर्द्रव्यप्रकृतयः, सङ्क्षेपेण द्विसप्ततिः । तासां यथास्वं सम्पदः । शक्तिः सिद्धिश्च । बलं शक्तिः, सुखं सिद्धिः । शक्तिस्त्रिविधा–ज्ञानबलं मन्त्रशक्तिः, कोशदण्डबलं प्रभुशक्तिः विक्रमबलमुत्साहशक्तिः । एवं सिद्धिस्त्रिविधैव मन्त्रशक्तिसाध्या मन्त्रसिद्धिः, प्रभुशक्तिसाध्या प्रभुसिद्धिः, उत्साहशक्तिसाध्या उत्साहसिद्धिरिति । ताभिरभ्युच्चितो ज्यायान् भवति । अपचितो हीनः । तुल्यशक्तिः समः । तस्माच्छक्तिं सिद्धिं च घटेतात्मन्यावेशयितुम् । साधारणो वा द्रव्यप्रकृतिष्वानन्तर्येण शौचवशेन वा । दूष्यामित्राभ्यां वापकृष्टुं यतेत ।

यदि वा पश्येत्—'अमित्रो मे शक्तियुक्तो वाग्दण्डपारुष्यार्थदूषणैः प्रकृतीरुपहनिष्यति, सिद्धियुक्तो वा मृगयाद्यूतमद्यस्त्रीभिः प्रमादं गमिष्यति, स विरक्तप्रकृतिरुपक्षीणः प्रमत्तो वा साध्यो मे भविष्यति, विग्रहाभियुक्तो वा सर्वसन्दोहेनैकस्थो दुर्गस्थो वा स्थास्यति, स संहतसैन्यो मित्रदुर्गवियुक्तः साध्यो मे भविष्यति, बलवान् वा राजा परतः शत्रुमुच्छेत्तुकामस्तमुच्छिद्य न माम्-

होतो. त्यांपैकीं प्रत्येक राजाजवळ अमात्य, देश, किल्ला, तिजोरी व लष्कर अशी पांच प्रकारची राज–संपत्ति असते. म्हणून संयुक्त राजमंडलांत या अठरांचा समावेश होतो.

शत्रू, मध्यस्थ व उदासीन राजांचें निरनिराळें मंडल यावरून समजण्यांत येईल.

याप्रमाणें चार मंडलें झालीं–यांत बारा राजे, साठ प्रकारची राजसंपत्ति म्हणजे एकंदर बहात्तर प्रकारच्या तत्त्वांचा समावेश झाला असें उघड होतें.

या प्रत्येक राजास स्वतःची राज संपत्ति शक्ति आणि सिद्धी असते. शक्ति म्हणजे बल आणि सिद्धि म्हणजे सुख.

शक्ति तीन प्रकारची असतेः–बुद्धिबल किंवा मंत्रबल म्हणजे कार्याकार्य विचार करण्याची शक्ति, भरपूर तिजोरीचें व बलाढ्य सैन्याचें बल म्हणजे राजशक्ति, आणि पराक्रम व शौर्य म्हणजे उत्साहशक्ति.

याचप्रमाणें सिद्धीहि तीन प्रकरची असतेः–कार्याकार्य विचार करून पावलेली ती मंत्रसिद्धि, भरपूर तिजोरीच्या व सैन्याच्या बळावर पावलेली ती राजसिद्धि आणि पराक्रमानें व शौर्यानें पावलेली ती उत्साह सिद्धि.

ह्या तीन सिद्धी म्हणजे शक्ती व सूख ज्याजवळ प्रकर्षानें असतात तो श्रेष्ठ राजा व कमी प्रमाणांत असतात तो कनिष्ठ राजा. ज्याजवळ या शक्ती सारख्याच असतात तो समान समजावा. म्हणून राजानें आपली शक्ति व सिद्धि वृद्धिंगत करण्याचा प्रयत्न करीत असावें.

जो राजा शक्तीनें व सिद्धीनें साधारण असेल त्यानें स्वतःच्या धर्मनिष्ठतेच्या जोरावर अथवा आपल्या शत्रूशीं वैरभावानें वागणाऱ्या ( राजद्रोही ) लोकांचे किंवा शत्रूच्या शत्रूंचें साहाय्य घेऊन शत्रूवर वर्चस्व संपादन करावें, अथवा जर त्यांस असें वाटत असेल कीः—

" आपला शत्रू जरी बलाढ्य आहे तरी तो केव्हां तरी उर्मट भाषणानें किंवा कडक शासनानें किंवा उधळेपणानें आपल्या राजसंपत्तीस धक्का बसविल्यावांचून राहणार नाहीं; कांहीं दिवस सिद्धि अथवा सुख भोगील पण अखेरीस मृगया, द्यूत, मद्य व स्त्री यांच्या नादास लागून तो नाशाप्रत गेल्यावांचून राहणार नाहीं; त्यावर प्रजेचें प्रेम नाहीं, त्याच्या स्वतःच्या अंगांत बल नाहीं, अंगांत उद्धटपणा पूर्ण भरलेला आहे, म्हणून त्यास पाडावयास मला किती वेळ लागणार ? लढाईत त्यावर हल्ला केला म्हणजे तो आपल्या मंडळीसह कोठेंतरी अथवा किल्ल्यांत जाऊन बसेल. बरें त्याजवळ पुष्कळ सैन्य असेल पण त्याला मित्र नसल्यामुळें व त्याच्या राज्यांत किल्ले किंवा तटबंदींचीं शहरें नसल्यामुळें तो केव्हांतरी माझ्या तावडींत येईलच. अथवा पलीकडील राजा मोठा बलाढ्य आहे त्यांस स्वतःच्या शत्रूचा उच्छेद करावयाचा आहे; त्यानें आपल्या शत्रूवर चाल करून त्याचा

च्छिन्द्यादि' ति 'बलवता प्रार्थितस्य मे विपन्नकर्मारम्भस्य वा साहाय्यं दास्यति मध्यमलिप्सायां चे' ति, एवमादिषु कारणेष्वमित्रस्यापि शक्तिं सिद्धिं चेच्छेत् ।

नेमिमेकान्तरान् राज्ञः कृत्वा चानन्तरानरान् । नाभिमात्मानमायच्छेन्नेता प्रकृतिमण्डले ॥

मध्ये ह्युपहितः शत्रुर्नेतुर्मित्रस्य चोभयोः । उच्छेद्यः पीडनीयो वा बलवानपि जायते ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे मण्डलयोनौ षष्ठाधिकरणे द्वितीयोऽध्यायः शमव्यायामिकम्, आदितोऽष्टनवतितमः ।

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य मण्डलयोनिः षष्ठमधिकरणं समाप्तम् ।

---

उच्छेद केला म्हणजे मी त्याची विनंती करीन कीं मलाहि माझ्या शत्रूचा समाचार घ्यावयाचा आहे पण मजजवळ असावीं तितकी तयारी नाहीं, म्हणून या कामांत तूं मला मदत कर " आणि अशी विनंती केल्यानंतर तो मला मदत करील अथवा दोन राजामध्यें लढा लागला तर मला मध्यस्थी करण्याकरितां बोलाविण्यांत येईल. "

अशा कारणानें विजयेच्छूनें आपल्या शत्रूची शक्ति व ( सिद्धि अथवा ) सुख तात्पुरतें वाढलें तरी हरकत नाहीं असा विचार करावा.

विजयेच्छूचा प्रदेश हा राजमंडलाचा नाभि अथवा तुंबा; मित्राच्या पलीकडील राजांचे प्रदेश ह्या आरा आणि त्यांच्या प्रदेशांभोंवती काढिलेली रेषा ती नेमि अथवा धांव असें मानून विजयेच्छुनें मंडलांत आपल्याकडे पुढारीपण घ्यावें. विजयेच्छु राजा व त्याचा मित्र या उभयतांच्यामध्यें असलेला शत्रू उखडून टाकावयास अथवा जेरीस आणावयासच योग्य; कारण तसें न केल्यास कालांतरानें तो बलाढ्य होऊन बसेल.



# षाड्गुण्यं--सप्तममधिकरणम् ।

## अध्याय ९९ षाड्गुण्यसमुद्देशः क्षयस्थानवृद्धिनिश्चयश्च ।

षाड्गुण्यस्य प्रकृतिमण्डलं योनिः ।

सन्धिविग्रहासनयानसंश्रयद्वैधीभावाः षाड्गुण्यम् इत्याचार्याः ।

द्वैगुण्यम् इति वातव्याधिः, सन्धिविग्रहाभ्यां हि षाड्गुण्यं सम्पद्यत इति ।

षाड्गुण्यमेवैतदवस्थाभेदाद् इति कौटल्यः ।

तत्र पणबन्धः सन्धिः, अपकारो विग्रहः, उपेक्षणमासनम्, अभ्युच्चयो यानं, परार्पणं संश्रयः, सन्धिविग्रहोपादानं द्वैधीभाव इति षड् गुणाः ।

परस्माद्धीयमानः संदधीत । अभ्युच्चीयमानो विगृह्णीयात् । न मां परो नाहं परमुपहन्तुं शक्तः इत्यासीत । गुणातिशययुक्तो यायात् । शक्तिहीनः संश्रयेत । सहायसाध्ये कार्ये द्वैधीभावं गच्छेत् ।

इति गुणावस्थापनम् ।

तेषां यस्मिन् वा गुणे स्थितः पश्येत् 'इहस्थः शक्ष्यामि दुर्गसेतुकर्मवणिक्पथशून्यनिवेशखनिद्रव्यहस्तिवनकर्माण्यात्मनः प्रवर्तयितुं परस्य चैतानि कर्माण्युपहन्तुम्' इतितमातिष्ठेत्, सा वृद्धिः ।

---

### अधिकरण ७ वें. षड्विध ( सहाप्रकारचें ) धोरण.

#### षड्विध ( सहाप्रकारच्या ) धोरणाचा उद्देश; उत्कर्ष, अपकर्ष व गतिराहित्य

षड्विध ( सहाप्रकारच्या ) राजनीतीच्या धोरणाची उत्पति राजमंडलांत होत असते.

तह, लढाई, तटस्थपणा, लष्करी हालचाल, दोस्ती आणि एकाशीं मैत्री व दुसऱ्याशीं लढाई—अशी सहाप्रकारचीं राजनीतीचीं धोरणें असतात असें आमच्या गुरूचें मत आहे.

वातव्याधि असें म्हणतो कीं, सहाप्रकारचीं धोरणें वस्तुतः तह व लढाई यांपासून उद्भवतात म्हणून तह व लढाई अशीं दोनच धोरणें खरीं होत.

पण कौटिल्य म्हणतो—" धोरणें सहाप्रकारचींच आहेत कारण तीं भिन्न भिन्न परिस्थितीमुळें उद्भवतात.

राजमीतीचे षड्विध प्रकार असे—अटी घालून केलेला सलोखा म्हणजे तह; शत्रूवर चढाई म्हणजे लढाई, उदासीनवृत्ति म्हणजे तटस्थपणा, युद्धाची तयारी म्हणजे लष्करी हालचाल, दुसऱ्याचा आश्रय घेणें म्हणजे दोस्ती, एकाशीं मैत्री व दुसऱ्याशीं लढाई म्हणजे दुटप्पी धोरण अथवा द्वैधीभाव.

जो दुसऱ्याहून कनिष्ठ असेल त्यानें दुसऱ्याशीं सलोखा करावा, जो श्रेष्ठ असेल त्यानें चढाई करावी, दुसरा मला मारावयास समर्थ नाहीं व मी दुसऱ्यास मारावयास समर्थ नाहीं असें असेल तेव्हां तटस्थपणा स्वीकारावा. ज्याची जय्यत तयारी असेल त्यानें चाल करावी, ज्यांस शक्ती नाहीं त्यानें दोस्ती करावी, मदतीवांचून इष्ट हेतु साध्य व्हावयाचा नाहीं, असें वाटत असेल तेव्हां एकाशीं तह करावा व दुसऱ्याशीं लढाई करावी असें दुहेरी धोरण संभाळावें.

याप्रमाणें सहाप्रकारचीं धोरणें निश्चित झालीं आहेत.

वर निर्दिष्ट केलेल्या धोरणांपैकीं ज्या धोरणानें आपणांस अमुक अमुक ठिकाणीं किल्ले, सेतु, व्यापारी रस्ते वगैरे तयार करितां येतील, नवीन वसाहत किंवा खाणी सुरू करतां येतील, अथवा लांकडांचीं किंवा हत्तींचीं जंगलें करितां येतील, अथवा शत्रूच्या संदरबाबी उध्वस्त करितां येतील, तें धोरण सुज्ञ राजानें स्वीकारिलें असतां तो उत्कर्षास चढेल.

'आशुतरा मे वृद्धिर्भूयस्तरा वृद्ध्युदयतरा वा भविष्यति विपरीता परस्य' इति ज्ञात्वा परवृद्धिमुपेक्षेत। तुल्यकालफलोदयायां वृद्धौ सन्धिमुपेयात्।

यस्मिन् वा गुणे स्थितः स्वकर्मणामुपघातं पश्येन्नेतरस्य तस्मिन्न तिष्ठेद्, एषः क्षयः।
चिरतरेणाल्पतरं वृद्ध्युदयतरं वा क्षेष्ये, विपरीतं परः इति ज्ञात्वा क्षयमुपेक्षेत।
तुल्यकालफलोदये वा क्षये सन्धिमुपेयात्।
यस्मिन् वा गुणे स्थितः स्वकर्मवृद्धिं क्षयं वा नाभिपश्येदेतत् स्थानम्।
ह्रस्वतरं वृद्ध्युदयतरं वा स्थास्यामि विपरीतं पर इति ज्ञात्वा स्थानमुपेक्षेत।
तुल्यकालफलोदये वा स्थाने सन्धिमुपेयाद् इत्याचार्याः। नैतद् विभाषितम् इति कौटल्यः।

यदि वा पश्येत्—'सन्धौ स्थितो महाफलैः स्वकर्मभिः परकर्माण्युपहनिष्यामि, महाफलानि वा स्वकर्माण्युपभोक्ष्ये, परकर्माणि वा, सन्धिविश्वासेन वा योगोपनिषत्प्रणिधिभिः परकर्माण्युपहनिष्यामि, सुखं वा सानुग्रहपरिहारसौकर्यं फललाभभूयस्त्वेन स्वकर्मणां परकर्मयोगावहं जनमास्रावयिष्यामि, बलिनातिमात्रेण वा संहितः परः स्वकर्मोपघातं प्राप्स्यति, येन वा विगृहीतो मया सन्धत्ते

---

शत्रूपेक्षां आपला उत्कर्ष झपाट्यानें, अधिक प्रमाणांत किंवा अधिक लाभदायक होत आहे व शत्रूचा तसा होत नाहीं, असें वाटत असेल, तेव्हां शत्रूच्या तात्पुरत्या उत्कर्षाकडे दुर्लक्ष करावें.

इष्ट फलाची प्राप्ती व्हावयास शत्रूला व स्वतःला सारखाच वेळ लागण्याचा संभव आहे असें वाटेल तेव्हां तह करावा.

ज्या धोरणानें स्वतःच्या कार्यांत बिघाड येण्याचा संभव आहे व शत्रूच्या कार्यांत बिघाड येणार नाहीं, तें धोरण शहाण्या राजानें स्वीकारितां कामा नये, हा अपकर्ष होय.

कालांतरानें शत्रूच्या मानानें स्वतःला लाभापेक्षां हानिच अधिक भोगण्याचा प्रसंग येईल असें वाटत असेल तेव्हां स्वतःच्या तात्पुरत्या अपकर्षाकडे दुर्लक्ष करावें.

शत्रूचा व स्वतःचा सारखाच अपकर्ष चाललेला असून उभयतांसहि इष्ट फलाची प्राप्ती व्हावयास सारखाच वेळ लागण्याचा संभव आहे, असें वाटेल, तेव्हां तह करावा.

ज्या स्थितींत उत्कर्ष किंवा अपकर्ष दिसून येत नाहीं तिला गतिराहित्य म्हणावें.

माझें गतिराहित्य फार दिवस टिकणार नाहीं व कालांतरानें शत्रूपेक्षां मी अधिक उत्कर्ष पावेन, असें वाटत असेल तेव्हां तात्पुरत्या गतिराहित्याकडे दुर्लक्ष करावें.

शत्रूचें व स्वतःचें गतिराहित्य सारखेंच असून उभयतांसहि इष्ट फलाची प्राप्ती व्हावयास सारखाच वेळ लागण्याचा संभव आहे, असें वाटत असेल, तेव्हां तह करावा, असें आमच्या गुरूंचें मत आहे; कौटिल्य म्हणतो "हें सांगावयालाच नको."

जर त्यांस असें वाटत असेल कीं—"तहाच्या अटींचा फायदा घेऊन मी आपल्या राज्यांत मोठमोठीं फलोत्पादक कामें काढीन व शत्रूंच्या कामांचा विध्वंस करीन, अथवा स्वतःच्या राज्यांतील संस्थांची फळें, तशींच शत्रु–राज्यांतील फळें मीच उपभोगीन, अथवा तहावर विसंबून गुप्त हेरांच्या साहाय्यानें व गुप्त खलबतानें शत्रु-कार्यांचा नायनाट करीन, अथवा मी आपल्या राज्यांतील प्रजाजनांच्या सुख–सोयींकडे विशेष लक्ष पुरवीन, त्यांस इनामें देईन, सारा माफ करीन, थोडक्या श्रमांत त्यांस पुष्कळ नफा होईल अशी तजवीज करीन, आणि अशा रीतीनें शत्रूच्या राज्यांतील प्रजाजनांचा ओघ स्वतःच्या राज्याकडे वळवून त्याचें राज्य ओस पाडीन, अथवा शत्रूला अतिशय बलाढ्य राजाबरोबर तह करणें भाग पडल्यामुळें, त्याच्या कार्यांचा बिघाड होईल, अथवा शत्रूनें त्यांवर लढाई पुकारली म्हणजे तो मजबरोबर तह करील आणि मी ती लढाई शक्य तितकी लांबविण्याचें धोरण ठेवीन, अथवा माझा

तेन अस्य विग्रहं दीर्घं करिष्यामि, मया वा संहितस्य मद्द्वेषिणो जनपदं पीडयिष्यति, परोपहतो वास्य जनपदो मामागमिष्यति ततः कर्मसु वृद्धिं प्राप्स्यामि, विपन्नकर्मारम्भो वा विषमस्थः परः कर्मसु न मे विक्रमेत परतः प्रवृत्तकर्मारम्भो वा ताभ्यां संहितः कर्मसु वृद्धिं प्राप्स्यामि, शत्रुप्रतिबद्धं वा शत्रुणा सन्धिं कृत्वा मण्डलं भेत्स्यामि, भिन्नमवाप्स्यामि, दण्डानुग्रहेण वा शत्रुमुपगृह्य मण्डललिप्सायां विद्वेषं ग्राहयिष्यामि, विद्विष्टं तेनैव घातयिष्यामि' इति सन्धिना वृद्धिमातिष्ठेत्।

यदि वा पश्येत्—'आयुधीयप्रायः श्रेणीप्रायो वा मे जनपदः शैलवननदीदुर्गैकद्वारा रक्षो वा शक्ष्यति पराभियोगं प्रतिहन्तुमिति, व्यसनपीडोपहतोत्साहो वा परः संप्राप्तकर्मोपघातकाल इति; विगृहीतस्यान्यतो वा शक्ष्यामि जानपदमपवाहयितुम्' इति विग्रहे स्थितो वृद्धिमातिष्ठेत्।

यदि वा मन्येत—'न मे शक्तः परः कर्माण्युपहन्तु, नाहं तस्य कर्मोपघाती वा, व्यसनमस्य, श्ववराहयोरिव कलहे वा स्वकर्मानुष्ठानपरो वा वर्धिष्ये' इत्यासनेन वृद्धिमातिष्ठेत्।

यदि वा मन्येत—'यानसाध्यः कर्मोपघातः शत्रोः, प्रतिविहितस्वकर्मारक्षश्चास्मि' इति यानेन वृद्धिमातिष्ठेत्।

---

व शत्रूचा तह घडवून आणून माझ्या दुसऱ्या शत्रूचा देश जेरीस आणीन, अथवा माझ्या शत्रूच्या देशावर त्याच्या शत्रूनें उपद्रव चालविल्यामुळें, त्याच्या राज्यांतील लोक आपोआपच माझ्या राज्यांत रहावयास येतील आणि मग माझीं कार्यें अर्थातच भरभराटींत येतील, अथवा माझ्या शत्रूच्या यच्चयावत् कार्यांचा नाश झाला असल्यामुळें तो सांप्रत अडचणींत आहे म्हणून त्यास मजवर पराक्रम गाजविण्याचें सामर्थ्य नाहीं, अथवा पलीकडील मित्र राजांशीं सलोखा करून त्यांनीं आरंभिलेल्या कार्यांच्या धोरणानें मी आपल्या राज्यांतील कामें उत्कर्षास नेईन, अथवा शत्रूनें मंडल ( मित्र मंडल ) स्थापन केलें आहे, तरी त्यांत भेद पाडून त्यांमधील कांहींशीं सलोखा करीन, अथवा शत्रूस धाकदपटशानें अथवा स्नेहभावानें आपल्या ताब्यांत आणून स्वतःचें मंडल तयार करीन आणि त्याच्यांत व इतर राजांत वैर उत्पन्न करीन, किंवा इतरांकरवीं द्वेषाच्या भरांत त्यास ठार करवीन" असें वाटत असेल तर राजानें तह करून उत्कर्ष करून घ्यावा.

आपल्या राज्यांत लढवय्ये लोक व लोकांची पथकें हवीं तितकीं आहेत व मोठमोठे पर्वत, जंगलें, नद्या, एकच दार असलेले तटबंदी किल्ले किंवा शहरें वगैरे बचावाचीं साधनें इतकीं आहेत कीं शत्रूचा हल्ला सहज परतवितां येईल, अथवा मी आपल्या दुर्भेद्य किल्ल्यांत आश्रय घेऊन शत्रूचा सप्पा उडवीन, अथवा शत्रूच्या राज्यांत धामधूम चालल्यामुळें त्याचा उत्साह अगोदरच भग्न झाला आहे म्हणून त्याचा विध्वंस लवकरच होण्याचा संभव आहे, अथवा त्याच्या दुसऱ्या शत्रूनें त्यांवर हल्ला केला म्हणजे त्याच्या प्रजाजनांस आपल्या राज्यांत आश्रय घ्यावयास उत्तेजन देईन—असें वाटत असेल तर त्यानें उघड उघड वैर म्हणजे लढाई पुकारावी.

शत्रू माझें कांहीं बिघडवूं शकत नाहीं व मलाहि त्याचें नुकसान करण्याची ताकद नाहीं, आणि जर कदाचित् मी याच्याशीं भांडलों तर कुत्र्याडुकरांच्या लढाईंत जसा तिसऱ्यांचा लाभ तसा यांतहि तिसऱ्यांचा लाभ होईल, पण त्यापेक्षां मी आपला कारभार चोख करून अधिक उत्कर्ष पावेन असें जर वाटत असेल, तर तटस्थवृत्ति धारण करून स्वतःचा उत्कर्ष साधावा.

स्वतःचें संरक्षण करण्याकरितां आपण जय्यत तयारी करून ठेविली आहे व शत्रूवर हल्ला केल्यास त्याचा नाश आपण करूं शकूं असें वाटत असेल तेव्हां लष्करी हालचाल करून उत्कर्ष साधावा.

यदि वा मन्येत—'नास्मि शक्तः परकर्माण्युपहन्तुं, स्वकर्मोपघातं वा त्रातुम्, इति बलवन्तमाश्रितः स्वकर्मानुष्ठानेन क्षयात् स्थानं स्थानाद्वृद्धिं चाकाङ्क्षेत ।

यदि वा मन्येत—'सन्धिनैकतः स्वकर्माणि प्रवर्तयिष्यामि विग्रहेणैकतः परकर्माण्युपहनिष्यामि' इति द्वैधीभावेन वृद्धिमातिष्ठेत् ।

एवं षड्भिर्गुणैरेतैः स्थितः प्रकृतिमण्डले । पर्येषेत क्षयात् स्थानं स्थानाद् वृद्धिं च कर्मसु ।

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे प्रथमोऽध्यायः षाड्गुण्यसमुद्देशः क्षयस्थानवृद्धिनिश्चयश्च, आदितो नवनवतितमः ।

---

# अध्याय १०० संश्रयवृत्तिः ।

सन्धिविग्रहयोस्तुल्यायां वृद्धौ सन्धिमुपेयात् । विग्रहे हि क्षयव्ययप्रवासप्रत्यवाया भवन्ति । तेनासनयानयोरासनं व्याख्यातम् ।

द्वैधीभावसंश्रययोर्द्वैधीभावं गच्छेत् । द्वैधीभूतो हि स्वकर्मप्रधान आत्मन एवोपकरोति । संश्रितस्तु परस्योपकरोति, नात्मनः ।

यद्बलः सामन्तः तद्विशिष्टबलमाश्रयेत । तद्विशिष्टबलाभावे तमेवाश्रितः कोशदण्डभूमीनामन्यतमेनास्योपकर्तुमदृष्टः प्रयतेत । महादोषो हि विशिष्टसमागमो राज्ञामन्यत्रारिविगृहीतात् । अशक्ये दण्डोपनतवद् वर्तेत ।

---

शत्रूवर हल्ला करून त्याचा नाश आपण करूं शकणार नाहीं व स्वतःचें संरक्षणहि करूं शकणार नाहीं असें वाटत असेल तेव्हां बलाढ्याचा आश्रय करून अपकर्षापासून स्वस्थानाप्रत म्हणजे गतिराहित्याप्रत व तेथून उत्कर्षाप्रत पोहोंचून अभिवृद्धि करून घ्यावी.

एकाशीं सलोखा करून स्वतःची अभिवृद्धि करितां येईल व त्याचवेळीं दुसऱ्याशीं लढाई पुकारून शत्रूचा नाश करितां येईल असें वाटत असेल तेव्हां द्वैधीभाव अथवा दुहेरी धोरण पत्करून उत्कर्ष करून घ्यावा.

अशा प्रकारचें षड्विध अथवा सहाप्रकारचें राजनीतिचें धोरण अवलंबून राजानें राजमंडलांत हळूहळू अपकर्षापासून सुरक्षितता व सुरक्षिततेपासून उत्कर्ष अशी मजल गांठावी.

## आश्रय घेऊन राहाणें

सन्धि म्हणजे सलोखा आणि विग्रह म्हणजे लढाई या दोहोंपासून नफा नुकसान सारखेंच असें असेल तेव्हां सलोखाच पत्करावा. कारण लढाईमुळें सैन्याचा, पैशाचा नाश होतो, मोहिमेची दगदग पडते आणि इतर विघ्नेंहि उपस्थित होतात. याच न्यायानें तटस्थपणा व स्वारी, यांत तटस्थपणा पत्करावा, हें वरील विवेचनावरून उघड होतें.

दुहेरी धोरण आणि दोस्ती यांत दुहेरी धोरण (म्हणजे एकाशीं सलोखा व दुसऱ्याशीं वैर) पत्करावें. कारण राजानें दुहेरी धोरण पत्करलें म्हणजे तो स्वकार्यांत तत्पर राहून स्वतःचाच फायदा करितो, परंतु दुसऱ्याची दोस्ती अथवा आश्रय केला म्हणजे त्यांत स्वतःचा कांहीं फायदा न होतां दुसऱ्याचा मात्र फायदा होतो.

दुर्बळ राजानें आपल्या शेजाऱ्याहून (शत्रूहून) अधिक बलाढ्य राजाचा आश्रय करावा. तसा राजा न आढळेल तर शेजाऱ्यांशींच सलोखा करावा व त्यांस गुपचुप द्रव्य किंवा सैन्य किंवा प्रांत पुरवून संतुष्ट राखावें. कारण शत्रूनें प्रत्यक्ष कैद केलें नसतांना एखाद्या राजाच्या आश्रयाला जाऊन राहाणें हें राजाला लांच्छन आहे. योग्य संधि येईपर्यंत शरण गेलेल्या माणसाप्रमाणें पण इतर रीतीनें राहाणें अशक्य झाल्यास त्याचा आश्रय घेऊन राहावें.

यदा चास्य प्राणहरं व्याधिमन्तःकोपं शत्रुवृद्धिं मित्रव्यसनमुपस्थितं वा तन्निमित्तामात्मनश्च वृद्धिं पश्येत्, तदा सम्भाव्यव्याधिधर्मकार्यापदेशेनापयायात् स्वविषयस्थो वा नोपगच्छेत्। आसन्नो वास्य छिद्रेषु प्रहरेत्।

बलीयसोर्वा मध्यगतस्त्राणसमर्थमाश्रयेत्। यस्य वानन्तर्धिः स्यात्। उभौ वा। कपालसंश्रयस्तिष्ठेत्। मूलहरमितरस्येतरमपदिशन् भेदमुभयोर्वा परस्परापदेशं प्रयुञ्जीत। भिन्नयोरुपांशुदण्डम्। पार्श्वस्थो वा बलस्थयोरासन्नभयात् प्रतिकुर्वीत। दुर्गापाश्रयो वा द्वैधीभूतस्तिष्ठेत्। सन्धिविग्रहक्रमहेतुभिर्वा चेष्टेत। दूष्यामित्राटविकानुभयोरुपगृह्णीयात्। एतयोरन्यतरं गच्छंस्तैरेवान्यतरस्य व्यसने प्रहरेत्। द्वाभ्यामुपहितो वा मण्डलापाश्रयस्तिष्ठेत् मध्यममुदासीनं वा संश्रयेत। तेन सहैकमुपगृह्येतरमुच्छिन्द्यादुभौ वा। द्वाभ्यामुच्छिन्नो वा मध्यमोदासीनयोस्तत्पक्षीयाणां वा राज्ञां न्यायवृत्तिमाश्रयेत। तुल्यानां वा यस्य प्रकृतयः सख्येयुरेनं, यत्रस्थो वा शक्नुयादात्मानमुद्धर्तुं, यत्र पूर्वपुरुषोचितागतिरासन्नः सम्बन्धो वा मित्राणि भूयांसीति शक्तिमन्ति वा भवेयुः।

प्रियो यस्य भवेद् यो वाप्रियोऽस्य कतरस्तयोः। प्रियो यस्य स तं गच्छेदित्याश्रयगतिः परा ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे द्वितीयोऽध्यायः संश्रयवृत्तिः, आदितः शततमः ॥

---

ज्याचा आश्रय घेतला त्यांस प्राणघातक रोग जडला आहे, त्याच्या राज्यांतील प्रजाजन खवळलेले आहेत, त्यांस अनेक शत्रू उत्पन्न झाले आहेत, त्याच्या मित्रावर संकट आलें आहे असें दिसून येतांच आपल्या उत्कर्षाचा समय समीप आला आहे असें समजावें आणि शत्रूवरील संकट निवारण करण्याकरितां धर्मकृत्याचें मिष करून तेथून निघून यावें. आपल्याच देशांत वास्तव्य असेल तर त्यास भेटावयास जाऊं नये अथवा त्यांस भेटावयास जाऊन सन्निध राहून संधि साधून त्यांजवर घाला घालावा.

दोन बलाढ्य राजांमध्यें असलेल्या राजानें जो आपलें संरक्षण करावयास समर्थ असेल त्या राजाशीं दोस्ती करावी अथवा त्याचा आश्रय करावा, अथवा दोघांत ज्याच्या राज्यांत धनधान्य समृद्धि असेल त्याचा आश्रय करावा. अथवा दोघांबरोबरहि सारख्या अटीवर दोस्ती करावी. तदनंतर अमुक राजा अमक्याचें राज्य हरण करण्याच्या विचारांत आहे असें त्या उभयतांत परस्परांविरुद्ध चिथवून त्यांच्यांत वैर उत्पन्न करावें. आणि त्यांमध्यें वांकडे आल्यानंतर गुप्त मसलत करून प्रत्येकाचा समाचार घ्यावा. अथवा दुसऱ्या दोन बलाढ्य राजांचा आश्रय संपादन करून जवळील शत्रूंपासून आपला बचाव करावा. किंवा किल्ल्यांतील एखाद्या सरदाराशीं मैत्री करून एकाशीं सलोखा व दुसऱ्याशीं वैर पत्करावें. अथवा सलोख्यांत व वैरांत परिस्थित्यनुरूप धोरण ठेवावें. अथवा दोघांच्या देशांतील राजद्रोही लोक, वैरी आणि रानटी बंडखोर असतील त्यांची मैत्री संपादन करावी व त्या दोघांपैकीं एकाशीं मैत्री दाखवून यांच्याच सहाय्यानें शत्रु संकटांत आहे असें पाहून त्याचा समाचार घ्यावा. अथवा दोघांशीं मैत्री करून राजमंडल स्थापन करावें किंवा मध्यम राजाचा किंवा उदासीन राजाचा आश्रय करावा व त्याची मदत घेऊन एकाशीं सलोखा करून दुसऱ्याचा उच्छेद करावा, अथवा दोघांचाहि नाश करावा. दोन्ही राजांनीं त्यास जेरीस आणिलें असेल तेव्हां मध्यम, उदासीन व त्यांच्या गोटांतील राजे, यांपैकीं जो राजा न्यायनिष्ठ व धर्मनिष्ठ असेल त्याचा आश्रय करावा. अथवा समान दर्जाच्या राजांत ज्याचे प्रजाजन आपल्या योगक्षेमाची काळजी घेतील किंवा ज्याच्या प्रदेशांत राहून आपणा स्वतःला पुन्हां वर आणितां येईल किंवा ज्याच्या प्रदेशांत आपल्या पूर्वजांचे परिचित लोक असतील, किंवा ज्याच्या प्रदेशांत आपला जवळचा नातलग असेल किंवा बरेच बलाढ्य मित्र असतील त्या राजाच्या आश्रयाखालीं रहावें.

दोन राजांत परस्पर स्नेहसंबंध असेल, तेव्हां दोहोंपैकीं जो राजा आपल्यास प्रिय असेल व जो आपल्यावर प्रेम करीत असेल त्याचा आश्रय करावा, हीच सर्वांत उत्तम दोस्ती होय.

# अध्याय १०१ समहीनज्यायसां गुणाभिनिवेशः हीनसन्धयश्च ।

विजिगीषुः शक्त्यपेक्षः षाड्गुण्यमुपयुञ्जीत । समज्यायोभ्यां सन्धीयेत । हीनेन विगृह्णीयात् । विगृहीतो हि ज्यायसा हस्तिना पादयुद्धमिवाभ्युपैति । समेन चामपात्रमामेनाहतमिवोभयतः क्षयं करोति । कुम्भेनेवाश्मा हीनेनैकान्तसिद्धिमवाप्नोति ।

ज्यायांश्चेन्न सन्धिमिच्छेत्, दण्डोपनत वृत्तमाबलीयसं वा योगमातिष्ठेत् ।

समश्चेन्न सन्धिमिच्छेत्, यावन्मात्रमपकुर्यात् तावन्मात्रमस्य प्रत्यपकुर्यात् । तेजो हि सन्धानकारणं, नातप्तं लोहं लोहेन सन्धत्त इति ।

हीनश्चेत् सर्वत्रानुप्रणतस्तिष्ठेत् सन्धिमुपेयात् । आरण्योऽग्निरिव हि दुःखामर्षजं तेजो विक्रमयति । मण्डलस्य चानुग्राह्यो भवति ।

संहितश्चेत् 'परप्रकृतयो लुब्धक्षीणापचरिताः प्रत्यादानभयाद् वा नोपगच्छन्ति' इति पश्येद्धीनोऽपि विगृह्णीयात् ।

विगृहीतश्चेत् 'प्रकृतयो लुब्धक्षीणापचरिताः विग्रहोद्विग्ना वा मां नोपगच्छन्ति' इति पश्येत्, ज्यायानपि सन्धीयेत, विग्रहोद्वेगं वा शमयेत् । व्यसनयौगपद्ये गुरुव्यसनोऽस्मि, लघुव्यसनः परः सुखेन प्रतिकृत्य व्यसनमात्मनोऽभियुञ्ज्यात्' इति पश्येत्, ज्यायानपि सन्धीयेत ।

---

## समान, कनिष्ठ व वरिष्ठ राजे यांचे गुण व कनिष्ठानें करावयाचा सलोखा.

विजयेच्छु राजास आपली शक्ति वृद्धिंगत करावयाची असल्यास त्यानें षड्विध धोरण प्रसंगानुसार अनुसरलें पाहिजे. समान किंवा वरिष्ठ दर्जाच्या राजाशीं सलोखा करावा आणि कनिष्ठ दर्जाच्या राजाशीं शत्रुत्व करावें. वरिष्ठाशीं वैर करणें म्हणजे पादचारी माणसानें हत्तीशीं लढाई करण्यासारखें आहे. समान राजाशीं वैर करणें हें दोन कच्ची मडकीं एकमेकांवर आपटण्यासारखें असून त्यांत उभतांचाहि नाश होतो. बलिष्ठानें कनिष्ठाशीं लढाई करणें हें दगड मडक्यावर आपटण्यासारखें आहे. त्यांत बलिष्ठ राजाला जय हा ठेविलेलाच आहे.

वरिष्ठ राजा सलोखा करूं इच्छित नसेल तेव्हां कनिष्ठ राजानें पराजित राजाची वृत्ति धारण करावी, अथवा ( अधिकरण १२ त सांगितल्याप्रमाणें ) नम्र होऊन तदनुसार आचरण करावें.

समान राजा सलोखा करूं इच्छित नसेल तर त्यानें जितका अपकार केला असेल, तितक्याचें उसनें फेडल्यावांचून कधीं राहूं नये. कारण सलोखा केवळ तेजामुळेंच घडून येतो; बिनतापवलेल्या लोखंडाचा तुकडा दुसऱ्या लोखंडी तुकड्यांशीं कधीं सांधला जात नाहीं.

कनिष्ठ राजा जेव्हां सर्वथैव नमला जाऊन शरण आला असेल तेव्हां त्याशीं सलोखा करावा. कारण मानहानीच्या दुःखापासून उत्पन्न झालेला अग्नि रानांतील वणव्याप्रमाणें आपला प्रभाव दाखविल्यावांचून राहणार नाहीं, आणि राजमंडलांतील राजेहि त्यांस सहानुभूति दाखविल्यावांचून राहणार नाहींत.

ज्या कनिष्ठराजानें दुसऱ्या राजाशीं सलोखा केला असेल त्यांस जर असें दिसून येईल कीं, " शत्रूचे प्रजाजन लोभी आहेत, अन्नास मोताद झालेले आहेत व जुलमानें गांजलेले आहेत, पण केवळ राजाच्या धाकानें माझ्या राज्यांत रहावयास येत नाहींत, ' तेव्हां त्यानें आपला कनिष्ठपणा मनांत न आणितां खुशाल वैर पत्करावें.

एका राजाचें दुसऱ्या राजाशीं वैर अथवा युद्ध जुंपलें असतां त्यांस जर असें दिसून येईल कीं, " शत्रूचे प्रजाजन लोभी असून, अन्नान्नदशेला पोचले असून, अथवा जुलमामुळें व्याकुल झालेले असून आणि लढाईच्या धामधुमीमुळें वैतागलेले असून सुद्धां आपल्या बाजूस येत नाहींत " तेव्हां त्यानें आपला वरिष्ठपणा मनांत न आणितां सलोखा करावा, अथवा शक्य तितकी लढाईची धामधूम बंद करावी. परस्परांशीं युद्ध करणाऱ्या उभयतां राजांस

सन्धिविग्रहयोश्चेत् परकर्शनमात्मोपचयं वा नाभिपश्येत्, ज्यायानप्यासीत ।

परव्यसनमप्रतिकार्यं चेत् पश्येत्, हीनोऽप्यभियायात् । अप्रतिकार्यासन्नव्यसनो वा ज्यायानपि संश्रयेत ।

सन्धिनैकतो विग्रहेणैकतश्चेत् कार्यसिद्धिं पश्येत्, ज्यायानपि द्वैधीभूतस्तिष्ठेदिति ।

एवं समस्य षाड्गुण्योपयोगः । तत्र तु प्रतिविशेषः--

प्रवृत्तचक्रेणाक्रान्तो राज्ञा बलवताबलः । सन्धिनोपनमेत् तूर्णं कोशदण्डात्मभूमिभिः ।

स्वयं सङ्ख्यातदण्डेन दण्डस्य विभवेन वा । उपस्थातव्यमित्येष सन्धिरात्मामिषो मतः ।

सेनापतिकुमाराभ्यामुपस्थातव्यमित्ययम् । पुरुषान्तरसन्धिः स्यान्नात्मनेत्यात्मरक्षणः ।

एकेनान्यत्र यातव्यं स्वयं दण्डेन वेत्ययम् । अदृष्टपुरुषः सन्धिर्दण्डमुख्यात्मरक्षणः ।

---

सारख्याच अडचणी असतील, पण त्यांतल्यात्यांत एका राजास असें दिसून येईल कीं, " आपल्याला अडचणी फार आहेत, शत्रूस थोड्या आहेत, त्यामुळें शत्रू आपल्या अडचणी दूर करून मजबरोबर लढावयास सहज तयार होऊं शकेल " तर त्या राजानें आपला वरिष्ठपणा मिरवीत न बसतां सलोखा करावा.

सलोखा अगर वैर केल्यानें शत्रूची हानि व स्वतःचा लाभ साधत नाहीं असें जेव्हां दिसून येईल तेव्हां वरिष्ठ राजानें तटस्थपणा धरावा.

शत्रू संकटांत गुरफटलेला असून त्यांतून निघणें त्यांस दुरापास्त आहे असें जेव्हां दिसून येईल, तेव्हां कनिष्ठ राजानें शत्रूवर स्वारी करावी.

दुर्निवार संकट येऊन ठेपलें असतां राजा वरिष्ठ असला, तरी त्यानें दुसऱ्याचा आश्रय घ्यावा म्हणजे त्याशीं दोस्ती करावी.

एकाशीं तह व दुसऱ्याशीं वैर पुकारलें असतां आपला कार्यभाग सिद्धीस जाईल, असें जेव्हां दिसून येईल तेव्हां वरिष्ठ राजानें सुद्धां असें दुहेरी धोरण अंगीकारावें.

अशारीतीनें एकंदर षड्विध धोरणांची योजना सांगितली आहे. त्यांची विशेष योजना परिस्थित्यनुरूप करावयाची ती पुढील नियमांप्रमाणें करावी:—

" एखाद्या बलाढ्य राजानें राजमंडलाचें पुढारीपण स्वीकारून जर दुर्बळ राजावर स्वारी केली तर दुर्बळ राजानें त्यास द्रव्य, सैन्य आणि एखादा प्रांत देण्याचें कबूल करून त्याबरोबर तह करावा.

" इतकें ठराविक सैन्य अथवा माझें सगळें सैन्यबल घेऊन मी स्वतः आपल्या कार्यप्रसंगीं हजर होत जाईन " या अटीवर झालेली दोस्ती म्हणजे " आत्मामिष " संधि होय.

" सेनापती व राजकुमार या दोघांनीं हजर रहावें या अटीवर झालेला तह तो " पुरुषांतरसंधि " होय–म्हणजे अन्य पुरुष ओलीस ठेऊन केलेला तह होय. या तहानें राजास स्वतः हजर रहाण्याचें कारण नसतें म्हणून हा स्वतःचें रक्षण करणारा तह होय.

" सैन्यावरील कोणातरी अधिकाऱ्यानें एकीकडे मदतीस जावें किंवा दुसऱ्या माणसानें किंवा मुसत्या सैन्यावरील अधिकाऱ्यानीं अमुक ठिकाणीं स्वारीवर जावें " या अटीवर झालेला तह तो " अदृष्ट पुरुष संधि" म्हणावा–म्हणजें विवक्षितच पुरुष गेला पाहिंजे अशी अट नसलेला हा तह होय. या तहानें राजा व सैन्यावरील अधिकारी यांस सुरक्षितता येते.

मुख्यस्त्रीबन्धनं कुर्यात् पूर्वयोः पश्चिमे त्वरिम् । साधयेद्गूढमित्येते दण्डोपनतसन्धयः ।
कोशदानेन शेषाणां प्रकृतीनां विमोक्षणम् । परिक्रयो भवेत् सन्धिः स एव च यथासुखम् ।
स्कन्धोपनेयो बहुधा ज्ञेयः सन्धिरुपग्रहः । निरुद्धो देशकालाभ्यामत्ययः स्यादुपग्रहः ।
विषह्यदानादायत्यां क्षमः स्त्रीबन्धनादपि । सुवर्णसन्धिर्विश्वासादेकीभावगतो भवेत् ।
विपरीतः कपालः स्यादत्यादानादभाषितः । पूर्वयोः प्रणयेत् कुप्यं हस्त्यश्वं वा गरान्वितम् ।
तृतीये प्रणयेदर्थं कथयन् कर्मणां क्षयम् । तिष्ठेच्चतुर्थे इत्येते कोशोपनतसन्धयः ।
भूम्येकदेशत्यागेन देशप्रकृतिरक्षणम् । आदिष्टसन्धिस्तत्रेष्टो गूढस्तेनोपघातिनः ।
भूमीनामात्तसाराणां मूलवर्जं प्रणामनम् । उच्छिन्नसन्धिस्तत्रैष परव्यसनकाङ्क्षिणः ।
फलदानेन भूमीनां मोक्षणं स्यादवक्रयः । फलातिभुक्तो भूमिभ्यः सन्धिः स परदूषणः ॥

---

पहिल्या दोन तहांत सैन्यावरील अधिकाऱ्यांपैकीं एखादी स्त्री ओलीस ठेऊन घ्यावी आणि शेवटल्या तहांत शत्रूला गुप्त मसलत करून पकडण्याची तजवीज करावी. असें हे सैन्य पुरविण्याच्या अटीवर केलेल्या तहाचे दोन प्रकार आहेत.

द्रव्य देऊन इतर सुखें कायम ठेवण्याच्या अटीवर झालेला तह समाधानकारक होतो, यांस “ परिक्रय संधि ” म्हणजे मोल देऊन विकत घेतलेला तह म्हणतात.

हप्त्या हप्त्यानें खंडणी देण्याचा करार करून केलेला तह तो “ उपग्रह संधि ” म्हणजे खंडणी देऊन केलेला तेह म्हणावा. काळाच्या व देशाच्या अडचणीमुळें देऊं केलेली खंडणी वसूल व्हावयास व्यत्यय येण्याचा संभव असतो.

देऊं केलेली खंडणी आज उद्यां केव्हांतरी देऊन टाकितां येईल अशी उमेद असते म्हणून या अटीवर केलेला तह स्त्री ओलीस देण्याच्या अटीवरील तहापेक्षां पुष्कळ बरा म्हटला पाहिजे.

उभय पक्षांचा परस्परांस पूर्ण विश्वास बसून उभयता प्रेमानें राहतात तेव्हां तो “ सुवर्ण—संधि ” म्हणावा.

याच्या म्हणजे सुवर्णसंधीच्या उलट “ कपाल संधि ” होय. कारण यांत अपारिमित द्रव्य देण्याची अट असते-देणाऱ्यास कपाल म्हणजे भिक्षापात्र घ्यावयाची पाळी येते !

पहिल्या दोन तहांप्रमाणें कच्चा माल, मरावयास टेकलेले घोडे व हत्ती आणि तिसऱ्या तहाप्रमाणें द्रव्य पुरवावें, आणि चवथ्या तहाच्या प्रसंगीं ‘ आमची अगदीं धूळधाण झाली आहे ’ असें सांगून गप्प बसावें. असें हें द्रव्य पुरविण्याच्या अटीवर केलेल्या तहांचे प्रकार आहेत.

राज्यांतील एखादा प्रांत देऊन इतर प्रांतांचे व प्रजाजनांचें रक्षण केलें जातें त्या तहास “ आदिष्ट संधि ” म्हणतात. ज्या देशांत चोरून दरोडे घालणारांचा सुळसुळाट फार आहे त्या देशाच्या राजानें तसा प्रांत देऊन तह करावा हें इष्ट आहे.

राजधानी खेरीज धूळधाण झालेला समग्र देश अर्पण करण्याच्या अटीवर केलेला तह तो “ उच्छिन्न संधि ” होय. शत्रूचा नाश व्हावा अशी इच्छा करणाऱ्या राजानें असा तह खुशाल करावा.

ज्या तहामुळें जमीनींतील उत्पन्न देऊन देशाचें स्वातंत्र्य कायम ठेविलें जातें तो “ अपक्रय संधि ” म्हणजे भाडें अथवा करभार देऊन केलेला तह होय. ज्या तहांत जमीनींतून निघणाऱ्या उत्पन्नापेक्षां अधिक द्रव्य द्यावें लागतें त्यास “ परदूषण संधि ” म्हणतात.

कुर्यादवेक्षणं पूर्वौ पश्चिमौ त्वाबलीयसम् । आदाय फलमित्येते देशोपनतसन्धयः ।
स्वकार्याणां वशेनैते देशे काले च भाषिताः । आबलीयसिकाः कार्यास्त्रिविधा हीनसन्धयः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे तृतीयोऽध्यायः समहीनज्यायसां
गुणाभिनिवेशो हीनसन्धयः, आदित एकशततमः ॥

---

# अध्याय १०२ विगृह्यासनं, सन्धायासनं, विगृह्ययानं, सन्धाययानं, सम्भूयप्रयाणं च ।

सन्धिविग्रहयोरासनं यानं च व्याख्यातम् । स्थानमासनमुपेक्षणं चेत्यासनपर्यायाः ।
विशेषस्तु गुणैकदेशे स्थानम् । स्ववृद्धिप्राप्त्यर्थमासनम् । उपायानामप्रयोग उपेक्षणमिति ।
सन्धानकामयोरिविजिगीष्वोरुपहन्तुमशक्तयोर्विगृह्यासनं सन्धाय वा ।

यदा वा पश्येत्--' स्वदण्डैर्मित्राटवीदण्डैर्वा समं ज्यायांसं वा कर्शयितुमुत्सहे ' इति, तदा तबाह्याभ्यन्तरकृत्यो विगृह्यासीत । यदा वा पश्येत्--' उत्साहयुक्ता मे प्रकृतयः संहता विवृद्धाः वकर्माण्यव्याहताश्चरिष्यन्ति, परस्य वा कर्माण्युपहनिष्यन्ति' इति तदा विगृह्यासीत ।

---

वरील तहांमध्यें पहिल्या दोन प्रकारचे तह करून योग्य संधीची वाट पहावी; आणि पुढील दोन तह मान वाकविल्यावांचून गत्यंतर नाहीं असें असेल तेव्हांच आपली शक्ति वाढेपर्यंत करावे. या प्रमाणें जमीनींचें उत्पन्न देऊन केले जाणारे तह आहेत.

स्वतःची परिस्थिति, देश व काळ यांस अनुसरून कनिष्ठ राजानें, आपली शक्ति वाढेपर्यंत, बलिष्ठ राजाशीं जो तह करावयाचा, त्याचे असे आणखी तीन प्रकार आहेत.

---

## शत्रुत्व किंवा तटस्थपणा स्वीकारल्यानंतरची संयमवृत्ति किंवा चढाई; संयुक्त राजांची स्वारी

तटस्थपणा किंवा शत्रुत्व स्वीकारल्यानंतर अंगीकारावयाच्या संयमवृत्तीविषयीं पूर्वाचार्यांनीं असें सांगितलें आहे.—

स्थान ( शांतवृत्ति ), आसन ( वैरनिवृत्ति ) आणि उपेक्षण ( दुर्लक्ष ) हे तीनहि शब्द ' आसन ' ( संयमवृत्ति ) शब्दाचेच पर्यायवाचक शब्द आहेत. त्यांमधील भेद असे आहेतः–विवक्षित धोरणानें शांत राहाणें म्हणजे 'स्थान;' स्वतःचा उत्कर्ष करून घेण्याच्या उद्देशानें वैरापासून निवृत्त होणें म्हणजे 'आसन;' उपाय योजतां येण्याजोगे असन ते न योजणें म्हणजे उपेक्षण.

दोन विजयेच्छु राजे परस्परांचा सलोखा इच्छित असून एकमेकांचा पाडाव करावयास असमर्थ असतील तेव्हां त्यांनीं शत्रुत्व स्वीकारून किंवा तह करून संयमवृत्ति अथवा 'आसन'–वृत्ति धरून चालावें.

जेव्हां असें दिसून येईल कीं, आपल्या स्वतःच्या, मित्रराजाच्या अथवा रानटी लोकांच्या सैन्याची मदत घेऊन समान किंवा वरिष्ठ शत्रूचा पाडाव करितां येईल, तेव्हां देशांतील व बाहेरील बंदोबस्त करून वैरवृत्ति मनांत बाळगून स्वस्थ राहावें.

जेव्हां असें दिसून येईल कीं, आपले प्रजाजन शूर आहेत, त्यामध्यें जूट आहे त्यांची भरभराट आहे आणि ते आपआपलीं कामें निर्विघ्नपणें पार पाडून शत्रूच्या कार्याचा समाचार घेतील तेव्हां वैर स्वीकारून स्वस्थ बसावें.

यदा वा पश्येत्—'परस्यापचारिताः क्षीणा लुब्धाः स्वचक्रस्तेनाटवीव्यथिता वा प्रकृतयः स्वयमुपजापेन वा मामेष्यन्तीति, सम्पन्ना मे वार्ता विपन्ना परस्य तस्य प्रकृतयो दुर्भिक्षोपहता मामेष्यन्ति, विपन्ना मे वार्ता सम्पन्ना परस्य तं मे प्रकृतयो न गमिष्यन्ति, विगृह्य चास्य धान्यपशुहिरण्यान्याहरिष्यामि, स्वपण्योपघातीनीति वा परपण्यानि निवर्तयिष्यामि, परवणिक्पथाद् वा सारवन्ति मामेष्यन्ति विगृहीते नेतरं, दूष्यामित्राटवीनिग्रहं वा विगृहीतो न करिष्यति, तैरेव वा विग्रहं प्राप्स्यति, मित्रं मे मित्रभाव्यभिप्रयातो बह्वल्पकालं तनुक्षयव्ययमर्थं प्राप्स्यति गुणवतीमादेयां वा भूमिं, सर्वसंदोहेन वा मामनादृत्य प्रयातुकामः कथं न यायात्' इति परवृद्धिप्रतिघातार्थं प्रतापार्थं च विगृह्यासीत।

तमेव हि प्रत्यावृत्तो ग्रसत इत्याचार्याः। नेति कौटल्यः। कर्शनमात्रमस्य कुर्यादव्यसनिनः। परवृद्ध्या तु वृद्धः समुच्छेदनम्। एवं परस्य यातव्योऽस्मै साहाय्यमविनष्टः प्रयच्छेत्। तस्मात् सर्वसन्दोहप्रकृतं विगृह्यासीत।

विगृह्यासनहेतुप्रातिलोम्ये सन्धायासीत।

विगृह्यासनहेतुभिरभ्युच्चितः सर्वसन्दोहवर्जं विगृह्य यायात्।

---

अथवा जेव्हां असें दिसून येईल कीं:—

शत्रूच्या राज्यांतील प्रजाजन जुलमानें गांजलेले, अन्नान्न दशेस पोहोंचलेले, लोभाविष्ट झालेले व लष्कराच्या, दरोडेखोरांच्या किंवा रानटी बंडखोरांच्या जाचांत सांपडलेले असल्यामुळें केव्हांतरी ते आपण होऊन, किंवा त्यांच्यांत फितुरी उत्पन्न केल्यावर, आपल्या बाजूस येतील; आपल्या देशांत धनधान्यसमृद्धि आहे, शत्रूच्या देशांत अक्काबाईचा फेरा आलेला दिसत आहे म्हणून त्याचे लोक दुष्काळानें गांजले असल्यामुळें आपल्याकडे येतील; आपला देश दरिद्री आहे व शत्रूचा देश समृद्ध आहे पण आपले लोक त्याच्या आश्रयास जाणार नाहींत; मी त्याशीं युद्ध करून त्याच्या देशांतील धान्य, पशु व सुवर्ण हरण करून आणीन; आमच्या देशी मालाशीं स्पर्धा करून नुकसान करणाऱ्या शत्रुदेशांतील मालाची आयात बंद करीन; लढाई केल्यास शत्रूच्या बाजारांतील भारी किंमतीचा माल माझ्याच देशांत येईल इतरत्र जाणार नाहीं; मी लढाई पुकारल्यानंतर शत्रूच्या राज्यांतील राजद्रोही लोक, शत्रु, रानटी लोक व इतर बंडखोर पुंडावा करूं लागतील, तो शमवितां न आल्यामुळें त्यांस आणखी एका लढाईची भानगड उपस्थित होईल; माझा मित्र स्वतःचें नुकसान न करितां मितव्ययानें लवकरच पुष्कळ द्रव्य आणि चांगली भूमि मिळवील आणि मी स्वारीवर निघालों म्हणजे आपल्या लवाजम्यासह मजबरोबर येईलच येईल; कारण नवीन प्रांत मिळविण्याची व माझ्या सारख्याची मैत्री संपादन करण्याची संधि तो कसा दवडील? असा विचार करून शत्रूचा उत्कर्ष हाणून पाडण्याकरितां व स्वतःचा प्रताप दाखविण्याकरितां वैरभाव स्वीकारून वाट पहात बसावें.

अशा रीतीनें वैरभाव मात्र ठेवून कांहींच हालचाल न केल्यास आपल्याला शत्रूच ग्रासून टाकील असें आमचे आचार्य म्हणतात. यांवर कौटिल्य म्हणतो—"असें नाहीं. असला शत्रु आपल्यावर उलटला तरी जोपर्यंत आपल्यावर इतर कोणतें संकट आलेलें नाहीं तोंपर्यंत तो शत्रु फारतर आपला पराभव करील पण समूळ उच्छेद करूं शकणार नाहीं. पण आपण त्याला अगदींच ढिला सोडल्यास त्याची शक्ति वाढल्याबरोबर तो आपला समूळ उच्छेद करण्याच्या उद्योगास लागेल. त्याचवेळीं आणि शत्रूचा शत्रू स्वतःच्या रक्षणार्थ त्याला मदत दिल्यावांचून राहणार नाहीं. म्हणून आपल्याजवळ असलेलीं सर्व प्रकारचीं साधनें जय्यत ठेवून वैरभाव धरून वाट पहात बसावें हें चांगलें.

वर वर्णिलेल्याच्या उलट परिस्थिति असल्यामुळें वैरभाव स्वीकारल्यानंतर स्वस्थ बसण्यापासून जर अनिष्ट परिणाम घडून येण्याचा संभव नसेल तर सलोखा करून स्वस्थ बसावें.

यदा वा पश्येत्—'व्यसनी परः, प्रकृतिव्यसनं वास्य शेषप्रकृतिभिरप्रतिकार्यं, स्वचक्रपीडिता विरक्ता वास्य प्रकृतयः कर्शिता निरुत्साहाः परस्पराद् भिन्नाः शक्या लोभयितुम्, अग्न्युदकव्याधिमरकदुर्भिक्षनिमित्तक्षीणयुग्यपुरुषनिचयरक्षाविधानः परः' इति, तदा विगृह्य यायात्।

यदा वा पश्येत्—'मित्रमाक्रन्दश्च मे शूरवृद्धानुरक्तप्रकृतिर्विपरीतप्रकृतिः परः पार्ष्णिग्राहश्चासारश्च, शक्यामि मित्रेणासारमाक्रन्देन पार्ष्णिग्राहं वा विगृह्य यातुम्' इति, तदा विगृह्य यायात्।

यदा वा फलमेकहार्यमल्पकालं पश्येत्, तदा पार्ष्णिग्राहासाराभ्यां विगृह्य यायात्। विपर्यये सन्धाय यायात्।

यदा वा पश्येत्—'न शक्यमेकेन यातुमवश्यं च यातव्यम्' इति, तदा समहीनज्यायोभिः सामवायिकैः सम्भूय यायात्। एकत्र निर्दिष्टेनांशेनानेकत्रानिर्दिष्टेनांशेन। तेषामसमवाये दण्डमन्यतमस्मिन् निविष्टांशेन याचेत। संभूयाभिगमनेन वा निर्विश्येत। ध्रुवे लाभे निर्दिष्टेनांशेनाध्रुवे लाभांशेन॥

अंशो दण्डसमः पूर्वः प्रयाससम उत्तमः। विलोपो वा यथालाभं प्रक्षेपसम एव वा॥

इति कौटिलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे चतुर्थोऽध्यायः विगृह्यासनं सन्धायासनं विगृह्ययानं सन्धाययानं सम्भूयप्रयाणम्, आदितो द्विशततमः॥

---

वैरभाव धरून जो राजा स्वस्थ बसला आहे, त्याची शक्ति वाढली असल्यास त्यानें दुर्बळ राजावर लढाई पुकारून स्वारी करावी; अथवा "शत्रुसंकटांत गुरफटला आहे, त्याची प्रजाहि संकटांत आहे, कोणत्याहि साधनानें संकट निवारण शक्य नाहीं, प्रजाजन राजाच्या जुलमानें गांजलेले असल्यामुळें राजावर असंतुष्ट आहेत, राजानें प्रजेला पिळून काढिलें असल्यामुळें ती दुबळी व निरुत्साह झाली आहे. परस्परांत जूट नाहीं, म्हणून शत्रूच्या प्रजाजनांत फितुरी करून त्यांस आपल्या बाजूस आणितां येईल" असें वाटत असेल तेव्हांहि लढाई पुकारून स्वारी करावी. किंवा "शत्रूचा देश पुरानें, रोगानें, सांथीनें अथवा दुष्काळानें व्यापून गेला आहे आणि माणसें व जनावरें नाहींशीं झाल्यामुळें शत्रूच्या देशांत स्वसंरक्षणार्थ बंदोबस्तहि म्हणण्यासारखा नाहीं" असें वाटत असेल तेव्हांहि लढाई पुकारून स्वारी करावी.

"पुढच्या बाजूला साहाय्य करण्यास माझा मित्र समर्थ आहे व मागच्या बाजूसहि साहाय्य करण्यास मागील मित्र (आक्रंद) समर्थ आहे. उभयतांचे प्रजाजन शूर अनुभवी व राजनिष्ठ आहेत. शत्रूची स्थिति उलट आहे; त्याचा पुढील मित्र व मागील मित्र माझ्या मित्रासारखे नाहींत. मी आपल्या पुढील मित्राच्या साहाय्यानें मागील शत्रूला सहज दाबांत ठेवूं शकेन असें जेव्हां वाटेल तेव्हां लढाई पुकारून स्वारी करावी.

"मी एकटा तुटून पडून हां हां म्हणतां जय मिळवीन" अशी खात्री वाटत असेल, तेव्हां पिछाडीच्या शत्रुराजांविरुद्ध लढाई पुकारून आघाडीच्या शत्रूवर चालून जावें, तितकी खात्री वाटत नसल्यास पिछाडीच्या राजाबरोबर सलोखा करून मग शत्रूवर चाल करावी.

—"स्वारी तर केलीच पाहिजे पण एकट्यानें करणें अशक्य आहे" असें जेव्हां वाटत असेल, तेव्हां समान, कनिष्ठ किंवा वरिष्ठ राजांशीं दोस्ती करून सर्वांनीं मिळून स्वारी करावी. निश्चित अथवा विवक्षित हेतूनें स्वारी केली असेल, तेव्हां लढाईत मिळालेली लूट अगोदर ठरविलेल्या प्रमाणांत सर्वांत वाटली जावी. पण विवक्षित हेतूनें स्वारी केली नसेल, तेव्हां वांटणीचें ठराविक प्रमाण नसलें तरी हरकत नाहीं. राजांचा एकत्र मिलाफ शक्य नसेल, तेव्हां त्यांपैकीं एखाद्या राजास लुटीचा विवक्षित भाग देऊं करून सैन्याची मदत मागावी, अथवा सारखा भाग कबूल करून त्यांस स्वतः यावयास विनंती करावी. लाभाची खात्री असेल तेव्हां भाग निश्चित ठरवून स्वारीवर निघावें, खात्री नसेल तेव्हां जो मिळेल तो मिळेल या कबुलायतीनें निघावें.

सैन्याच्या मानानें लुटीचा भाग मिळणें हा सामान्य प्रकार होय. श्रमाच्या मानानें लूट विभागली जाणें हा उत्तम प्रकार होय. ज्यामानानें लूट मिळविली असेल अथवा ज्या मानानें पैसा खर्च केला असेल, त्यामानानें हि लुटीचे भाग ठरविले जातात.

# अध्याय १०२ यातव्यामित्रयोरभिग्रहाचिन्ता, क्षयलोभविरागहेतवः प्रकृतीनां, सामवायिकविपरिमर्शश्च ।

तुल्यसामन्तव्यसने यातव्यमामित्रं वेत्यमित्रमाभियायात्, तत्सिद्धौ यातव्यम् । अमित्रसिद्धौ हि यातव्यः साहाय्यं दद्यान्नामित्रो यातव्यसिद्धौ ।

गुरुव्यसनं यातव्यं, लघुव्यसनममित्रं वेति गुरुव्यसनं सौकर्यतो यायादित्याचार्याः । नेति कौटल्यः--लघुव्यसनममित्रं यायात् । लघ्वपि हि व्यसनमभियुक्तस्य कृच्छ्रं भवति । सत्यं गुर्वपि गुरुतरं भवति । अनभियुक्तस्तु लघुव्यसनः सुखेन व्यसनं प्रतिकृत्यामित्रो यातव्यमभिसरेत् । पार्ष्णिं गृह्णीयात् ।

यातव्ययौगपद्ये गुरुव्यसनं न्यायवृत्तिं लघुव्यसनमन्यायवृत्तिं विरक्तप्रकृतिं वेति विरक्तप्रकृतिं यायात् । गुरुव्यसनं न्यायवृत्तिमभियुक्तं प्रकृतयोऽनुगृह्णन्ति । लघुव्यसनमन्यायवृत्तिमुपेक्षन्ते । विरक्ता बलवन्तमप्युच्छिन्दन्ति । तस्माद् विरक्तप्रकृतिमेव यायात् ।

---

## बलहीन व बलाढ्य शत्रूवरील स्वारीविषयीं विचार.

## क्षय, लोभ, व अप्रीति यांचीं कारणें; राजसंघाविषयीं विचार

आपल्या शेजारचे राजे सारखेच संकटांत असतील तेव्हां त्यांतल्या बलहीन शत्रुवर आधीं स्वारी करावी, कीं बलाढ्य शत्रूवर आधीं करावी, असा विचार पडला असतां बलाढ्य शत्रूवरच चालून जावें. त्याचा पराभव केल्यानंतर बलहीन शत्रूचा समाचार घ्यावा. कारण बलाढ्य शत्रूवर चाल करून जात असतां बलहीन शत्रु आपणांस मदत करावयास तयार होण्याचा जसा संभव आहे तसा बलहीनावर स्वारी करतांना बलाढ्य शत्रु मदतीस येण्याचा संभव नाहीं.

बलहीन शत्रूचीं संकटें अधिक आहेत, बलाढ्य शत्रूचीं संकटें कमी आहेत, असें असेल तेव्हां कोणावर आधीं स्वारी करावी ?

आमचे गुरु म्हणतात—अधिक संकटांत गुरफटलेल्या शत्रूवर स्वारी आधीं करावी कारण त्यांस जिंकणें सोपें आहे. परंतु कौटिल्य म्हणतो–"असें नाहीं. कमी संकटांत असलेल्या बलाढ्य शत्रूवरच आधीं स्वारी करावी, कारण त्यांवर स्वारी केली म्हणजे त्याच्या लहान संकटास सुद्धां भयंकर स्वरूप येतें. बलहीनावर स्वारी केल्यास, त्याचें मोठें संकट पूर्वीपेक्षां अधिक भयंकर होतें हें खरें. परंतु बलाढ्य शत्रूवर स्वारी केली नाहीं तर तो आपले क्षुद्र स्वरूपाचें संकट तेव्हांच दूर करून बलहीन शत्रूस मदत द्यावयास धांवत येईल, अथवा आपल्या पिछाडीवर चाल करून येईल व त्यामुळें आपली बाजू कमकुवत होईल.

दोघां राजांवर स्वारी करावयाची आहे आणि त्यांपैकीं एक धर्मनिष्ठ व न्यायनिष्ठ असून अधिक अडचणींत आहे व दुसरा कमी अडचणींत असला तरी अधर्मी व अन्यायी असल्यानें प्रजेची त्यांवर प्रीति नाहीं, तेव्हां या दोहोंतून कोणावर आधीं स्वारी करावी ?

प्रजेची ज्याच्यावर प्रीति नसेल त्यावर स्वारी करावी. धर्मनिष्ठ व न्यायनिष्ठ राजा अधिक संकटांत असला तरी त्यावर स्वारी करितांच त्याचे प्रजाजन त्यांस मदत केल्यावांचून राहाणार नाहींत. दुसरा राजा कमी कचाट्यांत असला तरी तो अधर्मी व अन्यायी असल्यामुळें त्यांस प्रजाजन मदत द्यावयाची टाळाटाळच करणार. अशारीतीनें असंतुष्ट प्रजाजन बलाढ्य राजाचा सुद्धां नाश करावयास मागेंपुढें पहात नाहींत. म्हणून जो राजा प्रजेला अप्रिय असेल त्याचें संकट लहान असलें तरी त्यावरच आधीं स्वारी करावी.

क्षीणलुब्धप्रकृतिमपचरितप्रकृतिं वेति--क्षीणलुब्धप्रकृतिं यायात् । क्षीणलुब्धा हि प्रकृतयः सुखेनोपजापं पीडां वोपगच्छन्ति, नापचरिताः प्रधानावग्रहसाध्या इत्याचार्याः । नेति कौटल्यः-- क्षीणलुब्धा हि प्रकृतयो भर्तरि स्निग्धा भर्तृहिते तिष्ठन्ति । उपजापं वा विसंवादयन्ति, अनुरागे सार्वगुण्यमिति । तस्मादपचरितप्रकृतिमेव यायात् ।

बलवन्तमन्यायवृत्तिं दुर्बलं वा न्यायवृत्तिमिति, बलवन्तमन्यायवृत्तिं यायात् । बलवन्तमन्यायवृत्तिम् अभियुक्तं प्रकृतयो नानुगृह्णन्ति निष्पातयन्त्यमित्रं वास्य भजन्ते । दुर्बलं तु न्यायवृत्तिमभियुक्तं प्रकृतयः परिगृह्णन्ति, अनुनिष्पतन्ति वा ।

अवक्षेपेण हि सतामसतां प्रग्रहेण च । अभूतानां च हिंसानामधर्म्याणां प्रवर्तनैः ॥
उचितानां चरित्राणां धर्मिष्ठानां निवर्तनैः । अधर्मस्य प्रसङ्गेन धर्मस्यावग्रहेण च ॥
अकार्याणां च करणैः कार्याणां च प्रणाशनैः । अप्रदानैश्च देयानामदेयानां च साधनैः ॥
अदण्डनैश्च दण्ड्यानां दण्ड्यानां चण्डदण्डनैः । अग्राह्याणामुपग्राहैर्ग्राह्याणां चानभिग्रहैः ॥
अनर्थ्यानां च करणैरर्थ्यानां च विघातनैः । अरक्षणैश्च चोरेभ्यः स्वयं च परिमोषणैः ॥
पातैः पुरुषकाराणां कर्मणां गुणदूषणैः । उपघातैः प्रधानानां मान्यानां चावमाननैः ॥
विरोधनैश्च वृद्धानां वैषम्येणानृतेन च । कृतस्याप्रतिकारेण स्थितस्याकरणेन च ॥

---

ज्याचें प्रजाजन दरिद्रावस्थेस पोहोंचलेले व अत्यंत लोभी झालेले आहेत, अशावर स्वारी करावी, किंवा ज्याचें प्रजाजन जुलमानें गांजलेले आहेत अशावर स्वारी करावी ? "अर्थात, ज्याचे प्रजाजन दारिद्रावस्थेस पोहोंचलेले व अत्यंत लोभी झालेले आहेत, अशावर स्वारी करावी. कारण लोभी व दरिद्री प्रजाजनांस मसलतीनें आपल्या बाजूस सहज वळवून घेतां येते, व त्यांमध्यें क्षोभहि सहज उत्पन्न करितां येतो. जुलमानें गांजलेल्या प्रजेंत तसें करितां येत नाहीं; कारण तीमधील कांहीं पुढाऱ्यांस शासन केलें म्हणजे तिचा क्षोभ सहज शांत होतो" असें आमचे गुरु म्हणतात. परंतु कौटिल्य म्हणतो—" असें नाहीं. कारण, लोभी व दरिद्री प्रजाजन राजनिष्ठ असल्यामुळें राजाच्या हिताकरितां झटतीलच झटतील, आणि त्यांमध्यें राजद्रोह पसरविण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी त्यांस ते वश होणार नाहींत. आणि प्रजाजनांची प्रीति हा राजांचा सर्वोपकारक आधार असतो; म्हणून ज्याची प्रजा अत्यंत गांजलेली असेल त्यावरच स्वारी करावी."

बलाढ्य, पण अधर्मी व अन्यायी राजावर स्वारी करावी कां बलहीन, पण धर्मनिष्ठ व न्यायनिष्ठ राजावर करावी ? बलाढ्य पण अधर्मी व अन्यायी राजांवर स्वारी करावी. बलाढ्य पण अधर्मी व अन्यायी राजावर स्वारी केली असतां त्याचे प्रजाजन त्यांस सहाय्य करीत नाहींत, उलट त्याचा नाश करतात अथवा त्याच्या शत्रूस जाऊन मिळतात. परंतु बलहीन राजांवर स्वारी केली असतां, तो धर्मनिष्ठ व न्यायनिष्ठ असल्यामुळें त्याचे प्रजाजन त्यांस सहाय्य करावयास व त्याबरोबर मरावयास तयार होतात, म्हणून बलाढ्य पण अन्यायी राजावर स्वारी करणेंच योग्य.

राजानें सज्जनांचा धिक्कार व दुर्जनांचा संग्रह केला; धर्माविरुद्ध अनन्वित हिंसा केली, धार्मिक व समाजहितकर कृत्यें सोडून दिलीं, अधर्माचा पुरस्कार व धर्माचा त्याग केला, जे करावयास पाहिजे तें सोडून, जें करावयास नको तें मुद्दाम केलें, जें द्यावयास पाहिजे ते वेतनादिक दिलें नाहीं व जो कर घ्यावयास नको तो वसूल करून घेतला, जे शिक्षेस पात्र आहेत त्यांस शिक्षा केली नाहीं, जे शिक्षेस पात्र त्यांस विशेष कडक शिक्षा केली, जे पकडावयास नकोत त्यांस पकडून, जे पकडले पाहिजेत त्यांस सोडून दिले, अनर्थकारक कार्यें हातीं घेतलीं, हितकर कार्यें बिघडवून टाकलीं, चोरांपासून प्रजाजनांचें संरक्षण करावयाचें टाकून, उलट आपणच त्यांस लुटलें, पराक्रमाची कृत्यें न करितां उलट पराक्रमासच नांवें ठेविलीं, राज्यांतील प्रमुख पुरुषांचा छळ केला, आदरणीय गृहस्थांचा अपमान केला, कुटिल व असत्य भाषणानें; अनुभवी वृद्ध माणसांस विरोध केला, उपकारांची चीज केली नाहीं, हातीं

राज्ञः प्रमादालस्याभ्यां योगक्षेमवधेन च । प्रकृतीनां क्षयो लोभो वैराग्यं चोपजायते ॥
क्षीणाः प्रकृतयो लोभं लुब्धा यान्ति विरागताम् । विरक्ता यान्त्यमित्रं वा भर्तारं घ्नन्ति वा स्वयम् ॥
तस्मात् प्रकृतीनां क्षयलोभविरागकारणानि नोत्पादयेत् । उत्पन्नानि वा सद्यः प्रतिकुर्वीत ।
क्षीणा लुब्धा विरक्ता वा प्रकृतय इति । क्षीणाः पीडनोच्छेदनभयात् सद्यः सन्धिं युद्धं निष्पतनं वा रोचयन्ते । लुब्धा लोभेनासन्तुष्टा परोपजापं लिप्सन्ते । विरक्ताः पराभियोगमभ्युत्तिष्ठन्ते ।
तासां हिरण्यधान्यक्षयः सर्वोपघाती कृच्छ्रप्रतीकारश्च । युग्यपुरुषक्षयो हिरण्यधान्यसाध्यः ।
लोभ ऐकदेशिको मुख्यायत्तः परार्थेषु शक्यः प्रतिहन्तुमादातुं वा ।
विरागः प्रधानावग्रहसाध्यः । निष्प्रधाना हि प्रकृतयो भोग्या भवन्त्यनुपजाप्याश्चान्येषामनापत्सहास्तु । प्रकृतिमुख्यप्रग्रहैस्तु बहुधा भिन्ना गुप्ता भवन्त्यापत्सहाश्च ।
सामवायिकानामपि सन्धिविग्रहकारणान्यवेक्ष्य शक्तिशौचयुक्तेन सम्भूय यायात् । शक्तिमान् हि पार्ष्णिग्रहणे यात्रासाहाय्यदाने वा शक्तः, शुचिः सिद्धौ चासिद्धौ च यथास्थितकारीति ।

---

घेतलेल्या कामाची हयगय केली, हलगर्जीपणानें व आळसानें प्रजाजनांच्या सुखसोयीकडे दुर्लक्ष केलें म्हणजे प्रजेंत दारिद्र्य, लोभ व अप्रीति उत्पन्न होते.

प्रजेची अन्नान्नदशा झाली म्हणजे ती लोभी होते, प्रजेस लोभ सुटला म्हणजे तींत अप्रीति अथवा असंतोष उत्पन्न होतो; प्रजा असंतुष्ट झाली म्हणजे ती शत्रूस तरी जाऊन मिळते अथवा स्वतःच राजाचा समाचार घेते !

म्हणून प्रजाजनांत दारिद्र्य, लोभ व असंतोष यांचीं कारणें उत्पन्न होऊं देऊं नयेत, झालींच तर तीं तात्काळ दूर करावीं.

दरिद्री प्रजा, लोभी प्रजा व असंतुष्ट प्रजा यांत बरी वाईट कोणती ?

प्रजा दरिद्री असली म्हणजे तिला राजाचा जुलूम होऊं नये व आपला समूळ नाश होऊं नये असें वाटत असतें म्हणून ती साहजिकपणें तात्काळ तडजोडीस, युद्धास अथवा देशांतर करण्यास तयार होते. प्रजा लोभाविष्ट झाली आणि असंतुष्टपणा वाढूं लागला म्हणजे ती शत्रूच्या गुप्त मसलतीस बळीं पडून त्यास सामील व्हावयास इच्छिते. ज्या प्रजेच्या मनांत राजाविषयीं अनादर आहे तिच्या राजावर शत्रूनें हल्ला केला असतां ती शत्रूच्या मदतीस जाते.

देशांतील सुवर्ण व धान्य कमीकमी होत जाऊन देश दरिद्री झाला तर तें राज्याला सर्व बाजूंनीं विघातक होतें.कारण ही आपत्ति मोठ्या मुष्किलीनेंच दूर करितां येते. देशांतील जनावरें व शूर माणसें नाहींतशीं होऊन आलेलें दुर्बलत्व सुवर्णानें व धान्यानें दूर करितां येतें. लोभ केवळ कांहीं लोकांत म्हणजे राज्यांतील मुख्य मुख्य माणसांतच असतो व त्यांस शत्रुदेशांत लुटीची संधी देऊन तो काढून टाकितां येतो. असंतोष चिरडून किंवा उपटून टाकावयाचा झाल्यास प्रमुख प्रमुख लोकांस पकडून तुरुंगांत टाकिलें म्हणजे कार्य भागतें. कारण लोकांना पुढारी नसला म्हणजे त्यांवर बिनधोर अंमल चालवितां येतो व ते गुप्त मसलतीस बळी पडून शत्रूस मिळतील असें भयहि राहात नाहीं. लोकांच्या अंगांत आपत्ति सहन करण्याची शक्ति नसली म्हणजे पुढाऱ्यांस पकडल्याबरोबर त्यांची पांगापांग होते आणि त्यांस दाबांत ठेविलें म्हणजे ते आपोआपच आपत्ति सहन करूं लागतात.

संयोग करून स्वारी करावयाची असल्यास, सलोख्याच्या व लढाईच्या कारणांचा नीट विचार करून बलाढ्य व धर्मनिष्ठ राजाशीं संयोग करावा आणि मग त्यासह स्वारी करावयास जावें. आपल्या पिछाडीच्या शत्रूचा समाचार घ्यावयास अथवा स्वारीच्या कामांत आपणांस मदत करावयास जो समर्थ असेल तो बलाढ्य राजा समजावा. लाभ होवो वा हानि होवो ठरलेला करार पाळणारा तो धर्मनिष्ठ होय.

तेषां ज्यायसैकेन द्वाभ्यां समाभ्यां वा सम्भूय यातव्यमिति । द्वाभ्यां समाभ्यां श्रेयः, ज्यायसा ह्यवगृहीतश्चरति समाभ्यामतिसन्धानाधिक्ये वा तौ हि सुखौ भेदयितुम् । दुष्टश्चैको द्वाभ्यां नियन्तुं भेदोपग्रहं चोपगन्तुमिति ।

समेनैकेन द्वाभ्यां हीनाभ्यां वेति । द्वाभ्यां हीनाभ्यां श्रेयः । तौ हि द्विकार्यसाधकौ वश्यौ च भवतः कार्यसिद्धौ तु—

कृतार्थाज्ज्यायसो गूढः सापदेशमपस्रवेत् । अशुचेः शुचिवृत्तात् तु प्रतीक्षेताविसर्जनात् ॥
सत्रादपसरेद् यत्तः कलत्रमपनीय वा । समादपि हि लब्धार्थाद् विश्वस्तस्य भयं भवेत् ॥
ज्यायस्त्वे चापि लब्धार्थः समो विपरिकल्पते । अभ्युच्चितश्चाविश्वास्यो वृद्धिश्चित्तविकारिणी ॥
विशिष्टादल्पमप्यंशं लब्ध्वा तुष्टमुखो व्रजेत् । अनंशो वा ततोऽस्याङ्के प्रहृत्य द्विगुणं हरेत् ॥
कृतार्थस्तु स्वयं नेता विसृजेत् सामवायिकान् । अपि जीयेत न जयेन्मण्डलेष्टस्तथा भवेत् ॥

इति कोटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे पञ्चमोऽध्यायः यातव्यामित्रयोरभिग्रहंचिन्ता क्षयलोभविरागहेतवः प्रकृतीनां सामवायिकविपरिमर्शः, आदितास्त्रिशततमः ॥

---

आपल्यापेक्षां एका वरिष्ठ राजाशीं तह करून शत्रूवर स्वारी करावी कां समान दर्जाच्या दोन राजांशीं तहनामा करून मग स्वारी करावी. अर्थात दोन समान दर्जाच्या राजांशीं दोस्ती करून स्वारी करावी हें चांगलें. कारण वरिष्ठाशीं दोस्ती केली म्हणजे त्याच्या मर्जीनें चालावें लागतें. दोन बरोबरीच्या राजाशीं स्नेह केला म्हणजे हि त्यांच्या मर्जीप्रमाणें चालावें लागतें पण ते दोघे कारस्थानी व मसलती असतील तर, त्या दोघांमध्यें वितुष्ट पाडावयास उशीर लागत नाहीं. त्या राजांपैकीं एक जर दुष्ट असेल तर त्यांस दोघांनीं दडपून टाकावें; अथवा त्यास विरोधाचीं कडू फळें भोगावयास लावावीं.

आपल्या बरोबरीच्या एका राजाशीं संयोग करावा कीं दोन कनिष्ठ राजाशीं संयोग करावा ? दोन कनिष्ठ राजांशीं संयोग करणें अधिक चांगलें; कारण दोघांस पृथक् पृथक् कार्याकरितां पाठवितां येतें व दोघांसहि आपल्या कह्यांत ठेवितां येतें.

कार्य यशस्वी झाल्यानंतर वरिष्ठाची कामगिरी पुरी केल्यावर तो दुष्ट असल्यास कनिष्ठराजानें गुप्तपणानें निघून जावें. तो दुष्ट नसल्यास जावयास रजा देईपर्यंत वाट पाहावी. किंवा अडचणीच्या जागेंतून मुलांमाणसांसह सावधपणानें निसटावें. समान दर्ज्याच्या राजानें यश संपादन केलें म्हणजे त्यावर विश्वास ठेवण्यांतहि धोका आहे. कारण समान राजा यशस्वी झाला म्हणजे तो वरिष्ठपणाची वृत्ति स्वीकारणारच. वरिष्ठ राजांवर तर कधींहि विश्वास ठेवूंनये, कारण भरभराटीमुळें त्याची मनोवृत्ति फिरण्याचा संभव असतो. म्हणून मुळींच भाग न घेतां किंवा थोडासा भाग घेऊनहि संतोष दाखवून निघून जावें, परंतु मागून मात्र त्याच्या मानगुटीवर बसून दुप्पट उट्टें काढावें. यास्तव विजिगीषु राजाची कार्यसिद्धि झाली म्हणजे त्यानें संतोष दाखवून संयुक्त राजास जाण्याची परवानगी द्यावी. लुटीच्या वाटणींत स्वतः पड घेऊन इतरांस अधिक द्यावें; अशारीतीनें त्यानें राजमंडळांत प्रिय व्हावें.

---

# अध्याय १०४ संहितप्रयाणिकं, परिपणितापरिपणितापसृतसन्धयश्च ।

विजिगीषुर्द्वितीयां प्रकृतिमेवमतिसन्दध्यात् । सामन्तं संहितप्रयाणे योजयेत्—'त्वमितो याहि अहमितो यास्यामि, समानो लाभ' इति ।

लाभसाम्ये सन्धिः । वैषम्ये विक्रमः ।

सन्धिः परिपणितश्चापरिपणितश्च ।

'त्वमेतं देशं याह्यहमिमं देशं यास्यामीति' परिपणितदेशः ।

'त्वमेतावन्तं कालं चेष्टस्व, अहमेतावन्तं कालं चेष्टिष्य इति' परिपणितकालः ।

'त्वमेतावत् कार्यं साधय, अहमेतावत् कार्यं साधयिष्यामीति' परिपणितार्थः ।

यदि वा मन्येत—'शैलवननदीदुर्गमटवीव्यवहितं छिन्नधान्यपुरुषवीवधासारमयवसेन्धनोदकमविज्ञातं प्रकृष्टमन्यभावदेशीयं वा सैन्यव्यायामानामलब्धभौमं वा देशं परो यास्यति विपरीतमहम्' इति, एतस्मिन् विशेषे परिपणितदेशं सन्धिमुपेयात् ।

यदि वा मन्येत—'प्रवर्षोष्णशीतमतिव्याधिप्रायमुपक्षीणाहारोपभोगं सैन्यव्यायामानां चौपरोधिकं कार्यसाधनानामूनमतिरिक्तं वा कालं परश्चेष्टिष्यते, विपरीतमहम्' इति, एतस्मिन् विशेषे परिपणितकालं सन्धिमुपेयात् ।

---

## दोस्त राजांची स्वारा व तहनामे.

विजयेच्छु राजानें शेजारच्या शत्रुराजाशीं पुढील कारस्थान लढवावें. आपल्या राज्यास लागून जो राजा दोस्त असेल, त्यास आपल्या कारस्थानांत सामील करून घेऊन त्याशीं असें संधान बांधावें कीं "तूं शत्रूच्या त्याबाजूवर हल्ला कर, मी या बाजूवर हल्ला करितों आणि जी लूट मिळेल ती दोघे सारखी वांटून घेऊं' ! लुटीची वांटणी सारखी असेल तेव्हां तो दोस्तीचा तह, आणि सारखी असेल तेव्हां वरचढपणाचा तह असें समजावें.

दोस्तीचा तह निर्दिष्ट कार्याकरितां असेल किंवा अनिर्दिष्ट कार्याकरितां असेल. निर्दिष्ट कार्याकरितां केलेल्या तहाचे तीन पोटभेद होतात. "तूं या भागावर हल्ला कर, मी त्या भागावर हल्ला करितों," असा करार असेल तेव्हां तो स्थलावच्छिन्न तह समजावा.

"तूं इतके दिवस युद्ध कर, मी इतके दिवस युद्ध करीन" असा करार असेल तेव्हां त्यांस कालावच्छिन्न तह म्हणावें.

"तूं इतकें कार्य साधावें मी इतकें काय साधीन" असा करार असेल तेव्हां त्यास कार्यावच्छिन्न तह समजावा.

जेव्हां विजयेच्छु राजास असें दिसून येईल कीं—"माझ्या शत्रूस ( म्हणजे आज दोस्त झालेल्यास ) अगदीं गैरमाहीत दूर प्रदेशावर जावें लागेल, तेथें जाण्याकरितां त्यास पर्वत, नद्या व निबिड अरण्यें ओलांडावीं लागतील, तेथें माणसें नाहींत, धान्य नाहीं, अन्न नाहा, चारा नाहीं, पाणी नाहीं, किंवा लांकूड फांटा नाहीं; तेथील परिस्थिति इतर देशांहून अगदीं भिन्न आहे, किंवा लष्करास हालचाल करावयास तेथें जागा मिळण्याचीहि मारामार आहे; पण मला मात्र याहून निराळ्या ठिकाणावर जावें लागणार आहे," तेव्हां त्यानें स्थलावच्छिन्न तह करावा.

"माझ्या शत्रूस इतके दिवस गुंतून राहावें लागेल कीं त्यांस पावसाळा, हिंवाळा व उन्हाळा या तीनहि ऋतूंचे परिणाम भोगावे लागतील, रोगराई सोसावी लागेल, खाण्यापिण्याचे हाल भोगावे लागतील, लष्करी हालचालीस अडथळे येतील आणि कार्यसिद्धीस कमी अथवा जास्ती वेळ लागेल. पण मला मात्र तसें होणार नाहीं" असा फरक जेव्हां विजयेच्छु राजाला दिसून येईल तेव्हां त्यानें कालावच्छिन्न तह करावा.

यदि वा मन्येत —: प्रत्यादेयं प्रकृतिकोपकं दीर्घकालं महाक्षयव्ययमल्पमनर्थानुबन्धमकल्यमधर्म्यं मध्यमोदासीनविरुद्धं मित्रोपघातकं वा कार्यं परः साधयिष्यति, विपरीतमहम् ' इति, तस्मिन् विशेषे परिपणितार्थं सन्धिमुपेयात् ।

एवं देशकालयोः कालकार्ययोर्देशकार्ययोर्देशकालकार्याणां चावस्थापनात् सप्तविधः परिपणितः । तस्मिन् प्रागेवारभ्य प्रतिष्ठाप्य च स्वकर्माणि, परकर्मसु विक्रमेत ।

व्यसनत्वरावमानालस्ययुक्तमज्ञं वा शत्रुमतिसन्धातुकामो देशकालकार्याणामनवस्थापनात् ' संहितौ स्वः' इति सन्धिविश्वासेन परच्छिद्रमासाद्य प्रहरेत् । इत्यपरिपणितः ।

तत्रैतद् भवति—

सामन्तेनैव सामन्तं विद्वानायोज्य विग्रहे । ततोऽन्यस्य हरेद् भूमिं छित्त्वा पक्षं समन्ततः ।

सन्धेरकृतचिकीर्षा कृतश्लेषणं कृतविदूषणमवशीर्णक्रिया च । विक्रमस्य प्रकाशयुद्धं, कूटयुद्धं, तूष्णींयुद्धम् । इति सन्धिविक्रमौ ।

अपूर्वस्य सन्धेः सानुबन्धैः सामादिभिः पर्येषणं समहीनज्यायसां च यथाबलमवस्थापनमकृतचिकीर्षा ।

कृतस्य प्रियहिताभ्यामुभयतः परिपालनं यथासम्भाषितस्य च निबन्धनस्यानुवर्तनं रक्षणं च ' कथं परस्माच्च भिद्येत इति ' कृतश्लेषणम् ।

---

" माझ्या शत्रूस असें कार्य साधावयाचें आहे कीं—तें क्षुद्रस्वरूपाचें असून त्याचा बचाव करणें दुर्घट होणार आहे, शिवाय तें साधावयास त्यांस काळ व पैसा पुष्कळ खर्चावा लागणार आहे, त्यापासून त्याच्या प्रजेंत असंतोष, धर्मनिष्ठतेचा नाश, मध्यम व उदासीन राजाशीं विरोध व मित्रराजांचा नाश वगैरे अनेक अनर्थ त्यावर गुदरण्याचा संभव आहे. परंतु मला जें कार्य साधावयाचें तें अशा प्रकारचें नाहीं " असा फरक दिसून येईल तेव्हां कार्यावच्छिन्न संधि करावा.

याप्रमाणें स्थल व काल, काल व कार्य, स्थल व कार्य, आणि स्थल, काल व कार्य यांचा विचार केला म्हणजे तहांचे आणखी चार प्रकार म्हणजे एकंदर सात प्रकार होतात असें दिसून येईल. तहांतील शर्ती ठरतांच आपल्या कार्याला एकंदर आरंभ करून तें कार्य संपवून टाकावें आणि मग शत्रूस पेचांत आणण्याची खटपट करावी.

दुर्व्यसनी, उतावळा, उद्धट, आळशी व मूर्ख अशा शत्रूला फशीं पाडण्याची इच्छा करणाऱ्या विजयेच्छु राजानें स्थल, काल किंवा कार्य या बाबतींत निश्चित अटी न ठरवितां शेजारच्या शत्रुराजाशीं मोघम दोस्तीचा तह करावा. त्या तहावर विश्वासून जो राजा मित्रत्वानें वागूं लागला म्हणजे त्याचें छिद्र शोधून काढून त्यावर तडाखा मारावा. अशा हेतूनें व कृतीनें केलेला तह म्हणजे मोघम दोस्ती म्हणतां येईल. याविषयीं आधार आहे तो पुढें दिला आहे:—

" शहाण्या राजानें एका जवळच्या शत्रुराजास दुसऱ्या जवळील शत्रुराजाशीं लढाईत गुंतवून नंतर आपण सगळीकडून पक्ष तोडल्याप्रमाणें असहाय झालेल्या त्या राजाचा भूप्रदेश हरण करावा. तहाचे अकृतचिकीर्षा, कृतश्लेषणं, कृतविदूषणं आणि अवशीर्ण क्रिया असे चार पोटभेद होतात.

चढाईचें उघड लढाई, दगेबाजीची लढाई किंवा गाजाबाजा न करितां लढाई असे तीन प्रकार संभवतात.

ज्या तहांत साम, दाम, दंड, भेद इत्यादि उपायांनीं नवीन तह अमलांत येऊन, त्यांत समान, कनिष्ठ व वरिष्ठ राजांचे त्यांच्या दर्जास अनुरूप हक्क निश्चित केले जातात त्या तहास अकृतचिकीर्षा तह म्हणावें.

आपली दोस्ती न फुटतां जेणें करून कायम टिकेल अशा विचारानें उभयतांनीं स्नेहबुद्धीनें जुने करार पाळणें आणि परिस्थित्यनुरूप नवे निर्बंध घालून त्यांस अनुसरून वागण्याचा व करार पाळण्याचा तह करणें याला ' कृतश्लेषण ' तह म्हणतात.

परस्य अपसन्धेयतां दूष्यातिसन्धानेन स्थापयित्वा व्यतिक्रमः कृतविदूषणम् ।
भृत्येन मित्रेण वा दोषापसृतेन प्रतिसन्धानमवशीर्णक्रिया ।

तस्यां गतागतश्चतुर्विधः-कारणाद्गतागतः, विपरीतः, कारणाद्गतोऽकारणादागतः विपरीतश्चेति।
स्वामिनो दोषेण गतो गुणेनागतः परस्य गुणेन गतो दोषेणागत इति कारणाद्गतागतः सन्धेयः ।

स्वदोषेण गतागतो गुणमुभयोः परित्यज्य अकारणाद्गतागतश्चलबुद्धिरसन्धेयः ।
स्वामिनो दोषेण गतः परस्मात् स्वदोषेणागत इति कारणाद् गतोऽकारणादागतस्तर्कयितव्यः—' परप्रयुक्तः स्वेन वा दोषेणापकर्तुकामः, परस्योच्छेत्तारममित्रं मे ज्ञात्वा प्रतिघातभयादागतः, परं वा मामुच्छेत्तुकामं परित्यज्यानृशंस्यादागतः' इति । ज्ञात्वा कल्याणबुद्धिं पूजयेदन्यथाबुद्धिमपकृष्टं वासयेत् ।
स्वदोषेण गतः परदोषेणागतः इत्यकारणाद्गतः कारणादागतस्तर्कयितव्यः—' छिद्रं मे पूर-

---

राजद्रोह्यांच्या किंवा गुप्तहेरांच्या मदतीनें दुसऱ्यापक्षाकडून तहांतील अटी मोडल्या गेल्या असें शाबीत करून त्यास दोस्तीला अपात्र ठरवून जुना तह मोडल्याचें जाहीर करणें याला ' कृतविदूषण ' तह म्हणतात.

स्वतःच्या दोषामुळें आपणांपासून फुटून निघालेल्या नोकराशीं किंवा मित्राशीं पुनः दोस्ती केली म्हणजे तो ' अवशीर्ण क्रिया ' नांवाचा तह होतो.

फुटून जाणाऱ्या व पुनः परत येणाऱ्या माणसांत चार प्रकार असतात. कारणानें निघून जाणारा व कारणानेंच परत येणारा, कारण नसतां निघून जाणारा व कारण नसतां परत येणारा, कारणानें निघून जाणारा पण कारण नसतां परत येणारा आणि कारण नसतां निघून जाणारा पण कारणानें परत येणारा, असें ते प्रकार होत.

धन्याच्या अवगुणामुळें गेलेला व धन्याच्या सद्गुणामुळें परत आलेला आणि शत्रूचे सद्गुण ऐकून गेलेला व शत्रूचे दुर्गुण पाहून परत आलेला असा जो भृत्य असेल तो सकारण गेला व सकारण आला असें समजावें. अशा माणासाशीं पुनः संधि अथवा दोस्ती होऊं शकते.

उभयतांचे म्हणजे नव्या व जुन्या धन्यांचे गुण लक्षांत न आणितां जो स्वतःच्या दोषांमुळें गेला व परत आला तो चंचलबुद्धीचा माणूस समजावा. तो कारणावांचून गेला व कारणावांचून आला म्हणून त्याच्याशीं संधि किंवा दोस्ती करूं नये.

धन्याच्या दोषामुळें गेला पण शत्रूकडून येतांना स्वतःच्या दोषामुळें परत आला तर तो सकारण गेला पण अकारण परत आला असें समजावें. अशा माणसाची शहानिशा करण्यांत यावी ती अशीः—

हा काय शत्रूच्या मसलतीनें परत आला कीं स्वतःच्या दुष्टबुद्धीनें मला अपकार करण्याकरितां आपण होऊन परत आला ? मी माझ्या शत्रूस उखडून टाकण्याची तयारी करीत आहे हें जाणून स्वतःला त्रास होऊं नये म्हणून तर हा परत आला नसेल ना ? अथवा माझा शत्रु मला उखडून टाकण्याचा प्रयत्न करीत असून याला तो दुष्टपणा आहे असें वाटून तो त्यास सोडून परत आला कीं काय ? अशा रीतीनें याची चांगली चौकशी करावी आणि चौकशी अंतीं तो सद्धेतूनें प्रेरित होऊन परत आला आहे असें निश्चित झालें म्हणजे त्यांस सन्मानानें आश्रय द्यावा, नाहींतर त्यांस दूर ठेवावें.

जो स्वतःच्या दुष्टपणामुळें गेला व शत्रूच्या ( नवीन मालकाच्या ) दुष्टपणामुळें परत आला तो अकारण गेला व सकारण परत आला याचीहि चौकशी करावी. ती अशीः—हा मनुष्य शत्रूचीं गृहछिद्रें मला

यिष्यति, उचितोऽयमस्य वासः, परत्रास्य जनो न रमते, मित्रैर्मे संहितः, शत्रुभिर्विगृहीतः, लुब्धक्रूरादाविग्नः, शत्रुसंहिताद् वा परस्माद्' इति । ज्ञात्वा यथाबुद्ध्यवस्थापयितव्यः ।

कृतप्रणाशः शक्तिहानिर्विद्यापण्यत्वमाशानिर्वेदो देशलौल्यमविश्वासो बलवद्विग्रहो वा परित्यागस्थानमित्याचार्याः । भयमवृत्तिरमर्ष इति कौटल्यः ।

इहापकारी त्याज्यः । परापकारी सन्धेयः । उभयापकारी तर्कयितव्य इति समानम् ।
असन्धेयेन त्ववश्यं सन्धातव्ये यतः प्रभावः ततः प्रतिविदध्यात् ।
सोपकारं व्यवहितं गुप्तमायुःक्षयादिति । वासयेदरिपक्षीयमवशीर्णक्रियाविधौ ॥
विक्रामयेद् भर्तरि वा सिद्धं वा दण्डचारिणम् । कुर्यादमित्राटवीषु प्रत्यन्ते वान्यतः क्षिपेत् ॥
पण्यं कुर्यादसिद्धं वा सिद्धं वा तेन संवृतम् । तस्यैव दोषेणादूष्य परसन्धेयकारणात् ॥
अथवा शमयेदेनमायत्यर्थमुपांशुना । आयत्यां च वधप्रेप्सुं दृष्ट्वा हन्याद् गतागतम् ॥
अरितोऽभ्यागतो दोषः शत्रुसंवासकारितः । सर्पसंवासधर्मित्वान्नित्योद्वेगेन दूषितः ॥

---

सांगेल म्हणून यास आश्रय देणें उचित होईल काय ? याच्या माणसांस परकीय स्थळीं राहणें आवडत नाहीं म्हणून हा परतला असेल काय ? याचें माझ्या मित्राशीं सख्य व शत्रूशीं वांकडें आहे काय ? शत्रूकडील लोभी व क्रूर लोक पाहून याला उद्वेग वाटला कां, शत्रूंच्या जमावाची याला भीति वाटून हा परत आला कां ? अशा रीतीनें विचार करून मग काम करावयाचें असेल तें करावें.

आमच्या गुरूचें असें मत आहे कीं—"जो मनुष्य केलेला उपकार जाणत नसेल, शक्तिहीन झालेला असेल, विद्येचा विक्रय करणारा असेल, हताश झालेला असेल, देशोदेशीं भटकणारा असेल, अविश्वासूक असेल, अथवा ज्याचा स्वीकार केल्यास प्रबळाशीं वैर उद्भवत असेल त्याचा त्याग करावा !'

कौटिल्य म्हणतोः—"भित्रेपणा, उडाणटप्पूपणा आणि खुनशीपणा हे दोष ज्याच्या अंगीं असतील तोच मनुष्य त्याज्य ठरतो इतर त्याज्य मानूं नयेत. जो आपल्याला अपकार करणारा असेल त्याचा त्याग करावा. जो शत्रूला अपकार करणारा असेल त्यांशीं दोस्ती करावी. दोंघांसहि अपकार करणारा असेल तेव्हां त्याच्याविषयीं विचार करावा.

ज्या बरोबर तह करणें उचित नव्हे अशा बरोबर तह करणें प्राप्त झाल्यास त्याची सरशी ज्या बाबतींत असेल त्या बाबतींत आपल्या अंगावर बाजू येणार नाहीं असा बंदोबस्त करून मग दोस्ती करावी.

बिघडलेला स्नेहसंबंध पुनः जोडावयाचा असेल तेव्हां शत्रूकडील इसमास आपल्या दरबारीं ठेवावयाचा तो त्यास उपकारबद्ध करून, प्रत्यक्ष आपल्याशीं संबंध न येईल अशा रीतीनें आणि आमरण त्याजवर नजर ठेवून असा ठेवून घ्यावा.

असा इसम कार्यक्षम असेल तर त्यास त्याच्या मालकावर म्हणजे आपल्या शत्रुवर उठवावें, किंवा रानटी बंडखोरांचा मोड करण्याकरितां त्यास सैन्याचा अधिकारी नेमून सरहद्दीवर किंवा दुसऱ्या ठिकाणीं पाठवून द्यावें.

अथवा त्यांस तयार मालाचा किंवा कच्च्या मालाचा व्यापार करण्यांत गुंतवून त्यांत त्यावर शत्रूशीं संगनमत केल्याचा आरोप ठेवून त्याचा सर्व माल जप्त करावा.

अथवा पुढचा त्रास मिटवण्याकरितां त्यांस गुप्तपणें शासन करून ताब्यांत ठेवावें आणि जर कदाचित् तो आपल्या वधाची इच्छा मनांत धरील असें वाटलें तर त्यांस ( परत आलेल्या माणसास ) ठारहि करावें.

कारण शत्रूशीं नित्यसहवासानें उत्पन्न झालेला दोष ज्याच्या अंगीं जडला तो इसम सापासारखा सहवासाला भयप्रद होतो.

जायते प्लक्षबीजाशात् कपोतादिव शाल्मलेः । उद्वेगजननो नित्यं पश्चादपि भयावहः ।
प्रकाशयुद्धं निर्दिष्टो देशे काले च विक्रमः । विभीषणमवस्कन्दः प्रमादव्यसनार्दनम् ।
एकत्र त्यागघातौ च कूटयुद्धस्य मातृका । योगगूढोपजापार्थं तूष्णींयुद्धस्य लक्षणम् ।

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे षष्ठोऽध्यायः संहितप्रयाणिकं परिपणितापरिपणि-
तापसृताश्च सन्धयः, आदितश्चतुस्त्रततमः ॥

---

# अध्याय १०५ द्वैधीभाविकाः सन्धिविक्रमाः ।

विजिगीषुर्द्वितीयां प्रकृतिमेवमुपगृह्णीयात् । सामन्तं सामन्तेन सम्भूय यायात् । यदि वा मन्येत—' पार्ष्णिं मे न ग्रहीष्यति, पार्ष्णिग्राहं वारयिष्यति, यातव्यं नाभिसरिष्यति, बलद्वैगुण्यं मे भविष्यति, वीवधासारौ मे प्रवर्तयिष्यति, परस्य वारयिष्यति, बह्वाबाधे मे पथि कण्टकान् मर्दायष्यति, दुर्गाटव्यपसारेषु दण्डेन चरिष्यति, यातव्यमविषह्ये दोषे सन्धौ वा स्थापयिष्यति, लब्धलाभांशो वा शत्रूनन्यान् मे विश्वासयिष्यती' ति । द्वैधीभूतो वा कोशेन दण्डं दण्डेन कोशं सामन्तानामन्यतमाल्लिप्सेत ।

---

प्लक्षबीज खाण्याची चटक लागलेल्या कपोतापासून जसा शालमली वृक्षाचा भीतिप्रद जन्म होतो तसाच हा इसमहि हानिकारक व भयप्रद होत असतो.

नेमलेल्या ठिकाणीं व नेमलेल्या वेळीं दिवसा—उजेडीं जें युद्ध चालतें तें उघड युद्ध होय.

एकीकडे हूल दाखवून दुसरीकडे एकाएकीं हल्ला करावयाचा, शत्रु गैरसावध अथवा संकटांत असतां त्याचा फायदा घेऊन त्याचा नाश करावयाचा, शत्रू सैन्यांतील कांहीं लोकांस सोडून देऊन इतर लोकांसच मारावयाचें असे हे कूट—युद्धाचे प्रकार आहेत.

शत्रूच्या सैन्यांत गुप्त मसलतीनें फितुरी करणें आणि गुप्त प्रयोगांत घात करणें हें गुप्त युद्धाचें लक्षण होय.

---

## दुहेरी धोरण; तह आणि लढाई

विजयेच्छु राजानें पुढील मार्गानें आपल्या शेजारच्या राजाशीं म्हणजे जवळील शत्रूशीं कारस्थान करून त्याजवर मात करावी. शेजारच्या एका राजाशीं सख्य करून दुसऱ्यावर स्वारी करावी.

अथवा त्यास जर असें वाटत असेल कीं "तो स्वतः पिछाडीवर हल्ला न करितां पिछाडीच्या शत्रूचें निवारण करील, ज्यावर स्वारी करावयास निघालों आहें त्या बरोबर दोस्ती करणार नाहीं, कारण असें झालें म्हणजे मला कचाट्यांत सांपडावें लागेल; तो माझा सारा दाणागोटा गोळा करण्यांत उपयोगी पडेल, शत्रूला दाणागोटा गोळा करूं देणार नाहीं, माझ्या देशांतील व वाटेंतील दंगेधोपे शांत करील, रानटी बंडखोरांस दडपून टाकील, किल्ल्यांत किंवा अरण्यांत दडून बसलेल्या अपराध्यावर सैन्यानिशीं चाल करील, ज्यावर स्वारी करावयास निघालों आहे त्यांस चांगला गोत्यांत आणील किंवा त्यास तह करावयास भाग पाडील, तदनंतर जी लूट मिळेल तिचा भाग संतोषानें स्वीकारून माझा व माझ्या दुसऱ्या शत्रूंचा असाच सलोखा घडवून आणील '? तर एकाशीं तह व दुसऱ्यावर चढाई करावी व त्याकरितां शेजारच्या एखाद्या राजास द्रव्य देऊन सैन्य, किंवा सैन्य देऊन द्रव्य जरूरीप्रमाणें उभ करावें.

तेषां ज्यायसोऽधिकेनांशेन समात् समेन हीनाद्धीनेनेति समसन्धिः। विपर्यये विषमसन्धिः। तयोर्विशेषलाभादतिसन्धिः।

व्यसनिनमपायस्थाने सक्तमनर्थिनं वा ज्यायांसं हीनो बलसमेन लाभेन पणेत। पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत। अन्यथा सन्दध्यात्।

एवम्भूतो हीनशक्तिः प्रतापपूरणार्थं सम्भाव्यार्थाभिसारी मूलपार्ष्णित्राणार्थं वा ज्यायांसं हीनो बलसमाद् विशिष्टेन लाभेन पणेत। पणितः कल्याणबुद्धिमनुगृह्णीयात्। अन्यथा विक्रमेत।

जातव्यसनप्रकृतिरन्ध्रमुपस्थितानर्थं वा ज्यायांसं हीनो दुर्गमित्रप्रतिस्तब्धो वा ह्रस्वमध्वानं यातुकामः शत्रुमयुद्धमेकान्तसिद्धिं लाभमादातुकामो बलसमाद्धीनेन लाभेन पणेत। पणितस्तस्य अपकारसमर्थो विक्रमेत। अन्यथा सन्दध्यात्।

अरन्ध्रव्यसनो वा ज्यायान् दुरारब्धकर्माणं भूयः क्षयव्ययाभ्यां योक्तुकामो दूष्यदण्डं प्रवासयितुकामो दूष्यदण्डमावाहयितुकामो वा पीडनीयमुच्छेदनीयं वा हीनेन व्यथयितुकामः सन्धिप्रधानो वा कल्याणबुद्धिः हीनं लाभं प्रतिगृह्णीयाद्। कल्याणबुद्धिना सम्भूयार्थं लिप्सेत। अन्यथा विक्रमेत।

एवं समः सममतिसंदध्याद्, अनुगृह्णीयाद् वा।

---

वरिष्ठ, समान व कनिष्ठ दर्जाच्या राजाशीं तह केला आणि त्यांस द्यावयाचा लुटीचा भाग अनुक्रमें अधिक, सारखा व कमी असा ठरविला म्हणजे तो समसंधि म्हणावा, याच्या उलट भाग ठरल्यास विषमसंधि म्हणावा. आणि इतरांना विनाकारण फाजील भाग द्यावा लागला तर तो ' अतिसंधि ' म्हणजे ' फसवणूक ' होय.

वरिष्ठ राजा संकटांत गुरफटला असेल, दुःखांत असेल, अथवा दुर्दैवाच्या फेऱ्यांत असेल, तेव्हां त्याकडे कनिष्ठ राजानें जाऊन 'मला सैन्य पुरविल्यास' मी त्यामानानें लुटीचा भाग तुला देईन अशी शर्त घालून तहाचें बोलणें करावें. अशी शर्त त्यांस घातल्यानंतर बलवान पण संकटांत सांपडलेल्या राजानें स्वतःच्या अंगी अपकार करण्याची ताकद असल्यास लढाईस उठावें, नाहींतर सांगितलेली शर्त कबूल करून तह करावा.

कनिष्ठ राजास आपली शक्ति व संपत्ति कमी होत चालली आहे हें समजून ती वाढवावयाची असेल अथवा राज्याच्या अघाडी–पिछाडीचा चांगला बचाव करावयाचा असेल तेव्हां त्यानें वरिष्ठ राजाकडे जाऊन मला तुजकडून इतकें इतकें सैन्य मिळालें म्हणजे लुटीच्या अर्ध्याहून अधिक भाग तुला देईन " असें सांगून तहाचें बोलणें करावें. बलिष्ठ राजानें त्याचा सद्धेतु असल्यास तह कबूल करावा नसल्यास लढाईस उठावें.

कनिष्ठ म्हणजे शक्तिहीन राजाला, किंवा ज्यास किल्ल्यांचा किंवा मित्रांचा पाठिंबा आहे अशा राजाला लढाईवांचून शत्रूला पकडण्याकरितां किंवा अपेक्षित फायदा हस्तगत करण्याकरितां लहानशा स्वारीवर जावयाचें असेल तेव्हां त्यानें व्यसनाधीन, रोगग्रस्त, असंतुष्ट प्रजा असलेला व अनेक अनर्थांत सांपडलेला एखादा वरिष्ठ राजा गांठावा आणि त्यांस आपल्या इतकेंच सैन्य पुरविण्यास पण लुटीचा कमी भाग स्वीकारण्यास सांगून तहाचें बोलणें लावावें. अशी शर्त घातल्यानंतर अपकार करण्याची अंगांत ताकद असल्यास वरिष्ठ राजानें लढाईस उठावें, नसल्यास तह कबूल करावा.

सुस्थितींत असलेल्या वरिष्ठ दर्जाच्या राजास शत्रूनें आरंभलेल्या नीच कार्यांत शत्रूला मनुष्यहानि व खर्च सोसणें भाग पडावें असें वाटत असेल, अथवा दगेबाज लष्करी शिपाई हद्दपार करण्याची किंवा शत्रूच्या कचाट्यांत ढकलण्याची इच्छा असेल अथवा शत्रूचें मर्दन किंवा उन्मूलन करण्याच्या इराद्यानें कनिष्ठ राजास पेचांत आणावयाची इच्छा असेल तर त्यानें तहाकरितां तह करावयाचा म्हणून किंवा सद्बुद्धीनें प्रेरित होऊन कमी भाग स्वीकारावा आणि आपल्याप्रमाणेंच सद्बुद्धीनें प्रेरित झालेल्या दुसऱ्या राजाशीं संयोग करून आपला अर्थ साध्य करावा, नाहींतर लढाईस उभें रहावें,

परानीकस्य प्रत्यनीकं मित्राटवीनां वा शत्रोर्विभूमीनां देशिकं मूलपार्ष्णित्राणार्थं वा समः समबलेन लाभेन पणेत। पणितः कल्याणबुद्धिमनुगृह्णीयाद्, अन्यथा विक्रमेत।

जातव्यसनप्रकृतिरन्धमनेकविरुद्धमन्यतो लभमानो वा समः समबलाद्धीनेन लाभेन पणेत। पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा सन्दध्यात्।

एवम्भूतो वा समः सामन्तायत्तकार्यः कर्तव्यबलो वा बलसमाद् विशिष्टेन लाभेन पणेत। पणितः कल्याणबुद्धिमनुगृह्णीयाद्, अन्यथा विक्रमेत।

जातव्यसनप्रकृतिरन्ध्रमभिहन्तुकामः स्वारब्धमेकान्तसिद्धिं वास्य कर्मोपहन्तुकामो मूले यात्रायां वा प्रहर्तुकामो यातव्याद् भूयो लभमानो वा ज्यायांसं हीनं समं वा भूयो याचेत। भूयो वा याचितः स्वबलरक्षार्थं दुर्धर्षमन्यद्दुर्गमासारमटवीं वा परदण्डेन मर्दितुकामः प्रकृष्टेऽध्वनि काले वा परदण्डं क्षयव्ययाभ्यां योक्तुकामः परदण्डेन वा विवृद्धस्तमेवोच्छेत्तुकामः परदण्डमादातुकामो वा भूयो दद्यात्।

ज्यायान् वा हीनं यातव्यापदेशेन हस्ते कर्तुकामः परमुच्छिद्य वा तमेवोच्छेत्तुकामः त्यागं

---

शत्रूच्या सैन्यास टक्कर देतां येईल, मित्रराजांचा व अरण्यांत राहणाऱ्या लोकांचा बचाव करतां येईल, किंवा राज्याच्या आघाडीचें व पिछाडीचें संरक्षण करतां येईल इतकें सैन्य तुम्ही पुरविल्यास लुटीचा सारखा भाग तुम्हांस देईन अशा शर्तीवर समान दर्जाच्या राजांशीं तहाचें बोलणें लावावें. असें बोलणें लावणाऱ्याचा हेतु चांगला असल्यास दुसऱ्यानें त्याशीं तह कबूल करावा नाहींतर लढाईस उठावें.

राजाला दुसरीकडून मदत मिळण्यासारखी असेल तर त्यानें आपल्या बरोबरीचा जो राजा अनेक संकटांनीं गांजलेला व अनेकांच्या कचाट्यांत सांपडलेला असेल त्यांस आपल्याइतकेंच सैन्य पुरविण्याची व लुटीचा कमी वांटा स्वीकारण्याची शर्त घालून तहाचें बोलणें लावावें. अशी शर्त घातल्यानंतर अंगांन अपकार करण्याची ताकद असेल तर त्यानें लढाईस उठावें नाहींतर तह कबूल करावा.

राजा जर अशा म्हणजे भयावहस्थितींत असेल, किंवा त्याचें कार्य सर्वस्वी शेजारच्या राजांवर अवलंबून असेल, अथवा त्याचें सैन्य तयार व्हावयाचें असेल तर त्यानें निम्यापक्षां अधिक भाग देण्याचें कबूल करावें. तो कबूल केल्यानंतर त्याचा हेतु चांगला दिसल्यास दुसऱ्यानें त्यास मदत द्यावी न दिसल्यास लढाईस उठावें.

राजा ज्यावर स्वारी करावयास उठला आहे त्यापासून त्यास वरचेवर पुष्कळ खंडणी मिळत गेलेली असली तरी सुद्धां, तो दुसरा राजा मोठा असो, लहान असो वा बरोबरीचा असो, तो अनर्थपरंपरेंत गुरफटला आहे असें पाहून त्यांस हाणून पाडण्याच्या इरायानें, अथवा त्यानें आरंभलेल्या अत्यंत फायदेशीर अशा सत्कार्यांत विघात करण्याच्या इरायानें, अथवा त्याच्याच राजधानींत किंवा स्वारींत त्यावर घाव घालण्याच्या इरायानें, पहिला राजा दुसऱ्या राजाजवळ वरचेवर खंडणीची मागणी करीत जाईल. पण ज्यावर मागणी केली आहे, त्यांस जर असें वाटत असेल कीं, स्वतःची शक्ति कायम राखण्याकरितां परसैन्याच्या मदतीनेंच पहिल्याचा एखादा दुर्घट किल्ला किंवा मित्र हस्तगत करितां येईल किंवा पहिल्याचा जंगली प्रांत उध्वस्त करितां येईल, अथवा पहिल्याचें सैन्य दूर अंतरावर बरेच दिवस गुंतवून त्यांस अतोनात मनुष्यहानि व खर्च सोसावयास लावितां येईल, अथवा परसैन्याच्या मदतीनें वरचढ करून त्याचाच घात करितां येईल, तर त्यानें खुशाल ती मागणी पूर्ण करावी.

एखाद्या राजाला जेव्हां दुसरा एखादा वरिष्ठ किंवा कनिष्ठ राजा स्वारीच्या धाकानें हस्तगत करून ठेवावयाचा असेल अथवा त्याच्या मदतीनें तिसऱ्या शत्रूचा नाश करून मग त्यांस उखडून टाकावयाचें असेल अथवा दिलेली खंडणी परत घ्यावयाची असेल तेव्हां त्यानें सैन्य–पुरवठ्याच्या मानानें अधिक फायदा देण्याचें

वा कृत्वा प्रत्यादातुकामो बलसमाद् विशिष्टेन लाभेन पणेत । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत अन्यथा सन्दध्यात् । यातव्यसंहितो वा तिष्ठेत् । दूष्यामित्राटवीदण्डं वास्मै दद्यात् ।

जातव्यसनप्रकृतिरन्धो वा ज्यायान् हीनं बलसमेन लाभेन पणेत । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा सन्दध्यात् ।

एवम्भूतं वा हीनं ज्यायान् बलसमाद्धीनेन लाभेन पणेत । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा सन्दध्यात् ॥

आतो बुध्येत पणितः पणमानश्च कारणम् । ततो वितर्क्योभयतो यतः श्रेयस्ततो व्रजेत् ॥

आतो बुध्येत पणितः पणमानश्च कारणम् । ततो वितर्क्योभयतो यतः श्रेयस्ततो व्रजेत् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे सप्तमोऽध्यायः द्वैधीभाविकाः सन्धिविक्रमाः, आदितः पञ्चशततमः ॥

---

## अध्याय १०६ यातव्यवृत्तिः अनुग्राह्यमित्रविशेषाश्च

यातव्योऽभियास्यमानः सन्धिकारणमादातुकामो विहन्तुकामो वा सामवायिकानामन्यतमं लाभद्वैगुण्येन पणेत । प्रपणिता क्षयव्ययप्रवासप्रत्यवायपरोपकारशरीराबाधांश्चास्य वर्णयेत् । प्रतिपन्नमर्थेन योजयेत् । वैरं वापरैर्ग्राहयित्वा विसंवादयेत् ।

---

कबूल करून तहाचें बोलणें लावावें. दुसऱ्या राजाच्या अंगांत त्याला अपाय करण्याची ताकद असल्यास त्यानें लढाईस उभें रहावें, नाहीं तर तह कबूल करावा. अथवा ज्यावर स्वारीचा घाट असेल त्या बरोबर दोस्ती करून स्तब्ध बसावें, अथवा ज्या सैन्यांत राजद्रोही, वैरी किंवा रानटी बंडखोर लोक आहेत असें सैन्य त्याला द्यावें.

राजा वरिष्ठ दर्जाचा असून तो जर अनेक अनर्थांच्या चक्रांत सांपडलेला असेल तर त्यानें कनिष्ठ राजाला सैन्य पुरवठ्याच्या मानानें समान भाग देण्याचें कबूल करून तहाचें बोलणें लावावें. त्यास अपाय करण्याची ताकद असेल, तर दुसऱ्यानें लढाईस उठावें, नसेल तर तह कबूल करावा.

कनिष्ठ राजा अशाच म्हणजे भयावह स्थितींत असेल तर वरिष्ठ राजानें त्या राजाला सैन्य-पुरवठ्याच्या मानानें कमी भाग देण्याची अट घालून तहाचें बोलणें लावावें. कनिष्ठास वरिष्ठाला अपकार करण्याची ताकद असल्यास त्यानें लढाईस उठावें नसल्यास तह कबूल करावा.

तहाचें बोलणें करणारा व स्वीकारणारा या दोघांनीं परस्परांचे हेतु अगोदर पूर्णपणें समजून घ्यावे आणि नंतर पूर्ण विचाराअंतीं जो फायदेशीर मार्ग असेल तो स्वीकारावा.

---

### ज्यावर स्वारी करावयाची त्याची वृत्ति; ज्या मित्रास सहाय्य करावयाचें त्याचे गुण

एखाद्या राजावर स्वारी येण्याची भीति असेल, तेव्हां त्यानें स्वारी करणाऱ्या संयुक्त राजांपैकीं एखाद्या राजास गांठावें; आणि त्या राजाशीं संधि करण्याच्या बुद्धीनें किंवा त्यांची परस्परांतील जूट फोडण्याच्या बुद्धीनें, ज्या अटीवर तुमचा तहनामा झाला असेल, ती अट तुझ्या बाबतींत मीं स्वतःपत्करतों असें त्यास सांगून, अथवा संयुक्त राजांमधून फुटून निघण्यास सांगून तिकडे जितका फायदा झाला असता त्याच्या दुप्पट फायदा देण्याचें कबूल करावें, असें कबूल करणाऱ्यानें आणखी असें सांगावें कीं, तूं जर स्वारीवर गेलास, तर मनुष्यहानि होईल, द्रव्यहानि होईल. प्रवासाची दगदग पडेल, अनेक पापें होतील, हत्या होईल, शरीरास कष्ट होतील. इतक्यावर तो सलोखा करण्यास कबूल झाला तर त्यास कबूल केलेला भाग देऊन टाकावा. अथवा संयुक्त मंडळांतील इतर राजांशीं त्याचें वांकडें आणून त्यांच्यांतला सलोखा मोडून टाकावा.

दुरारब्धकर्माणं भूयः क्षयव्ययाभ्यां योक्तुकामः स्वारब्धायां वा यात्रायां सिद्धिं विघातयितुकामो मूले यात्रायां वा प्रतिहर्तुकामो यातव्यसंहितः पुनर्याचितुकामः प्रत्युत्पन्नार्थकृच्छ्रस्तस्मिन् अविश्वस्तो वा तदात्वे लाभमल्पमिच्छेद्, आयत्यां प्रभूतम्।

मित्रोपकारममित्रोपघातम् अर्थानुबन्धमवेक्षमाणः पूर्वोपकारकं कारयितुकामो भूयस्तदात्वे महान्तं लाभमुत्सृज्यायत्यामल्पमिच्छेत्।

दूष्यामित्राभ्यां मूलहरेण वा ज्यायसा विगृहीतं त्रातुकामस्तथाविधमुपकारं कारयितुकामः सम्बन्धापेक्षी वा तदात्वे च आयत्यां च लाभं न प्रतिगृह्णीयात्।

कृतसन्धिरतिक्रमितुकामः परस्य प्रकृतिकर्शनं मित्रामित्रसन्धिविश्लेषणं वा कर्तुकामः पराभियोगाच्छङ्कमानो लाभमप्राप्तमधिकं वा याचेत। तमितरस्तदात्वे च आयत्यां च क्रममवेक्षेत। तेन पूर्वे व्याख्याताः।

अरिविजिगीष्वोस्तु स्वं स्वं मित्रमनुगृह्णतोः शक्यकल्यभव्यारम्भिस्थिरकर्मानुरक्तप्रकृतिभ्यो विशेषः। शक्यारम्भी विषह्यं कर्मारभेत। कल्यारम्भी निर्दोषम्। भव्यारम्भी कल्याणोदयम्। स्थिर-

---

एखाद्या राजाला जेव्हां दुसऱ्या राजानें अविचारानें आरंभिलेल्या कार्यांत मनुष्यहानि व द्रव्यहानि घडवून आणावयाची असेल, अथवा विचारानें आरंभिलेल्या फायदेशीर कार्याचा विघात करावयाचा असेल, अथवा त्यास त्याच्याच प्रांतांत किंवा स्वारींत लुबाडावयाचें असेल, अथवा ज्यावर स्वारी करावयाची त्याच्याशीं सख्य जोडून त्या राजापासून खंडणी वसूल करावयाची असेल, अथवा आपण पैशाच्या अडचणींत असून दोस्ताचा विश्वास वाटत नसेल, तेव्हां अशा परिस्थितींत त्या राजानें सध्यां थोडक्या फायद्यांत संतुष्ट राहावें आणि पाठीमागून मोठा लाभ प्राप्त करून घेण्याची इच्छा धरावी.

अथवा मी ज्यास आज साहाय्य देत आहें, त्याच्या मदतीनें पुढें केव्हांतरी मला माझ्या मित्राचा अत्यंत फायदा करतां येईल किंवा माझ्या शत्रूची अत्यंत हानि करतां येईल, किंवा मला याच्यापासून मुबलक द्रव्य मिळवितां येईल अशी अपेक्षा असल्यास राजानें त्याजवर आगाऊ उपकार करून ठेवण्याच्या इच्छेनें सध्यां मिळत असलेला अधिक फायदा सोडून देऊन पुढें देऊं केला जाणारा अल्पसा लाभ स्वीकारावा.

एखाद्या राजाला जर असें वाटत असेल कीं ‘ अमक्या राजावर राजद्रोही लोकांनीं, शत्रूंनी, किंवा राज्य हरण करण्याच्या उद्देशानें एखाद्या बलिष्ठ राजानें लढाई पुकारली आहे आणि त्यास आपण मदत करून त्याचें संरक्षण केलें तर तोहि आपणांवर तसा प्रसंग गुदरल्यास मदत करील’ तर त्यानें स्नेह जोडण्यासाठीं आतांच्या किंवा पुढच्या फायद्याचा आग्रह न धरितां त्यास मदत करावी.

तह केल्यानंतर एखाद्याला तो तह मोडावासा वाटेल, किंवा शत्रूस प्रजेकडून जेरीस आणावेंसें वाटेल, किंवा मित्र व शत्रु यांच्याशीं त्यानें केलेले तह मोडवावेसें वाटेल, अथवा आपल्यावर कोणी चालून येईल अशी शंका वाटत असेल, तर आपणांस मिळावयाचा पण न मिळालेला फायदा किंवा त्याहून अधिक देखील हिस्सा मागून घ्यावा. अशा रीतीनें मागणी झाल्यास दुसऱ्यापक्षानेंहि आपण ती मागणी मान्य करावी कीं नाहीं हें पूर्वीच्या धोरणावरून ठरवावें. हाच नियम पूर्वीच्या पक्षांनाहि लागू आहे.

शत्रूचा पराजय करण्याची इच्छा धारण करून आपआपल्या मित्रांवर उपकार करणाऱ्या दोघां राजांत ज्याची प्रजा अनुरक्त आहे आणि जो शक्य, स्तुत्य व फायदेशीर कामें करणारा आहे, अशा मित्रावर उपकार करणारा अधिक शहाणा. आपल्या आटोक्यांत असलेलें काम हातीं घेणारा तो शक्यारंभी, निर्दोष कामें हातीं घेणारा तो कल्यारंभी, मोठीं फलोत्पादक कामें हातीं घेणारा तो भव्यारंभी, आणि काम पुरें केल्यावांचून जो थांबणारा नाहीं तो स्थिरकर्ता असें म्हणतात.

कर्मा नासमाप्य कर्मोपरमते। अनुरक्तप्रकृतिः सुसहायत्वादल्पेनाप्यनुग्रहेण कार्यं साधयति। त एते कृतार्थाः सुखेन प्रभूतं चोपकुर्वन्ति। अतः प्रतिलोमे नानुग्राह्याः।

तयोरेकपुरुषानुग्रहे यो मित्रं मित्रतरं वानुगृह्णाति सोऽतिसन्धत्ते। मित्रादात्मवृद्धिं हि प्राप्नोति। क्षयव्ययप्रवासपरोपकारान् इतरः। कृतार्थश्च शत्रुर्वैगुण्यमेति।

मध्यमं त्वनुगृह्णतोर्यो मध्यमं मित्रं मित्रतरं वानुगृह्णाति सोऽतिसन्धत्ते। मित्रादात्मवृद्धिं हि प्राप्नोति। क्षयव्ययप्रवासपरोपकारानितरः। मध्यमश्चेदनुगृहीतो विगुणः स्यादमित्रोऽतिसन्धत्ते। कृतप्रयासं हि मध्यमामित्रमपसृतमेकार्थोपगतं प्राप्नोति।

तेनोदासीनानुग्रहो व्याख्यातः।

मध्यमोदासीनयोर्बलांशदाने यः शूरं कृतास्त्रं दुःखसहमनुरक्तं वा दण्डं ददाति, सोऽतिसन्धीयते। विपरीतोऽतिसन्धत्ते।

यत्र तु दण्डः प्रतिहतस्तं वा चार्थमन्यांश्च साधयति, तत्र मौलभृतश्रेणीमित्राटवीबलानामन्यतममुपलब्धदेशकालं दण्डं दद्यात्। अमित्राटवीबलं वा व्यवहितदेशकालम्।

---

ज्यास प्रजाजनांचें साहाय्य असल्यामुळें जो थोड्या मदतीनेंसुद्धां मोठें कार्य तडीस नेऊं शकतो तो अनुरक्त प्रकृति ह्मणावा; अशा मित्रांचें मन संतुष्ट ठेविलें ह्मणजे ते आनंदानें हवी तितकी मदत देण्यास तयार होतात. यांच्या उलट असतील त्यांस मदत करूं नये.

शत्रु व विजयेच्छु राजा या दोघांस जेव्हां एकाच राजास अथवा मनुष्यास मदत करणें शक्य असेल, तेव्हां त्या दोघांपैकीं जो खऱ्या मित्रभावानें वागणाऱ्यास अथवा अधिक मित्रभावानें वागणाऱ्यास मदत करितो तो दुसऱ्यावर ताण करतो असें समजावें; कारण खऱ्या मित्राच्या सहाय्यानें त्याचा उत्कर्ष होतो. खऱ्या मित्रास साहाय्य न करतां भलत्यास साहाय्य करणारा राजा मनुष्यहानीच्या व खर्चाच्या पेचांत येतो, प्रवासाची दगदग पावतो, एवढाच त्याच्या परोपकाराचा फायदा! असें झालें ह्मणजे शत्रू कृतकार्य होऊन अधिकच उखाळ्या पाखाळ्या काढूं लागतो.

शत्रू व विजयेच्छु राजा या दोघांस जेव्हां एखाद्या मध्यस्थ राजास मदत करावयाची असेल, तेव्हां आपल्याशीं खऱ्या मित्रत्वानें किंवा अधिक मित्रत्वानें वागणाऱ्या मध्यस्थ राजास जो मदत करतो तो दुसऱ्यावर ताण करतो असें समजावें. कारण मित्राच्या साहाय्यानें त्याचा उत्कर्ष होतो. मध्यस्थ असा नसेल तेव्हां तो राजा मनुष्यहानीच्या व खर्चाच्या पेचांत येतो व त्यास प्रवासाची दगदग पडते. एवढाच त्याच्या परोपकाराचा फायदा! मध्यस्थ राजाला मदत केली आणि तो उलटला ह्मणजे शत्रूची सरशी झाली असें समजावें. कारण आपण यातायात करून जो मित्र जोडावयास गेलों तो मध्यस्थ आपल्याशीं फटकून वागून आयताच आपल्या शत्रूस जाऊन मिळतो.

उदासीन राजास मदत करतांनाहि वरीलप्रमाणें विचार करावा.

मध्यस्थ व उदासीन या दोहोंतून एखाद्या राजास मदतीकरितां आपलें कांहीं सैन्य पाठविल्यास आपला कार्यभाग साधेल असें जेव्हां दिसून येईल तेव्हां जो राजा आपलें शूर, जय्यत तयारीचें, काटक, व राजनिष्ठ असें सैन्य मदतीकरतां पाठवितो तो फसतो. याच्या उलट वागणाऱ्याचा कार्यभाग साधतो.

पण ज्या ठिकाणीं भाडोत्री सैन्याच्या हातून कार्यभाग होणार नाहीं व चांगल्या सैन्याच्या हातून तो कार्यभाग होऊन शिवाय इतर कामेंहि होतील असें वाटेल तेथें आपलें खास हुजरात, पगारी, सडें सैन्य किंवा मित्रांचें अगर सरहद्दीवरचें सैन्य देशकालादिकांची अट घालून मदतीस पाठवावें. अशी अट घालण्याजोगी नसेल तर मित्रांचें किंवा सरहद्दीवरचें मात्र सैन्य पाठवावें; हुजुरात सैन्य पाठवूं नये.

यं तु मन्येत—'कृतार्थो मे दण्डं गृह्णीयात्, अमित्राटव्यभूम्यवृतुषु वा वासयेदफलं वा कुर्यादि'ति, दण्डव्यासङ्गापदेशेन नैनमनुगृह्णीयात्। एवमवश्यं त्वनुग्रहीतव्ये तत्कालसहमस्मै दण्डं दद्यात्। आ समाप्तेश्चैनं वासयेद् योधयेच्च, बलव्यसनेभ्यश्च रक्षेत् । कृतार्थाच्च सापदेशमवस्रावयेत्। दूष्यामित्राटवीदण्डं वाऽस्मै दद्यात्। यातव्येन वा सन्धायैनमतिसन्दध्यात्।

समे हि लाभे सन्धिः स्याद् विषमे विक्रमो मतः। समहीनविशिष्टानामित्युक्ताः सन्धिविक्रमाः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे अष्टमोऽध्यायः। यातव्यवृत्तिरनुग्राह्यमित्रविशेषाः आदितः षट्छततमः ॥

---

# अध्याय १०७ मित्रहिरण्यभूमिकर्मसन्धयः



संहितप्रयाणे मित्रहिरण्यभूमिलाभानामुत्तरोत्तरो लाभः श्रेयान्। मित्रहिरण्ये हि भूमिलाभाद् भवतः, मित्रं हिरण्यलाभात्। यो वा लाभः सिद्धः शेषयोरन्यतरं साधयति।

'त्वं चाहं च मित्रं लभावहे' इत्येवमादिः समसन्धिः । 'त्वं मित्रम्' इत्येवमादिर्विषमसन्धिः। तयोर्विशेषलाभादतिसन्धिः।

---

जेव्हां असें वाटेल कीं, हा माझें सैन्य घेऊन उपकारबद्ध होईल खरा, पण माझ्या सैन्याला अवेळीं अवघड वाटेनें नेईल, रानांत किंवा शत्रूच्या तावडींत छावणी करावयास लावील, किंवा माझ्या सैन्याचा योग्य उपयोग करणार नाहीं, त्यावेळीं सैन्याची कवाईत शिकविण्याची वेळ आहे असें सांगून मदत देण्याचें टाळावें. त्यास कुमक देणें अत्यावश्यक असल्यास त्या काळाला वहिवाटलेलें असें सैन्य पाठवावें आणि कार्य संपेपर्यंत तो त्या सैन्याची नीट निगा राखील व योग्य वेळीं लढाईला पाठवील अशी दक्षता ठेवावी आणि त्या सैन्यावर इतर संकटें न येतील अशी त्याची चांगली काळजी घ्यावी. त्याचा कार्यभाग उरकल्यानंतर कांहीं निमित्तानें आपलें सैन्य परत आणवावें. अथवा त्याला कुमक पाठवावयाची झाल्यास त्याकडे राजद्रोही किंवा रानटी बंडखोर पलटण रवाना करावी. अथवा ज्यावर स्वारी करण्याचा त्याचा घाट आहे, त्याच्याशींच आपण सलोखा करून याला खडे चारावे.

वरिष्ठ, कनिष्ठ व समान राजांत सारखा सारखा लाभ होत असेल तर तह किंवा खरा सलोखा होतो. आणि कमीअधिक लाभ होण्याचा प्रसंग आल्यास युद्ध उपस्थित होतें; असा हा समविषम राजांमधील तह किंवा युद्ध करण्याविषयींचा विचार आहे.

---

## मित्रलाभ, द्रव्यलाभ, भूमिलाभ, दुर्गलाभ, इत्यादिकरतां केलेले तह.

संयुक्त राजांच्या स्वारींत मित्रलाभापेक्षां द्रव्यलाभ व द्रव्यलाभापेक्षां भूमिलाभ अधिक चांगला. कारण भूमि मिळाली म्हणजे मित्र व द्रव्य यांची प्राप्ति आपोआप होते. द्रव्यलाभ झाला म्हणजे मित्रलाभ होतो. किंवा मित्रलाभ व द्रव्यलाभ यांतून कोणताहि एक लाभ झाला कीं बाकीच्याचा लाभ आपोआप होतो.

"तुझाहि मित्र मिळावा व मलाहि मित्र मिळावा" अशा प्रकारच्या समान भूमिकेवर केलेला तह म्हणजे समसंधि, आणि "तुला मित्र आणि मला भूमि किंवा द्रव्य" अशा भिन्न लाभाच्या करारानें केलेला तह म्हणजे विषमसंधि म्हणावा; त्यांत एकाचाला फाजील फायदा झाला असेल तर त्यास अतिसंधि किंवा शुद्ध फसवणूक म्हणावें.

**समसन्धौ तु यः सम्पन्नं मित्रं मित्रकृच्छ्रे वा मित्रमवाप्नोति सोऽतिसन्धत्ते । आपद्धि सौहृदस्थैर्यमुत्पादयति ।**

**मित्रकृच्छ्रेऽपि नित्यमवश्यमनित्यं वश्यं वेति । 'नित्यमवश्यं श्रेयः, तद्ध्यनुपकुर्वदपि नापकरोति ' इत्याचार्याः ।**

**नेति कौटल्यः । वश्यमनित्यं श्रेयः, यावदुपकरोति तावन्मित्रं भवति । उपकारलक्षणं मित्रमिति ।**

**वश्ययोरपि महाभोगमनित्यमल्पभोगं वा नित्यमिति । 'महाभोगमनित्यं श्रेयः, महाभोगमनित्यमल्पकालेन महदुपकुर्वन्महान्ति व्ययस्थानानि प्रतिकरोति ' इत्याचार्याः ।**

**नेति कौटल्यः । नित्यमल्पभोगं श्रेयः, महाभोगमनित्यमुपकारभयादपक्रामति, उपकृत्य वा प्रत्यादातुमीहते । नित्यमल्पभोगं सातत्यादल्पमुपकुर्वन्महता कालेन महदुपकरोति ।**

**गुरुसमुत्थं महन्मित्रं लघुसमुत्थमल्पं वेति । 'गुरुसमुत्थं महन्मित्रं प्रतापकरं भवति, यदा चोत्तिष्ठते, तदा कार्यं साधयति ' इत्याचार्याः ।**

---

समसंधींत म्हणजे सारख्या अटीवर झालेल्या तहांत जो कोणी ऐश्वर्यवान मित्र संपादन करील त्यानें ताण केली असें समजावें; अथवा जो मित्रांची वाण भासत असतांना मित्र संपादन करील त्यानें ताण केली असें समजावें; कारण संकट प्रसंगीं जडलेली मैत्री कायमची टिकते.

मित्राची वाण भासत असतांना कोणत्या प्रकारच्या मित्राशीं सख्य करावें ? जो चिरकाल मित्रत्वानें वागणारा पण आपल्या कह्यांत न वागणारा अशा मित्राशीं किंवा नेहमीं मित्रत्वानें नसणारा पण आपल्या कह्यांत राहणारा अशा मित्राशीं ? जो चिरकालिक मैत्री ठेवणारा असेल त्याच्याशीं सख्य करावें, मग तो आपल्या तंत्राप्रमाणें वागणारा नसला तरी अपकार तरी करणार नाहीं असें आमचे गुरु म्हणतात.

पण कौटिल्य म्हणतो–असें नाहीं; जो आपल्या तंत्राप्रमाणें वागणारा असेल त्याशींच मैत्री करावी. मग तो हंगामी अथवा शाळूसोबती असला तरी हरकत नाहीं; जेवढा वेळ उपकार करील तेवढ्या पुरता तरी तो मित्र असतो. कारण उपकार हेंच मित्रत्वाचें लक्षण आहे.

आपल्या मर्जीप्रमाणें वागणारे दोन मित्र आहेत; त्यांपैकीं एकाजवळ अपरिमित संपत्ति आहे, पण त्याची मैत्री हंगामी आहे व दुसऱ्याजवळ अल्पसंपत्ति आहे, पण त्याची मैत्री कायम टिकणारी आहे, यांत चांगला कोण ? ज्याजवळ अपरिमित संपत्ति आहे तो चांगला, मग तो कायम टिकणारा मित्र नसला तरी हरकत नाहीं; कारण तो कायम टिकणारा मित्र नसला तरी त्याजवळ अपरिमित संपत्ति असल्यामुळें, थोडक्या अवकाशांत तो अनेक मार्गांनीं मदत करूं शकतो, त्याच प्रमाणें मोठ्या खर्चाचीं कामेंहि अंगावर घेऊं शकतो–असें आमचे गुरु ह्मणतात.

परंतु कौटिल्य ह्मणतो– 'असें नाहीं; जो कायम टिकणारा मित्र असेल, तोच चांगला–मग त्याजवळ संपत्ति कमी असली तरी चालेल; कारण ज्याजवळ पुष्कळ संपत्ती तो हंगामी सोबती असल्यामुळें स्वतःचें नुकसान होत आहे असें पाहून मैत्री सोडून जाईल, अथवा केलेल्या उपकाराची परत फेड मागेल; परंतु कायम टिकणाऱ्या मित्राजवळ कमी संपत्ति असली तरी त्याची मैत्री कायम असल्यामुळें सतत थोडथोडा लाभ झाला तरी एकंदरींत मोठा लाभ घडतो.

दोन मित्रांपैकीं एक बलाढ्य आहे पण उठावणी करावयास प्रयास पडतात. आणि दुसऱ्याची सहज उठावणी करतां येते, पण तो दुर्बल आहे. यांतून अधिक चांगला कोणता ?

आमचे गुरु म्हणतात––बलाढ्य मित्र पराक्रम गाजविणारा असतो म्हणून तो चांगला, मग त्यास उठावयास प्रयास पडत असले तरी हरकत नाहीं. कारण तो एकदां उठला म्हणजे काम फत्ते केल्यावांचून राहाणार नाहीं.

नेति कौटल्यः—लघुसमुत्थमल्पं श्रेयः, लघुसमुत्थमल्पं मित्रं कार्यकालं नातिपातयति दौर्बल्याच्च यथेष्टभोग्यं भवति, नेतरत् प्रकृष्टभौमम्।

विक्षिप्तसैन्यमवश्यसैन्यं वेति। 'विक्षिप्तं सैन्यं शक्यं प्रतिसंहर्तुं वश्यत्वात् इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। अवश्यसैन्यं श्रेयः। अवश्यं हि शक्यं सामादिभिर्वश्यं कर्तुं, नेतरत् कार्यव्यासक्तं प्रतिसंहर्तुम्।

पुरुषभोगं हिरण्यभोगं वा मित्रमिति। 'पुरुषभोगं मित्रं श्रेयः, पुरुषभोगं मित्रं प्रतापकरं भवति। यदा चोत्तिष्ठते तदा कार्यं साधयति' इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। हिरण्यभोगं मित्रं श्रेयः, नित्यो हिरण्येन योगः कदाचिद् दण्डेन दण्डश्च हिरण्येनान्ये च कामाः प्राप्यन्त इति।

हिरण्यभोगं भूमिभोगं वा मित्रमिति। 'हिरण्यभोगं गतिमत्वात् सर्वव्ययप्रतीकारकरम्' इत्याचार्याः।

नेति कौटल्यः—'मित्रहिरण्ये हि भूमिलाभाद् भवतः' इत्युक्तं पुरस्तात्। तस्माद् भूमिभोगं मित्रं श्रेय इति।

तुल्ये पुरुषभोगे विक्रमः क्लेशसहत्वमनुरागः सर्वबललाभो वा मित्रकुलाद् विशेषः।

---

परंतु कौटिल्य म्हणतो, असें नाहीं; दुर्बळ पण झटपट उठणारा मित्र चांगला; तो दुर्बळ असला तरी तत्काळ उठून लढाईस सज्ज रहाणारा असल्यामुळें विनाकारण कालक्षेप होत नाहीं. शिवाय तो आपल्यापेक्षां वरचढ नसल्यामुळें त्याला यथेष्ट राबवितां येतें. जो प्रबळ आहे त्याची मर्जी संभाळतां संभाळतांच पुरेवाट व्हावयाची !

ज्याचें सैन्य पांगलेलें आहे असा मित्र चांगला कीं ज्याचें सैन्य एकत्र आहे पण तें त्याच्या हुकमतींत नाहीं असा मित्र चांगला ? गुरु म्हणतात कीं ज्याचें सैन्य पांगलेलें आहे तो मित्र चांगला: कारण तें सैन्य त्याच्या कह्यांत असल्यामुळें जमवावयास आयास पडत नाहींत.

परंतु कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. ज्याचें सैन्य एकत्र आहे पण हुकमतींत नाहीं तो मित्र चांगला. कारण त्याच्या सैन्याची सामदामादि नानाप्रकारें समजूत घालून तें सैन्य आपल्या ताब्यांत आणतां येतें; पण पांगलेल्या सैन्यांतील लोक आपआपल्या उद्योगांत असल्यामुळें आयत्या वेळेस जमविणें कठीण जातें.

ज्याजवळ पुष्कळ शूर लोक आहेत असा मित्र चांगला, कां ज्याजवळ पुष्कळ संपत्ति आहे असा मित्र चांगला ? आमचे गुरु म्हणतात—ज्याजवळ पुष्कळ शूर लोक आहेत तो चांगला; कारण तो शूर पुरुष घेऊन एकदां उठला म्हणजे काम फत्ते केल्यावांचून राहाणार नाहीं असा तो पराक्रम गाजविणारा असतो.

परंतु यावर कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. ज्याजवळ भरपूर संपत्ति आहे तो चांगला; कारण पैशाचें काम नेहमीं लागणार असतें; सैन्याचें काम नेहमींच लागतें असें नाहीं त्यांतूनहि पैसा असला म्हणजे सैन्य मिळतें आणि दुसरेंहि हवें तें मिळतें.

ज्या जवळ पैसा भरपूर आहे तो मित्र चांगला, कीं ज्या जवळ जमीन पुष्कळ आहे तो मित्र चांगला ? ज्या जवळ पैसा भरपूर आहे तो मित्र चांगला; कारण त्या जवळ पाहिजे त्यापेक्षां पुष्कळच पैसा असल्यामुळें कितीहि खर्च झाला तरी त्यास विधिनिषेध वाटत नाहीं असें आचार्य म्हणतात.

पण कौटिल्य म्हणतो असें नाहीं; भूमि मिळाली म्हणजे मित्र व द्रव्य आपोआप मिळतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे, म्हणून ज्या जवळ जमीन आहे तो मित्र चांगला.

दोनहि मित्रांजवळ सारखेंच सैन्य आहे; परंतु एकाच्या सैन्याच्या अंगीं पराक्रम, क्लेशसहिष्णुता, राजनिष्ठा असून त्याचें सर्व सैन्य आपल्यास मिळण्यासारखें असेल तर तो मित्र चांगला.

तुल्ये हिरण्यभोगे प्रार्थितार्थता प्राभूत्यमल्पप्रयासता सातत्यं च विशेषः ।
तत्रैतद् भवति--
नित्यं वश्यं लघूत्थानं पितृपैतामहं महत् । अद्वैध्यं चेति सम्पन्नं मित्रं षड्गुणमुच्यते ॥
ऋते यदर्थं प्रणयाद् रक्ष्यते यच्च रक्षति । पूर्वोपचितसम्बन्धं तन्मित्रं नित्यमुच्यते ॥
सर्वचित्रमहाभोगं त्रिविधं वश्यमुच्यते । एकतोभोग्युभयतः सर्वतोभोगि चापरम् ॥
आदातृ वा दातृपि वा जीवत्यरिषु हिंसया । मित्रं नित्यमवश्यं तद् दुर्गाटव्यपसारि च ॥
अन्यतो विगृहीतं यल्लघुव्यसनमेव वा । सन्धत्ते चोपकाराय तन्मित्रं वश्यमध्रुवम् ॥
एकार्थानर्थसम्बन्धमुपकार्यविकारि च । मित्रभावि भवत्येतन्मित्रमद्वैध्यमापदि ॥
मित्रभावाद् ध्रुवं मित्रं शत्रुसाधारणाच्चलम् । न कस्यचिदुदासीनं द्वयोरुभयभावि तत् ॥
विजिगीषोरमित्रं यन्मित्रमन्तर्धितां गतम् । उपकारे निविष्टं वा शक्तं वानुपकारि तत् ॥
प्रियं परस्य वा रक्ष्यं पूज्यसम्बन्धमेव वा । अनुगृह्णाति यन्मित्रं शत्रुसाधारणं हि तत् ॥
प्रकृष्टभौमं सन्तुष्टं बलवच्चालसं च यत् । उदासीनं भवत्येतद् व्यसनादवमानितम् ॥

---

त्याच प्रमाणें दोघां मित्रांजवळ सारखीच संपत्ति असेल तर त्यांतला जो मागितल्याबरोबर द्यावयास तयार असेल, ज्याला स्वतःला गरज नसेल आणि ज्याचें मन वळविण्यास सुलभ असेल व ज्याची बुद्धि चंचल नसून स्थिर असेल तो मित्र चांगला.

यासंबंधानें पुढें दिलेले विचार चिंतनीय आहेतः—

कायम टिकणारा, अनुकूल, सहज किंवा अल्पप्रयासानें सज्ज होणारा, वाडवडिलांपासून स्नेह चालत आलेला, वैभवशाली, आणि प्रतारणा न करणारा असे हे मित्राच्या अंगचे सहा गुण सांगितले आहेत.

जो पैशाच्या लालुचीनें नव्हे तर केवळ प्रेमाखातर मैत्री करतो आणि जो पूर्वापार चालत आलेला स्नेह-संबंध कायम ठेवतो तोच कायम टिकणारा मित्र होय.

ज्या संपन्न मित्राची दंडकोशभूमिरूपी संपत्ति सर्व प्रकारांनीं उपभोगितां येते तो त्रिविध वश्य अथवा अनुकूल मित्र ह्मणावा. यांतून एकेक लाभ कमी अधिक असेल त्या मानानें त्यास एकतोभोगी, उभयतोभोगी किंवा सर्वतोभोगी म्हणावें.

त्याचप्रमाणें लहानमोठ्या सर्वप्रकारच्या संकटांत ज्याचा आधार घेतां येतो तोहि अनुकूल मित्र ह्मणावा. जो प्रसंगानुरूप साहाय्य देतो व घेतो, जो शत्रूला सदैव अपाय करून त्याजवरच जगतो आणि जो किल्ल्यांत किंवा रानांत दडून स्वतःचा बचाव करतो तो कायम टिकणारा पण प्रतिगामी मित्र समजावा.

शत्रूनें लढाई पुकारल्यामुळें किंवा क्षुद्र संकटांमुळें जो आपल्या बचावासाठीं सलोखा करतो तो अनुकूल पण अस्थिर मित्र होय.

भल्याबुऱ्या सुखदुःखाच्या काळांत ज्याचा संबंध कायम रहातो, जो कधीं आपल्याविरुद्ध जावयाचा नाहीं, तर उपकारच करील, तो मित्र संकटसमयीं प्रतारणा न करणारा असा ( अद्वैध्य ) समजावा.

प्रेमळपणानें वागणारा तो स्थिर मित्र; आणि शत्रूचाहि पक्ष धरणारा तो अस्थिर मित्र होय; आणि जो कोणाशींहि तटस्थवृत्तीनें वागत नाहीं तो दोघांचा मित्र होय.

विजयेच्छु राजाच्या शत्रूशीं गुप्तपणानें मैत्री करणारा मित्र कितीहि शक्तिवान् असला, अथवा मदत देत असला तरी त्यापासून नुकसानच व्हावयाचें असें समजावें.

जो राजा आपल्या शत्रूचा मित्र, आश्रित, पूज्य गृहस्थ अथवा आप्त यास मदत करितो तो आपल्याला शत्रूसारखाच आहे असें समजावें.

ज्याच्या राज्यांत मुबलक सुपीक जमीन आहे, जो अल्पसंतुष्ट व समाधानी आहे, ज्याला सैन्याचें पाठबळ आहे, पण जो आळशी आहे आणि जो व्यसनाधीन असल्यामुळें ज्याची कोणी पर्वा करीत नाहीं अशाला ‘ उदासीन ’ मित्र ह्मणतात.

अरेर्नेतुश्च यद् वृद्धिं दौर्बल्यादनुवर्तते । उभयस्याप्यविद्विष्टं विद्यादुभयभावि तत् ॥
कारणाकारणध्वस्तं कारणाकारणागतम् । यो मित्रं समुपेक्षेत स मृत्युमुपगूहति ॥
क्षिप्रमल्पो लाभश्चिरान्महानिति वा । 'क्षिप्रमल्पो लाभः कार्यदेशकालसंवादकः श्रेयान्' इत्याचार्याः ॥
नेति कौटल्यः । चिरादविनिपाती बीजसधर्मा महान् लाभः श्रेयान्, विपर्यये पूर्वः ।
एवं दृष्ट्वा ध्रुवे लाभे लाभांशे च गुणोदयम् । स्वार्थसिद्धिपरो यायात् संहितः सामवायिकैः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे नवमोऽध्यायः मित्रहिरण्यभूमिकर्मसन्धौ
मित्रसन्धिः, हिरण्यसंधिः, आदितः सप्तशततमः ॥

---

# अध्याय १०८ भूमिसन्धिः

'त्वं चाहं च भूमिं लभावहे' इति भूमिसन्धिः ।
तयोर्यः प्रत्युपस्थितार्थः सम्पन्नां भूमिमवाप्नोति सोऽतिसन्धत्ते ।

---

शत्रू आणि विजयेच्छु मित्र या दोघांचीहि अभिवृद्धि ध्यानांत आणून जो दुर्बलत्वानें दोघांच्याहि मर्जीप्रमाणें वागतो व कोणासच अप्रिय होत नाहीं तो उभयभावि मित्र समजावा.

कारणानें असो किंवा कारणावांचून असो, ज्या मित्राला कोणी अपाय करीत असेल, आणि कारणानें असो वा कारणाविना असो, जो मित्र मदत मागण्याकरितां आपल्याकडे आला असेल, अशा मित्राची जो उपेक्षा करील तो स्वतःच्या मृत्यूला आलिंगन देतो ( स्वतःचा नाश करून घेतो ) असें समजावें.

तत्काळ मिळणारा थोडा फायदा पत्करावा किंवा कालांतरानें मिळणारा मोठा फायदा पत्करावा ? यावर आमचे गुरु म्हणतात, तत्काळ मिळणारा थोडा फायदा चांगला; कारण त्याचा कार्य देश व काल यांशीं चांगलाच मेळ बसतो.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं; जो फायदा कालान्तरानेंहि बाधित होणार नाहीं व बीजांत जसा उत्पादक धर्म असतो तसा धर्म ज्यांत असेल तो भावी फायदाहि चांगला; तसा धर्म त्यांत नसेल तर थोडका पण तत्काळ मिळणारा फायदा पत्करावा.

याप्रमाणें राजानें आपला निश्चित फायदा कशानें होणार आहे आणि जो प्राप्तीचा अंश मिळणार तोहि वाढत जाणारा आहे कीं नाहीं, हें पाहून स्वतःची अभिवृद्धि करून घेण्याविषयीं तत्पर होऊन अनेक मित्र राजांसह सलोखा करून स्वारीस निघावें.

---

## भूमिलाभाकरितां तह

"तूं व मी दोघे मिळून देश जिंकून घेऊं" असें म्हणून दोघांनीं केलेला तह तो भूमिसंधि होय.

अशा दोघांपैकीं जो आपला कार्यभाग आधीं साधून संपन्न भूमि—देश—मिळवितो त्यानें दुसऱ्यावर ताण केली असें समजावें. दोघांसहि सारखीच सुपीक जमीन मिळाली असेल तर त्यांत ज्यानें बलाढ्य शत्रूला जिंकून जमीन मिळविली असेल त्यानें ताण केली असें म्हणावें; कारण त्यानें देश जिंकून शिवाय शत्रूला जर्जर करून स्वतःचा पराक्रम स्थापित केला असें सिद्ध होतें. बलहीनास जिंकून त्याची जमीन हस्तगत करणें हें खरोखर अगदीं सुकर कार्य; पण तो लाभहि तसाच निकृष्ट प्रतीचा असणार. शिवाय जवळचा राजा आजपर्यंत मित्रत्वानें वागत आला असला, तरी तो पुढें वैरीच होणार. कारण आतां आपण त्याचेवर स्वारी करूं अशी त्याला भीति वाटूं लागणार.

तुल्ये सम्पन्नालाभे यो बलवन्तमाक्रम्य भूमिमवाप्नोति सोऽतिसन्धत्ते । भूमिलाभं शत्रुकर्शनं प्रतापं च हि प्राप्नोति । दुर्बलाद् भूमिलाभे सत्यं सौकर्यं भवति । दुर्बल एव च भूमिलाभः, तत्सामन्तश्च मित्रममित्रभावं गच्छति ।

तुल्ये बलीयस्त्वे यः स्थिरं शत्रुमुत्पाट्य भूमिमवाप्नोति सोऽतिसन्धत्ते । दुर्गावाप्तिर्हि स्वभूमिरक्षणममित्राटवीप्रतिषेधं च करोति ।

चलामित्राद् भूमिलाभे शक्यसामन्ततो विशेषः । दुर्बलसामन्ता हि क्षिप्राप्यायनयोगक्षेमा भवति । विपरीता बलवत्सामन्ता कोशदण्डावच्छेदनी च भूमिर्भवति ।

सम्पन्ना नित्यामित्रा मन्दगुणा वा भूमिरनित्यामित्रेति । 'सम्पन्ना नित्यामित्रा श्रेयसी भूमिः । सम्पन्ना हि कोशदण्डौ सम्पादयति । तौ चामित्रप्रतिघातकौ ' इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः—नित्यामित्रालाभे भूयाञ्छत्रुलाभो भवति । नित्यश्च शत्रुरुपकृते चापकृते च शत्रुरेव भवति । अनित्यस्तु शत्रुरुपकारादनपकाराद्वा शाम्यति । यस्या हि भूमेर्बहुदुर्गाश्चोरगणैर्म्लेच्छाटवीभिर्वा नित्याविरहिताः प्रत्यन्ताः, सा नित्यामित्रा । विपर्यये त्वनित्यामित्रेति ।

अल्पा प्रत्यासन्ना महती व्यवहिता वा भूमिरिति । अल्पा प्रत्यासन्ना श्रेयसी । सुखा हि प्राप्तुं पालयितुमभिसारयितुं च भवति । विपरीता व्यवहिता ।

व्यवहिताव्यवहितयोरपि दण्डधारणात्मधारणा वा भूमिरिति । आत्मधारणा श्रेयसी । सा हि स्वसमुत्थाभ्यां कोशदण्डाभ्यां धार्यते । विपरीता दण्डधारणा दण्डस्थानमिति ।

---

दोघांचेही प्रतिस्पर्धी सारखेच पराक्रमी असतील, तर ज्यानें किल्ल्यांत किंवा खदक्रांत बसून लढाई करणाऱ्या शत्रूला उखडून प्रांत मिळविला त्यानें दुसऱ्यावर ताण केली असें समजावें. कारण किल्ला हातीं आल्यामुळें आपल्य प्रांताचें रक्षण होतें आणि शत्रूपासून व रानटी दरोडेखोरांपासून राज्याचा बंदोबस्त करतां येतो.

मैदानावर लढणाऱ्या शत्रूला जिंकून भूमि मिळविली तर त्यांत बलहीन राजाकडून झालेला भूमिलाभ हितकर. कारण दुर्बलाच्या भूमीचें सौकर्यानें संरक्षण करतां येतें व लागवडीस आणून ती भूमि संपन्न करतां येते. परंतु याच्या उलट बलाढ्य राजाला जिंकून जो प्रदेश घेतला असेल त्याचें संरक्षण करतां करतां पैसा व सैन्य यांचा चुराडा उडतो.

सुपीक पण शेजारीं कायमचा शत्रु असलेली जमीन चांगली कीं नापीक पण शेजारीं हंगामी शत्रू असलेली चांगली ? सुपीक जमीन चांगली, मग शेजारीं कायमचा शत्रू असला तरी हरकत नाहीं; कारण जमीन सुपीक असली म्हणजे पैसा मिळतो, सैन्यहि मिळतें. आणि यांच्या योगानें शत्रूस प्रतिरोध करतां येतो, असें आमचे गुरु म्हणतात.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं; शेजारीं कायमचा शत्रू असलेली जमीन मिळाली म्हणजे आणखी शत्रू उत्पन्न होतात. कायमच्या शत्रूवर उपकार केले किंवा त्यास अपकार केले, तरी तो शत्रूच रहाणार. हंगामी शत्रूवर उपकार करून अथवा त्यास अपकार करून नमवितां येतें. ज्या जमिनीच्या सरहद्दीवर अनेक किल्ले असून जींत चोरांच्या टोळ्या, म्लेंछ व रानटी लोक रहातात ती शेजारी कायमचा शत्रू असलेली जमीन म्हणावी; उलटपक्षीं हंगामी शत्रू असलेली समजावी.

लहान पण जवळ, आणि मोठीपण दूर यांपैकीं कोणती जमीन चांगली ? लहान पण जवळ जमीन चांगली; कारण ती मिळवावयास रक्षण करावयास व शत्रूविरुद्ध बचाव करावयास प्रयास पडत नाहींत; दूर जमिनीची तशी गोष्ट नाहीं.

जवळच्या व दूरच्या जमिनींमध्यें जी जमीन स्वतःचें रक्षण करूं शकते. ती चांगली, कीं जिचें रक्षण बाह्य उपायांनीं करावें लागतें ती चांगली ? जी स्वतःचें रक्षण करूं शकते ती चांगली; कारण तिजमध्यें उभारलेल्या

बालिशात् प्राज्ञाद् वा भूमिलाभ इति। बालिशाद् भूमिलाभः श्रेयान् । सुप्राप्यानुपाल्या हि भवत्यप्रत्यादेया च। विपरीता प्राज्ञादनुरक्तेति।

पीडनीयोच्छेदनीययोरुच्छेदनीयाद् भूमिलाभः श्रेयान् । उच्छेदनीयो ह्यनपाश्रयो दुर्बलापाश्रयो वाभियुक्तः कोशदण्डावादायापसर्तुकामः प्रकृतिभिस्त्यज्यते। न पीडनीयो दुर्गमित्रप्रतिस्तब्ध इति।

दुर्गप्रतिस्तब्धयोरपि स्थलनदीदुर्गीयाभ्यां स्थलदुर्गीयाद् भूमिलाभः श्रेयान्। स्थलीयं हि सुरोधावमर्दावस्कन्दमनिःस्रावशत्रु च। नदीदुर्गं तु द्विगुणक्लेशकरमुदकं च पातव्यं वृत्तिकरं चामित्रस्य।

नदीपर्वतदुर्गीयाभ्यां नदीदुर्गीयाद् भूमिलाभः श्रेयान् । नदीदुर्गं हि हस्तिस्तम्भसङ्क्रमसेतुबन्धनौभिः साध्यमनित्यगाम्भीर्यमवस्राव्युदकं च, पार्वतं तु स्वारक्षं दुरुपरोधि कृच्छ्रारोहणं भग्ने चैकस्मिन् न सर्ववधः, शिलावृक्षप्रमोक्षश्च महापकारिणाम्।

निम्नस्थलयोधिभ्यो निम्नयोधिभ्यो भूलाभः श्रेयान् । निम्नयोधिनो ह्युपरुद्धदेशकालाः, स्थलयोधिनस्तु सर्वदेशकालयोधिनः।

---

सैन्यानें व द्रव्यानें तिचें धारण–पोषण होतें; उलट प्रकारची जमीन सैन्य आणून जतन करावी लागते, म्हणजे ती केवळ लष्करी ठाणें होऊन बसतें.

मूर्खापासून मिळविलेली जमीन चांगली कीं शहाण्यापासून मिळविलेली चांगली? मूर्खापासून मिळविलेली चांगली; अशी जमीन मिळवावयास व राखावयास प्रयास पडत नाहींत; शिवाय ती परतहि द्यावी लागत नाहीं. परंतु शाहण्याच्या जमिनींतील (देशांतील) लोक त्यावर प्रेम करणारे असल्यामुळें, तिची गोष्ट उलट असते.

शत्रूस जिकिरीस आणून जमीन मिळविणें बरें कीं उखडून टाकून मिळविणें बरें? असा विचार पडल्यास, शत्रूस उखडून जमीन मिळवावी हें चांगलें; कारण, त्यावर हल्ला केला असतां, त्यास साहाय्य नसल्यामुळें, किंवा अल्प साहाय्य असल्यामुळें तो आपलें द्रव्य व सैन्य घेऊन पळून जातो म्हणून त्याचे प्रजाजन त्याचा त्याग करितात; परंतु शत्रूला नुसतें अडवून जेरीस आणावयाचें, असें म्हटलें तर शत्रू आपल्या मित्रांच्या व किल्ल्यांच्या जोरावर प्रतिकार करीत राहील.

किल्ल्यांच्या आश्रयानें राहणाऱ्या शत्रूंमध्यें भुईकोट किल्ल्यांतील शत्रूपासून जमीन मिळविणें सोपें कीं जंजिरा किल्ल्यांतील शत्रूपासून मिळविणें सोपें? भुईकोट किल्ल्यांतील शत्रूपासून मिळविणें सोपें; कारण भुईकोट किल्ला वेढा घालून उध्वस्त करावयास किंवा हल्ला करून हस्तगत करावयास फार प्रयास पडत नाहींत, व शत्रूसहि तेथून निसटून जातां येत नाहीं. परंतु जंजिऱ्या किल्ल्यास दुप्पट प्रयास पडतात, शिवाय त्यांतील शत्रूचा पाणी व अन्नसामग्री यांचा सांठा बंद करणें कठीण जातें.

जंजिरा किल्ला व डोंगरी किल्ला यांमध्यें जांजिऱ्या किल्ल्यांतील शत्रूपासून जमीन मिळविणें हें डोंगरी किल्ल्यांतिल शत्रूपासून जमीन मिळविण्यापेक्षां सोपें. कारण जंजिऱ्या किल्ल्याला नदीचा वेढा असला तरी तो हत्तीवरून, तात्पुरता पूल बांधून अथवा नांवावरून गांठतां येतो; कांहीं ठिकाणीं नदीला पाणी खोल नसल्यामुळें उतार मिळतो किंवा पाणी खोल असल्यास पाणी काढून टाकितां येतें. परंतु डोंगरी किल्ला स्वाभाविकपणें सुरक्षित असतो; त्यास वेढा घालण्यास किंवा चढून जावयास प्रयास पडतात; त्यावर मारा केला, तरी कांहीं भाग उध्वस्त करितां येईल, सर्व किल्ला उध्वस्त करितां येणार नाहीं; शिवाय शत्रूला डोंगरी किल्ल्याकरून मोठमोठे दगड किंवा झाडें फेकून मारा करितां येतो.

तळघाटांत लढणाऱ्यापासून जमीन मिळवावी कीं मैदानावर लढणाऱ्या पासून मिळवावी असा विचार पडल्यास, तळघाटांत लढणाऱ्यापासून जमीन मिळविणें चांगलें; कारण त्यास स्थळकालादि संबंधांत प्रतिकूल परिस्थितींत लढावें लागतें; पण मैदानावर लढणारा हव्या त्या ठिकाणीं व हव्या त्या वेळीं लढाई देऊं शकतो.

खनकाकाशयोधिभ्यः खनकेभ्यो भूमिलाभः श्रेयान् । खनका हि खातेन शस्त्रेण चोभयथा युध्यन्ते, शस्त्रेणैवाकाशयोधिनः ।

एवंविधेभ्यः पृथिवीं लभमानोऽर्थशास्त्रवित् । संहितेभ्यः परेभ्यश्च विशेषमधिगच्छति ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे दशमोऽध्यायः मित्रहिरण्यभूमिकर्मसन्धौ भूमिसन्धिः, आदितोऽष्टशततमः ॥

---

# अध्याय १०९—अनवसितसन्धिः

'त्वं चाहं च शून्ये निवेशयावह' इत्यनवसितसन्धिः । तयोर्यः प्रत्युपस्थितार्थो यथोक्तगुणां भूमिं निवेशयति सोऽतिसन्धत्ते ।

' तत्रापि स्थलमौदकं वेति । महतः स्थलादल्पमौदकं श्रेयः सातत्यादवस्थितत्वाच्च फलानाम् । स्थलयोरपि प्रभूतपूर्वापरसस्यमल्पवर्षपाकमसक्तारम्भं श्रेयः । औदकयोरपि धान्यवापमधान्यवापाच्छ्रेयः । तयोरल्पबहुत्वे धान्यकान्तादल्पान्महदधान्यकान्तं श्रेयः महत्यवकाशे हि स्थाल्याश्चानूप्याश्चौषधयो भवन्ति । दुर्गादीनि च कर्माणि प्राभूत्येन क्रियन्ते । कृत्रिमा हि भूमिगुणाः ।

खनिधान्यभोगयोः खनिभोगः कोशकरः, धान्यभोगः कोशकोष्ठागारकरः । धान्यमूला हि दुर्गादीनां कर्मणामारम्भाः । महाविषयविक्रयो वा खनिभोगः श्रेयान् ।

---

खंदकांत बसून लढणारा व आकाशांतून लढणारा यांमध्यें खंदकांत बसून लढणाऱ्यापासून जमीन मिळविणें सोपें. कारण, त्यास लढाईंत खंदक व शस्त्रें यावर अवलंबून रहावें लागतें. आकाशांतून लढणाऱ्याच्या गतीस प्रतिबंध कांहींच नसतो. त्याजला शस्त्राचीच काय ती गरज असते.

याप्रमाणें राजनीतिशास्त्रांत निष्णात असलेल्या राजानें वर सांगितलेल्या शत्रूपासून भूमि संपादन करावी, म्हणजे संयुक्त राजमंडळांतील इतर राजांवर व शत्रूंवर त्याची छाप पडते.

---

## बिनमुदतीचा तह.

" तूंव मी दोघे अमुक अमुक पडित देशांत वसाहत करूं या " या करारानें केलेल्या तहास बिनमुदतीचा तह म्हणतात. असा तह करणाऱ्यांपैकीं जो आधीं जाऊन सुपीक व सोईस्कर जमिनींत वसाहत करतो तो दुसऱ्यावर ताण करतो.

त्यांत जिराईत जमीन चांगली कीं बागाईत चांगली ? जिराईत जमीन मोठी असली तरी तिजपेक्षां लहानशीच कां होईना पण बागाईत जमीन चांगली; कारण तिला दुष्काळाचें भय नसून तींत सर्व ऋतूंत उत्पन्न काढितां येतें. जिराईत जमिनींत सुद्धां थोड्या पावसावर व अल्प श्रमानें जींत पाहिलीं व दुसरीं पिकें काढतां येतात ती चांगली; बागाईत जमिनींत धान्यांचीं पिकें जींत होतात ती जमीन इतर पिकांच्या जमिनीपेक्षां चांगली. बागाईत मोठी जमीन आणि बागाईत लहान जमीन यांमध्यें बागाईत लहान जमिनींत धान्यें होत असलीं तरी तिजपेक्षां मोठी जमीन चांगली, मग तींत धान्यें पिकत नसलीं तरी हरकत नाहीं. कारण, अशा जमिनीचें क्षेत्र विपुल असल्यामुळें, इतर झाडेंझुडपें, वनस्पति वगैरे तींत उत्पन्न होतात, आणि किल्ले, तट वगैरे करावयाचे झाल्यास हवे तितके तयार करितां येतात, कारण भूमीचा गुणच असा आहे कीं, आपण म्हणूं तशी ती उपयोगांत आणितां येते.

खाणींचा प्रदेश व धान्याचा प्रदेश, यांमध्यें खाणींचा प्रदेश नुसती तिजोरी भरून काढतो, धान्याचा प्रदेश तिजोरी व कोठारघर दोन्हीं भरून काढतो. किल्ले, तट वगैरे बांधण्याच्या कामांत धान्याची जरूरी लागते. तरीपण ज्या खाणींतील पदार्थांना पुष्कळ मागणी असते अशा खाणींचा प्रदेश असला तर तोहि फायदेशीर समजावा.

'द्रव्यहस्तिवनभोगयोर्द्रव्यवनभोगः सर्वकर्मणां योनिः प्रभूतनिधानक्षमश्च । विपरीतो हस्तिवनभोगः' इत्याचार्याः । नेति कौटल्यः । शक्यं द्रव्यवनमनेकमनेकस्यां भूमौ वापयितुं न हस्तिवनं, हस्तिप्रधानो हि परानीकवध इति ।

वारिस्थलपथभोगयोरनित्यो वारिपथभोगः, नित्यः स्थलपथभोग इति ।

भिन्नमनुष्या श्रेणीमनुष्या वा भूमिरिति । भिन्नमनुष्या श्रेयसी । भिन्नमनुष्या भोग्या भवत्यनुपजाप्या चान्येषाम् । अनापत्सहा तु विपरीता श्रेणीमनुष्या कोपे महादोषा ।

तस्यां चातुर्वर्ण्याभिनिवेशे सर्वभोगसहत्वादवरवर्णप्राया श्रेयसी । बाहुल्याद् ध्रुवत्वाच्च ।

कृष्या कर्षणवती । कृष्या चान्येषां चारम्भाणां प्रयोजकत्वाद् गोरक्षकवती, पण्यनिचयर्णानुग्रहादाढ्यवणिग्वती ।

भूमिगुणानामपाश्रयः श्रेयान् । दुर्गापाश्रया पुरुषापाश्रया वा भूमिरिति । पुरुषापाश्रया श्रेयसी । पुरुषवद्धि राज्यम् । अपुरुषा गौर्वन्ध्येव किं दुहीत ।

महाक्षयव्ययनिवेशां तु भूमिमवाप्तुकामः पूर्वमेव क्रेतारं पणेत दुर्बलमराजबीजिनं निरुत्साहमपक्षमन्यायवृत्तिं व्यसनिनं दैवप्रमाणं यत्किञ्चनकारिणं वा ।

---

ज्या प्रदेशांत नाना प्रकारचीं झाडें व द्रव्यें उत्पन्न होतात तोप्रदेश, ज्यांत हत्ती रहातात अशा प्रदेशापेक्षां चांगला, कारण त्यांत सर्व प्रकारचीं कामें होऊं शकतात व विपुल समृद्धिहि करितां येते; पण ज्यांत केवळ हत्तींचीच वसती आहे त्यापासून इतर कांहींच लाभ नसतो, असें आमच्या गुरूंचें मत आहे. पण तें उचित नव्हे. झाडें व इतर द्रव्यें वाटेल तेथें उत्पन्न करतां येतील; पण हत्ती कांहीं वाटेल तेथें निपजत नाहींत, आणि शत्रूचा पराजय करणें हें तर हत्तींवर अवलंबून असतें. यास्तव हस्तिवन श्रेष्ठ.

जलमार्ग व स्थलमार्ग यामध्यें जलमार्गाचा उपयोग सदैव करितां येत नाहीं; स्थलमार्गाचा हवा तेव्हां उपयोग करतां येतो. यास्तव स्थलमाग असलेला प्रदेश चांगला.

ज्या देशांतील लोक खेड्यापाड्यांतून पृथक् पृथक् रहातात तो देश चांगला किंवा ज्या देशांतील लोक समवायानें शहरांत रहातात तो चांगला ? ज्यांतील लोक पृथक् पृथक् राहतात तो देश चांगला; कारण पृथक् पृथक् रहाणाऱ्या लोकांवर सहज अंमल चालवितां येतो. व त्यांमध्यें शत्रूला फंदफितुरी करतां येत नाहीं. पण समवायानें रहाणारे लोकांत सहनशीलपणा कमी असतो म्हणून ते खवळावयास उशीर लागत नाहीं; आणि त्यांचा असंतोष म्हणजे प्राणसंकट !

ज्या मुलुखांत वसाहत करावयाची, त्यांत चारहि वर्णांपैकीं खालच्या खालच्या वर्गांतील लोक ज्यांत अधिक असतील तो मुलूख अधिक पसंत करावा; कारण त्या लोकांच्या अंगांत काटकपणा असून स्थिरपणा असतो व त्यांची संख्याहि पुष्कळ असते.

पडित व लागवड जमिनीमध्यें पडित जमीन दुसऱ्या अनेक कामांस उपयोगी पडणारी असल्यामुळें व गायरानें असल्यामुळें अधिक चांगली. ज्या प्रदेशांत मालाचा संग्रह करणारे आणि लोकांत कर्जवाम देऊन उपयोगी पडणारे मोठमोठे धनाढ्य व्यापारी राहत आहेत असा देश अर्थातच चांगला.

भूमीच्या इतर गुणांपेक्षां संरक्षणाचीं साधनें असणें हा गुण श्रेयस्कर होय. जींत पुष्कळ किल्ले आहेत ती भूमि चांगली कीं जींत मोठी लोकसंख्या आहे ती चांगली ? जींत लोकसंख्या मोठी ती भूमि चांगली, कारण राज्य हें लोकांवर अवलंबून आहे; लोक नसतील तर ती भूमि वांझ गाईप्रमाणें दोहिली तरी काय देऊं शकेल ?

वसाहतीच्या कामांत माणसांचा व पैशाचा चुराडा उडेल असें माहीत असूनहि जर एखादा देश संपादन करावयाचा असेल तर बलहीन, हलक्या कुळांतील, निरुत्साही, असहाय, अन्यायी, व्यसनी, दैववादी, अथवा अविवेकी अशा एखाद्या राजाच्या गळ्यांत हें काम बांधावें.

महाक्षयव्ययनिवेशायां हि भूमौ दुर्बलो राजबीजी निविष्टः सगन्धाभिः प्रकृतिभिः सह क्षयव्ययेनावसीदति । बलवानराजबीजी क्षयव्ययभयादसगन्धाभिः प्रकृतिभिस्त्यज्यते । निरुत्साहस्तु दण्डवानपि दण्डस्याप्रणेता सदण्डः क्षयव्ययेनावभज्यते । कोशवानप्यपक्षः क्षयव्ययानुग्रहहीनत्वान्न कुतश्चित् प्राप्नोति । अन्यायवृत्तिर्निविष्टमप्युत्थापयेत्, स कथमनिविष्टं निवेशयेत् । तेन व्यसनी व्याख्यातः । दैवप्रमाणो मानुषहीनो निरारम्भो विपन्नकर्मारम्भो वावसीदति । यत्किञ्चनकारी न किञ्चिदासादयति । स चैषां पापिष्ठतमो भवति ।

'यत्किञ्चिदारभमाणो हि विजिगीषोः कदाचिच्छिद्रमासादयेद्' इत्याचार्याः । 'यथा छिद्रं तथा विनाशमप्यासदयेद्' इति कौटल्यः ।

तेषामलाभे यथा पार्ष्णिग्राहोपग्रहे वक्ष्यामस्तथा भूमिमवस्थापयेत् । इत्यभिहितसन्धिः ।

गुणवतीमादेयां वा भूमिं बलवता क्रयेण याचितः सन्धिमवस्थाप्य दद्यात् । इत्यनिभृतसन्धिः ।

समेन वा याचितः कारणमवेक्ष्य दद्यात्—'प्रत्यादेया मे भूमिर्वश्या वा, अनया प्रतिबद्धः परो मे वश्यो भविष्यति, भूमिविक्रयाद् वा मित्रहिरण्यलाभः कार्यसामर्थ्यकरो मे भविष्यति' इति ।

---

दुर्बल राजाच्या गळ्यांत हें काम अडकविलें कीं द्रव्य व माणसें यांची हानि होऊन त्याच्या प्रजेसह त्याचा नाश होतो. बलाढ्य पण हलक्या कुळांतील राजा अशा देशांत वसाहत करील, तर त्याचे प्रजाजन त्यावर प्रेम करणारे नसल्यामुळें नाश व हानि यांच्या भीतीनें ते त्यास सोडून जातील. राजा उत्साहरहित असेल तर त्याजवळ सैन्य असूनहि त्याचा उपयोग तो करणार नाहीं. आणि मग मनुष्यहानि व द्रव्यहानि सोसून तोहि मरेल व त्याबरोबर त्याचें सैन्यहि मरेल. वसाहत करणारा राजा पुष्कळ श्रीमंत असेल पण त्यास कोणाचें सहाय्य नसेल तर त्यास दुसऱ्याकरितां कधीं मनुष्यहानि किंवा द्रव्यहानि सोसण्याची किंवा दुसऱ्याला अन्य तऱ्हेचें साहाय्य देण्याची पाळी आली नसल्यामुळें त्याला कोठूनहि मदत मिळावयाची नाहीं. अन्यायी व अनीतिमान् राजा वसाहत झालेल्या देशाचाहि नाश करील मग तो नव्या देशाची ऊर्जितावस्था कशी साधील? दुर्व्यसनी राजाचीहि अशीच गोष्ट आहे. निव्वळ दैवावर भरंवसा ठेवून बसणारा कर्तृत्वहीन असतो म्हणून त्याच्या हातून उद्योग न झाल्यामुळें किंवा झालाच तर भलताच झाल्यामुळें त्यास नुकसान सोसावें लागेल. रिकामटेकडा उद्योग करणारास तर कांहींच मिळावयाचें नाहीं; असा राजा तर सर्वांत वाईट समजला पाहिजे !

रिकामटेकडा उद्योग करणारा कधीं कधीं विजयेच्छु राजाचे मर्मस्थानावर घाव घालण्याचा संभव आहे असें गुरु म्हणतात. पण तो जसें मर्म गांठील तसाच त्याचा नाशहि घडवून आणतां येईल असें कौटिल्य म्हणतो.

वसाहतीकरितां वर निर्दिष्ट केलेले लोक मिळत नसतील, तेव्हां "पिछाडीचा शत्रु कसा पकडावा" या प्रकरणांत सांगितल्या जाणाऱ्या मार्गानें वसाहत करविण्याची व्यवस्था करावी. या व्यवस्थेस न बदलणारा तह ह्मणतात.

बलाढ्य राजानें दुसऱ्या राजास त्याची सुपीक व आवडती जमीन आपल्यास विकत द्यावयास जबरदस्तीनें भाग पाडलें तर त्यानें परतबोलीचा करार करून आपली जमीन विकत द्यावी. या प्रकारास अनिश्चित तह असें ह्मणतात.

समान दर्जाच्या राजानें वरीलप्रमाणें मागणी केल्यास विकत देणारानें अगोदर पुढील विचार करून जमीन द्यावी; जमीन मला परत मिळवितां येईल कीं नाहीं, माझ्या ताब्यांत राहील कीं नाहीं, जमीन ताब्यांत घेऊन शत्रू माझ्या स्वाधीन होईल कीं नाहीं, जमीन विकून माझ्या कामाला उपयोगी पडणारे मित्र किंवा धन मिळेल कीं नाहीं;

तेन हीनः क्रेता व्याख्यातः ।

एवं मित्रं हिरण्यं च सजनामजनां च गाम् । लभमानोऽतिसन्धत्ते शास्त्रवित् सामवायिकान् ।

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे एकादशोऽध्यायः मित्रहिरण्यभूमिकर्मसन्धौ अनवसितसन्धिः, आदितो नवशततमः ॥

---

# अध्याय ११०—कर्मसन्धिः

'त्वं चाहं च दुर्गं कारयावहे' इति कर्मसन्धिः ।

तयोर्यो दैवकृतमविषह्यमल्पव्ययारम्भं दुर्गं कारयति सोऽतिसन्धत्ते ।

तत्रापि स्थलनदीपर्वतदुर्गाणामुत्तरोत्तरं श्रेयः ।

सेतुबन्धयोरप्याहार्योदकात् सहोदकः श्रेयान् । सहोदकयोरपि प्रभूतवापस्थानः श्रेयान् ।

द्रव्यवनयोरपि यो महत् सारवद्द्रव्याटवीकं विषयान्ते नदीमातृकं द्रव्यवनं छेदयति, सोऽति— सन्धत्ते । नदीमातृकं हि स्वाजीवमपाश्रयश्चापदि भवति ।

हस्तिवनयोरपि यो बहुशूरमृगं दुर्बलप्रतिवेशमनन्तावक्लेशि विषयान्ते हस्तिवनं बध्नाति- सोऽतिसन्धत्ते । तत्रापि 'बहुकुण्ठालपशूरयोरल्पशूरं श्रेयः । शूरेषु हि युद्धम् । अल्पाः शूरः बहून-

---

निकृष्ट राजा विकत घेणारा असेल तेव्हांहि असाच विचार करावा.

संयुक्त मंडळांतील जो राजा अशा प्रकारें मित्र, द्रव्य आणि सजन अथवा निर्जन प्रांत संपादन करितो त्याची इतरांवर सरशी होते.

---

## दुर्गादि कार्योद्देशानें केलेला तह.

तूं आणि मी दोघे दुर्गादि कामें करवूं असें म्हणून केलेला तह, तो कर्मसंधि होय.

अशा दोघांत जो दुर्घट व निसर्गरक्षित किल्ला अल्पश्रमानें व अल्प खर्चांत बांधवील, तो दुसऱ्यावर सरशी करील.

त्यांत सुद्धां भुईकोट किल्ल्यापेक्षां पाणकोट किल्ला चांगला व पाणकोट किल्ल्यापेक्षां डोंगरी किल्ला चांगला. कालव्यामध्यें ज्या कालव्याला दुसऱ्या ठिकाणाहून पाणी येतें, त्यापेक्षां अंतर्गत झऱ्याचा पाणी—पुरवठा असलेला कालवा चांगला; निरन्तर वाहणाऱ्या कालव्यांतहि विस्तृत क्षेत्र भिजविणारा कालवा अधिक चांगला.

झाडजंगलामध्यें जो कोणी मूल्यवान झाडें व इतर द्रव्यें असलेलें असें विस्तृत आणि ज्याच्या सरहद्दीवर वाहणारी नदी आहे असलें जंगल तयार करितो तो दुसऱ्यांवर ताण करतो. निरंतर वाहणारी नदी असली म्हणजे जंगलाचें पोषण स्वाभाविकपणें होतें, आणि अशा जंगलापासून संकट प्रसंगीं आश्रयहि मिळतो.

हत्ती वगैरे जनावरांच्या रानांपैकीं ज्यांत अनेक बलाढ्य पशु आहेत, ज्याच्या शेजारीं अधिक बळकट अशी माऱ्याची जागा नाहीं, ज्यावनांत प्रवेश करणें व ज्यांतून बाहेर पडणें मुष्किलीचें काम आहे, असें हत्तींचें रान जो तयार करितो, त्याची सरशी होते असें समजावें. त्यांतहि पुष्कळ पण दुर्बळ हत्ती असलेलें वन चांगलें, कीं ज्यांत थोडे पण शूर हत्ती आहेत असें वन चांगलें ? थोडे कां होईनात पण शूर हत्ती असलेलें वन चांगलें, कारण युद्ध होतें तें शूरांशूरांतच होतें. थोडकेसे पण शूर हत्ती अनेक सुस्त व दुर्बळ हत्तींचा पाडाव करूं शकतात, आणि

शूरान् भञ्जन्ति, ते भग्नाः स्वसैन्यावघातिनो भवन्ति ' इत्याचार्याः । नेति कौटल्यः । कुण्ठा बहवः श्रेयांसः, स्कन्धविनियोगादनेकं कर्म कुर्वाणाः स्वेषामपाश्रया युद्धे, परेषां दुर्धर्षा विभीषणाश्च । बहुषु हि कुण्ठेषु विनयकर्मणा शक्यं शौर्यमाधातुं, न त्वेवाल्पेषु शूरेषु बहुत्वमिति ।

खन्योरपि यः प्रभूतसारामदुर्गमार्गामल्पव्ययारम्भां खनिं खानयति, सोऽतिसन्धत्ते । तत्रापि ' महासारमल्पमल्पसारं वा प्रभूतमिति । महासारमल्पं श्रेयः । वज्रमणिमुक्ताप्रवालहेमरूप्यधातुर्हि प्रभूतमल्पसारमत्यर्घेण ग्रसते ' इत्याचार्याः । नेति कौटल्यः । चिरादल्पो महासारस्य क्रेता विद्यते। प्रभूतः सातत्यादल्पसारस्य ।

एतेन वणिक्पथो व्याख्यातः । तत्रापि ' वारिस्थलपथयोर्वारिपथः श्रेयान्, अल्पव्ययव्यायामः प्रभूतपण्योदयश्च ' इत्याचार्याः । नेति कौटल्यः । संरुद्धगतिरसार्वकालिकः प्रकृष्टभययोनिर्निष्प्रतिकारश्च वारिपथः विपरीतः स्थलपथः ।

वारिपथे तु कूलसंयानपथयोः कूलपथः पण्यपट्टणबाहुल्याच्छ्रेयान् । नदीपथो वा सातत्याद्विषह्याबाधत्वाच्च । स्थलपथेऽपि हैमवतो दक्षिणापथाच्छ्रेयान् हस्त्यश्वगन्धदन्ताजिनरूप्यसुवर्णपण्याः सारवत्तराः ' इत्याचार्याः । नेति कौटल्यः । कम्बलाजिनाश्वपण्यवर्जाः शङ्खवज्रमणिमुक्ता-

---

अशा दुर्बळ हत्तींचा पाडाव झाला म्हणजे ते हत्ती उलटून सैरावैरा धांवून आपल्याच सैन्याचा नाश करितात. असें आमचे गुरु म्हणतात. कौटिल्य म्हणतो—असें नाहीं; पुष्यळ हत्ती असलेलें वन अधिक चांगलें; मग ते हत्ती शूर नसले तरी हरकत नाहीं. हत्ती पुष्कळ असले म्हणजे त्यांस लष्करांतल्या अनेक कामांस लावतां येतें; लष्करांतील शिपायांस ते अनेक मार्गांनीं मदत देऊं शकतील. संख्येच्या जोरावर ते शत्रूस एकाएकीं दाद देणार नाहींत व शत्रूस त्यांची संख्या पाहूनच धास्ति वाटेल. शिवाय हत्ती जात्याशूर नसले तरी ते शिकवून सवरून युद्धाला तयार करतां येतात; परंतु थोडेसे हत्ती शूर असले तरी त्यांची संख्या कशी वाढवितां येईल ?

खाणीमध्यें जींत विपुल द्रव्यें सांपडतात व जिचा रस्ता अवघड नाहीं अशी खाण जो थोड्या खर्चांत व थोड्या श्रमांत चालवील त्यानें दुसऱ्यावर सरशी केली असें होतें.

त्यांतहि लहान पण मूल्यवान द्रव्यें जींत सांपडतात अशी खाण चांगली, कीं मोठी पण सामान्य द्रव्यें जींत विपुल सांपडतात ती चांगली ? मूल्यवान् द्रव्यें जींत सांपडतात ती चांगली; मग ती लहान असली तरी चालेल; कारण वज्रमणि वगैरे रत्नें, मोत्यें, प्रवाळ, सोनें, रुपें व इतर मुल्यवान् धातु यांची किंमतच इतकी असते कीं तीं कैक सामान्य द्रव्यें गिळून टाकतील असें आमचे गुरु म्हणतात. कौटिल्य म्हणतो, मूल्यवान् जिनसांना थोडकीं गिऱ्हाइकें मिळतात ( भारी माल लवकर विकला जात नाहीं व त्याला गिऱ्हाईकेंहि थोडीं असतात. ) थोड्या किंमतीच्या मालाला हमेश गिऱ्हाईकें असतात. म्हणून असल्या पदार्थांच्या खाणीपासूनच अधिक लाभ होतो.

व्यापारी रस्त्यांत बरावाईट रस्ता अशाच विचारानें ठरवावा. त्यांतहि जलमार्ग व स्थलमार्ग या दोहोंत जलमार्ग चांगला; कारण खर्च कमी व नफा फार असें गुरु म्हणतात. पण कौटिल्य म्हणतो असें नाहीं; जलमार्गांत अडथळे फार; हव्या त्या काळांत प्रवास करतां येत नाहीं; नाना प्रकारचे धोके असतात; स्वतःचा बचाव करितां येत नाहीं; स्थलमार्गांत अशा अडचणी नसतात.

जलमार्गांत सुद्धां किनाऱ्या किनाऱ्याचा मार्ग व भरसमुद्रांतील मार्ग यामध्यें किनाऱ्या किनाऱ्याचा मार्ग पसंत; कारण वाटेंत व्यापारी बंदरें गांवें बरींच असतात. नदीमार्गहि चांगला असतो कारण तो जाण्यायेण्याला केव्हांही सुकर असतो व अडथळेहि नसतांत; असलेच तर ते दूर करतां येतात. स्थलमार्गांत हिमालयाचा मार्ग दक्षिणेच्या मार्गाहून ( व्यापाराला ) अधिक चांगला. कारण त्यांत हत्ती, घोडे, हस्तिदंत, चामडें, रुपें, सोनें यांची समृद्धि असते असें गुरु म्हणतात. परंतु कौटिल्य म्हणतो—असें नाहीं; कांबळीं, चामडीं

सुवर्णपण्याश्च प्रभूततरा दक्षिणापथे । दक्षिणापथेऽपि बहुखनिः सारपण्यः प्रसिद्धगतिरल्पव्ययायामो वा वणिक्पथः श्रेयान् । प्रभूतविषयो वा फल्गुपण्यः । तेन पूर्वः पश्चिमश्च वणिक्पथो व्याख्यातः ।

तत्रापि चक्रपादपथयोश्चक्रपथो विपुलारम्भत्वाच्छ्रेयान् । देशकालसम्भावनो वा खरोष्ट्रपथः । आभ्यामंसपथो व्याख्यातः ॥

परकर्मोदयो नेतुः क्षयो वृद्धिर्विपर्यये । तुल्ये कर्मपथे स्थानं ज्ञेयं स्वं विजिगीषुणा ॥
अल्पागमातिव्ययता क्षयो वृद्धिर्विपर्यये । समायव्ययता स्थानं कर्मसु ज्ञेयमात्मनः ॥
तस्मादल्पव्ययारम्भं दुर्गादिषु महोदयम् । कर्म लब्ध्वा विशिष्टः स्यादित्युक्ताः कर्मसन्धयः॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे द्वादशोऽध्यायः मित्रहिरण्यभूमिकर्मसन्धौ कर्मसन्धिः,
आदितो दशशततमः ॥

---

# अध्याय १११—पार्ष्णिग्राहचिन्ता

संहत्यारिविजिगीष्वोरमित्रयोः पराभियोगिनोः पार्ष्णिं गृह्णतोर्यः शक्तिसम्पन्नस्य पार्ष्णिं गृह्णाति, सोऽतिसन्धत्ते । शक्तिसम्पन्नो ह्यमित्रमुच्छिद्य पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, न हीनशक्तिरलब्धलाभ इति ।

---

व घोडे यांशिवाय बाकीचा ह्मणजे शंख, वज्रमणि वगैरे रत्नें, मोत्यें, सोनें वगैरे माल दक्षिण भागांत विपुल असतो. दक्षिणभागांतहि ज्या मार्गांत मूल्यवान् द्रव्यांच्या अनेक खाणी आहेत, जो अत्यंत रहदारीचा आहे, व जो बिनखर्चाचा व बिनकष्टाचा आहे तो व्यापारी मार्ग अधिक चांगला; अथवा थोडक्या किंमतींत भरपूर माल जेथें मिळतो, तोहि चांगला. पूर्वेकडील व पश्चिमेकडील मार्गांसंबंधींहि असेंच समजावें.

गाडीवाट व पायवाट यांमध्यें गाडीवाटेनें थोडक्या वेळांत व श्रमांत अधिक काम होतें ह्मणून ती चांगली; अथवा उंट व गाढवें हव्या त्या ठिकाणीं व हव्या त्या काळीं जाऊं शकतात ह्मणून त्यांवरही प्रवास चांगला. खांद्यावर वाहून माल न्यावयाचा रस्ता व डोली करून जावयाचा रस्ता या संबंधींहि वरीलप्रमाणेंच निर्णय समजावा.

विजयेच्छु राजानें आरंभलेल्या कार्यापासून शत्रूचा फायदा झाला, म्हणजे तें विजयेच्छूचें नुकसान; आणि शत्रूचें नुकसान झालें तर विजयेच्छूचा फायदा; आरंभलेल्या कार्यापासून उभयतांस सारखीच फलप्राप्ति झाली म्हणजे विजयेच्छूचें हितहि नाहीं व अहितहि नाहीं, असें समजावें.

भांडवल थोडें, खर्च फार ह्मणजे नुकसान; भांडवल ( उत्पन्न ) फार व खर्च थोडा ह्मणजे नफा; आणि उत्पन्न व खर्च सारखाच ह्मणजे बरोबरी अथवा रमारमी. ( नफा नाहीं, नुकसान नाहीं. )

ह्मणून किल्ले वगैरे बांधकामें करावयाचीं, त्यांत थोडच्या श्रमांत व थोडच्या खर्चांत पुष्कळ नफा कसा होईल, असा विचार करून ती केलीं ह्मणजे ती उत्तम; याप्रमाणें कर्मसंधी संबंधाचा विचार झाला.

---

## पिछाडी हस्तगत कशी करावी !

विजयेच्छु राजा व अरि-राजा हे उभयता संयुक्त होऊन आपापले शत्रु दुसऱ्यावर स्वारी करण्यांत गुंतले आहेत असें पाहून त्यांच्या पिछाडीचें प्रांत काबीज करावयास निघाले असतां त्या दोघांत जो शक्तिसंपन्न राजाच्या पिछाडीवर चाल करील, तो अधिक सरस ठरतो; कारण शक्तिमान राजा शत्रूचा मोड करून पिछाडीवर हल्ला करणाऱ्यास जसा सहज उखडून टाकील, तसा कमजोर राजा स्वतःच विजयी झाला नसल्यामुळें तसें करूं शकणार नाहीं.

शक्तिसाम्ये यो विपुलारम्भस्य पार्ष्णि गृह्णाति, सोऽतिसन्धत्ते । विपुलारम्भो ह्यमित्रमुच्छिद्य पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, नाल्पारम्भः सक्तचक्र इति ।

आरम्भसाम्ये यः सर्वसन्दोहेन प्रयातस्य पार्ष्णि गृह्णाति, सोऽतिसन्धत्ते । शून्यमूलो ह्यस्य सुकरो भवति, नैकदेशबलप्रयातः कृतपार्ष्णिप्रतिविधान इति ।

बलोपादानसाम्ये यश्चलामित्रं प्रयातस्य पार्ष्णि गृह्णाति, सोऽतिसन्धत्ते । चलामित्रं प्रयातो हि सुखेनावाप्तसिद्धिः पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, न स्थितामित्रं प्रयातः । असौ हि दुर्गप्रतिहतः । पार्ष्णि-ग्राहे च प्रतिनिवृत्तस्थितेनामित्रेणावगृह्यते ।

तेन पूर्वे व्याख्याताः ।

शत्रुसाम्ये यो धार्मिकाभियोगिनः पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसन्धत्ते । धार्मिकाभियोगी हि स्वेषां च द्वेष्यो भवति । अधार्मिकाभियोगी सम्प्रियः ।

तेन मूलहरतादात्विककदर्याभियोगिनां पार्ष्णिग्रहणं व्याख्यातम् ।

मित्राभियोगिनोः पार्ष्णिग्रहणे त एव हेतवः ।

मित्रममित्रं चाभियुञ्जानयोर्यो मित्राभियोगिनः पार्ष्णिगृह्णाति, सोऽतिसन्धत्ते । मित्राभियोगी हि सुखेनावाप्तसिद्धिः पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात् । सुकरो हि मित्रेण सन्धिर्नामित्रेणेति ।

---

दोनहि राजे सारखेच शक्तिमान् असतील तर त्यांतला जो राजा थोड्या अवकाशांत आपली पूर्ण तयारी करूं शकतो, अशाच्या पिछाडीवर जो हल्ला करील, तो अधिक सरस होय; कारण ज्याची कडेकोट तयारी आहे, तो अघाडीच्या शत्रूस जिंकून पिछाडीवर चालून येणाऱ्या शत्रूसहि सहज जिंकील, परंतु ज्याची तशी तयारी नाहीं तो तसें करूं शकणार नाहीं कारण त्याचें सैन्य गुंतलेलें असतें.

तयारी सारखीच असेल तेव्हां जो राजा यच्चयावत् सैन्य घेऊन स्वारीस गेला असेल, त्याच्या पिछाडीवर चालून जाणाऱ्याची सरशी होणार असें म्हणावें; कारण त्या पिछाडीच्या राजाच्या देशांत सैन्य उरलें नसल्यामुळें त्याचा देश सहज हस्तगत होऊं शकतो; परंतु जो राजा सैन्याचा कांहीं भाग देशांत ठेवून व पिछा-डीच्या रक्षणाची तजवीज करून स्वारीवर गेला असेल, त्याचा देश लवकर हस्तगत होऊं शकणार नाहीं.

उभयतांचीं सैन्यें सारखींच असतील, तेव्हां जो ' चल ' शत्रूवर स्वारी करावयास गेलेल्याच्या पिछाडीवर झडप घालतो, तो सरस ठरतो; कारण ' चल ' शत्रूवर स्वारी करणारा सहज विजयी होतो व विजयी होऊन आल्या-वर मग तो पिछाडीवर आलेल्या शत्रूसहि जिंकूं शकेल; परंतु किल्ल्यांत सुरक्षित असलेल्या राजावर स्वारी करावयास जो गेला असेल त्याच्या पिछाडीर हल्ला करण्यांत अर्थ नाहीं; कारण किल्ला घेण्यास असमर्थ होऊन तो परत फिरेल आणि मग पिछाडीवर हल्ला करणाऱ्याला तोंड देण्याला तो चालून येईल.

इतर शत्रूसंबंधानेंहि हेंच लागू आहे.

शत्रु सारखेच असतील, तेव्हां धर्मनिष्ठ राजावर स्वारी करावयास गेलेल्याची पिछाडी जो हस्तगत करितो, तो अधिक सरस होय; कारण धर्मनिष्ठ राजावर स्वारी करणारा स्वतःच्या लोकांस नावडता होतो; उलट अधर्मी राजावर स्वारी करणारा राजा लोकप्रिय होतो.

उधळपट्टी करणाऱ्या, कसा तरी निर्वाह करणाऱ्या व कद्रू राजाविरुद्ध स्वारी करणाऱ्यांची पिछाडी काबीज करण्यासंबंधानें हाच नियम समजावा.

मित्रांवर स्वारी करणाऱ्या राजाच्या पिछाडीचे प्रांत काबीज करतांना हीच विचारसरणी लक्षांत ठेवावी.

मित्रावर व अमित्रावर स्वारी करणाऱ्यांत जो मित्रावर स्वारी करणाऱ्याच्या पिछाडीवर घाला घालतो, तो दुसऱ्यावर ताण करतो; कारण मित्रावर स्वारी करणारा सहजच त्याबरोबर तह करील आणि नंतर पिछाडीवर आलेल्या शत्रूचा समाचार घेईल, मित्राशीं तह लवकर होतो, तसा अमित्राशीं लवकर तह होत नाहीं.

मित्रममित्रं चोद्धरतोर्योऽमित्रोद्धारिणः पार्ष्णि गृह्णाति, सोऽतिसन्धत्ते । वृद्धमित्रो ह्यमित्रोद्धारी पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, नेतरः स्वपक्षोपघाती ।

तयोरलब्धलाभापगमने यस्यामित्रो महतो लाभाद् वियुक्तः क्षयव्ययाधिको वा, स पार्ष्णिग्राहोऽतिन्धत्ते । लब्धलाभापगमने यस्यामित्रो लाभेन शक्त्या हीनः, स पार्ष्णिग्राहोऽतिसन्धत्ते । यस्य वा यातव्यः शत्रोर्विग्रहापकारसमर्थः स्यात् ।

पार्ष्णिग्राहयोरपि यः शक्यारम्भबलोपादानाधिकः स्थितशत्रुः पार्श्वस्थायी वा सोऽतिसन्धत्ते । पार्श्वस्थायी हि यातव्याभिसारो मूलबाधकश्च भवति । मूलाबाधक एव पश्चात्स्थायी ।

पार्ष्णिग्राहास्त्रयो ज्ञेयाः शत्रोश्चेष्टानिरोधकाः । सामन्ताः पृष्ठतोवर्गः प्रतिवेशौ च पार्श्वयोः ॥

अरेर्नेतुश्च मध्यस्थो दुर्बलोऽन्तर्धिरुच्यते । प्रतिघाते बलवतो दुर्गाटव्यपसारवान् ॥

मध्यमं त्वरिविजिगीष्वोर्लिप्समानयोर्मध्यमस्य पार्ष्णि गृह्णतो लब्धलाभापगमने यो मध्यमं

---

एक राजा मित्रावर चाल करून गेला आणि दुसरा शत्रूवर चाल करून गेला तर त्यांपैकीं शत्रूचा नाश करण्यास उद्युक्त झालेल्याची पिछाडी जो काबीज करतो तो सरस होय; कारण अमित्रावर अथवा शत्रूवर स्वारी करून त्याचा जो नाश करूं पाहतो, त्यास पुष्कळ साहाय्य करणारे मित्र मिळतात व त्यांच्या साहाय्यानें तो पिछाडीवर चालून येणाऱ्या शत्रूस चिरडूं शकतो; पण दुसरा म्हणजे मित्रावर स्वारी करणारा, आपल्या बाजूकडील राजाचा घात करणारा असल्यामुळें, त्यास मित्रांचें साहाय्य मिळत नाहीं.

शत्रूंच्या पिछाडीवर हल्ला करावयास गेलेले असे दोघेहि राजे आपल्या शत्रूवर जय न मिळवितां हात हालवीत परत आले असतां त्यांत ज्याच्या शत्रूचा अधिक हिरमोड झाला असेल अथवा ज्याच्या शत्रूस अतोनात नुकसान व द्रव्यहानि व मनुष्यहानि सोसावी लागली असेल, अशाच्या पिछाडीवर हल्ला करणारा दुसऱ्यावर ताण करतो असें समजावें. जर कदाचित् हे दोघेहि राजे आपलें काम फत्ते करून परत फिरले असतील तर ज्याच्या शत्रूचें नुकसान अधिक झालें असेल किंवा ज्याच्या शत्रूला लाभ थोडा झाला असेल अशाच्या पिछाडीवर हल्ला करणाऱ्याला अधिक लाभ होतो असें समजावें. त्याचप्रमाणें ज्यावर हल्ला करावयाचा तो राजा शत्रूस प्रतिकार करण्यास समर्थ असेल तर देखील वरचाच नियम लागू आहे.

हल्ला करणाऱ्या दोघां राजांतून ज्याचा शत्रु कारस्थान, उद्योग व सैन्याची तयारी अधिक प्रमाणांत करून हल्ला करणाऱ्याच्या बाजूस ठाणें देऊन बसला असेल, त्या हल्ला करणाऱ्या राजाला अधिक फायदा होतो; कारण हल्ला करणाऱ्या राजाच्या बाजूस ठाणें देऊन बसलेला शत्रु फेरहल्ला करूं शकेल, शिवाय हल्ला करणाऱ्याच्या मूळ ठाण्यावरहि मारा करील; परंतु जेथून हल्ला करावयाचा, त्याच्या पाठीमागें ठाणें देऊन बसलेला पिछाडीचा शत्रु फार तर सैन्याची पिछाडी जिकीरीस आणील.

जे आपल्या पिछाडीस जिकीरीस आणूं शकतील, आणि जे आपल्या हालचालींस अडथळे करूं शकतील अशा शत्रूंचे तीन प्रकार असतातः—मागील बाजूस असलेले शत्रू आणि डाव्या उजव्या अंगास असलेले शत्रु.

विजयेच्छु व अरि यांमध्यें असलेला जो दुर्बल राजा, तो अंतर्धि ( मध्यें असलेला ); तो मध्यें असल्यामुळें त्याचा पराभव करतां येत नाहीं; कारण त्याजवर स्वारी झाली तर तो शेजारच्या बलवान राजाच्या किल्ल्यांत किंवा रानावनांत दडी मारून बचूं शकतो.

मध्यम राजाला आपल्याकडे वळवून घेण्याच्या इच्छेनें विजयेच्छु राजानें व त्याच्या शत्रूनें मध्यम राजाच्या पिछाडीवर हल्ला केला असतां त्या दोघांपैकीं जो कोणी आधीं लूट मिळवून परत फिरेल, मध्यमाची व त्याच्या मित्राची ताटातूट करील आणि शत्रूराजाशीं जो नवी मैत्री जोडील त्याची सरशी झाली असें समजावें; कारण शत्रूवर उपकार केला असतां तो मित्र होऊं शकतो, पण मित्राची एकादा मैत्री सुटली म्हणजे तो पुनःस्नेह जोडूं शकत नाहीं.

मित्राद् वियोजयति, अमित्रं च मित्रमाप्नोति, सोऽतिसन्धत्ते। सन्धेयश्च शत्रुरुपकुर्वाणो, न मित्रं मित्रभावादुत्क्रान्तम्।

तेनोदासीनलिप्सा व्याख्याता।

'पार्ष्णिग्रहणाभियानयोस्तु मन्त्रयुद्धादभ्युच्चयः। व्यायामयुद्धे हि क्षयव्ययाभ्याम् उभयोर्वृद्धिः। जित्वापि हि क्षीणदण्डकोशः पराजितो भवति' इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। सुमहतापि क्षयव्ययेन शत्रुविनाशोऽभ्युपगन्तव्यः।

तुल्ये क्षयव्यये यः पुरस्ताद् दूष्यबलं घातयित्वा निश्शल्यः पश्चाद् वश्यबलो युध्येत, सोऽतिसन्धत्ते।

द्वयोरपि पुरस्ताद्दूष्यबलघातिनोर्यो बहुलतरं शक्तिमत्तरमत्यन्तदूष्यं च घातयेत्, सोऽतिसन्धत्ते।

तेनामित्राटवीबलघातो व्याख्यातः॥

पार्ष्णिग्राहोऽभियोक्ता वा यातव्यो वा यदा भवेत्। विजिगीषुस्तदा तत्र नैत्रमेतत् समाचरेत्॥

पार्ष्णिग्राहो भवेन्नेता शत्रोर्मित्राभियोगिनः। विग्राह्य पूर्वमाक्रन्दं पार्ष्णिग्राहाभिसारिणा॥

आक्रन्देनाभियुञ्जानः पार्ष्णिग्राहं निवारयेत्। तथाक्रन्दाभिसारेण पार्ष्णिग्राहाभिसारिणम्॥

---

उदासीन अथवा तटस्थ राजास कसें हस्तगत करावें हें यावरून समजेल.

पिछाडीवर चालून जावयाचें असो, किंवा अघाडीवर असो, गनिमी काव्यानें लढणें अधिक चांगलें. मैदानावरील लढाईत मनुष्यहानि व द्रव्यहानि अधिक होत असल्यामुळें उभय पक्षांचें नुकसान होतें; लढाईत जय मिळाला तरी, सैन्य व पैसा याचा चुराडा झाल्यामुळें पराजय झाल्याइतकेंच नुकसान होतें; असें गुरु म्हणतात.

कौटिल्य म्हणतो, तसें नव्हे. कितीहि माणसांचा व द्रव्याचा चुराडा झाला, तरी शत्रूचा पुरता नाश हा केलाच पाहिजे.

उभयपक्षांकडील मनुष्यहानि व द्रव्यहानि सारखीच असेल, तेव्हां जो पक्ष आपल्या सैन्यांतील राजद्रोही लोकांच्या पलटणी अघाडीस ठेऊन त्यांचा प्रथम नाश करवील व नंतर निश्चिंत होऊन राजनिष्ठ पलटणीनिशीं शत्रूशीं लढेल, तो अधिक यशस्वी समजावा. उभयपक्षांनीं आपापल्या अघाडीस राजद्रोही पलटणी ठेवून त्यांचा नाश करविण्याचा विचार केला असेल, तेव्हां अधिक शक्तिमान् व अत्यंत राजद्रोही असे लोक जो अधिक प्रमाणांत मारयास पुढें करतो त्याची सरशी झाली, असें समजावें.

वैमनस्यानें राहणारे व रानटी बंडखोर कसे मारावे, तें यावरून समजेल.

विजिगीषु राजावर जेव्हां पार्ष्णिग्राह होण्याची (पिछाडीवर हल्ला करण्याची) किंवा अभियोक्तृ होण्याची (स्वतः स्वारी करावयाची) किंवा दुसरे राजे चालून आले असतां बचाव करण्याची पाळी येईल तेव्हां त्या राजानें पुढील धोरणानें चालावें:—

आपल्या पिछाडीकडील शत्रूनें त्याच्या पलीकडील राजावर (म्हणजे विजिगीषूच्या मित्रावर) स्वारी केली असतां विजिगीषूनें त्या शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करावा; पण तत्पूर्वी आक्रंद-राजाकडून म्हणजे पिछाडीच्या मित्राकडून (अर्थात् पिछाडीच्या शत्रु राजाच्या शत्रूकडून) पार्ष्णिग्राहासार म्हणजे आक्रंद राजाचा जो शत्रु (अर्थात् पिछाडीच्या शत्रु-राजाचा मित्र) याजवर स्वारी करवावी. ज्यावेळीं विजिगीषु राजाला आपल्या पिछाडीकडील शत्रूवर स्वतः स्वारी करावयाची असेल त्यावेळीं आक्रंद राजाकडून पार्ष्णिग्राहाला पायबंद देववावा; त्याचप्रमाणें आक्रंदासाराकडून पार्ष्णि-

अरिमित्रेण मित्रं च पुरस्तादवघट्टयेत् । मित्रमित्रमरेश्चापि मित्रमित्रेण वारयेत् ॥
मित्रेण ग्राहयेत् पार्ष्णिमभियुक्तोऽभियोगिनः । मित्रमित्रेण चाक्रन्दं पार्ष्णिग्राहान्निवारयेत् ॥
एवं मण्डलमात्मार्थं विजिगीषुर्निवेशयेत् । पृष्ठतश्च पुरस्ताच्च मित्रप्रकृतिसम्पदा ॥
कृत्स्ने च मण्डले नित्यं दूतान् गूढांश्च वासयेत् । मित्रभूतः सपत्नानां हत्वा हत्वा च संवृतः ॥
असंवृतस्य कार्याणि प्राप्तान्यपि विशेषतः । निस्संशयं विपद्यन्ते भिन्नप्लव इवोदधौ ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे त्रयोदशोऽध्यायः पार्ष्णिग्राहचिन्ता, आदितः एकादशशततमः ॥

---

# अध्याय ११२—हीनशक्तिपूरणम् ।

सामवायिकैरेवमभियुक्तो विजिगीषुर्यस्तेषां प्रधानस्तं ब्रूयात्—' त्वया मे सन्धिः, इदं हिरण्यमहं च मित्रं, द्विगुणा ते वृद्धिः, नार्हस्यात्मक्षयेण मित्रमुखानमित्रान् वर्धयितुम्, एते हि वृद्धास्त्वामेव परिभविष्यन्ति ' ।

भेदं वा ब्रूयात्—' अनपकारो यथाहमेतैः सम्भूयाभियुक्तः तथा त्वामप्येते संहितबलाः स्वस्था व्यसने वाभियोक्ष्यन्ते, बलं हि चित्तं विकरोति, तदेषां विघातय ' इति ।

---

ग्राहासारांलाहि पायबंद देववावा. विजिगीषु राजावर स्वारी होऊन त्यास स्वतःचा बचाव करण्याची पाळी येईल तेव्हां त्यानें आपल्या अघाडीच्या अरि राजाच्या मित्राशीं आपल्या मित्रराजाची लढाई उपस्थित करून द्यावी आणि अरि-मित्राच्या मित्राला आपल्या मित्राच्या मित्रांकरवीं पायबंद देववावा. आणि आपल्या मित्राकडून आपल्यावर चाल करून आलेल्या शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करवावा. आणि त्या मित्राच्या पिछाडीवर त्याच्या पाठीमागल्या शत्रूनें हल्ला करूं नये म्हणून आपल्या मित्राच्या मित्राकडून अरिमित्राच्या पिछाडीवरील हल्ल्याचें निवारण करवावें.

अशा रीतीनें विजयेच्छु राजाने आपल्या मित्रांच्या साहाय्यानें अघाडीचे व पिछाडीचे राजमंडळांतील यच्चयावत् राजे आपलयाला वश्य करून घ्यावेत. विजयेच्छूनें राजमंडळांतील प्रत्येक राजाच्या देशांत आपले दूत व गुप्त हेर कायमचे ठेवून द्यावे, आणि वैऱ्यांशीं वरून वरून मैत्री दाखवून गुप्तपणें शत्रूंचा फडशा पाडावा.

गुप्तपणें काम न करणाऱ्या माणसाचीं कामें जरी प्रसंगविशेषीं यशस्वी झालीं, तरी समुद्रांत गळकी नाव ज्याप्रमाणें नाश पावते, त्याप्रमाणें तीं केव्हांतरी नाश पावतील, यांत संशय नाहीं.

---

## दुर्बलांनीं सबल होण्याचा उपाय.

संयुक्त राजांनीं विजयेच्छु राजावर एकसमयावच्छेदेंकरून हल्ला केला असतां त्यांपैकीं जो प्रमुख असेल, त्यास विजयेच्छु राजानें असें म्हणावें—" तुजबरोबर मी सल्ला करतों; ही खंडणी घे; तुमची आमची दोस्ती होऊं द्या. या योगानें तुझी अभिवृद्धि दुप्पट होईल; तूं आपलें नुकसान करून वरवर स्नेह दाखविणाऱ्या या शत्रूंचा फायदा करून द्यावास हें योग्य नाहीं; कारण हे एकदां वैभवास चढले म्हणजे तुझा अपमान करावयास चुकणार नाहींत."

अथवा, संयोगांतून फुटून बाहेर पडण्याची त्यास सल्ला द्यावी. त्यास म्हणावें—" मी निरुपद्रवी असतांना ज्याप्रमाणें या सर्वांनीं एकत्र जमून मजवर स्वारी केली, त्याचप्रमाणें ते आपापली शक्ति संघटित करून सुरक्षित झाले म्हणजे तुजवरहि असेच उलटतील; कारण अंगांत शक्ति आली, म्हणजे दृष्टि फिरते ! म्हणून त्यांची शक्ति वाढूं न देतां तिची खच्ची कर.

भिन्नेषु प्रधानमुपगृह्य हीनेषु विक्रमयेत्। हीनाननुग्राह्य वा प्रधाने। यथा वा श्रेयोऽभिमन्येत, तथा वैरं वा परैर्ग्राहयित्वा विसंवादयेत्। फलभूयस्त्वेन वा प्रधानमुपजाप्य सन्धिं कारयेत्। अथोभयवेतनाः फलभूयस्त्वं दर्शयन्तः सामवायिकान् 'अतिसंहिताः स्थ' इत्युद्दूषयेयुः। दुष्टेषु सन्धिं दूषयेत्। अथोभयवेतना भूयो भेदमेषां कुर्युः—' एवं तद् यदस्माभिर्दर्शितं इति। भिन्नेष्वन्यतमोपग्रहेण वा चेष्टेत।

प्रधानाभावे सामवायिकानामुत्साहयितारं स्थिरकर्माणमनुरक्तप्रकृतिं लोभाद् भयाद् वा सङ्घातमुपगतं विजिगीषोर्भीतं राज्यप्रतिसम्बन्धं मित्रं चलामित्रं वा पूर्वानुत्तराभावे साधयेत्।

उत्साहयितारमात्मनिसर्गेण, स्थिरकर्माणं सान्त्वप्रणिपातेन, अनुरक्तप्रकृतिं कन्यादानयापनाभ्यां, लुब्धमंशद्वैगुण्येन, भीतमेभ्यः कोशदण्डानुग्रहेण, स्वतो भीतं विश्वासयेत्। प्रतिभूप्रदानेन राज्यप्रतिसम्बन्धमेकीभावोपगमनेन, मित्रमुभयतः प्रियहिताभ्यामुपकारत्यागेन वा, चलामित्रमवधृतमनपकारोपकाराभ्याम्। यो वा यथायोगं भजेत, तं तथा साधयेत्। सामदानभेददण्डैर्वा यथापत्सु व्याख्यास्यामः।

व्यसनोपघातत्वरितो वा कोशदण्डाभ्यां देशे काले कार्ये वावधृतं सन्धिमुपेयात्।

---

ही मात्रा लागू होऊन त्यांमध्यें फुट पडली म्हणजे त्यांतील प्रमुखास हाताशीं धरून, त्यास दुर्बलांविरुद्ध लढावयास लावावें; अथवा दुर्बलांस साहाय्य देऊन त्यांस प्रमुखाविरुद्ध उठवावें; अथवा असें युद्ध हितकर न वाटल्यास, प्रमुखाचें इतरांशीं वैर लावून द्यावें, अथवा प्रमुखास मोठ्या फायद्याचें आमिष दाखवून गुप्त मसलत करून त्या बरोबर गुप्त तह करावा. उभयतांकडून पगार घेणारे हेर असतील त्यांनीं, प्रमुखास जो पुष्कळ फायदा झाला तो संयुक्त राजांस दाखवून, "तहांत तुम्हांवर त्यानें ताण केली," असें म्हणून त्यांस चिडवावें. अशा प्रकारें चिडलेल्या राजांस तह झुगारून द्यावयास लावावें. नंतर दोघांकडून पगार घेणारांनीं "आम्हीं म्हणत होतों, त्याचें हें प्रत्यंतर पाहा" असें म्हणूनहि आणखी भेद उत्पन्न करावा. अशा रीतीनें सर्वांत फाटाफूट झाली, म्हणजे त्यांपैकीं एकास हाताशीं धरून पुढील क्रम चालवावा.

त्यांत प्रमुख पुरुष नसेल, तर संयुक्त मंडळास चिथविणारा जो असेल, त्यास हाताशीं धरावें; तो नसेल तर ज्याच्या अंगीं चिकाटी असेल त्यास हातीं धरावें; तो नसेल तर ज्याचे प्रजाजन राजनिष्ठ असतील, त्यास; तो नसेल तर जो भीतीमुळें किंवा लोभामुळें दोस्तीच्या कटांत सामील झाला असेल त्यास; तो नसेल तर आप्तसंबंधामुळें विजयेच्छूशीं मित्रत्वानें असेल त्यास; तो नसेल तर मित्रास; मित्र नसेल तर चल (पळून गेलेल्या) शत्रूस हाताशीं धरावें.

संयुक्त राजांमधील प्रोत्साहकास संतुष्ट करावयाचें, तें त्यास शरण जाऊन करावें; चिकाटीच्या राजास सामोपचारानें व अभिवादनानें; ज्याची प्रजा राजनिष्ठ आहे, त्यास कन्यादानानें किंवा कन्येच्या स्वीकारानें; लोभ्यास दुप्पट भागानें; संयुक्त राजांच्या भीतीमुळें सामील झालेल्यास द्रव्य व सैन्य देऊन; आणि स्वतःच्या भीतीनें सामील झालेल्यास अभय देऊन संतुष्ट करावें. राजघराण्यांच्या संबंधावरून मित्रत्वानें असलेल्यास अधिक स्नेहसंबंध दाखवून आपलेसें करून घ्यावें; मित्र असेल, त्यास त्यासाठीं उभयतांस हितकर अशा गोष्टी करून आपलासा करावा; पळून गेलेल्या शत्रूस साहाय्य देऊन संतुष्ट ठेवावें.

अशा प्रकारें राजांचा विश्वास संपादण्याकरितां ज्याला जें धोरण हितकर दिसेल त्याच्याशीं तसें धोरण स्वीकारावें. संकटप्रसंगीं साम, दाम, दंड व भेद कसे योजावे, हें पुढें सांगण्यांत येईल.

संकटामुळें किंवा हल्याच्या भीतिमुळें जो घाबरला असेल, त्यानें शत्रूला अमुक वेळेस, अमुक स्थळीं व

कृतसन्धिर्हीनमात्मानं प्रतिकुर्वीत। पक्षे हीनो बन्धुमित्रपक्षं कुर्वीत, दुर्गमविषह्यं वा । दुर्गमित्रप्रतिस्तब्धो हि स्वेषां परेषां च पूज्यो भवति । मन्त्रशक्तिहीनः प्राज्ञपुरुषोपचयं विद्यावृद्धसंयोगं वा कुर्वीत। तथाहि सद्यः श्रेयः प्राप्नोति।

प्रभावहीनः प्रकृतियोगक्षेमसिद्धौ यतेत। जनपदः सर्वकर्मणां योनिः, ततः प्रभावः। तस्य स्थानमात्मनश्च आपदि दुर्गम् । सेतुबन्धः सस्यानां योनिः । नित्यानुषक्तो हि वर्षगुणलाभः सेतुवापेषु। वणिक्पथः परातिसन्धानस्य योनिः, वणिक्पथेन हि दण्डगूढपुरुषातिनयनं शस्त्रावरणयानवाहनक्रयश्च क्रियते। प्रवेशो निर्णयनं च। खनिः सङ्ग्रामोपकरणानां योनिः। द्रव्यवनं दुर्गकर्मणां, यानरथयोश्च। हस्तिवनं हस्तिनाम्। गवाश्वखरोष्ट्राणां च व्रजः। तेषामलाभे बन्धुमित्रकुलेभ्यः समार्जनम्। उत्साहहीनः श्रेणीप्रवीरपुरुषाणां चोरगणाटविकम्लेच्छजातीनां परापकारिणां गूढपुरुषाणां च यथालाभमुपचयं कुर्वीत। परमिश्रः प्रतीकारमाबलीयसं वा परेषु प्रयुञ्जीत॥

एवं पक्षेण मन्त्रेण द्रव्येण च बलेन च। सम्पन्नः प्रतिनिर्गच्छेत् परावग्रहमात्मनः॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे चतुर्दशोऽध्यायः हीनशक्तिपूरणम्, आदितो द्वादशशतः॥

---

अमुक कार्याकरितां द्रव्य व सैन्य पुरविण्याचें कबूल करून त्याशीं तह करावा; आणि तह मोडल्यास कांहीं नुकसान भरून द्यावयाचेंहि कबूल करावें. आपल्या बाजूस साहाय्य करणारे लोक नसतील तर त्यानें आपल्या आप्ताच्या किंवा मित्राच्या पक्षाचा आश्रय करावा, अथवा एखादा दुर्घट किल्ला बांधून ठेवावा व त्याचा अशा वेळीं आश्रय घ्यावा. कारण किल्ल्याचा किंवा मित्राचा आधार असला, म्हणजे त्यास स्वकीय व परकीय मान देतात. ज्यास कार्याकार्य विचारशक्ति नाहीं त्यानें शहाण्या माणसांचा संग्रह करावा; अथवा विद्वान्, अनुभवी व वृद्ध माणसांचा सहवास ठेवावा म्हणजे त्याचें खरें खरें कल्याण साधेल.

ज्यास प्रभाव नाहीं म्हणजे ज्याजवळ द्रव्यबल व सैन्यबल नाहीं, त्यानें राष्ट्राच्या सुस्थितीविषयीं विशेष झटत असावें. राष्ट्र हें सर्व कार्यांचें उत्पत्तिस्थान आहे, राष्ट्रापासून प्रभाव म्हणजे द्रव्यबल व सैन्यबल प्राप्त होतें. दुर्ग म्हणजे डोंगरी किल्ला हा राजाचा व राष्ट्राचा आधार होय.

पाटबंधाऱ्याचीं कामें हें सर्व पिकांचें उत्पत्तिस्थान; पर्जन्यवृष्टीपासून जो फायदा, तोच फायदा पाटापासून कायमचा होतो.

व्यापारी रस्ते शत्रूवर सरशी करावयास उपयोगी पडतात, कारण व्यापारी रस्त्यांवरूनच सैन्याची व हेरांची रहदारी चालते; आणि शस्त्रें, चिलखतें, गाड्या, घोडे वगैरेंची खरेदी आणि नेआण याच रस्त्यांमुळें होऊं शकते.

खाणीपासून लढाईचीं हत्यारें उत्पन्न होतात.

झाडी व जंगलें यांचा किल्ले बांधण्यास आणि गाड्या, रथ वगैरे वाहनें तयार करण्यास उपयोग होतो. हत्तीच्या जंगलापासून हत्ती मिळतात. व्रजांपासून गाई, बैल, घोडे, खेचरें व उंट मिळतात.

ज्याचेजवळ यांचा अभाव असेल, त्यानें आपल्या आप्तापासून किंवा मित्रापासून हे मिळविण्याचा प्रयत्न करावा; ज्यास सैन्यबल नसेल, त्यानें शक्य तितका यत्न करून स्वयंसेवक पथकें, मोठमोठे बलाढ्य योद्धे, चोर व दरोडेखोर, रानटी लोक, म्लेच्छ, दुसऱ्यांस उपद्रव देणारे लोक व गुप्त हेर यांचा संग्रह करून ठेवावा.

दुसऱ्या राजाशीं तहानें स्नेहसंबंध उत्पन्न करून आपल्या बलाढ्य शत्रूचा प्रतिकार करावा. किंवा तें शक्य नसल्यास बलाढ्याशीं नमून वागावें.

याप्रमाणें आपल्या पक्षांतील राजांच्या मदतीनें, गुप्त मसलतीनें, द्रव्यबलानें, व सैन्यबलानें संपन्न होऊन राजानें शत्रूच्या तावडींतून आपली सुटका करून घ्यावी.

---

# अध्याय ११३ बलवता विगृह्योपरोधहेतवः दण्डोपनतवृत्तं च ।



दुर्बलो राजा बलवताभियुक्तः तद्विशिष्टबलमाश्रयेत, यमितरो मन्त्रशक्त्या नातिसन्दध्यात् । तुल्यबलमन्त्रशक्तीनाम् आयत्तसम्पदो वृद्धसंयोगाद् वा विशेषः । विशिष्टबलाभावे समबलैस्तुल्यबल-सङ्घैर्वा बलवतः सम्भूय तिष्ठेत, यावन्न मन्त्रप्रभावशक्तिभ्यामतिसन्दध्यात् । तुल्यमन्त्रप्रभावशक्तीनां विपुलारम्भतो विशेषः ॥

समबलाभावे हीनबलैः शुचिभिरुत्साहिभिः प्रत्यनीकभूतैर्बलवतः सम्भूय तिष्ठेत, यावन्न मन्त्र-प्रभावोत्साहशक्तिभिरतिसन्दध्यात् । तुल्योत्साहशक्तीनां स्वयुद्धभूमिलाभाद् विशेषः । तुल्यभूमीनां स्वयुद्धकाललाभाद् विशेषः । तुल्यदेशकालानां युग्यशस्त्रावरणतो विशेषः ।

सहायाभावे दुर्गमाश्रयेत, यत्रामित्रः प्रभूतसैन्योऽपि भक्तयवसेन्धनोदकोपरोधं न कुर्यात्, स्वयं च क्षयव्ययाभ्यां युज्येत । तुल्यदुर्गाणां निचयापसारतो विशेषः । निचयापसारसम्पन्नं हि मनुष्यदुर्गमिच्छेदिति कौटल्यः । तदेभिः कारणैराश्रयेत—

---

## प्रबल शत्रूशीं गांठ पडली असतां आश्रय शोधणें; जित राजाचें वर्तन.

बलहीन राजावर बलाढ्य राजानें स्वारी केली असतां, बलहीन राजानें, शत्रूच्या कारस्थानास दाद न देणारा व शत्रूहून अधिक बलाढ्य राजा असेल, त्याचा आश्रय करावा. राजाराजांत कारस्थानीपणा आणि सैन्यबल सारखेंच असेल, तेव्हां जो आपली मंत्रिअमात्यदुर्गादि संपत्ति आपल्या कह्यांत राखूं शकतो व ज्यास अनुभवी व पोक्त माणसांचा सहवास असतो, असा राजा पसंत करावा.

बलाढ्य राजा न आढळल्यास, शत्रूच्या बरोबरीच्या राजांशीं किंवा शत्रूशीं टक्कर देतां येईल इतक्या राजांशीं दोस्ती करावी. मात्र ही दोस्ती त्या राजांत शत्रूची मसलत, द्रव्यबल व पराक्रम यांस दाद न देण्याची ताकद असेल तोंपर्यंतच करावी. राजाराजांत कारस्थान, द्रव्यबल, व पराक्रम यांत समानताच असेल, तेव्हां जो अल्पावकाशांत युद्धाची जय्यत तयारी करूं शकतो, तो पसंत करावा.

शत्रूच्या बरोबरीचे राजे नसतील, तेव्हां सुवृत्त व उत्साही आणि शत्रूशीं तेढ असलेल्या अशा कमजोर राजाशीं समेट करून तोंपर्यंतच रहावें कीं, जोंपर्यंत कारस्थान, द्रव्यबल, पराक्रम व उत्साह यांच्यायोगानें शत्रू त्याजवर मात करणार नाहीं. राजाराजांत उत्साह व कार्यक्षमता सारखीच असेल, तेव्हां आपल्यास इष्ट व हितकर असें युद्ध-क्षेत्र ज्याचें असेल त्या राजाशीं स्नेह करावा. युद्ध-क्षेत्र सारखेंच असल्यास, आपल्याला हितकर अशावेळीं ज्याची मैत्री उपयोगी पडेल तो राजा पसंत करावा. स्थल व काल सारखेच हितकर असल्यास, वीर, शस्त्रें व चिलखतें यांच्या बरेवाईटपणावरून निवड करावी.

अशा कोणाचीच मदत न मिळेल तर अशा किल्ल्यांत आश्रय घेऊन बसावें कीं, शत्रूजवळ कितीहि सैन्य असलें तरी तो त्या किल्ल्यांत अन्न सामुग्री, दाणागोटा, लांकूडफांटा, पाणी वगैरे पोहोंचण्यास अडथळा करूं शकणार नाहीं आणि उलट शत्रूलाच द्रव्यहानि व मनुष्यहानि सोसावी लागेल. अनेक किल्ले बळकटीनें सारखेच असतील, तर ज्यांत युद्धसामुग्रीचा सांठा करण्यास अधिक सोइस्कर असेल आणि ज्यांतून बाहेर पडण्यास मार्ग असेल तो पसंत करावा. कौटिल्य म्हणतो—दाणागोट्याची, दारूगोळा सांठविण्याची व बाहेर पडण्याची सारखीच सोय असेल अशांतून ज्या किल्ल्यांत माणसांची वस्ती असेल तोच पसंत करावा. अशा किल्ल्याचा आश्रय करण्याचीं कारणें:—

'पार्ष्णिग्राहमासारं मध्यममुदासीनं वा प्रतिपादयिष्यामि । सामन्ताटविकतत्कुलीनावरुद्धानामन्यतमेनास्य राज्यं हारयिष्यामि घातयिष्यामि वा । कृत्यपक्षोपग्रहेण वास्य दुर्गे राष्ट्रे स्कन्धावारे वा कोपं समुत्थापयिष्यामि । शस्त्राग्निरसप्रणिधानैरौपनिषदिकैर्वा यथेष्टमासन्नं हनिष्यामि । स्वयमधिष्ठितेन वा योगप्रणिधानेन क्षयव्ययमेनमुपनेष्यामि । क्षयव्ययप्रवासोपतप्ते वास्य मित्रवर्गे सैन्ये वा क्रमेणोपजापं प्राप्स्यामि । वीवधासारप्रसारवधेन वास्य स्कन्धावारावग्रहं करिष्यामि । दण्डोपनयेन वास्य रन्ध्रमुत्थाप्य सर्वसन्दोहेन प्रहरिष्यामि । प्रतिहतोत्साहेन वा यथेष्टं सन्धिमवाप्स्यामि । मयि प्रतिबन्धस्य वा सर्वतः कोपाः समुत्थास्यन्ति । निरासारं वास्य मूलममित्राटवीदण्डैरुद्घातयिष्यामि । महतो वा देशस्य योगक्षेमामिहस्थः पालयिष्यामि । स्वविक्षिप्तं मित्रविक्षिप्तं वा मे सैन्यमिहस्थस्यैकस्थमविषह्यं भविष्यति । निम्नखातरात्रियुद्धविशारदं वा मे सैन्यं पथ्याबाधमुक्तमासन्ने कर्मणि करिष्यति । विरुद्धदेशकालमिहागतो वा स्वयमेव क्षयव्ययाभ्यां न भविष्यति । महाक्षयव्ययाभिगम्योऽयं देशो दुर्गाटव्यपसारबाहुल्यात्, परेषां व्याधिप्रायः सैन्यव्यायामानाम् अलब्धभौमश्च, तमापद्गतः प्रवेक्ष्यति । प्रविष्टो वा न निर्गमिष्यति' इति ।

कारणाभावे बलसमुच्छ्रये वा परस्य दुर्गमुन्मुच्यापगच्छेत् । अग्निपतङ्गवदमित्रे वा प्रविशेत् । अन्यतरासिद्धिर्हि त्यक्तात्मनो भवतीत्याचार्याः । नेति कौटल्यः । सन्धेयतामात्मनः परस्य चोप-

---

" माझे पार्ष्णिग्राह व पार्ष्णिग्राहासार अशा राजांना मी मध्यम अथवा तटस्थ व्हावयास लावीन; शत्रूच्या राज्यास लागून असलेला राजा ( अर्थात् त्याचा शत्रु ), किंवा शत्रूच्या राज्यांतील रानटी बंडखोर किंवा बंदींत असलेले, असे त्याचे आप्त यांस माझ्या बाजूस वळवून, त्यांच्याकडून शत्रूच्या राज्याची धूळधाण करीन अथवा राज्य नाहींसें करीन; त्याच्या राज्यांत असलेल्या माझ्या पक्षाच्या लोकांकडून त्याच्या किल्ल्यांत, देशांत अथवा सैन्यांत असंतोष उत्पन्न करीन; जवळ असेल तेव्हां त्यावर शस्त्रप्रयोग, अग्निप्रयोग अथवा विषप्रयोग करून, अथवा मला सुचेल तो गुप्त प्रयोग करून, त्यास ठार करीन; आपण होऊन किंवा गुप्त हेरांच्या उठावणीनें अंगीकारिलेल्या कार्यांत त्यास मनुष्यहानि व द्रव्यहानि सोसावयास लावीन; मनुष्यहानि, द्रव्यहानि व प्रवासाची दगदग सोसून त्रासलेल्या त्याच्या मित्रांत अथवा सैन्यांत गुप्तपणें राजद्रोहाचें बीज फैलावीन; त्याची कही लुटून त्या सैन्यास अन्नसामुग्री व इतर सामान पोहोचणार नाहीं असा त्याच्या छावणीचा कोंडमारा करीन; अथवा त्यास आपण होऊन शरण जाईन, आणि मग त्याच्यांत मर्मस्थळें शोधून काढून जय्यत तयारीनिशीं त्याजवर घाला घालून त्यास जेरीस आणीन; अशाप्रकारें तो शक्तिहीन झाला म्हणजे त्यास मला हवा तसा तह कबूल करावयास भाग पाडीन; आणि तो मला हरकत करावयास लागला, तर त्यावर सर्व बाजूंनीं काहूर उठेल; अथवा त्याचें खास सैन्य दुर्बल झालें म्हणजे त्याच्याच देशांतील त्याच्या रानटी वैऱ्यांकडून अथवा बंडखोरांकडून त्याचा नाश करवीन; येथें किल्ल्यांत बसून मी आपल्या अफाट देशाचें पोषण व रक्षण करीन; इतस्ततः पसरलेलें माझें व माझ्या मित्राचें सैन्य येथें एकत्र जमलें म्हणजे तें शत्रूस अजिंक्य होईल; माझें सैन्य दऱ्याखोऱ्यांत, खंदकांत व रात्रीं युद्ध करण्यांत पटाईत असून कूच करतांना त्यास कसलाहि त्रास होत नसल्यामुळें योग्य वेळ येईल तेव्हां ते सैन्य आपला पराक्रम दाखवील, शत्रु भलत्याच वेळीं व भलत्याच वाटेनें येथें आला तर द्रव्यहानि व मनुष्यहानि होऊन आपोआपच त्याचा नाश होईल; या प्रांतांत अनेक किल्ले व अनेक रानटी लोक असल्यामुळें आणि येथून हुलकावणी देऊन जाण्याला अनेक मार्ग असल्यामुळें माणसांची व पैशाची अतोनात हानि सोसल्याशिवाय या प्रांतावर स्वारी करणें त्यास अगदीं दुरापास्त आहे; शिवाय हा प्रांत परकीयांस रोगकारक आहे, व यांत सैन्याच्या हालचालींस योग्य स्थळें नाहींत; म्हणून तो ( शत्रू ) येथें आला, तर अत्यंत हालअपेष्टांमध्यें येऊन तो पडेल; आणि इतके हाल सोसून आलाच तर धडपणें परत जाणार नाहीं."

वरील कारणें दिसून आलीं नाहींत, किंवा शत्रूचें सैन्य फार अफाट आहे, असें जेव्हां दिसेल, तेव्हां किल्ला सोडून निघून जावें.

लभ्य सन्दधीत । विपर्यये विक्रमेण सिद्धिमपसारं वा लिप्सेत । सन्धेयस्य वा दूतं प्रेषयेत् । तेन वा प्रेषितमर्थमानाभ्यां सत्कृत्य ब्रूयात्—इदं राज्ञः पण्यागारम्, इदं देवीकुमाराणां, देवीकुमारवचनाद् इदं राज्यमहं च त्वदर्पणः इति ।

लब्धसंश्रयः समयाचारिकवद् भर्तरि वर्तेत । दुर्गादीनि च कर्माण्यावाहविवाहपुत्राभिषेकाश्वपण्यहस्तिग्रहणसत्रयात्राविहारगमनानि चानुज्ञातः कुर्वीत । स्वभूम्यवस्थितप्रकृतिसन्धिमुपघातमपसृतेषु वा सर्वमनुज्ञातः कुर्वीत । दुष्टपौरजानपदो वा न्यायवृत्तिमन्यां भूमिं याचेत । दूष्यवदुपांशुदण्डेन वा प्रतिकुर्वीत । उचितां वा मित्राद् भूमिं दीयमानां न प्रतिगृह्णीयात् । मन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजानामन्यतममदृश्यमाने भर्तरि पश्येत् । यथाशक्ति चोपकुर्यात् । दैवतस्वस्तिवाचनेषु तत्परा आशिषो वाचयेत् । सर्वत्रात्मनिसर्गं गुणं ब्रूयात् ॥

संयुक्तबलवत्सेवी विरुद्धः शङ्किताद्भिः । वर्तेत दण्डोपनतो भर्तर्येवमवस्थितः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे पञ्चदशोऽध्यायः बलवता विगृह्योपरोधहेतवः दण्डोपनतवृत्तम्, आदितस्त्रयोदशशततमः ॥

---

आमचे गुरु म्हणतात—जयाची किंवा सुटकेची आशाच नसेल तर, पतंग दिव्यावर झडप घालतो त्याप्रमाणें शत्रूवर चालून जावें; कारण अशावेळीं जिवावर उदार झालेल्या माणसास जय न मिळाल्यास स्वर्गप्राप्ति तरी होईल.

कौटिल्य म्हणतो—असें जिवावर उदार होणें बरें नव्हे. आपला व शत्रूचा तह होण्यासारखी परिस्थिति आहे कीं नाहीं, हें अगोदर पहावें; असल्यास तह करावा; नसल्यास जिवावर उदार होऊन पराक्रम गाजवावा, किंवा संधि सांपडल्यास दूर निघून जावें; अथवा कोणी तहास कबूल होण्यासारखा असेल, त्यावरोबर तहाचें बोलणें करण्याकरितां दूत पाठवावा, किंवा दुसऱ्या कोणाकडून तहासाठीं दूत आला तर त्यास द्रव्यानें व बहुमानानें सत्कारून त्यास म्हणावें––" हें राजाचें भांडार, हें राणीचें, हें राजपुत्राचें; राणी व राजपुत्र यांच्या संमतीनें मी हें सर्व तुम्हांस आपल्यासह अर्पण करितों. "

आश्रय मिळाल्यानंतर, त्याची मालकाप्रमाणें वेळोवेळीं सेवा करावी. किल्ले वगैरे बांधावयाचे असल्यास, विवाहादि संस्कार, किंवा पुत्रास यौवराज्याभिषेक करावयाचा झाल्यास, घोडे खरेदी करावयाचे झाल्यास, व्यापार करावयाचा झाल्यास, हत्ती पकडावयाचे झाल्यास, यज्ञादि कर्मे करावयाचीं झाल्यास, स्वारीस किंवा मृगयेस जावयाचें झाल्यास आश्रयदात्याची परवानगी घेतली पाहिजे. आपल्या हद्दींतील लोकांशीं कांहीं राजकारण करावयाचें झाल्यास, अथवा आपला देश सोडून गेलेल्यांना शिक्षा करावयाची असल्यास-सारांश कांहींहि करावयाचें झाल्यास–परवानगीनें करावें. राज्यांतील खेडींपाडीं व मोठीं शहरें यच्चयावत् आपल्या विरुद्ध असतील, तर ज्या प्रांतांत आपल्याला अनुकूल लोक असतील, असा प्रांत मागून घ्यावा; किंवा स्वतःला प्रतिकूल असलेल्या लोकांस अपराध्याप्रमाणें गुप्तपणें शासन करून प्रांत निष्कंटक करावा. मित्र जरी चांगली भूमि देऊं लागला, तरी ती पतकरतां कामा नये. आश्रयदात्याची गांठ पडली नाहीं, तर त्याचे मंत्री पुरोहित, सेनापति, व युवराज यांपैकीं कोणाची तरी गांठ घेत जावी. त्यास यथाशक्ति देणग्या ( नजराणे ) देऊन सुप्रसन्न राखावें. देवांच्या उत्सवांत आश्रयदात्याच्या कल्याणार्थ लोकांस प्रार्थना करावयास सांगावें. सारांश हरएक प्रसंगीं स्वतःस विसरून आश्रयदात्याचे गुणानुवाद गावे.

अशा रीतीनें बलाढ्य राजाची मनधरणी करीत असतां जिंकलेल्या राजानें, आपल्या स्वामीशीं अनुकूल असलेल्या वजनदार अधिकाऱ्यांची मर्जी राखून आणि स्वामीशीं प्रतिकूलतेनें वागणाऱ्यांशीं फटकून राहून कालक्रमणा करावी.

# अध्याय ११४ दण्डोपनायिवृत्तम् ।



अनुज्ञातस्तद्धिरण्योद्वेगकरं बलवान् विजगीषमाणो, यतः सुभूमिः स्वर्तुवृत्तिश्च स्वसैन्यानाम् अदुर्गोपसारः शत्रुरपार्ष्णिरनासारश्च, ततो यायात् । विपर्यये कृतप्रतीकारो यायात् ।

सामदानाभ्यां दुर्बलानुपनमयेद्, भेददण्डाभ्यां बलवतः ।

नियोगविकल्पसमुच्चयैश्चोपायानामनन्तरैकान्तराः प्रकृतीः साधयेत् ।

ग्रामारण्योपजीविव्रजवणिक्पथानुपालनमुज्झितापसृतापकारिणां चार्पणमिति सान्त्वमाचरेत् । भूमिद्रव्यकन्यादानमभयस्य चेति दानमाचरेत् ।

सामन्ताटविकतत्कुलीनावरुद्धानामन्यतमोपग्रहेण कोशदण्डभूमिदाययाचनमिति भेदमाचरेत् । प्रकाशकूटतूष्णींयुद्धदुर्गलम्भोपायैरमित्रप्रग्रहणमिति दण्डमाचरेत् ।

एवमुत्साहवतो दण्डोपकारिणः स्थापयेत्, स्वप्रभाववतः कोशोपकारिणः, प्रज्ञावतो भूम्युपकारिणः ।

---

## दुसऱ्यास नरम आणणाऱ्या राजाची वृत्ति.

बलवान् विजयेच्छु राजाला जेणेंकरून खंडणी वसूल होईल अशी व शत्रूला तापदायक अशी स्वारी करण्याला शास्त्राची अनुज्ञा आहे. अशा राजानें ज्या देशांत सर्व काळीं व सर्वस्थळीं सैन्याच्या व्यवस्थित हालचाली करावयास योग्य अशी भूमि असेल आणि जेथील राजाला किल्ल्यांचें संरक्षण नसेल आणि जेथून आपल्याला पिछाडीच्या शत्रूची किंवा त्याच्या आसार नामक मित्राची भीति नसेल अशा देशावर स्वारी करावी. पिछाडीच्या शत्रूंची भीति असेल तर त्यांचा बंदोबस्त केल्यानंतर मग स्वारीस जावें.

दुर्बल राजे असतील, त्यांच्याशीं सलोखा करून किंवा देणग्या देऊन त्यांस वश करावें; बलाढ्य राजांना त्यांच्यांत फाटाफूट करून किंवा स्वारी करून वश करावे.

राजकारणांतील निश्चित किंवा विकल्पात्मक किंवा समुच्चयस्वरूपाचीं धोरणें अमलांत आणून आपल्या अगदीं लगतच्या शत्रूच्या व त्याच्या पलीकडील शत्रूच्या अमात्यादि प्रकृतीस वश करावें.

गांवांत व रानांत उपजीविका करणारे जे लोक त्यांच्या सोयीसाठीं गौळवाडे व दळणवळणाचे रस्ते वगैरेंचें संरक्षण करून, आणि हद्दपार केलेले,पळून गेलेले आणि राज्याला उपद्रव देणारे जे लोक असतील त्यांस माफी देऊन त्या लोकांस निर्भय करून आपलेसे करून घ्यावें. ज्यांना असली कसलीहि भीति नसेल त्यांना जमीन, द्रव्य, कन्या इत्यादि दान देऊन आपलेसे करावें.

शेजारचा राजा, रानटी बंडखोर, राजघराण्यांतील आप्त, बंदीवान् असलेले राजपुत्र यांतून एखाद्यास शत्रूविरुद्ध चिथवून त्यास द्रव्य, सैन्य, जहागीर किंवा हिस्सा मागावयास लावून भेद उत्पन्न करावा.

मैदानावर उघड युद्ध करून, गनिमी काव्यानें लढून, किंवा गुप्त युद्ध करून अथवा किल्ला हस्तगत करण्याःकरितां जे उपाय सांगितले आहेत ते योजून शत्रूस घेरावें. यास दंडनीति म्हणतात.

अशा रीतीनें जिंकलेल्या शत्रूंतून ज्यांच्या योगानें सैन्यास बळकटी येईल, अशा उत्साही शत्रूंस आपल्या सैन्यांत जागा द्यावी. ज्यांच्या योगानें द्रव्य-भांडार अधिक भरपूर होईल असे जे ऐश्वर्यवान् राजे असतील त्यांच्या कडून खंडणी घ्यावी. अथवा ज्यांच्या योगानें देश संपन्न होईल, असे जे बुद्धिमान् लोक असतील त्यांची शेतकीच्या सुधारणेकडे योजना करावी.

तेषां पण्यपत्तनग्रामखनिसञ्जातेन रत्नसारफल्गुकुप्येन द्रव्यहस्तिवनव्रजसमुत्थेन यानवाहनेन वा यद् बहुश उपकरोति तच्चित्रभोगं, यद्व दण्डेन कोशेन वा महदुपकरोति तन्महाभोगं, यद् दण्डकोशभूमीरुपकरोति तत् सर्वभोगम्।

यदमित्रमेकतः प्रतिकरोति तदेकतोभोगि। यदमित्रमासारं चापकरोति तदुभयतोभोगि। यदमित्रासारप्रतिवेशाटविकान् सर्वतः प्रतिकरोति तत् सर्वतोभोगि।

पार्ष्णिग्राहश्चाटविकः शत्रुमुख्यः शत्रुर्वा भूमिदानसाध्यः कश्चिदासाद्येत, निर्गुणया भूम्यैनमुपग्राहयेत्, अप्रतिसम्बद्धया दुर्गस्थं, निरुपजीव्ययाटविकं, प्रत्यादेयया तत्कुलीनं, शत्रोरुपच्छिन्नया शत्रोरुपरुद्धं, नित्यामित्रया श्रेणीबलं, बलवत्सामन्तया संहतबलम्, उभाभ्यां युद्धे प्रतिलोमम्, अलब्धव्यायामयोत्साहिनं, शून्ययारिपक्षीयं, कर्शितयापवाहितं, महाक्षयव्ययनिवेशया गतप्रत्यागतम्, अनुपाश्रयया प्रत्यपसृतं, परेणानधिवास्यया स्वयमेव भर्तारमुपग्राहयेत्।

तेषां महोपकारं निर्विकारं चानुवर्तयेत्। प्रतिलोममुपांशुना साधयेत्। उपकारिणमुपकारशक्त्या तोषयेत्। प्रयासतश्चार्थमानौ कुर्यात्। व्यसनेषु चानुग्रहम्। स्वयमागतानां यथेष्टदर्शनं प्रति-

---

त्यांच्यापैकीं जे मोठमोठ्या व्यापारी शहरांत व गांवांत व्यापार करून किंवा खाणी खोदून मिळालेलीं रत्नें, किंवा इतर कच्चा माल, इमारती लांकडें, जंगलांतील वनस्पती हत्ती किंवा खिल्लारें आणि गाड्या रथ वगैरे पुरवून मदत करितात, ते "चित्र-भोग" मित्र होत; जे द्रव्य व सैन्य पुरवून मदत करितात, ते 'महाभोग' मित्र, जे द्रव्य, सैन्य व जमीन पुरवून मदत करितात, ते "सर्वभोग मित्र" होत. जो मित्र शत्रूला एका बाजूनेंच रोखून धरितो, तो एक बाजू संभाळणारा ( एकतो भोगी ) मित्र; जो शत्रूस व शत्रुमित्रांसहि हात दाखवितो तो उभयतोभोगीमित्र; आणि जो शत्रु, शत्रूचे मित्र, शेजारील राजे, रानटी लोक इत्यादि सर्वांचा समाचार घेतो, तो सर्वतोभोगी मित्र होय.

पिछाडीचा शत्रु, रानांतील बंडखोर, शत्रु-सरदार, किंवा प्रत्यक्ष शत्रु जमीन देऊन वश होण्याजोगा असेल तर त्यास नापीक ज़मीन देऊन वश करून ठेवावें; किल्लेदार शत्रु असेल, तर त्यास त्याच्या किल्ल्याला लागून नसलेली जमीन देऊन वश करावें; जंगली शत्रूस, ज्या जमिनींत उपजीविका होणार नाहीं, अशी जमीन देऊन हस्तगत करावें, त्याच्या ( शत्रूच्या ) घराण्यांतलि माणूस शत्रु असेल, तर जमीन परत मिळण्याच्या करारावर ती त्यास देऊन आधीन करून ठेवावें, शत्रूनें बंदिवान केलेला माणूस असेल तर त्यास शत्रूपासून काबीज केलेली जमीन देऊन वश करावें; संघांच्या पथकास जींत निरंतर शत्रुत्वानें राहणारे लोक असतील अशी जमीन देऊन कह्यांत ठेवावें; संयुक्त मंडळाचें सैन्य असेल त्यास ज्या जमिनी शेजारीं बलाढ्य राजांचा प्रांत आहे अशी जमीन देऊन हाताशीं धरावें; जींत दोनहि उपद्रव आहेत—म्हणजे जींत निरंतर शत्रुत्वानें राहणारे लोक व शेजारीं बलाढ्य राजा—अशी जमीन अजिंक्य लढवय्यास देऊन वश करून ठेवावें. सैन्याच्या हालचालीस जी जमीन गैरसोयीची असेल अशी जमीन उत्साही राजास द्यावी; शत्रुपक्षाच्या माणसास पडित जमीन असेल ती द्यावी; हद्दपार केलेल्यास क्षीण झालेली जमीन, पळून गेलेला मनुष्य पुन्हां परत आला असेल त्यास, ज्या जमिनींत अत्यंत खर्च व श्रम करून वसाहत करतां येईल, अशी जमीन द्यावी; आपला देश सोडून आलेल्यास दुर्गादि रक्षणसाधनरहित जमीन असेल ती द्यावी, आणि आपल्या आश्रयदात्या राजास, वस्ती करावयास अयोग्य, अशी जमीन स्वतः अर्पण करावी.

अशा राजांपैकीं जो मोठा उपकारकर्ता व निष्कपट मनाचा असेल, त्याशीं तसेंच सरळ वर्तन ठेवावें; विरुद्ध असेल, त्यास गुप्तपणें ताळ्यावर आणावें; सद्बुद्धीनें वागणाराशीं सद्बुद्धीनें वागून त्यास खुष ठेवावें; जो आपल्या हितार्थ झटतो त्यास यथाशक्ति देणगी द्यावी व सन्मानास चढवावें;

विधानं च कुर्यात् । परिभवोपघातकुत्सातिवादांश्चैषु न प्रयुञ्जीत । दत्त्वा चाभयं पितेवानुगृह्णीयात् । यश्चास्यापकुर्यात् तद्दोषमभिविख्याप्य प्रकाशमेनं घातयेत् । परोद्वेगकारणाद् वा दाण्डकर्मिकवच्चेष्टेत ।

नच हतस्य भूमिद्रव्यपुत्रदारानभिमन्येत । कुल्यानप्यस्य स्वेषु पात्रेषु स्थापयेत् । कर्मणि मृतस्य पुत्रं राज्ये स्थापयेत् ।

एवमस्य दण्डोपनताः पुत्रपौत्राननुवर्तन्ते ।

यस्तूपनतान् हत्वा बद्ध्वा वा भूमिद्रव्यपुत्रदारानभिमन्येत, तस्योद्विग्नं मण्डलम् अभावायोत्तिष्ठते । ये चास्यामात्याः स्वभूमिष्वायत्तास्ते चास्योद्विग्ना मण्डलमाश्रयन्ते । स्वयं वा राज्यं प्राणान् वास्याभिमन्यन्ते ॥

स्वभूमिषु च राजानस्तस्मात् साम्नानुपालिताः ।
भवन्त्यनुगुणा राज्ञः पुत्रपौत्रानुवर्तिनः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे षोडशोऽध्यायः दण्डोपनायिवृत्तम्, आदितश्चतुर्दशशततमः ॥

---

# अध्याय ११५ सन्धिकर्म, सन्धिमोक्षश्च ।

शमः सन्धिः समाधिरित्येकोऽर्थः । राज्ञां विश्वासोपगमः शमः सन्धिः समाधिरिति ।

---

संकटसमयीं त्याच्यावर कृपा करावी. जेव्हां जेव्हां तो भेटावयास येईल तेव्हां तेव्हां त्याची भेट घेऊन आणि परत भेट देऊन आनंदवीत जावें, त्याचा अपमान करूं नये, त्यास धमकी देऊं नये; निंदाभाषण करूं नये; कठोरपणानें बोलूं नये. त्यास अभय देऊन, बाप मुलाचें पालन करतो, तसें पालन करावें. जर कोणी त्याची खोडी काढील तर त्याचा गुन्हा जाहीर करून त्यास जाहीर रीतीनें शासन करावें. तसें केल्यानें लोकांत खळबळ उडण्यासारखी असल्यास अपराध्यांस गुप्त शिक्षा करण्याच्या प्रकाराचा अवलंब करावा.

लढाईंत पडलेल्या राजाचें द्रव्य, जमीन, मुलगा, बायको, यांचा अभिलाष करूं नये. त्याचे आप्तस्वकीय असतील त्यांसहि त्यांच्या त्यांच्या पात्रतेप्रमाणें कामावर नेमून ठेवावें. आपल्या बरोबर स्वारीस आलेला राजा मेला असतां, त्याच्या मुलास त्याच्या गादीवर बसवावें.

असें आचरण केलें असतां सैन्यबलानें शरण आलेले लोक आपल्याशींच नव्हे तर आपल्या पुत्रांशीं व पौत्रांशींहि भक्तीनें वागतील.

राजांना ठार करून किंवा बंदीवान करून जो त्यांच्या भूमीचा, द्रव्याचा, पुत्राचा किंवा बायकोचा अभिलाष धरील, त्यावर मंडलांतील इतर राजे संतापून त्याचा नाश करावयास उठतील आणि त्याचे जे अमात्य त्याच्या देशांत नेमलेले असतील, तेहि संतापून मंडलांतील राजांस जाऊन मिळतील, आणि विजिगीषूचें राज्य व प्राण हरण करण्याच्या खटपटीस लागतील.

जिंकलेल्या राजांची त्यांच्या देशांत पुनः स्थापना करून ठेवली आणि त्यांच्याशीं सलोखा ठेवावा म्हणजे ते आपली अशी स्थापना करणाऱ्या राजाशीं आणि त्याच्या वंशजांशीं भक्तीनेंच वागतात.

---

## तह करणें व मोडणें.

शम, संधि आणि समाधि हे समानार्थक शब्द आहेत. जेणेंकरून राजांचा एकमेकांवर विश्वास बसतो, त्यास शम, संधि किंवा समाधि म्हणतात.

'सत्यं शपथो वा चलः सन्धिः। प्रतिभूः प्रतिग्रहो वा स्थावरः' इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। सत्यं शपथो वा परत्रेह च स्थावरः सन्धिः, इहार्थ एव प्रतिभूः प्रतिग्रहो वा बलापेक्षः।

'संहिताः स्मः' इति सत्यसन्धाः पूर्वे राजानः सत्येन सन्दधिरे। तस्यातिक्रमे शपथेन अग्न्युदकसीताप्राकारलोष्टहस्तिस्कन्धाश्वपृष्ठरथोपस्थशस्त्ररत्नबीजगन्धरससुवर्णहिरण्यान्यालेभिरे--हन्युरेतानि त्यजेयुश्चैनं यः शपथमतिक्रामेद् इति।

शपथातिक्रमे महतां तपस्विनां मुख्यानां वा प्रातिभाव्यबन्धः प्रतिभूः। तस्मिन् यः परावग्रहसमर्थान् प्रतिभुवो गृह्णाति, सोऽतिसन्धत्ते। विपरीतोऽतिसन्धीयते।

बन्धुमुख्यप्रग्रहः प्रतिग्रहः। तस्मिन् यो दूष्यामात्यं दूष्यापत्यं वा ददाति सोऽतिसन्धत्ते। विपरीतोऽतिसन्धीयते। प्रतिग्रहग्रहणविश्वस्तस्य हि परः छिद्रेषु निरपेक्षः प्रहरति।

अपत्यसमाधौ तु। कन्यापुत्रदाने ददत् तु कन्यामतिसन्धत्ते। कन्या ह्यदायादा परेषामेवार्थाय क्लेशाय च। विपरीतः पुत्रः।

पुत्रयोरपि जात्यं प्राज्ञं शूरं कृतास्त्रमेकपुत्रं वा ददाति, सोऽतिसन्धीयते। विपरीतोऽतिसन्धत्ते।

---

आमचे गुरु असें म्हणतात कीं, वचन अथवा शपथ यांवर अवलंबून राहणारा तह असतो तो अस्थिर संधि अथवा तह होय; आणि जामीन किंवा ओलीस घेऊन झालेला तह स्थिर संधि अथवा तह होय.

पण कौटिल्य म्हणतो—असें नव्हे. वचनपूर्वक अथवा शपथपूर्वक केलेला संधि या लोकीं आणि परलोकींहि स्थिर मानावा. जामीन किंवा ओलीस घेऊन केलेला संधि केवळ या लोकीं शक्ति वाढविण्याच्या कामीं उपयोगीं पडतो.

प्राचीन काळांतले सत्यवचनी राजे केवळ सत्याला स्मरून हा आम्हीं आपापसांत तह केला असें म्हणत आणि तो तह पक्का मानला जाई. यदाकदाचित् सत्याचें उल्लंघन होईल अशी भीति वाटली तर मात्र अग्नि, उदक, नांगर, तटाचें ढेंकूळ, हत्तीचें गंडस्थळ, घोड्याची पाठ, रथांतलें आसन, शस्त्र, रत्न, धान्य, गंध, रस, सुवर्ण किंवा सोन्याचें नाणें यांस स्पर्श करून शपथ घेत असत; आणि सत्याचें उल्लंघन केल्यास जो उल्लंघन करील त्याचा नाश होवो अथवा ह्या वस्तु त्यास सोडून जावोत असें म्हणत असत.

शपथ मोडली जाऊं नये म्हणून ज्या तहांत मोठमोठे लोक अथवा तपस्वी अथवा प्रमुख पुरुष यांची जामीनकी घेतली जाते तो जामीन घेऊन केलेला तह होय. त्यांत जो पक्ष शत्रूचा पाडाव करण्यास समर्थ असे जामीन घेतो त्यानें जिंकलें आणि उलटपक्ष हरला असें म्हणावें.

ज्या तहांत राजघराण्यांतील पुरुष अथवा प्रमुख पुरुष ओलीस घेतला जातो, त्यास प्रतिग्रह अथवा ओलीस घेऊन केलेला तह असें म्हणतात; त्यांत जो पक्ष फितुर होण्याजोगा अमात्य किंवा राजपुत्र ओलीस देतो तो सरस आणि उलटपक्ष नीरस ठरतो; कारण असा ओलीस पत्करून तहास कबूल होणाऱ्या पक्षाच्या मर्मावर दुसरा पक्ष निःशंकपणें घाव घालतो.

तहांत अपत्य ओलीस द्यावयाची पाळी आली असतां, त्यांत मुलगा द्यावा कीं मुलगी द्यावी असा विचार उपस्थित झाल्यास, जो मुलगी ओलीस देतो त्याची वाहवा; कारण मुलीला वारसा हक्क नसतो व ती केव्हांतरी परक्याला द्यावयाचीच असते व ती दुसऱ्याच्या क्लेशांस व संकटांसच कारणीभूत होते. मुलाची गोष्ट तशी नसते.

दोन पुत्रांमध्यें समानजातीय, शहाणा, शूर, शस्त्रास्त्र जाणणारा अथवा एकुलता एक पुत्र जो देतो तो फसला आणि उलटपक्षाची फत्ते झाली असें म्हणावें; कारण हीन जातीय मुलाला किंवा त्याच्या संततीस राज्याचा वारसा

जात्यादजात्यो हि लुप्तदायादसन्तानत्वादाधातुं श्रेयान्। प्राज्ञादप्राज्ञो मन्त्रशक्तिलोपात् । शूरादशूर- उत्साहशक्तिलोपात् । कृतास्त्रादकृतास्त्रः प्रहर्तव्यसम्पल्लोपात्। एकपुत्रादनेकपुत्रो निरपेक्षत्वात्।

जात्यप्राज्ञयोर्जात्यमप्राज्ञमैश्वर्यप्रकृतिरनुवर्तते । प्राज्ञमजात्यं मन्त्राधिकारः । मन्त्राधिकारेऽपि वृद्धसंयोगाज्जात्यकः प्राज्ञमतिसन्धत्ते।

प्राज्ञशूरयोः प्राज्ञमशूरं मतिकर्मणां योगोऽनुवर्तते। शूरमप्राज्ञं विक्रमाधिकारः । विक्रमाधि- कारेऽपि हस्तिनमिव लुब्धकः प्राज्ञः शूरमतिसन्धत्ते।

शूरकृतास्त्रयोः शूरमकृतास्त्रं विक्रमव्यवसायोऽनुवर्तते । कृतास्त्रमशूरं लक्षलम्भाधिकारः । लक्षलम्भाधिकारेऽपि स्थैर्यप्रतिपत्त्यसंमोषैः शूरः कृतास्त्रमतिसन्धत्ते।

बह्वेकपुत्रयोर्बहुपुत्र एकं दत्त्वा शेषवृत्तिस्तब्धः सन्धिमतिक्रामति नेतरः।

पुत्रसर्वस्वदाने संन्धिश्चेत् पुत्रफलतो विशेषः। समफलयोः शक्तप्रजननतो विशेषः । शक्तप्रज- ननयोरप्युपस्थितप्रजननतो विशेषः।

---

हक्क नसल्यामुळें असा मुलगा ओलीस देणें स्वजातीय मुलगा देण्यापेक्षां अधिक चांगलें, मूर्ख मुलाला सारासार विचार करण्याची शक्ति नसल्यामुळें तो देणें शहाणा मुलगा देण्यापेक्षां अधिक चांगलें; भ्याडाला उत्साह लवमात्र नसतो म्हणून असा मुलगा शूराऐवजीं देणें हें चांगलें; ज्यास शस्त्रास्त्रविद्येचा गंधहि नाहीं, अशा मुलास शत्रूवर प्रहार कसा करावा हें माहीत नसतें, म्हणून तो देणें शस्त्रवेत्ता मुलगा देण्यापेक्षां अधिक चांगलें; एकुलता एक मुलगा देण्यापेक्षां अनेक पुत्र असल्यास त्यांपैकीं एक देणें अधिक चांगलें, कारण पुष्कळ मुलगे असले म्हणजे त्याविषयीं पुत्रप्रेम बेताचेंच असणार !

सत्कुलीन मुलगा आणि शहाणा मुलगा यांपैकीं प्रजाजन सत्कुलीन मुलाशींच प्रेमानें राहतील, मग तो शहाणा नसला तरी हरकत नाहीं. शहाणा मुलगा सत्कुलीन नसला तरी कार्याकार्य विचार करणारा असतो; तथापि राजकारणांत सत्कुलीन मुलाला वृद्ध व अनुभवी माणसांचा वेळोवेळीं सल्ला मिळण्याचा जसा संभव असतो तसा शहाण्या पण अकुलीन मुलाला नसतो. म्हणून कुलीन मुलगाच शहाण्याहून सरस ठरतो.

शहाणा व शूर यां पैकीं शहाणा मुलगा शूर नसला, तरी बुद्धीचीं कामें करण्यास लायक असतो; आणि शूर मुलगा शहाणा नसला, तरी पराक्रम गाजवूं शकतो. पण पराक्रमाच्या बाबतींतहि ज्याप्रमाणें शिकारी मनुष्य ( साटमाऱ्या ) हत्तीवर ताण करतो त्याप्रमाणें शहाणा मुलगा शूर मुलावर सरशी करतो.

शस्त्रविद्या जाणणारा आणि शूर, यांमध्यें शूर मुलगा शस्त्रविद्या जाणणारा नसला तरी पराक्रम गाज- विण्याचें शील त्यास असतें; आणि शस्त्रविद्याभिज्ञ शूर नसला, तरी अचूक नेम मारण्याची पात्रता त्यास असते. अचूक नेम मारण्याची पात्रता असली, तरी शूराच्या आंगीं दृढनिश्चय व चिकाटी असल्यामुळें, तो शस्त्रविद्या जाण- णाऱ्याहूनहि सरस ठरतो.

ज्या राजास अनेक पुत्र आहेत, तो राजा एक पुत्र ओलीस देऊन इतर पुत्रांत समाधान मानून राहील; म्हणून अशा राजास केव्हांतरी तह मोडतां येईल; परंतु ज्या राजास एकच पुत्र असून तोहि ओलीस द्यावा लागला असेल, त्यास केव्हांहि तह मोडतां येणार नाहीं.

सर्वच पुत्र ओलीस द्यावे असा प्रसंग प्राप्त झाल्यास ज्याला अद्यापि पुत्र होण्याची आशा आहे तो राजा बरा म्हणावयाचा. अशा दोघां राजांत पुत्रोत्पादनाचें सामर्थ्य सारखेंच असेल, तेव्हां ज्यास सशक्त पुत्र होत असतील तो दुसऱ्यापेक्षां बरा. आणि सशक्त पुत्र उत्पन्न करण्याचें सामर्थ्य सारखेंच असेल तेव्हां ज्यास पुत्रोत्पत्ति लवकर होण्याचीं चिन्हें असतील तो दुसऱ्यापेक्षां बरा.

शक्तिमत्येकपुत्रे तु लुप्तपुत्रोत्पत्तिरात्मानमादध्यात्, न चैकपुत्रमिति।
अभ्युच्चीयमानः समाधिमोक्षं कारयेत्।

कुमारासन्नाः सत्रिणः कारुशिल्पिव्यञ्जनाः कर्माणि कुर्वाणाः सुरुङ्गया रात्रावुपखानयित्वा कुमारमपहरेयुः। नटनर्तकगायकवादकवाग्जीवनकुशीलवप्लवकसौभिका वा पूर्वप्रणिहिताः परमुपतिष्ठेरन्। ते कुमारं परम्परयोपतिष्ठेरन्। तेषामनियतकालप्रवेशस्थाननिर्गमनानि स्थापयेत्। ततस्तद्व्यञ्जनो वा रात्रौ प्रतिष्ठेत।

तेन रूपाजीवाभार्याव्यञ्जनाश्च व्याख्याताः। तेषां वा तूर्यभाण्डफेलां गृहीत्वा निर्गच्छेत्। सूदारालिकस्नापकसंवाहकास्तरककल्पकप्रसाधकोदकपरिचारकैर्वा द्रव्यवस्त्रभाण्डफेलाशयनासनसम्भोगैर्निर्ह्रियेत। परिचारकच्छद्मना वा किञ्चिदरूपवेलायामादाय निर्गच्छेत्। सुरङ्गामुखेन वा निशोपहारेण। तोयाशये वा वारुणं योगमातिष्ठेत्। वैदेहकव्यञ्जना वा पक्वान्नफलव्यवहारेणारक्षिषु रसमवचारयेयुः। दैवतोपहारश्राद्धप्रहवणनिमित्तमारक्षिषु मदनयोगयुक्तमन्नपानरसं वा प्रयुज्यापगच्छेत्। आरक्षकप्रोत्साहनेन वा।

नागरककुशीलवचिकित्सकापूपिकव्यञ्जना वा रात्रौ समृद्धगृहाण्यादीपयेयुः। (आरक्षिणां?)

---

एकुलता एक शूर मुलगा ओलीस देण्याचा प्रसंग आल्यास व पुढें पुत्रोत्पत्ति होण्याची आशा नसल्यास, बापानें स्वतः ओलीस जावें, पण मुलास ओलीस देऊं नये.

तह करून राहिल्यानंतर आपलें बल वाढलेलें दिसून आल्यावर तह मोडण्याच्या मार्गास लागावें.

ओलीस ठेवलेल्या राजपुत्राशीं सुतार, लोहार वगैरे कारागिरांच्या वेषांत असलेल्या हेरांनीं संधान बांधून रात्रीं भुयार खणून त्यामधून राजपुत्राला काढून न्यावें. नट, नर्तक, गवई, बजवय्ये, सोंगाडे, भाट डोंबारी, गारुडी वगैरे जे हेर अगोदरपासून कामगिरीवर पाठविलें असतील, त्यांनीं शत्रूच्या तैनातींत रहावें, व क्रमाक्रमानें राजपुत्रासही भेटत जावें; आणि हव्या त्यावेळीं बिनहरकत राजपुत्राकडे जाण्यायेण्याची व राहण्याची वहिवाट पाडावी. नंतर वरील हेरांचा वेष घेऊन राजपुत्रानें तेथून पलायन करावें.

वरील हेरांत वेश्या आणि भार्या अशा रूपानें राहणाऱ्या हेरांचा समावेश होतो; राजपुत्रानें वाद्यें किंवा दागिने यांची पेटी घेऊन त्या हेरांच्या वेषानें घेऊन निघून जावें. राजपुत्राजवळ हेरांनीं आचारी; मिठाईवाले, स्नान घालणारे, मालिश करणारे, अंथरूण घालणारे, श्मश्रु करणारे, अलंकार चढविणारे, पाणी देणारे वगैरे नोकर होऊन रहावें आणि संधि येतांच त्यांनीं राजपुत्राला पेटींत, कपड्यालत्त्यांत, भांड्यांच्या पेटाऱ्यांत, अंथरुणापांघरुणांत अथवा इतर सामानांत छपवून घेऊन जावें, अथवा राजपुत्रानें चेहरा न दिसेल अशा अंधाराच्या वेळीं नोकराचा वेष धारण करून पलायन करावें, अथवा रात्रीं भुयारामधून गुप्तपणें निघून जावें. किंवा जलाशयासन्निध मला वरुण देवाची पूजा करावयाची आहे असें म्हणून बसावें व पाण्यांतून पोहून निसटावें. व्यापारी हेरांनीं रखवालदारांस शिजविलेलें अन्न, फळें किंवा इतर पदार्थ खावयास द्यावेत व त्यांतून त्यांना गुंगीचें औषध द्यावें. पहारेकरी बेशुद्ध होतांच निघून जावें. अथवा देवतेची पूजा करण्याच्या मिषानें, पितरांचें श्राद्ध करण्याच्या मिषानें अथवा यज्ञक्रियेच्या मिषानें रखवालदारांच्या अन्नांत व पाण्यांत मदनवृक्षाचा रस घालून त्यांस विषप्रयोग करून निघून जावें; अथवा रखवालदारांस लांच देऊन त्याच्याच संमतीनें निघून जावें.

अथवा नगररक्षक, भाट, वैद्य किंवा पक्वान्नें तयार करणारा आचारी यांचे वेष घेऊन राहणाऱ्या गुप्त हेरांनीं रात्रीं शेजारच्या भरल्या घरास आग लावावी; किंवा व्यापारी हेरांनीं मोठमोठ्या बाजारांतील दुकानांस आग लावावी आणि त्या गडबडींत पहारेकऱ्यांचें लक्ष चुकवून राजपुत्रानें निसटावें. आपला पाठलाग होऊं नये

वैदेहकव्यञ्जना वा पण्यसंस्थामादीपयेयुः । अन्यद्वा शरीरं निक्षिप्य स्वगृहमादीपयेदनुपातभयात् । ततः सन्धिच्छेदखातसुरङ्गाभिरपगच्छेत् ।

काचकुम्भभाण्डभारव्यञ्जनो वा रात्रौ प्रतिष्ठेत । मुण्डजटिलानां प्रवासनान्यनुप्रविष्टो वा रात्रौ तद्व्यञ्जनः प्रतिष्ठेत विरूपव्याधिकरणारण्यचरच्छद्मनामन्यतमेन वा । प्रेतव्यञ्जनो वा गूढैर्निर्ह्रियेत । प्रेतं वा स्त्रीवेषेणानुगच्छेत् । वनचरव्यञ्जनाश्चैनमन्यतो यान्तमन्यतोऽपदिशेयुः, ततोऽन्यतो गच्छेत् । चक्रचराणां वा शकटवाटैरपगच्छेत् । आसन्ने चानुपाते सत्रं वा गृह्णीयात् । सत्राभावे हिरण्यं रसविद्धं वा भक्षजातमुभयतः पन्थानमुत्सृजेत् । ततोऽन्यतोऽपगच्छेत् ।

गृहीतो वा सामादिभिरनुपातमतिसन्दध्यात् । रसविद्धेन वा पथ्यदानेन ।

वारुणयोगाग्निदाहेषु वा शरीरमन्यदाधाय शत्रुमभियुञ्जीत—पुत्रो मे त्वया हत इति ॥

उपात्तच्छन्नशस्त्रो वा रात्रौ विक्रम्य रक्षिषु । शीघ्रपातैरपसरेद् गूढप्रणिहितैः सह ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे सप्तदशोऽध्यायः सन्धिकर्म सन्धिमोक्षः, आदितः पंचदशशततमः ॥

---

म्हणून राजपुत्रानें ज्या घरामध्यें तो राहात असेल त्यांत दुसऱ्या एखाद्या माणसाचें प्रेत ठेवून घरास आग लावावी आणि फटींतून, खिडकींतून किंवा भुयारांतून पलायन करावें.

अथवा, राजपुत्रानें कांचेचे मणि, मातीचीं भांडीं किंवा इतर माल विकणारा असा वेष घेऊन रात्रीं निघून जावें. अथवा मुंडलेल्या किंवा जटाधारी संन्याशांच्या मेळयांत मिसळून रात्रीं संन्याशाच्या वेषानें निघून जावें. अथवा विलक्षण रोगानें गांजलेला मनुष्य अशा मिषानें अथवा अरण्यवासी मनुष्याच्या मिषानें त्यास हेरांनीं घेऊन जावें; अथवा प्रेत म्हणून न्यावें. अथवा स्त्रीचा वेष धारण करून एखाद्या प्रेताच्या मागून जावें. राजपुत्रास कोणी धरावयास आला तर, वनचरांचा वेष धारण करणाऱ्या हेरांनीं पाठलाग करणारांस एक दिशा दाखवावी आणि इकडे राजपुत्रानें दुसऱ्याच दिशेनें निघून जावें. गाडीवाल्यांमध्यें मिसळून गाड्यांबरोबर व गाडीवाल्यांबरोबर निघून जावें. पाठलाग करणारा अगदींच नजीक आला, तर रानांत कोठेंतरी दबा धरून बसावें. दबा धरण्यासारखें ठिकाण नसल्यास रस्त्याच्या दोहों बाजूंवर सोनें किंवा विष मिसळलेले पदार्थ टाकून ठेवावे, आणि तेथून दुसऱ्या दिशेनें निघून जावें.

राजपुत्र पकडला गेला तर, पाठलाग करणाराची मनधरणी वगैरे करून त्याचा विश्वास संपादन करून त्यास फसवावें; अथवा विष मिसळलेले पदार्थ त्यास खावयास द्यावे.

वरुण देवतेला संतुष्ट करण्याकरितां चाललेल्या यज्ञांतील होमकुंडांत अथवा दुसऱ्या एखाद्या अग्नींत कोणाचें तरी शरीर टाकवून, राजपुत्राच्या बापानें शत्रूविरुद्ध अशी तक्रार करावी कीं, तूं माझा मुलगा ठार केलास. या कृतीनें राजपुत्र मृत झाला असें समजून त्याचा पाठलाग होणार नाहीं.

हेरांच्या कडून गुप्तपणें हत्यार हस्तगत करून घेऊन राजपुत्रानें रात्रीच्या वेळीं पाहरेकऱ्यावर चाल करावी व त्यास ठार करून हेरांनीं तयार ठेवलेल्या शीघ्र वाहनांच्या साधनानें निघून जावें.

---

# अध्यायं ११६ मध्यमचरितोदासीनचरितमण्डलचरितानि ।



मध्यमस्यात्मा तृतीया पञ्चमी च प्रकृती प्रकृतयः । द्वितीया च चतुर्थी षष्ठी च विकृतयः । तच्चेदुभयं मध्यमोऽनुगृह्णीयात्, विजिगीषुर्मध्यमानुलोमः स्यात् । न चेदनुगृह्णीयात् प्रकृत्यनुलोमः स्यात् ।

मध्यमश्चेद् विजिगीषोर्मित्रं मित्रभावि लिप्सेत, मित्रस्यात्मनश्च मित्राण्युत्थाप्य मध्यमाच्च मित्राणि भेदयित्वा मित्रं त्रायेत् । मण्डलं वा प्रोत्साहयेत्—अतिप्रवृद्धोऽयं मध्यमः सर्वेषां नो विनाशाय अभ्युत्थितः सम्भूयास्य यात्रां विहनामेति । तच्चेन्मण्डलमनुगृह्णीयात् मध्यमावग्रहेणात्मानमुपबृंहयेत् । न चेदनुगृह्णीयात्, कोशदण्डाभ्यां मित्रमनुगृह्य ये मध्यमद्वेषिणो राजानः परस्परानुगृहीता वा बहवस्तिष्ठेयुः एकसिद्धा वा बहवः सिध्येयुः परस्पराद् वा शङ्किता नोत्तिष्ठेरन्, तेषां प्रधानमेकमासन्नं वा सामदानाभ्यां लभेत । द्विगुणो द्वितीयं त्रिगुणस्तृतीयम् । एवमभ्युच्चितो मध्यममवगृह्णीयात् ।

देशकालातिपत्तौ वा सन्धाय मध्यमेन मित्रस्य साचिव्यं कुर्यात् । दूष्येषु वा कर्मसन्धिम् । कर्शनीयं वास्य मित्रं मध्यमो लिप्सेत, प्रतिस्तम्भयेदेनम्—अहं त्वा त्रायेय, इत्या-

---

## मध्यम, तटस्थ, आणि मंडलांतील इतर राजे यांचें आचरण.

मध्यम राजापासून जो तिसरा आणि पांचवा राजा ते मध्यमाचे मित्र, आणि दुसरा, चौथा व सहावा राजा त्याचे शत्रु होत. मध्यम राजा जर ह्या दोन्ही कंपूंचा स्नेह जोडील तर विजयेच्छूनेंहि मध्यमाशीं स्नेह ठेवावा; मध्यमाचा त्या दोघांशीं स्नेह नसेल, तर विजयेच्छूनें मध्यमापासून जो तिसरा व पांचवा त्या राजाशीं स्नेह करावा.

विजयेच्छु राजाच्या मित्राचा स्नेह संपादावा अशी मध्यम राजाची इच्छा असल्यास, विजयेच्छूनें स्वतःचे आणि आपल्या मित्राचे मित्र मध्यम राजाविरुद्ध उठवून आणि मध्यम राजांत व मध्यमाच्या मित्रांत फूट पाडून स्वतःच्या मित्राचें मित्रत्व रक्षण करावें. अथवा मंडलांतील राजांस मध्यमाविरुद्ध चिथवून त्यांस विजयेच्छु राजानें असें सांगावें कीं, हा मध्यम राजा फार चढला आहे. तो आमचा नाश करावयास उठला आहे, म्हणून आपण सर्व मिळून त्याची मोहीम हाणून पाडूं. मंडलांतील राजांनीं असें कबूल केल्यानंतर विजयेच्छु राजानें मध्यमाचा पाडाव करून स्वतःची अभिवृद्धि करावी. मंडलांतील राजांनीं कबूल केलें नाहीं तर त्यानें द्रव्यबलानें व सैन्यबलानें आपल्या मित्रांस साहाय्य करावें, आणि जे राजे मध्यम राजाचा द्वेष करीत असतील, अथवा जे परस्परांच्या सहाय्यानें एकत्र रहात असतील, अथवा जे एकाच्या किंवा अनेकांच्या सह्यानें वागावयास तयार असतील, अथवा जे परस्परांच्या भीतीस्तव उठले नसतील, त्या राजांपैकीं एकादा प्रमुख राजा अथवा आपल्या शेजारचा राजा सामदामांनीं आपल्या बाजूस वळवून घ्यावा. याप्रमाणें दुसरा राजा त्यास मिळाला म्हणजे त्याचें बळ दुप्पट होतें, आणि तिसरा मिळाला म्हणजे तिप्पट होतें. अशा प्रकारें आपली शक्ति वृद्धिंगत करून मध्यम राजाचा पाडाव करावा.

योग्य स्थल व योग्य काल नसल्यास त्यानें मध्यम राजाशीं संधि करून मित्राचें सहाय्य करावें; आणि मध्यम राजाच्या शत्रूंपैकीं एकाशीं किंवा मध्यम राजाच्या राजद्रोही प्रजाजनाशीं संगनमत करावें. मध्यम राजा विजयेच्छु राजाच्या मित्रांस पीडा देण्याच्या विचारांत असेल तर विजयेच्छूनें त्याचा प्रतिकार करून मित्रांस असें सांगावें कीं, शत्रूचा प्रतिकार करून मी तुझें संरक्षण करतों; शत्रू मित्रांस पीडा करावयास आला म्हणजे विजयेच्छूनें मित्रांचें संरक्षण करावें. मध्यम राजा विजयेच्छूच्या मित्रांस उखडून टाकण्याचा प्रयत्न करील तर विजयेच्छूनें

कर्शनात् । कर्शितमेनं त्रायेत । उच्छेदनीयं वास्य मित्रं मध्यमो लिप्सेत कर्शितमेतं त्रायेत मध्यमवृद्धिभयात् । उच्छिन्नं वा भूम्यनुग्रहेण हस्ते कुर्यादन्यत्रापसारभयात् ।

कर्शनीयोच्छेदनीययोश्चेन्मित्राणि मध्यमस्य साचिव्यकराणि स्युः, पुरुषान्तरेण सन्धीयेत । विजिगीषोर्वा तयोर्मित्राण्यवग्रहसमर्थानि स्युः, सन्धिमुपेयात् । अमित्रं वास्य मध्यमो लिप्सेत, सन्धिमुपेयात् । एवं स्वार्थश्च कृतो भवति मध्यमस्य प्रियं च ।

मध्यमश्चेत् स्वमित्रं मित्रभावि लिप्सेत, पुरुषान्तरेण सन्दध्यात् । सापेक्षं वा 'नार्हसि मित्रमुच्छेत्तुम्' इति वारयेत् । उपेक्षेत वा—मण्डलमस्य कुप्यतु स्वपक्षवधादिति । अमित्रमात्मनो वा मध्यमो लिप्सेत, कोशदण्डाभ्यामेनमदृश्यमानोऽनुगृह्णीयात् ।

उदासीनं वा मध्यमो लिप्सेत—'उदासीनाद् भिद्यताम्' इति मध्यमोदासीनयोर्यो मण्डलस्याभिप्रेतस्तमाश्रयेत ।

मध्यमचरितेनोदासीनचरितं व्याख्यातम् ।

उदासीनश्चेद् मध्यमं लिप्सेत, यतः शत्रुमतिसन्दध्यान्मित्रस्योपकारं कुर्यात्, मध्यममुदासीनं वा दण्डोपकारिणं लभेत, ततः परिणमेत ।

एवमुपगृह्यात्मानमारिप्रकृतिं कर्शयेत् । मित्रप्रकृतिं चोपगृह्णीयात् ।

---

अशा समयीं मित्रांचें संरक्षण करावें. अथवा मध्यम राजापासून वाटणारी भीति दूर करून विजयेच्छूनें आपल्या मित्रांस जमीन देऊन आपल्या हातीं ठेवावें; असें केलें म्हणजे तो मित्र दुसरीकडे जाण्याची भीति रहात नाहीं.

विजयेच्छू राजाच्या मित्रांपैकीं जे राजे मध्यम राजाचे जर्जर करावयास योग्य व उखडून टाकावयास योग्य शत्रु असतील, ते जर मध्यम राजाशीं संगनमत करूं लागले तर विजयेच्छु राजानें दुसऱ्या एकाद्या राजाशीं दोस्ती करावी. मध्यम राजाच्या मित्रांमध्यें कांहीं राजे विजयेच्छु राजाचे जर्जर करावयास योग्य अथवा उखडून टाकावयास योग्य असे शत्रु असतील, ते जर चढाई व संरक्षण करावयास समर्थ असून विजयेच्छु राजाशीं दोस्ती करतील तर विजयेच्छूनें त्यांजबरोबर तह करावा. असें झालें म्हणजे विजयेच्छूचें हित साधतें आणि मध्यम राजाचेंहि बरें होतें.

मध्यम राजा विजयेच्छु राजाच्या मित्रांशीं स्नेह करूं पाहील, तर विजयेच्छूनें दुसऱ्या राजांशीं तह करून सांगवावें कीं, मला तुजशीं स्नेहसंबंध ठेवावयाचा आहे. तूं मला उखडून टाकावें हें योग्य नाहीं; असें सांगून मध्यमाशीं त्यांस मैत्री करूं देऊं नये; अथवा राजमंडलांतील राजे तो आपल्या पक्षांतील एका मित्राचा नाश करतो म्हणून त्यावर रागावतील असें जर विजयेच्छु राजाला वाटत असेल तर त्यानें मुकाट्यानें बसावें. मध्यम राजा आपल्या शत्रूस आपला मित्र करूं पाहील तर विजयेच्छु राजानें गुप्तपणें द्रव्य व सैन्य देऊन त्या शत्रूस वश करून घ्यावें.

मध्यम राजा तटस्थ राजांशीं मैत्री करूं पाहील तर उदासीनांत व मध्यमांत भेद उत्पन्न करावा; मध्यम राजा व उदासीन ( तटस्थ ) राजा यांत जो राजा संयुक्तमंडलास अधिक आवडतो त्याचा विजयेच्छूनें आश्रय करावा.

मध्यम राजाच्या वागणुकीविषयीं जें सांगितलें त्यावरून उदासीन अथवा तटस्थ राजाशीं कसें वागावें याचाहि उलगडा होतो.

तटस्थ राजा मध्यमाशीं मैत्री करूं पाहील तर जेणेंकरून तटस्थ राजाला शत्रूवर सरशी करतां येणार नाहीं, मित्राला सहाय्य देतां येणार नाहीं अथवा दुसऱ्या तटस्थ राजापासून सैन्याचें सहाय्य मिळवितां येणार नाहीं अशी तजवीज करावी. अशा रीतीनें स्वतःची वृद्धि करून शत्रुराजे क्षीण करून टाकावे आणि मित्रराजे असतील त्यांसहि सहाय्यदानानें वश करून घ्यावें.

सत्यप्यमित्रभावे तस्यानात्मवान् नित्यापकारी शत्रुः, शत्रुसहितः पार्ष्णिग्राहो वा, व्यसनी यातव्यो, व्यसने वा नेतुरभियोक्त्यरिभाविनः।

एकार्थाभिप्रयातः पृथगर्थाभिप्रयातः सम्भूययात्रिकः संहितप्रयाणिकः स्वार्थाभिप्रयातः सामुत्थायिकः कोशदण्डयोरन्यतरस्य क्रेता विक्रेता द्वैधीभाविक इति मित्रभाविनः।

सामन्तो बलवतः प्रतिघातोऽन्तर्धिः प्रतिवेशो वा बलवतः पार्ष्णिग्राहो वा स्वयमुपनतः प्रतापोपनतो वा दण्डोपनत इति भृत्यभाविनः सामन्ताः।

तैर्भूम्येकान्तरा व्याख्याताः।

तेषां शत्रुविरोधे यन्मित्रमेकार्थतां व्रजेत्। शक्त्या तदनुगृह्णीयाद् विषहेत यया परम्॥
प्रसाध्य शत्रुं यन्मित्रं वृद्धं गच्छेदवश्यताम्। सामन्तैकान्तराभ्यां तत् प्रकृतिभ्यां विरोधयेत्॥
तत्कुलीनावरुद्धाभ्यां भूमिं वा तस्य हारयेत्। यथा वानुग्रहापेक्षं वश्यं तिष्ठेत् तथा चरेत्॥
नोपकुर्यादमित्रं वा गच्छेद् यदतिकर्शितम्। तदहीनमवृद्धं च स्थापयेन्मित्रमर्थवित्॥
अर्थयुक्त्या चलं मित्रं सन्धिं यदुपगच्छति। तस्यापगमने हेतुं विहन्यान्न चलेद् यथा॥

---

सगळेच शेजारचे राजे हे शत्रु असले. तरी त्यांतला दुष्ट स्वभावाचा राजा विजयेच्छूचा नित्य अपकार करणारा शत्रु होय. पिछाडीचा राजा अघाडीच्या राजांशीं मित्रत्वानें असला म्हणजे तोही विजयेच्छु राजाचा कट्टा शत्रु होय. ज्या राजावर स्वारी करणें हितकर आहे तो संकटांत असला म्हणजे शत्रु समजावा. विजयेच्छु राजावर संकट येतांच स्वारी करण्याची संधि पाहणारा राजा त्याचा शत्रु होय. हे इतके शत्रूचे प्रकार सांगितले.

विजयेच्छु राजाबरोबर एकच हेतु मनांत धरून स्वारीस निघालेला राजा, भिन्न हेतु धरून स्वारीस निघालेला राजा, शत्रूवर स्वारी करण्याकरितां विजयेच्छु राजाशीं संयुक्त झालेला राजा, तहाच्या अटीला अनुसरून स्वारीस निघालेला राजा, केवळ स्वतःचा हेतु साधण्याकरितां स्वारीस निघालेला राजा, इतरांबरोबर लढाईस उठलेला राजा, द्रव्य व सैन्य विकत देणारा व घेणारा राजा आणि दुहेरी धोरण म्हणजे एकाशीं तह व दुसऱ्याशीं वैर करणारा राजा—हे सर्व विजयेच्छूचे मित्र समजावेत

विजयेच्छु राजाच्या शेजारच्या राजांपैकीं ज्यास बलाढ्य शत्रूच्या हल्ल्याची निरंतर भीति वाटते असा राजा; विजयेच्छु व त्याचा शत्रु यांमध्यें असलेला राजा; बलाढ्य राजाच्या पिछाडीचा शत्रु, आपण होऊन शरण आलेला; पराक्रमाच्या भीतीनें शरण आलेला आणि सैन्याच्या जोरावर काबीज केलेला हे सर्व विजयेच्छु राजाची चाकरी करण्यास लायक असे सामन्त होत.

विजयेच्छु राजाच्या लगतच्या शत्रूच्या पलीकडील राजेहि असेच समजावे.

विजयेच्छु राजाचें शत्रूशीं वैर उद्भवलें असतां यांपैकीं जो मित्र तोच हेतु मनांत धरून येईल त्यास विजयेच्छु राजानें अशी मदत करावी कीं जिच्यायोगानें शत्रूशीं टक्कर देतां येईल.

जो मित्र शत्रूचा पाडाव करून व स्वतः वृद्धि पावून विजयेच्छु राजाशीं आढ्यतेनें राहील त्यास जवळील व त्या पलीकडील राजांच्या मर्जीतून उतरून टाकावें.

अथवा त्याच्या घराण्यांतील एकाद्या किंवा बंदींत असलेल्या प्रमुख पुरुषाकरवीं त्याचा प्रांत घेववावा, अथवा त्यास आणखी जरूरी लागेल व तो आपल्या आधीन राहील असें करावें.

अमित्र उत्तरोत्तर दरिद्री होत चालला तर त्यास कधींही मदत करूं नये. नीतिशास्त्रवेत्त्यानें मित्रांची फार उन्नति होऊं देऊं नये व फार अवनतीहि होऊं देऊं नये.

पैशाकरितां अस्थिरमित्र तह करूं पाहील तेव्हां त्याचें पळून जाण्याचें कारण असेल तें दूर करावें म्हणजे तो जाणार नाहीं.

अरिसाधारणं यद्वा तिष्ठेत् तदरितः शठम् । भेदयेद् भिन्नमुच्छिन्द्यात् ततः शत्रुमनन्तरम् ॥
उदासीनं च यत् तिष्ठेत् सामन्तैस्तद् विरोधयेत् । ततो विग्रहसन्तप्तमुपकारे निवेशयेत् ॥
अमित्रं विजिगीषुं च यत् सञ्चरति दुर्बलम् । तद् बलेनानुगृह्णीयाद् यथा स्यान्न पराङ्मुखम् ॥
अपनीय ततोऽन्यस्यां भूमौ वा सन्निवेशयेत् । निवेश्य पूर्वं तत्रान्यं दण्डानुग्रहहेतुना ॥
अपकुर्यात् समर्थं वा नोपकुर्याद् यदापदि । उच्छिन्द्यादेव तन्मित्रं विश्वस्याङ्कमुपस्थितम् ॥
मित्रव्यसनतो वारिरुत्तिष्ठेद् योऽनवग्रहः । मित्रेणैव भवेत् साध्यश्छादितव्यसनेन सः ॥
अमित्रव्यसनान्मित्रमुत्थितं यद् विरज्यति । अरिव्यसनसिद्ध्या तच्छत्रुणैव प्रसिध्यति ॥
वृद्धिं क्षयं च स्थानं च कर्शनोच्छेदनं तथा । सर्वोपायान् समादध्यादेतान् यश्चार्थशास्त्रवित् ॥
एवमन्योन्यसञ्चारं षाड्गुण्यं योऽनुपश्यति । स बुद्धिनिगलैर्बद्धैरिष्टं क्रीडति पार्थिवैः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे षाड्गुण्ये सप्तमाधिकरणे अष्टादशोऽध्यायः
आदितः षोडशशततमः ॥

**एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य षाड्गुण्यं सप्तममधिकरणं समाप्तम् ॥**

---

जो विजयेच्छूशीं व त्याच्या शत्रूंशीं सारखेपणानें राहतो तो शत्रूहूनहि दुष्ट म्हणावा. त्यांत व शत्रूंत आधीं फूट पाडावी व त्याचा नाश करावा. नंतर शत्रूचा नाश करावा.

जो मित्र तटस्थ राहील त्याचें व शेजारच्या राजाचें वांकडें आणावें; मग त्याशीं लढाई करून तो त्रासला म्हणजे त्यास सहाय्य करावें.

दुबळेपणानें जो विजयेच्छु राजाशीं व त्याच्या शत्रूंशींहि स्नेह करितो त्यानें आपलेपासून जाऊं नये म्हणून त्यास विजयेच्छु राजानें सैन्याची मदत करावी.

अथवा त्यास त्याच्या देशांतून काढून दुसऱ्या ठिकाणीं ठेवावें. तेथें त्यास मदतीची किंवा दाबांत ठेवण्याची तजवीज आधींच करून ठेवावी.

अथवा तो अधिक बलाढ्य होऊन उपद्रव देऊं लागला किंवा संकटांत मदत न करितां विजयेच्छु राजावर विसंबून स्वस्थ राहूं लागला तर त्यास उखडून टाकावें.

शत्रूनें आपला शत्रु संकटांत आहे असें पाहून विजयेच्छूवर बिनहरकत स्वारी केली असतां मित्रानेंच ( शत्रूचा शत्रु व विजयेच्छूचा मित्र यानें ) आपलें संकट न दाखवितां स्वतः त्या शत्रूचा नाश करावा.

शत्रु संकटांत असतां त्यावर उठलेला मित्र विजयेच्छूशीं बेफिकीरीनें वागेल तर शत्रूचें संकट दूर जाहल्या-नंतर शत्रूकडूनच त्या मित्रास जिंकवावें.

नीतिशास्त्रवेत्त्यानें उत्कर्ष, अपकर्ष, गतिराहित्य, पीडन व उच्छेद करावयाचे हे उपाय नीट लक्षांत आणावे.

याप्रमाणें एकमेकांत गुंतलेलीं राजनीतीचीं सहा धोरणें कसकशीं चालवावीं हें जो राजा जाणतो तो बुद्धिरूप शृंखलांनीं मंडलांतील सर्व राजांस सहज लीलेनें जखडून त्यांच्याशीं यथेष्ट क्रीडा करतो.



# व्यसनाधिकारिकम्–अष्टममधिकरणम्।

## अध्याय ११७—प्रकृतिव्यसनवर्गः।

व्यसनयौगपद्ये सौकर्यतो यातव्यं रक्षितव्यं वेति व्यसनचिन्ता।

दैवं मानुषं वा प्रकृतिव्यसनमनयापनयाभ्यां सम्भवति।

गुणप्रातिलोम्यमभावः प्रदोषः प्रसङ्गः पीडा वा व्यसनम्। व्यस्यत्येनं श्रेयस इति व्यसनम्।

स्वाम्यमात्यजनपददुर्गकोशदण्डमित्रव्यसनानां पूर्वं पूर्वं गरीय इत्याचार्याः।

नेति भारद्वाजः। स्वाम्यमात्यव्यसनयोरमात्यव्यसनं गरीय इति। मन्त्रो मन्त्रफलावाप्तिः कर्मानुष्ठानमायव्ययकर्म दण्डप्रणयनममित्राटवीप्रतिषेधो राज्यरक्षणं व्यसनप्रतीकारः कुमाररक्षणमभिषेकश्च कुमाराणामायत्तममात्येषु। तेषाम् अभावे तदभावः, छिन्नपक्षस्येवं राज्ञश्चेष्टानाशः। व्यसनेषु चासन्नाः परोपजापाः। वैगुण्ये च प्राणबाधः प्राणान्तिकचरत्वाद् राज्ञ इति।

नेति कौटल्यः। मन्त्रिपुरोहितादिभृत्यवर्गमध्यक्षप्रचारं पुरुषद्रव्यप्रकृतिव्यसनप्रतीकारमेधनं

---

### अधिकरण ८ वें. संकटांचा तारतम्यविचार

### प्रकृतिव्यसनविचार.

अनेक आपत्ति एकं समयावच्छेदेंकरून गुदरल्या म्हणजे, शत्रूवर चढाई करणें सोपें किंवा बचाव करून राहणें सोपें असा विचार सुरू होतो. यांलाच व्यसनाचिंता अथवा संकटाविषयीं तारतम्यविचार म्हणतात.

राज्यावरील आपत्ति दैवकृत व मनुष्यकृत असतात; आणि त्या अनुक्रमें दुर्दैवापासून व दुर्वर्तनापासून उत्पन्न होतात.

सद्गुणाचा विपर्यास, सद्गुणाचा अभाव, दुर्गुणांचें आधिक्य, कामक्रोधादिकांचा आविर्भाव, अत्यासक्ति आणि बाह्यसंकट म्हणजेच व्यसन अथवा आपत्ति. जें मनुष्याचें कल्याण नाहींसें करतें त्यालाच व्यसन म्हणजे संकट म्हणतात.

राजाची आपत्ति अमात्याच्या आपत्तीपेक्षां, आमात्याची प्रजाजनांच्या आपत्तीपेक्षां, प्रजाजनांची किल्ल्याच्यां आपत्तीपेक्षां, किल्ल्याची द्रव्याच्या आपत्तीपेक्षां आणि द्रव्याची मित्राच्या आपत्तीपेक्षां अधिक भयंकर असते:—असें आमच्या गुरूंचें मत आहे.

परंतु भारद्वाज म्हणतो—असें नाहीं. राजाची आपत्ति आणि अमात्याची आपत्ति यांत अमात्याची आपत्ति अधिक भयंकर होय. राज्यकारभाराविषयीं सांगोपांग विचार, कार्यनिर्णय, कार्यांची अंमलबजावणी, जमाबंदी, खर्च, दिवाणी, फौजदारी व लष्करी कारभार, शत्रुराजांचा किंवा बंडखोरांचा बंदोबस्त, राज्याचें रक्षण, आपत्ति निवारणार्थ उपाय, राजपुत्रांचें रक्षण, युवराजास अभिषेक, ह्या सर्व बाबी अमात्यांच्या अधिकारांतील आहेत. ते चांगले नसले, म्हणजे या बाबींत गोंधळ होतो, आणि पंख उपटलेल्या पक्ष्यासारखी राजाची अवस्था होऊन सर्व व्यापार बंद पडतात; अशा आपत्तींत शत्रूंच्या कारस्थानास चांगलेंच फावतें. अमात्य जर दुर्गुणी असतील, तर राजाच्या प्राणास धक्का बसण्याचा संभव असतो. कारण, राजाचा प्राण सर्वस्वी अमात्यांच्या हातीं असतो.

यावर कौटिल्य म्हणतो—नाहीं; मंत्री, पुरोहित वगैरे नोकर आणि निरनिराळ्या खात्यांवरील मुख्य अधिकारी, यांच्या नेमणुका राजाच करीत असतो; प्रजेच्या बाबतींत किंवा पैशाच्या बाबतींत विघ्नें उपस्थित

च राजैव करोति। व्यसनिषु वामात्येष्वन्थानव्यसनिनः करोति। पूज्यपूजने दूष्यावग्रहे च नित्ययुक्तस्तिष्ठति। स्वामी च सम्पन्नः स्वसम्पद्भिः प्रकृतीः सम्पादयति। स्वयं यच्छीलस्तच्छीलाः प्रकृतयो भवन्ति, उत्थाने प्रमादे च तदायत्तत्वात्। तत्कूटस्थानीयो हि स्वामीति।

अमात्यजनपदव्यसनयोर्जनपदव्यसनं गरीय इति विशालाक्षः। कोशो दण्डः कुप्यं विष्टिर्वाहनं निचयाश्च जनपदादुत्तिष्ठन्ते। तेषामभावो जनपदाभावे। स्वाम्यमात्ययोश्चानन्तर इति।

नेति कौटल्यः। अमात्यमूलाः सर्वारम्भाः जनपदस्य कर्मसिद्धयः स्वतः परतश्च योगक्षेमसाधनं व्यसनप्रतीकारः शून्यनिवेशोपचयौ दण्डकरानुग्रहश्चेति।

जनपददुर्गव्यसनयोर्दुर्गव्यसनम् इति पाराशराः। दुर्गे हि कोशदण्डोत्पत्तिरापदि स्थानं च जनपदस्य। शक्तिमत्तराश्च पौरा जानपदेभ्यो नित्याश्चापदि सहाया राज्ञः। जानपदास्त्वमित्रसाधारणा इति।

नेति कौटल्यः। जनपदमूला दुर्गकोशदण्डसेतुवार्तारम्भाः। शौर्यं स्थैर्यं दाक्ष्यं बाहुल्यं च। जानपदेषु पर्वतान्तर्द्वीपाश्च। दुर्गा नाध्युष्यन्ते जनपदाभावात्। कर्षकप्राये तु दुर्गव्यसनमायुधीयप्राये तु जनपदे जनपदव्यसनमिति।

---

झाल्यास त्यांचें निवारणहि राजासच करावें लागतें; शिवाय राष्ट्राची अभिवृद्धि व्हावी, म्हणून त्यासच खटपट करावी लागते. अमात्य व्यसनी असतील तर दुसरे निर्व्यसनी अमात्य राजा नेमील. सन्मान्यांचा सत्कार व दुष्टांस शासन करणारा राजाच असतो. राजा स्वतः सर्वगुणसंपन्न असला, म्हणजे तो प्रजाजनांसहि सर्वगुणसंपन्न करितो; राजाचें जसें शील असेल तसें प्रजेचें शील बनतें. प्रजेची उन्नति किंवा अवनति राजावरच अवलंबून राहते; कारण राजा हा या सर्व गोष्टींचें उगमस्थान असतो.

विशालाक्षाचें मत असें आहे कीं, अमात्याची आपत्ति व प्रजाजनांची आपत्ति, यांत प्रजाजनांची आपत्ति अधिक भयंकर, कारण, पैसा, सैन्य, कच्चामाल, वेठ, वाहतुक आणि धान्यादिकांचा पुरवठा प्रजाजनांपासून मिळतो; प्रजेस दारिद्र्य आलें, म्हणजे यांची प्राप्ति होत नाहीं; प्रजेची आपत्ति, राजाची आपत्ति व अमात्याची आपत्ति, यांचे परिणाम सारखेच होतात.

कौटिल्य म्हणतो-असें नाहीं; सर्व कार्यांचा उगम अमात्यापासून होतो. प्रजेच्या कार्यांची सफलता अमात्यावर अवलंबून असते; राज्यांतील धामधुमींत किंवा परचक्राच्या धामधुमींत शरीररक्षण व द्रव्यरक्षण अमात्यास करावें लागतें; अनेक आपत्ति निवारण कराव्या लागत असतात; ओसाड प्रदेशांत वसाहत किंवा सुधराई करविण्याचें काम त्यासच करावें लागतें; कर वसूल करावे लागतात; इनामें द्यावीं लागतात.

प्रजेवरची आपत्ति आणि किल्ला अथवा तटबंदी गांवें यांवरील आपत्ति यांत किल्ल्याची अथवा तटबंदी गांवांची आपत्ति अधिक भयंकर असें पराशराचे अनुयायी समजतात; कारण किल्ल्यांतून अथवा तटबंदी गांवांतून पैसा व सैन्य, यांचा उगम होतो, आणि संकटप्रसंगीं प्रजेला आश्रय मिळतो; शहरांतील व खेड्यांतील लोकांपेक्षां किल्ले किंवा तटबंदी गांवें अधिक बळकट असतात, आणि संकटप्रसंगीं राजाला त्यांचा चांगला आधार असतो; परंतु इतरत्र राहणाऱ्या लोकांस काय, राजा सारखा व शत्रुहि सारखाच!

कौटिल्य म्हणतो—नाहीं; किल्ले अथवा तटबंदी गांवें, पैसा, सैन्य, पाटबंधारे, इमारती, शेती, व्यापार, गोरक्षण, शौर्य, स्थैर्य, दक्षता व समृद्धि, या सर्वांचा उगम जनतेपासूनच होतो. ज्या भागांत लोकवस्ती आहे त्यांत पर्वत व बेटें असतातच; पण लोकसंख्येचाच तुटवडा असल्यास किल्ल्यांत किंवा तटबंदी गांवांत वस्ती होऊं शकत नाहीं. ज्या प्रदेशांत शेतकरी अधिक प्रमाणांत राहतात, त्यांत किल्ल्याच्या अभावामुळें संकट येण्याचा संभव असतो; पण ज्या प्रदेशांत लढाऊ लोकांची बहुसंख्या असते त्या प्रदेशांत किल्ले नसले तरी त्याची फिकीर करण्याचें कारण नाहीं.

दुर्गकोशव्यसनयोः कोशव्यसनम् इति पिशुनः । कोशमूलो हि दुर्गसंस्कारो दुर्गरक्षणं च। दुर्गः कोशादुपजाप्यः परेषाम्। जनपदमित्रामित्रनिग्रहो देशान्तरितानामुत्साहनं दण्डबलव्यवहारः। कोशमादाय च व्यसने शक्यमपयातुं न दुर्गम् इति।

नेति कौटल्यः । दुर्गार्पणः कोशो दण्डस्तूष्णींयुद्धं स्वपक्षनिग्रहो दण्डबलव्यवहारः आसारप्रतिग्रहः परचक्राटवीप्रतिषेधश्च। दुर्गाभावे च कोशः परेषाम्। दृश्यते हि दुर्गवतामनुच्छित्तिरिति।

कोशदण्डव्यसनयोर्दण्डव्यसनम् इति कौणपदन्तः । दण्डमूलो हि मित्रामित्रनिग्रहः परदण्डोत्साहनं स्वदण्डप्रतिग्रहश्च। दण्डाभावे च ध्रुवः कोशविनाशः। कोशाभावे च शक्यः कुप्येन भूम्या परभूमिस्वयंग्रहेण वा दण्डः पिण्डयितुम्। दण्डवता च कोशः। स्वामिनश्चासन्नवृत्तित्वादमात्यसधर्मा दण्ड इति।

नेति कौटल्यः । कोशमूलो हि दण्डः । कोशाभावे दण्डः परं गच्छति, स्वामिनं वा हन्ति। सर्वाभियोगकरश्च। कोशो धर्मकामहेतुः। देशकालकार्यवशेन तु कोशदण्डयोरन्यतरः प्रमाणीभवति। लम्भपालनो हि दण्डः कोशस्य। कोशः कोशस्य दण्डस्य च भवति। सर्वद्रव्यप्रयोजकत्वात् कोशव्यसनं गरीय इति।

---

पिशुन म्हणतो—किल्ल्याचा तुटवडा व पैशाचा तुटवडा यांत पैशाचा तुटवडा अधिक भयंकर. किल्ल्याचें संरक्षण व दुरुस्ती पैशावर अवलंबून असते. पैशानें शत्रूच्या किल्ल्यांत असंतोष व द्रोह उत्पन्न करितां येतो; लोकांस, मित्रांस व शत्रूस पैशाच्या जोरावर दडपितां येतें, देशांतरास गेलेल्यांस द्रव्याची लालूच दाखवून चिथावणी देतां येते; सैन्याच्या हालचाली व व्यवहार पैशावर अवलंबून असतात. संकटप्रसंगीं तिजोरी घेऊन पळून जातां येईल, पण किल्ला घेऊन कसें जाणार ?

कौटिल्य म्हणतो-असें नाहीं. किल्ल्यांत तिजोरी व सैन्य सुरक्षित राहील; किल्ल्यांमधून गुपचुप लढाई चालवितां येईल, आपल्या बाजूकडील राजावर छाप ठेवितां येईल, सैन्याचा बंदोबस्त करितां येईल, मित्राला मदतकरितां येईल, आणि शत्रूचा किंवा रानांतील बंडखोरांचा समाचार घेता येईल. किल्ला नसला तर तिजोरी शत्रूचीच झाली, असें समजावें; ज्यांस किल्ल्यांचें पाठबळ आहे, त्यांचा नाश होत नाहीं, असें आपणांस दिसतेंच.

कौणपदंत म्हणतो—पैशाच्या अभावामुळें येणारी आपत्ति व सैन्याच्या अभावामुळें येणारी आपत्ति, यांत सैन्याची आपत्ति अधिक भयंकर होय. मित्रांवर व शत्रूंवर छाप सैन्यामुळें बसते; शत्रूच्या सैन्यास सैन्याच्या जोरावर वश करितां येतें; राज्यांतील कारभार सैन्यावर चालतो. सैन्य नसेल तर तिजोरी गेली असें समजावें. तिजोरी नसली तरी खाणींतून अगर वनांतून कच्चा माल काढून, जमीन पेरून अथवा शत्रूची जमीन काबीज करून सैन्य जमवितां येतें. सैन्याचे जोरावर पैसा मिळवितां येतो. राजाच्या संनिध राहण्याच्या दृष्टीनें अमात्य व दंड याच्यांत साधर्म्य आहे.

कौटिल्य म्हणतो—सैन्य पैशावर अवलंबून असतें. पैशाच्या अभावीं सैन्य शत्रूस जाऊन मिळतें, राजास मारितें; आणि अनेक विघ्नें उत्पन्न करितें. पैसा धर्माचरणास व मनोरथसिद्धीस कारणीभूत होतो. तथापि स्थलपरत्वें, कालपरत्वें व कार्यपरत्वें कधीं पैसा, तर कधीं सैन्य, अधिक कार्यकारी ठरतें. सैन्याच्या जोरावर पैसा मिळवितां येईल व जतन करून ठेवितां येईल, पण मिळालेला पैसा व सैन्य दोनहि पैशाच्या जोरावरच राखतां येतील. ज्याअर्थी पशापासून सर्व कांहीं मिळतें, त्याअर्थीं पैशाची आपत्ति अधिक भयंकर होय.

दण्डमित्रव्यसनयोर्मित्रव्यसनम् इति वातव्याधिः। मित्रमभृतं व्यवहितं च कर्म करोति, पार्ष्णिग्राहमासारमामित्रमाटविकं च प्रतिकरोति, कोशदण्डभूमिभिश्चोपकरोति व्यसनावस्थायोगमिति।

नेति कौटल्यः। दण्डवतो मित्रं मित्रभावे तिष्ठत्यमित्रो वा मित्रभावे। दण्डमित्रयोस्तु साधारणे कार्ये सारतः स्वयुद्धदेशकाललाभाद् विशेषः। शीघ्राभियाने त्वमित्राटविकाभ्यन्तरकोपे च न मित्रं विद्यते। व्यसनयौगपद्ये परवृद्धौ च मित्रमर्थयुक्तौ तिष्ठति।

प्रकृतिव्यसनसम्प्रधारणमुक्तमिति।

प्रकृत्यवयवानां तु व्यसनस्य विशेषतः। बहुभावोऽनुरागो वा सारो वा कार्यसाधकः॥

द्वयोस्तु व्यसने तुल्ये विशेषो गुणतः क्षयात्। शेषप्रकृतिसाद्गुण्यं यदि स्यान्नाभिधेयकम्॥

शेषप्रकृतिनाशस्तु यत्रैकव्यसनाद् भवेत्। व्यसनं तद् गरीयः स्यात् प्रधानस्येतरस्य वा॥

इति कौटलीयार्थशास्त्रे व्यसनाधिकरिकेऽष्टमाधिकरणे प्रथमोऽध्यायः

प्रकृतिव्यसनवर्गः, आदितो सप्तदशशततमः॥

---

वातव्याधि म्हणतो—दोस्त नसणें व सैन्य नसणें यांत दोस्त नसणें अधिक भयंकर; कारण दोस्तास कांहीं मोबदला मिळत नसला व तो दूर देशांत रहाणारा असला, तरी तो कार्य करावयास तयार असतो; पिछाडीचा शत्रु, पिछाडीच्या शत्रूचा मित्र, अघाडीचा शत्रु किंवा राज्यांतील बंडखोर, यांवर उठावयास तयार असतो; संकटप्रसंगीं सैन्य, पैसा व जमीन पुरवून मदत करावयास मागेंपुढें पहात नाहीं.

कौटिल्य म्हणतो—नाहीं. आपल्याजवळ सैन्य असलें, तरच दोस्त राजा आपला स्नेहसंबंध ठेवील. फार तर काय, शत्रुहि मित्रत्व पत्करील. सैन्याच्या साहाय्यानें कार्य करावें, किंवा मित्राच्या सहाय्यानें करावें, असा प्रश्न पडेल तेव्हां, युद्धभूमि, युद्धकाल व युद्धापासून होणारा फायदा, ज्याच्या सहाय्यानें अधिक श्रेयस्कर होईल, त्याच्या साहाय्यानें कार्य करावें. ताबडतोब स्वारी करावयाची असेल, अथवा शत्रूचा, बंडाळी माजविणाऱ्या रानटी लोकांचा किंवा राज्यांतील राजद्रोही माणसांचा बंदोबस्त करावयाचा असेल, तेव्हां दोस्त राजा मदतीस घेऊं नये. अनेक संकटें एकदम आलीं असतां, व शत्रूची सरशी झाली असतां दोस्तास जर पैसा दिला तरच तो दोस्तपणा कायम ठेवतो.

राज्यावर येणारीं संकटें आणि त्यांचा तारतम्यविचार येथवर सांगितला.

राज्याच्या अंगांपैकीं एक अंग दूषित असेल, तेव्हां इतर अंगांत संख्याधिक्य, प्रेमाधिक्य व गुणाधिक्य असल्यास, व्यसनाचा जोर न चालतां कार्यसिद्धि होते.

दोन अंगें दूषित असतील तेव्हां वरच्या प्रमाणें गुणाधिक्य पहात न बसतां ज्या अंगांतील दोष इतर अंगांना विनाशक असेल, त्याचा आधीं बंदोबस्त केला पाहिजे; मात्र इतर अंगांत नांव घेण्याजोगा दोष नसला पाहिजे.

एकाच अंगांतील दोषांमुळें जर इतर सर्व अंगांचा नाश होण्याचा संभव असेल, मग तो दोष मुख्य अंगांतील असो वा इतर अंगांतील असो, तर तो दोष अत्यंत घातक असाच समजला पाहिजे.

# अध्याय ११८—राजराज्ययोर्व्यसनचिन्ता ।

राजा राज्यमिति प्रकृतिसंक्षेपः ।

राज्ञोऽभ्यन्तरो बाह्यो वा कोप इति । अहिभयादभ्यन्तरः कोपो बाह्यकोपात् पापीयान् । अन्तरमात्यकोपश्चान्तःकोपात् । तस्मात् कोशदण्डशक्तिमात्मसंस्थां कुर्वीत ।

द्वैराज्यवैराज्ययोः । द्वैराज्यमन्योन्यपक्षद्वेषानुरागाभ्यां परस्परसङ्घर्षेण वा विनश्यति । वैराज्यं तु प्रकृतिचित्तग्रहणापेक्षि यथास्थितमन्यैर्भुज्यत इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । पितापुत्रयोर्भ्रात्रोर्वा द्वैराज्यं तुल्ययोगक्षेममनमात्यावग्रहं वर्तयेतेति । वैराज्ये तु जीवतः परस्याच्छिद्य 'नैतन्मम' इति मन्यमानः कर्शयत्यपवाहयति, पण्यं वा करोति, विरक्तं वा परित्यज्य अपगच्छतीति ।

अन्धश्चलितशास्त्रो वा राजेति । अशास्त्रचक्षुरन्धो यत्किञ्चनकारी दृढाभिनिवेशी परप्रणेयो वा राज्यमन्यायेनोपहन्ति, चलिवशास्त्रस्तु यत्र शास्त्राच्चलितमतिर्भवति, शक्यानुनयो भवतीत्याचार्याः।

नेति कौटल्यः । अन्धो राजा शक्यते सहायसम्पदा यत्र तत्र वा पर्यवस्थापयितुमिति । चलितशास्त्रस्तु शास्त्रादन्यथाभिनिविष्टबुद्धिरन्यायेन राज्यमात्मानं चोपहन्तीति ।

---

## राजाची आपत्ति व राज्याची आपत्ति यांविषयीं विचार.

राजा व राज्य हीं सप्तप्रकृतींचीं दोन मुख्य अंगें होत.

राजाला अंतस्थ व बाह्य असे दोन प्रकारचे ताप असतात. सापाचा धाक जसा भयंकर असतो. तसा अंतस्थ ताप बाह्यतापापेक्षां अधिक भयंकर होय; आणि अंतस्थ तापापेक्षांहि अमात्यापासून उद्भवणारा ताप अधिक भयंकर असतो. म्हणून खजिना व सैन्य राजानें आपल्या ताब्यांत ठेवलें पाहिजे.

दुहेरी राज्यकारभार व परकीय कारभार, या दोहोंतून दुहेरी राज्यकारभारांत परस्परांचा पक्षद्वेष व घासाघीस, आणि आपापल्या लोकांविषयीं पक्षपात चालत असल्यामुळें, तो कधींना कधीं लयास जातो. परकीय अंमलांत प्रजेचा संतोष राखणें जरूर असल्यामुळें तें राज्य प्रजेला सुखावह होतें असें आचार्य म्हणतात !

कौटिल्य म्हणतो, असें नव्हे. दुहेरी राज्य पितापुत्रांचें किंवा भावा भावांचें असेल. पण त्यांत दोघांनाहि प्रजेची काळजी सारखीच असून अमात्यांचा त्यावर दाब असल्यानें प्रजेचा नाश होणार नाहीं. जीवमान राजाचें राज्यहरण करून परकीयांनीं आपला अंमल बसविला म्हणजे मात्र त्यास अर्थातच " हें राज्य आपलें नाहीं " असें वाटून, तो राज्याची हेळसांड करून टाकितो अथवा द्रव्य शोषण करून टाकितो; अथवा त्याच्या आधारावर दुसऱ्या उलाढाली करीत बसतो, आणि अखेरीस राज्यांत असंतोष उत्पन्न झाला म्हणजे तें सोडून निघून जातो !

शास्त्रदृष्टि नसणारा राजा चांगला कां शास्त्रविरुद्ध चालणारा राजा चांगला ? आमचे गुरु म्हणतात— शास्त्राची दृष्टि ज्यास नाहीं असा अंध राजा रिकामटेकडा उद्योग करणारा, हट्टी, व दुसऱ्यांच्या मतानें वाहवणारा असतो आणि तो अनीतीनें कारभार करून राज्याची हानि करितो. शास्त्रविरुद्ध वागणारा राजा जेथें शास्त्राला सोडून वागेल तेथें त्यास पुनः मार्गावर आणणें शक्य असतें.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. स्वतःला शास्त्रदृष्टि नसलेला राजा राज्यकारभारांत साहाय्य करणारांच्या मतांप्रमाणें इष्ट तें धोरण स्वीकारावयास तयार होऊं शकेल. परंतु शास्त्राला सोडून चालणारा राजा शास्त्रविरुद्ध वर्तन करण्याच्या हट्टास पेटल्यामुळें अनीतीनें वागून स्वतःची व राज्याची हानि करतो.

व्याधितो नवो वा राजेति । व्याधितो राजा राज्योपघातममात्यमूलं प्राणाबाधं वा राज्यमूल-मवाप्नोति, नवस्तु राजा स्वधर्मानुग्रहपरिहारदानमानकर्मभिः प्रकृतिरञ्जनोपकारैश्चरतीत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । व्याधितो राजा यथाप्रवृत्तं राजप्रणिधिमनुवर्तयति । नवस्तु राजा 'बलार्जितं ममेदं राज्यम्' इति यथेष्टमनवग्रहश्चरति । सामुत्थायिकैरवगृहीतो वा राज्योपघातं मर्षयति । प्रकृतिष्वरूढः सुखः समुच्छेत्तुं भवति । व्याधिते विशेषः—पापरोग्यपापरोगी च । नवेऽप्यभिजातोऽनभिजात इति ।

दुर्बलोऽभिजातो बलवाननभिजातो राजेति । दुर्बलस्याभिजातस्योपजापं दौर्बल्यापेक्षाः प्रकृतयः कृच्छ्रेणोपगच्छन्ति बलवतश्चानभिजातस्य बलापेक्षाः सुखेन इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः दुर्बलमभिजातं प्रकृतयः स्वयमुपनमन्ति, जात्यमैश्वर्यप्रकृतिरनुवर्तत इति । बलवतश्चानभिजातस्योपजापं विसंवादयन्ति—अनुरागे सार्वगुण्यम् इति ।

प्रयासवधात् सस्यवधो मुष्टिवधात् पापीयान् । निराजीवत्वादवृष्टिरतिवृष्टित इति ।

द्वयोर्द्वयोर्व्यसनयोः प्रकृतीनां बलाबलात् । पारम्पर्यक्रमेणोक्तं याने स्थाने च कारणम् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे व्यसनाधिकारिकेऽष्टमाधिकरणे द्वितीयोऽध्यायः राजराज्ययोर्व्यसनचिन्ता, आदितोऽष्टादशशततमः ॥

---

रोगी राजा बरा, कां नवा राजा बरा? आमचे गुरु म्हणतात—रोगी राजा अमात्यांच्या कारस्थानामुळें राज्याचें नुकसान करितो, किंवा त्यांच्या कारस्थानामुळें स्वतःच्या प्राणास मुकतो. परंतु नवा राजा स्वतःच्या कर्तव्यांत दक्ष राहून, लोकांवर कृपा करून, कर माफ करून, इनामें व सन्मानदर्शक पदव्या देऊन व दुसरीं अनेक परोपकाराचीं कृत्यें करून आपल्या प्रजेस संतुष्ट राखण्याची खटपट करितो.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. रोगी राजा पूर्वापार चालत आलेलीं राजाचीं कर्तव्यें चालू ठेवितो, परंतु नव्या राजास "मीं आपल्या बळानें राज्य जिंकलें असल्यामुळें हें माझेंच राज्य आहे," असें वाटतें, म्हणून तो स्वछंदानें राज्यकारभार चालवूं लागतो. अनेक राजांनीं मिळून त्यास पेंचांत आणून राज्यांत कितीहि नासाडी केली, तरी त्यास क्षिति वाटत नाहीं. राज्यांत त्याचा जम अजून नीट बसला नसल्यामुळें, त्याची उखडपट्टीहि लवकरच होऊं शकते. रोग्यारोग्यांत फरक असा आहे कीं, एक पापरूप रोग जडलेला व दुसरा अपापी पण रोग जडलेला. नव्या राजांतहि एक उच्च कुळांत जन्मलेला व दुसरा नीच कुळांत जन्मलेला, असा फरक आहे.

बलहीन पण उच्च व बलाढ्य पण नीच अशा राजांत बरा कोण? आमचे गुरु म्हणतात—लोकांस दुर्बल राजा असावा हें आवडत असलें, तरी ते बलहीन राजा उच्च असला, तरी त्याच्या कारभारास मोठ्या मुष्किलीनेंच वश होतील. पण त्यांना जर अधिकार अथवा शक्ति हवी असेल, तर बलवान राजा नीच असला, तरी त्याच्या कारस्थानास ते सहज जाऊन मिळतील.

कौटिल्य म्हणतो— असें नाहीं. उच्च राजा बलहीन असला, तरी लोक त्यासच स्वाभाविकपणें भजत असतात, कारण उच्चकुलीन राजाला ऐश्वर्यगुण आपोआपच येतात. बलवान् पण अकुलीन राजाच्या कारभारास प्रजाजन अनुकूल होत नाहींत; आणि राज्याची सगळी किल्ली प्रजेच्या अनुकूलतेंत आहे.

शत्रूच्या स्वारीमुळें होणाऱ्या धान्याच्या नाशापेक्षां दुष्काळामुळें नापेर होणें फार घातुक होय; त्याचप्रमाणें अतिवृष्टीपेक्षां अनावृष्टि घातुक होय, कारण तींत जिवंत राहणेंच अशक्य होतें.

राज्याच्या भिन्न भिन्न अंगांमधील वर निर्दिष्ट केलेल्या दोन दोन दोषांत कमी अधिक जाचकपणा असेल तो लक्षांत आणून सांगितलेल्या क्रमाप्रमाणें त्याच्या परिहाराच्या उपायाचा अवलंब करावा, म्हणजे मग परिस्थिती-प्रमाणें चढाईचें अथवा बचावाचें धोरण अंगीकारतां येतें.

# अध्याय ११९—पुरुषव्यसनवर्गः ।



अविद्याविनयः पुरुषव्यसनहेतुः । अविनीतो हि व्यसनदोषान् न पश्यति ।

तानुपदेक्ष्यामः । कोपजस्त्रिवर्गः, कामजश्चतुर्वर्गः ।

तयोः कोपो गरीयान् । सर्वत्र हि कोपश्चरति, प्रायशश्च कोपवशा राजानः प्रकृतिकोपैर्हताः श्रूयन्ते, कामवशाः क्षयव्ययनिमित्तमरिव्याधिभिः इति ।

नेति भारद्वाजः । सत्पुरुषाचारः कोपः । वैरयातनमवज्ञावधो भीतमनुष्यता च । नित्यश्च कोपसम्बन्धः पापप्रतिषेधार्थः । कामः सिद्धिलाभः । सान्त्वं त्यागशीलता सम्प्रियभावश्च । नित्यश्च कामेन सम्बन्धः कृतकर्मणः फलोपभोगार्थं इति ।

नेति कौटल्यः । द्वेष्यता शत्रुवेदनं दुःखासङ्गश्च कोपः । परिभवो द्रव्यनाशः पाटच्चरद्यूतकारलुब्धकगायनवादकैश्चानर्थ्यैः संयोगः कामः ।

तयोः परिभवाद् द्वेष्यता गरीयसी, परिभूतः स्वैः परैश्चावगृह्यते, द्वेष्यः समुच्छिद्यत इति । द्रव्यनाशाच्छत्रुवेदनं गरीयः, द्रव्यनाशः कोशाबाधकः, शत्रुवेदनं प्राणाबाधकमिति ॥ अनर्थ्यसंयोगाद् दुःखसंयोगो गरीयान्, अनर्थ्यसंयोगो मुहूर्तप्रीतिकरः, दीर्घक्लेशकरो दुःखानामासङ्ग इति । तस्मात् कोपो गरीयान् ।

---

## माणसांच्या अंगचे दुर्गुण.

विद्येचा व शिक्षणाचा अभाव हा माणसांच्या दुर्गुणाचें कारण होय; कारण दुर्गुणांपासून किती अनर्थ उद्भवतात, हें अशिक्षित माणसास कळत नाहीं. हे दुर्गुण कोणते, ते आम्ही आतां सांगणार आहों:—

कोपापासून तीन प्रकारचे अनर्थ आणि कामापासून म्हणजे उपभोगेच्छेपासून चार प्रकारचे अनर्थ उत्पन्न होतात. त्या दोघांत कोप बलवत्तर आहे, कारण तो जिकडे तिकडे असतोच. राजे लोक बहुतकरून क्रोधाच्या आधीन होतात, आणि प्रजाजनांच्या क्रोधास बळी पडून कित्येकदां ते नाश पावले असल्याचें आपण ऐकतों. सुखोपभोगाच्या आधीन झालेले राजे लोक क्षयादि रोगांस बळी पडून व खर्चाच्या पेचांत येऊन शत्रूच्या व मृत्यूच्या तावडींत सांपडतात.

भारद्वाजास हें कबूल नाहीं; तो म्हणतो—कोप साधुपुरुषाचें लक्षण आहे, कोप म्हणजे शत्रुत्वाचा प्रतिकार, अपमानाचें निवारण आणि सर्वांवर दरारा उत्पन्न करणारा आहे. पापाचें निवारण करण्याकरितां क्रोध आवश्यक आहे. काम हा हातीं घेतलेल्या कार्यांत यश मिळविण्याकरितां मनुष्यास प्रयत्न करावयास लावितो; परसांत्वनबुद्धि ( परोपकारबुद्धि ) व स्वार्थत्यागबुद्धि वाढवितो; आणि लोकप्रीति संपादन करितो. आपल्या कार्यांचीं फळें आपणांस उपभोगितां यावीं, म्हणून काम अंतःकरणांत सदैव जागृत ठेवणें आवश्यक आहे.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. कोप शत्रुत्वास व शत्रुत्वापासून उद्भवणाऱ्या दुःखास कारणीभूत होतो; कोप व दुःख परस्परांशीं निगडित असतात. कामापासून अथवा भोगेच्छेपासून मानहानि व द्रव्यनाश उद्भवतात; कामामुळें चोर, जुवेबाज, पारधी, गवई, बजवय्ये वगैरे अनिष्ट लोकांशीं संबंध येतो.

शत्रुत्व मानहानीपेक्षां भयंकर होय. कारण मानहानि झाली, म्हणजे आप्तस्वकीय व इतरेतर जन फार तर तिरस्कार करतील, पण शत्रुत्व उद्भवलें म्हणजे तें समूळ नाश करितें. द्रव्यहानीपेक्षां शत्रुत्वापासून उद्भवणारें दुःख अधिक भयंकर होय; द्रव्यहानीमुळें फारतर तिजोरींत खडखडाट होईल, पण शत्रुत्वाचा ताप प्राणाशीं गांठ घालतो. अनिष्ट माणसांच्या सहवासापेक्षां दुर्गुणांचा सहवास अधिक भयंकर होय; कारण अनिष्ट माणसांचा सहवास घटकाभर तरी आनंद देतो, पण दुःखांचा सहवास दीर्घकाल पर्यंत जाचक होतो—म्हणून कोप अधिक भयंकर होय.

वाक्पारुष्यमर्थदूषणं दण्डपारुष्यमिति । वाक्पारुष्यार्थदूषणयोः वाक्पारुष्यं गरीयः इति विशालाक्षः । परुषमुक्तो हि तेजस्वी तेजसा प्रत्यारोहति, दुरुक्तशल्यं हृदि निखातं तेजस्सन्दीपनमिन्द्रियोपतापि च इति ।

नेति कौटल्यः । अर्थपूजा वाक्छल्यमपहन्ति, वृत्तिविलोपस्त्वर्थदूषणम् । अदानमादानं विनाशः परित्यागो वा अर्थस्येत्यर्थदूषणम् ।

अर्थदूषणदण्डपारुष्ययोरर्थदूषणं गरीयः इति पाराशराः । अर्थमूलौ धर्मकामौ, अर्थप्रतिबन्धश्च लोको वर्तते, तस्योपघातो गरीयान् इति ।

नेति कौटल्यः । सुमहताप्यर्थेन न कश्चन शरीरविनाशमिच्छेत् । दण्डपारुष्याच्च तमेव दोषमन्येभ्यः प्राप्नोति । इति कोपजस्त्रिवर्गः ।

कामजस्तु । मृगया द्यूतं स्त्रियः पानमिति चतुर्वर्गः । तस्य मृगयाद्यूतयोः मृगया गरीयसी इति पिशुनः । स्तेनामित्रव्यालदावप्रस्खलनभयादिङ्मोहाः क्षुत्पिपासे च प्राणाबाधस्तस्याम् । द्यूते तु जितमेवाक्षविदुषा यथा जयत्सेनदुर्योधनाभ्याम् इति ।

नेति कौटल्यः । तयोरप्यन्यतरपराजयोऽस्तीति नलयुधिष्ठिराभ्यां व्याख्यातं, तदेव विजितद्रव्यमामिषं, वैरबन्धश्च, सतोऽर्थस्य विप्रतिपत्तिरसतश्चार्जनमप्रतिभुक्तनाशो, मूत्रपुरीषधारणबुभुक्षा-

---

कठोर भाषण, द्रव्यनाश, व कठोर शासन हे तीन कोपाचे परिणाम होत. त्यांमध्यें कठोर भाषण व द्रव्यनाश, यांतून कठोर भाषण अधिक वाईट, असें विशालाक्षाचें मत आहे; कारण, तो म्हणतो—शूर पुरुष कठोर भाषणास जशास तसें उत्तर दिल्यावांचून रहात नाहीं; कठोर भाषणाचें शल्य उरास टोंचत राहिल्यामुळें अंतःकरणांत संताप व इंद्रियांत वेदना उत्पन्न होतात.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. द्रव्य दिलें म्हणजे कठोर भाषणाचे परिणाम शमवितां येतात; पण द्रव्याचा नाश झाला, म्हणजे वृत्तिछेद झाला असें होतें. देणें न्याय्य असून तें न देणें, दिलेलें परत घेणें, मुद्दाम नुकसान करणें आणि रक्षण न करितां नाश होऊं देणें हे अर्थदूषणाचे चार प्रकार होत.

पराशराचे अनुयायी म्हणतात—द्रव्यनाश व कठोर शासन, यांत द्रव्यनाश अधिक वाईट होय; कारण धर्माचरण व सुखोपभोग द्रव्यावर अवलंबून असतात; सगळें जग द्रव्यानें बद्ध झालें आहे; म्हणून त्यांचा लोप फार वाईट म्हणावा लागतो.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. किती जरी द्रव्य दिलें तरी शारीरिक ऱ्हास कोणीहि पत्करणार नाहीं. कडक शासन करणारास तसेंच शासन शत्रूकडून मिळत असतें.

कोपापासून उद्भवणारे तीन प्रकारचे अनर्थ असे आहेत.

कामापासून अथवा भोगेच्छेपासून उद्भवणारे मृगया, द्यूत, स्त्री आणि पान हे चार दुर्गुण होत.

पिशुन म्हणतो—मृगया व द्यूत, यांत मृगया वाईट; कारण मृगयेंत चोर, शत्रु, हत्ती व वणवा, यांच्या तावडींत सांपडण्याची भीति असते, दिशाभूल होते, खाण्यापिण्याचे हाल होतात, किंबहुना प्राणाशींहि गांठ येते; द्यूतांत पटाईत खेळणारास जयत्सेन व दुर्योधन यांच्याप्रमाणें जयप्राप्ति होते !

कौटिल्य म्हणतो—असें नव्हे. द्यूतांत एका पक्षाला लाभ झाला तरी दुसऱ्या पक्षाला नल–युधिष्ठिरांप्रमाणें पराभवाचे दुष्परिणाम भोगावे लागतात. द्यूतांत जें द्रव्य जिंकिलें, तेंच आमिष होऊन पुढें वैरास कारणीभूत होतें. न्यायानें मिळालेल्या धनाबद्दल तंटे लागतात; आपलें असलेलें द्रव्य हरलें जातें आणि अन्यायानें मिळालेल्या धनाची प्राप्ति झाली तरी त्याचा उपभोग न घेतां तें धन पुनः द्यूत कर्माकडेच लावलें जातें. शिवाय द्यूत खेळणाऱ्याला मलमूत्र-

दिभिश्च व्याधिलाभ इति द्यूतदोषः। मृगयायां तु व्यायामः श्लेष्मपित्तमेदःस्वेदनाशश्चले स्थिरे च काये लक्षपरिचयः कोपभयस्थानेहितेषु च मृगाणां चित्तज्ञानमनित्ययानं चेति।

द्यूतस्त्रीव्यसनयोः कैतवव्यसनम् इति कौणपदन्तः। सातत्येन हि निशि प्रदीपे मातरि च मृतायां दीव्यत्येव कितवः, कृच्छ्रे च प्रतिपृष्टः कुप्यति। स्त्रीव्यसनेषु तु स्नानप्रतिकर्मभोजनभूमिषु भवत्येव धर्मार्थपरिप्रश्नः। शक्या च स्त्री राजहिते नियोक्तुम्। उपांशुदण्डेन व्याधिना वा व्यावर्तयितुमवस्रावयितुं वा इति।

नेति कौटल्यः। सप्रत्यादेयं द्यूतं, निष्प्रत्यादेयं स्त्रीव्यसनम्। अदर्शनं, कार्यनिर्वेदः, कालातिपातनादनर्थधर्मलोपश्च, तन्त्रदौर्बल्यं, पानानुबन्धश्चेति।

स्त्रीपानव्यसनयोः स्त्रीव्यसनम् इति वातव्याधिः। स्त्रीषु हि बालिश्यमनेकविधं निशान्तप्रणिधौ व्याख्यातम्। पाने तु शब्दादीनामिन्द्रियार्थानामुपभोगः प्रीतिदानं परिजनपूजनं कर्मश्रमवधश्च इति।

नेति कौटल्यः। स्त्रीव्यसने भवत्यपत्योत्पत्तिरात्मरक्षणं चान्तर्दारेषु, विपर्ययो वा बाह्येषु, अगम्येषु सर्वोच्छित्तिः। तदुभयं पानव्यसने। पानसम्पत्--संज्ञानाशः अनुन्मत्तस्योन्मत्तत्वमप्रेतस्य

---

विसर्जनाचें किंवा अन्नपाण्याचें भानहि राहत नाहीं; त्यामुळें अनेक रोग जडतात,—असे द्यूताचे दुष्ट परिणाम आहेत; उलटपक्षीं मृगयेमुळें शरीरास व्यायाम घडतो, कफपित्ताचे विकार नाहींसे होतात, मेद झडतो, घाम जिरतो, चल व अचल पदार्थावर नेम मारण्याचें कौशल्य अंगीं येतें; वध्यपशु चवताळला किंवा काय, भ्याला किंवा काय, हें समजूं लागतें; आणि मृगयेला जाणें नेहमीं शक्य नसल्यामुळें द्यूतासारखें हें कायमचें व्यसन होत नाहीं.

कौणपदंत म्हणतो—द्यूताचा नाद व स्त्रीचा नाद, यांत द्यूताचा नाद फार वाईट होय; द्यूत खेळणारा दिवस पाहात नाहीं, रात्र पहात नाहीं, तिकडे आई मरो किंवा कांहीं होवो, याचा खेळ सुटत नाहीं. द्यूतांत हरलेल्या माणसास कांहीं विचारलें, म्हणजे तो चिडून बोलूं लागतो. पण स्त्रीलंपट मनुष्याशीं निदान स्नानाच्या वेळीं, पोषाखाच्या वेळीं, जेवते वेळीं, धर्माच्या किंवा द्रव्याच्या बाबतींत दोन शब्द बोलतां येतात. शिवाय, स्त्रीकरवीं राजाच्या हिताची कामगिरी घडवून आणितां येते; नाहीं तर गुप्त शासन करून किंवा रोगी म्हणून तिला हांकून देतां येतें. अथवा तिनें घेतलेलें द्रव्य तिला परत द्यावयास लावतां येतें.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. द्यूतापासूनच मनुष्यास परावृत्त करितां येतें; स्त्रीच्या नादापासून परावृत्त करणें अत्यंत दुरापास्त असतें; शिवाय स्त्रीच्या नादामुळें विवेकबुद्धि नष्ट होते, कर्तव्य करण्यांत दीर्घसूत्रीपणा येतो व तेणेंकरून धनाचा व धर्माचा नाश होतो, राजकीय धोरणाच्या बाबतींत दुबळेपणा उत्पन्न होतो व उत्तेजक अथवा मादक पदार्थांचें सेवन करण्याचीहि संवय जडते!

वातव्याधि म्हणतो—स्त्रियांचा नाद व दारूचा नाद, यांत स्त्रियांचा नाद फार वाईट; कारण, स्त्रींत पोरकटपणा अनेक ठिकाणीं दिसून येतो, हें जनानखाना प्रकरणांत सांगितलेंच आहे. पण दारू पिण्याचा नाद असला तरी शब्द आदिकरून जे इंद्रियांचे विषय, त्यांचा उपभोग घ्यावयास सांपडतो, प्रेम करितां येतें, सेवकजनांच गौरव करितां येतो, व श्रमांचा परिहार करतां येतो!

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. स्त्रीच्या नादानें संतति होते, स्वतःचें रक्षण होतें, जनानखान्यांतील स्त्रियांत एखादी रोगी असल्यास तिचा नाद सोडून दुसरीचा धरतां येतो. निषिद्ध स्त्रियांच्या बाबतींत मात्र असे सुपरिणाम होत नाहींत. मद्यपानाच्या नादापासून अनर्थच उद्भवतात. मद्यपानांतील गुणदोष येणेंप्रमाणें आहेत. शहाण्या माणसाची बुद्धिसुद्धां भ्रष्ट होते; तो वेडा नसून वेडा दिसतो; मनुष्य मेळा नसतां त्यास प्रेतकळा येते; कपड्या-

प्रेतत्वं कौपीनदर्शनं श्रुतप्रज्ञाप्राणवित्तमित्रहानिः सद्भिर्वियोगोऽनर्थ्यसंयोगस्तन्त्रीगीतनैपुण्येषु चार्थघ्नेषु प्रसङ्ग इति ।

द्यूतमद्ययोः द्यूतमेकेषाम् । पणनिमित्तो जयः पराजयो वा प्राणिषु निश्चेतनेषु वा पक्षद्वैधेन प्रकृतिकोपं करोति, विशेषतश्च सङ्घानां सङ्घधर्मिणां च राजकुलानां द्यूतनिमित्तो भेदः, तन्निमित्तो विनाश इति । असत्प्रग्रहः पापिष्ठतमो व्यसनानां तन्त्रदौर्बल्यादिति ॥

असतां प्रग्रहः कामः कोपश्चावग्रहः सताम् । व्यसनं दोषबाहुल्यादत्यन्तमुभयं मतम् ॥
तस्मात् कोपं च कामं च व्यसनारम्भमात्मवान् । परित्यजेन्मूलहरं वृद्धसेवी जितेन्द्रियः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे व्यसनाधिकारिकेऽष्टमाधिकरणे तृतीयोऽध्यायःपुरुषव्यसनवर्गः ।

आदित एकोनविंशातिशततमः ॥

---

# अध्याय १२० पीडनवर्गः, स्तम्भनवर्गः, कोशसङ्गवर्गश्च ।



दैवपीडनमग्निरुदकं व्याधिर्दुर्भिक्षं मरक इति ।

अग्न्युदकयोरग्निपीडनमप्रतिकार्यं सर्वदाहि च, शक्योपगमनं तार्याबाधमुदकपीडनमित्याचार्याः ।

---

लत्त्यावांचून तो नागवा उघडा हिंडतो; वेदविद्या विसरून जातो; बुद्धि नष्ट होते; जीव जाण्याची वेळ येते; पैशाचा चुराडा उडतो; मित्र अंतरतात; चांगल्या माणसांची संगति तुटते; निंद्य माणसांची संगति लागते; गायन, वादन आदिकरून कला जाणणाऱ्या लोकांशीं व द्रव्यहानि करणाऱ्या अनिष्ट लोकांशीं दृढ सहवास घडतो.

द्यूताचा नाद व मद्याचा नाद, यांपैकीं द्यूतांत पण जिंकल्यामुळें एकास जय, व हरल्यामुळें दुसऱ्यास पराजय भोगावा लागतो; समाजांत पक्षभेद उपस्थित होऊन क्षोभ उत्पन्न होतो; विशेषेंकरून संघटित मंडळांत आणि संयुक्त राजमंडळांत तर द्यूतावरून पक्षभेद अधिक तीव्र होतात आणि अखेर द्यूतामुळें नाश पावावा लागतो. अशा प्रकारचें हें निंद्य व्यसन सर्व व्यसनांत अत्यंत अनर्थकारक होय, कारण तेणेंकरून राजनीतिविषयक बाबतींत दुबळेपणा येतो.

वाईटाचा स्वीकार म्हणजे काम, आणि चांगल्याचा छळ म्हणजे कोप; या दोनहि विकारांपासून अनेक अनर्थ उद्भवतात, म्हणून हे अत्यंत वाईट समजले जातात.

म्हणून मनुष्यानें आध्यात्मिक बल संपादन करावें, पोक्त. व अनुभवी माणसांचा सहवास ठेवावा, इंद्रियांचें दमन करावें, आणि सर्वस्व हरण करण्यास व अनेक अनर्थ उत्पन्न करण्यास कारणीभूत होणाऱ्या कामाचा व क्रोधाचा त्याग करावा.

---

## आधिदैविक अनर्थ, आधिभौतिक अडथळे व कोशहानि

आग, महापूर, रोगराई, दुष्काळ व सांथीचे रोग हे आधिदैविक अनर्थ होत.

आग व महापूर, यांत आगीच्या अनर्थावर कांहीं उपाय चालत नाहीं व आगींत सर्वस्वाची राखरांगोळी होते. महापुराचा अनर्थ पोहून किंवा नावेंत बसून टाळतां येतो—असें गुरु म्हणतात,

नेति कौटल्यः। अग्निर्ग्राममर्धग्रामं वा दहति, उदकवेगस्तु ग्रामशतप्रवाहीति।

व्याधिदुर्भिक्षयोर्व्याधिः प्रेतव्याधितोपसृष्टपरिचारकव्यायामोपरोधेन कर्माण्युपहन्ति, दुर्भिक्षं पुनरकर्मोपघाति हिरण्यपशुकरदायि च इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। एकदेशपीडनो व्याधिः शक्यप्रतीकारश्च, सर्वदेशपीडनं दुर्भिक्षं प्राणिनामजीवनायेति। तेन मरको व्याख्यातः।

क्षुद्रकमुख्यक्षययोः क्षुद्रकक्षयः कर्मणामयोगक्षेमं करोति, मुख्यक्षयः कर्मानुष्ठानोपरोधधर्मा इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। शक्यः क्षुद्रकक्षयः प्रतिसन्धातुं बाहुल्यात् क्षुद्रकाणां। न मुख्यक्षयः। सहस्रेषु हि मुख्यो भवत्येको न वा, सत्त्वप्रज्ञाधिक्यादाश्रयत्वात् क्षुद्रकाणामिति।

स्वचक्रपरचक्रयोः स्वचक्रमातिमात्राभ्यां दण्डकराभ्यां पीडयत्यशक्यं च वारयितुं, परचक्रं तु शक्यं प्रतियोद्धुमपसारेण सन्धिना वा मोक्षयितुम् इत्याचार्याः।

नेति कौटल्यः। स्वचक्रपीडनं प्रकृतिपुरुषमुख्योपग्रहविघाताभ्यां शक्यते वारयितुम्, एकदेशं वा पीडयति। सर्वदेशपीडनं तु परचक्रं विलोपघातदाहविध्वंसनापवाहनैः पीडयतीति।

---

कौटिल्य म्हणतो-असें नाहीं. आग फारतर अर्धा किंवा सबंध गांव जाळील, पण पुराच्या तडाख्यांत शेंकडों गांवें वाहून जातील !

रोग व दुष्काळ, या दोहोंपैकीं रोगामुळें जनता बाधित व मृत्यु वश होत असल्याकारणानें कामकऱ्यांची पांगापांग होऊन कामांत व्यत्यय येऊन काम बंद पडतें. दुष्काळामुळें कामें बंद तर पडत नाहींतच. उलट सोनें, जनावरें यांच्या योगानें कर वसूल होतो–असें गुरु म्हणतात.

पण कौटिल्य म्हणतो–असें नाहीं. रोगानें देशाचा एखादा भाग फारतर उद्ध्वस्त होईल, शिवाय त्यावर औषधाचा इलाजहि चालूं शकतो; पण दुष्काळाच दुःख सबंध देशास भोगावें लागतें, त्यांतून वाचण्याचीच मुष्कील पडते. महामारीसारख्या सांथीच्या रोगाविषयींहि असेंच समजावें.

सामान्य माणसांचा नाश व प्रमुख पुरुषांचा नाश, यांत आमच्या गुरूंच्या मतें, सामान्य माणसांच्या नाशामुळें कामास जसा अडथळा येतो तसा प्रमुख माणसांच्या नाशानें येत नाहीं. पण कौटिल्य म्हणतो–असें नाहीं. सामान्यांचा नाश झाला, तरी त्यांची संख्या मोठी असल्यामुळें त्यांतून तो नाश भरून काढतां येतो; पण प्रमुखांचा नाश झाला, तर तो सामान्यांची भरती करून भरून काढतां येणार नाहीं. हजारांत एखादा प्रमुख सांपडेल न सांपडेल. प्रमुख पुरुषांत शौर्याचें व बुद्धीचें मान अधिक असतें; प्रमुख पुरुष सामान्य जनांस आधार असतो; तो आधारच गेला तर सामान्य माणसें असून नसून सारखींच.

आमचे गुरु म्हणतात–आपल्या सैन्यांतील बंडाळी आणि शत्रूची स्वारी, यांपैकीं स्वसैन्यांतील बंडाळी भयंकर उपद्रव करणारी असल्यामुळें व निवारण्यांस दुरापास्त असल्यामुळें फार अनर्थ करते; शत्रूनें स्वारी केली, तरी त्यास सामना देऊन, किंवा दुसरीकडे निघून जाऊन, अथवा तह करून कशीतरी तीमधून सुटका करून घेतां येते.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. स्वराज्यांतील बंडाळी बंडखोरांच्या पुढाऱ्यांस वळवून घेऊन किंवा मारून मोडतां येते; अथवा फार तर ती एकाद्या भागास उपद्रव करील; पण शत्रूच्या स्वारीमुळें राज्यांतील धंदे बंद पडतात, माणसें ठार होतात, घरादारांची होळी होते, मालाची धूळधाण होते, लुटालूट चालते; अशा रीतीनें सगळ्या देशावर अनर्थ गुदरतो.

प्रकृतिराजविवादयोः प्रकृतिविवादः प्रकृतीनां भेदकः पराभियोगानावहति । राजविवादस्तु प्रकृतीनां द्विगुणभक्तवेतनपरिहारकरो भवतीत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । शक्यः प्रकृतिविवादः प्रकृतिमुख्योपग्रहेण कलहस्थानापनयनेन वा वारयितुं, विवदमानास्तु प्रकृतयः परस्परसङ्घर्षेणोपकुर्वन्ति । राजविवादस्तु पीडनोच्छेदनाय प्रकृतीनां द्विगुणव्यायामसाध्य इति ।

देशराजविहारयोः देशविहारस्त्रैकाल्येन कर्मफलोपघातं करोति, राजविहारस्तु कारुशिल्पिकुशीलववाग्जीवनरूपाजीवावैदेहकोपकारं करोति इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । देशविहारः कर्मश्रमवधार्थमल्पं भक्षयति, भक्षयित्वा च भूयः कर्मसु योगं गच्छति । राजविहारस्तु स्वयं वल्लभैश्च स्वयंग्राहप्रणयपण्यागारकार्योपग्रहैः पीडयतीति ।

सुभगाकुमारयोः कुमारः स्वयं वल्लभैश्च स्वयंग्राहप्रणयपण्यागारकार्योपग्रहैः पीडयति । सुभगा विलासोपभोगेन । इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । शक्यः कुमारो मन्त्रिपुरोहिताभ्यां वारयितुं, न सुभगा बालिश्यादनर्थ्यजनसंयोगाच्चेति ।

श्रेणीमुख्ययोः श्रेणी बाहुल्यादनवग्रहा स्तेयसाहसाभ्यां पीडयति, मुख्यः कार्यानुग्रहविघाताभ्याम् इत्याचार्याः ।

---

प्रजाजनांमधील कलह व राजाराजांमधील कलह, यांपैकीं प्रजाजनांमधील कलहामुळें लोकांमध्यें फळ्या होतात, व तेणेंकरून शत्रूला स्वारी करावयास आयतेंच फावतें; पण राजांराजांत कलह लागला म्हणजे लोकांना दुप्पट पगार, दुप्पट मजुरी मिळते व करमाफी मिळते:—असें आमच्या गुरूंचें मत आहे.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. लोकांचे कलह पुढाऱ्यांस वश करून घेऊन किंवा कलहाचें कारण दूर करून मिटवितां येतील; लोक भांडले, तरी परस्परांशीं चढाओढ करून देशाचें हित करतील; परंतु राजांचे कलह प्रजेला उपद्रवकारक व विघातक होतात; आणि ते मिटाविण्याकरितां दुप्पट श्रम करावे लागतात.

आमचे गुरु म्हणतात—लोकांची क्रीडा व राजाची क्रीडा, यांपैकीं लोकांची क्रीडा तीनहि काळ चालत असल्यामुळें उद्योगधंद्यांत अडथळा आणिते; पण राजाची क्रीडा सुतार वगैरे कारागीर, गवई, भाट, वेश्या, सौदागर वगैरे लोकांस हितावह होते.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. लोक श्रमांचा परिहार करण्याकरितां क्रीडा करितात, पण तिजमुळें नुकसान फार थोडें होतें; नुकसान झालें असलें, तरी ते पुन: आपापल्या उद्योगास लागल्यानें भरून येतें. परंतु राजेलोक आपल्या आवडत्या लोकांसह क्रीडा करावयास गेले, म्हणजे कधीं जबरदस्तीनें तर कधीं गोडीगुलाबीनें दुकानांतील माल नेऊन उद्योगधंद्यांस नुकसान पोंचवितात.

आमचे गुरु म्हणतात—राजकन्या व राजपुत्र, यांपैकीं राजपुत्र स्वतः किंवा आपल्या प्रियमित्रांमार्फत कधीं जबरदस्तीनें तर कधीं गोडीगुलाबीनें दुकानांतील माल नेऊन जुलूम करितात; राजकन्येचा त्रास सुखोपभोगाच्या वस्तूपुरताच असतो.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं, राजपुत्राचा जुलूम मंत्री किंवा पुरोहित यांच्या उपदेशानें दूर करितां येईल; पण राजकन्येचा करितां येणार नाहीं, कारण तिच्या अंगीं पोरकटपणा भरलेला असतो आणि तिला संगतिहि वाईट लोकांची असते; म्हणून तिला उपदेश करणें कठिण असतें.

आमचे गुरु म्हणतात—संघ व पुढारी, यांपैकीं संघ अनेक व्यक्तींचा बनलेला असल्यामुळें शांत करावयास अडचण पडते; शिवाय चोरी, दरोडा निरंतर करीत असल्यामुळें त्यापासून जुलूम फार होतो; पुढारी फारतर एखाद्या कामांत व्यत्यय आणील किंवा काम बंद पाडील.

नेति कौटल्यः । सुख्यावर्त्या श्रेणी समानशीलव्यसनत्वात्, श्रेणीमुख्यैकदेशोपग्रहेण वा । स्तम्भयुक्तो मुख्यः परप्राणद्रव्योपघाताभ्यां पीडयतीति ।

सन्निधातृसमाहर्त्रोः सन्निधाता कृतविदूषणात्ययाभ्यां पीडयति । समाहर्ता करणाधिष्ठितः प्रदिष्टफलोपभोगी भवति इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । सन्निधाता कृतावस्थमन्यैः कोशप्रवेश्यं प्रतिगृह्णाति । समाहर्ता तु पूर्वमर्थमात्मनः कृत्वा पश्चाद् राजार्थं करोति, प्रणाशयति वा, परस्वादाने च स्वप्रत्ययश्चरतीति ।

अन्तपालवैदेहकयोरन्तपालश्चोरप्रसङ्गदेयात्यादानाभ्यां वणिक्पथं पीडयति । वैदेहकास्तु पण्यप्रतिपण्यानुग्रहैः प्रसाधयन्ति इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । अन्तपालः पण्यसम्पातानुग्रहेण वर्तयति । वैदेहकास्तु सम्भूय पण्यानामुत्कर्षापकर्षं कुर्वाणाः पणे पणशतं कुम्भे कुम्भशतम् इत्याजीवन्ति ।

अभिजातोपरुद्धा भूमिः पशुव्रजोपरुद्धा वेति । अभिजातोपरुद्धा भूमिः महाफलाप्यायुधीयोपकारिणी न क्षमा मोक्षयितुं व्यसनाबाधभयात् । पशुव्रजोपरुद्धा तु कृषियोग्या क्षमा मोक्षयितुं, विवीतं हि क्षेत्रेण बाध्यते । इत्याचार्याः ।

---

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. संघांतील व्यक्तींचे गुणदोष सारखे असल्यामुळें, संघाचें निवारण सहज होऊं शकतें, अथवा संघाच्या मुख्यास अथवा कांहीं लोकांस पकडलें म्हणजेहि संघ थंड पडतो. परंतु पुढारी गर्वानें ताठलेला असल्यामुळ, तो दुसऱ्यांच्या प्राणास व मालमत्तेस निरंतर उपद्रव देत असतो.

गुरु म्हणतात—खजीनदार व जमीनमहसुलावरील मुख्य अधिकारी, या दोहोंतून खजीनदाराकडे सगळावसूल जमा होणारा असल्यामुळें त्याची विविधप्रकारें अफरातफर करून तो अधिक ताप देऊं शकेल. जमीनमहसुलावरील अधिकारी ठरलेला सारा वसूल करण्याकरितां नेमलेला असल्यामुळें फारतर जमलेल्या वसुलांतून कांहीं वसूल स्वतः वापरील !

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. खजीनदार हा दुसऱ्यांनीं दिलेला वसूल सरकारी तिजोरींत ठेवण्याकरितां स्वीकारणारा असल्यामुळें तो थोडीच अफरातफर करूं शकेल. पण जमीनमहसुलावरील अधिकारी स्वतः शेतसारा वसूल करून नंतर तो सरकारी खजिन्यांत भरणा करणार असल्यामुळें तो अफरातफरहि करूं शकतो व मर्जीस वाटेल तसा कर वसूल करून लोकांस लुबाडण्याचा क्रमहि चालवूं शकतो.

गुरूचें मत असें आहे कीं,—सरहद्दीवरील करोडगिरीचे अधिकारी आणि व्यापारी, यांपैकीं करोडगिरीचे अधिकारी चोरांच्या बंदोबस्तासाठीं व करासाठीं घ्यावयाची रक्कम शिरस्त्यापेक्षां फाजील वसूल करून देशाचें नुकसान करतात. उलट व्यापारी लोक बाहेरून माल आणून मालाची देवघेव करून देशाला उर्जितावस्था आणतात.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. सरहद्दीवरील करोडगिरीचे अधिकारीच व्यापाऱ्यांस संरक्षण व सवलती देऊन देशांची भरभराट करितात. पण व्यापारी लोक मात्र कोंडी करून मालाच्या किंमतींत चढ—उतार करितात आणि शंभर पणांस शंभर पण अथवा शंभर कुंभांत शंभर कुंभ नफा काढून चैन चालवितात.

थोर कुळांत जन्मलेल्या पुरुषांना ( शिकारी करितां ) दिलेली भूमि आणि गवळ्यांना गुरचारणीकरितां दिलेली भूमि, यांतून जरूर पडल्यास कोणती भूमि राजानें परत घ्यावी ? शिकारीकरितां दिलेली भूमि कितीहि फायदेशीर असली तरी ती वीर पुरुषांच्या उपयोगी पडणारी असल्याकारणानें परत घेणें योग्य नाहीं; कारण त्यापासून विनाकारण अनर्थ उद्भवेल; पण गुरांसाठीं राखून ठेविलेली चराऊ भूमि जप्त करावयास हरकत नाहीं; कारण पेरणीच्या जमिनीची चराऊ रानापेक्षां अधिक जरूरी असते.—असें आमचे गुरु म्हणतात.

नेति कौटल्यः । अभिजातोपरुद्धा भूमिरत्यन्तमहोपकारापि क्षमा मोक्षयितुं व्यसनाबाधभयात् । पशुव्रजोपरुद्धा तु कोशवाहनोपकारिणी न क्षमा मोक्षयितुमन्यत्र सस्यवापोपरोधादिति ।

प्रतिरोधकाटविकयोः प्रतिरोधका रात्रिसत्रचराः शरीराक्रमिणो नित्याः शतसहस्रापहारिणः प्रधानकोपकाश्च । व्यवहिताः प्रत्यन्तारण्यचराश्चाटविकाः प्रकाशा दृश्याश्चरन्त्येकदेशघातकाश्च । इत्याचार्याः ।

नेति कौटिल्यः । प्रतिरोधकाः प्रमत्तस्यापहरन्ति, अल्पाः कुण्ठाः सुखा ज्ञातुं ग्रहीतुं च । स्वदेशस्थाः प्रभूता विक्रान्ताश्चाटविकाः । प्रकाशयोधिनोऽपहर्तारो हन्तारश्च देशानां राजसधर्माण इति ।

मृगहस्तिवनयोः मृगाः प्रभूताः प्रभूतमांसचर्मोपकारिणो मन्दग्रासावक्लेशिनः सुनियम्याश्च । विपरीता हस्तिनो गृह्यमाणाः दुष्टाश्च देशविनाशायेति ।

स्वपरस्थानीयोपकारयोः स्वस्थानीयोपकारो धान्यपशुहिरण्यकुप्योपकारो जानपदानामापद्यात्मधारणः । विपरीतः परस्थानीयोपकारः । इति पीडनानि ।

आभ्यन्तरो मुख्यस्तम्भो बाह्योऽमित्राटवीस्तम्भः । इति स्तम्भवर्गः ।

---

पण कौटिल्य म्हणतो—थोर कुळांतील माणसांच्या शिकारीकरितां राखलेली भूमि अत्यंत मोठा फायदा करणारी असली, तरी ती खुशाल परत घ्यावी; म्हणजे उपद्रवाची भीति राहणार नाहीं. परंतु गुरांकरतां राखून ठेविलेली चराऊ भूमि दुभतें व जनावरें वगैरे पुरवणारी असल्याकारणानें जप्त करणें योग्य नाहीं; मात्र लागवडीस व्यत्ययच येत असेल, तर तीहि परत घ्यावयास हरकत नाहीं.

आमचे गुरु म्हणतात—दरोडेखोर आणि रानटी लोक, यांपैकीं दरोडेखोर रात्रीचे वेळीं गुप्तपणें संचार करतात; अंगावर चालून येतात; शेंकडों हजारों रुपये लुटून नेतात; आणि मुख्यतः प्रमुख धनिकांना उपद्रव देतात. रानटी लोक उघड उघड रानाच्या आसपास कोठेंतरी एखाद्-दुसऱ्या भागांतच उपद्रव करीत फिरत असतात; तेव्हां दरोडेखोरांचा उपद्रव अधिक वाईट.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. दरोडेखोर गैरसावध लोकांचेंच द्रव्य लुटूं शकतात. ते थोडे व कमजोर असून सहज ओळखतां येतात व त्यांस पकडणें सोपें आहे. परंतु रानटी लोक आपापल्या ठिकाणांत भक्कम होऊन बसलेले असतात; ते संख्येनें पुष्कळ असतात; शरीरानें दणगट असतात; उघड उघड लढणारे असतात, आणि देशांची लूट व विध्वंस करणारे असतात; अशा रीतीनें ते राजासारखे वागणारे असल्यामुळें त्यांचाच उपद्रव अधिक घातक होय.

पशूंचें रान व हत्तीचें रान, यांपैकीं पशूंच्या रानांत पशूंची संख्या पुष्कळ असल्यामुळें त्यापासून मांस व चामडीं पुष्कळ मिळतात; शिवाय पशु रानांत गवत फार माजूं देत नाहींत; व ते सहज माणसाळले जातात. पण हत्तींची गोष्ट उलट आहे; हत्ती धरून आणिलें, तरी ते देशांत धूळधाण करितात, हें आपण पाहतों.

स्वदेशापासून अथवा परदेशापासून फायदा काय ? स्वदेशापासून फायदे म्हटलें म्हणजे धान्य, पशु, द्रव्य, व कच्चा माल यांची प्राप्ति, आणि संकटकाळीं रहिवाशांस स्वसंरक्षणाचा आधार, आणि परदेशापासून फायदा याच्या अगदीं उलट !

येणेंप्रमाणें अनेक अनर्थ सांगितले आहेत.

देशांतील प्रमुख पुरुषांनीं चालविलेला अडथळा हा अंतस्थ व्यत्यय, आणि शत्रूनें किंवा रानटी लोकांनीं आणिलेला अडथळा हा बाह्य व्यत्यय होय. असे दोन प्रकारचे व्यत्यय आहेत.

ताभ्यां पीडनैर्यथोक्तैश्च पीडितः सक्तो मुख्येषु परिहारोपहतः प्रकीर्णो मिथ्यासंहृतः सामन्ताटवीहृत इति कोशसङ्गः ॥

पीडनानामनुत्पत्तौ उत्पन्नानां च वारणे । यतेत देशवृद्ध्यर्थं नाशे च स्तम्भसङ्गयोः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे व्यसनाधिकारिकेऽष्टमाधिकरणे चतुर्थोऽध्यायः पीडनवर्गः स्तम्भनवर्गः कोशसङ्गवर्गः, आदितः विंशतिशततमः ॥

---

# अध्याय १२१ बलव्यसनवर्गः, मित्रव्यसनवर्गश्च ।

बलव्यसनानि । अमानितं विमानितम्, अभृतं व्याधितं, नवागतं दूरायातं, परिश्रान्तं परिक्षीणं, प्रतिहतं हताग्रवेगम्, अनृतुप्राप्तम् अभूमिप्राप्तम्, आशानिर्वेदि परिसृप्तं, कलत्रगर्हि अन्तश्शल्यं, कुपितमूलं भिन्नगर्भम्, अपसृतम् अतिक्षिप्तम्, उपनिविष्टं समाप्तम्, उपरुद्धम् परिक्षिप्तं, छिन्नधान्यपुरुषवीवधं, स्वविक्षिप्तं मित्रविक्षिप्तं, दूष्ययुक्तं दुष्टपार्ष्णिग्राहं, शून्यमूलम् अस्वामिसंहतं, भिन्नकूटम् अन्धमिति ।

तेषाममानितविमानितयोरमानितं कृतार्थमानं युध्येत न विमानितमन्तःकोपम् ।

---

अशा प्रकारच्या आधिदैविक व आधिभौतिक संकटांमुळें कोशहानि होते. त्याशिवाय अधिकाऱ्यांना वसुलाची अफरातफर केल्यामुळें, सूट सोडल्यामुळें, वसूल अनेक स्थळीं पडून राहिल्यामुळें, योग्य वसूल न केल्यामुळें आणि शत्रु व रानटी लोक यांनीं लूट केल्यामुळें वसुलाची हानि होते.

यास्तव देशाची भरभराट व्हावी या हेतूनें देशावर संकटें कशीं न ओढवतील, संकटें उपस्थित झाल्यास त्यांचें निवारण कसें होईल, चळवळ्या लोकांचे अडथळे कसे दूर करतां येतील व कोशाचें नुकसान कसें टाळतां येईल, याची राजानें नित्य विवंचना करावी.

---

## सैन्याचे दोष आणि मित्राचे दोष

सैन्याच्या दोषाचे प्रकार असे:—

न गौरविलेलें; पाणउतारा केलेलें; वेळेला पगार न मिळालेलें; रोगग्रस्त झालेलें; नुकतेंच येऊन पोंचलेलें, दूरचा प्रवास करून आलेलें; थकलेलें; रोडावलेलें; भंग पावलेलें; आघाडीचे वीर ठार झाल्यानें कुंठित झालेलें; अयोग्यकाळीं निघालेलें; अयोग्यस्थळीं गेलेलें; आशाभंग होऊन खिन्न झालेलें; पांगलेलें; कुटुंबाच्या काळजीनें घेरलेलें; मनांत टोंचणी असलेलें; पुढारी खवळलेलें; सैनिकांत फाटाफूट झालेलें; एका देशांतून पराभूत होऊन आलेलें; अनेक देशांतून पराभव पावून आलेलें; लढाईची किंवा तळ देण्याची एखादी जागा शत्रूनीं हेरलेलें; लढाईची किंवा तळ देण्याची पद्धति शत्रूस अवगत झालेलें; एका बाजूनें अडविलेलें; सर्व बाजूनीं वेढलेलें; दाणागोटा बंद झालेलें; कुमक बंद झालेलें; स्वदेशांत पांगलेलें; मित्र देशांत पांगलेलें; फितुरी लोक असलेलें; पिछाडीच्या शत्रूंनीं सतावून सोडलेलें; सुसज्ज नसलेलें; सेनापतीवांचून असलेलें; धुरीण नष्ट झालेलें; शत्रूची व युद्धभूमीची माहिती नसलेलें—असे दोष सैन्यांत असले म्हणजे ती सैन्यावरील आपत्ति होय.

यांपैकीं ज्यांचा योग्य गौरव केला नसेल, अशा सैन्याचा आधीं द्रव्य व पदव्या देऊन गौरव केल्यास तें मनापासून लढूं शकेल; परंतु ज्यांचा पाणउतारा झाला आहे, अशा सैनिकांच्या मनांत तेढ कायम रहात असल्यानें तें सैन्य आपल्या मनासारखें लढणार नाहीं.

अभृतव्याधितयोरभृतं तदात्वकृतवेतनं युध्येत, न व्याधितमकर्मण्यम् ।

नवागतदूरायातयोर्नवागतमन्यत उपलब्धदेशमनवमिश्रं युध्येत, न दूरायातमायतगतपरिक्लेशम् ।

परिश्रान्तपरिक्षीणयोः परिश्रान्तं स्नानभोजनस्वप्नलब्धविश्रमं युध्येत, न परिक्षीणमन्यत्राहवे क्षीणयुग्य पुरुषम् ।

प्रतिहतहताग्रवेगयोः प्रतिहतमग्रपातभग्नं प्रवीरपुरुषसंहतं युद्धेत, न हताग्रवेगमग्रपातहतप्रवीरम् ।

अनृत्वभूमिप्राप्तयोरृतुप्राप्तं यथर्तुयोग्ययुग्यशस्त्रावरणं युध्येत, नाभूमिप्राप्तमवरुद्धप्रसारव्यायामम् ।

आशानिर्वेदिपरिसृप्तयोराशानिर्वेदि लब्धाभिप्रायं युध्येत, न परिसृप्तमपसृतमुख्यम् ।

कलत्रगर्ह्यन्तश्शल्ययोः कलत्रगर्ह्युन्मुच्य कलत्रं युध्येत, नान्तश्शल्यमन्तरमित्रम् ।

कुपितमूलभिन्नगर्भयोः कुपितमूलं प्रशमितकोपं सामादिभिर्युध्येत, न भिन्नगर्भमन्योन्यस्माद् भिन्नम् ।

---

पगार थकलेलें आणि रोगग्रस्त झालेलें, या दोहोंतून पगार थकलेल्या सैन्याचा सर्व पगार दिल्यास तें युद्धास तयार होईल; परंतु रोगी सैनिक युद्धास निरुपयोगी ठरणार.

नुकतेंच येऊन पोंचलेलें किंवा दूरचा प्रवास करून आलेलें, यांपैकीं रणभूमीवर नुकत्याच येऊन पोहोंचलेल्या सैन्यास इतरांकडून शत्रूची माहिती मिळाल्यास, माहितगार सैन्याच्या जोडीनें तें नुकतेंच आलेलें सैन्य लढूं शकेल; परंतु लांबचा प्रवास करून आलेलें सैन्य थकून गेलेलें असल्यामुळें, युद्धास अयोग्य होय.

थकलेलें किंवा रोडावलेलें सैन्य, यांमध्यें थकलेलें सैन्य अंघोळ, जेवण व झोंप झाल्यानंतर ताजेतवानें झालें म्हणजे युद्धास सिद्ध होईल; परंतु ज्या सैन्यांतील लढवय्ये लोक दुसरीकडील युद्धांत कामास आले आहेत, असलें सैन्य लढाई देऊं शकणार नाहीं.

भंग पावलेलें सैन्य व ज्यांतील अघाडीचे लोक ठार झाले आहेत असें सैन्य, यांपैकीं भंग पावलेल्या सैन्यांत नवेनवे योद्धे भरतीस घातल्यास सैन्य लढूं शकेल; परंतु ज्याची अघाडी पार ठार झाली आहे, तें सैन्य कुचकामाचें होय.

त्रासदायक काळांत लढाईस नेलेलें सैन्य आणि त्रासदायक देशावर स्वारी करावयास नेलेलें सैन्य, यांत त्रासदायक काळीं लढाईस नेलेल्या सैन्यास, त्या काळास योग्य अशीं शस्त्रें व चिलखतें यांची योजना करून दिल्यास तें लढण्यास तयार होईल, परंतु अयोग्यस्थळीं युद्धास नेलेल्या सैन्याच्या हालचालींसच अशा स्थळीं अवसर सांपडत नसल्यामुळें तें सैन्य तेथें लढाईस निरुपयोगी होतें.

नैराश्यानें खिन्न झालेलें आणि पांगापांग झालेलें सैन्य, यांमध्यें नैराश्यानें खिन्न झालेल्या सैनिकांचे मनोरथ पूर्ण करून, त्यांस युद्धास नेल्यास तें उपयोगी पडेल; पण पांगापांग झालेल्या सैन्यांत धीर देणारे पुढारी नसल्यानें तें निरुपयोगी होय.

कुटुंबाच्या काळजीनें घेरलेले सैनिक आणि अंतःकरणांत कांहींतरी शल्य असलेलें सैनिक, यांपैकीं कुटुंबाच्या काळजींत असलेले सैनिक, त्यांच्या कुटुंबाची योग्य तजवीज केल्यास, युद्धास जाऊं शकतील, परंतु अंतःकरणांत टोंचणी असलेले सैनिक मनांतून वैरभाव धरणारे असल्यामुळें युद्धाला नालायक होत.

पुढारी खवळलेलें सैन्य आणि अंतःस्थ फूट झालेलें सैन्य. यांपैकीं पुढारी खवळलेलें सैन्य सामोपचारानें शांत करून युद्धास नेतां येईल; पण अंतःस्थ फूट पडलेल्या सैनिकांत अनेक फळ्या असतात, म्हणून तें कुचकामाचें.

अपसृतातिक्षिप्तयोरपसृतमेकराज्यातिक्रान्तम् मन्त्रव्यायामाभ्यांसत्रमित्रापाश्रयं युध्येत, नातिक्षिप्तमनेकराज्यातिक्रान्तं बह्वाबाधत्वात् ।

उपनिविष्टसमाप्तयोरुपनिविष्टं पृथग्यानस्थानमतिसन्धातारं युध्येत, न समाप्तमरिणैकस्थानयामम् ।

उपरुद्धपरिक्षिप्तयोरुपरुद्धमन्यतो निष्क्रम्योपरोद्धारं प्रतियुध्येत, न परिक्षिप्तं सर्वतः प्रतिरुद्धम् ।

छिन्नधान्यपुरुषवीवधयोः छिन्नधान्यमन्यतो धान्यमानीय जङ्गमस्थावराहारं वा युध्येत, न छिन्नपुरुषवीवधमनभिसारम् ।

स्वविक्षिप्तमित्रविक्षिप्तयोः स्वविक्षिप्तं स्वभूमौ विक्षिप्तं सैन्यमापदि शक्यमवस्रावयितुं, न मित्रविक्षिप्तं विप्रकृष्टदेशकालत्वात् ।

दूष्ययुक्तदुष्टपार्ष्णिग्राहयोर्दूष्ययुक्तमाप्तपुरुषाधिष्ठितमसंहतं युध्येत, न दुष्टपार्ष्णिग्राहं पृष्ठाभिघातत्रस्तम् ।

---

एका देशांतून पराभव होऊन आलेलें सैन्य आणि अनेक ठिकाणीं पराजय होऊन पळून आलेलें सैन्य, यांमध्यें एका देशांतून हार खाऊन आलेले सैनिक, योग्य शिक्षण दिल्यास व शिस्त लावल्यास गुप्त हेरांच्या किंवा मित्रांच्या संगतींत ठेवून युद्धास नेतां येतील; परंतु ज्यांचा अनेक स्थळीं पराजयच झालेला आहे असे सैनिक केव्हांच धीर धरूं शकत नसल्यानें त्यांच्यापासून धोका येण्याचा संभव असतो.

लढण्याची किंवा तळ देण्याची जागा शत्रूस कळलेले सैनिक आणि सैन्याची लढण्याची पद्धति शत्रूस समजलेले सैनिक, यांमध्यें पहिले सैनिक जागा बदलून, निराळी हालचाल करून शत्रूशीं तोंड देऊं शकतील; परंतु ज्यांचे पांचपेंच शत्रूस समजले ते सैनिक निरुपयोगीच झाले म्हणावयाचे.

एका बाजूनें अडविलेलें सैन्य व सर्व बाजूंनीं वेढलेलें सैन्य, यांमध्यें एका बाजूनें अडविलेलें सैन्य दुसरा मार्ग काढून निघून जाईल व अडविणारांशीं सामना देईल; परंतु सगळीकडून वेढलेलें सैन्य असून नसून सारखेंच समजावयाचें.

ज्यांचा दाणागोटा बंद झाला आहे असें सैन्य आणि ज्यास कुमक व दारूगोळा मिळेनासा झाला आहे असें सैन्य, यांपैकीं दाणागोटा बंद पडलेल्या सैन्यास दुसऱ्या ठिकाणाहून धान्य पुरवून, अथवा भाजीपाला, फळफळावळ व मांस पुरवून लढाईस सज्ज करतां येईल; परंतु कुमक व दारूगोळा बंद झाला, तर तें सैन्य प्रतिपक्षावर चाल करूं शकणार नाहीं.

स्वतःच्या देशांत पांगलेलें सैन्य व मित्राच्या देशांत पांगलेलें सैन्य, यांमध्यें स्वतःच्या देशांत पांगलेलें सैन्य देशांतल्या देशांत असल्याकारणानें संकटप्रसंगीं ताबडतोब एकत्र जमवितां येतें; तसें मित्राच्या देशांत पांगलेलें सैन्य दूरदूरच्या ठिकाणीं असल्याकारणानें व यावयास वेळ लागत असल्याकारणानें एकत्र जमवितां येत नाहीं, म्हणून तें युद्धास निरुपयोगी होय.

ज्यांत फितुरी लोकांचा भरणा आहे, असें सैन्य आणि ज्यास पिछाडीचा शत्रु फार उपद्रव करीत आहे असें सैन्य यामध्यें फितुरीलोकांचा भरणा ज्यांत आहे तें सैन्य निरनिराळ्या तुकड्या करून व आपल्या खात्रीच्या अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं देऊन लढाईस नेतां येतें; परंतु ज्याच्या पाठीं पिछाडीचा शत्रु लागला आहे, त्यास निरंतर भीति असल्यानें तें सैन्य उपयोगी पडत नाहीं.

शून्यमूलास्वामिसंहतयोः शून्यमूलं कृतपौरजानपदारक्षं सर्वसन्दोहेन युध्येत, नास्वामिसंहत राजसेनापतिहीनम्।

भिन्नकूटान्धयोर्भिन्नकूटमन्याधिष्ठितं युध्येत, नान्धमदेशिकमिति।

दोषशुद्धिर्बलावापः सत्रस्थानातिसंहितम्। सन्धिश्चोत्तरपक्षस्य बलव्यसनसाधनम्॥
रक्षेत् स्वदण्डं व्यसने शत्रुभ्यो नित्यमुत्थितः। प्रहरेद् दण्डरन्ध्रेषु शत्रूणां नित्यमुत्थितः॥
अभियातं स्वयं मित्रं सम्भूयान्यवशेन वा। परित्यक्तमशक्त्या वा लोभेन प्रणयेन वा॥
विक्रीतमभियुञ्जाने सङ्ग्रामे वापवर्तिना। द्वैधीभावेन वा मित्रं यास्यता वान्यमन्यतः॥
पृथग्वा सह याने वा विश्वासेनातिसंहितम्। भयावमानालस्यैर्वा व्यसनान्न प्रमोक्षितम्॥
अवरुद्धं स्वभूमिभ्यः समीपाद् वा भयाद् गतम्। आच्छेदनाददानाद् वा दत्त्वा वाप्यवमानितम्॥
अत्याहारितमर्थं वा स्वयं परमुखेनवा। अतिभारे नियुक्तं वा भङ्क्त्वा परमवस्थितम्॥
उपेक्षितमशक्त्या वा प्रार्थयित्वा विरोधितम्। कृच्छ्रेणसाध्यते मित्रं सिद्धं चाशु विरज्यति॥

---

मागें कुमक नसलेलें सैन्य आणि सेनापतीवांचून अथवा प्रमुख पुरुषावांचून असलेलें सैन्य, यांमध्यें कुमक नसलेल्या सैन्यास शहरांतील व खेड्यांतील लोकांकडून योग्य मदत मिळवून दिल्यास तें सैन्य लढूं शकेल; परंतु ज्या सैन्यास सेनापति किंवा इतर प्रमुख पुरुष धुरीण नसेल, तें लढाईस उपयोगी पडणार नाहीं.

ज्याचा धुरिण नष्ट झाला आहे, असें सैन्य आणि गैरमाहितगार व अशिक्षित सैन्य, यांपैकीं ज्या सैन्याचा धुरीण नष्ट झाला आहे, त्यावर दुसरा धुरीण नेमून, तें लढाईस घेऊन जातां येतें; परंतु ज्यास लढाईचें ज्ञान नाहीं, असें गैरमाहितगार अशिक्षित सैन्य काय कामाचें?

वर निर्दिष्ट केलेले सैन्याचे दोष दूर करावे, नवीन सैन्यभरती करावी, दबा धरून बसण्याचीं अनेक ठिकाणें तयार करावीं आणि आपणांहून बलाढ्य पक्षाशीं संधि करावा; हे सैन्यावरील संकटें दूर करण्याचे उपाय होत.

राजानें निरंतर सावध राहून शत्रूच्या भयापासून आपल्या सैन्याचें रक्षण करावें, आणि तसेंच निरंतर सावध राहून शत्रूच्या सैन्याचें मर्मस्थान सांपडलें कीं, त्याच्या सैन्यावर प्रहार करावा.

विजिगीषूनें आपण होऊन, अथवा कटांत सामिल होऊन, अथवा दुसऱ्याच्या नादीं लागून, ज्या मित्रावर स्वारी केली आहे आणि सामर्थ्यहीनतेनें, लोभानें किंवा शत्रूशीं संगनमत करून ज्या मित्रास टाकून दिलें आहे; ज्याच्यावर स्वारी होऊन लढाई चालू असतां ज्याला मध्येंच हातचा सोडून देऊन विजिगीषूनें मोर्चा मागें वळविला आहे; एकाशीं मैत्री व दुसऱ्याशीं वैर या दुहेरी धोरणास अनुसरून एखादा राजा विजिगीषूच्या मित्रावर किंवा दुसऱ्यावर दुसरीकडून स्वारी करूं पाहात असतां त्या राजाशीं सहकार्य करून ज्या मित्राला फशी पाडलें आहे; भय, मानहानि किंवा संकट यांतून ज्याची विजिगीषूनें मुक्तता केली नाहीं; ज्या मित्राला विजिगीषूच्या देशांत येण्यास बंदी झाली आहे, अथवा जो आपण होऊनच विजिगीषूपासून भीतीनें पळून गेला आहे; ज्याला वाजवीपेक्षां अधिक करभार द्यावा लागला आहे, अथवा दुसऱ्यापासून ठरलेला करभार न मिळाल्यामुळें जो असंतुष्ट झाला आहे; अथवा करभार मिळाला असूनहि ज्याचा अपमान केला गेला आहे; विजिगीषूनें ज्याकडून आपण होऊन किंवा दुसऱ्याच्या मध्यस्थीनें अधिक करभार उकळला आहे; विजिगीषूच्या शत्रूचा मोड करून आला असतां लगेच ज्याला दुसरी मोठी जबाबदारीची कामगिरी सांगितली

कृतप्रयासं मान्यं वा मोहान्मित्रममानितम्। मानितं वा न सदृशं भक्तितो वा निवारितम् ॥
मित्रोपघातत्रस्तं वा शङ्कितं वारिसंहितात् । दूष्यैर्वा भेदितं मित्रं साध्यं सिद्धं च तिष्ठति ॥
तस्मान्नोत्पादयेदेनान् दोषान् मित्रोपघातकान्। उत्पन्नान् वा प्रशमयेद् गुणैर्दोषोपघातिभिः ॥
यतो निमित्तं व्यसनं प्रकृतीनामवाप्नुयात्। प्रागेव प्रतिकुर्वीत तन्निमित्तमतन्द्रितः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे व्यसनाधिकारिके अष्टमाधिकरणे पञ्चमोऽध्यायः बलव्यसनवर्गः मित्रव्यसनवर्गः
आदितः एकविंशतिशततमः ॥

---

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य व्यसनाधिकारिकम्
अष्टममधिकरणं समाप्तम्

---

गेली आहे; नालायक म्हणून ज्याची उपेक्षा झाली आहे, आणि ज्यानें अनेक प्रकारें नमतें घेतलें असूनहि ज्याच्या मैत्रीचा स्वीकार केला गेला नाहीं अशा मित्राचें मन दुखावलें गेल्यामुळें त्याची मैत्री पुनः जुळणें दुरापास्त होतें; आणि कदाचित् जुळलीच, तर ती मैत्री पुनः लवकरच फिसकटते.

ज्यानें विजिगीषूकरतां आयास सोशिले आहेत, जो सन्मान्य आहे, कांहीं गैरसमजुतीमुळें ज्याचा अपमान झाला आहे, ज्याची व्हावी तितकी समजूत केली गेली नाहीं, जो आपण होऊन भक्तीनें मैत्री करण्यास आला असतां जो झिडकारला गेला आहे, जो दुसऱ्या मित्राचा नाश झालेला पाहून घाबरला आहे, जो शत्रूंचा जमाव आपल्याविरुद्ध जुळलेला पाहून भीतीनें गांगरला आहे, अथवा फितुरी लोकांनीं ज्यास मैत्री तोडावयास लाविलें आहे, अशा मित्राची मैत्री कांहीं काळ तुटली तरी पुनश्च जुळणें शक्य आहे, आणि ती एकदां जुळली म्हणजे निरंतर टिकूं शकतें. म्हणून ज्यामुळें मैत्री बिघडेल, अशीं कारणें उपस्थित होणार नाहींत, अशी विजिगीषूनें खबरदारी घेतली पाहिजे, आणि यदाकदाचित् अशी दोषास्पद कारणें उद्भवलींच, तर जेणें करून ते दोष दूर होतील अशा गुणानीं त्या कारणांचें निराकरण करावें. सारांश, ज्या कारणांमुळें आपल्या प्रजेवर संकट येईल असें वाटेल तीं कारणें दिसूं लागतांच विजिगीषूनें जागरूकतेनें त्यांचा तावडतोब प्रतिकार करावा.



# अभियास्यत्कर्म—नवममधिकरणम् ।

## अध्याय १२२ शक्तिदेशकालबलाबलज्ञानं, यात्राकालाश्च ।

विजिगीषुरात्मनः परस्य च बलाबलं शक्तिदेशकालयात्राकालबलसमुत्थानकालपश्चात्कोपक्षयव्ययलाभापदां ज्ञात्वा विशिष्टबलो यायात् । अन्यथासीत ।

उत्साहप्रभावयोरुत्साहः श्रेयान् । स्वयं हि राजा शूरो बलवानरोगः कृतास्त्रो दण्डद्वितीयोऽपि शक्तः प्रभाववन्तं राजानं जेतुम्, अल्पोऽपि चास्य दण्डस्तेजसा कृत्यकरो भवति । निरुत्साहस्तु प्रभाववान् राजा विक्रमाभिपन्नो नश्यति इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । प्रभाववानुत्साहवन्तं राजानं प्रभावेनातिसन्धत्ते तद्विशिष्टमन्यं राजानम् आवाह्य हृत्वा क्रीत्वा प्रवीरपुरुषान् । प्रभूतप्रभावहयहास्तिरथोपकरणसम्पन्नश्चास्य दण्डः सर्वत्राप्रतिहतश्चरति । उत्साहवतश्च प्रभाववन्तो जित्वा क्रीत्वा च स्त्रियो बालाः पङ्गवोऽन्धाश्च पृथिवीं जिग्युः इति ।

---

### अधिकरण ९ वें.

### शत्रूवर स्वारी.

### शक्ति, देश, काल, बलाबल, यांचें तारतम्यज्ञान आणि स्वारीला उचितकाळ.

विजयेच्छु राजानें स्वारीस निघण्यापूर्वीं, शत्रूच्या मानानें आपलें सैन्य टिकाव धरण्यासारखें आहे किंवा नाहीं, आपल्या अंगांत पराक्रम आहे किंवा नाहीं, युद्धाचें स्थळ व काळ आपल्यास अनुकूल आहे किंवा नाहीं, स्वारीस जाण्यास योग्य समय आहे किंवा नाहीं, सैन्य उभारावयास पुरेसा वेळ आहे किंवा नाहीं, आपण स्वारीस गेल्यास पाठीमागें काय भानगड होईल, द्रव्यहानि व मनुष्यहानि किती होईल, फायदा काय होईल, तोटा काय होईल, याविषयीं नीट विचार करून बरोबर पुरेसें सैन्य घेऊन मग स्वारीस निघावें; नाहींतर स्वस्थ बसावें.

आमच्या गुरूंचें मत असें आहे कीं,—उत्साह व बलसंपन्नता यांमध्यें उत्साह अधिक फायदेशीर होय; राजाजवळ सैन्य कितीहि असलें तरी तो उत्साही, शूर, पराक्रमी, निकोप प्रकृतीचा व शस्त्रास्त्रांत निपुण असेल, तरच तो बलाढ्य राजास जिंकू शकतो; त्याचें सैन्य थोडें असलें, तरी त्याचें धुरीणत्व राजाकडे असल्यामुळें, त्याच्या द्वारें हवा तो कार्यभाग सिद्धीस जातो. निरुत्साही राजा कितीहि पराक्रमी असला, किंवा त्यास कितीहि सैन्य असलें तरी त्याजवर नाश पावण्याचा प्रसंग येतो.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. ज्याच्या अंगांत प्रभाव आहे अथवा जो बलसंपन्न आहे तो आपल्या बलसंपन्नतेच्या जोरावर शत्रुराजा कितीहि उत्साही असला तरी त्यावर सरशी करतो दुसऱ्या एखाद्या उत्साही राजास आपल्या पक्षांत सामील करून घेऊन, किंवा बलात्कारानें खेंचून आणून, किंवा लाचलुचपतीनें मिळवून, त्याचप्रमाणें मोठमोठे योद्धे मिळवून, आपलें पराक्रमी सैन्य, घोडेस्वार, हत्ती, रथ वगैरे वाटेल तिकडे निर्विघ्नपणें नेऊं शकतो. बलसंपन्न राजांनीं—ते स्त्री, बाल, लुले, आंधळे होते तरी—उत्साही राजांस मदतीस घेऊन पृथ्वी जिंकिली आहे,

प्रभावमन्त्रयोः प्रभावः श्रेयान् । मन्त्रशक्तिसम्पन्नो हि वन्ध्यबुद्धिरप्रभावो भवति, मन्त्रकर्म चास्य निश्चितमप्रभावो गर्भधान्यमवृष्टिरिवोपहन्ति इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । मन्त्रशक्तिः श्रेयसी । प्रज्ञाशास्त्रचक्षुर्हि राजा अल्पेनापि प्रयत्नेन मंत्रमाधातुं शक्तः, परानुत्साहप्रभाववतश्च सामादिभिर्योगोपनिषद्भ्यां चातिसन्धातुम् । एवमुत्साहप्रभावमन्त्रशक्तीनामुत्तरोत्तराधिकोऽतिसन्धत्ते ।

देशः पृथिवी । तस्यां हिमवत्समुद्रान्तरमुदीचीनं योजनसहस्रपरिमाणं तिर्यक् चक्रवर्तिक्षेत्रम् । तत्रारण्यो ग्राम्यः पार्वत औदको भौमः समो विषम इति विशेषाः । तेषु यथास्वबलवृद्धिकरं कर्म प्रयुञ्जीत । यत्रात्मनः सैन्यव्यायामानां भूमिः अभूमिः परस्य, स उत्तमो देशः । विपरीतोऽधमः । साधारणो मध्यमः ।

कालः शीतोष्णवर्षात्मा । तस्य रात्रिरहः पक्षो मास ऋतुरयनं संवत्सरो युगमिति विशेषाः । तेषु यथास्वबलवृद्धिकरं कर्म प्रयुञ्जीत । यत्रात्मनः सैन्यव्यायामानामृतुः अनृतुः परस्य स उत्तमः कालः । विपरीतोऽधमः साधारणो मध्यमः ।

शक्तिदेशकालानां तु शक्तिः श्रेयसीत्याचार्याः । शक्तिमान् हि निम्नस्थलवतो देशस्य शीतोष्णवर्षवतश्च कालस्य शक्तः प्रतीकारे भवति ।

देशः श्रेयान् इत्येके, स्थलगतो हि श्वा नक्रं विकर्षति, निम्नगतो नक्रः श्वानमिति ।

---

आमचे गुरु म्हणतात—बलसंपन्नता व कारस्थान, यांत बलसंपन्नता श्रेष्ठ होय. राजा कारस्थानांत कितीहि जरी पटाईत असला, तरी बलसंपन्नते वांचून त्याची कारस्थानी बुद्धि फोल होय. कारस्थान काय कोणासहि करतां येतें. पण राजा बलसंपन्न नसला म्हणजे अवर्षणांत जसें पेरलेलें बीं फुकट जात तसा तो शुष्क होऊन जातो.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. कारस्थान–शक्तिच अधिक श्रेष्ठ होय. बुद्धीच्या व राजनीतीच्या नेत्रांनीं चालणारा राजा थोडक्या श्रमानें कारस्थान लढवूं शकतो, आणि उत्साही बलसंपन्न शत्रूला देखील सामादि उपायांनीं अथवा गुप्त हेरांच्या मदतीनें, अथवा गुप्तपणें योजिलेल्या घातकी उपायांनीं, जेरीस आणूं शकतो. म्हणून उत्साहशक्ति, बलसंपन्नता व कारस्थानशक्ति या एकीहून एक वरचढ होत व त्यांत निष्णात असलेल्याचाच जय होतो.

देश म्हणजे पृथ्वी; तींत हिमालयापासून समुद्रापर्यंत पसरलेला, त्रिकोणाकृति आणि उत्तरेच्या बाजूस एक हजार योजनें लांबीचा जो देश आहे, तो चक्रवर्ती राजाचा देश होय. त्यांत अरण्यें, गांवें, डोंगर, पठार, पाणथळ जमीन, निर्जल प्रदेश, उंचसखल भाग वगैरे अनेक प्रकार आहेत. त्या ठिकाणीं राजानें आपल्या सैन्याचें बल वाढविण्याकरितां योग्य वाटेल तो उपाय योजावा. ज्या प्रदेशांत आपल्या सैन्याच्या हालचाली करावयास योग्य अवकाश सांपडतो, पण शत्रूस तसा अवकाश सांपडणार नाहीं तो देश उत्तम, आणि याच्या उलट असेल, तो निकृष्ट देश होय, जेथें दोघांसहि सारखा अवकाश मिळेल, तो देश मध्यम समजावा.

काळांत हिंवाळा, उन्हाळा व पावसाळा असे तीन भाग आहेत. रात्र, दिवस, पंधरवडा, महिना, ऋतु, अयन, वर्ष व युग, हे काळाचे विभाग होत. ज्या काळांत जें कर्म आपलें बल वाढवील, त्या काळांत तें कर्म राजानें करावें. जो काळ आपल्या सैन्याच्या हालचालींस अनुकूल व शत्रूच्या हालचालींस प्रतिकूल, तो काल उत्तम; याच्या उलट असेल, तो काल निकृष्ट; आणि दोघांसहि सारखाच फायदेशीर, तो काल मध्यम समजावा.

आमचे गुरु म्हणतात—देश, काल व शक्ति, यांत शक्ति श्रेष्ठ होय; कारण ज्याच्या अंगांत शक्ति आहे, तो दऱ्याखोरीं असोत किंवा सपाटी असो, थंडी असो, ऊन असो किंवा पाऊस असो, कशासहि दाद द्यावयाचा नाहीं.

कांहीं ग्रंथकार म्हणतात—देशच श्रेष्ठ; कारण कोरड्या जमीनीवरील कुत्रा मगरीला सहज ओढूं शकतो, आणि पाणथळ जमीनींतील मगर कुत्र्यास ओढूं शकतो.

कालः श्रेयान् इत्येके । दिवा काकः कौशिकं हन्ति, रात्रौ कौशिकः काकम् इति ।

नेति कौटल्यः । परस्परसाधका हि शक्तिदेशकालाः ।

तैरभ्युच्चितः तृतीयं चतुर्थं वा दण्डस्यांशं मूले पार्ष्ण्यां प्रत्यन्ताटवीषु च रक्षा विधाय कार्यसाधनसहं कोशदण्डं चादाय क्षीणपुराणभक्तमगृहीतनवभक्तमसंस्कृतदुर्गममित्रं, वार्षिकं चास्य सस्यं हैमनं च मुष्टिमुपहन्तुं मार्गशीर्षीं यात्रां यायात् । हैमनं चास्य सस्यं वासन्तिकं च मुष्टिमुपहन्तुं चैत्रीं यात्रां यायात् । क्षीणतृणकाष्ठोदकमसंस्कृतदुर्गममित्रं, वासन्तिकं चास्य सस्यं वार्षिकीं वा मुष्टिमुपहन्तुं ज्येष्ठामूलीयां यात्रां यायात् ।

अत्युष्णमल्पयवसेन्धनोदकं वा देशं हेमन्ते यायात् । तुषारदुर्दिनमगाधनिम्नप्रायं गहनतृणवृक्षं वा देशं ग्रीष्मे यायात् । स्वसैन्यव्यायामयोग्यं परस्यायोग्यं वर्षति यायात् । मार्गशीर्षं तैषं चान्तरेण दीर्घकालां यात्रां यायात् । चैत्रं वैशाखं चान्तरेण मध्यमकालां, ज्येष्ठामूलीयमाषाढं चान्तरेण ह्रस्वकालामुपोषिष्यन् । व्यसने चतुर्थीम् । व्यसनाभियानं विगृह्ययाने व्याख्यातम् ।

प्रायशश्चाचार्याः परव्यसने यातव्यम् इत्युपदिशन्ति । शक्त्युदये यातव्यमनैकान्तिकत्वाद् व्यसनानाम् इति कौटल्यः ।

---

दुसरे म्हणतात—काल श्रेष्ठ; दिवसा कावळा घुबडाला मारितो; रात्रीं घुबड कावळ्याला मारितें.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. शक्ति, देश व काल हे तीनहि परस्परापेक्षी आहेत. परस्परांस परस्परांची मदत हवी असते.

शक्ति, देश व काल यांची योग्य संधि पाहून, आपल्या देशाच्या अंतर्गत सुरक्षिततेकरितां आणि पिछाडीचा शत्रु व सरहद्दीवरील रानटी लोक, यांचा बंदोबस्त करण्याकरितां एक तृतीयांश किंवा एक चतुर्थांश सैन्य राखून ठेवून, व आपली स्वारी फत्ते करण्यास पुरेसें द्रव्य व सैन्य बरोबर घेऊन, ज्या शत्रूची धान्यादि सामुग्री शिळी व तुटपुंजी झाली आहे आणि ज्यानें नवीन धान्यादि संग्रह केला नाहीं, व ज्यानें आपल्या किल्ल्यांची दुरुस्तीसुद्धां केली नाहीं, अशा शत्रूचा पाडाव करण्याकरितां स्वारीवर निघावें. शत्रूच्या राज्यांतील वर्षाऋतूंत तयार झालेल्या व हेमन्तऋतूंत पेरल्या गेलेल्या धान्याची नासाडी करण्याकरितां मार्गशीर्ष महिन्यांत स्वारीस निघावें; हेमंतऋतूंतील पिकाची किंवा वसंत ऋतूंतील पेरणीची नासाडी करण्याकरितां चैत्रांत स्वारीस निघावें; आणि ज्या शत्रूच्या देशांत गवत, लांकूडफांटा आणि पाणी यांचा तुटवडा आहे, व ज्याचे किल्ले नादुरुस्त आहेत, अशा शत्रूचा पाडाव करून, वसंतऋतूंतील पिकाची आणि वर्षा ऋतूंतील पेरणीची नासाडी करण्याकरितां ज्येष्ठ महिन्यांत स्वारीस निघावें.

ज्या देशांत उन्हाळा फार कडक असतो, आणि गवत, कडबा, जळण व पाणी कमी असतें, त्या देशावर हेमंत ऋतूंत स्वारी करावी. जो देश धुक्यानें व्यापिलेला, खोल दऱ्या असलेला, दाट गवतानें व झाडीनें आच्छादिलेला असतो, त्यावर ग्रीष्मऋतूंत स्वारी करावी. ज्या देशांत आपल्या सैन्याच्या हालचालींस सवड व शत्रुसैन्याच्या हालचालींस अडचण पडते, त्या देशावर वर्षाकाळांत स्वारी करावी. फार लांब स्वारीस जावयाचें झाल्यास मार्गशीर्ष व पौष यांच्या दरम्यान स्वारीस निघावें; फार दूर नाहीं, फार जवळ नाहीं, अशा स्वारीस चैत्र वैशाख महिन्यांच्या संधींत आणि जवळच्या स्वारीस ज्येष्ठ व आषाढ यांच्या दरम्यान राजानें निघावें. शत्रु संकटांत असल्यास पावसाळ्यांतहि स्वारी काढण्यास हरकत नाहीं. लढाई पुकारल्यानंतर स्वारी कशी व केव्हां करावी, हें ज्या प्रकरणांत सांगितलें आहे, त्यांतच शत्रु संकटांत असतांना त्यावर स्वारी करण्याला योग्य काल कोणता तो सांगितला आहे.

शत्रु संकटांत असला कीं त्यावर चालून जावें, असेंच बहुतेक सर्व आचार्य सांगतात. परंतु कौटिल्य म्हणतो—आपली सर्व बाजूंनीं जय्यत तयारी असेल, तरच स्वारी करावी; कारण शत्रूचें संकट किती वेळ टिकेल याचा नेम नसतो.

यदा वा प्रयातः कर्शयितुमुच्छेत्तुं वा शक्नुयादमित्रं, तदा यायात्।

अत्युष्णोपक्षीणे कालेऽहस्तिबलप्रायो यायात्। हस्तिनो ह्यन्तस्स्वेदाः कुष्ठिनो भवन्ति, अनवगाहमानास्तोयमपिबन्तश्चान्तश्चान्तरवक्षाराश्चान्धीभवन्ति। तस्मात् प्रभूतोदके देशे, वर्षति च हस्तिबलप्रायः यायात्। विपर्यये खरोष्ट्राश्वबलप्रायः। देशमल्पवर्षपङ्कं वर्षति मरुप्रायं चतुरङ्गबलो यायात्।

समविषमनिम्नस्थलह्रस्वदीर्घवशेन वाध्वनो यात्रां विभजेत्।

सर्वा वा ह्रस्वकालाः स्युर्यातव्याः कार्यलाघवात्। दीर्घाः कार्यगुरुत्वाद्वा वर्षावासः परत्र च॥

इति कौटलीयार्थशास्त्रे अभियास्यत्कर्मणि नवमाधिकरणे प्रथमोऽध्यायः शक्तिदेशकालबलाबलज्ञानं यात्राकालाः आदितः द्वाविंशतिशततमोऽध्यायः॥

---

## अध्याय १२३ बलोपादानकालाः, सन्नाहगुणाः, प्रतिबलकर्म च।

मौलभृतकश्रेणीमित्रामित्राटवीबलानां समुद्दानकालाः।

मूलरक्षणादतिरिक्तं मौलबलम्, अत्यावापयुक्ता वा मौला मूले विकुर्वीरन् इति, बहुलानुरक्तमौलबलः सारबलो वा प्रतियोद्धा व्यायामेन योद्धव्यम् इति, प्रकृष्टेऽध्वनि काले वा क्षयव्ययसहत्वान्मौ-

---

स्वारी करून शत्रूचा पाडाव किंवा नाश करणें शक्य असेल, तरच स्वारी करणें इष्ट होय.

उन्हाळयाची तीव्रता कमी झाली, म्हणजे हत्तीचें बळ घेऊन स्वारीस जावें; कारण उष्णतेनें हत्तींच्या अंगांस घाम सुटतो. व त्यामुळें त्यांस कुष्ठरोग होतो; आणि डुंबावयास न सांपडल्यानें व प्यावयास पाणी न मिळाल्यास, ते मलूल व अंध होतात. ज्या देशांत पाणी पुष्कळ असेल, त्या देशांत, आणि पावसाळ्यांत हत्तींचें दळ घेऊन स्वारीस जावें. उलट प्रकार असेल, तेव्हां गाढवें, उंट व घोडे यांचें दळ बरोबर घेऊन जावें. ज्या देशांत पाऊस कमी आणि चिखलहि कमी अशा प्रदेशावर स्वारी करावयाची असेल तेव्हां, आणि मारवाडा सारख्या देशांत, पावसाळ्यांत देखील चारहि प्रकारचें सैन्य बरोबर घ्यावें. प्रदेश सपाट, उंचसखल, खडकाळ, आणि दिवस लहानमोठा असेल, त्या मानानें जवळचा किंवा लांबचा ( कमीजास्त ) मुक्काम ठरवावा.

ज्या कार्याकरितां स्वारी करावयाची, तें फार महत्त्वाचें नसल्यास प्रवासाचा टप्पा लहानच ठेवावा, पण तें महत्त्वाचें असल्यास मोठा ठेवावा; पावसाळ्यांत परप्रांतांत छावणी करूं नये, हा नियमहि महत्त्वाच्या कार्यांच्या वेळीं पाळतां येत नाहीं.

---

### सैन्याच्या उपयोगास उचित काल. शत्रूच्या सैन्यास तोंड देण्याची तयारी.

वंशपरंपरेनें ठेवलेलें सैन्य, पगारी सैन्य, पथक-सैन्य, मित्रराजाचें सन्य, शत्रुराजाचें सैन्य आणि रानटी जातींचें सैन्य इत्यादि सैन्यांचा उपयोग करण्यास काळ कोणता, हें सांगावयाचें आहे.

देशाचें रक्षण करण्याकरितां जितकें पिढीजाद अथवा वंशपरंपरागत सैन्य जरूर असेल, त्यापेक्षां तें अधिक असेल, किंवा पिढीजाद सैन्याचें इतर सैन्याशीं वाजवीपेक्षां अधिक संघट्टन झाल्यानें हें पिढीजाद सैन्य राजावरच उलटेल असें वाटत असेल, किंवा प्रतिस्पर्धी राजा अत्यंत पराक्रमी असून त्यास अनेक राजनिष्ठ पिढीजाद पथकांचें साहाय्य आहे म्हणून त्याबरोबर मोठ्या चातुर्यानें लढलें पाहिजे असें वाटत असेल, दूरच्या किंवा पुष्कळ दिवसांच्या प्रवासाचे हाल सोसावयास केवळ पिढीजाद सैनिकच समर्थ होऊं शकतील

लानाम् इति, बहुलानुरक्तसम्पाते च यातव्यस्योपजापभयादन्यसैन्यानां भृतादीनामविश्वासे, बलक्षये वा सर्वसैन्यानाम् इति, मौलबलकालः।

प्रभूतं मे भृतबलमल्पं च मौलबलम् इति, परस्याल्पं विरक्तं वा मौलबलं, फल्गुप्रायमसारं वा भृतसैन्यम् इति, मन्त्रेणयोद्धव्यमल्पव्यायामेन इति, ह्रस्वो देशः कालो वा तनुक्षयव्ययः इति, अल्पसम्पातं शान्तोपजापं विश्वस्तं वा मे सैन्यम् इति, परस्याल्पः प्रसारो हन्तव्यः इति, भृतबलकालः।

प्रभूतं मे श्रेणीबलं शक्य मूले यात्रायां चाधातुम् इति, ह्रस्वप्रवासः, श्रेणीबलप्रायः प्रतियोद्धा, मन्त्रव्यायामाभ्यां प्रतियोद्धुकामो, दण्डबलव्यवहारः इति श्रेणीबलकालः।

प्रभूतं मे मित्रबलं शक्यं मूले यात्रायां चाधातुम्, अल्पः प्रवासो मन्त्रयुद्धाच्च भूयो व्यायामयुद्धम् इति, मित्रबलेन वा पूर्वमटवीं नगरीस्थानमासारं वा योधयित्वा पश्चात् स्वबलेन योधयिष्यामि, मित्रसाधारणं वा मे कार्यं, मित्रायत्ता वा मे कार्यसिद्धिः, आसन्नमनुग्राह्यं वा मे मित्रम्, अत्यावापं वास्य साधयिष्यामि इति मित्रबलकालः।

---

असें वाटत असेल, पगारी व इतर सन्यें राजनिष्ठतेबद्दल कितीजरी प्रसिद्ध असलीं तरी तीं सैन्यें घेऊन ज्यावर स्वारी करावयाची आहे, त्या शत्रूच्या कारस्थानांस तीं कदाचित् बळी पडण्याचा संभव आहे, म्हणून त्यांचा विश्वास धरतां कामा नये, असें वाटत असेल, किंवा इतर सर्व फौजा कमजार आहेत, असें वाटत असेल अशा प्रसंगीं लढण्याकरितां पिढीजाद सैन्याचा उपयोग करणें योग्य आहे, असें समजावें.

पगारी सन्य पुष्कळ, पिढीजाद सैन्य थोडें आहे; शत्रूच पिढीजाद सैन्य थोडें व असंतुष्ट, आणि पगारी सैन्य कुचकामाचें व कमकुवत आहे; लढाई करावयाची, ती फारशी हालचाल न करितां कारस्थानानें करावयाची आहे; फार दूरचा किंवा पुष्कळ दिवसांचा प्रवास करावयाचा नाहीं व द्रव्यहानि किंवा मनुष्यहानिहि फार व्हावयाची नाहीं; सैन्याबरोबर शस्त्रसामुग्री थोडीच असून आपले सैनिक शत्रूच्या कारस्थानास दाद देणारे नसून अगदीं पूर्ण विश्वासूक आहेत; शत्रूला पाडाव करण्याचें कामहि फारसें मोठें कठिण आहे असेंहि नाहीं, अशी स्थिति असेल तेव्हां त्या युद्धाचे कामीं पगारी सैन्याचा उपयोग करणें योग्य असें समजावें.

पथक सैन्य विपुल असून, देशाचें रक्षण करण्याचें व शत्रूवर स्वारी करण्याचें काम त्यावर सोंपविण्यास हरकत नाहीं; स्वारीसहि फार दिवस लागावयाचे नाहींत; प्रतिस्पर्धी राजाजवळ देखील बहुतेक पथक–सैन्यच आहे; तो आपल्या सैन्यानिशीं प्रत्यक्ष रणांगणावर येऊन आणि कारस्थानानें असा दुहेरी रीतीनें लढण्याच्या विचारांत आहे आणि त्याची भिस्त सैन्याच्या कवाइतीच्या हालचालीवर आहे असें वाटत असेल, तेव्हां पथक सैन्याचा लढाईसाठीं उपयोग करणें योग्य आहे असें समजावें.

माझ्या मित्राजवळ पुष्कळ सैन्य आहे; स्वतःच्या देशाचें रक्षण करण्यास लागणारें सैन्य ठेवून घेऊन स्वारी करण्याकरितां तो मला सैन्याची मदत करूं शकेल; मला स्वारीवर फार दिवस लागावयाचे नाहींत; कारस्थानी लढाईपेक्षां प्रत्यक्ष सामन्याची लढाइच अधिक व्हावयाची आहे; अथवा मित्र राजाच्या सैन्याकरवीं अगोदर माझ्या शत्रूच्या देशांतील रानटी लोकांचा, शहरांचा व पिछाडीच्या शत्रूचा बंदोबस्त करवून, नंतर मी आपल्या सैन्याच्या मदतीनें शत्रूशीं लढाई देईन; मित्राचें व माझें उद्दिष्ट कार्य सारखेंच आहे; माझी कार्यसिद्धि मित्राच्या हातांत आहे; माझा मित्र अगदीं जवळ आहे व त्यावर उपकार करणें जरूर आहे; त्याजवळ जें वाजवी पेक्षां अधिक सैन्य आहे, त्याचा उपयोग आपण करण्यांत मित्राचाहि फायदा आहे असें जेव्हां वाटत असेल तेव्हां मित्रराजाच्या सैन्याचा लढाईकडे उपयोग करावा.

प्रभूतं मे शत्रुबलं शत्रुबलेन योधयिष्यामि नगरस्थानम्, अटवीं वा। तत्र मे श्ववराहयोः कलहे चण्डालस्येवान्यतरसिद्धिर्भविष्यति; आसाराणामटवीनां वा कण्टकमर्दनमेतत् करिष्यामि; अत्युपचितं वा कोपभयान्नित्यमासन्नमरिबलं वासयेदन्यत्राभ्यन्तरकोपशङ्कायाः। शत्रुयुद्धावरयुद्धकालश्च। इत्यमित्रबलकालः।

तेनाटवीबलकालो व्याख्यातः।

मार्गदेशिकं परभूमियोग्यमरियुद्धप्रतिलोममटवीबलप्रायः शत्रुर्वा बिल्वं बिल्वेन हन्यताम्। अल्पः प्रसारो हन्तव्यः इत्यटवीबलकालः।

सैन्यमनेकमनेकजातीयस्थमुक्तमनुक्तं वा विलोपार्थं यदुत्तिष्ठति, तदौत्साहिकम्। भक्तवेतनविलोपविष्टिप्रतापकरं भेद्यं परेषाम्, अभेद्यं तुल्यदेशजातिशिल्पप्रायं संहतं महत्। इति बलोपादानकालाः।

तेषां कुप्यभृतममित्राटवीबलं विलोपभृतं वा कुर्यात्।

अमित्रस्य वा बलकाले प्रत्युत्पन्ने शत्रुमवगृह्णीयात्। अन्यत्र वा प्रेषयेत्। अफलं वा कुर्यात्।

---

माझ्या शत्रूजवळ सैन्य पुष्कळ आहे; त्या सैन्याचा माझ्या दुसऱ्या शत्रूच्या शहरावर किंवा रानटी भागावर हल्ला करण्यास मी उपयोग करीन, आणि मग कुत्र्याडुकरांच्या भांडणांत जसा चांडालास फायदा होतो, तसा त्या लढाईंत मला कांहींना कांहींतरी फायदाच होईल; अथवा त्या लढाईमुळें शत्रुराजाच्या मित्राचा किंवा रानटी लोकांचा कांटा काढून टाकतां येईल; निरंतर जवळ असलेलें शत्रूचें सैन्य फारच वाढलें तर त्याच्या असंतोषाची झळ आपणास लागूं नये म्हणून तें सैन्य लढाईंत गुंतविणें चांगलें असें वाटत असेल; तर आपल्या कामाकरितां शत्रूच्या सैन्याची मदत घेणें चांगलें. मात्र देशांतील लोकांत अंतस्थ कारणांमुळें क्षोभ माजल्यास असें करतां कामा नये. ( बलाढ्य ) शत्रूच्या युद्धापेक्षां कमजोर शत्रूशीं लढाईचा रंग दिसत असेल, तेव्हांहि शत्रूचें सैन्य उपयोगांत आणण्याचा काल आला, असें समजावें.

रानटी लोकांच्या सैन्याच्या उपयोगाचा काळहि असाच समजावा.

त्याचप्रमाणें लढाईंत मार्ग दाखविण्याकरितां, शत्रूच्या प्रदेशावर स्वारी करण्यास रानटी सैन्यच योग्य असेल अशा वेळीं, शत्रूच्या वतीनें लढण्यास तें नाराजी असेल तेव्हां आणि शत्रूच्या सैन्यांत बहुतेक रानटी लोकांचीच भरती असेल, अशा वेळीं बेलफळ बेलफळानें फोडावें त्याप्रमाणें रानटी सैन्याचाच उपयोग करावा. तसेंच शत्रूला उगीच थोडीशी चुणूक दाखवावयाची असेल, तेव्हां रानटी लोकांचें सैन्य उपयोगांत आणण्यास योग्य काळ समजावा.

जें सैन्य अफाट असून अनेक जातींच्या लोकांनीं भरलेलें आहे आणि जें सांगितल्याबरोबर किंवा न सांगतांहि वाटेल तेव्हां शत्रूच्या मुलुखाची लूट करण्याकरितां तयार होतें, त्या सैन्यास 'औत्साहिक' सैन्य म्हणतात. जें सैन्य पोटगी किंवा पगार अथवा लुटीचा अंश देऊं करून उभारलेलें असतें किंवा वेठीला धरलेलें असतें तें सैन्य शत्रूला फितूर होऊं शकतें. ज्यांत एकाच देशाचे, एकाच जातीचे व एकाच धंद्याचे लोक भरलेले असतात आणि संघशक्तीमुळें जें बलिष्ठ झालें असतें तें शत्रूच्या फितुरीला दाद देत नाहीं. याप्रमाणें सैन्यांच्या उपयोगाचे योग्यकाळ सांगितले.

या सैन्यांपैकीं शत्रुसैन्यास आणि रानटी लोकांच्या सैन्यास कच्चा माल अथवा धान्य, आणि लुटीचा भाग देऊं करावा.

शत्रुराजा आपल्या शत्रूवर स्वारी करण्याच्या उद्देशानें आपल्या जवळ सैन्याची मागणी करूं लागल्यास त्यास अडथळा करावा. आपल्याजवळचें सैन्य दूर पाठवून द्यावें; किंवा तें निरुपयोगी करावें किंवा कोणत्या

विक्षिप्तं वा वासयेत् । काले वातिक्रान्ते विसृजेत् । परस्य चैतद् बलसमुद्दानं विघातयेद्, आत्मनः सम्पादयेत् ।

पूर्वंपूर्वं चैषां श्रेयः सन्नाहयितुम् ।

तद्भावभावित्वान्नित्यसत्कारानुरागाच्च मौलबलं भृतबलाच्छ्रेयः ।

नित्यानन्तरं क्षिप्रोत्थायि वश्यं च भृतबलं श्रेणीबलाच्छ्रेयः ।

जानपदमेकार्थोपगतं तुल्यसङ्घर्षामर्षसिद्धिलाभं च श्रेणीबलं मित्रबलाच्छ्रेयः ।

अपरिमितदेशकालमेकार्थोपगमाच्च मित्रबलममित्रबलाच्छ्रेयः ।

आर्याधिष्ठितममित्रबलमटवीबलाच्छ्रेयः । तदुभयं विलोपार्थम् । अविलोपे व्यसने च ताभ्यामहिभयं स्यात् ।

ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रसैन्यानां तेजःप्राधान्यात् पूर्वंपूर्वं श्रेयः सन्नाहयितुम् इत्याचार्याः ।

नेति कौटल्यः । प्रणिपातेन ब्राह्मणबलं परोऽभिहारयेत् । प्रहरणविद्याविनीतं तु क्षत्रियबलं श्रेयः, बहुलसारं वा वैश्यशूद्रबलमिति ।

---

तरी सबबीनें त्याची पांगापांग करावी व स्वारीचा समय निघून गेल्यावर मग त्याची रवानगी करावी. अशा रीतीनें शत्रु–सैन्यांचें बळ हाणून पाडावें; आणि स्वतःची शक्ति हरप्रयत्नानें वाढविण्याची खबरदारी घ्यावी.

वर जे सैन्याचे प्रकार सांगितले आहेत त्यांत अगोदर सांगितलेलें सैन्य पुढें सांगितलेल्या सैन्यापेक्षां अधिक सरस समजावें. उदाहरणार्थ—

परंपरागत म्हणजे पिढीजाद सैन्य हें पगारी सैन्यापेक्षां सरस होय; कारण पिढीजाद सैन्याचें अस्तित्व राजावर अवलंबून असून राजाकडून त्याचा नित्य सत्कार झाल्यानें त्याची राजनिष्ठा कायम असते.

निरंतर राजासन्निध असणारें, चटकन सज्ज होणारें, व राजाच्या हुकमतींत असणारें पगारी सैन्य पथक–सैन्यापेक्षां अधिक चांगलें.

पथक–सैन्य स्वदेशांतील लोकांचें बनलेलें, एकाच उद्देशानें लढणारें आणि स्पर्धेनें, क्रोधानें व लाभा-लाभाच्या अपेक्षेनें सारखेंच प्रेरित झालेलें असल्यामुळें मित्राच्या सैन्यापेक्षां तें अधिक सरस समजावें.

मित्रबल हें कितीहि दुरून आणि कितीहि दीर्घकालपर्यंत मदतीस येणारें आणि एकाच उद्देशानें लढणारें असल्यानें तें शत्रुसैन्यापेक्षां अधिक सरस समजावें.

आर्य सेनापतीच्या धुरीणत्वाखालीं असलेलें शत्रुराजाचें सैन्य रानटी लोकांच्या सैन्यापेक्षां अधिक पसंत समजावें. या दोन्ही सैन्यांस लुटीची हांव सारखीच असते. त्यांस लूट मिळाली नाहीं, किंवा त्यांवर कांहीं संकट आलें, तर त्या दोघांपासूनहि घरांत शिरलेल्या सापासारखें भय उत्पन्न होतें.

आमचे गुरु म्हणतात—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र यांचें सैन्य उभारावयाचें झाल्यास त्यांच्यांत क्रमवारीनें तेजाधिक्य असल्यामुळें, शिकून तयार करण्यास पहिलें दुसऱ्याहून, दुसरें तिसऱ्याहून, तिसरें चौथ्याहून सरस समजावें.

कौटिल्य म्हणतो—असें नाहीं. शत्रु नमस्कार करून ब्राह्मणांचें सैन्य आपल्याकडे वळवून घेईल; म्हणून शस्त्रविद्येंत प्रवीण असें क्षत्रियांचें सैन्य अधिक चांगलें समजावें; अथवा वैश्यांचें व शूद्रांचें सैन्य संख्येनें मोठें असेल, तर तेंहि अधिक पसंत करावें,

तस्माद् ' एवंबलः परः, तस्यैतत् प्रतिबलम् ' इति बलसमुद्दानं कुर्यात् ।

हस्तियन्त्रशकटगर्भकुन्तप्रासहाटकवेणुशल्यवद्धस्तिबलस्य प्रतिबलम् । तदेव पाषाणलगुडावरणाङ्कुशकचग्रहणीप्रायं रथबलस्य प्रतिबलम् । तदेवाश्वानां प्रतिबलम् । वर्मिणो वा हस्तिनोऽश्वा वा वर्मिणः, कवचिनो रथा आवरणिनः, पत्तयश्चतुरङ्गबलस्य प्रतिबलम् ॥

एवं बलसमुद्दानं परसैन्यनिवारणम्। विभवेन स्वसैन्यानां कुर्यादङ्गविकल्पशः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे अभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे द्वितीयोऽध्यायः
बलोपादानकालाः सन्नाहगुणाः प्रतिबलकर्म,
आदितस्त्रयोविंशतिशततमोऽध्यायः

---

## अध्याय १२४—पश्चात्कोपचिन्ता, बाह्याभ्यन्तरप्रकृतिकोपप्रतीकारश्च ।



अल्पः पश्चात्कोपो महान् पुरस्ताल्लाभः इति । अल्पः पश्चात्कोपो गरीयान् । अल्पं पश्चात्कोपं प्रयातस्य दूष्यामित्राटविका हि सर्वतः समेधयन्ति, प्रकृतिकोपो वा । लब्धमपि च महान्तं पुरस्ताल्लाभम् एवंभूते भृत्यमित्रक्षयव्यया ग्रसन्ते । तस्मात् सहस्रैकीयः पुरस्ताल्लाभस्यायोगः, शतैकीयो वा पश्चात्कोप इति न यायात् । सूचीमुखा ह्यनर्था इति लोकप्रवादः ।

---

म्हणून सैन्य उभारतांना असा विचार करून सैन्य उभारावें कीं—शत्रूचें सैन्य अशा अशा प्रकारचें आहे, त्यास सामना द्यावयास माझें सैन्य याप्रकारचें असावें.

हत्तीदळास सामना द्यावयाचा झाल्यास आपल्या सैन्यांत यंत्रें, शकट–गर्भ भाले, प्रास, त्रिशूळ, लाठी, लोहदंड वगैरे आयुधें असलीं पाहिजेत. रथदळास सामना द्यावयाचा झाल्यास दगड, सोटे, चिलखतें, अंकुश व भाले जवळ असले पाहिजेत. घोडेस्वारांच्या पलटणीस सामना द्यावयाकरितांहि वरील आयुधांचीच जरूरी लागते. चिलखतें घालून सुरक्षित केलेले हत्ती, घोडे, रथ व पदाती हे सगळेच चतुरंग बलांतून कोणाशींहि लढूं शकतात.

याप्रमाणें आपल्या सैन्याची तयारी व उपयोग आणि शत्रुसैन्याचा प्रतिकार यांचा विचार आपल्या सैन्यांतील चारहि विभाग आणि त्यांचे पर्याय यांच्या बलानुरोधानें राजानें करावा.

---

### पिछाडीकडील क्षोभ. परकीय देशांतील व स्वदेशांतील लोकांचा क्षोभ व त्यावर उपाय.

पिछाडीस थोडासा क्षोभ उत्पन्न होणारा असला आणि अघाडीस चालून गेल्यानें भरपूर लाभ होणार असला तरी पिछाडीचा थोडासा उपद्रव देखील अधिक भयंकर समजून त्याचा बंदोबस्त केल्याशिवाय अघाडीस चालून जाऊं नये. कारण पिछाडीस थोडासा उपद्रव जरी असला, तरी राजा अघाडीच्या स्वारीवर गेला म्हणजे देशांतील राजद्रोही लोक, शेजारचे शत्रु व रानटी बंडखोर लोक, तो क्षोभ सर्वत्र वाढवूं लागतात आणि देशांतली प्रजा देखील बिथरूं लागते. अशा स्थितींत अघाडीस मोठा लाभ प्राप्त झाला तरी देखील भृत्य आणि मित्र यांच्या संरक्षणार्थ जी द्रव्यहानि व मनुष्यहानि होते, तिच्या मुळेंच तो सगळा लाभ नाहींसा होऊन जातो. यास्तव पिछाडीस एकपट हानि आणि अघाडीस दसपट लाभ असला तरी पुढें स्वारी करून जाऊं नये. अनर्थाचा चंचुप्रवेश झाला कीं मागाहून तो वाढतो हें लोकप्रसिद्ध आहे.

पश्चात्कोपे सामदानभेददण्डान् प्रयुञ्जीत । पुरस्ताल्लाभे सेनापतिं कुमारं वा दण्डचारिणं कुर्वीत ।

बलवान् वा राजा पश्चात्कोपावग्रहसमर्थः पुरस्ताल्लाभमादातुं यायात् । अभ्यन्तरकोपशङ्कायां शङ्कितानादाय यायात् । बाह्यकोपशङ्कायां वा पुत्रदारमेषामभ्यन्तरावग्रहं कृत्वा शून्यपालमनेकबलवर्गमनेकमुख्यं च स्थापयित्वा यायात् । न वा यायात् । 'अभ्यन्तरकोपो बाह्यकोपात् पापीयान्' इत्युक्तं पुरस्तात् ।

मन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजानामन्यतमकोपोऽभ्यन्तरकोपः । तमात्मदोषत्यागेन परशक्त्यपराधवशेन वा साधयेत् । महापराधेऽपि पुरोहिते संरोधनमवस्रावणं वा सिद्धिः, युवराजे संरोधनं निग्रहो वा गुणवत्यन्यस्मिन् सति पुत्रे । ताभ्यां मन्त्रिसेनापती व्याख्यातौ ।

पुत्रं भ्रातरमन्यं वा कुल्यं राज्यग्राहिणमुत्साहेन साधयेत् । उत्साहाभावे गृहीतानुवर्तनसन्धिकर्मभ्यामरिसन्धानभयात् । अन्येभ्यस्तद्विधेभ्यो वा भूमिदानैर्विश्वासयेदेनम् । तद्विशिष्टं स्वयंग्राहं दण्डं वा प्रेषयेत्, सामन्ताटविकान् वा । तैर्विगृहीतमातिसन्दध्यात् । अवरुद्धादानं पारग्रामिकं वा योगमातिष्ठेत् । एतेन मन्त्रिसेनापती व्याख्यातौ ।

---

पिछाडीस क्षोभ उद्भवला असतां सामदामभेददंड या चतुष्टयांतला योग्य तो उपाय योजावा. अघाडीच्या राजापासून लाभ मिळवावयाचा असेल, तेव्हां सेनापति किंवा राजपुत्र यास सैन्याचें आधिपत्य देऊन स्वारीवर पाठवावें.

पण राजा जर पिछाडीच्या राजापासून होणारा उपद्रव सहज निवारण्याइतका बलवान व समर्थ असेल तर त्यानें स्वतः अघाडीच्या राजापासून लाभ मिळविण्याकरितां स्वारी करावी. अशावेळीं मागें अंतस्थ बंडाळी उत्पन्न होण्याची भीति वाटत असेल, तर राजानें संशयित लोकांस आपल्याबरोबर घेऊन स्वारीस जावें. अशा स्वारीवर निघाल्यास सरहद्दीवरील अधिकारी व रानटी जाती इत्यादिकांचा क्षोभ उत्पन्न होण्याची भीति असेल, तर त्यांचीं बायकामुलें आपल्या देशांत अडकवून ठेवावीं आणि आपल्या पाठीमागें अरक्षित अशा प्रदेशाच्या रक्षणार्थ अनेक जातींचीं पथकें ठेवून त्यावर वेगवेगळे अधिकारी नेमून ठेवावे. इतका बंदोबस्त करून देखील स्वारीस जाणें धोक्याचें वाटल्यास स्वारीवर जाऊंच नये. कारण, परकीय लोकांच्या क्षोभाहून देशांतील लोकांचा क्षोभ अधिक भयंकर असतो, हें मागें सांगितलेंच आहे.

मंत्री, पुरोहित, सेनापति व युवराज यांपैकीं कोणाचाहि पुंडावा, म्हणजे अंतस्थ क्षोभ होय. असा क्षोभ राजानें स्वतःचे दोष काढून टाकून आणि पुंडावा करणाऱ्यांचें सामर्थ्य व त्यांच्या अपराधाचा लहानमोठेपणा यांच्या अनुरोधानें त्यांस शिक्षा करून मोडून टाकावा. पुरोहितानें भयंकर अपराध केला तरी, त्यास बंदींत टाकावें किंवा हद्दपार करावें, युवराजानें तसा मोठा गुन्हा केल्यास, दुसरा सद्गुणी पुत्र असेल तर त्यास युवराज करून, युवराजास बंदींत टाकावें किंवा मारावें. मंत्री आणि सेनापति, यांच्या संबंधानेंहि वरील नियम पाळावे.

युवराजाखेरीज अन्य पुत्र, बंधु अथवा दुसरा एखादा राजघराण्यांतील प्रमुख पुरुष राज्य घेण्याची इच्छा धरील तर त्यास इतर कांहीं अधिकाराची आशा दाखवून वश करून घ्यावें. आशा दाखवून तो वळत नसेल, तेव्हां त्यानें जें द्रव्य अथवा जो प्रांत ताब्यांत घेतला असेल, तें द्रव्य अथवा तो प्रांत त्याकडे चालू ठेवण्याच्या अटीवर त्याबरोबर सल्ला करून शत्रूच्या गोटांत तो सामील होणार नाहीं अशी योजना करावी; अथवा त्याच्यासारख्याच दुसऱ्या कोणाची तरी जमीन घेऊन त्यास देऊन त्याची मर्जी संपादन करावी; किंवा त्यानें आपण होऊन उभारलेल्या स्वयंसैनिकांचें आधिपत्य देऊन त्यास सरहद्दीवरील शत्रुबरोबर अथवा रानटी लोकांबरोबर लढावयास पाठवावें; आणि त्यांत तो शत्रूकडून कैद केला जाऊन फशीं पडेल अशी योजना करावी आणि मग बंदिवान राजपुत्र सोडवून आणण्याकरितां किंवा शत्रूचें गांव काबीज करण्याकरितां जे उपाय सांगितले आहेत, ते उपाय योजून त्यास स्वाधीन करून घ्यावें. मंत्री व सेनापति, यांसंबंधानेंहि हेंच धोरण पाळावें,

मन्त्र्यादिवर्जानामन्तरमात्यानामन्यतमकोपोऽन्तरमात्यकोपः। तत्रापि यथार्हमुपायान् प्रयुञ्जीत।

राष्ट्रमुख्यान्तपालाटविकदण्डोपनतानामन्यतमकोपो बाह्यकोपः। तमन्योन्येनावग्राहयेत्। अतिदुर्गप्रतिस्तब्धं वा सामन्ताटविकतत्कुलीनावरुद्धानामन्यतमेनावग्राहयेत्। मित्रेणोपग्राहयेद् वा, यथा नामित्रं गच्छेत्।

अमित्राद् वा सत्री भेदयेदेनम्—' अयं त्वा योगपुरुषं मन्यमानो भर्तर्येव विक्रमयिष्यति, अवाप्तार्थो दण्डचारिणममित्राटविकेषु कृच्छ्रे वा प्रवासे योक्ष्यति, विपुत्रदारमन्ते वा वासयिष्यति, प्रतिहतविक्रमं त्वां भर्तरि पण्यं करिष्यति, त्वया वा सन्धिं कृत्वा भर्तारमेव प्रसादयिष्यति, मित्रमुपकृष्टं वास्य गच्छेद् ' इति।

प्रतिपन्नमिष्टाभिप्रायैः पूजयेत्।

अप्रतिपन्नस्य संश्रयं भेदयेद्—असौ ते योगपुरुषः प्रणिहितः इति।

सत्री चैनमभिव्यक्तशासनैर्घातयेद्, गूढपुरुषैर्वा। सहप्रस्थायिनो वास्य प्रवीरपुरुषान् यथाभिप्रायकरणेनावाहयेत्। तेन प्रणिहितान् सत्री ब्रूयात्। इति सिद्धिः।

परस्य चैनान् कोपानुत्थापयेत्। आत्मनश्च शमयेत्।

---

मुख्य मंत्र्याखेरीज इतर मंत्र्यांचा जो क्षोभ त्याला अंतस्थ अमात्य क्षोभ म्हणतात. या बाबतींतहि परिस्थित्यनुरूप योग्य ते उपाय योजावे.

परप्रांताधिकारी, सरहद्दीवरील अधिकारी, रानटी लोकांचा पुढारी व जिंकलेल्या मुलखाचा राजा, यांपैकीं कोणाचाहि क्षोभ हा बाह्यक्षोभ होय; असा क्षोभ त्यांस एकमेकांविरुद्ध उठवून शांत करावा. यांपैकीं जर कोणी किल्ल्यांत अथवा तटबंदी शहरांत बळकटी करून बसला असेल तर त्यास शेजारचा राजा, रानटी लोकांचा पुढारी, त्याच्या घराण्यांतील प्रमुख पुरुष, अथवा त्यानें बंदिवान केलेला राजपुत्र, यांच्याकडून पकडून आणावें; अथवा अतःपर त्यानें शत्रुत्वानें राहूं नये म्हणून त्यास मित्राच्या साहाय्यानें ताळ्यावर आणावें.

अथवा-सत्रि हेरानें त्यास शत्रूच्या गोटांतून असें सांगून फोडावें कीं—हा परकी राजा तुला केवळ फितुरी हेर समजून तुझ्या धन्याविरुद्ध तुला लढावयास लावील; त्याचा हा उद्देश सिद्धीस गेला म्हणजे तो तुला सैन्यानिशीं त्याच्या राज्यांतील बंडखोर रानटी लोकांविरुद्ध लढावयास पाठवील; अथवा तुला कष्टदायक प्रवास करावयास लावील, अथवा तुझ्या बायकामुलांपासून तुझी ताटातूट करून, तुला दूर सरहद्दीवरच कायमचा रहावयास लावील; किंवा तूं हतबल झालास म्हणजे तो तुला धन्याच्या स्वाधीन करून आपल्यावरचें अरिष्ट टाळील; अथवा तुला स्वाधीन करण्याच्या अटीवर तुझ्या धन्याशीं सल्ला करून त्याची मर्जी संपादन करील; म्हणून राजाच्या शत्रूकडे न जातां राजाचा जो मित्र असेल, त्याकडे तूं जावेंस, हें चांगलें. " याप्रमाणें सांगितलें असतां त्यानें ऐकिलें तर त्याचा सत्कार करावा; पण त्यानें ऐकलें नाहीं तर, ज्या शत्रूचा तो आश्रय करील त्याच्याच मनांत भेद उत्पन्न करावा. त्यास सांगावें कीं " तुला मारण्याकरितांच याची गुप्त मारेकरी म्हणून योजना झाली आहे " नंतर सत्रिहेरानें राजाच्या उघड हुकमानें अथवा गुप्त वेष धारण केलेल्या हेरांकरवीं त्यास ठार मारावें. अथवा आणखी जे कोणी शूर पुरुष त्याच्या बरोबर शत्रूकडे जावयास सिद्ध झाले असतील त्यांना त्यांचे मनोदयानुरूप बक्षीस देऊन वश करून घ्यावें आणि मग हे लोक तुझा घात करण्याकरितां शत्रूनें पाठविले आहेत असें यास सांगून शत्रूविषयीं त्याचें मन कलुषित करावें.

याप्रमाणें शत्रूच्या राज्यांत क्षोभ उत्पन्न करावे आणि आपल्या राज्यांतील क्षोभ शांत करावे.

यः कोपं कर्तुं शमयितुं वा शक्तः, तत्रोपजापः कार्यः । यः सत्यसन्धः शक्तः कर्मणि फलावाप्तौ चानुग्रहीतुं विनिपाते च त्रातुं, तत्र प्रतिजापः कार्यः । तर्कयितव्यश्च—कल्याणबुद्धिरुताहो शठ इति ।

शठो हि बाह्योऽभ्यन्तरमेवमुपजपति—भर्तारं चेद्धत्वा मां प्रतिपादयिष्यति, शत्रुवधो भूमिलाभश्च मे द्विविधो लाभो भविष्यति, अथवा शत्रुरेनमाहनिष्यति हतबन्धुपक्षस्तुल्यदोषदण्डेन वा उद्विग्नश्च, मे भूयान् कृत्यपक्षो भविष्यति । तद्विधे वान्यस्मिन्नपि शङ्कितो भविष्यति । अन्यमन्यं चास्य मुख्यमभिव्यक्तशासनेन घातयिष्यामि इति ।

अभ्यन्तरो वा शठो बाह्यमेवमुपजपति—कोशमस्य हरिष्यामि, दण्डं वास्य हनिष्यामि, दुष्टं वा भर्तारमनेन घातयिष्यामि, प्रतिपन्नं बाह्यममित्राटविकेषु विक्रमयिष्यामि चक्रमस्य सज्यतां वैरमस्य प्रसज्यतां ततः स्वाधीनो मे भविष्यति, ततो भर्तारमेव प्रसादयिष्यामि, स्वयं वा राज्यं ग्रहीष्यामि, बद्ध्वा वा बाह्यभूमिं भर्तृभूमिं चोभयमवाप्स्यामि, विरुद्धं वावाहयित्वा बाह्यं विश्वस्तं घातयिष्यामि शून्यं वास्य मूलं हरिष्यामि इति ।

---

जो प्रमुख पुरुष क्षोभ उत्पन्न करण्यास आणि उत्पन्न झालेला क्षोभ शांत करण्यास समर्थ असेल, त्याच्या बाबतींत असलें कारस्थान लढवावें. जो पुढारी सत्यवक्ता, सत्यप्रतिज्ञ, कार्यप्रसंगीं व कार्यसिद्धीस्तव साहाय्य करण्यास, किंवा संकटप्रसंगीं रक्षण करण्यास समर्थ असेल, त्याच्या बाबतींत दुसऱ्यानें केलेलें कारस्थान हाणून पाडण्याचा प्रयत्न करावा. असा प्रयत्न करतांना असा विचार करावा कीं, 'हा पुढारी सद्बुद्धीनें प्रेरित झालेला आहे, किंवा लबाड आहे?'

धूर्त परकीय राजा देशांतील लोकांसंबंधानें जें कारस्थान मनांत योजित असतो तें येणें प्रमाणें—"जर हा मनुष्य या आपल्या राजाला ठार करून, मला येऊन मिळेल तर मला दोन लाभ होतील—एक शत्रूचा नाश व दुसरा भूमीचा लाभ; शत्रूनें जर ह्यास ठार केलें, तर मारलेल्या माणसाचे बांधव व त्याच्या पक्षांतील लोक, आपणांसहि असल्याच आरोपावरून हा राजा अशीच शिक्षा करील अशा भीतीनें त्रस्त होऊन फितुर होण्याला तयार होतील; आणि मग अशा लोकांविषयीं व इतरांविषयींहि राजाला संशय येत राहील. अशा रितीनें राजा संशयखोर बनल्यावर मग राजाकडून उघड हूकूम घेऊन असें क्रमाक्रमानें एकेक प्रमुख पुरुषाचा घात करवीन.

देशांतील धूर्त कारस्थानी मनुष्य बाहेरच्या लोकांत फितुरी करण्याकरितां पुढील प्रमाणें कारस्थान मनांत योजीत असेल—"मी याचें द्रव्यभांडार हरण करीन, अथवा याच्या सैन्याचा घात करीन, अथवा ह्याच्या हातून माझ्या दुष्ट धन्याचा मी नाश करवीन. हा फितुरी पुढारी माझ्या मुठींत आला म्हणजे मी त्यास परकीय शत्रूच्या विरुद्ध अथवा बंडखोर रानटी लोकांच्या विरुद्ध स्वारी करावयास लावीन. त्याचें सैन्य या कामांत गुंतून पडलें आणि त्यांचे इतर राजांबरोबर पक्कें वैमनस्य आलें म्हणजे तो माझ्या मुठींत आल्याप्रमाणें होईल; मग त्याला स्वाधीन करून मी माझ्या धन्याची मर्जी प्रसन्न करून घेईन. अथवा—मी स्वतः त्याचें राज्य हरण करीन, अथवा त्यास बंदींत टाकीन; म्हणजे मला माझ्या राजाचा प्रदेश आणि या फितुरी इसमाचा बाहेरील असे दोनहि देश प्राप्त होतील. अथवा माझ्या राजाला मी याच्यावर स्वारी करावयास लावून, विश्वास दाखवून याचा घात करीन, आणि त्याचें राज्य अराजक झालें म्हणजे मी तें आपल्या ताब्यांत घेईन.

कल्याणबुद्धिस्तु सहजीव्यर्थमुपजपति । कल्याणबुद्धिना सन्दधीत । शठं 'तथा' इति प्रतिगृह्यातिसन्दध्यात् । इति ।

एवमुपलभ्य,

परे परेभ्यः स्वे स्वेभ्यः स्वे परेभ्यः स्वतः परे । रक्ष्याः स्वेभ्यः परेभ्यश्च नित्यमात्मा विपश्चिता ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे अभियास्यत्कर्मणि नवमाधिकरणे तृतीयोऽध्यायः पश्चात्कोपचिन्ता, बाह्याभ्यन्तरप्रकृतिकोपप्रतीकारश्च, आदितश्चतुर्विंशतिशतः ॥

---

# अध्याय १२५—क्षयव्ययलाभविपरिमर्शः ।

युग्यपुरुषापचयः क्षयः । हिरण्यधान्यापचयो व्ययः ।

ताभ्यां बहुगुणविशिष्टे लाभे यायात् ।

आदेयः, प्रत्यादेयः, प्रसादकः, प्रकोपकः, ह्रस्वकालः, तनुक्षयः, अल्पव्ययः महान्, वृद्ध्युदयः, कल्यः, धर्म्यः, पुरोगश्चेति लाभसम्पत् ।

सुप्राप्यानुपाल्यः परेषामप्रत्यादेय इति आदेयः ।

विपर्यये प्रत्यादेयः । तमाददानस्तत्रस्थो वा विनाशं प्राप्नोति ।

यदि वा पश्येत्—'प्रत्यादेयमादाय कोशदण्डनिचयरक्षाविधानान्यवस्रावयिष्यामि, खनिद्रव्यहस्तिवनसेतुबन्धवणिक्पथानुद्धृतसारान् करिष्यामि; प्रकृतिरस्य कर्शयिष्यामि; आवाहयिष्यामि,

---

हे शठाच्या मनांतले बेत सांगितले. पण जो परोपकार बुद्धीचा असतो, त्याला कारस्थानापेक्षां सलोख्याची बुद्धीच पटते; म्हणून अशा सुशील मनुष्याबरोबर सख्याच करावा. पण दुष्ट मनुष्य जर तसें ढोंग करून फसवूं पाहील तर त्यास वरकरणी होकार द्यावा आणि मग त्यास चांगलें पेचांत पकडावें.

अशा रीतीनें शहाण्या राजानें एका शत्रूचें दुसऱ्या शत्रूपासून, चांगल्या प्रजेचें दुष्ट प्रजेपासून, आपल्या प्रजेचें शत्रूपासून व शत्रूचें आपल्या फितुरी प्रजेपासून निरंतर रक्षण करावें; आणि फितुरी प्रजेपासून व शत्रूपासून स्वतःचेंहि निरंतर रक्षण करावें.

## मनुष्यहानि, द्रव्यहानि व लाभ यांविषयीं विचार.

कार्यक्षम पुरुषांचा नाश म्हणजे क्षय अथवा मनुष्यहानि होय. धनधान्याचा नाश म्हणजे व्यय अथवा द्रव्यहानि होय.

अपेक्षित लाभ जर वर सांगितलेल्या द्विविध हानीहून पुष्कळ अधिक होणार असेल, तर शत्रूवर स्वारी करावी.

लाभाचे पुढें सांगितल्याप्रमाणें १ आदेय २ प्रत्यादेय ३ प्रसादक ४ प्रकोपक ५ ह्रस्वकाल ६ तनुक्षय ७ अल्पव्यय ८ महान ९ वृद्ध्युदय १० कल्य ११ धर्म्य आणि १२ पुरोग असे बारा प्रकार आहेत.

जो लाभ प्राप्त करून घ्यावयास विशेष कष्ट पडत नाहींत, प्राप्त झाल्यावर जो सहज राखतां येतो व जो शत्रूस परत द्यावा न लागतां नेहमीं उपभोगितां येतो तो आदेय लाभ होय. याच्या उलट असेल तो प्रत्यादेय लाभ होय; असा लाभ प्राप्त करून घेण्याकरितां जो मनुष्य यत्न करितो अथवा जो अशा लाभाचा तेथेंच राहून उपभोग घेतो त्यास विनाश भोगावा लागतो.

तथापि जर असें वाटत असेल कीं—" हा लाभ जरी प्रत्यादेय म्हणजे परत द्यावा लागणारा असला तरी, तो प्राप्त करून घेऊन मी शत्रचा खजिना, सैन्य, कोठर किंवा रक्षणाचीं साधनें क्षीण करून टाकीन, शत्रूच्या खाणी, द्रव्यवनें व हस्तिवनें, पूल, पाटबंधारे, व्यापारीरस्ते धुळीस मिळवीन; त्याचे प्रजाजन जर्जर करीन, अथवा

आयोगेनाराधयिष्यामि वा, ताः परः प्रतियोगेन कोपयिष्यति; प्रतिपक्षे वास्य पण्यमेनं करिष्यामि; मित्रमवरुद्धं वास्य प्रतिपादयिष्यामि; मित्रस्य स्वस्य वा देशस्य पीडामत्रस्थस्तस्करेभ्यः परेभ्यश्च प्रतिकरिष्यामि; मित्रमाश्रयं वास्य वैगुण्यं ग्राहयिष्यामि, तदमित्रं विरक्तं तत्कुलीनं प्रतिपत्स्ये, सत्कृत्य वास्मै भूमिं दास्यामि, इति, संहितसमुत्थितं मित्रं मे चिराय भविष्यति ' इति प्रत्यादेयमपि लाभमाददीत । इत्यादेयप्रत्यादेयौ व्याख्यातौ ।

अधार्मिकाद् धार्मिकस्य लाभो लभ्यमानः स्वेषां परेषां च प्रसादको भवति । विपरीतः प्रकोपक इति । मन्त्रिणामुपदेशाल्लाभो लभ्यमानः कोपको भवति, ' अयमस्माभिः क्षयव्ययौ ग्राहितः ' इति । दूष्यमन्त्रिणामनादराल्लाभो लभ्यमानः कोपको भवति, ' सिद्धार्थोऽयमस्मान् विनाशयिष्यति ' इति ' विपरीतः प्रसादकः । इति प्रसादककोपकौ व्याख्यातौ ।

गमनमात्रसाध्यत्वाद्ध्रस्वकालः । मन्त्रसाध्यत्वात् तनुक्षयः । भक्तमात्रव्ययत्वादल्पव्ययः । तदात्ववैपुल्यान्महान् । अर्थानुबन्धकत्वाद् वृद्ध्युदयः । निराबाधकत्वात् कल्यः । प्रशस्तोपादानाद् धर्म्यः । सामवायिकानामनिर्बन्धगामित्वात् पुरोग इति ।

---

शत्रूचे प्रजेस मी माझ्या देशांत येऊन राहावयास लावीन आणि त्यांमध्यें फितुरी करून त्यांस मी माझ्याकडे वळवून घेईन; असें झालें म्हणजे शत्रु आपल्या प्रजेस अर्थातंच शिक्षा करून क्रुद्ध ( क्षुब्ध ) करील; अथवा माझ्या शत्रूस त्याच्या दुसऱ्या शत्रूच्या स्वाधीन करून माझा लाभ साधीन; नंतर त्याच्या जागीं आपल्या मित्राची किंवा त्याच्या कुळांतील कोणी पुरुष अटकेंत असेल त्याची स्थापना करीन अथवा या भूमिच्या लाभाच्या योगानें आपल्या जमिनीचा किंवा मित्राच्या जमिनीचा चोरादिकांपासून व शत्रूपासून बचाव करीन आणि तो शत्रु ज्या मित्राच्या किंवा इतराच्या घरीं आश्रयास गेला असेल त्यास त्याचे दोष कळवीन; अथवा त्याच्या शत्रूला किंवा त्याच्याच कुळांतल्या त्याजवर रागावलेल्या एखाद्या पुरुषाला गांठीन व त्यास सत्कारपूर्वक ती भूमि देऊन टाकीन, त्यायोगानें तो माझा कायमचा मित्र व सहकारी होईल, अशी खात्री वाटत असल्यास प्रत्यादेय म्हणजे परत द्यावा लागणारा लाभ देखील प्राप्त करून घेण्याकरितां यत्न करावा.

ह्याप्रमाणें आदेय म्हणजे प्राप्त करून घेण्यासारखा लाभ आणि प्रत्यादेय म्हणजे परत द्यावा लागणारा लाभ, यांविषयीं विचार सांगितला आहे.

अधर्मी राजापासून धर्मनिष्ठ राजाला जो लाभ प्राप्त होतो, तो स्वदेशांतील व परदेशांतील लोकांस संतोष देतो; उलट प्रकारचा लाभ क्षोभास कारणीभूत होतो. मंत्र्यांच्या सल्ल्यानें मिळालेला लाभ क्षोभकारक होतो, कारण त्यांस असें नेहमीं वाटत राहणार कीं, हा लाभ मिळविण्यासाठीं आम्ही राजास संकटांत पाडलें. राजद्रोही मंत्र्यांचा अनादर करून मिळविलेला लाभहि क्षोभकारक होतो, कारण त्यांस असें वाटतें कीं, राजाचा उद्दिष्ट हेतु सिद्धीस गेला म्हणजे तो आपला घात केल्यावांचून राहणार नाहीं. याच्या उलट जो लाभ, तो संतोषकारक होतो. याप्रमाणें प्रसादक व कोपक लाभाचा विचार सांगितला.

स्वारी केल्याबरोबर जो लाभ मिळण्यासारखा असतो, तो ह्रस्वकाल लाभ म्हणजे थोडक्या अवधींत प्राप्त होणारा लाभ होय. कारस्थानानें प्राप्त होणाऱ्या लाभाला तनुक्षय लाभ म्हणतात, कारण त्यांत मनुष्यहानि अल्पमात्र होते. केवळ अन्नपाण्याचा खर्च करून जो लाभ प्राप्त करून घेतां येतो तो अल्पव्यय म्हणजे थोड्या पैशानें प्राप्त होणारा लाभ होय. तत्काल भरपूर मोबदला देणारा लाभ, तो महान लाभ म्हणावा. ज्यापासून निरंतर वित्ताची प्राप्ति होते, तो उत्कर्षास चढविणारा वृद्ध्युदय लाभ समजावा. ज्यापासून अपाय होत नाहीं, तो कल्य म्हणजे नुकसान न

तुल्ये लाभे, देशकालौ शक्त्युपायौ प्रियाप्रियौ जवाजवौ सामीप्यविप्रकर्षौ तदात्वानुबन्धौ सारत्वसातत्ये बाहुल्यबाहुगुण्ये च विमृश्य बहुगुणयुक्तं लाभमाददीत।

लाभविघ्नाः—कामः कोपः साध्वसं कारुण्यं ह्रीः अनार्यभावो मानः सानुक्रोशता परलोकापेक्षा दाम्भिकत्वम् अत्यागित्वं दैन्यम् असूया हस्तगतावमानो दौरात्मिकमविश्वासो भयमनिकारः शीतोष्णवर्षाणामाक्षम्यं मङ्गलतिथिनक्षत्रेष्टित्वमिति।

नक्षत्रमतिपृच्छन्तं बालमर्थोऽतिवर्तते। अर्थो ह्यर्थस्य नक्षत्रं किं करिष्यन्ति तारकाः॥
नाधनाः प्राप्नुवन्त्यर्थान् नरा यत्नशतैरपि। अर्थैरर्थाः प्रबध्यन्ते गजाः प्रतिगजैरिव॥

इति कौटलीयार्थशास्त्रे अभियास्यत्कर्मणि नवमाधिकरणे, चतुर्थोऽध्यायः क्षयव्ययलाभविपरिमर्शः, आदितः पञ्चविंशशतः॥

---

# अध्याय १२६ बाह्याभ्यन्तराश्चापदः।



१ सन्ध्यादीनामयथोद्देशावस्थापनमपनयः। तस्मादापदः सम्भवन्ति।

---

करणारा लाभ होय. श्रेयस्कर रीतीनें प्राप्त होणारा लाभ, तो धर्म्य म्हणजे न्यायानें प्राप्त होणारा लाभ होय. संघांतील दोस्त राजाशीं कोणताहि विशेष करार न करतां जो सहजासहजीं प्राप्त होतो, तो पुरोग म्हणजे आपोआप पुढें आलेला लाभ होय. असे हे लाभाचे बारा प्रकार झाले.

दोन कार्यांपासून मिळणारे लाभ इतर प्रकारें सारखेच असतील तेव्हां स्थल व काल, शक्ति व उपाय, लाभाची इष्टानिष्टता, कालाचें लघुत्वदीर्घत्व, सामीप्य किंवा दूरता, सद्यःप्राप्ति किंवा भविष्यकालीन प्राप्ति, एकदम मोठा लाभ किंवा थोडा पण सतत टिकणारा लाभ, संख्याधिक्य व गुणाधिक्य इत्यादिकांचा पूर्णपणें विचार करावा, आणि नंतर ज्यांत विशेष गुण असतील तो लाभ प्राप्त करून घेण्याचा यत्न करावा.

लाभाच्या मार्गांत आडवीं येणारीं विघ्नें पुढीलप्रमाणें—काम, क्रोध, भीरुत्व, मनाचा कोवळेपणा, भिडस्तपणा, अनार्यता, अभिमान, सदयता, परलोकेच्छा, ताठा ( दंभ ), कवडीचुंबकपणा, दैन्य, मत्सर, मिळालेल्याचा अनादर, दुष्टपणा, गैरविश्वास, भय, उपेक्षा, थंडीऊन सहन करण्याची अक्षमता, आणि तिथीनक्षत्रांच्या शुभाशुभपणावर भरंवसा.

नक्षत्रांची शुभाशुभता अतिरेकानें पहात बसणाऱ्या बालिश माणसापासून संपत्ति दूर निघून जाते; संपत्ति हीच संपत्ति प्राप्त करून देणारें शुभ नक्षत्र होय, आकाशांतील नक्षत्रें बिचारीं काय करतील ? दरिद्री माणसांनीं शेंकडों प्रयत्न केले तरी संपत्तीची प्राप्ति त्यांस होणें शक्य नाहीं. पाळलेले हत्ती हेच जसे रानटी हत्तींना पकडून आणूं शकतात तशी हातांत असलेली संपत्तीच नवी संपत्ति प्राप्त करून देऊं शकते.

## बाह्य व अंतस्थ संकटें.

सामादि उपायांची योजना शास्त्रांत सांगितलेल्या धोरणाप्रमाणें न करतां भलत्याच प्रकारें केली म्हणजे त्याला अपनय ( चुकीचें धोरण ) म्हणतात; आणि सगळीं संकटें अशा चुकीच्या धोरणामुळें उद्भवतात; तीं संकटें येणें प्रमाणें होत:—

बाह्योत्पत्तिरभ्यन्तरप्रतिजापा । अभ्यन्तरोत्पत्तिर्बाह्यप्रतिजापा । बाह्योत्पत्तिर्बाह्यप्रतिजापा । अभ्यन्तरोत्पत्तिरभ्यन्तरप्रतिजापा । इत्यापदः ।

यत्र बाह्या अभ्यन्तरानुपजपन्ति, अभ्यन्तरा वा बाह्यान् तत्रोभययोगे प्रतिजपतः सिद्धिर्विशेषवती । सुव्याजा हि प्रतिजपितारो भवन्ति, नोपजपितारः । तेषु प्रशान्तेषु नान्यान् शक्नुयुरुपजपितुमुपजपितारः । कृच्छ्रोपजापा हि बाह्यानामभ्यन्तरास्तेषामितरे वा । महतश्च प्रयत्नस्य वधः, परेषाम् अर्थानुबन्धश्चात्मनोऽन्य इति ।

अभ्यन्तरेषु प्रतिजपत्सु सामदाने प्रयुञ्जीत । स्थानमानकर्म सान्त्वम् । अनुग्रहपरिहारौ कर्मस्वायोगो वा दानम् ।

बाह्येषु प्रतिजपत्सु भेददण्डौ प्रयुञ्जीत । सत्रिणो मित्रव्यञ्जना वा बाह्यानां चारमेषां ब्रूयुः 'अयं वो राजा दूष्यव्यञ्जनैरतिसन्धातुकामो, बुध्यध्वम्' इति । दूष्येषु वा दूष्यव्यञ्जनाः प्रणिहिता दूष्यान् बाह्यैर्भेदयेयुः, बाह्यान् वा दूष्यैः । दूष्याननुप्रविष्टा वा तीक्ष्णाः शस्त्ररसाभ्यां हन्युः । आहूय वा बाह्यान् घातयेयुरिति ।

---

बाहेरील लोक कारस्थानास आरंभ करतात व त्यांस देशांतील लोक सामील होतात, देशांतील लोक कारस्थानास प्रारंभ करतात व त्यांस बाहेरील लोक सामील होतात; बाहेरील लोकांकडून कारस्थानास प्रारंभ होऊन त्यांस बाहेरील दुसरे लोक सामील होतात; आणि देशांतील लोकांकडून कारस्थानास आरंभ होऊन त्यांस देशांतील इतर लोक सामील होतातः—असे हे संकटाचे चार प्रकार झाले.

बाहेरील लोक देशांतील लोकांस कारस्थानांत सामील करून घेण्याचा प्रयत्न करोत किंवा देशांतील लोक बाहेरील लोकांस कारस्थानांत सामील करून घेण्याचा प्रयत्न करोत या उभयपक्षींहि कारस्थान उपस्थित करणाऱ्यांपेक्षां कारस्थानांत सामील होणाऱ्यांना वळविणें अधिक सुलभ होय. कारण प्रत्यक्ष कारस्थान उपस्थित करणाऱ्यांपेक्षां कारस्थानांत सामील होणाऱ्या लोकांस लालूच दाखवून फोडणें सोपें असतें. आणि एकदां अशा बळी पडणाऱ्या लोकांना वश करून घेतलें म्हणजे कारस्थानी लोक दुसऱ्या कोणासहि आपल्या कटांत सामील करून घेऊं शकणार नाहींत. बाहेरील लोक स्थानिक लोकांस, किंवा स्थानिक लोक बाहेरील लोकांस, मोठ्या मुष्किलीनेंच आपल्या कारस्थानांत सामील करून घेतां येतात. कारण अशा कारस्थानांत सामील होण्यापूर्वीं लोक असा विचार करितात, कीं, शत्रूंनीं कितीहि खटाटोप केला तरी तो निष्फळच होणार; बरें त्यांचा डाव साधला तरी त्यांत त्यांना तेवढा फायदा होईल पण आपल्या गळ्याला मात्र फांस लागेल !

स्थानिक लोक बाहेरील लोकांच्या कारस्थानांत सामील झाल्यास, त्यांस सामोपचारानें व द्रव्यदानानें वळवून घ्यावें. हुद्दा किंवा बहुमान देणें म्हणजे सामोपचार होय; कृपाकरणें, करमाफ करणें किंवा विशिष्ट कार्यावर नेमणूक करणें म्हणजेहि दानच होय.

बाहेरील लोक स्थानिक लोकांच्या कारस्थानांत सामील झाल्यास, भेद पाडण्याचा व दंड योजण्याचा अवलंब करावा. गुप्त हेरांनीं मित्रत्व दाखवून बाहेरील दूष्य लोकांच्या हेरास असें भासवावें कीं, "हा राजा राजद्रोही म्हणून वावरणाऱ्या गुप्त हेरांच्या सहाय्यानें तुम्हांला फसविण्याच्या विचारांत आहे, हें लक्षांत ठेवा." अथवा राजद्रोही म्हणून वावरणाऱ्या गुप्त हेरांनीं, कारस्थानांत सामील होणाऱ्या लोकांत मिसळून त्यांच्यांत व बाहेरील लोकांत, किंवा बाहेरील लोकांत सामील होऊन त्यांच्यांत व दूष्य लोकांत फूट पाडावी. अथवा गुंड हेरांनीं कटांत सामील होणाऱ्या ( दूष्य ) लोकांत शिरकाव करून घ्यावा, आणि त्यांस शस्त्रप्रयोगानें अथवा विषप्रयोगानें ठार करावें. किंवा कारस्थान रचणाऱ्या बाहेरील लोकांस 'तुमचें काम करून देतों पहा या' असें म्हणून बोलावून ठार करावें.

यत्र बाह्या बाह्यानुपजपन्ति, अभ्यन्तरान् अभ्यन्तरा वा, तत्रैकान्तयोग उपजपितुः सिद्धिर्विशेषवती। दोषशुद्धौ हि दूष्या न विद्यन्ते। दूष्यशुद्धौ हि दोषः पुनरन्यान् दूषयति।

तस्माद् बाह्येषूपजपत्सु भेददण्डौ प्रयुञ्जीत। सत्रिणो मित्रव्यञ्जना वा ब्रूयुः–'अयं वो राजा स्वयमादातुकामः, विगृहीताः स्थानेन राज्ञा, बुध्यध्वम्' इति। प्रतिजपितुर्वा ततो दूतदण्डाननुप्रविष्टास्तीक्ष्णाः शस्त्ररसादिभिरेषां छिद्रेषु प्रहरेयुः। ततः सत्रिणः प्रतिजपितारमभिशंसेयुः।

अभ्यन्तरानभ्यन्तरेषूपजपत्सु यथार्हमुपायं प्रयुञ्जीत। तुष्टलिङ्गमतुष्टं विपरीतं वा साम प्रयुञ्जीत। शौचसामर्थ्यापदेशेन व्यसनाभ्युदयापेक्षणेन वा प्रतिपूजनमिति दानम्।

मित्रव्यञ्जनो वा ब्रूयादेतान्–चित्तज्ञानार्थमुपधास्यति वो राजा, तदस्याख्यातव्यम् इति। परस्पराद् वा भेदयेदेनान्–असौ चासौ च वो राजन्येवमुपजपति। इति भेदः।

दाण्डकामकवच्च दण्डः।

---

जेव्हां परदेशांतील कारस्थानी लोक परकीय लोकांना कटांत ओढण्याचा प्रयत्न करतात किंवा देशांतील कारस्थानी लोक देशांतील लोकांना कारस्थानांत ओढण्याचा यत्न करूं लागतात, तेव्हां कारस्थानें रचणाऱ्यांचाच बंदोबस्त करणें सुलभ व निश्चित फलदायक ठरतें. कारण दोषाचेंच निर्मूलन केलें म्हणजे दूष्य होणारे लोक आपोआपच दोषापासून दूर राहतात. पण कारस्थानाला बळी पडलेल्या लोकांचें निर्मूलन केलें तरी कारस्थान शिल्लक राहिल्यानें तें दुसऱ्या कोणातरी लोकांस दूषित केल्यावांचून राहणार नाहीं.

म्हणून परकीय लोक कारस्थान रचूं लागले, म्हणजे भेद व दंड यांचा उपयोग करावा. गुप्त हेरांनीं मित्रत्व दाखवून त्यांस असें म्हणावें कीं, "अहो हा राजा स्वतः तुम्हांस फसवून जाळ्यांत पकडणार आहे. तुम्ही त्याच्या जाळ्यांत सांपडत आहां, सावध व्हा; लक्ष्यांत ठेवा. तदनंतर कारस्थानांत सामील झालेल्या माणसांच्या सेवकांच्या घोळक्यांत मिसळून गुंड हेरांनीं शस्त्रप्रयोगानें, विषप्रयोगानें अथवा अन्य प्रयोगानें त्यांच्या मर्मावर घाव घालून त्यांस ठार करावें. नंतर इतर गुप्त हेरांनीं कारस्थानांत सामील झालेल्या माणसांचेंच हें काम असा त्यांच्या विरुद्ध बोभाट करावा.

देशांतील लोक देशांतील लोकांशीं कारस्थान करूं लागले, म्हणजे त्यांस हाणून पाडण्याकरितां योग्य दिसतील ते उपाय योजावे. वरून वरून संतोष पण अंतर्यामीं असंतोष अगर वरून असंतोष पण अंतर्यामी संतोष दाखविणें असे सामोपचाराचे प्रकार आहेत.

एखाद्या मनुष्यानें आपला विश्वासूकपणा संबीरपणानें राखला असें जाहीर करून त्यास देणगी देणें, अथवा त्याच्या घरच्या संकटाच्या किंवा उत्सवाच्या निमित्तानें त्यास देणगी देणें, हे दानाचे प्रकार होत. मित्र म्हणून वावरणाऱ्या गुप्त हेरानें यांस असें सांगावें कीं, "राजा तुमचें मन पाहात आहे म्हणून त्यास तुम्ही खरें खरें असेल तें सांगितलें पाहिजे." अथवा गुप्त हेरांनीं त्याची एकमेकांत असें सांगून फूट पाडावी कीं, अमुक अमुक मनुष्य राजाला तुमची चुगली जाऊन सांगतो!

दंडाचा प्रकार दांडकार्मिक प्रकरणांत सांगितलाच आहे.

या चार संकटांपैकीं अंतस्थ अथवा देशांतील कारस्थानाचें अगोदर निवारण करावें. कारण "सापाच्या भीतीप्रमाणें देशांतील लोकांचा क्षोभ परकीय लोकांच्या क्षोभाहून अधिक भयंकर असतो," असें मागें सांगितलेंच आहे.

एतासां चतसृणामापदामभ्यन्तरामेव पूर्वं साधयेत् । 'अहिभयादभ्यन्तरकोपो बाह्यकोपात् पापीयान्' इत्युक्तं पुरस्तात् ॥

पूर्वां पूर्वां विजानीयाल्लघ्वीमापदमापदाम् । उत्थितां बलवद्भ्यो वा गुर्वीं लघ्वीं विपर्यये ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे अभियास्यत्कर्मणि नवमाधिकरणे पञ्चमोऽध्यायः बाह्याभ्यन्तराश्चापदः, आदितः षड्विंशतिशततमः ॥

## अध्यायः १२७—दूष्यशत्रुसंयुक्ताः ।

दूष्येभ्यः शत्रुभ्यश्च द्विविधाः शुद्धाः ।

दूष्यशुद्धायां पौरेषु जानपदेषु वा दण्डवर्जानुपायान् प्रयुञ्जीत । दण्डो हि महाजने क्षेप्तुमशक्यः क्षिप्तो वा तं चार्थं न कुर्यात् । अन्यं चानर्थमुत्पादयेत् । मुख्येषु त्वेषां दाण्डकर्मिकवच्चेष्टेतेति ।

शत्रुशुद्धायां यतः शत्रुः प्रधानः कार्यो वा, ततः सामादिभिः सिद्धिं लिप्सेत ।

स्वामिन्यायत्ता प्रधानसिद्धिः मन्त्रिष्वायत्तायत्तसिद्धिः, उभयायत्ता प्रधानायत्तसिद्धिः ।

दूष्यादूष्याणामामिश्रितत्वादामिश्रा । आमिश्रायामदूष्यतः सिद्धिः आलम्बनाभावे ह्यालम्बिता न विद्यते ।

मित्रामित्राणामेकीभावात् परमिश्रा । परमिश्रायां मित्रतः सिद्धिः । सुकरो हि मित्रेण सन्धिर्नामित्रेणेति ।

---

या चार संकटांमध्यें अगोदर सांगितलेलें संकट पुढें सांगितलेल्या संकटाहून कमी भयंकर समजावें, हा सामान्य नियम झाला. तथापि ज्या कारस्थानाच्या बुडाशीं बलिष्ठ लोक आहेत तें कारस्थान अधिक भयंकर होय; आणि दुर्बलांनीं उभारलेलें कारस्थान कमी भयंकर होय; मग हीं कारस्थानें बाह्य असोत वा अंतस्थ असोत.

### राजद्रोही व शत्रु यांच्यापासून उद्भवणारीं संकटें.

केवळ राजद्रोही लोकांपासून आणि केवळ शत्रूंपासून उद्भवणारीं जीं संकटें तीं शुद्ध स्वरूपाचीं होत.

शहरांत किंवा खेड्यापाड्यांत केवळ राजद्रोही लोकांपासून संकट उद्भवल्यास दंडाखेरीज इतर म्हणजे साम, दाम, आणि भेद हे उपाय योजावे; कारण मोठ्या जनसमुदायास दंड करणें अशक्य असतें; आणि दंड केलाच तर इष्ट हेतु सिद्धीस न जातां भलताच एखादा अनर्थ उद्भवतो. राजद्रोह्यांचे पुढारी असतील त्यांच्यावर मात्र दांड-कार्मिक प्रकरणांत सांगितलेल्या उपायांचा प्रयोग करावा.

केवळ शत्रूपासून संकट उद्भवलें असतां त्या संकटाचा उगम स्वतः शत्रूपासून आहे का त्याच्या मंत्र्यापासून आहे, याचा तपास करावा आणि जेथून उगम असेल त्यास अनुसरून साम आदिकरून उपायांची योजना करून आपला हेतु साध्य करावा.

सलोखा करणें केवळ शत्रुराजाच्याच मर्जीवर असल्यास कार्यसिद्धि स्वावलंबी व सुकर समजावी. मंत्र्याच्या स्वाधीन असल्यास परावलंबी समजावी आणि राजा व मंत्री या उभयतांच्या विचारावर अवलंबून असल्यास सुकर पण परावलंबी समजावी.

प्रजाजनांत राजद्रोही आणि राजनिष्ठ लोकांचें संमिश्रण झालें असल्यास तें संमिश्र संकट होय. संमिश्रसंकटांत जे लोक राजनिष्ठ राहिले असतील त्यांच्यावरच शांततेची सगळी भिस्त असते. बंडखोरांना त्यांचा आधार मिळेनासा झाला म्हणजे त्यांच्या बंडाचा पायाच ढासळला असें समजावें.

संकटाच्या मुळाशीं शत्रु व मित्र यांचें सहकार्य असेल तर तें परमिश्र संकट म्हणावें. अशा संकटांतून सुटण्याला मित्रांचाच मुख्यतः उपयोग होतो. कारण केव्हां झालें तरी मित्राशीं जसा सलोखा सहज होईल तसा शत्रूशीं होऊं शकणार नाहीं.

मित्रं चेन्न सन्धिमिच्छेत्, अभीक्ष्णमुपजपेत्, ततः सत्रिभिरमित्राद् भेदयित्वा मित्रं लभेत। मित्रामित्रसङ्घस्य वा योऽन्तस्थायी तं लभेत। अन्तस्थायिनि लब्धे मध्यस्थायिनो भिद्यन्ते। मध्यस्थायिनं वा लभेत। मध्यस्थायिनि वा लब्धे नान्तस्थायिनः संहन्यन्ते। यथा चैषामाश्रयभेदः तानुपायान् प्रयुञ्जीत।

धार्मिकं जातिकुलश्रुतवृत्तस्तवेन सम्बन्धेन पूर्वेषां त्रैकाल्योपकारानपकाराभ्यां वा सान्त्वयेत्।

निवृत्तोत्साहं विग्रहश्रान्तं प्रतिहतोपायं क्षयव्ययाभ्यां प्रवासेन चोपतप्तं शौचेनान्यं लिप्समानमन्यस्माद् वा शङ्कमानं मैत्रीप्रधानं वा कल्याणबुद्धिं साम्ना साधयेत्।

लुब्धं क्षीणं वा तपस्विमुख्यावस्थापनापूर्वं दानेन साधयेत्।

तत् पञ्चविधं देयविसर्गो, गृहीतानुवर्तनम्, आत्तप्रतिदानं, स्वद्रव्यदानम् अपूर्वं, परस्वेषु स्वयंग्राहदानं चेति दानकर्म।

परस्परद्वेषवैरभूमिहरणशङ्कितम् अतोऽन्यतमेन भेदयत्। भीरुं वा प्रतिघातेन, 'कृतसन्धिरेष त्वयि कर्म करिष्यति, मित्रमस्य निसृष्टं; सन्धौ वा नाभ्यन्तर' इति।

---

मित्र जर सल्ला न करील, तर त्याचेवर पुनः पुनः गुप्त मसलतींचा उपयोग करावा; नंतर गुप्त हेरांच्या साहाय्यानें त्यास शत्रूच्या गोटांतून फोडून, पुन्हां मैत्री करावयास लावावें. मित्रांचा व शत्रूंचा एकत्र संघ असल्यास, त्यांतील जो शेवटला असेल, तो आपलासा करून घ्यावा; शेवटला मित्र आपलासा झाला, म्हणजे मधले आपोआप फोडतां येतात. अथवा मधला मित्र आपलासा करावा, आणि तो मधला मित्र आपलासा झाला, म्हणजे शेवटले मित्र एकमेकांशीं संघ करूं शकत नाहींत. सारांश जेणेंकरून त्यांस एकमेकांचा आधार मिळणार नाहीं, असे उपाय योजावे.

धर्मनिष्ठ राजास त्याची जात, कुल, शिक्षण व शील यांची स्तुति करून किंवा पिढीजाद कुलसंबंध निदर्शनास आणून आपलेसें करावें; अथवा आम्ही आजपर्यंत आपणांवर अमुक अमुक उपकार केले आहेत, आजपर्यंत आपल्यांत केव्हांहि वैरभाव आलेला नाहीं व पुढें येणार नाहीं असें सांगून त्याचें मन वळवावें.

ज्याचा उत्साह पार नाहींसा झाला आहे, अनेक लढाया करून जो थकून गेला आहे, ज्याचे सामादि उपाय फसल्यामुळें जो निरुपाय होऊन बसला आहे, मनुष्यहानि व द्रव्यहानि झाल्यामुळें किंवा दूरचा प्रवास करावा लागल्यामुळें जो त्रासून गेला आहे, सद्भावाचा मित्र मिळावा अशी जो इच्छा करीत आहे, अथवा ज्यास आपल्या सहकाऱ्याची शंका वाटत आहे, अथवा ज्यास मैत्रीचीच महती विशेष वाटत आहे, तो जर सद्बुद्धीनें प्रेरित असेल, तर त्यास सामोपचारानें आपल्याकडे वळवून घ्यावें.

लोभी राजास, किंवा ज्याची द्रव्यहानि विशेष झाली आहे अशा राजास वश करून घ्यावयाचें असल्यास, अगोदरच योजून ठेविलेल्या गोसाव्यांतील प्रमुख पुरुषांच्या हातून त्यांस देणगी देऊन वश करून घ्यावें.

वर निर्दिष्ट केलेल्या देणगीचे पांच प्रकार आहेत. ते असेः– येणें असलेल्या रकमेची सूट देणें; घेतलेल्या रकमेला अनुमति देणें; जप्त केलेली रक्कम परत करणें, पदरची रक्कम मुद्दाम देणें, दुसऱ्याच्या मत्तेवर हात मारावयाला परवानगी देणें.

दोन राजांत परस्परांस द्वेषाची, वैमनस्याची किंवा राज्यापहरणाची भीति वाटत असेल, तेव्हां त्या दोघांत फूट पाडावी. त्या दोघांपैकीं जो भित्रा असेल, त्यास असा धाक दाखवावा कीं, "हा राजा दुसऱ्याबरोबर दोस्ती करून तुझ्या विरुद्ध कारस्थान करण्याच्या विचारांत आहे. त्याचा मित्र या कामाकरितां रवाना देखील झाला आहे; तेव्हां आतां त्यांची संधि झाल्यास तुझ्या बाजूचा कोणी राहिलाच नाहीं!

यस्य वा स्वदेशाद् अन्यदेशाद् वा पण्यानि पण्यागारतयागच्छेयुः, तान्यस्य 'यातव्याल्लब्धानि' इति सत्रिणश्चारयेयुः। बहुलीभूते शासनमभिव्यक्तेन प्रेषयेत्--'एतत् ते पण्यं, पण्यागारं वा मया ते प्रेषितं, सामवायिकेषु विक्रमस्व, अपगच्छ वा, ततः पणशेषमवाप्स्यसि' इति। ततः सत्रिणः परेषु ग्राहयेयुरेतद् अरिप्रदत्तम् इति।

शत्रुप्रख्यातं वा पण्यमविज्ञातं विजिगीषुं गच्छेत्। तदस्य वैदेहकव्यञ्जनाः शत्रुमुख्येषु विक्रीणीरन्। ततः सत्रिणः परेषु ग्राहयेयुः-'एतत् पण्यमरिप्रदत्तम्' इति।

महापराधानर्थमानाभ्यामुपगृह्य वा शस्त्ररसाग्निभिरमित्रे प्रणिदध्यात्। अथैकममात्यं निष्पातयेत्। तस्य पुत्रदारमुपगृह्य रात्रौ हतमिति ख्यापयेत्। अथामात्यः शत्रोस्तानेकैकशः प्ररूपयेत्। ते चेद्यथोक्तं कुर्युः, न चैनान् ग्राहयेत्। अशक्तिमतो वा ग्राहयेत्। आप्तभावोपगतो मुख्यादस्यात्मानं रक्षणीयं कथयेत्; अथामित्रशासनम् मुख्यायोपघाताय प्रेषितमुभयवेतनो ग्राहयेत्।

उत्साहशक्तिमतो वा प्रेषयेत्-'अमुष्य राज्यं गृहाण यथा स्थितो न सन्धिः' इति। ततः सत्रिणः परेषु ग्राहयेयुः।

---

किंवा, त्या राजाच्या कोठारांत संग्रह करण्याकरितां स्वदेशांतून अथवा परदेशांतून माल येत असेल, तेव्हां गुप्त हेरांनीं अशीं कंडी पिकवावी कीं, याचा मित्र ज्यावर हल्ला करणार आहे, त्या शत्रूच्या देशांतून हा माल आलेला आहे. असा बोभाटा सर्वत्र पसरला म्हणजे त्या शत्रूच्या नांवाचा खलिता उघड जासुदाबरोबर पाठवावा कीं "हा माल मी तुजकडे पाठविला आहे; याच्या मोबदला तूं तुझ्या दोस्तावर स्वारी कर किंवा निदान त्यास सोडून बाजूस हो, म्हणजे तुला आणखी बाकीचा माल मिळेल." तदनंतर गुप्त हेरांनीं संघांतील इतर राजांस असें सांगावें कीं, या तुमच्या दोस्ताला हा माल तुमच्या शत्रूकडून मिळाला आहे.

शत्रूच्या भांडारांत असल्याविषयीं प्रसिद्ध असलेला असला एखादा अलंकार गुप्तपणानें विजयेच्छु राजाकडे पाठवून द्यावा. तदनंतर सौदागर हेरांनीं तो अलंकार शत्रुपक्षांतील प्रमुख गृहस्थास विकावा आणि मग गुप्त हेरांनीं इतरांना सांगावें कीं, हा अलंकार तुमच्या शत्रूनें यांना लांच म्हणून दिलेला आहे.

शत्रुदेशांत अत्यंत विश्वासघातकी व राजद्रोही लोक असतील, त्यांस द्रव्य व बहुमान देऊन आपलेसें करावें, आणि शस्त्रप्रयोग, विषप्रयोग व अग्निप्रयोग करण्याकरितां जरूर तीं साधनें त्यास पुरवून, शत्रूच्याच देशांत राहावयास त्यांस सांगावें. तदनंतर अमात्यांपैकीं एका अमात्यास घालवून देऊन शत्रूच्या देशांत जाऊन राहण्यास सांगावें; आणि त्याच्या बायकामुलांना गुप्तस्थळीं नेऊन ठेवून असा बोभाटा करावा कीं, रात्रींच्या समयीं अमात्याच्या बायकामुलांस कोणी तरी ठार केलें! तदनंतर शत्रूच्या राज्यांत जाऊन राहिलेल्या अमात्यानें त्या मारेकऱ्यांची शत्रु राजापाशीं वेगवेगळी शिफारस करून त्यांची सोय लावून द्यावी. पुढें त्यांनीं जर ठरल्याप्रमाणें कामगिरी केली तर त्यांस पकडूं देऊं नये, तशी कामगिरी हातून होणार नाहीं असें जर त्यांनीं सांगितलें तर मात्र त्यांस अटकेंत ठेवावें. अशा रीतीनें राजाचा विश्वास संपादन केल्यावर त्यानें राजास असें सांगावें कीं, अमुक प्रमुख माणसापासून आपणास धोका आहे, म्हणून जपून राहिलें पाहिजे. हें ऐकून राजानें त्या प्रमुख माणसाचा वध करण्याविषयीं हुकूम पाठविला असतां दोन्हीकडून पगार घेणाऱ्या हेरांनीं, तें पत्र वाटेंत पकडलें जाईल असें करावें.

जे राजे उत्साही व बलाढ्य असतील, त्यांस असें सांगून पाठवावें कीं, "आमची याची दोस्ती राहिलेली नाहीं; यास्तव तुम्हीं याचें राज्य घ्यावें." आणि इकडे गुप्त हेरांनीं शत्रुपक्षांतील राजांना अमुक राजांचे असे असे बेत चालले आहेत अशी आगाऊ इशारत द्यावी.

एकस्य स्कन्धावारं वीवधासारं वा घातयेयुः, इतरेषु मैत्रीं ब्रुवाणाः। तं सत्रिणः–' त्वमेतेषां घातयितव्यः ' इत्युपजपेयुः।

यस्य वा प्रवीरपुरुषो हस्ती हयो वा म्रियेत, गूढपुरुषैर्हन्येत ह्रियेत वा, तं सत्रिणः परस्परोपहतं ब्रूयुः। ततः शासनमभिशस्तस्य प्रेषयेत्—' भूयः कुरु ततः पणशेषमवाप्स्यसि ' इति। तदुभयवेतना ग्राहयेयुः।

भिन्नेष्वन्यतमं लभेत। तेन सेनापतिकुमारदण्डचारिणो व्याख्याताः। साङ्घिकं च भेदं प्रयुञ्जीत। इति भेदकर्म।

तीक्ष्णमुत्साहिनं व्यसनिनं स्थितशत्रुं वा गूढपुरुषाः शस्त्राग्निरसादिभिः साधयेयुः। सौकर्यतो वा तेषामन्यतमः। तीक्ष्णो ह्येकः शस्त्ररसाग्निभिः साधयेत्। अयं सर्वसन्दोहकर्म विशिष्टं वा करोति।

इत्युपायचतुर्वर्गः। पूर्वः पूर्वश्चास्य लघिष्ठः। सान्त्वमेकगुणम्। दानं द्विगुणं सान्त्वपूर्वम्। भेदस्त्रिगुणः सान्त्वदानपूर्वः। दण्डश्चतुर्गुणः सान्त्वदानभेदपूर्वः।

इत्यभियुञ्जानेषूक्तम्। स्वभूमिष्ठेषु तु त एवोपायाः। विशेषस्तु। स्वभूमिष्ठानामन्यतमस्य

---

गुप्त हेरांनीं दोस्तां पैकीं कोणाच्या तरी एकाच्या सैन्यांत किंवा दाणागोट्यांत नासधूस चालवावी आणि असें करण्याविषयीं इतरांचा सल्ला आहे असें सांगत सुटावें. त्यानंतर गुप्तहेरांनीं मित्रत्वाच्या मिषानें या राजास अशी सल्ला द्यावी कीं, बाकीचे राजे एक होऊन तुला ठार करण्याच्या विचारांत आहेत!

एखाद्या राजाचा बलाढ्य योद्धा, हत्ती अथवा घोडा आपोआप मेला किंवा गुप्तहेरांनीं मारला किंवा हरण करून नेला, तर गुप्तहेरांनीं हा परस्परांच्या शत्रुत्वाचा परिणाम आहे, असा बोभाटा करावा. तदनंतर ज्याच्यावर या कृत्याचा संशय असेल, त्याच्या नांवचा खोटाच असा गुप्त लेख पाठवावा कीं, " आणखी अशींच कृत्यें कर, म्हणजे तुला देऊं केलेली बाकीची रक्कमहि मिळेल. " आणि इकडे दोन्ही राजांपासून पगार घेणाऱ्या माणसांनीं हा खलिता वाटेंत पकडला जाईल असें करावें.

अशा रितीनें दोस्तांत फूट पडली असतां, त्यांच्या पैकीं एखाद्याशीं आपण मैत्री जोडावी.

सेनापति, राजपुत्र आणि सैनिक यांसंबंधानेंहि वर निर्दिष्ट केलेले उपाय योजावे. संघांमध्येंहि असाच भेदभाव उत्पन्न करावा. या प्रमाणें शत्रूंत भेद कसा उत्पन्न करावा हें सांगितलें.

दीर्घद्वेषी, पराक्रमी, व्यसनी किंवा दुर्गादिबळकट ठिकाणीं राहणारा अशा शत्रूस गुप्त हेरांनीं गुप्तपणानें शस्त्रप्रयोग, अग्निप्रयोग किंवा विषप्रयोग करून ठार करावें, किंवा या तीन उपायांपैकीं जो सोपा वाटेल, तो एकच योजावा. एकटा गुंड हेरसुद्धां शस्त्रप्रयोगानें, विषप्रयोगानें किंवा अग्निप्रयोगानें हें काम करूं शकेल; अर्थातच त्यास सर्व साधनांची मदत असल्यावर तो याहूनहि अधिक कामगिरी बजावील.

असे हे साम दान भेद दंडादि चार प्रकारचे उपाय सांगितले; यांमध्यें अगोदर सांगितलेला उपाय पुढील उपायाहून कमी प्रभावी असतो. साम उपायांत एकच गुण असतो. दानांत दोन; कारण तत्पूर्वीं साम उपाय येत असतो; भेदांत तीन गुण, कारण तत्पूर्वीं साम व दान हे उपाय येतात; आणि दंडाचा अथवा धमकीचा उपाय चतुर्गुण असतो, कारण तत्पूर्वीं साम, दान व भेद यांचा विचार झालेला असतो.

परदेशावर करावयाच्या स्वारीच्या वेळचा हा विचार झाला. स्वारीच्यापूर्वीं शांततेच्या काळांतहि वरील उपाय योजावे. फरक एवढाच कीं देशांत राहणारे जे शत्रुराजे असतील, त्यापैकीं एकाद्याकडे कारखानदारांच्या माहितींतील मुख्य मुख्य दूत हमेश पाठवीत जावे; अशा दूतांनीं त्या राजास आपल्या राजाशीं संधि करण्याविषयीं किंवा त्याच्या

पण्यागारैरभिज्ञातान् दूतमुख्यानभीक्ष्णं प्रेषयेत्. त एनं सन्धौ परहिंसायां वा योजयेयुः, अप्रतिपद्यमानं कृतो नः सन्धिः इत्यावेदयेयुः। तमितरेषामुभयवेतनाः सङ्क्रामयेयुः--अयं वो राजा दुष्टः इति।

यस्य वा यस्माद् भयं वैरं द्वेषो वा, तं तस्माद् भेदयेयुः--'अयं ते शत्रुणा सन्धत्ते, पुरा त्वामतिसन्धत्ते, क्षिप्रतरं सन्धीयस्व, निग्रहे चास्य प्रयतस्व'। इति। आवाहविवाहाभ्यां वा कृत्वा संयोगमसंयुक्तान् भेदयेत्।

सामन्ताटविकतत्कुलीनावरुद्धैश्चैषां राज्यं निघातयेत्। सार्थव्रजाटवीभिर्वा दण्डं चाभिसृतम्। परस्परापाश्रयाश्चैषां जातिसङ्घाश्छिद्रेषु प्रहरेयुः। गूढाश्चाग्निरसशस्त्रेण॥

वितंसगिलवच्चारीन् योगैराचरितैः शठः। घातयेत् परमिश्रायां विश्वासेनामिषेण च॥

इति कौटलीयार्थशास्त्रेऽभियास्यत्कर्मणि नवमाधिकरणे षष्ठोऽध्यायः दूष्यशत्रुसंयुक्ताः,
आदितः सप्तविंशतिशततमः॥

---

## अध्याय १२८—अर्थानर्थसंशययुक्ताः, तासामुपायविकल्पजाः सिद्धयश्च।

कामादिरुत्सेकः स्वाः प्रकृतीः कोपयति; अपनयो बाह्याः। तदुभयमासुरी वृत्तिः। स्वजनविकारः कोपः परवृद्धिहेतुष्वापद् अर्थोऽनर्थः संशय इति।

---

शत्रूचा नाश करण्याविषयीं उत्तेजन द्यावें. त्यानें हें कबूल न केलें तरी दूतांनीं आपला कार्यभाग सिद्धीस गेला, तह झाला, असें जाहीर करावें. नंतर दोघांकडून पगार घेणाऱ्यांनीं इतर राजांना असें जाहीर करावें कीं, हा तुमचा दोस्त राजा दुष्ट आहे; त्यानें तुमच्या शत्रूंशीं संधान बांधलें! ज्या राजाला दुसऱ्याचें भय वाटत असेल, अथवा जो दुसऱ्याशीं वैरभावानें वागत असेल, त्याला असें सांगून फोडावें कीं, "हा तुझ्या शत्रूशीं सल्ला करून लवकरच तुला दगा देण्याच्या विचारांत आहे, म्हणून ताबडतोब आमच्या राजाशीं तह कर आणि त्याला घेरण्याचा प्रयत्न कर." ज्यांच्यांत दोस्ती झाली नसेल अशांपैकीं एकास मुलगी देऊन किंवा त्याची घेऊन विवाहसंबंध घडवून आणून त्यास इतरांपासून वेगळें करावें.

शेजारचा राजा, रानटी लोकांचा पुढारी, शत्रुवंशांतील थोर पुरुष अथवा बंदीवान राजपुत्र, यांच्याशीं संधि करून त्यांच्या राज्याचा नाश करवावा. अथवा सौदागर संघ किंवा रानटी लोक यांच्या हातून स्थानिक शत्रु व त्याचें सैन्य ठार करवावें; अथवा स्थानिक शत्रूच्या जातीच्या कांहीं लोकांनीं संघशः शत्रूच्या आश्रयास जाऊन राहावें आणि मर्मस्थान शोधून काढून त्यांचा घात करावा; अथवा हेरांनीं गुप्तपणानें अग्निप्रयोग, विषप्रयोग किंवा शस्त्रप्रयोग करून ठार करावें.

देशांत शत्रुमित्रांची भेसळ झाली असेल तेव्हां शठराजानें पक्षी पकडण्याकरितां जसें जाळ्यांत पक्ष्याचें चित्र व आमिष ठेवतात, तशा कपटप्रयोगांनीं विश्वास दाखवून आणि लालूच दाखवून शत्रूंचा नाश करावा.

### अर्थ, अनर्थ आणि संशय यांनीं युक्त अशी आपत्ति आणि तीवर वैकल्पिक उपाय योजून मिळणारी सिद्धि.

कामक्रोधादि विकारांचा अतिरेक झाला म्हणजे प्रजाजनांत क्षोभ उत्पन्न होतो; आणि चुकीचें धोरण पत्करलें म्हणजे बाहेरील लोकांत क्षोभ उत्पन्न होतो. म्हणून या दोनहि वृत्ति आसुरी होत. स्वजनविकार उत्पन्न करणारा जो कोप तो शत्रूच्या अभिवृद्धीस कारणीभूत होतो आणि म्हणून त्यालाच अर्थानर्थसंशयरूप आपत्ति म्हणतात.

योऽर्थः शत्रुवृद्धिमप्राप्तः करोति, प्राप्तः प्रत्यादेयः परेषां भवति, प्राप्यमाणो वा क्षयव्ययोदयो भवति, स भवत्यापदर्थः। यथा–सामन्तानामामिषभूतः; सामन्तव्यसनजो लाभः; शत्रुप्रार्थितो वा स्वभावाधिगम्यो लाभः; पश्चात्कोपेन पार्ष्णिग्राहेण वा विगृहीतः पुरस्ताल्लाभः; मित्रोच्छेदेन सन्धिव्यतिक्रमेण वा मण्डलविरुद्धो लाभ इत्यापदर्थः।

स्वतः परतो वा भयोत्पत्तिरित्यनर्थः।

तयोः 'अर्थो न वे' ति 'अनर्थो न वा' इति, 'अर्थोऽनर्थः' इति, 'अनर्थः अर्थः' इति, संशयः।

शत्रुमित्रमुत्साहयितुमर्थो न वेति संशयः। शत्रुबलमर्थमानाभ्यामावाहयितुमनर्थो न वेति संशयः। बलवत्सामन्तां भूमिमादातुमर्थोऽनर्थः इति संशयः। ज्यायसा सम्भूययानमनर्थोऽर्थ इति संशयः। तेषामर्थसंशयमुपगच्छेत्।

अर्थोऽर्थानुबन्धः, अर्थो-निरनुबन्धः, अर्थोऽनर्थानुबन्धः, अनर्थोऽर्थानुबन्धः, अनर्थो निरनुबन्धः, अनर्थोऽनर्थानुबन्ध इत्यनुबन्धषड्वर्गः।

शत्रुमुत्पाट्य पार्ष्णिग्राहादानमर्थोऽर्थानुबन्धः।

उदासीनस्य दण्डानुग्रहः फलेन अर्थो निरनुबन्धः।

---

जो लाभ प्राप्त झाला नाहीं तरी शत्रूच्या अभिवृद्धीस कारणीभूत होतो, जो लाभ केव्हांना केव्हां तरी शत्रूस परत द्यावा लागतो अथवा जो मिळविण्याकरितां बरीच मनुष्यहानि व द्रव्यहानि सोसावी लागते, तो लाभ ( अथवा अर्थ ) 'आपदर्थ' म्हणजे अपायकारक अर्थ होय. उदाहरणार्थः—ज्या लाभावर शेजारच्या राजांचाहि डोळा आहे, जो शेजाऱ्यांचें नुकसान करून प्राप्त करून घेतला आहे, ज्याला शत्रूनें मागणी घातली व त्याला जो स्वाभाविकपणें प्राप्त होणारा आहे; अथवा अघाडीच्या शत्रूपासून मिळविलेला जो लाभ मागून बंडाळी उद्भवल्यामुळें किंवा पिछाडीच्या शत्रूच्या उठावणीमुळें बाधित होण्याचा संभव आहे, अथवा जो मित्राचा नाश करून किंवा तहाच्या अटी मोडून संयुक्त मंडलाच्या मर्जीविरुद्ध प्राप्त करून घेतला आहे असा लाभ 'आपदर्थ' म्हणजे अपायकारक अर्थ होय.

ज्यामुळें स्वतःच्या प्रजेपासून किंवा शत्रूपासून भय उत्पन्न होतें, तो **अनर्थ** ( अनर्थावह अर्थ ) होय.

ज्या संबंधानें असा प्रश्न येऊन पडतो कीं, " हा लाभ आहे कां हानि आहे, किंवा आधीं लाभ दिसून मागाहून हानि होणार आहे किंवा अगोदर हानि होऊन मागाहून लाभ होणार आहे" त्या लाभाला '**संशयित अर्थ**' समजावा. असे हे संशयाचे चार प्रकार आहेत.

शत्रूच्या मित्राला हा लाभ प्रोत्साहन देणारा आहे किंवा नाहीं असा संशय उत्पन्न झाला, म्हणजे तो पहिल्या प्रकारचा संशयित अर्थ समजावा. द्रव्य व बहुमान देऊन शत्रूचें सैन्य आपल्या मदतीस बोलावणें हानिकारक आहे कां नाहीं हा दुसऱ्या प्रकारचा 'संशयित अनर्थ' होय. प्रबल शेजाऱ्यांचा प्रांत काबीज करणें बरें कां वाईट असा प्रश्न उद्भवणें हा तिसऱ्या प्रकारचा 'अर्थानर्थ संशय' होय आणि प्रबल राजाबरोबर दोस्ती करून लाभ मिळवावा कां नाहीं हा चवथ्या प्रकारचा अनर्थार्थ संशय होय. या संशयांचा निरास करून ज्यांत अनर्थ नसेल त्या कार्याला हात घालावा.

परिणामाच्या दृष्टीनें आणखी सहा प्रकार होतात. ते असे— ( १ ) ज्या लाभापासून नवीन लाभाची उत्पत्ति होते तो **अर्थानुबंध** अर्थ ( २ ) ज्या लाभापासून पुढें लाभहानि कांहीं नाहीं तो **निरनुबंध** अर्थ ( ३ ) ज्या लाभापासून अनर्थाचा उद्भव होतो तो **अनर्थानुबंध** अर्थ ( ४ ) ज्या हानीपासून पुढें लाभ होतो तो **अर्थानुबंध** अनर्थ ( ५ ) ज्या हानीपासून पुढें लाभहानि कांहीं नाहीं तो **निरनुबंध** अनर्थ आणि ( ६ ) ज्या हानी पासून पुढें हानीच होणार तो **अनर्थानुबंध** अनर्थ होय. याची क्रमवार उदाहरणें:—

अघाडीच्या शत्रूचा नाश केल्यानें पिछाडीच्या शत्रूचा नाश करतां आला तर तो **अर्थानुबंध** अर्थ झाला, असें म्हणावें.

परस्यान्तरुच्छेदनमर्थोऽनर्थानुबन्धः ।
शत्रुप्रतिवेशस्यानुग्रहः कोशदण्डाभ्यामनर्थोऽर्थानुबन्धः ।
हीनशक्तिमुत्साह्य निवृत्तिरनर्थो निरनुबन्धः ।
ज्यायांसमुत्थाप्य निवृत्तिरनर्थोऽनर्थानुबन्धः ।
तस्य पूर्वः पूर्वः श्रेयानुपसम्प्राप्तुम् । इति कार्यावस्थापनम् ।
समन्ततो युगपदर्थोत्पत्तिः समन्ततोर्थापद् भवति ।
सैव पार्ष्णिग्राहविगृहीता समन्ततोर्थसंशयापद् भवति ।
तयोर्मित्राक्रन्दोपग्रहात् सिद्धिः ।
समन्ततः शत्रुभ्यो भयोत्पत्तिः समन्ततोनर्थापद् भवति ।
सैव मित्रविगृहीता समन्ततोनर्थसंशयापद् भवति ।
तयोश्चलामित्राक्रन्दोपग्रहाद् सिद्धिः । परमिश्राप्रतीकारो वा ।

इतो लाभ इतरतो लाभ इत्युभयतोर्थापद् भवति । तस्यां समन्ततोर्थायां च लाभगुणयुक्तमर्थमादातुं यायात् । तुल्ये लाभगुणे प्रधानमासन्नमनतिपातिनम्, ऊनो वा येन भवेत् तम्, आदातुं यायात् ।

---

तटस्थ राजास सैन्याची मदत करून मिळविलेला जो लाभ, तो **निरनुबंध** अर्थ होय.

शत्रूच्या व आपल्या मधला जो अंतर्धि त्याचा नाश करून मिळविलेला अर्थ, तो **अनर्थानुबंध** अर्थ होय.

शत्रूच्या शेजाऱ्यास द्रव्य व सैन्य पुरवून नुकसान सोसलें, तरी तो **अर्थानुबंध** अनर्थ होय.

कमकुवत राजास चिडवून गप्प बसल्यास, हें नुकसान **निरनुबंध** अनर्थ समजावें.

बलाढ्य राजास चिडवून गप्प बसल्यास, हें नुकसान **अनर्थानुबंध** अनर्थ म्हणावें.

या सहा प्रकारांतील इष्टानिष्टता वरील अनुक्रमानुसारच आहे हें जाणून जें इष्ट आहे त्याचाच अवलंब करावा. अशीही कार्यारंभाची व्यवस्था सांगितली आहे.

सर्व बाजूंनीं एकदम लाभ देणारी परिस्थिति असेल तेव्हां ती '**समन्ततोऽर्थापद्**' समजावी.

परंतु सर्व बाजूंनीं अर्थ उत्पन्न होण्यास पिछाडीचा राजा विघ्न करीत असेल, तेव्हां ती '**अर्थसंशयापद्**' समजावी.

अशा उभयप्रसंगीं मित्राची व मित्राच्या मित्राची मदत घेऊन अर्थप्राप्ति करून घेतां येते.

सर्वच बाजूंनीं शत्रूंचें काहूर उठल्यास ती '**समन्ततोऽनर्थापद्**' होय.

असा प्रसंग निवारण्यास मित्रानें मदत केली, म्हणजे ती '**अनर्थ संशयापद्**' होय.

अशा संशयात्मक भयंकर अनर्थाच्या प्रसंगीं भुरट्या शत्रूची व पिछाडीच्या शत्रूच्या शत्रूची मदत घेऊन कार्यसिद्धि करतां येते. परामिश्र संकटाचा प्रतीकार कसा करावा हें मागील एका प्रकरणांत सांगितलें आहे त्या वरूनहि याचा प्रतीकार लक्ष्यांत येईल.

या दिशेनें लाभ व्हावयाचा आहे, व त्याहि दिशेनें लाभ व्हावयाचा आहे असें असेल तेव्हां त्यांस '**उभयतोऽर्थापद्** म्हणतात.

अशा उभयविध किंवा सार्वत्रिक लाभास्तव स्वारी करितांना ज्यापासून अधिक लाभ अथवा अर्थ निष्पन्न होईल तिकडे मोर्चा फिरवावा. दोनहि लाभ एकाच जातीचे असतील, तेव्हां जो लाभ अत्यंत डोळ्यांत भरण्यासारखा नजीकचा, खात्रीचा व जो प्राप्त करून न घेतल्यास आपल्यास कमीपणा येईल तो प्राप्त करण्याकरितां स्वारी करावी.

इतोऽनर्थ इतरतोऽनर्थ इत्युभयतोऽनर्थापत्। तस्यां समन्ततोऽनर्थायां च मित्रेभ्यः सिद्धिं लिप्सेत। मित्राभावे प्रकृतीनां लघीयस्यैकतोनर्थां साधयेत् । उभयतोनर्थां ज्यायस्या। समन्ततोनर्थां मूलेन प्रतिकुर्यात् । अशक्ये सर्वमुत्सृज्यापगच्छेत् । दृष्टा हि जीवता पुनरावृत्तिः, यथा सुयात्रोदयनाभ्याम्।

इतो लाभ इतरतो राज्याभिमर्श इत्युभयतोर्थानर्थापद् भवति । तस्यामनर्थसाधको योऽर्थः तमादातुं यायात्; अन्यथा हि राज्याभिमर्शं वारयेत् । एतया समन्ततोर्थानर्थापद् व्याख्याता ।

इतोऽनर्थ इतरतोऽर्थसंशय इत्युभयतोनर्थार्थसंशया । तस्यां पूर्वमनर्थं साधयेत्, तत्सिद्धावर्थसंशयम्। एतया समन्ततोनर्थार्थसंशया व्याख्याता । इतोऽर्थ इतरतोऽनर्थसंशय इत्युभयतोर्थानर्थसंशयापत् । एतया समन्ततोर्थानर्थसंशया व्याख्याता।

तस्यां पूर्वां पूर्वां प्रकृतीनामनर्थसंशयान्मोक्षयितुं यतेत । श्रेयो हि मित्रमनर्थसंशये तिष्ठन्न दण्डः, दण्डो वा न कोश इति।

समग्रमोक्षणाभावे प्रकृतीनामवयवान् मोक्षयितुं यतेत । तत्र पुरुषप्रकृतीनां च बहुलमनुरक्तं

---

या दिशेनें अनर्थ उद्भवेल व त्याहि दिशेनें अनर्थ उद्भवेल, अशी जी परिस्थिति ती 'उभयतोऽनर्थापद्' होय अशा प्रसंगीं व सार्वत्रिक अनर्थांच्या प्रसंगीं मित्रांच्या साहाय्यानें कार्यसिद्धि करून घ्यावी. मित्र नसेल, तेव्हां लहानसा प्रांत सोडून देऊन एका बाजूनें उद्भवलेला अनर्थ पार पाडावा; अधिक उत्पन्नाचा प्रांत सोडून देऊन दोन बाजूंनीं उद्भवलेल्या अनर्थांतून पार पडावें; आणि सर्वच बाजूंनीं अनर्थ कोसळल्यास राजधानी सोडून देऊन अनर्थ दूर करावे. एवढ्यानेंहि न भागल्यास सगळें राज्य सोडून निघून जावें; कारण 'शीर सलामत तर पगडी पचास' उदाहरणार्थ—सुयात्र (म्हणजे नल) व उदयन यांनीं राज्यत्याग करून संकट टाळलें आणि मागाहून आपलें राज्य परत मिळविलें.

एका बाजूनें लाभ व्हावयाचा आहे, व दुसऱ्या बाजूनें राज्यावर हल्ला यावयाचा आहे असें असेल, तेव्हां अर्थ व अनर्थ यांनीं मिश्रित परिस्थिति उत्पन्न होते. अशा प्रसंगीं लाभापासून अनर्थाचें निवारण व्हावयासारखें असेल, तरच तो प्राप्त करण्याकरितां स्वारी काढावी; नाहींतर राज्यावरील हल्ला परतविण्याच्या कामास लागावें. सर्व बाजूंनीं अर्थ व अनर्थ यांहीं मिश्रित परिस्थिति उद्भवल्यासहि असेंच वागावें.

एका बाजूनें अनर्थ किंवा नाश व दुसऱ्या बाजूनें संशयात्मक लाभ व्हावयाचा असेल, तेव्हां अगोदर अनर्थांचें निवारण करावें, व त्याचें निवारण झाल्यावर संशयात्मक लाभ प्राप्त करून घेण्याच्या नादास लागावें. सर्व बाजूंनीं अनर्थ व संशयात्मक अर्थ, अशा परिस्थितींतहि वरील धोरणच स्वीकारावें. एकीकडे लाभ व दुसरीकडे संशयास्पद अनर्थ असेल ती 'उभयतोऽर्थानर्थसंशयदायी' स्थिति होय. 'समन्ततोऽर्थानर्थसंशयदायी' परिस्थितीचाहि यांत विचार आला.

राजानें आपल्या राज्याच्या निरनिराळ्या आंगांत जे संशयात्मक अनर्थ असतील ते प्रकृतींच्या परिगणनेंतील क्रमानें निवारण करावे; संशयात्मक अनर्थाच्या प्रसंगीं सैन्यापेक्षां मित्राकडे दुर्लक्ष केलें असतां चालेल; त्याच प्रमाणें सैन्याकडे दुर्लक्ष केलें असतां चालेल, पण तिजोरीकडे दुर्लक्ष करतां कामा नये.

राज्याच्या सर्व आंगांवर विघ्नें आलीं असून कोणत्याहि एका आंगाचा पूर्ण बचाव करणें अशक्य असेल, तर कांहीं भागापुरतीं तरी संकटें निवारण्याची खटपट करावी. उदाहरणार्थ, प्रजाजन बिथरले असतां

वा तीक्ष्णलुब्धवर्जम् । द्रव्यप्रकृतीनां सारं महोपकारं वा । संन्धिनासनेन द्वैधीभावेन वा लघूनि विपर्ययैर्गुरूणि ।

क्षयस्थानवृद्धीनां चोत्तरोत्तरं लिप्सेत। प्रातिलोम्येन वा क्षयादीनाम् आयत्यां विशेषं पश्येत्। इति देशावस्थापनम् ।

एतेन यात्रादिमध्यान्तेष्वर्थानर्थसंशयानामुपसंप्राप्तिर्व्याख्याता ।

निरन्तरयोगित्वाच्चार्थानर्थसंशयानां यात्रादावर्थः श्रेयानुपसम्प्राप्तुं पार्ष्णिग्राहासारप्रतिघाते क्षयव्ययप्रवासप्रत्यादेयमूलरक्षणेषु च भवति । तथानर्थः संशयो वा स्वभूमिष्ठस्य विषह्यो भवति ।

एतेन यात्रामध्येऽर्थानर्थसंशयानामुपसम्प्राप्तिर्व्याख्याता ।

यात्रान्ते तु कर्शनीयमुच्छेदनीयं वा कर्शयित्वोच्छिद्य वार्थः श्रेयानुपसम्प्राप्तुं नानर्थः संशयो वा पराबाधभयात् ।

सामवायिकानामपुरोगस्य तु यात्रामध्यान्तगोऽनर्थः संशयो वा श्रेयानुपसम्प्राप्तुमनिबन्धगामित्वात् ।

---

प्रजाजनांपैकीं गुंड व लोभी लोकांना सोडून बहुजन समाजाला व राजनिष्ठ लोकांना अनुकूल करून घ्यावें. संपत्तीच्या बाबतींत जेवढें म्हणून अत्यंत मूल्यवान व उपयुक्त असेल तेवढें तरी वांचवावें. किरकोळ शत्रूंना सलोख्यानें, तटस्थ वृत्तीनें अथवा दुटप्पी धोरणानें वश करून घ्यावें. जे शत्रु प्रबळ असतील त्यांना इतर उपायांनीं वश करावें.

अपकर्ष, गतिराहित्य आणि उत्कर्ष यांतील पुढील गति तत्पूर्वींच्यापेक्षां श्रेयस्कर असल्यानें ती प्राप्त करून घेण्याची इच्छा धरावी. याच्या उलट क्रम स्वीकारल्यास पुढील काळांत अधिक फायदा होईल असें वाटत असेल, तर विरुद्धक्रमहि स्वीकारावा.

ह्याप्रमाणें देशाचा विचार झाला.

स्वारीच्या ऐनरंगांत किंवा शेवटीं अर्थ व अनर्थ यांहीं अनिश्चित अशी परिस्थिति उत्पन्न होईल तेव्हांहि वरील धोरण अंगीकारावें.

ज्या अर्थीं स्वारीमध्यें संशयात्मकअर्थ व संशयात्मक अनर्थ वारंवार उपस्थित होतात, त्याअर्थीं युद्धाच्या पूर्वीं कोशसंग्रह करणें श्रेयस्कर आहे. कारण तेणेंकरून पिछाडीचा शत्रु व त्याचे दोस्त यांना हाणून पाडतां येतें, युद्धाचा खर्च व मनुष्यहानि भरून काढतां यते; दूरचा प्रवास करण्याकरितां लागणारा सांठा करून ठेवतां येतो, देणें परत देतां येत व राजधानीचें रक्षण करतां येतें. उलटपक्षीं कोशसंग्रह नसला किंवा संशयित असला म्हणजे राज्यांत राहून देखील राज्यावरील संकट असह्य होतें.

स्वारीच्या ऐन रंगांत संशयात्मक अनर्थाची किंवा अर्थाची स्थिति उद्भवल्यास, हेंच धोरण पत्करावें.

स्वारीच्या शेवटीं, ज्या शत्रूस जर्जर करावयाचें असेल, अथवा उखडून टाकावयाचें असेल, त्यास जर्जर करून व उखडून टाकून आपला निश्चित फायदा साधणेंच अधिक श्रेयस्कर म्हटलें पाहिजे; अनर्थाची किंवा संशयाची परिस्थिति कायम ठेवणें बरें नव्हे; कारण अशा स्थितींत शत्रूपासून उपद्रव होण्याचें भय असतें.

जो राजा संयुक्त राजांचा पुढारी नसेल त्यानें स्वारीच्या ऐन रंगांत किंवा शेवटीं शेवटीं संशयात्मक अर्थाच्या अथवा अनर्थाच्या प्रतीकारार्थ यत्न करणें श्रेयस्कर होय, कारण स्वारी चालू ठेवण्याची जबाबदारी त्यावर नसते.

अर्थो धर्मः काम इत्यर्थत्रिवर्गः। तस्य पूर्वः पूर्वः श्रेयानुपसम्प्राप्तुम्।

अनर्थोऽधर्मः शोक इत्यनर्थत्रिवर्गः। तस्य पूर्वः पूर्वः श्रेयान् प्रतिकर्तुम्।

अर्थोऽनर्थ इति, धर्मोऽधर्म इति, कामः शोक इति, संशयत्रिवर्गः। तस्योत्तरपक्षसिद्धौ पूर्वपक्षः श्रेयानुपसम्प्राप्तुम्।

इति कालावस्थापनम्। इत्यापदः।

तासां सिद्धिः पुत्रभ्रातृबन्धुषु सामदानाभ्यां सिद्धिरनुरूपा, पौरजानपददण्डमुख्येषु दानभेदाभ्यां, सामन्ताटविकेषु भेददण्डाभ्याम्।

एषानुलोमा विपर्यये प्रतिलोमा। मित्रामित्रेषु व्यामिश्रा सिद्धिः। परस्परसाधका ह्युपायाः।

शत्रोः शङ्कितामात्येषु सान्त्वं प्रयुक्तं शेषप्रयोगं निवर्तयति; दूष्यामात्येषु दानम्। सङ्घातेषु भेदः; शक्तिमत्सु दण्ड इति।

गुरुलाघवयोगाच्चापदां नियोगविकल्पसमुच्चया भवन्ति। 'अनेनैवोपायेन नान्येन' इति नियोगः। 'अनेन वान्येन वा' इति विकल्पः। 'अनेनान्येन च' इति समुच्चयः।

---

अर्थ, धर्म व काम असे पुरुषार्थांचे तीन प्रकार होत. यांत पहिला दुसऱ्यापेक्षां व दुसरा तिसऱ्यापेक्षां अधिक इष्ट, म्हणून तो आधीं प्राप्त करून घ्यावा.

अनर्थ, अधर्म व दुःख, हे अनर्थांचे तीन प्रकार होत.

यांत पहिला दुसऱ्यापेक्षां व दुसरा तिसऱ्यापेक्षां अधिक तापदायक, म्हणून तो अगोदर दूर करावा.

अर्थ कीं अनर्थ, धर्म कीं अधर्म, सुख कीं दुःख असे संशयाचे तीन प्रकार होत. यांत तिसऱ्यापेक्षां दुसऱ्याविषयीं व दुसऱ्यापेक्षां पहिल्याविषयीं अगोदर विचार करणें बरें.

हा कालाच्या दृष्टीनें विचार झाला. आणि येथें संकटांचें वर्गीकरणहि संपलें.

आलेलीं संकटें कशीं निवारावीं हें आतां सांगतों—मुलगा, भाऊ किंवा आप्तसंबंधी, यापासून विघ्न आल्यास, सामोपचारानें व दानानें त्याचें निवारण करावें. शहरांतील किंवा खेड्यापाड्यांतील लोकांपासून, किंवा सैन्यावरील अधिकाऱ्यांपासून विघ्न उद्भवल्यास, त्यांस देणगी देऊन किंवा त्यांत फूट पाडून तें दूर करावें. शेजारील राजापासून किंवा रानटी लोकांपासून विघ्न आल्यास, फूट पाडून किंवा स्वारी करून तें निवारावें.

हें राजनीतीचें सामान्य धोरण होय; विशेष बिकट परिस्थितींत निराळें धोरण पत्करावें.

मित्र आणि शत्रु यांचें संमिश्रण झालें असून त्यांविरुद्ध यश मिळवावयाचें झाल्यास मिश्र उपाय योजावे. सामान्यतः देखील हे सगळे उपाय परस्परांस पोषक असेच असतात. केवळ एकच एक उपाय यशस्वी होत नाहीं.

संशयास्पद अमात्याविरुद्ध सामोपचाराचा उपाय योजावा; त्यास इतर उपायांची जरूरी नसते. फितुर होऊं शकणाऱ्या अमात्याविरुद्ध दानाचा प्रयोग चांगला. संयुक्त राजाविरुद्ध भेदाचा आणि बलाढ्य लोकांविरुद्ध लढाईचा उपाय योजणें प्रशस्त होय.

एकाच वेळीं कांहीं मोठीं व कांहीं लहान अशी संकटें उद्भवल्यास निश्चयात्मक, वैकल्पिक व सामुदायिक उपाय योजावे लागतात.

"याच उपायानें कार्यसिद्धि होईल, दुसऱ्यानें होणार नाहीं," यास निश्चयात्मक उपाय म्हणावे; "यानें होईल किंवा दुसऱ्यानें होईल" यास वैकल्पिक आणि "यानें व दुसऱ्यानें मिळून होईल," यास समुच्चयात्मक उपाय म्हणावे.

तेषामेकयोगाश्चत्वारस्त्रियोगाश्च; द्वियोगाः षट्; एकश्चतुर्योग इति पञ्चदशोपायाः । तावन्तः प्रतिलोमाः ।

तेषामेकेनोपायेन सिद्धिरेकसिद्धिः, द्वाभ्यां द्विसिद्धिः, त्रिभिस्त्रिसिद्धिः, चतुर्भिश्चतुस्सिद्धिरिति।

धर्ममूलत्वात् कामफलत्वाच्चार्थस्य धर्मार्थकामानुबन्धा यार्थस्य सिद्धिः, सा सर्वार्थसिद्धिः ।

इति सिद्धयः ।

दैवादग्निरुदकं व्याधिः प्रमारो विद्रवो दुर्भिक्षमासुरीसृष्टिः इत्यापदः ।

तासां दैवतब्राह्मणप्रणिपाततः सिद्धिः ।

अवृष्टिरतिवृष्टिर्वा सृष्टिर्वा यासुरी भवेत् । तस्यामाथर्वणं कर्म सिद्धारम्भाश्च सिद्धयः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रेऽभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे सप्तमोऽध्यायः अर्थानर्थसंशययुक्तास्तासामुपाय-विकल्पजाः सिद्धयश्च, आदितोऽष्टाविंशतिशततमः ॥

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य अभियास्यत्कर्म नवममधिकरणं समाप्तम् ॥

---

यांतील एकेकटा उपाय असे चार प्रकार होतात, कोणत्याहि तीन उपायांचा संयोग मिळून चार प्रकार होतात; कोणत्याहि दोन उपायांचा संयोग मिळून सहा प्रकार होतात; आणि चारहि उपायांचा संयोग मिळून एक प्रकार होतो. असे पंधरा प्रकारचे उपाय निष्पन्न होतात. व्यतिरेकानेंहि इतकेच प्रकार होतात.

जो राजा यांतील एकच उपाय योजून यश मिळवितो, तो एकसिद्धि होय; दोन योजून सिद्धि मिळवितो तो द्विसिद्धि, तीन योजून सिद्धिं मिळवितो तो त्रिसिद्धि व चारहि योजून सिद्धि मिळवितो तो चतुःसिद्धि होय.

धर्म हें अर्थाचें अथवा संपत्तीचें मूळ; आणि काम अथवा सुखोपभोग हें अर्थाचें फळ आहे; म्हणून धर्म, अर्थ व सुखोपभोग वृद्धिंगत करणारा अर्थ प्राप्त करून घेण्यांत आलेल्या यशास ‘ सर्वार्थसिद्धि ’ असें म्हणतात.

असे सिद्धींचे प्रकार आहेत.

दैवापासून येणाऱ्या आपत्ति म्हटल्या म्हणजे आग, पूर, रोगराई, पटकी, ज्वालामुखीचा स्फोट, दुष्काळ व आसुरी पीडा या होत.

त्या निवारण्याचा उपाय देवब्राह्मणांस वंदन करणें हा होय.

अवर्षण, अतिवृष्टि आणि टोळ-मूषकादिकांच्या उत्पात्तिरूपी आसुरी सृष्टि या पीडा होत. त्या निवारण्यासाठीं अथर्ववेदांत सांगितलेलीं किंवा सिद्ध पुरुषांनीं सांगितलेलीं शांतिकर्मे आचरावीं.



# सांग्रामिकं—दशममधिकरणम् ।

## अध्याय १२९ स्कन्धावारनिवेशः ।

वास्तुकप्रशस्ते वास्तुनि नायकवर्धकिमौहूर्तिकाः स्कन्धावारं वृत्तं दीर्घं चतुरश्रं वा, भूमिवशेन वा, चतुर्द्वारं षट्पथं नवसंस्थानं मापयेयुः । खातवप्रसालद्वाराट्टालकसम्पन्नं भये स्थाने च ।

मध्यमस्योत्तरे नवभागे राजवास्तुकं धनुश्शतायाममर्धविस्तारं, पश्चिमार्धे तस्यान्तःपुरम् । अन्तर्वंशिकसैन्यं चान्ते निविशेत । पुरस्तादुपस्थानं, दक्षिणतः कोशशासनकार्यकरणानि, वामतो राजौपवाह्यानां हस्त्यश्वरथानां स्थानम् । अतो धनुश्शतान्तराश्चत्वारः शकटमेथीप्रततिस्तम्भसालपरिक्षेपाः । प्रथमे पुरस्तान्मन्त्रिपुरोहितौ, दक्षिणतः कोष्ठागारं महानसं च, वामतः कुप्यायुधागारम् । द्वितीये मौलभृतानां स्थानम् अश्वरथानां, सेनापतेश्च । तृतीये हस्तिनः श्रेण्यः प्रशास्ता च । चतुर्थे विष्टिर्नायको मित्रामित्राटवीबलं स्वपुरुषाधिष्ठितम् । वणिजो रूपाजीवाश्चानुमहापथम् । बाह्यतः लुब्धकश्वगणिनः सतूर्याग्नयः गूढाश्चाररक्षाः ।

शत्रूणामापाते कूपकूटावपातकण्टकिनीश्च स्थापयेत् । अष्टादशवर्गाणामारक्षाविपर्यासं कारयेत् । दिवायामं च कारयेदपसर्पज्ञानार्थम् । विवादसौरिकसमाजद्यूतवारणं च कारयेत् । मुद्रारक्षणं च ।

---

# अधिकरण १० वें. युद्धाविषयीं

## अध्याय १२९ लष्करी छावणी

वास्तुशास्त्रानें पसंत केलेल्या भू-भागावर सेनापति, सुतार व ज्योतिषी यांनीं सैन्याची छावणी वाटोळी, लांबोडी किंवा चौकोनी अथवा जागा असेल त्या मानानें आणि चार द्वारें, सहा रस्ते व नऊ विभाग पाडितां येतील अशाप्रकारें आंखावी. तिच्या भोंवती खंदक, बुरुज, तट, वेशी आणि पाहऱ्याच्या उंच जागा भीतीच्या जागीं व योग्यस्थळीं असाव्या.

नऊ विभागांपैकीं एका विभागांत मधील विभागाच्या उत्तरेस राजाकरितां शंभर धनु लांब व पन्नास धनु रुंद अशी जागा तयार करावी; राजाच्या छावणीच्या पश्चिमेस जनानखाना व त्यापलीकडे जनानखान्याचें सैन्य ठेवावें; समोर देवडी; उजवीकडे फडनवीस व मुलकी कचेऱ्या; डावीकडे राजाचे खास हत्ती घोडे व रथ यांकरितां तबेले; त्या पलीकडे शंभर शंभर धनूंच्या अंतरानें पहिला गाड्यांचा, दुसरा कांटेरी झुडपांचा, तिसरा लांकडी खांबांचा व चवथा मातीचा असे चार कोट करावे. पहिल्या विभागांत समोरील बाजूस मुख्य प्रधान व पुरोहित, उजव्या बाजूस कोठार व स्वयंपाकघर, व डाव्या बाजूस मालाचें कोठार व शस्त्रगृह असावें. दुसऱ्या विभागांत परंपरागत अथवा पिढीजाद सैन्याच्या बराकी, सेनापतीचें स्थान व गाड्याघोड्यांचे तबेले. त्या बाहेर तिसऱ्या भागांत हत्तींच्या गजशाळा व गुप्तपोलिसांच्या मुख्याची कचेरी असावी. चौथ्या भागांत लष्करांतील मजूर व त्यांचे मेस्त्री, आपल्या अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं असलेलें मित्रांचें, अमित्रांचें व रानटी सैन्य असावें. रस्त्याच्या दोनहि बाजूंला वाणी व कलावंतिणी ( ? ) यांचीं दुकानें असावीं. त्याच्या पलीकडे शिकारीलोक व त्यांचे कुत्रे, बिगुलवाले, आगवाले आणि हेरांवर देखरेख ठेवणारे गुप्त हेर असावे.

शत्रू ज्या मार्गानें येण्याचा संभव असेल त्या मार्गावर आड, गुप्त विहिरी, आंत कांटे असलेले गुप्त खळगे असावे. अठरा कारखान्यांवरील पहारे वरचेवर बदलावे. भलताच मनुष्य छावणींत आल्यास कळावें म्हणून दिवसा येण्याजाण्यास खुणेचा शब्द ( परवल ) ठरवावा. कलह, सुरापान, संमेलनें व द्यूत यांना बंदी असावी. परवान्याविना कोणी जाऊं येऊं नये.

सेनानिवृत्तमायुधीयमशासनं शून्यपालोऽनुबध्नीयात् ॥

पुरस्तादध्वनः सम्यक् प्रशास्ता रक्षणानि च । यायाद् वर्धकिविष्टिभ्यामुदकानि च कारयेत् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे सांग्रामिके दशमेऽधिकरणे प्रथमोऽध्यायः स्कन्धावारनिवेशः । आदितः एकोनत्रिंशच्छततमः ॥

---

## अध्याय १३०—स्कन्धावारप्रयाणं बलव्यसनावस्कन्दकालरक्षणं च ।



ग्रामारण्यानामध्वनि निवेशान् यवसेन्धनोदकवशेन परिसङ्ख्याय स्थानासनगमनकालं च यात्रां यायात् । तत्प्रतीकाराद्द्विगुणं भक्तोपकरणं वाहयेत् । अशक्तो वा सैन्येष्वायोजयेत् । अन्तरेषु वा निचिनुयात् ।

पुरस्तान्नायकः । मध्ये कलत्रं स्वामी च । पार्श्वयोरश्वा बाहूत्सारः । चक्रान्तेषु हस्तिनः । प्रसारवृद्धिर्वा सर्वतः । वनाजीवः प्रसारः । स्वदेशादन्वायतिर्वीवधः, मित्रबलमासारः, कलत्रस्थानमपसारः । पश्चात् सेनापतिः पर्यायान्निविशेत ।

पुरस्ताद् अभ्याघाते मकरेण यायात्, पश्चाच्छकटेन, पार्श्वयोर्वज्रेण, समन्ततः सर्वतोभद्रेण, एकायने सूच्या ।

---

सैन्य छावणीबाहेर लढाईस गेलें असतां जो शिपाई परवान्याशिवाय छावणींत परत येईल त्याला रिकाम्या छावणीवरील अधिकाऱ्यानें अटक करावी.

सैन्याचें कूच होण्याच्या आधीं सैन्याची व्यवस्था पाहणाऱ्या बिनीवरील अधिकाऱ्यानें आपल्याबरोबर नोकर सुतार व वेठीस धरलेले लोक घेऊन पुढें जावें आणि बंदोबस्ताची व पाण्याची सोय करून ठेवावी.

---

### सैन्याचें कूच, संकटप्रसंगीं व हल्ल्याच्या प्रसंगीं रक्षणाचे उपाय.

स्वारीवर निघतांना वाटेंत ज्या गांवांत अथवा रानांत मुक्काम करावा लागेल, तेथें जनावरांच्या चारापाण्याची इतरांच्या जळणाची व पाण्याची सोय आहे असें पाहून मुक्काम किंवा कूच करण्याचा कार्यक्रम ठरवावा; तशी सोय नसल्यास अडचण पडूं नये म्हणून धान्य व इतर सामग्री दोन मुक्कामांची बरोबर घेऊन ठेवावी; सामग्री वाहून नेण्यास दुसरीं साधनें नसल्यास, ती सैनिकांकरवीं वाहून नेण्याची तजवीज करावी; अथवा मधील मुक्कामांच्या जागीं तिचा सांठा करून ठेवावा.

अघाडीस नायक, मध्यभागीं जनानखाना व राजा, दोन बाजूंस घोडे व शरीररक्षक, सैन्यमंडलाच्या सभोंवतीं हत्ती व फालतू सैन्य, आणि सर्व बाजूंनीं रानावनांत राहणारे फालतू लोक अशी रचना असावी. कही, खजिना, मित्रराजाचें सैन्य व त्याच्या दोस्ताचें सैन्य आणि जनानखाना यांनीं मात्र सुरक्षित मार्गानेंच जावें. सेनापतीनें सर्वांच्या मागून निघावें व पिछाडीस असावें.

वाटेंत हल्ल्याची भीति असल्यास, सैन्याची मकराकार मांडणी करून कूच करावें; पिछाडीकडून भीति असल्यास शकटाकार, दोनहि बाजूकडून भीति असल्यास वज्राकार व सर्व बाजूंनीं भीति असल्यास सर्वतोभद्र—अशी व्यूह—मांडणी करावी. एकच मनुष्य जाण्यापुरती वाट असेल, तेव्हां सुईच्या आकाराची व्यूह मांडणी करावी.

पथिद्वैधीभावे स्वभूमितो यायात्। अभूमिष्ठानां हि स्वभूमिष्ठा युद्धे प्रतिलोमा भवन्ति । योजनमधमा, अध्यर्धं मध्यमा, द्वियोजनमुत्तमा, संभाव्या वा गतिः।

आश्रयकारी, सम्पन्नघाती, पार्ष्णिरासारो मध्यम उदासीनो वा प्रतिकर्तव्यः, सङ्कटो मार्गः शोधयितव्यः, कोशो दण्डो मित्रामित्राटवीबलं वृष्टिः ऋतुर्वा प्रतीक्ष्याः। कृतदुर्गकर्मनिचयरक्षाक्षयः क्रीतबलनिर्वेदो मित्रबलनिर्वेदश्चागमिष्यति, उपजपितारो वा नातित्वरयन्ति, शत्रुरभिप्रायं वा पूरयिष्यति इति शनैर्यायात्। विपर्यये शीघ्रम्।

हस्तिस्तम्भसङ्क्रमसेतुबन्धनौकाष्ठवेणुसङ्घातैः, अलाबुचर्मकरण्डदृतिप्लवगण्डिकावेणिकाभिश्चोदकानि तारयेत्।

तीर्थाभिग्रहे हस्त्यश्वैरन्यतो रात्रावुत्तार्य सत्रं गृह्णीयात्।

अनुदके चक्रिचतुष्पदं चाध्वप्रमाणेन शक्त्योदकं वाहयेत्।

दीर्घकान्तारमनुदकं यवसेन्धनोदकहीनं वा कृच्छ्राध्वानमभियोगप्रस्कन्नं क्षुत्पिपासाध्वक्लान्तं पङ्कतोयगभीराणां वा नदीदरीशैलानामुद्यानापयाने व्यासक्तम् एकायनमार्गे शैलविषमे सङ्कटे वा बहुलीभूतं निवेशे प्रस्थिते विसन्नाहं भोजनव्यासक्तम् आयतगतपरिश्रान्तमवसुप्तं व्याधिमरकदुर्भिक्षपीडितं व्याधितपत्त्यश्वद्विपमभूमिष्ठं वा बलव्यसनेषु वा स्वसैन्यं रक्षेत्। परसैन्यं चाभिहन्यात्।

---

दोन वाटा असून त्यांतली एकवाट आपल्या देशांतून जात असल्यास परदेशांतून जाणाऱ्या वाटेनें जाऊं नये; कारण परदेशांतून जाणाऱ्यावर स्वदेशांतून चाल करणारे लोक सरशी करूं शकतात. कनिष्ठ सैन्य एक योजन, मध्यम दीड योजन व उत्तम दोन योजन प्रवास करूं शकतें, यावरून रोजच्या टप्प्याची सामान्य कल्पना येईल.

पिछाडीचा शत्रुराजा व त्याचा मित्र, मध्यम व तटस्थ राजा यांपैकीं कोणी शत्रूला साहाय्य करावयास व आपल्यावर हल्ला करावयास आला, तर त्याचा बंदोबस्त करावा. वाटेंतील अडथळे नाहींसे करावे; खजिना, सैन्य व मित्र यांचें काळजीनें रक्षण करावें; आपल्या मदतीस आलेलें शत्रूचें सैन्य व रानटी लोकांचें सैन्य, यांचाहि बचाव करावा; पाऊसपाणी, ऊन-वारा यांस जपावें. वरील कारणास्तव किंवा शत्रूचे किल्ले नादुरुस्त व बचावास निरुपयोगी झाले असतील, दाणागोटा संपत आला असेल, शत्रूचे भाडोत्री सैन्य व मित्रांचें सैन्य हातघाईस आलेलें असेल, कारस्थानी लोकांस बंडाळी उभारण्यास उशीर लागत असेल, किंवा शत्रु आपल्या मनोदयाप्रमाणें वागण्यास तयार होत असेल, तर आस्ते आस्ते कूच करावें, पण असें नसेल तर मात्र झपाट्यानें कूच केलें पाहिजे.

वाटेंत नदी आल्यास हत्ती, लांकडी हंगामी पूल, बांधीव पूल, होड्या, लांकडांचे किंवा वेळूचे तराफे, भोपळे, चामड्यानें मढविलेले टोकरे, चामडीबुधले, झाडांची खोडें व वेळूचीं खोडें—यांचा उपयोग करावा व नदीपार जावें.

नदी उतरतांना शत्रूकडून अडथळा आला तर, हत्ती व घोडे बरोबर घेऊन रात्रीच्या वेळीं दुसरीकडून नदी उतरून जावें आणि शत्रूवर अकस्मात् छापा घालावा.

वाटेंत लांब टप्प्यापर्यंत पाणी मिळेनासें असल्यास शक्य तितकें पाणी गाड्या व पखालीचीं जनावरें यावरून वाहून नेण्याची तजवीज करावी.

सैन्य जेव्हां चारा, लांकूडफांटा व पाणी मिळावयाचें नाहीं अशा एखाद्या अफाट व निर्जल अरण्यांतून कूच करीत असेल; अवघड रस्त्यानें चाललें असेल; शत्रूच्या उपद्रवानें त्रासलें असेल; तहानेनें, भुकेनें व प्रवासानें व्याकुळ झालें असेल; ज्यांत पुष्कळ चिखल व पाणी आहे, असा नदीकांठचा, दऱ्याखोऱ्याचा किंवा डोंगराळ प्रदेश मोठ्या कष्टानें चढत किंवा उतरत असेल; एकाच माणसापुरती जेथें वाट आहे, अशा अरुंद व अवघड डोंगरी रस्त्यानें गर्दी करून चालत असेल; मुक्कामांत किंवा कूच करतांना अंगांत चिलखत घातलेलें नसेल; भोजनास बसलेलें असेल; लांबच्या प्रवासामुळें थकून गेलें असेल; झोपेंत असेल; आजारानें, सांथीनें किंवा दुष्काळानें गांजलें असेल; पायदळ,

एकायनमार्गप्रयातस्य सेनानिश्चारग्रासाहारशय्याप्रस्ताराग्निनिधानध्वजायुधसङ्ख्यानेन परबलज्ञानम् । तदात्मनो गूहयेत् ॥

पार्वतं वनदुर्गं वा सापसारप्रतिग्रहम् । स्वभूमौ पृष्ठतः कृत्वा युध्येत निविशेत च ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे साङ्ग्रामिके दशमाधिकरणे द्वितीयोऽध्यायः । स्कन्धावारप्रयाणं, बलव्यसनावस्कन्दकालरक्षणं च आदितस्त्रिंशच्छततमः ॥

## अध्याय १३१—कूटयुद्धविकल्पाः, स्वसैन्योत्साहनं, स्वबलान्यबलव्यायोगश्च।



बलविशिष्टः कृतोपजापः प्रतिविहितर्तुः स्वभूम्यां प्रकाशयुद्धमुपेयात्; विपर्यये कूटयुद्धम् ।

बलव्यसनावस्कन्दकालेषु परमभिहन्यात् । अभूमिष्ठं वा स्वभूमिष्ठः । प्रकृतिप्रग्रहो वा स्वभूमिष्ठं दूष्यामित्राटवीबलैर्वा भङ्गं दत्त्वा विभूमिप्राप्तं हन्यात् । संहतानीकं हस्तिभिर्भेदयेत् ।

पूर्वं भङ्गप्रदानेनानुप्रलीनं भिन्नाभिन्नं प्रतिनिवृत्य हन्यात् । पुरस्तादभिहत्य प्रचलं विमुखं वा पृष्ठतो हस्त्यश्वेनाभिहन्यात् । पृष्ठतोऽभिहत्य प्रचलं विमुखं वा पुरस्तात् सारबलेनाभिहन्यात् । ताभ्यां पार्श्वाभिघातौ व्याख्यातौ ।

---

घोडेस्वार व हत्तीस्वार आजारी झाले असतील; युद्धाच्या हालचालीला अयोग्य अशास्थळीं राहिलें असेल, अथवा संकटांत असेल तेव्हां राजानें आपल्या सैन्याची काळजी घेतली पाहिजे. उलटपक्षीं शत्रूचें सैन्य अशा स्थितींत पाहिल्याबरोबर त्यावर मारा करावा.

शत्रु अगदीं अरुंद वाटेनें कूच करूं लागला म्हणजे त्याची अन्नसामग्री, चारापाणी, बाडबिछाना व इतर सामान किती आहे, अग्नियंत्रें, ध्वज, शस्त्रें वगैरे किती आहेत, हें सेनापतीनें मोजून शत्रूची शक्ति अजमासून पाहावी; पण आपली शक्ति मात्र त्यास कळूं देऊं नये.

युद्ध करावयाचें असेल, किंवा तळ द्यावयाचा असेल, तेव्हां पाठीमागें डोंगरी किल्ल्याचा किंवा पाणकिल्ल्याचा आधार पाहून ठेवावा, म्हणजे प्रसंगविशेषीं त्यांत आश्रय घेतां येईल किंवा तेथून आपल्याला कुमक मिळेल.

---

### कूट—युद्धाचे अथवा गनिमी लढाईचे प्रकार. आपल्या सैन्यास उत्तेजन. आपलें सैन्य व शत्रुसैन्य यांमधील लढाई.

आपलें सैन्य शत्रुसैन्याहून संख्येनें व गुणानें वरिष्ठ असेल, कारस्थान करून शत्रुसैन्यांत फितुरी केली असेल, युद्धाला योग्य काल असेल आणि युद्धाला अनुकूल असें क्षेत्र असेल, तर शत्रूला उघड उघड सामना द्यावा; उलट परिस्थितींत गनिमी काव्यानें लढावें.

शत्रूचें सैन्य संकटांत असेल किंवा नदीचा उतार ओलांडीत असेल, तेव्हां त्यावर हल्ला करावा; अथवा स्वतःला अनुकूल असें युद्धक्षेत्र पाहून, तेथून प्रतिकूल क्षेत्रांत असलेल्या शत्रूवर मारा करावा.

ज्याचें सैन्य अथवा प्रजाजन निरंतर हुकमतींत असतात अशा राजानें, आपला शत्रु अनुकूल क्षेत्रांत ठाण देऊन उभा आहे असें पाहिल्यास, शत्रूच्या राजद्रोही लोकांच्या किंवा रानटी बंडखोरांच्या टोळीकडून त्याजवर हल्ला करवून त्याचा मोड करवावा आणि मग शत्रु अनुकूल क्षेत्र सोडून प्रतिकूल क्षेत्रांत आला म्हणजे त्यावर आपण मारा करावा. शत्रूचें सगळें सैन्य एकत्र जमून राहिलें असेल, तेव्हां हत्तींच्या मदतीनें त्याची पांगापांग करावी.

हल्ला करणाऱ्यानें आपला पराजय झाला असें भासवून, शत्रु पाठलाग करून येऊं लागला म्हणजे मुख्य सैन्यापासून वेगळ्या झालेल्या त्याच्या सैन्यावर आपल्या संघटित सैन्यानें परत वळून मारा चालवावा. प्रथम शत्रूच्या

यतो वा दूष्यफल्गुबलं ततोऽभिहन्यात्। पुरस्ताद्विषमायां पृष्ठतोऽभिहन्यात्। पृष्ठतोविषमायां पुरस्तादभिहन्यात्। पार्श्वतोविषमायाम् इतरतोऽभिहन्यात्।

दूष्यामित्राटवीबलैर्वा पूर्वं योधयित्वा श्रान्तमश्रान्तः परमभिहन्यात्। दूष्यबलेन वा स्वयं भङ्गं दत्वा 'जितम्' इति विश्वस्तमविश्वस्तः सत्रापाश्रयोऽभिहन्यात्। सार्थव्रजस्कन्धावारसंवाहविलोपप्रमत्तमप्रमत्तोऽभिहन्यात्। फल्गुबलावच्छन्नः सारबलो वा परवीराननुप्रविश्य हन्यात्। गोग्रहणेन श्वापदवधेन वा परवीरानाकृष्य सत्रच्छन्नोऽभिहन्यात्।

रात्राववस्कन्देन जागरयित्वानिद्राक्लान्तानवसुप्तान् वा दिवा हन्यात्। सपादचर्मकोशैर्वा हस्तिभिः सौप्तिकं दद्यात्। अहस्सन्नाहपरिश्रान्तानपराह्णेऽभिहन्यात्। शुष्कचर्मवृत्तशर्कराकोशकैर्गोमहिषोष्ट्रयूथैर्वा त्रस्नुभिरकृतहस्त्यश्वं भिन्नमभिन्नः प्रतिनिवृत्तं हन्यात्। प्रतिसूर्यवातं वा सर्वमभिहन्यात्।

---

अघाडीवर मारा चालवावा; आणि शत्रूनें पळ काढिला किंवा तोंड फिरविलें म्हणजे घोडेस्वारांनीं व हत्तींनीं पिछाडीवर मारा करावा. किंवा आधीं पिछाडीवर मारा केल्यानें शत्रुसैन्य पळूं लागलें किंवा उलटलें तर आपल्या मुख्य सैन्यानिशीं त्याजवर मारा करून त्याचा मोड करावा. हेंच धोरण बगलेवरील हल्ल्यांनाहि लागू आहे.

शत्रूच्या सैन्यांत जें सैन्य फितूर होण्यासारखें किंवा बाजारबुणगें असेल, त्यावर आधीं हल्ला करावा. समोरून हल्ला करणें धोक्याचें असल्यास पिछाडीकडून, उलटपक्षीं अघाडीकडून चाल करावी. एका बगलेवर हल्ला करणें सोईचें नसल्यास दुसऱ्या बगलेवर हल्ला चढवावा.

अथवा, हल्ला करणाऱ्या राजानें अगोदर आपल्या शत्रूस आपल्या राज्यांतील राजद्रोही लोकांबरोबर व रानटी बंडखोरांबरोबर लढण्यांत गुंतवावें; मग तो लढाई करून करून थकला म्हणजे आपल्या ताज्या दमाच्या सैन्यानिशीं त्यावर हल्ला चढवावा. अथवा, हल्ला करणाऱ्या राजानें आपल्या सैन्यांतील राजद्रोही सैनिकांचा पराभव होऊं द्यावा आणि मग आपली फत्ते झाली अशा समजुतीनें शत्रु अगदीं निर्धास्त राहिला, म्हणजे हल्ला करणाऱ्या राजानें मोठ्या सावधगिरीनें दबा धरून शत्रूवर मारा करावा. अथवा शत्रूच्या सैन्यांतील सैनिक बाजार, गोधन, तंबूराहुट्या इत्यादि लूट वाहून नेण्यांत गर्क होऊन गेले म्हणजे हल्ला चढविणाऱ्या राजानें स्वतः सावधगिरीनें त्यावर मारा करावा. अथवा, आपलें सैन्य जरी बलाढ्य असलें, तरी त्याच्या भोंवतीं फालतुक सैन्य ठेवून तें कमकुवत आहे असें शत्रूस भासवावें आणि शत्रूचे योद्धे अंगावर येऊं लागले म्हणजे त्यांवर मारा करावा. अथवा, शत्रूचें गोधन हरण करावें अगर त्याच्या हद्दींतलीं इतर जनावरें ठार करावीं आणि त्याचा प्रतिकार करण्याकरितां शत्रू युद्धास आला म्हणजे दबा धरून बसलेल्या जागेवरून त्यावर हल्ला करावा.

रात्रीं हल्ला चढवून शत्रूस रात्रभर जागत ठेवावें; नंतर रात्रीच्या जागरणानें त्याचें सैन्य पेंगूं लागलें असतां किंवा झोपलें असतां दिवसा त्यावर मारा करावा. अथवा; आपादमस्तक कातडी झुली घातलेल्या हत्तींच्या मदतीनें रात्रीं छापा घालावा. अथवा–शत्रुसैन्यांतील लोक सकाळीं लढाईची तयारी करितां करितां थकून गेले म्हणजे दुपारीं त्यांवर मारा करावा. कातड्यानें मढविलेलीं व आंत खडे भरलेलीं भांडीं गळ्यांत बांधून त्यांच्या आवाजानें बुजलेल्या गाईचीं, म्हशींचीं व उंटांचीं खिल्लारें शत्रुसैन्यांत सोडून द्यावीं. त्या आवाजानें शत्रूचे घोडे व हत्ती उधळून गेले व सैन्यांत गोंधळ उडाला म्हणजे आपण मोठ्या बंदोबस्तानें परत फिरून शत्रूचा फडशा पाडावा. अथवा, शत्रुसैन्यांतील लोक सूर्याकडे व वाऱ्याकडे तोंड करून उभे असले, म्हणजे सर्व सैन्यावर चोहोंकडून मारा चालवावा.

धान्वनवनसङ्कटपंकशैलनिम्नविषमनावो गावः शकटव्यूहो नीहारो रात्रिरिति सत्राणि।

पूर्वे च प्रहरणकालाः कूटयुद्धहेतवः।

सङ्ग्रामस्तु निर्दिष्टदेशकालो धर्मिष्ठः।

संहत्य दण्डं ब्रूयात्—'तुल्यवेतनोऽस्मि; भवद्भिः सह भोग्यमिदं राज्यं; मयाभिहितः परोऽभिहन्तव्यः' इति। वेदेष्वप्यनुश्रूयते समाप्तदक्षिणानां यज्ञानामवभृथेषु—"सा ते गतिर्या शूराणाम्" इति; 'अपीह श्लोकौ भवतः—

"यान् यज्ञसङ्घैस्तपसा च विप्राः स्वर्गैषिणः पात्रचयैश्च यान्ति।
क्षणेन तानप्यतियान्ति शूराः प्राणान् सुयुद्धेषु परित्यजन्तः॥"
नवं शरावं सलिलस्य पूर्णं सुसंस्कृतं दर्भकृतोत्तरीयम्॥
तत् तस्य मा भून्नरकं च गच्छेद् यो भर्तृपिण्डस्य कृते न युध्येत्॥"
इति मन्त्रिपुरोहिताभ्यामुत्साहयेद् योधान्।

व्यूहसम्पदा कार्तान्तिकादिश्चास्य वर्गः सर्वज्ञदैवसंयोगख्यापनाभ्यां स्वपक्षमुद्धर्षयेत्। परपक्षं चोद्वेजयेत्। 'श्वो युद्धम्' इति कृतोपवासः शस्त्रवाहनं चानुशयीत। अथर्वभिश्च जुहुयात्। विजययुक्ताः स्वर्गीयाश्चाशिषो वाचयेत्। ब्राह्मणेभ्यश्चात्मानमतिसृजेत्।

शौर्यशिल्पाभिजनानुरागयुक्तमर्थमानाभ्यामविसंवादितमनीकगर्भं कुर्वीत। पितृपुत्रभ्रातृकाणामायुधीयानामध्वजं मुण्डानीकं राजस्थानम्। हस्ती रथो वा राजवाहनमश्वानुबन्धे। यत्प्रायः सैन्यो, यत्र वा विनीतः स्यात्, तदधिरोहयेत्। राजव्यञ्जनो व्यूहाधिष्ठानमायोज्यः।

---

वाळवंट, जंगल, अवघड जागा, डोंगर, दलदल, दरी, कलणारी होडी, गाई, शकटाकार सैन्यरचना, धुकें व रात्रीचा समय हीं शत्रूला हुलकावणी देण्याचीं व दबा धरून बसण्याचीं साधनें होत.

गनिमी कावा करण्यास हीं सगळीं साधनें व पूर्वोक्त हल्ला करण्याच्या सांगितलेल्या वेळा प्रशस्त होत.

अमुक ठिकाणीं व अमुक वेळीं लढाई करावयाची असें जाहीर करून युद्ध करणें, याला संग्राम म्हणतात; व तो धर्मशास्त्रानें प्रशस्त मानला आहे. अशा संग्रामाचे वेळीं राजानें आपल्या सैनिकांस एकत्र करून म्हणावें "मी तुमच्यासारखाच पगारी नोकर आहें; या राज्यावर तुमचा व माझा सारखाच हक्क आहे; म्हणून मी सांगतों, त्या शत्रूवर तुम्हीं चालून जाऊन त्याचा नाश करावा.

तदनंतर मंत्री व पुरोहित, यांनीं सैनिकांस उपदेश करून लढाईस तयार करावें. त्यांनीं त्यास सांगावें कीं, वेदांत सुद्धां असें म्हटलें आहे कीं, 'शूर पुरुषांना जी गति प्राप्त होते तीच यज्ञाची समाप्ति झाल्यावर ब्राह्मणांस दक्षिणा देऊन अवभृत-स्नान करणाऱ्या यजमानास प्राप्त होते' यासंबंधानें आणखीहि दोन श्लोक आहेत ते असे—

"स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें अनेक यज्ञ व तप करणारे ब्राह्मण आपल्या हवनपात्रांसह ज्या लोकांप्रत पावतात, त्यांच्याहि पलीकडे सत्कार्यास्तव अंगीकारलेल्या युद्धांत देह ठेवणारे शूर पुरुष एका क्षणांत जाऊन पोहोंचतात.

धन्याच्या अन्नास जागून धन्याकरितां जो लढणार नाहीं, त्यास अभिमंत्रण केलेला व दर्भानें झांकलेला असा कोरा करकरीत उदक-कुंभ कधीं लाभणार नाहीं; इतकेंच नव्हे तर तो नरकास जाईल."

ज्योतिषी, भविष्यवादी वगैरे राजाच्या अनुयायांनीं सैन्यरचना अभेद्य झाली आहे, राजा सर्वज्ञ आहे, त्याजवर देवांचा अनुग्रह आहे वगैरे गोष्टी सांगून आपल्या पक्षांतील सैनिकांत उत्साह उत्पन्न करावा व शत्रुपक्षांतील लोकांस घाबरवून टाकावें. "उद्यां युद्ध करावयाचें" असें जाहीर करून राजानें आदल्या दिवशीं उपवास करून रथांत शस्त्रें सज्ज ठेवून शयन करावें. अथर्व-वेदांतील विधींप्रमाणें अग्नीस आहुति द्याव्या; युद्धांत विजयप्राप्ति व्हावी अशा आशयाचें मंत्रपठण करवावें आणि आपलें सर्वस्व ब्राह्मणांना देऊन युद्धाला त्यांची परवानगी घ्यावी.

सूतमागधाः शूराणां स्वर्गमस्वर्गं भीरूणां जातिसङ्घकुलकर्मवृत्तस्तवं च योधानां वर्णयेयुः। पुरोहितपुरुषाः कृत्याभिचारं ब्रूयुः। सत्रिकवर्धकिमौहूर्तिकाः स्वकर्मसिद्धिमसिद्धिं परेषाम्।

सेनापतिरर्थमानाभ्यामभिसंस्कृतमनीकमाभाषेत—' शतसाहस्रो राजवधः। पञ्चाशत्साहस्रः सेनापतिकुमारवधः। दशसाहस्रः प्रवीरमुख्यवधः। पञ्चसाहस्रो हस्तिरथवधः। साहस्रोऽश्ववधः। शत्यः पत्तिमुख्यवधः। शिरो विंशतिकम्। भोगद्वैगुण्यं स्वयंग्राहश्च इति। तदेषां दशवर्गाधिपतयो विद्युः।

चिकित्सकाः शस्त्रयन्त्रागदस्नेहवस्त्रहस्ताः, स्त्रियश्चान्नपानरक्षिण्यः पुरुषाणामुद्धर्षणीयाः पृष्ठतस्तिष्ठेयुः।

अदक्षिणामुखं पृष्ठतस्सूर्यमनुलोमवातमनीकं स्वभूमौ व्यूहेत। परभूमिव्यूहे चाश्वांश्चारयेयुः।

यत्र स्थानं प्रजवश्चाभूमिर्व्यूहस्य, तत्र स्थितः प्रजवितश्चोभयथा जीयेत। विपर्यये जयति उभयथा स्थाने प्रजवे च।

समा विषमा व्यामिश्रा वा भूमिरिति, पुरस्तात् पार्श्वाभ्यां पश्चाच्च ज्ञेया। समायां दण्डमण्डलव्यूहाः, विषमायां भोगसंहतव्यूहाः। व्यामिश्रायां विषमव्यूहाः।

---

शूर, वाकबगार, कुलीन, राजावर प्रेम करणारे, इनाम व पदवी देऊन संतुष्ट ठेविलेले असे सैनिक सैन्याच्या गर्भांत म्हणजे मध्यभागीं ठेवावे. ज्या विभागांत लढण्यांत पटाईत असे आणि ज्यांना पिता, पुत्र, भ्राता असे आप्तसंबंधी आहेत असे लढवय्ये असतील, त्यांत राजाची जागा असावी. तेथें राजचिन्ह किंवा ध्वज, असूं नये. सैन्यांत घोडेस्वारच बहुतांशीं असतील, तेव्हां राजानें हत्तीवर किंवा रथांत स्वारी करावी; अथवा सैन्यांत अमुक जातीचें प्राणी विशेष भरले असल्यास, त्या जातीच्या प्राण्यावर बसावें किंवा जें शिकविलेलें जनावर असेल, त्यावर स्वारी करावी. सैन्यरचना करतांना राजासारखा पोशाख केलेला एक पुरुष व्यूहाच्या मध्यभागीं ठेवावा.

सूत म्हणजे भविष्यवादी आणि मागध म्हणजे भाट, यांनीं शूरांस स्वर्ग व भित्र्यांस नरक मिळतो, असें सैनिकांस समजावून सांगावें; आणि सैन्यांतील सैनिकांची जात, समाज, कुळ यांचा पराक्रम व चारित्र्य यांचें वर्णन करावें. पुरोहितांच्या अनुयायांनीं जादूटोण्याचे किंवा अभिचाराचे अमुक परिणाम होतात, हें सांगावें. गुप्तहेर, सुतार व ज्योतिषी यांनीं आपापलीं कामें अशा अशा रीतीनें सिद्धीस गेलीं, उलट शत्रूचीं कामें अशीं अशीं बिघडलीं, हें निदर्शनास आणावें.

सेनापतीनें सैनिकांस द्रव्यदानानें व पदवीदानानें गौरवून असें जाहीर करावें कीं, "शत्रूच्या राजाचा वध करणारास एक लक्ष पण, सेनापतीचा व युवराजाचा वध करणारास पन्नास हजार पण, शूर पथकाच्या पुढाऱ्याचा वध करणारास दहाहजार पण, प्रमुख हत्तीस्वाराचा व रथारूढाचा वध करणारास पांचहजार पण, घोडेस्वारांवरील मुख्याचा वध करणारास एक हजार पण, पायदळावरील मुख्याचा वध करणारास शंभर पण, दरएक डोक्याप्रत वीस पण याप्रमाणें इनाम मिळेल; लढाईंत ज्याला जी लूट सांपडेल, ती त्याला माफ; शिवाय पगार दुप्पट होईल." सदर जाहिरनामा दहा दहा सैनिकांवर जो नाईक असतो, त्यानें प्रत्येकास वाचून दाखवावा.

वैद्यांनीं आपल्याजवळ वैद्यकीय शस्त्रें, यंत्रें, औषधें, तेलें व मलमपट्ट्या तयार ठेवाव्या. स्त्रियांनीं अन्नपाण्याची व्यवस्था ठेवून, सैनिकांस प्रोत्साहन देत मागील बाजूस उभें रहावें.

युद्धास अनुकूल अशा क्षेत्रांत सैन्याची रचना करावी. सैन्याचें तोंड दक्षिणेखेरीज इतर दिशेस असावें. आणि पाठ सूर्याकडे करून वारा समोरून न येईल अशा बेतानें उभें रहावें. युद्धास प्रतिकूल अशा क्षेत्रांत सैन्यरचना करावी लागल्यास शत्रूवर घोडदळ सोडावें.

युद्धास प्रतिकूल अशा क्षेत्रांत सैन्याचा तळ दिला किंवा अशा क्षेत्रांत सैन्य आकस्मिक सांपडलें म्हणजे तें पराजित होईल; पण उलट स्थितींत म्हणजे अनुकूल क्षेत्रांत व्यूह करून राहिलेलें किंवा लढतां लढतां आलेलें सैन्य विजयी होतें.

विशिष्टबलं भङ्क्त्वा सन्धिं याचेत। समबलेन याचितः सन्दधीत। हीनमनुहन्यात्। न त्वेव स्वभूमिप्राप्तं त्यक्तात्मानं वा॥

पुनरावर्तमानस्य निराशस्य च जीविते। अधार्यो जायते वेगस्तस्माद्भग्नं न पीडयेत्॥

इति कौटलीयार्थशास्त्रे सांग्रामिके दशमाधिकरणे तृतीयोऽध्यायः, कूटयुद्धविकल्पाः स्वसैन्योत्साहनं स्वबलान्यबलव्यायोगश्च। आदित एकत्रिंशच्छततमः॥

# अध्याय १३२ युद्धभूमयः, पत्त्यश्वरथहस्तिकर्माणि च।



स्वभूमिः पत्त्यश्वरथद्विपानामिष्टा युद्धे निवेशे च। धान्वनवननिम्नस्थलयोधिनां खनकाकाशदिवारात्रियोधिनां च पुरुषाणां नादेयपार्वतानूपसारसानां च हस्तिनामश्वानां च यथास्वमिष्टा युद्धभूमयः कालाश्च।

समा स्थिराभिकाशा निरुत्खातिन्यचक्रखुरानक्षग्राहिणी अवृक्षगुल्मप्रततिस्तम्भकेदारश्वभ्रवल्मीकसिकतापङ्कभङ्गुरा दरणहीना च रथभूमिः।

---

पुढच्या बाजूस, मागच्या बाजूस व दोनहि अंगांस युद्धक्षेत्र सम, विषम अथवा मिश्र आहे हें पाहून ठेवावें. सम म्हणजे सपाट क्षेत्र असल्यास, दंडाकार किंवा वर्तुलाकार सैन्यरचना करावी; आणि विषम म्हणजे उंचनीच असल्यास भोगसंहतव्यूह करावा. युद्धक्षेत्र मिश्र स्वरूपाचें असल्यास वेगवेगळे व्यूह करावे.

शत्रूचें सैन्य प्रबळ असल्यास, तें फोडण्याचा यत्न करावा व मग तहाचें बोलणें लावावें. उभयतांचीं सैन्यें सारखींच असल्यास, शत्रूकडून तहाचें बोलणें आलें, तर तह करावा. शत्रुसैन्य कमजोर असल्यास, तें मारण्याचा यत्न करावा. परंतु शत्रु आपल्या राज्यांत शिरला असेल, किंवा जिवावर उदार झाला असेल, तर त्याच्याशीं तह करूं नये.

जिवावर उदार झालेलें सैन्य पुनः हल्ला करावयास परतलें म्हणजे त्याचा द्वेष अत्यंत दुःसह होतो; म्हणून भग्न झालेल्या सैन्यास चेव येण्यासारखी पीडा देऊं नये.

## युद्ध—भूमि. पायदळ, घोडदळ, रथदळ, व हत्तीदळ यांचीं कामें.

पायदळ, घोडदळ, रथदळ व हत्तीदळ यांस युद्ध करण्याकरितां व तळ देण्याकरितां अनुकूल अशी जी भूमि, ती ‘ स्वभूमि ’ होय. जे सैनिक ओसाड अरण्यांत, झाडींत, दऱ्याखोऱ्यांत व मैदानावर लढण्यांत तरबेज असतील; जे सैनिक खंदकांतील किंवा उंचावरील लढाई चालवूं शकत असतील, जे दिवसा किंवा रात्रीं लढूं शकत असतील त्यांकरितां युद्धभूमि व युद्धकाल ठरवावयाचा तो त्या त्या सैनिकांच्या पसंतीप्रमाणें ठरवावा; त्याचप्रमाणें नदी कांठच्या प्रदेशांतून आलेले किंवा डोंगराळ प्रदेशांतून अथवा दलदलीच्या किंवा सरोवराच्या प्रदेशांतून लढणाऱ्या सैनिकांकरितां आणि हत्तीघोड्यांकरितां जी भूमि व जो काल सोइस्कर दिसेल, ती भूमि व तो काल ठरविण्यांत यावा.

जी भूमि सपाट, भक्कम व गुळगुळीत आहे; जी उखळत नाहीं; जींत चाकें रुतून बसत नाहींत; जींत जनावरांच्या खुरांनीं खळगे पडलेले नाहींत, जींत गाडीची धांव अडत नाहीं; जींत झाडेंझुडपें व वेली नाहींत; जींत झाडांचीं खोडें किंवा कापलेल्या पिकाचे सड नाहींत आणि जी वारुळें, वाळू किंवा चिखल यामुळें पाय न ठरण्यासारखी नाहीं, जींत खांचखळगे नाहींत आणि जींत कांटे नाहींत अशी भूमि रथदळाला योग्य होय.

हस्त्यश्वयोर्मनुष्याणां च समे विषमे हिता युद्धे निवेशे च।

अणवश्मवृक्षा ह्रस्वलङ्घनीयश्वभ्रा मन्ददरणदोषा चाश्वभूमिः । स्थूलस्थाणवश्मवृक्षप्रततिवल्मीकगुल्मा पदातिभूमिः । गम्यशैलनिम्नविषमा मर्दनीयवृक्षा छेदनीयप्रततिः पङ्कभङ्गुरदरणहीना च हस्तिभूमिः ।

अकण्टकिन्यबहुविषमा प्रत्यासारवतीति पदातीनामतिशयः ।

द्विगुणप्रत्यासारा कर्दमोदकखञ्जनहीना निश्शर्करेति वाजिनामतिशयः ।

पांसुकर्दमोदकनलशराधानवती श्वदंष्ट्राहीना महावृक्षशाखाघातवियुक्तेति हस्तिनामतिशयः ।

तोयाशयाश्रयवती निरुत्खातिनी केदारहीना व्यावर्तनसमर्थेति रथानामतिशयः । उक्ता सर्वेषां भूमिः ।

एतया सर्वबलनिवेशा युद्धानि च व्याख्यातानि भवन्ति ।

भूमिवासवनविचयो विषमतोयतीर्थवातरश्मिग्रहणं, वीवधासारयोर्घातो रक्षा वा, विशुद्धिः स्थापना च बलस्य, प्रसारवृद्धिर्बाह्वुत्सारः, पूर्वप्रहारो, व्यावेशनं व्यावेधनमाश्वासो, ग्रहणं, मोक्षणं, मार्गानुसारविनिमयः, कोशकुमाराभिहरणं, जघनकोट्यभिघातो, हीनानुसारणमनुयानं, समाजकर्मेत्यश्वकर्माणि ।

---

हत्ती, घोडे व माणसें यांस लढाईकरितां किंवा तळ देण्याकरितां सपाट व उंचनीच भूमिहि चालते.

जींत बारीक बारीक खडे किंवा लहान लहान झाडें आहेत, अथवा जींत सहज ओलांडण्यासारिखे लहान लहान खड्डे आहेत, अथवा जींत थोडेफार कांटे आहेत, अशी भूमि घोड्यांस चालते.

जींत मोठमोठे झाडाचे बुंधे, दगड, वृक्ष, वेली व वारुळें आहेत, अशी भूमि पायदळास चालते.

जींत चढण्या उतरण्यासारिखे डोंगर किंवा दऱ्याखोरीं आहेत, जींत सहज तोडण्यासारखीं झाडें किंवा वेली आहेत, जींत भुसभुशीत चिखल किंवा कांटे नाहींत, अशा भूमीवरून हत्ती चालूं शकतात.

जींत कांटे नाहींत खांचखळगे फार नाहींत, आणि जी अत्यंत विस्तृत आहे, अशी भूमि पायदळास उत्तम समजावी.

जी दुप्पट रुंद आहे, जींत चिखल, पाणी, सड किंवा रेती नाहीं ती जमीन घोडदळास उत्तम होय.

जींत धूळ, चिखल, पाणी, देवनळ व दर्भ यांची समृद्धि आहे, पण जींत श्वदंष्ट्र नांवाचीं कांटेरी झुडपें किंवा मोठमोठ्या झाडांच्या फांद्या वाटेंत आडव्या येत नसतील, ती भूमि हत्तींस उत्तम समजावी.

जींत पाण्याची व विश्रांतीची सोय आहे आणि जींत खड्डे किंवा सड नाहींत आणि जींत वळण्यासवरण्यास मुबलक जागा आहे, ती भूमि रथाला उत्तम होय.

सैन्याच्या निरनिराळ्या अंगांकरितां योग्य स्थळें कोणतीं, हें सांगितलें. यावरून सर्व प्रकारच्या सैन्यास युद्धाकरितां किंवा मुक्कामाकरितां कशी भूमि असावी हें समजून येईल.

घोडदळानें जीं कामें करावयाचीं असतात तीं येणेंप्रमाणें—छावणीची जागा निर्भय करणें, छावणी पडली असतां पाहरा करणें, आसपासच्या रानांतून शत्रूस हुसकून लावणें; शत्रूला चालून येण्यास कठिण, पाणवठ्याच्या सोईची, उतारजवळ असलेली आणि ऊन व वारा प्रतिकूल नसलेली छावणीची जागा काबीज करणें, शत्रूची कही व कुमक बंद पाडणें आणि आपली सुरक्षित राखणें, आपल्या सैन्यांत शत्रूच्या हेरांचा प्रवेश न होऊं देणें व सैन्यास धीर देणें, शत्रुसैन्यास आसपास फिरकूं न देतां आपला चोहोंबाजूंचा मार्ग मोकळा राखणें, शत्रुसैन्यावर पहिला तडाखा मारणें, परसैन्यांत घुसून त्यास घाबरविणें, आपल्या घाबरलेल्या सैन्यास धीर देणें, शत्रूंचे योद्धे पकडणें, आपल्या योद्ध्यांची बंधमुक्तता करणें, आळीपाळीनें टेहळणी करणें, शत्रूचा खजिना व राजपुत्र यांचें हरण करणें,

पुरोयानमकृतमार्गवासतीर्थकर्म बाहूत्सारस्तोयतरणावतरणे स्थानगमनावतरणं विषमसम्बाधप्रवेशोऽग्निदानशमनमेकाङ्गविजयः भिन्नसन्धानमभिन्नभेदनं व्यसने त्राणमभिघातो विभीषिका त्रासनमौदार्यं ग्रहणं मोक्षणं सालद्वाराट्टालकभञ्जनं कोशवाहनापवाहनमिति हस्तिकर्माणि ।

स्वबलरक्षा चतुरङ्गबलप्रतिषेधः सङ्ग्रामे ग्रहणं मोक्षणं भिन्नसन्धानमभिन्नभेदनं त्रासनमौदार्यं भीमघोषश्चेति रथकर्माणि ।

सर्वदेशकालशस्त्रवहनं व्यायामश्चेति पदातिकर्माणि ।

शिबिरमार्गसेतुकूपतीर्थशोधनकर्म यन्त्रायुधावरणोपकरणग्रासवहनमायोधनाच्च प्रहरणावरणप्रतिविद्धापनयनमिति विष्टिकर्माणि ॥

कुर्याद् गवाश्वव्यायोगं रथेष्वल्पहयो नृपः । खरोष्ट्रशकटानां वा गर्भमल्पगजस्तथा ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे सांग्रामिके दशमाधिकरणे चतुर्थोऽध्यायः युद्धभूमयः पत्त्यश्वरथहस्तिकर्माणि, आदितो द्वात्रिंशच्छततमः ॥

---

पिछाडीवर किंवा अघाडीवर छापा घालणें, शत्रूच्या पळणाऱ्या सैन्याचा पाठलाग करणें आणि आपल्या पांगलेल्या सैन्याचें एकीकरण करणें हीं कामें घोडदळानें करावीं.

हत्तींनीं करावयाचीं कामें—सैन्याच्या अघाडीस कूच करून रस्ते, मुक्कामाची जागा आणि पाण्याचे उतार तयार करणें, पाण्यांतून सैन्य जात असतां व पाण्यांत उतरत असतां दोन्ही बाजूंचें पाणी अडविणें, उंच जागेवर चढण्याला किंवा उतरण्याला सहाय्य करणें, अडचणीच्या व धोक्याच्या जागेंत प्रवेश करणें, आग पसरविणें किंवा शमन करणें, शत्रुसैन्यांतील मुख्य भागाचा मोड करणें, घसरलेली बाजू सावरणें, शत्रूची फळी फोडणें, संकटाचेवेळीं सुटका करणें, शत्रुसैन्याची कत्तल करणें, शत्रूंना भीति दाखविणें, भित्र्यांना आश्रय देणें, शत्रु पकडणें, मित्रांची सुटका करणें, तट, बुरूज व वेशी यांचा भंग करणें, खजिना वाहून नेणें किंवा पळवून नेणें इत्यादि कामें हत्तींनीं करावीं.

रथदळाचीं कर्तव्यें येणें प्रमाणें होतः—

स्वतःच्या सैन्याचें रक्षण करणें; शत्रुसैन्याच्या चारहि अंगांनीं हल्ला केल्यास, तो परतविणें, युद्धकाळीं अनुकूल दिसेल तें स्थळ स्वीकारणें व प्रतिकूल दिसेल तें सोडून देणें; पांगलेलें सैन्य एकत्र जमविणें; शत्रुसैन्य एकत्र जमलें असल्यास तें फोडणें; त्यास घाबरें करणें; भित्र्यास आश्रय देणें; भयंकर गर्जना करणें इ०

पायउतारा सैनिकांनीं सर्व ऋतूंत व सर्व स्थळीं युद्धास सज्ज असावें आणि प्रत्यक्ष लढाई करावी.

वेठीस धरलेल्या लोकांचीं कामें येणें प्रमाणें:—

डेरेराहुट्या, रस्ते, पूल, विहिरी व पाणवठे यांची सुव्यवस्था करावी; लष्करी यंत्रें, शस्त्रें, चिलखतें, धान्यसामग्री आणि इतर सामान यांची नेआण करावी; युद्धांत पडलेले लोक व त्यांच्या जवळील शस्त्रें व चिलखतें छावणींत परत न्यावीं.

राजाजवळ घोड्यांची संख्या कमी असल्यास रथांना घोड्याबरोबर बैलांची योजना करावी; आणि हत्तींची संख्या कमी असल्यास खेचर, उंट आणि गाड्या यांची भरती सैन्याच्या गर्भांत म्हणजे मध्यभागांत करावी.

---

# अध्याय १३३—पक्षकक्षोरस्यानां बलाग्रतो व्यूहविभागः, सारफल्गुबल-विभागः, पत्त्यश्वरथहस्तियुद्धानि च ।

पञ्चधनुश्शतावकृष्टदुर्गमवस्थाप्य युद्धमुपेयाद्, भूमिवशेन वा । विभक्तमुख्यामचक्षुर्विषये मोक्षयित्वा सेनां सेनापतिनायकौ व्यूहेयाताम् ।

शमान्तरं पत्तिं स्थापयेत् । त्रिशमान्तरमश्वम् । पञ्चशमान्तरं रथं, हस्तिनं वा । द्विगुणान्तरं त्रिगुणान्तरं वा व्यूहेत । एवं यथासुखमसम्बाधं युध्येत ।

पञ्चारत्नि धनुः, तस्मिन् धन्विनं स्थापयेत् । त्रिधनुष्यश्वम् । पञ्चधनुषि रथं हस्तिनं वा । पञ्च धनुरनीकसन्धिः पक्षकक्षोरस्यानाम् ।

अश्वस्य त्रयः पुरुषाः प्रतियोद्धारः । पञ्चदश रथस्य, हस्तिनो वा, पञ्च चाश्वाः । तावन्तः पादगोपाः वाजिरथद्विपानां विधेयाः ।

त्रीणि त्रिकाण्यनीकं रथानामुरस्यं स्थापयेत् । तावत् कक्षं पक्षं चोभयतः । पञ्चचत्वारिंशद् एवं रथा व्यूहे भवन्ति ।

---

## पक्ष अथवा वाढती बाजू, बगल व मध्य यांची बलानुसार रचना, जोरदार सैन्य व कमजोर सैन्य यांची रचना; चतुरंग सैन्याचीं कामें.

छावणीपासून पांचशें धनूंच्या अंतरावर किंवा युद्धभूमीच्या सोईप्रमाणें कमी अधिक अंतरावर सैन्यरचना करून युद्धास सुरवात करावी. शेलकें सैन्य निराळें काढून, तें शत्रूस दिसणार नाहीं अशा एखाद्या जागेवर उभें करून ठेवावें आणि सेनापति व नायक यांनीं बाकीच्या सैन्याची रचना करावी.

दोन दोन शिपायांच्यामध्यें एक ‘शम’ म्हणजे चौदा अंगुळें अंतर राहील, अशा रीतीनें पायदळ सैन्याची रचना करावी, तीन शम अंतर राहील अशी घोडदळाची आणि पांच शम अंतर राहील अशी रथदळाची आणि हत्तींची रचना करावी. किंवा याच्या दुप्पट किंवा तिप्पट अंतर राहील अशी सैन्यरचना करावी. अशा रीतीनें रचना केली म्हणजे गर्दी किंवा त्रास न होतां सोईनें लढतां येतें.

पांच ‘अरत्नि’ (अरत्नि म्हणजे २४ अंगुळें) म्हणजे एक धनू. धनुर्धारी सैनिकांच्या पलटणी एक एक धनुष्याच्या अंतरावर; घोडदळांच्या तीन तीन धनू अंतरावर, आणि रथदळाच्या व हत्तीदळाच्या पांच पांच धनू अंतरावर रचून ठेवाव्या.

सैन्याच्या अघाडीचीं टोकें, बगला व मध्य यांमधील अंतर पांच पांच धनू असलें पाहिजे.

घोड्याशीं सामना यावयास तीन माणसें आणि रथाशीं किंवा हत्तीशीं सामना यावयास पंधरा माणसें अथवा पांच घोडे लागतात. म्हणून घोडे, रथ व हत्ती यांचेबरोबर त्यांच्या जोपासनेसाठीं तितकीं तितकीं माणसें ठेवावीं.

तीन तीन रथांची एक तुकडी अशा तीन तुकड्या मध्यभागीं, तितक्याच दोनहि अघाडीच्या टोकांस व दोनहि बगलांस ठेवाव्या. अशा रीतीनें सैन्यरचनेंत एकंदर पंचेचाळीस रथ येतील.

द्वे शते पञ्चविंशतिश्चाश्वाः, षट्शतानि पञ्चसप्ततिश्च पुरुषाः प्रतियोद्धारः । तावन्तः पादगोपा वाजिरथद्विपानाम् ।

एष समव्यूहः । तस्य द्विरथोत्तरा वृद्धिरा एकविंशतिरथादित्येवमोजा दश समव्यूहप्रकृतयो भवन्ति ।

पक्षकक्षोरस्यानामतो विषमसंख्याने विषमव्यूहः । तस्यापि द्विरथोत्तरा वृद्धिरा एकविंशतिरथादित्येवमोजा दश विषमव्यूहप्रकृतयो भवन्ति ।

अतः सैन्यानां व्यूहशेषमावापः कार्यः । रथानां द्वौ त्रिभागावङ्गेष्वावापयेत् । शेषमुरस्यं स्थापयेत् । एवं त्रिभागोनो रथानामावापः कार्यः तेन हस्तिनामश्वानाम् आवापो व्याख्यातः ।

यावदश्वरथद्विपानां युद्धसम्बाधं न कुर्यात्, तावदावापः कार्यः । दण्डबाहुल्यमावापः । पत्तिबाहुल्यं प्रत्यावापः । एकाङ्गबाहुल्यमन्वावापः । दूष्यबाहुल्यमत्यावापः ।

परावापात् प्रत्यावापाद्वाचतुर्गुणादाष्टगुणादिति वा विभवतः सैन्यानामावापः कार्यः ।

रथव्यूहेन हस्तिव्यूहो व्याख्यातः । व्यामिश्रो वा हस्तिरथाश्वानाम् । चक्रान्तयोर्हस्तिनः, पार्श्वयोरश्वमुख्या, रथा उरस्ये । हस्तिनामुरस्यं रथानां कक्षावश्वानां पक्षाविति मध्यभेदी ।

---

त्याचप्रमाणें दोनशें पंचवीस घोडे किंवा सहाशें पंचाहात्तर पदाती त्या रथांबरोबर असावे आणि घोडे किंवा हत्तीहि वर सांगितलेल्या प्रमाणांत असावे अशी रचना म्हणजे समरचना होय. या समरचनेंतील. रथांत दोन दोन प्रमाणें रथांची वाढ एकवीस रथापर्यंत केली म्हणजे दहा प्रकारचे समव्यूह होत. याहून वेगळें प्रमाण धरल्यास असेच दहा विषमव्यूह होतात. व्यूहरचना करून राहिलेलें सैन्य तें ' आवाप ' ( शिलकी सैन्य ) होय.

शिलकी रथांपैकीं दोन तृतीयांशरथ दोनहि टोकांकडे व बगलांकडे आणि एकतृतीयांश मध्यभागाकडे शिल्लक ठेवावे. याप्रमाणें एकंदर संख्येच्या एक तृतीयांशाहून कमी रथ शिल्लक राहतील अशी व्यूहरचना करावी. शिलकी घोडे व हत्ती यांची संख्याहि अशाच हिशेबानें ठेवावी. लढाई चालली असतां गर्दी होणार नाहीं, इतकेच घोडे, हत्ती व रथ शिलकी सैन्यांत ठेवावे. जरुरीपेक्षां जें अधिक सैन्य, त्यास 'आवाप' म्हणजे शिलकी सैन्य म्हणतात; केवळ पायदळाच शिलकी सैन्य असलें, म्हणजे त्यास 'प्रत्यावाप' म्हणावें; आणि सैन्याच्या तीन अंगांपैकीं एकच अंग जरूरीपेक्षां अधिक असलें तर त्यास 'अन्वावाप' म्हणावें; सैन्यांत बाजारबुणगे पुष्कळ असल्यास त्यास 'अत्यावाप' म्हणावें. शत्रूचें जेवढें आवाप सैन्य अथवा प्रत्यावाप सैन्य असेल; त्याच्या चौपटीपासून आठपटीपर्यंत आपल्या मगदुराप्रमाणें आपल्या सैन्यांत शिलकी सैन्याची भरती करावी.

रथांच्या व्यूहरचनेवरून हत्तींच्या व्यूहरचनेची कल्पना येईल. वाटल्यास हत्ती, रथ व घोडे यांची मिश्र रचना करावी. सैन्यमंडलांत शेवटीं हत्ती, बाजूंस घोडे व मध्यभागीं रथ असावे. सैन्यरचनेंत मध्यभागीं हत्ती, बगलांवर रथ व आघाडीच्या टोंकास घोडे अशी रचना केली, म्हणजे तिला ' मध्यभेदी ' रचना म्हणतात. आणि याच्या उलट रचना केल्यास, तिला 'अंतर्भेदी' रचना म्हणतात. केवळ हत्तींचा व्यूह केल्यास त्यास शुद्धव्यूह म्हणतात. अशा व्यूहांत मध्यभागीं लढणारे हत्ती, बगलांवर बसावयाचे हत्ती व बिनीच्या टोकांवर दांडगे व मदोन्मत्त हत्ती ठेवावे. केवळ घोड्यांच्या व्यूहरचनेंत मध्यभागीं बक्तर घातलेले घोडे आणि बिनींच्या टोकांवर व बगलांवर बिनबक्तर घोडे उभे करावे. पायदळ रचनेंत अघाडीवर चिलखत घातलेले आणि पिछाडीस धनुर्धारी शिपाई ठेवावे. हे शुद्ध-व्यूह रचनेचे प्रकार सांगितले.

विपरीतोऽन्तर्भेदी। हस्तिनामेव तु शुद्धः। सान्नाह्यानामुरस्यम्, औपवाह्यानां जघनं व्यालानां कोट्याविति। अश्वव्यूहो वर्मिणामुरस्यं शुद्धानां कक्षपक्षाविति। पत्तिव्यूहः पुरस्तादावरणिनः पृष्ठतो धन्विन इति। शुद्धाः।

पत्तयः पक्षयोरश्वाः पार्श्वयोः, हस्तिनः पृष्ठतो रथाः पुरस्तात्, परव्यूहवशेन वा विपर्यास इति। द्व्यङ्गबलविभागः। तेन त्र्यङ्गबलविभागो व्याख्यातः।

दण्डसम्पत् सारबलं पुंसाम्। हस्त्यश्वयोर्विशेषः–कुलं जातिः सत्त्वं वयःस्थता प्राणो वर्ष्म जवस्तेजः शिल्पं स्थैर्यमुदग्रता विधेयत्वं सुव्यञ्जनाचारतेति।

पत्त्यश्वरथद्विपानां सारत्रिभागमुरस्यं स्थापयेद्, द्वौ त्रिभागौ कक्षं पक्षं चोभयतः। अनुलोममनुसारम्। प्रतिलोमं तृतीयसारम्। फल्गु प्रतिलोमम्। एवं सर्वमुपयोगं गमयेत्।

फल्गुबलमन्तेष्ववधाय वेगोऽभिहुतो भवति। सारबलमग्रतः कृत्वा कोटीष्वनुसारं कुर्यात्। जघने तृतीयसारं, मध्ये फल्गुबलमेतत् सहिष्णु भवति।

व्यूहं तु स्थापयित्वा पक्षकक्षोरस्यामामेकेन द्वाभ्यां वा प्रहरेत्। शेषैः प्रतिगृह्णीयात्।

यत् परस्य दुर्बलं वीतहस्त्यश्वं दूष्यामात्यकं कृतोपजापं वा, तत् प्रभूतसारेणाभिहन्यात्। यद् वा परस्य सारिष्ठं, तद् द्विगुणसारेणाभिहन्यात्। यदङ्गमल्पसारमात्मनः, तद् बहुनोपचिनुयात्। यतः परस्यापचयस्ततोऽभ्याशे व्यूहेत, यतो वा भयं स्यात्।

---

दुरंगी व्यूहांत पायदळ पुढच्या टोकांस व घोडदळ बगलांस असावें. हत्ती पिछाडीस तर रथ अघाडीस असावेत. शत्रूच्या व्यूहाची रचना पाहून या रचनेंत फेरफार करावा. हा दुरंगी व्यूहाचा विचार झाला. यावरून तिरंगी व्यूहाची रचनाहि ध्यानांत येईल.

पायदळ सैन्याचें महत्व शिपायांच्या शरीरसामर्थ्यावर अवलंबून असतें. हत्तींच्या व घोड्यांच्या दलाचा सरसपणा पुढील गुणांवर अवलंबून असतो. कुलवान, जातिवंत, वयांत आलेले, सामर्थ्यवान्, धिप्पाड, वायुवेगी, तल्लख, शिकलेले, धैर्यवान्, बिनबुजणारे, भव्य, आज्ञाधारक व देखणे असे हत्ती व घोडे गुणवान होत.

शेलक्या चतुरंग दळाचा एक तृतीयांश मध्यभागीं आणि दोन तृतीयांश भाग दोनहि बगलांस व बिनीच्या टोंकास ठेवावा. त्याहून थोड्या कमी दर्जाचें मध्यम सैन्य त्याच्या पाठीमागें ठेवावें. त्याहून कमी दर्जाचें कनिष्ठ सैन्य उत्तम सैन्याच्या पुढें ठेवावा. सर्वांत हीन दर्जाचें फालतू सैन्य असेल तें सर्वांच्या अघाडीस ठेवावें. अशा रितीनें सगळ्या सैन्याचा उपयोग करून घ्यावा.

अघाडीस कमकुवत सैन्य ठेविल्यास, शत्रूचा पहिला आवेश त्यावर पडून शत्रूचा जोर थंडा पडतो. अथवा जोरदार सैन्य अगदीं पुढें ठेवून टोकांवर आणि बगलांवर मध्यम जोरदार सैन्य ठेवावें; आणि त्याच्याहून हलक्या दर्जाचें सैन्य पिछाडीस ठेवून अगदीं कमजोर सैन्य गर्भांत ठेवावें. अशी रचना केली म्हणजे शत्रूचा सहज प्रतिकार करितां येतो.

अशा रीतीनें योग्य व्यूह-रचना केल्यावर अघाडीवरील, वाढत्या बाजूंवरील किंवा बगलांवरील एकदोन तुकड्यांनिशीं शत्रूवर पहिला हल्ला करावा; आणि बाकीच्या सैन्यानें त्यास घेरून जेरीस आणावें.

शत्रूचें जें सैन्य कमकुवत असेल, किंवा ज्यांतील हत्ती घोडे लढाईंत नाहींसे झाले असतील, किंवा जें फितुरी अमात्यांच्या कारस्थानानें बेभरंवशाचें झालें असेल, त्यावर एकदम पुष्कळ शेलकें सैन्य घेऊन मारा करावा. शत्रूचें जें करोल सैन्य असेल, त्यावर दुप्पट सैन्यानिशीं चालून जावें. आपल्या सैन्याचें जें अंग कमजोर असेल, तें संख्येनें भरून काढावें. ज्या अंगास शत्रु-सैन्य बलानें किंवा संख्येनें कमी असेल अथवा आपल्या सैन्यावर धोका येण्याचा संभव असेल, त्या अंगास सैन्याची रचना अधिक बळकट करावी.

अभिसृतं परिसृतमतिसृतमपसृतमुन्मथ्यावधानं वलयो गोमूत्रिका मण्डलं प्रकीर्णिका व्यावृत्तपृष्ठमनुवंशमग्रतः पार्श्वाभ्यां पृष्ठतो भग्नरक्षा भग्नानुपातः इत्यश्वयुद्धानि।

प्रकीर्णिकावर्जान्येतान्येव, चतुर्णामङ्गानां व्यस्तसमस्तानां वा घातः, पक्षकक्षोरस्यानां च प्रभञ्जनमवस्कन्दः सौप्तिकं चेति हस्तियुद्धानि।

उन्मथ्यावधानवर्जान्येतान्येव स्वभूमावभियानापयानास्थितयुद्धानीति रथयुद्धानि।

सर्वदेशकालप्रहरणमुपांशुदण्डश्चेति पत्तियुद्धानि।

एतेन विधिना व्यूहानोजान् युग्मांश्च कारयेत्। विभवो यावदङ्गानां चतुर्णां सदृशो भवेत्।

द्वे शते धनुषां गत्वा राजा तिष्ठेत् प्रतिग्रहे। भिन्नसङ्घातनं तस्मान्न युध्येताप्रतिग्रहः॥

इति कौटलीयार्थशास्त्रे सांग्रामिके दशमाधिकरणे पञ्चमोऽध्यायः, पक्षकक्षोरस्यानां बलाग्रतो व्यूहविभागः, सारफल्गुबलविभागः, पत्त्यश्वरथहस्तियुद्धानि च। आदितस्त्रयस्त्रिंशच्छततमः॥

---

## अध्याय १३४ दण्डभोगमण्डलासंहतव्यूहव्यूहनं तस्य प्रतिव्यूहस्थापनं च।

पक्षावुरस्यं प्रतिग्रह इत्यौशनसो व्यूहविभागः। पक्षौ कक्षावुरस्यं प्रतिग्रहः इति बार्हस्पत्यः। प्रपक्षकक्षोरस्या उभयोः

---

समोर चाल करणें; गराडा घालणें; पलीकडे धांवून जाणें; माघारी पळणें; शत्रु-सैन्य खडें राहिलें असतां अडथळा करणें; अर्ध-मंडल करणें; मंडल करणें; मिश्र हालचाली करणें; अघाडीवरील, बाजूंकडील अथवा पिछाडीवरील शत्रु-सैन्यानें पाठ फिरविली असतां, पाठलाग करणें; आपल्या भंगलेल्या सैन्याचें रक्षण करणें; शत्रूच्या भंग पावलेल्या सैन्यावर तुटून पडणें;—येणेंप्रमाणें घोडदळी लढाईचे प्रकार आहेत.

मिश्र हालचालीखेरीज वरील सर्व प्रकार; शत्रुसैन्याच्या संघटित किंवा विघटित अशा चतुरंग बलाचा नाश; शत्रुसैन्याचा मध्यभाग, बगला व वाढत्या बाजू यांस जर्जर करून त्यांची दाणादाण करणें; आणि रात्रीं शत्रु झोंपेंत असतां, त्यावर छापा घालणें;—येणेंप्रमाणें हत्तीदळाच्या लढाईचे प्रकार होत.

शत्रुसैन्याची लांडगेतोड करणें व त्यास अडविणें, या प्रकाराखेरीज वरील इतर सर्व प्रकार, आणि आपल्या जागेवरून शत्रूवर हल्ला, पलायन; व ठाण मांडून लढाई—असे रथांच्या लढाईचे प्रकार होत.

शत्रूच्या सैन्याच्या सर्व भागांवर सर्वकाळ मारा करणें आणि अकस्मात् गुप्त हल्ला चढविणें—हे पायदळी सन्याचे युद्धप्रकार होत.

अशा प्रकारें जेणेंकरून आपल्या सैन्याच्या चारहि अंगांची बळकटी राहील, अशी सम अथवा विषम सैन्यरचना करून ठेवावी.

युद्धाच्या वेळीं राजानें दोनशें धनू अंतरावर पिछाडीस जाऊन शिलकी सैन्यानिशीं सज्ज उभें राहावें; या योगानें आपल्या सैन्याची पांगापांग झाल्यास ती थांबवितां येते. यास्तव केव्हांहि पिछाडीस शिलकी सैन्य ठेवल्याखेरीज लढूं नये.

---

### दंड, भोग, मंडल व असंहत व्यूह आणि प्रतिव्यूह.

उशनसाच्या मतें "सैन्याच्या दोन वाढत्या म्हणजे पुढें आलेल्या बाजू, मध्यभाग व शिलकी सैन्य," इतके सैन्य-रचनेंतले त्रिभाग होत; बृहस्पतीच्या मतें "दोन वाढत्या बाजू, दोन बगला, मध्यभाग व शिलकी सैन्य," असे विभाग होतात. दोघाचें मत विचारांत घेतलें असतां व्यूहांत वाढत्या बाजू, बगला व मध्यभाग येतात.

दण्डभोगमण्डलासंहताः प्रकृतिव्यूहाः ।

तत्र तिर्यग्वृत्तिर्दण्डः । समस्तानामन्वावृत्तिर्भोगः सुतरां सर्वतोवृत्तिः मण्डलः । स्थितानां पृथगनीकवृत्तिरसंहतः ।

पक्षकक्षोरस्यैः समं वर्तमानो दण्डः । स कक्षाभिक्रान्तः प्रदरः; स एव पक्षकक्षाभ्यां प्रतिक्रान्तो दृढकः; स एवातिक्रान्तः पक्षाभ्यामसह्यः; पक्षाववस्थाप्योरस्याभिक्रान्तः श्येनः; विपर्यये चापं चापकुक्षिः प्रतिष्ठः सुप्रतिष्ठश्च । चापपक्षः सञ्जयः; स एवोरस्यातिक्रान्तो विजयः; स्थूलकर्णपक्षः स्थूलकर्णः; द्विगुणपक्षस्थूलो विशालविजयः; अभिक्रान्तपक्षश्चमूमुखः; विपर्यये झषास्यः । ऊर्ध्वराजिर्दण्डः सूची; द्वौ दण्डौ वलयः; चत्वारो दुर्जयः । इति दण्डव्यूहाः ।

पक्षकक्षोरस्यैर्विषमं वर्तमानो भोगः । स सर्पसारी गोमूत्रिका वा । स युग्मोरस्यो दण्डपक्षः शकटः; विपर्यये मकरः; हस्त्यश्वरथैर्व्यतिकीर्णः शकट· पारिपतन्तकः । इति भोगव्यूहाः ।

पक्षकक्षोरस्यानाम् एकीभावे मण्डलः । स सर्वतोमुखः सर्वतोभद्रः, अष्टानीको दुर्जयः । इति मण्डलव्यूहाः ।

---

दंडाकार, सर्पाकार, मंडलाकार व पृथग्विभाग, असे व्यूहरचनेचे मुख्य प्रकार असतात.

सैन्यांतील सैनिक तिरप्या रांगेनें उभे केले, म्हणजे ती दंडाकार रचना; एकाभोंवतीं एक अशीं वर्तुळें केलीं, म्हणजे सर्पाकार रचना; सर्व बाजूंला तोंड करून उभें केलें म्हणजे मंडलाकार रचना; सैन्याचे पृथक् पृथक् विभाग करून, प्रत्येक विभागास स्वतंत्रपणें हालचाल करितां येईल, अशा रितीनें उभें केलें म्हणजे ती असंहत रचना.

सैन्यरचनेंत वाढत्याबाजू, बगला व मध्यभाग सारखेच असले, म्हणजे तो **दण्डव्यूह** होय. याच रचनेंत बगला जरा पुढें आल्या, म्हणजे तो **प्रदर**—व्यूह होतो, याच रचनेंत वाढत्या बाजू व बगला मागें गेलेल्या असल्या, म्हणजे तो **दृढक** होतो; वाढत्या बाजू अधिक लांबविल्या, म्हणजे **असह्य** व्यूह होतो; बगला आधीं कायम करून मध्यभाग पुढें वाढविला म्हणजे तो **श्येनाकार** व्यूह होतो.

वरील प्रकारांत सैन्यरचना उलट क्रमानें केली, म्हणजे त्यांस '**चाप**' '**चापकुक्षि,**' '**प्रतिष्ठ**' व '**सुप्रतिष्ठ**' असे व्यूह होतात.

सैन्याच्या, दोनहि टोंकांस चापाचा आकार दिला म्हणजे त्यास '**संजय**'; व्यूह म्हणावा; त्यांतच मध्यभाग पुढें वाढविला म्हणजे '**विजय**'; वाढत्या बाजू व बगला दंडाकार राखिल्या म्हणजे '**स्थूलकर्ण**'; विजय व्यूहांतील अघाडीच्या दुप्पट अघाडी ठेविली म्हणजे '**विशाल विजय**'; यांतील बिनीचीं टोकें पुढें गेलीं म्हणजे '**चमूमुख**' आणि उलट म्हणजे आंत गेलीं म्हणजे '**झषास्यव्यूह**' म्हणावा दंडव्यूहांत रांगेमागें रांग असली म्हणजे '**सूची**' व्यूह; असे दोन दंडाकार व्यूह झाले म्हणजे '**वलय**' आणि चार झाले म्हणजे '**दुर्जय**' व्यूह होत. हे दंडाकार व्यूहाचे प्रकार झाले.

भोग-व्यूहांत पुढचीं टोकें, बगला व मध्यभाग विषम असतात. त्यासच '**सर्पसारी**' अथवा, **गोमूत्रक**' व्यूह म्हणतात.

अवाडीस दोन रांगा असून बाजू दंडाकार असल्या, म्हणजे त्यास '**शकट**' व्यूह म्हणावें; त्याच्या उलट, '**मकर**' व्यूह म्हणावा; हत्ती, घोडे व रथ शकटव्यूहांत असले, म्हणजे तो '**पारिपतंतक**' व्यूह होतो. हे भोगव्यूहाचे प्रकार झाले.

पुढचीं टोकें, बगला व मध्यभाग यांतील सर्व तुकड्या एकमेकांत मिसळून गेल्या म्हणजे '**मंडल**' व्यूह होतो; त्याचेच '**सर्वतोमुख**', '**सर्वतोभद्र,**' '**अष्टानीक**', '**दुर्जय**' असे पोटभेद आहेत.

पक्षकक्षोरस्यानां असंहतादसंहतः । स पञ्चानीकानामाकृतिस्थापनाद् वज्रो गोधा वा । चतुर्णामुद्यानकः काकपदी वा । त्रयाणामर्धचन्द्रिकः कर्कटकशृङ्गी वा । इत्यसंहतव्यूहाः ।

रथोरस्यो हस्तिकक्षोऽश्वपृष्ठोऽरिष्टः । पत्तयोऽश्वा रथा हस्तिनश्चानुपृष्ठमचलः । हस्तिनोऽश्वा रथाः पत्तयश्चानुपृष्ठमप्रतिहतः ।

तेषां प्रदरं दृढकेन घातयेत्; दृढकमसह्येन; श्येनं चापेन; प्रतिष्ठं सुप्रतिष्ठेन; सञ्जयं विजयेन; पारिपतन्तकं सर्वतोभद्रेण । दुर्जयेन् सर्वान् प्रतिव्यूहेत ।

पत्त्यश्वरथद्विपानां पूर्वं पूर्वमुत्तरेण घातयेत् । हीनाङ्गमधिकाङ्गेन चेति ।

अङ्गदशकस्यैकः पतिः पदिकः; पदिकदशकस्यैकः सेनापतिः; तद्दशकस्यैको नायक इति । स तूर्यघोषध्वजपताकाभिः व्यूहाङ्गानां संज्ञाः स्थापयेत् । अङ्गविभागे सङ्घाते स्थाने गमने व्यावर्तने प्रहरणे च । समे व्यूहे देशकालसारयोगात् सिद्धिः ।

यन्त्रैरुपनिषद्योगैस्तीक्ष्णैर्व्यासक्तघातिभिः । मायाभिर्दैवसंयोगैः शकटैर्हस्तिभूषणैः ॥

---

पुढचीं टोकें, बगला व मध्यभाग यांतील तुकड्या वेगवेगळ्या ठेविल्या म्हणजे तो ‘ असंहत ’ व्यूह म्हणावा; पांच पांच तुकड्या वेगवेगळ्या ठेविल्या म्हणजे तो ‘ वज्र ’ अथवा ‘ गोधा ’ व्यूह म्हणावा; चार चार ठेविल्या म्हणजे ‘ उद्यानक ’ अथवा ‘ काकपदी ’, तीन ठेविल्या म्हणजे ‘ अर्धचंद्रक ’ अथवा ‘ कर्कटक शृंगी व्यूह म्हणावा. येणेंप्रमाणें असंहत व्यूहाचे प्रकार आहेत.

मध्यभागीं रथ बगलांवर हत्ती व पिछाडीवर घोडे, अशा व्यूहास ‘ अरिष्ट ’ म्हणतात.

पायदळ, घोडे, रथ व हत्ती एकामागें एक रांगेनें असले, म्हणजे तो ‘ अचल ’ व्यूह समजावा.

हत्ती, घोडे, रथ व पायदळ एकामागें एक असले, म्हणजे ‘ अप्रतिहत ’ व्यूह होतो.

अशा व्यूहांपैकीं ‘ प्रदर ’ व्यूहावर ‘ दृढक, ’ ‘ दृढकावर ’ ‘ असह्य, ’ ‘ श्येनावर ’ ‘ चाप, ’ ‘ प्रतिष्ठावर ’—‘ सुप्रतिष्ठ, ’ ‘ संजयावर ’ ‘ विजय, ’ ‘ स्थूलकर्णावर ’ ‘ विशालविजय, ’ ‘ पारिपतंतकावर ’ ‘ सर्वतोभद्र ’ व्यूहाची रचना करून त्या त्या व्यूहांचा भेद करावा. कोणत्याहि प्रकारचा व्यूह असला, तरी ‘ दुर्जय ’ व्यूह करून त्यास तोंड देतां येईल.

पायदळ, घोडदळ, रथदळ व हत्तीदळ यांमधील पायदळावर घोडदळ, घोडदळावर रथदळ, व रथदळावर हत्तीदळ चालवून मारा करावा, शत्रूचा जो विभाग संख्येनें कमी असेल, त्यावर आपल्या अधिक संख्येच्या विभागानें हल्ला करावा.

सैन्य विभागांतील दहा दहा व्यक्तींवर एक अधिकारी असतो त्यास ‘पदिक’, दहा पदिकांवर एक अधिकारी असतो त्यास ‘ सेनापति ’, आणि दहा सेनापतींवर जो मुख्य असतो त्यास ‘ नायक ’ म्हणतात. नायकानें सैन्याच्या निरनिराळ्या विभागांस तुतार्‍यांच्या आवाजांवरून, ध्वजांवरून व निशाणांवरून निरनिराळ्या खुणा शिकवून ठेवाव्यात; आणि त्या खुणा दर्शवितील त्याप्रमाणें सैन्याचे विभाग पाडणें, विभाग एकत्र करणें, तळ देणें, कूच करूं लागणें, हल्ला चढविणें, मागें फिरणें, इत्यादि हालचाली सैनिकांनीं कराव्या. उभयपक्षीं व्यूह सारखे असले म्हणजे यश मिळावयाचें तें स्थळ, काळ व पराक्रम यांवर अवलंबून असतें.

दूष्यप्रकोपैर्गोयूथैः स्कन्धावारप्रदीपनैः । कोटीजघनघातैर्वा दूतव्यञ्जनभेदनैः ॥
दुर्गं दग्धं हृतं वा ते कोपः कुल्यः समुत्थितः । शत्रुराटविको वेति परस्योद्वेगमाचरेत् ॥
एकं हन्यान्न वा हन्यादिषुः क्षिप्तो धनुष्मता । प्राज्ञेन तु मतिः क्षिप्ता हन्याद् गर्भगतानपि ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे साङ्ग्रामिके दशमाधिकरणे षष्ठोऽध्यायः, दण्डभोगमण्डलासंहतव्यूहव्यूहनं तस्य प्रतिव्यूहस्थापनं च । आदितश्चतुस्त्रिंशच्छततमः ॥

एतावता कौटलीयार्थशास्त्रस्य सांग्रामिकं दशममधिकरणं समाप्तम् ।

---

शत्रूंवर मारा करण्याचीं यंत्रें, विषारी धुरासारखे प्रयोग, शत्रु दुसऱ्या कामांत असतांना त्यास मारणाऱ्या गुंडहेरांची योजना, जादूटोणे, विजयेच्छु राजाला देवता प्रसन्न आहेत असा पुकारा, हत्तींसारख्या भासणाऱ्या गुप्तरथांचा प्रवेश, शत्रूच्या बाजूच्या लोकांस चिथवून देणें, आपल्या सैन्यासमोर गांईचे तांडे उभे करणें, छावणीला आग लावणें पुढलीं टोकें व पिछाडीं यांचा फडशा पाडणें, दूताचें काम पत्करून राहिलेल्या गुप्त हेरांकरवीं बंड उभारणें, तुमचा अमका किल्ला जळाला, अमका सर झाला, अमुक सरदार बिथरला, रानटी बंडखोरांनीं पुंडावा सुरू केला इत्यादि बातम्या पसरविणें, वगैरे विविध उपायांनीं शत्रूस घाबरें करून सोडावें.

धनुर्धारी वीरानें सोडिलेला बाण फारतर एक माणूस मारील किंवा तेवढाहि मारणार नाहीं; पण शहाण्या माणसानें लढविलेली शक्कल रणांगणावरील शत्रूचाच काय पण शत्रुस्त्रियांच्या गर्भांतील अर्भकांचाहि नाश करील.



# संघवृत्तम्—एकादशमधिकरणम् ।



## अध्याय १३५ भेदोपादानानि, उपांशुदण्डश्च ।



सङ्घलाभो दण्डमित्रलाभानामुत्तमः । सङ्घा हि संहतत्वादधृष्याः परेषाम् ।ताननुगुणान् भुञ्जीत सामदानाभ्याम् । विगुणान् भेददण्डाभ्याम् ।

काम्बोजसुराष्ट्रक्षत्रियश्रेण्यादयो वार्ताशस्त्रोपजीविनः । लिच्छिविकव्रजिकमल्लकमद्रककुकुर-कुरुपाञ्चालादयो राजशब्दोपजीविनः ।

सर्वेषामासन्नाः सत्रिणः सङ्घानां परस्परन्यङ्गद्वेषवैरकलहस्थानान्युपलभ्य क्रमाभिनीतं भेदमुपचारयेयुः—'असौ त्वा विजल्पति' इति । एवमुभयतः । बद्धरोषाणां विद्याशिल्पद्यूतवैहारिकेष्वाचार्यव्यञ्जना बालकलहानुत्पादयेयुः । वेशशौण्डिकेषु वा प्रतिलोमप्रशंसाभिः सङ्घमुख्यमनुष्याणां तीक्ष्णाः कलहानुत्पादयेयुः; कृत्यपक्षोपग्रहेण वा ।

कुमारकान् विशिष्टच्छन्दिकया हीनच्छन्दिकानुत्साहयेयुः । विशिष्टानां चैकपात्रं विवाहं हीनेभ्यो वारयेयुः । हीनान् वा विशिष्टैरेकपात्रे विवाहे वा योजयेयुः । अवहीनान् वा तुल्यभावोपगमने

## अधिकरण ११ वें. संघाचें वर्तन.

### भेदाचा प्रयोग व गुप्त शिक्षा.

सम्याचें किंवा दोस्त राजाचें साहाय्य मिळविण्यापेक्षां लोकसंघाचें साहाय्य मिळवलें, तर तें अधिक चांगलें. संघ एकजुटीनें वागणारे असल्यामुळें शत्रूला ते दाद देत नाहींत; म्हणून जे संघ आपल्यास अनुकूल असतील, त्यांस सामोपचारानें व द्रव्यदानानें आपल्या अंकित करून ठेवावें; आणि जे आपल्यास प्रतिकूल असतील, त्यांस भेदानें व धाकदपटशानें वश करून घ्यावें.

काम्बोज, सुराष्ट्र वगैरे देशांतील क्षत्रियादिकांचे संघ शेती, व्यापार व शस्त्रें यांवर उपजीविका करतात. लिच्छिविक, व्रजिक, मल्लक, मद्रक, कुकुर, कुरु, पांचाल वगैरे देशांतील संघ राजा पदवी धारण करून क्षत्रियत्वानें निर्वाह करतात.

गुप्त हेरांनीं या सर्व संघांत शिरून त्यांच्यांत एकमेकांविषयीं तिटकारा, द्वेष, वैर इत्यादि कलहाचीं कारणें असतील तीं पाहून ठेवावीं आणि मग त्यांच्यांत हळूहळू वितुष्ट पाडण्यास सुरवात करावी. 'अमुक अमुक तुला शिव्या देतो, असें एकास सांगावें, दुसरीकडे दुसऱ्यासहि असेंच चिथवावें. याप्रमाणें विद्या शिल्पकला, द्यूत अथवा इतर खेळ यासंबंधांत त्यांच्यांत तंटा लागला म्हणजे आचार्य बनलेल्या गुप्त हेरांनीं त्यांस पोरकटासारखी मारामारी करावयास लावावें. अथवा गुंडहेरांनीं बावनखणींत किंवा गुत्त्यांत बसून संघांतील प्रमुख प्रमुख माणसांदेखत हीन जातीय लोकांची प्रशंसा करून व अथवा फितुरी लोकांस हाताशीं धरून तंटे लावावे.

ज्यांना खासगी खर्चाची रक्कम कमी मिळते अशा क्षत्रिय-पुत्रांस, 'तुम्हांस खरोखर अधिक रक्कम मिळाली पाहिजे' असें सांगून चिथवावें; थोरकुळांतील असतील त्यांचा हीन कुळांतील लोकांबरोबर रोटीव्यवहार व बेटीव्यवहार होऊं देऊं नये अथवा कनिष्ठ वर्गातील लोकांना उच्च वर्गातील लोकांबरोबर तुमचा रोटीव्यवहार व बेटीव्यवहार घडला पाहिजे असें सांगून चिथवावें. जे लोक कुळानें, पराक्रमानें व सामाजिक दर्जानें हीन असतील त्यांस तुम्ही आपणांस हीन कां समजतां, तुम्हीहि वरिष्ठ जातिप्रमाणें वागावयास लागा असें सांगून त्यांस चेतवावें. संघांत जी

कुलतः पौरुषतः स्थानविपर्यासतो वा व्यवहारमवस्थितं वा प्रतिलोमस्थापनेन निशामयेयुः । विवादपदेषु वा द्रव्यपशुमनुष्याभिघातेन रात्रौ तीक्ष्णाः कलहानुत्पादयेयुः ।

सर्वेषु च कलहस्थानेषु हीनपक्षं राजा कोशदण्डाभ्यामुपगृह्य प्रतिपक्षवधे योजयेत्, भिन्नानपवाहयेद् वा । एकदेशे समस्तान् वा निवेश्य भूमौ चैषां पञ्चकुलीं दशकुलीं वा कृष्यां निवेशयेत् । एकस्था हि शस्त्रग्रहणसमर्थाः स्युः । समवाये चैषामत्ययं स्थापयेत् ।

राजशब्दिभिरवरुद्धमवक्षिप्तं वा कुल्यमभिजातं राजपुत्रत्वे स्थापयेत् । कार्तान्तिकादिश्चास्य वर्गो राजलक्षण्यतां सङ्घेषु प्रकाशयेत् । सङ्घमुख्यांश्च धर्मिष्ठानुपजपेत्—' स्वधर्ममसुष्य राज्ञः पुत्रे भ्रातरि वा प्रतिपद्यध्वम् ' इति । प्रतिपन्नेषु कृत्यपक्षोपग्रहार्थमर्थं दण्डं च प्रेषयेत् । विक्रमकाले शौण्डिकव्यञ्जनाः पुत्रदारप्रेतापदेशेन ' नैषेचनिकम् ' इति मदनरसयुक्तान् मद्यकुम्भान् शतशः प्रयच्छेयुः ।

चैत्यदैवतद्वाररक्षास्थानेषु च सत्रिणः समयकर्मनिक्षेपं सहिरण्याभिज्ञानमुद्राणि हिरण्यभाजनानि च प्ररूपयेयुः; दृश्यमानेषु च सङ्घेषु ' राजकीयाः ' इत्यावेदयेयुः । अथावस्कन्दं दद्यात् ।

सङ्घानां वा वाहनहिरण्ये कालिके गृहीत्वा सङ्घमुख्याय प्रख्यातं द्रव्यं प्रयच्छेत् । तदेषां याचिते ' दत्तमसुष्मै मुख्याय ' इति ब्रूयात् ।

एतेन स्कन्धावाराटवीभेदो व्याख्यातः ।

---

वहिवाट चालू असेल तिच्याविरुद्ध वहिवाट चालावी असें सांगत सुटावें. लोकांचे आपसांत वांकडे आलें म्हणजे कोणाची वस्तु, जनावर अथवा आप्तसंबंधी मनुष्य याचा गुंड हेरांनीं गुप्तपणें घात करून त्यांच्यांत भांडणें लावावीं.

सर्व प्रकारच्या तंट्यांत राजानें कमजोर पक्षाची कड घेऊन आणि त्यांस द्रव्य व सैन्य पुरवून आपणा आधीन करावें, आणि त्यांच्या मदतीनें विरुद्धपक्षाचा नाश करावा; अथवा त्यांच्यांत फूट पडली, तर त्यांस हद्दपार करावें; अथवा त्या सर्वांस लागवडीस लायक अशी एकाद्या देशांतली जमीन दाखवून, तेथें पांच पांच कुलें अथवा दहा दहा कुलें अशी वस्ती करावयास सांगावें, कारण ते सर्व एके ठिकाणीं राहिले तर ते शस्त्र घेऊन बंड करावयास समर्थ होतील. अशी वेगवेगळी वस्ती करावयास लावल्यावर ते एकत्र जमूं लागतील तर त्यास दंड म्हणजे शिक्षा ठरवावी !

युवराज–पदापासून च्युत झालेला किंवा बंदीवान झालेला एखादा थोर घराण्यांतील क्षत्रिय–पुत्र असेल तर त्यास राजपुत्र असें पद द्यावें. ज्योतिषी वगैरे बनलले गुप्त हेर असतील त्यांनीं संघांतील लोकांस सदर राजपुत्राचीं राज–लक्षणें दाखवावीं; आणि संघांतील धर्मनिष्ठ लोकांस असें सांगावें कीं—' हा अमुक अमुक राजाचा पुत्र आहे, आतां हाच तुमचें म्हणणें असेल तें ऐकणार आहे, यास तुम्ही आपला राजा समजा व आपलीं कर्तव्यें धर्मानुसार करा. ' यावर विश्वास ठेवून जे त्या क्षत्रियपुत्रास राजपुत्र म्हणून कबूल करतील, त्यांस आधिक लोक फितूर करण्याकरितां द्रव्य व सैन्य यांची मदत पाठवावी. दंग्याच्या प्रसंगीं दारूविके बनलेले गुप्त हेर असतील त्यांनीं ' अमक्याचा मुलगा मेला, अमक्याची बायको मेली असें खोटेंच सांगून, ' हें घ्या नैषेचनिक ' असें म्हणून मदनरस नामक विष मिसळलेले दारूचे शेंकडों घडे त्यास प्यावयास द्यावे.

सत्रि–हेरांनीं अग्निगृहाच्या किंवा देवळाच्या दारांत अथवा एखाद्या रखवालदाराच्या पहाऱ्याखालीं असलेल्या ठिकाणीं जाऊन, " आमचा अमुक करार झाला आहे, आम्हांस अमुक अमुक कार्य करावयाचें आहे, अमुक अमुक इनाम मिळालें आहे, या सुवर्ण–नाण्यांच्या थैल्या, यांत इतकीं सुवर्णनाणीं आहेत, यांवर मोहोर पहा " असें सर्वांस जाहीर करावें. तदनंतर संघांतील लोक पुढ आले म्हणजे त्यांस असें सांगावें कीं, " हें द्रव्य राजाचें आहे " असें सांगून त्यांच्याशीं युद्धास तयार व्हावें.

अवघ्या संघाच्या मालकीचीं बसावयाचीं जनावरें व सुवर्ण-वस्तु असतील, तीं हस्तगत करून त्यांतील निवडक निवडक जनावरें व वस्तु संघांतील मुख्यास द्यावीं; संघांनीं मागितल्यास, ' अमुक मुख्यास दिलीं ' म्हणून सांगावें,

शत्रूच्या छावणींत व रानटी लोकांत फूट कशी पाडावी, हें यावरून समजून येईल.

सङ्घमुख्यपुत्रमात्मसम्भावितं वा सत्री ग्राहयेत्—'अमुष्य राज्ञः पुत्रस्त्वं शत्रुभयादिह न्यस्तोऽसि ' इति; प्रतिपन्नं राजा कोशदण्डाभ्याम् उपगृह्य सङ्घेषु विक्रमयेत्; अवाप्तार्थस्तमपि प्रवासयेत् ।

बन्धकीपोषकाः प्लवकनटनर्तकसौभिका वा प्रणिहिताः स्त्रीभिः परमरूपयौवनाभिः संघमुख्यानुन्मादयेयुः । जातकामानामन्यतमस्य प्रत्ययं कृत्वान्यत्र गमनेन प्रसभहरणेन वा कलहानुत्पादयेयुः । कलहे तीक्ष्णाः कर्म कुर्युः—'हतोऽयमित्थं कामुकः ' इति ।

विसंवादितं वा मर्षयमाणमभिसृत्य स्त्री ब्रूयात्—' असौ मां मुख्यस्त्वयि जातकामां बाधते; तस्मिन् जीवति नेह स्थास्यामि ' इति घातमस्य प्रयोजयेत् ।

प्रसह्यापहृता वा वनान्ते क्रीडागृहे वापहर्तारं रात्रौ तीक्ष्णेन घातयेत् । स्वयं वा रसेन । ततः प्रकाशयेद्—' अमुना मे प्रियो हतः ' इति ।

जातकामं वा सिद्धव्यञ्जनः सांवननिकीभिरोषधीभिः संवास्य रसेनातिसन्धायापगच्छेत् । तस्मिन्नपक्रान्ते सत्रिणः परप्रयोगमभिशंसेयुः ।

आढ्यविधवा गूढाजीवा योगस्त्रियो वा दायनिक्षेपार्थं विवदमानाः सङ्घमुख्यानुन्मादयेयुः इति । अदितिकौशिकस्त्रियो नर्तकीगायना वा । प्रतिपन्नान् गूढवेश्मसु रात्रिसमागमप्रविष्टांस्तीक्ष्णा हन्युर्बद्ध्वा हरेयुर्वा ।

सत्री वा स्त्रीलोलुपं सङ्घमुख्यं प्ररूपयेत्—' अमुष्मिन् ग्रामे दरिद्रकुलमपसृतं; तस्यस्त्री राजार्हा

---

संघाच्या पुढाऱ्याचा एखादा स्वाभिमानी पुत्र असेल, त्यास सत्रि-हेरानें जाऊन असें चिथवावें कीं—" तूं खरोखर अमक्या राजाचा पुत्र आहेस, शत्रूच्या भीतीमुळें तुला इकडे आणून ठेविलें आहे. त्या पुत्रानें यावर भरंवसा ठेविला, म्हणजे राजानें त्यास पैशाची व सैन्याची मदत करून संघाविरुद्ध लढावयास लावावें; आणि मग आपला मनोदय सिद्धीस गेला म्हणजे राजानें त्या पुत्रासहि हद्दपार करावें.

वेश्या बाळगणारे, कोल्हाटी, नट, नाचकाम करणारे व गारुडी बनलेले अशा हेरांनीं अत्यंत सुंदर व तरुण स्त्रियांच्या मदतीनें संघांतील मुख्य लोकांस वेड लावावें; आणि ते त्या स्त्रियांच्या नादीं लागले म्हणजे त्यांमधील एकाशीं संकेत करून ठेवावा आणि मग त्यास सांगावें कीं, ती स्त्री तुजकडे येत असतां दुसरीकडेच गेली अथवा तिला अमक्यानें बलात्कारानें हरण करून नेलें आहे; अशारितीनें त्यांमध्यें तंटे लावावे; मारामारी झाली म्हणजे गुंड हेरांनीं येऊन कार्य करावें आणि म्हणावें, "हा पहा, व्यभिचाराच्या नादीं लागलेला असा मारला गेला."

स्त्रीनें एखाद्या मुख्याशीं केलेला संकेत पाळला नसूनहि तिला त्या मुख्यानें क्षमा केली असेल, तेव्हां त्या स्त्रीनें त्याकडे जाऊन असें कळवावें कीं—" तुमच्यावर माझें मन गेलें आहे, म्हणून अमुक अमुक मुख्य मला त्रास देतो; तो जिवंत आहे, तों पर्यंत मला आपल्याजवळ राहतां येणार नाहीं " अशी त्यास चिथावणी देऊन, खून करण्यास प्रवृत्त करावें.

ज्या स्त्रीला बलात्कारानें हरण करून नेलें असेल, तिनें रात्रीच्या वेळीं एखाद्या गुंडहेराच्या मदतीनें, अथवा स्वतःच विषप्रयोग करून, हरण करणारास वनांत किंवा क्रीडा-गृहांत ठार करावें. आणि असें जाहीर करावें कीं, ' अमुक एका तिसऱ्याच इसमानें माझ्या प्रियकराचा घात केला. ' स्त्रीच्या नादीं लागलेल्या मुख्यावर वशीकरण-वनस्पतींचा अथवा विषारी रसाचा प्रयोग करून गोसावीहेरानें पळून जावें; तो पळून गेल्यानंतर, हा प्रयोग इतर हेरांनीं दुसऱ्या कोणाच्या तरी माथीं लादावा.

विधवांनीं, व्यभिचारिणी स्त्रियांनीं अथवा गुप्त कामगिरीकरितां नेमलेल्या स्त्री-हेरांनीं राजदरबारांत जाऊन राजापाशीं ठेविलेल्या ठेवीबद्दल वाद चालवावा व तेथें असलेल्या संघ-मुख्यांस आपल्या नादीं लावावें. वेश्या, नाचणाऱ्या व गाणाऱ्या स्त्रिया, यांनीं आपल्या वल्लभांस रात्रीं एखाद्या गुप्त-स्थळीं भेटावयास बोलवावें व त्यास्थलीं ते आल्यावर, गुप्त हेरांनीं त्यांस मारावें, किंवा बांधून हरण करून न्यावें.

अथवा-सत्रि-हेरानें संघांतील एखाद्या स्त्रीलंपट मुख्यास असें सुचवावें कीं, " अमुक गांवांतील अमक्या दरिद्री कुलांतील मुख्य पळून गेला आहे, त्याची स्त्री राजाला अगदीं योग्य अशी आहे, तिला पकडून आण. " अशा

गृहाणैनाम् ' इति । गृहीतायामर्धमासान्तरं सिद्धव्यञ्जनो दूष्यः सङ्घमुख्यमध्ये प्रक्रोशेत्--' असौ मे मुख्यां भार्यां स्नुषां भगिनीं दुहितरं वाधिचरति ' इति । तं चेत् सङ्घो निगृह्णीयात्, राजैनमुपगृह्य विगुणेषु विक्रमयेत् । अनिगृहीते सिद्धव्यञ्जनं हि रात्रौ तीक्ष्णाः प्रवासयेयुः । ततस्तद्व्यञ्जनाः प्रक्रोशेयुः--' असौ ब्रह्महा ब्राह्मणीजारश्च ' इति ।

कार्तान्तिकव्यञ्जनो वा कन्यामन्येन वृतामन्यस्य प्ररूपयेत्—' अमुष्य कन्या राजपत्नी राजप्रसाविनी च भविष्यति; सर्वस्वेन प्रसह्य वैनां लभस्व ' इति । अलभ्यमानायां परपक्षमुद्धर्षयेत् । लब्धायां सिद्धः कलहः ।

भिक्षुकी वा प्रियभार्यं मुख्यं ब्रूयात्--' असौ ते मुख्यो यौवनोत्सिक्तो भार्यायां मां प्राहिणोत्; तस्याहं भयाल्लेख्यमाभरणं गृहीत्वागतास्मि; निर्दोषा ते भार्या; गूढमस्मिन् प्रतिकर्तव्यम् । अहमपि तावत् प्रतिपत्स्यामि ' इति । एवमादिषु कलहस्थानेषु स्वयमुत्पन्ने वा कलहे तीक्ष्णैरुत्पादिते वा हीनपक्षं राजा कोशदण्डाभ्यामुपगृह्य विगुणेषु विक्रमयेदपवाहयेद् वा ।

सङ्घेष्वेवमेकराजो वर्तेत । सङ्घाश्चाप्येवमेकराजादेतेभ्योऽतिसन्धानेभ्यो रक्षयेयुः ।

सङ्घमुख्यश्च सङ्घेषु न्यायवृत्तिर्हितः प्रियः । दान्तो युक्तजनस्तिष्ठेत् सर्वचित्तानुवर्तकः ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे सङ्घवृत्ते एकादशाऽधिकरणे प्रथमोऽध्यायः भेदोपादानानि
उपांशुदण्डश्च, आदितः पञ्चत्रिंशच्छततमः ।

**एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य सङ्घवृत्तमेकादशमधिकरणं समाप्तम् ॥**

---

रीतीनें सदर स्त्री पकडली गेली, म्हणजे पंधरा दिवसांनीं गोसावी–हेरानें संघाकडे जाऊन सदर स्त्रीलंपट मुख्यावर अशी फिर्याद आणावी कीं, " यानें माझी प्रमुख स्त्री, सून, बाहिण किंवा मुलगी हिजवर अत्याचार केला आहे. " त्यास जर संघानें शिक्षा केली, तर राजानें त्या शिक्षा पावलेल्यास हातीं धरून आपल्याविरुद्ध जे असतील त्यांची खोड मोडावी. संघानें शिक्षा केली नाहीं, तर गुंड हेरांनीं गोसावी हेरांस रात्रींच्या रात्रीं पळवून लावावें; आणि मग प्रसंगानुसार वेष धारण करणाऱ्या गुप्तहेरांनीं संघ-मुख्यावर असा आरोप जाहीरपणें करावा कीं—" हा माणूस अमुक अमुक ब्राह्मणस्त्रीशीं लंपट झाला आहे, यानें अमुक ब्राह्मणाचा खून केला आहे ! "

ज्योतिषी-हेरानें एखाद्याच्या नवरी म्हणून ठरलेल्या कन्येची लक्षणें दुसऱ्या एखाद्यास वर्णून सांगावीं— "अमक्याची कन्या कोणातरी राजाची बायको व राजपुत्राची आई होणार आहे; म्हणून हव्या त्या उपायानें तिला जबरदस्तीनें प्राप्त करून घे '. तिची प्राप्ति त्यास झाली नाहीं तर दुसऱ्या पक्षांतील लोकांस चिथवावें. आणि प्राप्ति झाली तर कलह हा ठेवलेलाच आहे!

भिक्षुकिणीचा वेष घेतलेल्या स्त्री–हेरानें संघामधील जो एखादा मुख्य पुरुष पत्नीवर प्रेम करणारा असेल, त्यास असें कळवावें कीं, " अमुक अमुक मुख्य तारुण्यमदानें तुझ्या पत्नीकडे निरोप देऊन मला धाडीत आहे; मला त्याचा मोठा धाक वाटतो, म्हणून त्याचें पत्र व दागिने घेऊन मी जात आहे; तुझी पत्नी खरोखर निर्दोषी आहे; गुप्तपणानें याबाबतींत उपाय योजिला पाहिजे; मीहि तुला मदत करीन". अशीं तंट्याचीं कारणें उपस्थित करून स्वतः किंवा गुंडहेरांकरवीं तंटे लावले म्हणजे राजानें कमजोर पक्षास द्रव्याची व सैन्याची मदत देऊन बलिष्ठ पण प्रतिकूल पक्षाविरुद्ध उठावयास त्यास प्रवृत्त करावें अथवा त्यास दुसरीकडे धाडून द्यावें.

याप्रमाणें सर्व संघांवर अनियंत्रित अंमल चालवावा आणि एकाच राजाच्या अमलाखालीं असलेल्या संघांनीं विश्वासघातापासून आपला बचाव करावा.

संघांतील पुढाऱ्यानें न्यायानें व प्रेमानें वागून, इंद्रियें ताब्यांत ठेवून आणि आपल्या अनुयायांच्या मताप्रमाणें वर्तन ठेवून, सर्वांचें प्रेम संपादन करावें.

---

# आबलीयसं--द्वादशमधिकरणम् ।



## अध्याय १२६ दूतकर्माणि ।



'बलीयसाभियुक्तो दुर्बलः सर्वत्रानुप्रणतो वेतसधर्मा तिष्ठेत् । इन्द्रस्य हि स प्रणमति, यो बलीयसो नमति' इति भारद्वाजः ।

'सर्वसन्दोहेन बलानां युध्येत, पराक्रमो हि व्यसनमपहन्ति; स्वधर्मश्चैष क्षत्रियस्य; युद्धे जयः पराजयो वा' इति विशालाक्षः ।

नेति कौटल्यः । सर्वत्रानुप्रणतः कुलैडक इव निराशो जीविते वसति । युध्यमानश्चाल्पसैन्यः समुद्रमिवाप्लवोऽवगाहमानः सीदति । तद्‌विशिष्टं तु राजानमाश्रितो दुर्गमविषह्यं वा चेष्टेत ।

त्रयोऽभियोक्तारो धर्मलोभासुरविजयिन इति । तेषामभ्यवपत्त्या धर्मविजयी तुष्यति; तमभ्यवपद्येत परेषामपि भयात् । भूमिद्रव्यहरणेन लोभविजयी तुष्यति; तमर्थेनाभ्यवपद्येत । भूमिद्रव्यपुत्रदारप्राणहरणेन असुरविजयी; तं भूमिद्रव्याभ्यामुपगृह्याग्राह्यः प्रतिकुर्वीत ।

---

## अधिकरण १२ वें.

### दुर्बलाचें बलसंपन्न होईपर्यंतचें वर्तन, दूताचीं कामें.

" बलिष्ठ राजानें स्वारी केली असतां दुर्बल राजानें सर्व बाबतींत मान लववून वेतासारखी म्हणजे नम्रवृत्ति धारण करून रहावें. कारण, जो बलिष्ठास नमस्कार करितो, तो इंद्रास नमस्कार करितो असें समजावें, " असें भारद्वाज म्हणतो.

विशालाक्ष म्हणतो--" अशावेळीं आपल्यापाशीं जेवढें सैन्य असेल, तेवढ्या सर्व सैन्यानिशीं लढलें पाहिजे, कारण शौर्यानेंच संकटाचा प्रतिकार होतो; युद्धांत यश येवो अथवा अपयश येवो, युद्धापासून परावृत्त न होणें हा क्षत्रियाचा स्वाभाविक धर्म आहे. "

यावर कौटिल्य म्हणतो—सदोदित मान लववून दीनपणानें राहणाऱ्या राजाला घरांत पोसलेल्या मेंढ्याप्रमाणें, स्वतःच्या जिवाची निराशाच वाटत असते. थोडेंच सैन्य घेऊन लढाई देणारा राजा नावेवांचून समुद्र उल्लंघन करूं पाहणाऱ्या माणसाप्रमाणें केव्हांतरी बुडाल्यावांचून राहात नाहीं. म्हणून दुर्बलानें एखाद्या बलवान राजाचा किंवा दुर्घट किल्ल्याचा आश्रय घेऊन हातपाय हालवीत असावें.

स्वारी करणाऱ्यांचे न्यायी, लोभी व राक्षसी असे तीन प्रकार आहेत.

या तिघांतून जो न्यायी त्यास शरण गेलें म्हणजे तो प्रसन्न होतो, म्हणून त्यास शरण जावें. इतर शत्रूंची भीति वाटत असेल तेव्हांहि त्यांस शरण जावें.

लोभानें स्वारी करणारा राजा भूमि व लूट हरण करून तुष्ट होतो, म्हणून त्यास द्रव्य देऊन प्रसन्न करावें.

असुरविजयी राजाची तृप्ति भूमि, द्रव्य व बायकामुलें लुटल्यानें, व जित राजाचा प्राण हरण केल्यानें होते; म्हणून दुर्बलानें त्यास भूमि व द्रव्य अर्पण करून आणि त्याच्या कचाट्यांत न सांपडण्यासारख्या स्थळीं राहून, त्याचा प्रतिकार करण्याची योजना चालवावी.

तेषामुत्तिष्ठमानं सन्धिना मन्त्रयुद्धेन कूटयुद्धेन वा प्रतिव्यूहेत । शत्रुपक्षमस्य सामदानाभ्यां; स्वपक्षं भेददण्डाभ्याम् । दुर्गं राष्ट्रं स्कन्धावारं वास्य गूढाः शस्त्ररसाग्निभिः साधयेयुः । सर्वतः पार्ष्णिमस्य ग्राहयेत्; अटवीभिर्वा राज्यं घातयेत्; तत्कुलीनावरुद्धाभ्यां वा हारयेत् । अपकारान्तेषु चास्य दूतं प्रेषयेत् । अनपकृत्य वा सन्धानम् ।

तथाप्यभिप्रयान्तं कोशदण्डयोः पादोत्तरमहोरात्रोत्तरं वा सन्धिं याचेत ।

स चेद् दण्डसन्धिं याचेत, कुण्ठमस्मै हस्त्यश्वं दद्याद्, उत्साहितं वा गरयुक्तम् । पुरुषसन्धिं याचेत, दूष्यामित्राटवीबलमस्मै दद्याद् योगपुरुषाधिष्ठितम् । तथा कुर्याद् यथोभयविनाशः स्यात् । तीक्ष्णबलं वास्मै दद्यात्, यदवमानितं विकुर्वीत । मौलमनुरक्तं वा, यदस्य व्यसनेऽपकुर्यात् ।

कोशसन्धिं याचेत, सारमस्मै दद्यात्, यस्य क्रेतारं नाधिगच्छेत्; कुप्यमयुद्धयोग्यं वा ।

भूमिसन्धिं याचेत, प्रत्यादेयां नित्यामित्रामनपाश्रयां महाक्षयव्ययनिवेशां वास्मै भूमिं दद्यात् ।

सर्वस्वेन वा राजधानीवर्जेन सन्धिं याचेत बलीयसः ॥

यत् प्रसह्य हरेदन्यस्तत् प्रयच्छेदुपायतः । रक्षेत् स्वदेहं न धनं का ह्यनित्ये धने दया ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे आबलीयसे द्वादशाऽधिकरणे दूतकर्माणिनाम प्रथमोऽध्यायः

आदितः षट्त्रिंशच्छततमः ।

---

वर वर्णिलेल्या तिघांपैकीं जेव्हां एखादा राजा आपल्यावर चालून येईल तेव्हां तहाचें बोलणें लावावें, अथवा कांहीं कारस्थान करून त्यास मोडून काढावें अथवा गनिमीकाव्याची लढाई चालवावी. तहाचें बोलणें लावावयाचें तें त्याच्या शत्रुपक्षांतील लोकांशीं लावावें; कारस्थान लढवावयाचें तें आपल्यांतील फितुरी लोकांना वळविण्याकारितां योजावें आणि गुप्त प्रयोग किंवा गनिमी कावा करावयाचा तो त्याच्या किल्ल्यावर, छावणीवर किंवा त्याच्या मुलखांतच गुप्त हेरांच्या हातून शस्त्र, विष किंवा जाळपोळ यांच्या द्वारें करावा. त्याची पिछाडी सर्व बाजूंनीं जर्जर करावी; रानटी लोकांच्याकडून त्याच्या राज्यांत धुमाळी माजवावी; अथवा त्याच्या आप्तांकरवीं किंवा बंदिवान राजपुत्राकरवीं त्याचें राज्यहरण करवावें. अशा प्रकारें त्यास जर्जर केल्यावर त्याजकडे तहासाठीं दूत पाठवावे अथवा शक्य तर त्यास कांहींएक इजा न करितांच तहाचें बोलणें लावावें.

इतकेंहि करून, तो जर स्वारी चालूंच ठेवील तर त्यास पूर्वींच्या बोलण्यापेक्षां सवापट द्रव्य व सैन्य द्यावयाचें कबूल करून किंवा पूर्वींच्या मुदतीहून अधिक मुदतीचा करार कबूल करून तह करण्याची विनंति करावी.

असल्या तहांत त्यानें हत्ती, घोडे देण्याची अट घातली, तर त्यास नाठाळ किंवा तडफदार पण विष घातलेले हत्तीघोडे द्यावे; शिपाई देण्याची अट घातली, तर त्यास ज्यांत विश्वासघातकी, आडमुठे व रानटी लोक यांचा भरणा आहे असें सैन्य द्यावें; या सैन्यावर गुप्तप्रयोगांत प्रवीण असा मनुष्य मुख्याधिकारी नेमावा, म्हणजे तो आपल्या दिलेल्या व शत्रूच्या राज्यांतल्या अशा दोन्ही सैन्यांचा नाश करील; अथवा ज्यांत गुंड लोक आहेत असें सैन्य त्यास द्यावें, म्हणजे अशा लोकांचा जरा अपमान झाला कीं, ते दंगा केल्यावांचून राहाणार नाहींत; अथवा आपल्या जवळील राजनिष्ठ असें जें पिढीजाद सैन्य असेल तेंच द्यावें, म्हणजे तें त्याच्या संकटांत त्याला अपायकरील.

तहामध्यें त्यानें द्रव्याची अट घातली, तर अशीं बहुमोल रत्नें द्यावीं कीं, त्यांस गिऱ्हाइकच मिळणार नाहीं; किंवा असला कच्चा माल द्यावा कीं, तो युद्धास केव्हांहि उपयोगी पडूं नये.

एखादा प्रांत देण्याची त्यानें अट घातली तर अशी भूमि द्यावी कीं, जी पुन्हा केव्हां तरी परत मिळवितां येईल, किंवा जींत सदैव शत्रुत्वानें राहणारे लोक राहतात, अथवा जींत कोणतीहि सोय नाहीं, अथवा जींत वसाहत करावयाची झाल्यास, पुष्कळ द्रव्यहानि व मनुष्यहानि सोसावी लागेल अशी भूमि द्यावी.

एवढ्यानें न भागेल तर राजधानीसेरीज वाटेल तें देण्याचें कबूल करून बलिष्ठाशीं तहाचें बोलणें लावावें.

जें कदाचित् दुसरा शत्रु हरण करील, तें कोणत्या तरी युक्तीनें बलाढ्य शत्रूस पत्करण्यास लावावें; धनाचें संरक्षण करण्याच्या ऐवजीं धन देऊन आपल्या देहाचें संरक्षण केलें पाहिजे; कारण अनित्य असें जें धन त्याचा लोभ कसचा धरावयाचा ?

# अध्याय १३७ मन्त्रयुद्धम् ।



स चेत् सन्धौ नावतिष्ठेत, ब्रूयादेनम्--"इमे षड्वर्गवशगा राजानो विनष्टाः तेषामनात्मवतां नार्हसि मार्गमनुगन्तुं; धर्ममर्थं चावेक्षस्व; मित्रमुखा ह्यमित्रास्ते ये त्वां साहसमधर्ममर्थातिक्रमं च ग्राहयन्ति; शूरैस्त्यक्तात्मभिः सह योद्धुं साहसं; जनक्षयमुभयतः कर्तुमधर्मः; दृष्टमर्थं मित्रमदुष्टं च त्यक्तुमर्थातिक्रमः; मित्रवांश्च स राजा भूयश्चैतेन अर्थेन मित्राण्युद्योजयिष्यति यानि त्वा सर्वतोऽभियास्यन्ति; न च मध्यमोदासीनयोर्मण्डलस्य वा परित्यक्तः; भवांस्तु परित्यक्तो ये त्वां समुद्युक्तमुपप्रेक्षन्ते--भूयः क्षयव्ययाभ्यां युज्यतां; मित्राच्च भिद्यतां; अथैनं परित्यक्तमूलं सुखेनोच्छेत्स्याम इति। स भवान् नार्हति मित्रमुखानाममित्राणां श्रोतुं, मित्राण्युद्वेजयितुम्, अमित्रांश्च श्रेयसा योक्तुं; प्राणसंशयमनर्थं चोपगन्तुम्" इति । यच्छेत् ।

तथापि प्रतिष्ठमानस्य प्रकृतिकोपमस्य कारयेद् यथा सङ्घवृत्ते व्याख्यातं, योगवामने च। तीक्ष्णरसदप्रयोगं च । यदुक्तमात्मरक्षितके रक्ष्यं, तत्र तीक्ष्णान् रसदांश्च प्रयुञ्जीत ।

बन्धकीपोषकाः परमरूपयौवनाभिः स्त्रीभिः सेनामुख्यानुन्मादयेयुः । बहूनामेकस्या द्वयोर्वा

---

## कारस्थानी युद्ध.

वरील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें प्रयत्न करून देखील तो बलाढ्य शत्रु तह करण्यास कबूल न होईल, तर त्यास दूतामार्फत सांगून पाठवावें तें असें—"कामक्रोधादि षड्रिपूंच्या आधीन झालेले राजे नाश पावले आहेत, त्याच अविचारी राजांचा मार्ग तूं परकरणें योग्य नव्हे. आपला धर्म काय, आपला अर्थ कशांत आहे, हें लक्षांत आण. जे तुला या साहसांत उडी टाकावयास आणि अधर्माचा व अनर्थाचा मार्ग स्वीकारण्यास तुला प्रवृत्त करीत आहेत, ते बाह्यतः मित्रासारखे दिसत असले तरी खरोखर ते शत्रु आहेत. प्राणाचीहि पर्वा न करतां लढणाऱ्या शूर पुरुषांबरोबर लढण्याचा प्रसंग आणणें हें साहसच. दोनहि बांजूकडील लोकांचा संहार करणें हाच अधर्म; आणि आज हातीं येणारी खंडणी आणि प्राप्त होणारा सरळ स्वभावाचा मित्र, यांचा अव्हेर करणें हा अनर्थ होय. शिवाय आमच्या राजास कोणी मित्र नाहींत असें नाहीं. तुला जी खंडणी द्यावयाची ती खंडणी आपल्या मित्रांना देऊन तो राजा त्या मित्रांस तुझ्या विरुद्ध उठवील; मग ते तुला सर्व बाजूंनीं घेरल्या वांचून राहाणार नाहींत. मंडलामधील राजांनीं किंवा मध्यम व तटस्थ रांजानीं आमच्या राजाला अगदींच हातचा सोडला आहे असें नाहीं, पण तुला मात्र त्यानीं सोडलें आहे; कशावरून म्हणशील तर तुझें नुकसान करण्यासाठींच ही स्वारी करण्यास तयार झालेल्या तुझी ते उपेक्षा करीत आहेत. ते आपल्या मनांत म्हणत आहेत—"याची चांगली द्रव्यहानि व मनुष्यहानि होऊंदे; याचे सगळे मित्र याला सोडून जाऊं देत; अशा रीतीनें त्याचा आधार तुटल्याबरोबर आपण सहज त्याचा उच्छेद करून टाकूं.' म्हणून वरवर मित्रत्व दाखविणारे पण खरेखरे शत्रु अशांचें ऐकूं नकोस; खऱ्या मित्रांचा छळ करून त्यांना चिडवूं नकोस; शत्रूंचा आयता फायदा करून देऊं नकोस; आणि स्वताच्या प्राणावर व अर्थावर संकट आणूं नकोस.

इतकें सांगितल्यानंतर सुद्धां बलाढ्य शत्रु आपला हेका सोडणार नाहीं, तर 'संघवृत्त' व 'योग वामन' या अधिकरणांत सांगितल्याप्रमाणें शत्रूच्या प्रकृतिवर्गांत असंतोष उत्पन्न करून गोंधळ माजवावा. गुंडांचा किंवा विषाचा उपयोग करावा. 'आत्मरक्षितक' या प्रकरणांत सांगितलेल्या ठिकाणीं शत्रुराज्यांत गुंडहेर व विषप्रयोग करणारे हेर ठेवावे.

नंतर वेश्या बाळगणाऱ्या माणसांनीं अत्यंत सुंदर व तरुण स्त्रियांच्या मदतीनें शत्रूच्या सैन्यावरील अधिकाऱ्यांस वेडलावावें. पुष्कळांचें किंवा निदान दोघां माणसांचें एकाच वेश्येवर मन बसलें म्हणजे त्यांपैकीं एकास गुंडहेरांनीं चिथवून

मुख्ययोः कामे जाते तीक्ष्णाः कलहानुत्पादयेयुः । कलहे पराजितपक्षं परत्रापगमने यात्रासाहाय्यदाने वा भर्तुर्योजयेयुः । कामवशान् वा सिद्धव्यञ्जनाः सांवननिकीभिरोषधीभिरातिसन्धानाय मुख्येषु रसं दापयेयुः ।

वैदेहकव्यञ्जनो वा राजमहिष्याः सुभगायाः प्रेष्यामासन्नां कामनिमित्तमर्थेन अभिवृष्य परित्यजेत् । तस्यैव परिचारकव्यञ्जनोपदिष्टः सिद्धव्यञ्जनः सांवननिकीमोषधीं दद्यात्—वैदेहकशरीरेऽवधातव्येति । सिद्धे सुभगाया अप्येनं योगमुपदिशेत्–राजशरीरेऽवधातव्या इति । ततो रसेनातिसन्दध्यात् ।

कार्तान्तिकव्यञ्जनो वा महामात्रं राजलक्षणसम्पन्नं क्रमाभिनीतं ब्रूयात् । भार्यामस्य भिक्षुकी—'राजपत्नी राजप्रसविनी वा भविष्यसि' इति ।

भार्याव्यञ्जना वा महामात्रं ब्रूयात्—'राजा किल मामवरोधयिष्यति, तवान्तिकाय पत्रलेख्यमाभरणं चेदं परिव्राजिकयाहृतम्' इति ।

सूदारालिकव्यञ्जनो वा रसप्रयोगार्थं राजवचनमर्थं चास्य लोभनीयमभिनयेत् । तदस्य वैदेहकव्यञ्जनः प्रतिसन्दध्यात्; कार्यसिद्धिं च ब्रूयात् । एवमेकेन द्वाभ्यां त्रिभिरित्युपायैरेकैकमस्य महामात्रं विक्रमायापगमनाय वा योजयेदिति ।

दुर्गेषु चास्य शून्यपालासन्नाः सात्रिणः पौरजानपदेषु मैत्रीनिमित्तमावेदयेयुः "शून्यपालेनोक्ता योधाश्च अधिकरणस्थाश्च--'कृच्छ्रगतो राजा जीवन्नागमिष्यति न वा; प्रसह्य वित्तमार्जयध्वममित्रांश्च

---

कलह उत्पन्न करावा; त्या मारामारींत हरलेल्या पक्षास दुसऱ्या देशास जाण्याची किंवा आपल्या राजास स्वारीच्या कामीं मदत करण्याची सल्ला द्यावी. किंवा स्त्रीलंपट झालेले अधिकारी हातीं धरून गोसावीहेरांनीं त्यांच्याकडून मुख्याधिकाऱ्यांना फसविण्यासाठीं म्हणून वशीकरण करणाऱ्या औषधींच्या द्वारा मुख्याधिकाऱ्यांवर विषप्रयोग करवावा.

अथवा, सौदागर हेरानें भाग्यवान् राणीची निरंतर सन्निध असणारी दासी गांठून तिला प्रेमभावानें विपुल द्रव्य द्यावें व पुढें तिचा त्याग करावा. नंतर तेथेंच नोकर होऊन राहिलेल्या हेरानें गोसावी हेरास, त्या दासीला कांहीं वशीकरण वनस्पति देण्याविषयीं विनंति करावी. त्यावर गोसावी हेरानें वनस्पति देऊन दासीस सांगावें कीं, ही वनस्पति सौदागराच्या अंगाला लाव (म्हणजे सौदागर पुन्हां तुजवर पूर्ववत् प्रेम करूं लागेल). याप्रमाणें अर्थातच् कार्यभाग सफल झाल्यानंतर, त्या नोकरानें त्या दासीमार्फत तोच प्रयोग राजावर करावयास राणीस सल्ला द्यावा; राणी प्रयोग करण्यास सिद्ध झाली कीं त्या वशीकरण–औषधींत विषाची योजना करून राजाचा घात करवावा.

ज्योतिषी–हेरांनीं शत्रूच्या मुख्य प्रधानांचीं लक्षणें पाहून म्हणावें—"तुमचीं लक्षणें राजलक्षणें आहेत, पण तुमचा हक्क बुडविला गेला आहे". भिक्षुकीण हेरानें त्याच्या बायकोस म्हणावें—"तुम्ही राजपत्नी किंवा राजमाता व्हाल."

प्रधानाची पत्नी म्हणून राहिलेल्या स्त्री–हेरानें त्यास म्हणावें—"माझ्यावर राजाचा डोळा आहे. त्यानें एका संन्यासिनीच्या हातीं मजकडे हें पत्र व हे अलंकार धाडिले आहेत, हे पहा!"

आचारी—हलवाई म्हणून राहिलेल्या हेरानें प्रधानास कळवावें कीं, तुम्हांस विषप्रयोग करण्याकरितां हें विष व त्याचें बक्षीस म्हणून हें द्रव्य राजानें मला दिलें आहे पहा! यावर विश्वास बसण्याकरितां सौदागर-हेरानें सांगावें कीं, हा म्हणतो तें खरें असेल; कारण राजानें मजपासून विष विकत घेतलें खरें. अशा रीतीनें एक वा अनेक उपाय करून राजाच्या प्रधानांचीं मनें कलुषित करावीं व ते राजाविरुद्ध उठतील किंवा निदान निघून तरी जातील असें करावें.

राजा स्वारीस गेला असतां त्याच्या जागीं काम करणाऱ्या मुख्य अधिकाऱ्याजवळ असलेल्या हेरांनीं नागरिकांस व खेडवळांस मित्रभावानें म्हणून असें सांगावें कीं, "राजाच्या गैरहजेरींत काम करणाऱ्या अधिकाऱ्यानें लष्करी व इतरखात्यांतील लोकांस असें जाहीर केलें आहे कीं, राजा अजून संकटांतून पार पडला नाहीं, तो जिवानिशीं परत

हत" इति। बहुलीभूते तीक्ष्णाः पौरान् निशास्वाहारयेयुः, मुख्यांश्चाभिहन्युः--'एवं क्रियन्ते, ये शून्यपालस्य न शुश्रूषन्ते' इति । शून्यपालस्थानेषु च सशोणितानि शस्त्रवित्तबन्धनान्युत्सृजेयुः। ततः सत्रिणः--'शून्यपालो घातयति, विलोपयाति च' इत्यावेदयेयुः।

एवं जानपदान् समाहर्तुर्भेदयेयुः।

समाहर्तृपुरुषांस्तु ग्राममध्येषु रात्रौ तीक्ष्णा हत्वा ब्रूयुः--'एवं क्रियन्ते, ये जनपदमधर्मेण बाधन्ते'; इति।

समुत्पन्ने दोषे शून्यपाल समाहर्तारं वा प्रकृतिकोपेन घातयेयुः। तत्कुलीनमवरुद्धं वा प्रतिपादयेयुः।

अन्तःपुरपुरद्वारद्रव्यधान्यपरिग्रहान्। दहेयुस्तांश्च हन्युर्वा ब्रूयुरस्यार्तवादिनः॥

इति कौटलीयार्थशास्त्रे आबलीयसे द्वादशोऽधिकरणे द्वितीयोऽध्यायः दूतकर्मणि वाक्ययुद्धं दूतकर्म समाप्तं मन्त्रयुद्धम्, आदितः सप्तत्रिंशच्छततमः॥

---

# अध्याय १२८ सेनामुख्यवधः मण्डलप्रोत्साहनं च।

राज्ञो राजवल्लभानां चासन्नाः सत्रिणः पत्त्यश्वरथद्विपमुख्यानां 'राजा क्रुद्धः' इति सुहृद्विश्वासेन मित्रस्थानीयेषु कथयेयुः। बहुलीभूते तीक्ष्णाः कृतरात्रिचारप्रतीकाराः 'गृहस्वामिवचनेन आगम्यताम्'

---

येतो कां नाहीं कोण जाणे! म्हणून तुम्ही जबरदस्तीनें धन मिळवून ठेवा व तुमचे शत्रु असतील त्यांस ठार करा." ही बातमी सर्वत्र फैलावली म्हणजे गुंडहेरांनीं एके दिवशीं रात्रीं नागरिकांस जबरीनें लुटावें व मुख्यांस ठार करावें आणि असें म्हणावें कीं, "जे शून्यपाळाचे हुकूम ऐकत नाहींत, त्यांस असा परिणाम भोगावा लागतो." नंतर शून्यपालाच्या वाड्याच्या आवारांत निरनिराळ्या ठिकाणीं रक्तानें भरलेलीं शस्त्रें, पैसे, दोर वगैरे ठेवून द्यावे. नंतर दुसऱ्या हेरांनीं असें जाहीर करावें कीं 'हा पहा राजाचा प्रतिनिधी (शून्यपाल) लोकांवर कसा जुलूम करितो व त्यांस कसा लुटतो व मारितो'!

जमीन महसुला वरील मुख्य अधिकाऱ्यांत व लोकांत वमनस्य आणावयाचें, तेहि अशाच युक्तीनें आणावें. यांच्या बाबतींत गुंड हेरांनीं रात्रीच्या वेळीं गांवाच्या मध्यभागीं वसुली कामगाराच्या हस्तकांस ठार करावें आणि सर्व लोकांस असें जाहीर करावें कीं, जे लोकांची अन्यायानें गांजणूक करितात, त्यांस असा परिणाम भोगावा लागतो!

अशा रीतीनें शून्यपाल किंवा जमीन महसुलावरील अधिकारी यांच्या विषयीं प्रजाजनांत तीव्र क्षोभ उत्पन्न करून त्यांच्या करवीं त्यांस मारवावें आणि त्यांच्या जागीं राजाच्या घराण्यांतील एखादा मनुष्य अथवा राजाचा बंदिवान मुलगा यांस बसवावें.

हेरांनीं शत्रूचें अंतःपुर, शहराच्या वेशी, धनधान्यादिकांचीं कोठारें यांना आग लावावी; किंवा इतर रीतीनें त्यांची नासाडी करावी आणि आपणच दुःखानें छाती-बडवीत ही बातमी त्यास जाऊन सांगावी.

---

## सेनापतींचा वध, मंडलांतील राजांची चिथावणी.

राजाच्या आणि दरबारांतील माणसांच्याजवळ राहणाऱ्या हेरांनीं मित्रसमूहांत जाऊन अगदीं मित्रत्वानें विश्वास बसेल अशा तऱ्हेनें सांगावें कीं, "पायदळावरील, घोडदळावरील, रथदळावरील आणि हत्तीदळावरील अधिकाऱ्यांवर राजाची मर्जी खप्पा झाली आहे." ही बातमी पसरतां पसरतां सर्वत्र पसरली म्हणजे गुंड हेरांनीं

इति ब्रूयुः ; तान् निर्गच्छत एवाभिहन्युः । 'स्वामिसन्देशः' इति चासन्नान् ब्रूयुः । ये च प्रवासितास्तान् सत्रिणो ब्रूयुः—' एतद्तद् यदस्माभिः कथितं, जीवितुकामेन अपक्रान्तव्यम् ' इति ।

येभ्यश्च राजा याचितो न ददाति तान् सत्रिणो ब्रूयुः—" उक्तः शून्यपालो राज्ञा ' अयाच्यमर्थमसौ चासौ च मा याचते; मया प्रत्याख्याताः शत्रुसंहिताः; तेषामुद्धरणे प्रयतस्व ' इति । ततः पूर्ववदाचरेत् ।

येभ्यश्च राजा याचितो ददाति, तान् सत्रिणो ब्रूयुः—" उक्तः शून्यपालो राज्ञा–अयाच्यमर्थमसौ चासौ च मा याचते; तेभ्यो मया सोऽर्थो विश्वासार्थं दत्तः; शत्रुसंहिताः तेषामुद्धरणे प्रयतस्व इति " । ततः पूर्ववदाचरेत् ।

ये चैनं याच्यमर्थं न याचन्ते, तान् सत्रिणो ब्रूयुः–" उक्तः शून्यपालो राज्ञा–याच्यमर्थमसौ चासौ च मा न याचते; किमन्यत् स्वदोषशङ्कितत्वात्; तेषामुद्धरणे प्रयतस्व इति" । ततः पूर्ववदाचरेत् ।

एतेन सर्वः कृत्यपक्षो व्याख्यातः ।

प्रत्यासन्नो वा राजानं सत्री ग्राहयेत्–' असौ चासौ च ते महामात्रः शत्रुपुरुषैः सम्भाषते' इति । प्रतिपन्ने दूष्यानस्य शासनहरान् दर्शयेत्–' एतत्तत् ' इति ।

---

रात्रीच्या समयीं हिंडण्याची मनाई करून राजवाड्याकडे आलेल्या त्या अधिकाऱ्यांना ' राजानें बोलावलें म्हणजे तुह्मी यावें ' असें सांगावें, आणि ते परत निघाले ह्मणजे त्यांस वाटेंतच ठार करावें; आणि जवळ असलेल्यांना असें सांगावें कीं, " राजाच्या हुकुमानेंच हें झालें आहे. " जे सैन्यावरील अधिकारी दुसरीकडे राहात असतील त्यांस हेरांनीं सांगावें कीं " आम्हीं तुम्हांला जें अगोदरच सांगितलें होतें, तसेंच घडून आलें कीं नाहीं तें पाहा; आतां जिवाची पर्वा असेल तर, एथून तुम्ही दुसऱ्या राज्यांत पळून जावें, हें बरें. "

ज्या लोकांनीं राजापाशीं कांहीं मागितलें असून राजानें त्यांस तें दिलें नाहीं, अशा लोकांस हेरांनीं जाऊन असें सांगावें कीं, " राजाच्या गैरहजेरींत अधिकार चालविणाऱ्या शून्यपालास राजानें असें सांगून ठेविलें आहे कीं, अमुक अमुक मनुष्यानें मजपाशीं जें मागूं नये, तें मागितलें होतें; तें मी त्यास दिलें नाहीं म्हणून आतां तो शत्रूशीं खलबत करूं लागला आहे, तेव्हां तूं त्याचा हरप्रयत्नानें उच्छेद करावा." यानंतर हेरांनीं वर सांगितलेल्या प्रकारच्या उद्योगास लागावें.

ज्या लोकांनीं राजापाशीं कांहीं मागितलें असून राजानें त्यांस तें दिलें असेल अशा लोकांस हेरांनीं जाऊन असें सांगावें कीं, " शून्यपालास राजानें असें कळविलें आहे कीं, अमुक अमुक मनुष्यानें मजपाशीं जें मागूं नये, तें मागितलें; त्याचा विश्वास बसावा म्हणून मी त्याची मागणी कबूल केली आहे; परंतु तो शत्रूस मिळालेला आहे असा मला संशय येतो, म्हणून त्याचा हरप्रयत्नानें उच्छेद करावा. " यानंतर हेरांनीं पूर्वी प्रमाणें आपल्या उद्योगास लागावें.

जे कोणी राजापाशीं एखादी वस्तु मागावयासारखी असून ती मागत नाहींत त्यांस हेरांनीं असें सांगावें कीं, " शून्यपालास राजानें असें कळविलें आहे कीं, यांनीं मजपाशीं अमुक वस्तु मागणें रास्त असून देखील ते ती मागत नाहींत; याचें कारण दुसरें काय असणार ? बेइमानीपणाविषयीं त्यांचें मनच त्यांना खात असावें; तेव्हां त्यांचा समाचार तूं घे. " यानंतरचा क्रम वर दिलाच आहे, तो अंमलांत आणावा.

याप्रमाणें फितुर होण्यालायक जे जे लोक असतील त्यांचा बंदोबस्त कसा करावा तें सांगितलें.

राजासन्निध निरंतर असणाऱ्या हेरानें राजाची अशी समजूत करून द्यावी कीं, अमुक प्रधान शत्रूच्या दरबारांतील लोकांशीं वारंवार खलबतें करीत असतो. यावर राजाचा विश्वास बसला म्हणजे कांहीं दिवसांनीं त्या प्रधानाच्या पदरच्या पण फितुर केलेल्या जासुदांस पकडावें आणि राजासंनिध नेऊन दाखवावें कीं, 'हीं पहा यांच्याजवळचीं पत्रें; मी जें सांगत होतों त्याचें हें प्रत्यंतर. '

सेनामुख्यप्रकृतिपुरुषान् वा भूम्या हिरण्येन वा लोभयित्वा स्वेषु विक्रमयेदपवाहयेद् वा । योऽस्यपुत्रः समीपे दुर्गे वा प्रतिवसति, तं सत्रिणोपजापयेत्–' आत्मसम्पन्नतरस्त्वं पुत्रः तथाप्यन्तर्हितः; तत् किमुपेक्षसे । विक्रम्य गृहाण; पुरा त्वा युवराजो विनाशयति ' इति । तत्कुलीनमवरुद्धं वा हिरण्येन प्रतिलोभ्य ब्रूयात्–' अन्तर्बलं प्रत्यन्तस्कन्धमन्यं वास्य प्रमृद्गीहि ' इति । आटविकानर्थमानाभ्यामुपगृह्य राज्यमस्य घातयेत् ।

पार्ष्णिग्राहं वास्य ब्रूयाद्–' एष खलु राजा मामुच्छिद्य त्वामुच्छेत्स्यति; पार्ष्णिमस्य गृहाण; त्वयि निवृत्तस्याहं पार्ष्णिं ग्रहीष्यामि ' इति । मित्राणि वास्य ब्रूयात्—' अहं वः सेतुः; मयि विभिन्ने सर्वानेष वो राजा प्लावयिष्यति' इति 'सम्भूय वास्य यात्रां विहनाम' इति । तत्संहतानामसंहतानां च प्रेषयेत्–' एष खलु राजा मामुत्पाट्य भवत्सु कर्म करिष्यति । बुध्यध्वम्, अहं वः श्रेयानभ्यवपत्तुम् ' इति ।

मध्यमस्य प्रहिणुयादुदासीनस्य वा पुनः । यथासन्नस्य मोक्षार्थं सर्वस्वेन त्वदर्पणम् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे आवलीयसे द्वादशेऽधिकरणे तृतीयोऽध्यायः सेनामुख्यवधः मण्डलप्रोत्साहनं च, आदितोऽष्टात्रिंशच्छततमः ॥

---

किंवा सैन्यावरील जे अधिकारी असतील त्यांच्या परिवारांतील मंडळींना भूमि अथवा द्रव्य यांची लालूच दाखवून त्यांस आपल्या लोकांविरुद्ध उठवावें, अथवा त्यांस आपला पक्ष सोडून निघून जाण्यास लावावें. सेनापतीचा एखादा पुत्र कोठेंतरी जवळपास किल्ल्यांत राहणारा असेल त्याकडे हेराला पाठवून कळवावें कीं, " तूं कितीतरी गुणवान व सुशील मुलगा आहेस, तरी देखील तुला अडकवून ठेविलें आहे. ! तूं असा गप्प तरी कसा बसलास ! पराक्रम दाखव आणि जें तुला हवें तें काबीज कर; नाहींतर पुढें युवराज तुझा घात करील. " अथवा— सेनापतीच्या घराण्यांतील एखादा पुरुष नजर कैदेंत असेल, त्यास पैशाची लालूच दाखवून असें सांगावें कीं, " या राज्यांतलि खासें सैन्य किंवा दुसऱ्या सैन्याचें एखादें पथक याचा विध्वंस कर. अथवा शत्रुराज्यांतील रानटी लोकांस द्रव्यदानानें व पदवीदानानें आपल्या बाजूस वळवून, त्यांच्याकरवीं शत्रुराज्यांत धुमाकूळ माजवावा.

शत्रूच्या पिछाडीचा शत्रु गांठून त्यास म्हणावें कीं " आधीं माझा नाश करून मग हा राजा तुझ्या राशीस लागणार आहे; म्हणून तूं याच्या पिछाडीवर घाव घाल. तुझ्यामागून मी याच्या पिछाडीवर स्वारी करतों " किंवा त्या राजाच्या मित्रांस सांगावें कीं, " मी मध्यंतरीं आहे म्हणून तुमचा बचाव आहे. माझा जर नाश झाला तर धरण फुटल्यानें आसपासच्या प्रदेशाची जशी नासाडी होते तशी हा राजा तुमची सगळ्यांची अवस्था करील; म्हणून आपण सर्वजण दोस्ती करूं या आणि जूट करून शत्रूचा हल्ला परतवूं या. " याचप्रमाणें शत्रुराजाशीं दोस्ती केलेल्या किंवा तटस्थ असलेल्या राजांना असा खलिता पाठवावा कीं, " हा राजा आधीं माझा उच्छेद करून नंतर तुम्हांवर चालून येणार आहे; याचा विचार करा; म्हणजे तुमच्या लक्षांत येईल कीं माझें रक्षण करण्यांत तुमचें कल्याण आहे.

याचप्रमाणें आपणावर आलेल्या संकटापासून आपली सुटका करण्याकरितां मध्यम राजाकडे अथवा तटस्थ राजाकडे विनंती करण्यासाठीं दूत पाठवावे आणि त्यास कळवावें कीं, माझें सर्वस्व तुमच्या स्वाधीन केलें आहे.

# अध्याय १३९ शस्त्राग्निरसप्रणिधयः, वीवधासारप्रसारवधश्च ।

ये चास्य दुर्गेषु वैदेहकव्यञ्जनाः, ग्रामेषु गृहपतिकव्यञ्जनाः, जनपदसन्धिषु गोरक्षकतापसव्यञ्जनाः, ते सामन्ताटविकतत्कुलीनावरुद्धानां पण्यागारपूर्वं प्रेषयेयुः—'अयं देशो हार्य' इति। आगतांश्चैषां दुर्गे गूढपुरुषानर्थमानाभ्याम् अभिसत्कृत्य प्रकृतिच्छिद्राणि प्रदर्शयेयुः। तेषु तैः सह प्रहरेयुः।

स्कन्धावारे वास्य शौण्डिकव्यञ्जनः पुत्रमभित्यक्तं स्थापयित्वा अवस्कन्दकाले रसेन प्रवासयित्वा 'नैषेचनिकम्' इति मदनरसयुक्तान् मद्यकुम्भाञ्छतशः प्रयच्छेत्। शुद्धं वा मद्यं माद्यं वा मद्यं दद्यादेकमहः, उत्तरं रससिद्धं प्रयच्छेत्। शुद्धं वा मद्यं दण्डमुख्येभ्यः प्रदाय मदकाले रससिद्धं प्रयच्छेत्।

दण्डमुख्यव्यञ्जनो वा 'पुत्रमभित्यक्तम्' इति—समानम्।

पक्वमांसिकौदनिकशौण्डिकापूपिकव्यञ्जना वा पण्यविशेषमवघोषयित्वा परस्परसङ्घर्षेण कालिकं समर्घतरमिति वा परानाहूय रसेन स्वपण्यान्यपचारयेयुः।

सुराक्षीरदधिसर्पिस्तैलानि वा तद्व्यवहर्तृहस्तेषु गृहीत्वा स्त्रियो बालाश्च रसयुक्तेषु स्वभाजनेषु

---

## शस्त्रप्रयोग, अग्निप्रयोग व विषप्रयोग. दाणागोटा, दारूगोळा व इतर सामान, यांचा विध्वंस.

शत्रूच्या तटबंदी शहरांत जे सौदागर हेर असतील, खेडेगांवांत जे गृहपतिक हेर असतील आणि प्रांताप्रांतांच्या हद्दीवर जे गवळी किंवा गोसावी हेर असतील, त्यांनीं शत्रूच्या देशांतील रानटी लोकांस अथवा शेजारच्या शत्रुराजास, अथवा शत्रूच्या आप्तसंबंध्यांस, अथवा बंदिवासी राजपुत्रास, आधीं नजराणा पाठवून 'हा देश सहज घेतां येण्याजोगा आहे,' असा निरोप पाठवावा. या निरोपावरून त्यांच्याकडून आलेल्या गुप्त दूतांस द्रव्य व मान देऊन त्यांचा सत्कार करावा आणि शत्रूच्या राज्यांत जीं जीं मर्मस्थळें असतील, तीं तीं त्यांस दाखवावीं; आणि त्यांशीं मिलाफ करून, त्या मर्मस्थळांवर मारा करावा.

अथवा—दारूविक्या हेरानें शत्रूच्या छावणींत एखाद्या वध्य पुरुषास आणून, आपला पुत्र म्हणून ठेवून घ्यावें आणि ऐन हल्ल्यांत विषप्रयोग करून नाहींसें करावें. त्या मृताच्या शांत्यर्थ म्हणून मदनवृक्षाच्या रसांत मिसळलेले दारूचे शेंकडों घट सेवन करण्याकरितां वांटावें. किंवा पहिल्या दिवशीं विषरहित किंवा नुसती गुंगी आणणारी अशी दारू द्यावी व दुसऱ्या दिवशीं भरपूर विष मिसळून द्यावी. अथवा, सैन्यावरील अधिकाऱ्यांस प्रथम निर्भेळ दारू पाजून त्यांस अंमल चढला म्हणजे मग विषयुक्त दारू पाजावी.

शत्रूच्या सैन्यांत अधिकारी म्हणून राहिलेल्या हेरानेंहि वरीलप्रमाणेंच युक्ति लढवावी.

शिजविलेलें मांस आणि भात, दारू व वडे, भजीं वगैरे तळलेले पदार्थ विकण्याचा धंदा करणाऱ्या ज्या गूढस्त्रिया असतील, त्यांनीं आपापला माल घेऊन रस्त्यांत चढाओढीनें "ताजा माल, उत्तम माल" असें ओरडत जावें; आणि माल उधारीनें मिळाल्यानें हा स्वस्त पडतो असें सांगावें. तें ऐकून शत्रुपक्षीय लोक माल घ्यावयास आले, म्हणजे मालांत विष कालवून तो त्यांस विकावा.

स्त्रियांनीं व लहान मुलांनीं दुकानांत जाऊन सुरा, दूध, दहीं, तूप किंवा तेल विकत घेऊन तें आपल्या विषयुक्त भांड्यांत ओतून घ्यावें; नंतर त्या दुकानदारास म्हणावें कीं, 'याच भावानें याच्याहून सरस माल दे, नाहींतर हा

परिकिरेयुः; 'अनेनार्घेण विशिष्टं वा भूयो दीयताम्' इति तत्रैवावकिरेयुः । एतान्येव वैदेहकव्यञ्जनाः पण्यविक्रयेणाहर्तारो वा हस्त्यश्वानां विधायवसेषु रसमासन्ना दद्युः ।

कर्मकरव्यञ्जना वा रसाक्तं यवसमुदकं वा विक्रीणीरन् । चिरसंसृष्टा वा गोवाणिजका गवामजावीनां वा यूथान्यवस्कन्दकालेषु परेषां मोहस्थानेषु प्रमुञ्चेयुः । अश्वखरोष्ट्रमहिषादीनां दुष्टांश्च तद्व्यञ्जना वा चुचुन्दरीशोणिताक्ताक्षान्; लुब्धकव्यञ्जना वा व्यालमृगान् पञ्जरेभ्यः प्रमुञ्चेयुः, सर्पग्राहा वा सर्पानुग्रविषान्; हस्तिजीविनो वा हस्तिनः । अग्निजीविनो वा अग्निमवसृजेयुः ।

गूढपुरुषा वा विमुखान् पत्त्यश्वरथद्विपमुख्यानभिहन्युः; आदीपयेयुर्वा मुख्यावासान् । दूष्यामित्राटविकव्यञ्जनाः प्रणिहिताः पृष्ठाभिघातमवस्कन्दप्रतिग्रहं वा कुर्युः । वनगूढा वा प्रत्यन्तस्कन्धमुपनिष्कृष्याभिहन्युः ।

एकायने वीवधासारप्रसारान् वा ।

ससङ्केतं वा रात्रियुद्धे भूरितूर्यमाहत्य ब्रूयुः—'अनुप्रविष्टाः स्मो लब्धं राज्यम्' इति । राजावासमनुप्रविष्टा वा सङ्कुलेषु राजानं हन्युः । सर्वतो वा प्रयातमेनं म्लेच्छाटविकदण्डचारिणः सत्रापाश्रयाः स्तम्भवाटापाश्रया वा हन्युः । लुब्धकव्यञ्जना वावस्कन्दसङ्कुलेषु गूढयुद्धहेतुभिरभिहन्युः ।

---

परत घे असें म्हणून ते जिन्नस परत दुकानदाराच्या भांड्यांत ओतून द्यावे! तदनंतर सौदागर हेरांनीं बाजारांत जाऊन तोच माल विकत घ्यावा आणि शत्रूचे माहुत, मोतद्दार वगैरे नोकर तोच विषयुक्त माल घोड्या—हत्तींस दाणापाणी देतांना चारतील, अशी तजवीज करावी.

नोकर—हेरांनीं गुरांच्या दाणापाण्यांत विष मिसळून तें विकावें. परवाना घेऊन बरेच दिवस गाई—बैलांची खरेदीविक्री करणाऱ्या हेरांनीं हल्ल्याच्या प्रसंगीं शत्रूस भूल पडेल, अशा ठिकाणीं शेळ्यामेंढ्या—गाईंचे कळप मोकळे सोडावे; आणि तोच धंदा करणाऱ्या हेरांनीं घोडे, खेचरें, उंट, म्हशी वगैरे जनावरांपैकीं दुष्ट जनावरें शोधून त्यांच्या डोळ्यांस चिचुंद्रीचें रक्त फांसून तीं मोकळीं सोडावीं. फांसेपारधी हेरांनीं जाळ्यांतून अत्यंत दुष्ट जनावरें बाहेर सोडावीं. साप पकडणाऱ्या हेरांनीं अत्यंत विषारी साप, हत्ती बाळगणाऱ्या हेरांनीं मत्त हत्ती व लोहार कुंभारादि हेरांनीं आपल्या भट्टींतला अग्नि वाऱ्यानें पसरेल असा करावा.

पायदळावरील, घोडदळावरील, रथदळावरील व हत्तीदळावरील मुख्य अधिकारी युद्धापासून तोंड फिरवूं लागले म्हणजे दबा धरून बसलेल्या हेरांनीं त्यांस ठार करावें व प्रमुख लोकांच्या छावणीस आग लावावी. राजद्रोही, शत्रु व रानटी हेरांनीं आपल्या गुप्त कामगिरीस तयार राहून शत्रूची पिछाडी जर्जर करावी किंवा ती पिछाडी काबीज करावी. रानांत दडून बसलेल्या हेरांनीं शत्रूच्या सरहद्दींत घुसून शत्रूचा मुलुख उध्वस्त करावा. शत्रूचा दाणागोटा, दारूगोळा व लष्करी सामान एकच माणूस जाईल अशा अरुंद वाटेनें जात असतां त्यावर हल्ला करावा.

अथवा—अगोदर बेत ठरवून रात्रीच्या वेळीं शत्रूवर छापा घालून पुष्कळ तुताऱ्या एकदम वाजवून गर्जना करावी कीं, "शत्रूच्या राज्यांत आम्हीं प्रवेश केला आहे, राज्य आमच्या हातीं आलें आहे." अशा रीतीनें राजवाड्यांत घुसून गर्दीमध्यें राजास ठार करावें, शत्रु सैरावैरा पळत सुटला म्हणजे दबा धरून बसलेल्या, अथवा झाडाच्या बुंध्याच्या व कुंपणाच्या आड दडून बसलेल्या म्लेच्छांच्या, व रानटी लोकांच्या सैनिकांनीं त्यास ठार करावें. पारधी-हेरांनीं ऐन हल्ल्याच्या रंगांत गनिमी डावपेंच लढवून त्यास मारावें,

एकायने वा शैलस्तम्भवाटखञ्जनान्तरुदके वा स्वभूमिबलेनाभिहन्युः । नदीसरस्तटाकसेतुबन्धभेदवेगेन वा प्लावयेयुः । धान्वनवननिम्नदुर्गस्थं वा योगाग्निधूमाभ्यां नाशयेयुः । सङ्कटगतमग्निना, धान्वनगतं धूमेन, निधानगतं रसेन, तोयावगाढं दुष्टग्राहैरुदकचरणैर्वा तीक्ष्णाः साधयेयुः ।

आदीप्तावासात् निष्पतन्तं वा--
योगवामनयोगाभ्यां योगेनान्यतमेन वा । अमित्रमतिसन्दध्यात् सक्तमुक्तासु भूमिषु ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे द्वादशोऽधिकरणे चतुर्थोऽध्यायः शस्त्राग्निरसप्रणिधयः, वीवधासारप्रसारवधश्च, आदित एकोनचत्वारिंशाच्छततमः ॥

---

# अध्याय १४० योगातिसन्धानं, दण्डातिसन्धानम्, एकविजयश्च ।



दैवतेज्यायां यात्रायाममित्रस्य बहूनि पूज्यागमस्थानानि भक्तितः । तत्रास्य योगमुब्जयेत् । देवतागृहप्रविष्टस्योपरि यन्त्रमोक्षणेन गूढभित्तिं शिलां वा पातयेत् । शिलाशस्त्रवर्षमुत्तमागारात्, कवाटमवपातितं वा, भित्तिप्रणिहितमेकदेशबन्धं वा परिघं मोक्षयेत् । देवतादेहस्थप्रहरणानि वास्योपरिष्टात् पातयेत् । स्थानासनगमनभूमिषु वास्य गोमयप्रदेहेन गन्धोदकावसेकेन वा रसमतिचारयेत्

---

शत्रु कूच करतां करतां, तो अरुंद वाटेवर, डोंगरावर, झाडीच्या गर्दीत, पाणथळ जमिनींत अथवा उताराच्या जागीं आला म्हणजे स्वतः सुरक्षित स्थळीं राहणाऱ्या हेरांनीं त्यास ठार करावें. नदीवरील, सरोवरावरील किंवा तळ्यावरील बांध फोडून पाण्याच्या प्रवाहांत त्यास बुडवावें. शत्रु ओसाड अरण्यांत, झाडाजंगलांत, भुईकोट किल्ल्यांत किंवा डोंगरी किल्ल्यांत दडून बसला असेल, तेव्हां विषारी ज्वाला व धूर सोडून त्यास मारावें; दाट झाडींत असेल तेव्हां अग्नीचा, ओसाड अरण्यांत असेल तेव्हां विषारी धुराचा, मजबूत स्थळीं असेल तेव्हां विषाचा आणि पाण्यांत उतरेल तेव्हां क्रूर नक्रांचा किंवा इतर जलचर साधनांचा उपयोग करून, गुंड हेरांनीं शत्रूस मारावें.

आग लागलेल्या घरांतून तो निघून जाऊं लागला म्हणजे 'योगवामन' प्रकरणांत सांगितलेल्या युक्त्यांनीं किंवा दुसऱ्या कोणत्यातरी युक्तीनें, अगर शत्रु ज्या ठिकाणीं दडून बसला असेल अथवा जेथून निसटून जात असेल, त्यीं त्या ठिकाणांस योग्य अशा अन्य मार्गांनीं त्यास जेरीस आणावें.

---

## गुप्त मसलतीनें किंवा सैन्यबलानें शत्रूचा घात; एकाऱ्याचा पराक्रम.

दैवतांची पूजा करण्याच्या निमित्तानें, अथवा यात्रेच्या निमित्तानें शत्रु ज्या देवालयांत अथवा क्षेत्रांत भक्ति-भावनेनें वारंवार जात असेल, त्या देवालयांत किंवा क्षेत्रांत त्यास ठार करितां येईल, अशी कांहीं युक्ति गुप्तपणानें करून ठेवावी. देवालयांत भिंतीला किंवा दगडाला कांहीं युक्ति करून ठेवावी व तो आंत आल्याबरोबर त्याच्या डोक्यावर भिंत किंवा दगड एकदम कोसळूं द्यावा; देवालयाच्या शिखरावरून त्यावर दगडांचा किंवा शस्त्रांचा वर्षाव करावा, दाराची निसटलेली फळी डोक्यावर आपटावी, भिंतीवर ठेवलेली किंवा कोठेंतरी लोंबकळत ठेविलेली पहार डोक्यावर पडूं द्यावी, देवतेच्या मूर्तीच्या हातांत असलेलीं शस्त्रें त्याच्या डोक्यावर पाडावीं, शत्रु उभा राहात असेल, बसत असेल अथवा चालत असेल, त्यात्या जमिनीवर शेणांत किंवा पाण्यांत विष कालवून त्यानें सारवण करावें अथवा विषारी पाण्याचा सडा घालावा; फुलांच्या पाकळ्यांत विषघालून त्या त्यास द्याव्या; धूपदीप

पुष्पचूर्णोपहारेण वा। गन्धप्रतिच्छन्नं वास्य तीक्ष्णं धूममतिनयेत्। शूलकूपमवपातनं वा शयनासनस्याधस्ताद् यन्त्रबद्धतलमेनं कीलमोक्षणेन प्रवेशयेत्।

प्रत्यासन्ने वामित्रे जनपदाज्जनमवरोधक्षममतिनयेत्। दुर्गाच्चानवरोधक्षममपनयेत्। प्रत्यादेयमरिविषयं वा प्रेषयेत्। जनपदं चैकस्थं शैलवननदीदुर्गेष्वटवीव्यवहितेषु वा पुत्रभ्रातृपरिगृहीतं स्थापयेत्।

उपरोधहेतवो दण्डोपनतवृत्ते व्याख्याताः।

तृणकाष्ठम् आ योजनाद् दाहयेत्। उदकानि च दूषयेद्, अवास्रावयेच्च। कूटकूपावपातकण्टकिनीश्च बहिरुब्जयेत्। सुरुङ्गाममित्रस्थाने बहुमुखीं कृत्वा विचयमुख्यानभिहारयेद्, अमित्रं वा। परप्रयुक्तायां वा सुरुङ्गायां परिखामुदकान्तिकीं खानयेत्, कूपशालामनुसालं वा। अतोयकुम्भान् कांस्यभाण्डानि वा शङ्कास्थानेषु स्थापयेत् खाताभिज्ञानार्थम्। ज्ञाते सुरुङ्गापथे प्रतिसुरुङ्गां कारयेत्। मध्ये भित्त्वा धूममुदकं वा प्रयच्छेत्।

प्रतिविहितदुर्गो वा मूले दायादं कृत्वा प्रतिलोमामस्य दिशं गच्छेत्—यतो वा मित्रैर्बन्धुभिराटविकैर्वा संसृज्येत, परस्यामित्रैर्दूष्यैर्वा महद्भिः; यतो वा गतोऽस्य मित्रैर्वियोगं कुर्यात्, पार्ष्णिं वा

---

अर्पण करण्याच्या निमित्तानें विषारी धूप लावून देवालय विषारी धुरानें भरून टाकावें; विहिरींत किंवा खड्ड्यांत भाले वगैरे रोवून त्यांत त्यास ढकलावें, अथवा निजावयाच्या किंवा बसावयाच्या पलंगाच्या खालीं असलेल्या यांत्रिक तळघरांत किल्ली फिरवून त्यास पाडावें.

शत्रू जवळपास आला असतां तेथली लोकवस्ती उठवून जेथें हल्ला होणार नाहीं अशा प्रदेशांत ती न्यावी. किल्ला लढविण्याचा प्रसंग आल्यास जे लोक वेळ्यांत राहण्याला असमर्थ असतील त्यांना तेथून दुसरीकडे न्यावें; अथवा शत्रूचा जो प्रांत पुन: आपणांस परत मिळण्यासारखा असेल, त्यांत त्यांची रवानगी करावी; किंवा उठविलेली सर्व प्रजा एकत्र जमवून डोंगरी किल्ल्यांत, रानकिल्ल्यांत, जंजिऱ्यांत अथवा जो प्रांत व शत्रूचा देश यांच्या दरम्यान मोठमोठीं अरण्यें आहेत अशा प्रांतांत, त्या प्रजाजनांना रहावयास पाठवावें. आणि त्यांचें पालन करण्याकरितां आपला मुलगा किंवा भाऊ नेमावा.

'सैन्याच्या जोरावर जिंकलेल्या राजाचें वर्तन,' या प्रकरणांत शत्रूच्या हालचालींना कसा प्रतिबंध करावा, हें सांगितलें आहे.

गवत व लांकूडफांटा एक योजनपर्यंत पेटवून द्यावा; पाणी दूषित अथवा घाण करून टाकावें; अथवा तें बांध फोडून वाहूं द्यावें; किल्ल्याच्या बाहेरील बाजूंस फसून आंत पडावें म्हणून गुप्त विहिरी खोदून ठेवाव्या व त्यांत कांटेरी तारा टाकलेल्या असाव्या. शत्रूच्या किल्ल्यांत जाण्याकरितां जें भुयार असेल, त्यास अनेक तोंडें पाडून त्यांमधून शत्रूच्या पोलिस अधिकाऱ्यावर किंवा मुख्य शत्रूवरच हल्ला करावा. शत्रूनें भुयारें खणल्यास त्यांच्यापुढें पाणी लागेपर्यंत खोल भुयारें आपण खोदावीं, किंवा तटाच्या सभोंवतीं विहिरी खोदून टाकाव्या. शत्रु भुयारें खणीत आहे कां हें समजण्यासाठीं संशयात्मक स्थलीं पाण्याचीं रिकामीं भांडीं अथवा काशांचीं भांडीं ठेवावीं, भुयाराची दिशा समजली म्हणजे त्याच्या उलट दिशेस दुसरें भुयार तयार करावें; अथवा भुयारांमध्येंच भोंक पाडून त्यांत पाणी किंवा धूर भरावा.

अथवा किल्ला लढविण्याचा बंदोबस्त करून व एखाद्या बांधवावर किल्ला लढविण्याची जबाबदारी टाकून शत्रूच्या जमावाच्या विरुद्ध दिशेला निघून जावें; किंवा जिकडे मित्र, आप्तसंबंधी, रानटी लोक, शत्रूचे शत्रु अथवा शत्रूचे बडे विश्वासघातकीमित्र, यांचें साहाय्य मिळण्याचा संभव असेल तिकडे जावें; किंवा जिकडे गेल्यास शत्रु व

गृह्णीयात्, राज्यं वास्य हारयेत्, वीवधासारप्रसारान् वा वारयेत्; यतो वा शक्नुयाद् आक्षिकपादपक्षेपेणास्य प्रहर्तुं; यतो वा स्वं राज्यं त्रायेत, मूलस्योपचयं वा कुर्यात् । यतः सन्धिमभिप्रेतं लभते, ततो वा गच्छेत् ।

सहप्रस्थायिनो वास्य प्रेषयेयुः—'अयं ते शत्रुरस्माकं हस्तगतः; पण्यं विप्रकारं वापादिश्य हिरण्यमन्तस्सारबलं प्रेषयस्व, एनमर्पयेम बद्धं प्रवासितं वा' इति । प्रतिपन्ने हिरण्यं सारबलं चाददीत ।

अन्तपालो वा दुर्गसम्प्रदानेन बलैकदेशमतिनीय विश्वस्तं घातयेत् ।

जनपदमेकस्थं वा घातयितुममित्रानीकमावाहयेत्; तदवरुद्धदेशमतिनीय विश्वस्तं घातयेत् ।

मित्रव्यञ्जनो वा बाह्यस्य प्रेषयेत्—'क्षीणमस्मिन् दुर्गे धान्यं स्नेहाः क्षारो लवणं वा; तदमुष्मिन् देशे काले च प्रवेक्ष्यति; तदुपगृहाण' इति । ततो रसविद्धं धान्यं स्नेहं क्षारं लवणं वा दूष्यामित्राटविकाः प्रवेशयेयुः; अन्ये वा अभित्यक्ताः ।

तेन सर्वभाण्डवीवधग्रहणं व्याख्यातम् ।

सन्धिं वा कृत्वा हिरण्यैकदेशमस्मै दद्यात् । विलम्बमानः शेषम् । ततो रक्षाविधानान्यवस्रावयेत्; अग्निरसशस्त्रैर्वा प्रहरेत्; हिरण्यप्रतिग्राहिणो वास्य वल्लभाननुगृह्णीयात् । परिक्षीणो वास्मै दुर्गं दत्वा निर्गच्छेत् सुरुङ्गया । कुक्षिप्रदरेण वा प्राकारभेदेन निर्गच्छेत् ।

---

त्याचा मित्र यांची गांठ पडणें अशक्य होईल, शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करितां येईल किंवा राज्य घेतां येईल, शत्रूचा दाणागोटा व दारूगोळा अडवितां येईल, जवळपास असलेले बाभळीचे वृक्ष वाटेवर टाकून त्यास जर्जर करतां येईल, स्वतःच्या राज्याचें रक्षण करितां येईल किंवा जेथून किल्ल्याला रसद पोंचवितां येईल त्या दिशेस निघून जावें, अथवा ज्या देशांत गेलें असतां आपल्याला पाहिजे तसा तह करावयास मिळेल, त्या देशाला जावें.

आपणाबरोबर आलेल्या दोस्त राजांनीं शत्रूस असा निरोप पाठवावा कीं, "हा तुझा शत्रु आमच्या हातीं आला आहे; तूं त्याच्या मोबदला कांहींतरी बहुमोल वस्तु आणि त्याला नेण्याकरितां शूर सैनिक पाठविशील, तर त्यास बंदिवान करून तुझ्या हवालीं करितों, किंवा त्यास मारून टाकतों." याप्रमाणें कबूल होऊन, त्यानें सुवर्ण व शूर सैन्य पाठविलें म्हणजे तें छापा घालून आपल्या ताब्यांत घ्यावें.

सरहद्दीवरील अधिकाऱ्यानें किल्ला हवालीं करण्याचें आमिष दाखवून, शत्रूच्या सैन्याचा एखादा भाग दूर दिशेस न्यावा व ते सैनिक निर्धास्त असतां त्यांस ठार करावें. अथवा एकत्र राहणाऱ्या शत्रूच्या लोकांवर छापा घालण्याच्या मिषानें, शत्रूस त्याच्या शत्रूच्या प्रांतांत घेऊन जावें; आणि चोहोंबाजूंनीं गुप्तपणें वेढलेल्या ठिकाणीं तो येऊन निर्धास्त झाला, म्हणजे त्यास मारावें.

मित्राच्या वेषानें राहणाऱ्या गुप्त हेरानें वेढा घालणाऱ्या राजास असा निरोप पाठवावा कीं—"या किल्ल्यांत धान्य, तेल, तूप, गूळ व मीठ यांचा सांठा संपला आहे; अमुक ठिकाणीं व अमुक वेळीं नवा सांठा यावयाचा आहे; तो काबीज करावा. नंतर राजद्रोही लोक, शत्रु, रानटीलोक, अथवा हद्दपारीची शिक्षा झालेले लोक यांच्याकडून धान्य, तेल, तूप, गूळ व मीठ विषांत मिसळून पाठवावें.

इतर माल व धान्य कसें काबीज करावें, हें यावरून समजेल.

अथवा—तह करून ठरलेल्या सुवर्णापैकीं कांहीं भाग तावडतोब द्यावा व बाकी हप्त्याहप्त्यानें द्यावें. तदनंतर स्वसंरक्षणाचे जे उपाय त्यानें करून ठेविले असतील, ते ढांसळून पाडावे; अथवा विषप्रयोग व अग्निप्रयोग करून त्यास मारावें; अथवा त्याच्या प्रेमांतील जे लोक, द्रव्यानें वश होण्यासारखे असतील, त्यांस द्रव्य द्यावें. अथवा अगदींच हातटेकीस आल्यास किल्ला देऊन भुयारांतून किंवा नवीन पाडलेल्या भोकांतून अथवा तटाला पडलेल्या खिंडारांतून निघून जावें.

रात्रावस्कन्दं दत्वा सिद्धस्तिष्ठेत्; असिद्धः पार्श्वेनापगच्छेत्; पाषण्डच्छद्मना मन्दपरिवारो निर्गच्छेत्; प्रेतव्यञ्जनो वा गूढैर्निर्ह्रियेत; स्त्रीवेषधारी वा प्रेतमनुगच्छेत् । दैवतोपहारश्राद्धप्रहवणेषु वा रसविद्धमन्नपानमवसृज्य कृतोपजापो दूष्यव्यञ्जनैर्निष्पत्य गूढसैन्योऽभिहन्यात् ।

एवं गृहीतदुर्गो वा प्राश्यप्राशं चैत्यमुपस्थाप्य दैवतप्रतिमाच्छिद्रं प्रविश्यासीत; गूढभित्तिं वा दैवतप्रतिमायुक्तं भूमिगृहम् । विस्मृते सुरुङ्गया रात्रौ राजावासमनुप्रविश्य सुप्तममित्रं हन्यात् । यन्त्रविश्लेषणं वा विश्लेष्याधस्तादवपातयेत् । रसाग्नियोगेनावलिप्तं गृहं जतुगृहं वाधिशयानममित्रमादीपयेत् ।

प्रमदवनविहाराणामन्यतमे वा विहारस्थाने प्रमत्तं भूमिगृहसुरुङ्गागूढभित्तिप्रविष्टास्तीक्ष्णा हन्युः, गूढप्रणिहिता वा रसेन । स्वपतो वा निरुद्धे देशे गूढाः । स्त्रियः सर्परसाग्निधूमानुपरि मुञ्चेयुः ।

प्रत्युत्पन्ने वा कारणे यद्यदुपपद्येत तत्तदमित्रेऽन्तःपुरगते गूढसञ्चारः प्रयुञ्जीत, ततो गूढमेवापगच्छेत्, स्वजनसंज्ञां च प्ररूपयेत् ।

द्वाःस्थान् वर्षवरांश्चान्यान् निगूढोपहितान् परे । तूर्यसंज्ञाभिराहूय द्विषच्छेषाणि घातयेत् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे आवलीयसे द्वादशाधिकरणे पञ्चमोऽध्यायः योगातिसन्धानं दण्डातिसन्धानम् एकविजयश्च । आदितश्चत्वारिंशच्छततमः ॥

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य आवलीयसं द्वादशमधिकरणं समाप्तम् ॥

---

अथवा—रात्रीच्या वेळीं बाहेर पडून छापा घालून विजय मिळाला तर किल्ल्यांत राहावें; विजय मिळाला नाहीं तर बगल देऊन पळून जावें. पाखंडी माणसाचें रूप धरून थोडके नोकरचाकर बरोबर घेऊन निघून जावें; अथवा गुप्तहेरांनीं त्यास प्रेत म्हणून वाहून न्यावें; अथवा त्यानें बायकोचा वेष घेऊन एखाद्या प्रेताच्या मागें जावें; अथवा देवतेच्या उत्सवांत किंवा हव्यकव्यांत लोकांस भोजन घालतांना विषयुक्त अन्न व पाणी वाढून, लोकांत खळबळ उडून राहिल्यावर राजद्रोही म्हणून राहिलेल्या गुप्तहेरांशीं संगनमत करून, बरोबर छपवून ठेवलेलें सैन्य घेऊन एकदम हल्ला करून शत्रूचा नाश करावा.

शत्रूनें किल्ला काबीज केला म्हणजे मग त्या किल्ल्यांतील एखाद्या देवळांत भरपूर अन्नपाण्याचा संग्रह करण्याची तरतूद करावी. नंतर एखाद्या देवतच्या प्रतिमेस छिद्र पाडून त्यांत दडून बसावें व ती प्रतिमा त्या देवालयांत नेली जाईल असें करावें, अथवा गुप्त भिंतींत किंवा ज्या तळघरांत एखादी मूर्ति असेल, त्यांत दडावें. शत्रूला आपली विस्मृति पडली म्हणजे भुयाराच्या मार्गानें राजाच्या शयनगृहांत प्रवेश करून, शत्रु निजलेला असेल तेव्हां त्यास मारावें; अथवा एखादें यंत्र ढिलें करून ठेवावें व तें कळ दाबतांच त्याच्या अंगावर पडेल असें करावें. विषारी किंवा ज्वालाग्राही पदार्थ चोपडलेल्या घरांत अथवा लाक्षा—गृहांत शत्रु निजलेला असल्यास त्यास आग लावावी; आनंदवनांत, क्रीडावनांत अथवा क्रीडोद्यानांत शत्रु गैरसावध आहे असें पाहून गंड हेरांनीं तळघरांतून, भुयारांतून किंवा गुप्त भिंतींतून आंत प्रवेश करून त्यास मारावें; अथवा दडून बसलेल्या हेरांनीं विष प्रयोग करून मारावें. शयनगृहाभोंवतीं पहारेबंदी असेल तर त्यांत अगोदरच दडून बसलेल्या स्त्रियांनीं त्याच्या अंगावर साप, अग्नि, विष किंवा विषारी धूर सोडावा. अंतःपुरांत जाण्याची परवानगी ज्या गुप्त हेरांना असेल, त्यांनीं शत्रूच्या बाबतींत प्रसंगानुरूप जी युक्ति सुचेल ती योजावी; कार्यभाग होतांच गुप्तपणें निघून जावें, जातांना आपापल्या सहकारी लोकांस कार्यसिद्धि झाल्याविषयीं ठराविक खुणा दाखवीत जाव्या.

नंतर शत्रूच्या नोकरींत आपले जे लोक द्वारपाळ, खोजे किंवा इतर गुप्त हेरांच्या वेषानें असतील त्यांस तुतारीच्या खुणांनीं एकत्र जमवावें आणि शत्रूच्या परिवारांतली जीं माणसें उरलीं असतील, त्यांची कत्तल करून टाकावी.

# दुर्गलम्भोपायः—त्रयोदशमाधिकरणम् ।

## अध्याय १४१ उपजापः ।

विजिगीषुः परग्राममवाप्तुकामः सर्वज्ञदैवतसंयोगख्यापनाभ्यां स्वपक्षमुद्धर्षयेत्; परपक्षं चोद्वेजयेत् ।

सर्वज्ञख्यापनं तु--गृहगुह्यप्रवृत्तिज्ञानेन प्रत्यादेशो मुख्यानां; कण्टकशोधनापसर्पागमेन प्रकाशनं राजद्विष्टकारिणां; विज्ञाप्योपायनख्यापनमदृष्टसंसर्गविद्यासंज्ञादिभिः; विदेशप्रवृत्तिज्ञान तदहरेव गृहकपोतेन मुद्रासंयुक्तेन ।

दैवतसंयोगख्यापनं तु--सुरुङ्गामुखेनाग्निचैत्यदैवतप्रतिमाच्छिद्रानुप्रविष्टैरग्निचैत्यदैवतव्यञ्जनैः सम्भाषणं पूजनं च; उदाकादुत्थितैर्वा नागवरुणव्यञ्जनैः सम्भाषा पूजनं च; रात्रावन्तरुदके समुद्रवालुकाकोशं प्रणिधायाग्निमालादर्शनम्; शिलाशिक्यावगृहीते प्लवके स्थानम्; उदकवस्तिना जरायुणा वा शिरोवगूढनासः पृषतान्त्रकुलीरनक्रशिंशुमारोद्रवसाभिर्वा शतपाक्यं तैलं नस्तःप्रयोगः तेन रात्रि-

---

# अधिकरण १३ वें. किल्ला काबीज करण्याचा उपाय.

### शत्रुपक्षांत फाटाफूट.

विजयेच्छु राजास शत्रूचा गांव हस्तगत करून घ्यावयाचा असेल तेव्हां त्यानें आपल्यास सर्व जाणण्याची शक्ति आहे व आपल्यास देवता प्रसन्न आहेत असें प्रसिद्ध करून, आपल्या लोकांत उत्साह उत्पन्न करावा आणि शत्रु—पक्षांतील लोकांस घाबरवून टाकावें.

आपल्यास सर्व कांहीं कळतें, यविषयीं लोकांची खात्री करावयाची ती येणेंप्रमाणें:—अधिकाऱ्यांच्या घरांतील गुप्त बातमी शोधून काढून, तुमचें बिंग कळलें आहे असें दर्शवून त्यांचा नक्षा उतरवावा. राज्यांतील गुन्हेगार शोधून काढण्याकरितां नेमिलेल्या गुप्त हेरांकरवीं राजद्रोही लोकांचा तपास लावून, त्यांचीं कारस्थानें चव्हाट्यावर आणावीं. कोणी कांहीं विनंति करावयास किंवा भेट द्यावयास आल्यास तो काय विचारणार किंवा कोणती भेट देणार हें, इतरांस प्रत्यक्ष संबंध न दिसेल अशा सांकेतिक विद्येच्या द्वारें, समजून घेऊन तें आगाऊ जाहीर करावें. परकीय देशांत कांहीं विशेष घडल्यास त्याच दिवशीं पाठविलेल्या पाळीव पारावतानें आणिलेल्या मोहोरबंद पत्रावरून सदर बातमी आपल्या राजधानींत त्याच दिवशीं जाहीर करावी.

आपल्यास देवता प्रसन्न आहेत हें सिद्ध करावयाचें, तें येणें प्रमाणें:—भुयाराच्या द्वारें अग्नि—गृहांत किंवा समाधि गृहांत किंवा देवाच्या मूर्तीला भोंक पाडून त्या मूर्तींत, गुप्त हेरांनीं दडून बसावें आणि अशा रितीनें अग्निरूप, समाधिरूप किंवा देवतारूप बनलेल्या हेरांशीं विजयेच्छु राजानें संभाषण करावें व त्यांची पूजा करावी; नागांचें किंवा नागदेवतांचे वेष धारण करून पाण्यांतून वर आलेल्या गुप्त हेरांशींहि राजानें असेंच संभाषण करावें व त्यांची पूजा करावी; रात्रीं पाण्याच्या आंत वाळूंचीं पोतीं ठेवून, त्यावरून हेरांनीं अग्निमाला दाखवावी, आंत शिळा ठेवलेल्या शिंक्यानें नांव स्थिर करून पाण्यांत उभें राहून दाखवावें; किंवा पाणी आंत न शिरेल अशा कपड्यानें किंवा प्राण्याच्या गर्भ—वेष्टनानें डोकें व नाक झांकून आणि ठिपक्याच्या सांबराचीं आंतडीं, खेंकडा, सुसर, जलकपि व पाणमांजर यांची चरबी शंभरदां कढवून तयार केलेलें तेल नाकास चोंपडून, जलस्तंभन करून रात्रीच्या वेळीं पाण्यांतील प्राण्यांबरोबर खुशाल पाण्यांत संचार करून दाखवावा. अशा रीतीनें पाण्यांत

गणश्चरति इत्युदकचरणानि; तैर्वरुणनागकन्यावाक्यक्रिया सम्भाषणं च; कोपस्थानेषु मुखादग्निधूमोत्सर्गः ।

तदस्य स्वविषये कार्तान्तिकनैमित्तिकमौहूर्तिकपौराणिकेक्षणिकगूढपुरुषाः । साचिव्यकरास्तद्दर्शिनश्च प्रकाशयेयुः । परस्य विषये दैवतदर्शनं दिव्यकोशदण्डोत्पत्तिं च अस्य ब्रूयुः । दैवतप्रश्ननिमित्तवायसाङ्गविद्यास्वप्नमृगपक्षिव्याहारेषु चास्य विजयं ब्रूयुः, विपरीतममित्रस्य सदुन्दुभिम् । उल्कां च परस्य नक्षत्रे दर्शयेयुः ।

परस्य मुख्यान् मित्रत्वेनापदिशन्तो दूतव्यञ्जनाः स्वामिसत्कारं ब्रूयुः । स्वपक्षबलाधानं परपक्षप्रतिघातं च तुल्ययोगक्षेमममात्यानामायुधीयानां च कथयेयुः । तेषु व्यसनाभ्युदयावेक्षणमपत्यपूजनं च प्रयुञ्जीत ।

तेन परपक्षमुत्साहयेद् यथोक्तं पुरस्तात् । भूयश्च वक्ष्यामः—साधारणगर्दभेन दक्षान्; लकुटशाखाहननाभ्यां दण्डचारिणः; कुलैलकेन चोद्विग्नान्; अशनिवर्षेण विमानितान्; विदुलेनावकेशिना

---

प्रकट झालेले हेर हे नागदेवता अथवा वरुणदेवता आहेत असें भासवून त्यांबरोबर राजानें संभाषण चालवावें; क्रोध आला, असें दाखविण्याकरितां त्या हेरांनीं कधीं कधीं तोंडावाटे अग्नि व धूर सोडावा.

राजाच्या देशांत जे ज्योतिषी, शकुन पाहणारे, मुहूर्त सांगणारे, गोष्टी सांगणारे, प्रश्न सांगणारे गुप्त हेर अथवा त्यांचे सांथीदार असतील, त्यांनीं आपल्या देशांत राजाच्या सर्वज्ञत्वाची स्तुति करावी आणि ज्या लोकांनीं आपल्या डोळ्यांनीं चमत्कार पाहिले असतील त्यांनीं लोकांमध्यें ते प्रसिद्ध करावे. याच मंडळींनीं शत्रूच्या देशांत जाऊन असें जाहीर करावें कीं, "विजयेच्छु राजास देवता प्रसन्न आहेत; व त्यास सैन्याची व द्रव्याची प्राप्ति देवतांपासून होत असते." देव आंगांत आणून प्रश्न विचारून शुभाशुभ सांगणें, शकुन, काक शब्दशकुन, स्वप्नविद्या, पशुपक्ष्यांची भाषा जाणणें इत्यादि निमित्तांनीं आपल्या राजाला जयप्राप्ति होणार आहे असें, डांगोरा पिटून सर्वत्र प्रसिद्ध करावें व शत्रूसंबंधानें याच्या उलट प्रसिद्धि करावी. ( त्याचा पराजय होणार असें जाहीर करावें. ). शत्रूच्या ( जन्म ) नक्षत्रांतून उल्कापात होत आहे व तें दुश्चिन्ह आहे, असें लोकांत पिकवावें.

विजयेच्छु राजाच्या दूतरूपी हेरांनीं शत्रूच्या सरदारांस मोठ्या प्रेमानें असें सांगावें कीं, विजयेच्छु राजा आल्या गेल्याचा परामर्ष चांगल्या रीतीनें घेत असतो, त्याजवळील सैन्य अत्यंत बलाढ्य आहे, तो शत्रूला सहज जिंकूं शकेल, आपल्या अमात्यांच्या व सैनिकांच्या योगक्षेमाची काळजी तो फार चांगली घेतो, त्यांवर संकट आलें तर त्यांस साहाय्य करतो, त्यांच्या उत्कर्षास मदत करितो. सारांश—तो आपल्या प्रजेची पित्याप्रमाणें काळजी घेतो, असें सांगावें.

याप्रमाणें शत्रु-पक्षांतील लोकांस आपल्या बाजूस वळविण्याचे कांहीं उपाय सांगितले, तथापि आणखी सांगतों:—

कर्तव्यदक्ष माणसांना चिडविण्याकरितां म्हणावें कीं, उकिरड्यावरच्या गाढवाइतकीच राजा तुमची किंमत समजतो, तुमच्या श्रमाचा तुम्हाला मोबदला काहींच नाहीं; सैनिकांना चिडवावें कीं, हातीं धरावयाची काठी किंवा कुऱ्हाड इतकीच तुमची राजा किंमत करतो; त्याचें काम झालें कीं तुम्ही कोपऱ्यांत पडणार ! निराश झालेल्यांना म्हणावें कीं, बळी देण्याकरितां घरांत पोसलेल्या मेंढ्याची आणि तुमची स्थिति सारखीच, तुमचा बळी देऊन राजा चैन करणार; राजानें ज्यांचा अपमान केला असेल त्यांस हिणवावें कीं, हा तर तुमच्यावर वज्राघातच झाला, हा अपमान तुम्ही कसा सहन करितां ? ज्यांचा आशाभंग झाला असेल त्यास म्हणावें या राजाची नोकरी म्हणजे बोरूची काठी; किंवा फळ न येणारें वांझोटें झाड किंवा अभक्ष्य असा काकबळी किंवा कपटमेघ; याच्यापासून कांहीं प्राप्ति व्हावयाची नाहीं, राज-

वायसपिण्डेन कैतवजमेघेनेति विहताशान्; दुर्भगालङ्कारेण द्वेषिणेति पूजाफलान्; व्याघ्रचर्मणा मृत्युकूटेन चोपहितान्; पीलुविखादनेन करकयोष्ट्र्या गर्दभीक्षीराभिमन्थनेनेति ध्रुवापकारिणः इति।

प्रतिपन्नान् अर्थमानाभ्यां योजयेत्। द्रव्यभक्तच्छिद्रेषु चैनान् द्रव्यभक्तदानैरनुगृह्णीयात्। अप्रतिगृह्णतां स्त्रीकुमारालङ्कारानभिहरेयुः।

दुर्भिक्षस्तेनाटव्युपघातेषु च पौरजानपदानुत्साहयन्तः सत्रिणो ब्रूयुः—' राजानमनुग्रहं याचामहे; निरनुग्रहाः परत्र गच्छामः ' इति।

तथेति प्रतिपन्नेषु द्रव्यधान्यपरिग्रहैः। साचिव्यं कार्यमित्येतदुपजापाद्भुतं महत्॥

इति कौटलीयार्थशास्त्रे दुर्गलम्भोपाये त्रयोदशेऽधिकरणे प्रथमोऽध्यायः उपजापः, आदित एकचत्वारिंशच्छततमः॥

---

# अध्याय १४२—योगवामनम्।



मुण्डो जटिलो वा पर्वतगुहावासी चतुर्वर्षशतायुः ब्रुवाणः प्रभूतजटिलान्तेवासी नगराभ्याशे तिष्ठेत्। शिष्याश्चास्य मूलफलोपगमनैरमात्यान् राजानं च भगवद्दर्शनाय योजयेयुः। समागतश्च राज्ञा

---

सेवेबद्दल ज्यांना कांहीं फलप्राप्ति झाली असेल त्यांना समजवावें कीं, कुरूप स्त्रीला दिलेल्या अलंकाराबद्दल नवऱ्याला जसें वाईट वाटत असतें तसें तुम्हांला दिलेल्या बक्षिसाबद्दल त्याला वाइट वाटतें; जे कोणी त्याच्या शब्दावर विश्वास ठेवून त्याच्या पक्षास जाऊन मिळाले असतील त्यांना कळवावें कीं, हा राजा वाघाचें कातडें पांघरलेला पण तुम्हाला मृत्युमुखांत लोटणारा असा आहे. आणि जे लोक नाशाला टपले असतील त्यांना म्हणावें कीं, तुमचा प्रयत्न हा करका पक्षिणीनें पीलुफळ खाण्याचा, किंवा मातीच्या भांड्यांत गाढवींचें दूध काढण्याचा, प्रयत्न करण्याइतकेंच आत्मघातक आहे.

या उपदेशानें शत्रूचे लोक वश झाले म्हणजे त्यांस विजयेच्छु राजानें द्रव्य व मान द्यावा. त्यांच्यापैकीं ज्यांस खाण्यापिण्याची पंचाइत असेल, त्यांस भरपूर पैसे व धान्य द्यावें; धान्य किंवा पैसे घेण्याचें नाकारतील, त्यांच्या बायकां मुलांस अलंकार द्यावे.

शत्रूचे लोक दुष्काळानें पीडित झाले असतील अथवा चोरांच्या व दरवडेखोरांच्या हल्ल्यामुळें गांजले असतील, तेव्हां गुप्त हेरांनीं त्यांस उत्तेजन देऊन असा सल्ला द्यावा कीं, " आपण राजापाशीं दाद मागावयास जाऊं; त्यानें आपली दाद घेतली तर बरेंच आहे, नाहींतर आपण दुसऱ्या राज्यांत निघून जाऊं. "

ही मसलत त्यांस पटली व ते राजाकडे आले म्हणजे त्यांना राजानें धन, धान्य व इतर आवश्यक वस्तु पुरविण्याची तजवीज करावी; अशा रीतीनें शत्रूच्या लोकांत फूट पाडली म्हणजे मोठें कार्य साधतें.

---

## कपटानें शत्रूचें उच्चाटण.

पर्वताच्या गुहेंत राहणारा, मुंडलेला किंवा जटाधारी गोसावी असेल, त्यानें मी चारशें वर्षांचा आहे, असें लोकांत प्रसिद्ध करून, बरेच जटाधारी शिष्य बरोबर घेऊन, शत्रुराजाच्या राजधानीजवळ मुक्काम करून राहावें. त्याच्या शिष्यांनीं कंदमूळें व फळें अमात्यांस व राजास बोवांचा प्रसाद म्हणून अर्पण करून, त्यांस महाराजांच्या दर्शनास बोलवावें. त्याप्रमाणें राजा दर्शनास आला म्हणजे त्या गोसावीबुवांनीं पूर्वींच्या राजांची व देशांची नांवें, वृत्तांत वगैरे सांगून, त्यास असें म्हणावें कीं, "दर शंभर वर्षांनीं मी अग्नींत प्रवेश करून, पुनः बालवयस्क होऊन, बाहेर

पूर्वराजदेशाभिज्ञानानि कथयेत् ‘ शते शते च वर्षाणां पूर्णेऽहमग्निं प्रविश्य पुनर्बालो भवामि; तदिह भवत्समीपे चतुर्थमग्निं प्रवेक्ष्यामि; अवश्यं मे भवान् मानयितव्यः; त्रीन् वरान् वृणीष्व इति । प्रतिपन्नं ब्रूयात्--सप्तरात्रमिह सपुत्रदारेण प्रेक्षाप्रहवणपूर्वं वस्तव्यम् इति । वसन्तमवस्कन्देत ।

मुण्डो वा जटिलो वा स्थानिकव्यञ्जनः प्रभूतजटिलान्तेवासी बस्तशोणितदिग्धां वेणुशलाकां सुवर्णचूर्णेनावलिप्य वल्मीके निदध्याद् उपजिह्विकानुसरणार्थं, स्वर्णनाळिकां वा । ततः सत्री राज्ञः कथयेत्--असौ सिद्धः पुष्पितं निधिं जानाति ’ इति । स राज्ञा पृष्टः ‘ तथा ’ इति ब्रूयात । तच्चाभिज्ञानं दर्शयेत् । भूयो वा हिरण्यमन्तराधाय ब्रूयाच्चैनं--‘ नागरक्षितोऽयं निधिः प्रणिपातसाध्यः ’ इति । प्रतिपन्नं ब्रूयात--सप्तरात्रम् ’ इति समानम् ।

स्थानिकव्यञ्जनं वा रात्रौ तेजनाग्नियुक्तमेकान्ते तिष्ठन्तं सत्रिणः क्रमाभिनीतं राज्ञः कथयेयुः ‘ असौ सिद्धः सामेधिकः ’ इति । तं राजा यमर्थं याचेत, तमस्य करिष्यमाणः ‘ सप्तरात्रम् ’-- इति समानम् ।

सिद्धव्यञ्जनो वा राजानं जम्भकविद्याभिः प्रलोभयेत । ‘ तं राजा इति समानम् ।

सिद्धव्यञ्जनो वा देशदेवतामभ्यर्हितामाश्रित्य प्रहवणैरभीक्ष्णं प्रकृतिमुख्यानभिसंवास्य क्रमेण राजानमतिसन्दध्यात् ।

---

येतों; आतां तुझ्या राजधानीसमीप चवथ्यांदा अग्नींत प्रवेश करणार आहें, त्यासमयीं तुझा सन्मान मला अवश्य केला पाहिजे. यास्तव मजपासून तूं तीन वर मागून घे. ” त्यानें वर मागावयाचें कबूल केलें म्हणजे “ सात दिवस बायकामुलाबाळांसह समारंभ व यज्ञोत्सव करीत या ठिकाणीं मुक्काम केला पाहिजे, ” असें त्यास सांगावें. त्याप्रमाणें त्यानें मुक्काम केला म्हणजे त्यास ठार करावें.

मुंडलेल्या किंवा जटाधारी गोसाव्यानें, आपल्याला भूमिगत द्रव्याचें ज्ञान आहे, असें लोकांत प्रसिद्ध करावें; आणि बरोबर पुष्कळ जटाधारी शिष्य घेऊन कोठेंतरी मुक्काम करावा. नंतर वेळूचा पोकळ तुकडा मेंढ्याच्या रक्तानें माखून त्यावर सोन्याचा चूर लिंपून, तो तुकडा वारुळांत ठेवावा; अथवा जी मधून साप जाईल येईल, अशी सोन्याची फुंकणी वारुळांत ठेवावी. नंतर दुसऱ्या हेरानें राजास जाऊन सांगावें कीं, ‘ भूमिगत द्रव्य कोठें आहे, हें या बुवास समजतें. ” राजानें त्यास विचारिलें म्हणजे ‘ होय मला समजतें, ’ असें त्यानें सांगावें. नंतर तो सुवर्णचूर्णयुक्त वेळूचा तुकडा अथवा ती सोन्याची नळी दाखवून, राजाची खात्री पटवावी. भूमींत आणखी अधिक द्रव्य ठेवून, राजास म्हणावें, “ या ठिकाणीं पुष्कळ द्रव्य आहे पण त्यावर नाग रक्षण करीत बसला आहे; त्याची पूजा केल्याशिवाय तें प्राप्त व्हावयाचें नाहीं. ” राजानें कबूल केलें म्हणजे त्यास बायकामुलांसह पूजासमारंभासाठीं सात दिवस मुक्काम करावयास बोलवावें. त्याप्रमाणें त्यानें मुक्काम केला म्हणजे त्याची वर सांगितल्याप्रमाणें वाट लावावी.

भूमिगत गुप्त द्रव्य जाणणाऱ्या हेरानें अंगाला कांहीं चकाकणारीं द्रव्यें फांसून, एकांत ठिकाणीं अग्निज्वालेप्रमाणें शरीर प्रकाशमान करून, स्वस्थ बसावें आणि मग इतर हेरांनीं राजास जाऊन म्हणावें कीं, “ या बुवाला गुप्त द्रव्य कोठें सांपडेल, हें समजतें; बुवा मोठे सिद्ध पुरुष आहेत; ” असें सांगून बुवांच्या दर्शनास घेऊन यावें. तेथें बुवानें राजा जें मागेल, तें देण्याचें वचन देऊन, त्यास सात दिवस बायकांमुलांसह मुक्काम करावयास सांगावें. आणि वरच्या प्रमाणेंच व्यवस्था करावी.

सिद्धाचें सोंग घेतलेल्या हेरानें ‘ जंभक ’ अथवा जादू विद्येनें राजास भूलवून टाकावें आणि योग्य समयीं त्याची विल्हेवाट लावावी.

जटिलव्यञ्जनमन्तरुदकवासिनं वा सर्वश्वेतं तटसुरुङ्गाभूमिगृहापसरणं वरुणं नागराजं वा सत्रिणः क्रमाभिनीतं राज्ञः कथयेयुः । 'तं राजा' इति समानम् ।

जनपदान्तेवासी सिद्धव्यञ्जनो वा राजानं शत्रुदर्शनाय योजयेत् । प्रतिपन्नं बिम्बं कृत्वा शत्रुमावाहयित्वा निरुद्धे देशे घातयेत् ।

अश्वपण्योपयाता वैदेहकव्यञ्जनाः पण्योपायननिमित्तमाहूय राजानं पण्यपरीक्षायामासक्तमश्वव्यतिकीर्णं वा हन्युः, अश्वैश्च प्रहरेयुः ।

नगराभ्याशे वा चैत्यमारुह्य रात्रौ तीक्ष्णाः कुम्भेषु नालीन् वा विदलानि धमन्तः—'स्वामिनो मुख्यानां वा मांसानि भक्षयिष्यामः पूजा नो वर्तताम्' इत्यव्यक्तं ब्रूयुः । तदेषां नैमित्तिकमौहूर्तिकव्यञ्जनाः ख्यापयेयुः ।

मङ्गल्ये वा ह्रदे तटाकमध्ये वा रात्रौ तेजनतैलाभ्यक्ता नागरूपिणः शक्तिमुसलान्ययोमयानि निष्पेषयन्तस्तथैव ब्रूयुः । ऋक्षचर्मकञ्चुकिनो वा अग्निधूमोत्सर्गयुक्ता रक्षोरूपं वहन्तस्त्रिरपसव्यं नगरं कुर्वाणाः श्वसृगालवाशितान्तरेषु तथैव ब्रूयुः । चैत्यदैवतप्रतिमां वा तेजनतैलेनाभ्रपटलच्छन्नेनाग्निना वा रात्रौ प्रज्वाल्य तथैव ब्रूयुः । तदन्ये ख्यापयेयुः ।

---

सिद्ध बनलेल्या हेरानें देशांतील सर्व शक्तिमान् देवता मला प्रसन्न आहे, असें सांगावें आणि उत्सवानिमित्त आधीं राज्यांतील मुख्य मुख्य प्रधानांस बोलावून आणावें, मग हळूहळू राजालाहि निमंत्रण करून आणावें व त्यास त्या ठिकाणीं ठार करावें.

जटाधारी हेराने शुद्ध सफेत वेष धारणकरून पाण्यांत जाऊन बसावें; आणि इतर हेरांना राजाकडे जाऊन असें सांगावें कीं, ही वरुणदेवता अथवा हा नागराज आहे; हा भुयारांतून अथवा तळघरांतून येथें येतो. असें सांगून राजास दर्शनासाठीं बोलवावें आणि तो आला म्हणजे त्याचा निकाल लावावा.

सिद्ध बनलेल्या हेरानें सरहद्दीवर कोठेंतरी मुक्काम करून राहावें, आणि मी तुला शत्रुराजाची गांठ घालून देतों, असा त्यानें राजास निरोप पाठवावा. राजानें यावयाचें कबूल केलें म्हणजे शत्रुराजाचें सोंग घेतलेल्या इसमास पाचारण करावें; त्याच्या भेटीस राजा आला म्हणजे सर्व बांजूंनीं गराडा घातलेल्या स्थळीं त्यास मारावें.

घोड्यांचा व्यापार करणाऱ्या सौदागर हरांनीं घोडे खरेदी करण्याच्या निमित्तानें राजाला बोलवावें; आणि राजा घोडे पाहण्यांत गर्क झाला असतां, किंवा घोड्यांच्या घेऱ्यांत सांपडला असतां, त्यास मारावें अथवा घोड्यांच्या पायांखालीं तो तुडवला जाईल असें करावें.

गुंड हेरांनीं राजधानीनजीक एखाद्या देवालयांवर अथवा समाधीवर चढून, वेळूच्या किंवा धातूच्या फुंकणीनें मडक्यांतील अग्नि फुंकून जाळ करावा आणि "राजाचें व अमात्यांचें मांस आम्हीं भक्षण करणार आहों, आमची पुंजा यथासांग होवो!" असें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटावें. हें वर्तमान ज्योतिषी किंवा शकुन सांगणाऱ्या हेरांनीं जगजाहीर करावें.

अथवा—नागराजाचा वेष घेतलेल्या हेरांनीं अंगास प्रकाशमान तेल चोंपडून, पवित्र सरोवरांत अथवा तळ्यांत बसावें; लोखंडी 'शक्ति', हत्यारें किंवा मुसळें हातीं घेऊन तीं आपटीत आपटीत, तोंडांतल्या तोंडांत वरच्याप्रमाणेंच पुटपुटावें.

अथवा—अस्वलाचें कातडें पांघरलेल्या हेरांनीं राक्षसाचे रूप धारण करून, तोंडावाटे अग्निज्वाला व धूर सोडीत, सोडीत शहराभोंवतीं उलटी, म्हणजे उजवीकडून डावीकडे, प्रदक्षिणा करावी; आणि कोल्हे—सांबर वगैरे प्राणी ज्यास्थलीं भयंकर ओरड करीत असतील, त्या स्थलीं मोठ्यानें ओरडत असावें. अथवा—रात्रीच्या वेळीं समाधीला किंवा देवाच्या मूर्तीला भडकणाऱ्या तेलांत बुचकळलेल्या अभ्रकाचा थर देऊन तें पेटवावें, आणि वर सांगितल्याप्रमाणें ओरडावें. मग इतर हेरांनीं तें वर्तमान लोकांत प्रसिद्ध करावें.

दैवतप्रतिमानामभ्यर्हितानां वा शोणितेन प्रस्रावमतिमात्रं कुर्युः । तदन्ये दैवरुधिरसंस्रावे सङ्ग्रामे पराजयं ब्रूयुः ।

सन्धिरात्रिषु श्मशानप्रमुखे वा चैत्यमूर्ध्वभक्षितैर्मनुष्यैः प्ररूपयेयुः । ततो रक्षोरूपी मनुष्यकं याचेत । यश्चात्र शूरवादिकोऽन्यतमो वा द्रष्टुमागच्छेत् तमन्ये लोहमुसलैर्हन्युः, यथा रक्षोभिर्हत इति ज्ञायेत । तदद्भुतं राज्ञः तद्दर्शिनः सत्रिणश्च कथयेयुः । ततो नैमित्तिकमौहूर्तिकव्यञ्जनाः शान्तिं प्रायश्चित्तं ब्रूयुः–‘ अन्यथा महदकुशलं राज्ञो देशस्य च ’ इति । प्रतिपन्नम् ‘ एतेषु सप्तरात्रमेकैकमन्त्रबलिहोमं स्वयं राज्ञा कर्तव्यम् इति ब्रूयुः । ततः समानम् ।

एतान् वा योगानात्मनि दर्शयित्वा प्रतिकुर्वीत परेषामुपदेशार्थम् । ततः प्रयोजयेद् योगान् । योगदर्शनप्रतीकारेण वा कोशाभिसंहरणं कुर्यात् ।

हस्तिकामं वा नागवनपाला हस्तिना लक्षण्येन प्रलोभयेयुः, प्रतिपन्नं गहनमेकायनं वातिनीय घातयेयुः, बद्ध्वा वापहरेयुः ।

तेन मृगयाकामो व्याख्यातः ।

द्रव्यस्त्रीलोलुपमाढ्यविधवाभिर्वा परमरूपयौवनाभिः स्त्रीभिर्दायादनिक्षेपार्थमुपनीताभिः सत्रिणः प्रलोभयेयुः । प्रतिपन्नं रात्रौ सत्रिच्छन्नाः समागमे शस्त्ररसाभ्यां घातयेयुः ।

---

अथवा—ज्या देवास लोक मोठ्या भक्तीनें पूजितात, अशा देवाच्या मूर्तींतून युक्तीनें रक्ताचा पाट वाहवावा; इतरांनीं म्हणावें कीं, मूर्तींतून रक्त वाहणें हें युद्धांत पराजय होण्याचें लक्षण आहे.

पर्वणीच्या रात्रीं स्मशानांतील प्रमुख जागीं समाधिस्त इसमांचीं नुसतीं धडें दिसतील असा देखावा करावा. आणि राक्षसाचें रूप घेणाऱ्यानें, मला मनुष्य बळी द्या अशी मागणी करावी. नंतर गांवांत स्वतःस शूर म्हणून समजत असतील, अशा लोकांपैकीं जर एखादा मी राक्षसास मारतों, असें म्हणून पुढें येईल तर त्यास इतरांनीं लोखंडी मुसळांखालीं बडवावें आणि राक्षसांनीं मारले असें प्रसिद्ध करावें. असा अद्भुत चमत्कार प्रत्यक्ष पाहणाऱ्या गुप्त हेरांनीं राजास तो निवेदन करावा. नंतर शकुन सांगणाऱ्या व ज्योतिषी हेरांनीं, राजानें अमुक अमुक प्रायश्चित्त घेतलें पाहिजे व शांति केली पाहिजे; नाहींतर, राजावर व देशावर अनर्थ गुजरेल असें सांगावें. शांति व प्रायश्चित्त करण्याचें कबूल केलें म्हणजे, राजानें सात दिवस रोज रोज अमुक मंत्रपाठ केला पाहिजे, अमुक बळी दिले पाहिजेत व अमुक होम केले पाहिजेत, असें सांगावें. ह्या कार्यक्रमांत संधि साधून वर सांगितल्याप्रमाणें त्यास मारावें.

इतर राजांस फसविण्याकरितां, विजयेच्छु राजानें प्रथम स्वतः—वरील अनर्थ टाळविण्याकरितां वरील विधि करावे आणि मग शत्रूस सदर विधि करण्याचा उपदेश करावा. अशा रितीनें ईश्वरी कोप शांत करण्याच्या उद्देशानें प्रजेपासून द्रव्यहि गोळा करावें.

शत्रूला हत्तींचा नाद असला तर हत्तीरानावरील अधिकाऱ्यानें तयार केलेला, असा एखादा सुंदर हत्ती दाखवून, त्यास नादीं लावावें. त्यास पकडावयास शत्रु आला म्हणजे दाट झाडींत अथवा पाऊलवाट असलेल्या स्थळांत त्यास नेऊन ठार करावें, किंवा बंदिवान करून घेऊन जावें. शिकारीचा नाद असलेल्या शत्रूस कसें मारावें, हें यावरून समजून येईल.

शत्रु द्रव्यलोभी किंवा स्त्रीलंपट असला, तर गुप्त हेरांनीं अत्यंत सुंदर व तरुण अशा स्त्रिया किंवा श्रीमंत विधवा स्त्रिया गांठून, त्यांस त्यांच्या नातलगांकडून त्यांची ठेव परत देवविण्याचें वचन देऊन, आपल्या कह्यांत आणून त्यांस शत्रूकडे धाडावें; आणि त्यांनीं शत्रूस मोहित करावें. ठरल्याप्रमाणें रात्रीं समागमाकरितां शत्रु आला म्हणजे, गुप्त हेरांनीं त्यास शस्त्रप्रयोगानें किंवा विषप्रयोगानें ठार करावें.

सिद्धप्रव्रजितचैत्यस्तूपदैवतप्रतिमानामभीक्ष्णाभिगमनेषु वा भूमिगृहसुरुङ्गागूढभित्तिप्रविष्टास्तीक्ष्णाः परममिहन्युः ।

येषु देशेषु याः प्रेक्षाः प्रेक्षते पार्थिवः स्वयम् । यात्राविहारे रमते यत्र क्रीडति वाम्भसि ॥
चाद्रुक्त्यादिषु कृत्येषु यज्ञप्रहवणेषु वा ॥ सूतिकाप्रेतरोगेषु प्रीतिशोकभयेषु वा ॥
प्रमादं याति यस्मिन् वा विश्वासात् स्वजनोत्सवे । यत्रास्यारक्षिसञ्चारो दुर्दिने सङ्कुलेषु वा ॥
विप्रस्थाने प्रदीते वा प्रविष्टे निर्जनेऽपि वा । वस्त्राभरणमाल्यानां फेलाभिः शयनासनैः ।
मद्यभोजनफेलाभिस्तूर्यैर्वाभिहतैः सह । प्रहरेयुररींस्तीक्ष्णाः पूर्वप्रणिहितैः सह ॥
यथैव प्रविशेयुश्च द्विषतः सत्रहेतुभिः । तथैव चापगच्छेयुरित्युक्तं योगवामनम् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे दुर्गलम्भोपाये त्रयोदशाधिकरणे द्वितीयोऽध्यायः योगवामनम्,
आदितो द्विचत्वारिंशच्छततमः ॥

---

# अध्याय १४३ अपसर्पप्रणिधिः ।

श्रेणीमुख्यमाप्तं निष्पातयेत् । स परमाश्रित्य पक्षापदेशेन स्वविषयात् साचिव्यकरणसहायोपादानं कुर्वीत । कृतापसर्पोपचयो वा परमनुमान्य स्वामिनो दूष्यग्रामं वीतहस्त्यश्वं दूष्यामात्यं दण्डमाक्रन्दं

---

सिद्ध किंवा संन्यासी आणि समाधि, स्तूप अथवा देवालयें, यांचें दर्शन घेण्याकरितां शत्रु एखादे ठिकाणीं वारंवार येत असेल, तर गुंड हेरांनीं ती संधि साधून तळघरामधून, भुयारामधून अथवा गुप्त भिंतीमधून आंत प्रवेश करून, तेथें शत्रूस ठार करावें.

कोणत्याहि स्थलीं कोणताहि देखावा अथवा खेळ पाहण्याकरितां राजा स्वतः गेलेला असो; नगराबाहेर मौजेनें प्रवास करीत असो; अथवा जलक्रीडा करित असो; दुसऱ्याशीं थट्टा मस्करी करीत असो; यज्ञ व हवन पाहात असो; घरांत कोणी प्रसूत होत असतां, अथवा मेलें असतां, अथवा कोणी आजारी पडलें असतां, तो प्रेमांत अथवा दुःखांत अथवा काळजींत असो; तो आप्तांच्या उत्सवांत निर्धास्त असो अथवा गैरसावध असो; अंगरक्षक ज्या ठिकाणीं जवळ असण्याचें कारण नांहीं, अशा ठिकाणीं अंसो; पावसांत असो किंवा गर्दींत असो; ब्राम्हणांच्या एकत्र जमण्याच्या स्थानीं असो; आगीच्या ठिकाणीं गेलेला असो; निर्जनस्थलीं असो, कोठेंतरी संधि साधून आणि त्याचीं वस्त्राभरणें पुष्पमाळा, शयन, आसन, खाण्यापिण्याचे पदार्थ यांचा उपयोग करून आणि त्या ठिकाणीं अगोदर छपून बसलेल्या हेरांच्या सहाय्यानें व तुताऱ्या फुंकून आवाज करून त्या आवाजाच्या गर्दींत गुंड हेरांनीं शत्रूवर प्रहार करावा. इतकें केल्यानंतर, ज्याप्रमाणें ते हेर गुप्त रितीनें येऊन दडून बसले होते, त्याचप्रमाणें त्यांनीं गुप्तपणें निघून जावें. याप्रमाणें शत्रूवर हल्ला करून कपटानें त्याचा नाश करावा.

---

## शत्रूच्या देशांत राहणारे गुप्त हेर.

एखाद्या श्रेणीवरील प्रमुख व विश्वासूक अधिकाऱ्यास विजयेच्छु राजानें हद्दपार करावें. त्यानें शत्रूचा आश्रय घ्यावा आणि त्याच्या मदतीकरितां म्हणून आपल्या देशांतून अनेक सहाय्यक लोकांना तिकडे न्यावें. अशा रीतीनें तेथें बराच जमाव जमला म्हणजे आश्रय देणाऱ्या राजाच्या परवानगीनें, ज्यांत हत्ती व घोडे फारसे नाहींत व ज्यांत राजद्रोही अमात्यांचा भरणा आहे, असा एखादा बंडखोर गांव किंवा तसलेंच विजयेच्छु राजाचें सैन्य

वा हत्वा परस्य प्रेषयेत् । जनपदैकदेशं श्रेणीमटवीं वा सहायोपादानार्थं संश्रयेत । विश्वासमुपगतं स्वामिनः प्रेषयेत् । ततः स्वामी हस्तिबन्धनमटवीघातं वापदिश्य गूढमेव प्रहरेत् ।

एतेनामात्याटविका व्याख्याताः ।

शत्रुणा मैत्रीं कृत्वा अमात्यानवक्षिपेत् । ते तच्छत्रोः प्रेषयेयुः--' भर्तारं नः प्रसादय ' इति । स यं दूतं प्रेषयेत्, तमुपालभेत--' भर्ता ते माममात्यैर्भेदयति, न च पुनरिहागन्तव्यम् ' इति । अथैकममात्यं निष्पातयेत्; स परमाश्रित्य योगापसर्पापरक्तदूष्यानशक्तिमतः स्तेनाटविकानुभयोपघातकान् वा परस्योपहरेत् । आप्तभावोपगतः प्रवीरपुरुषोपघातमस्योपहरेत् । अन्तपालमाटविकं दण्डचारिणं वा ' दृढमसौ चासौ च ते शत्रुणा सन्धत्त ' इति । अथ पश्चादभित्यक्तशासनैरेनान् घातयेत् ।

दण्डबलव्यवहारेण वा शत्रुमुद्योज्य घातयेत् ।

कृत्यपक्षोपग्रहेण वा परस्यामित्रं राजानमात्मन्यपकारयित्वाभियुञ्जीत । ततः परस्य प्रेषयेद्--' असौ ते वैरी ममापकरोति; तमेहि सम्भूय हनिष्यावः; भूमौ हिरण्ये वा ते परिग्रहः ' इति । प्रतिपन्नमभिसत्कृत्यागतमवस्कन्देन प्रकाशयुद्धेन वा शत्रुणा घातयेत् । अभिविश्वासनार्थं भूमिदानपुत्राभिषेकरक्षापदेशेन वा ग्राहयेत् । अविषह्यमुपांशुदण्डेन वा घातयेत् । स चेद् दण्डं दद्यात् न स्वयमाग-

---

किंवा त्याच्या मित्राचें राज्य, यावर हल्ला करून त्याजकडे तें वर्तमान पाठवावें. अथवा साहाय्य करण्याच्या मिषानें प्रांताच्या एका भागांत, पथक सैन्यांत किंवा अरण्यांत, आश्रय घेऊन राहावें; आणि तेथील लोकांचा विश्वास बसला म्हणजे विजयेच्छु राजाकडे निरोप पाठवावा. तो निरोप आल्यावर विजयेच्छुराजानें हत्ती पकडण्याच्या निमित्तानें, किंवा रानटी लोकांचा मोड करण्याच्या निमित्तानें, गुप्तपणें येऊन त्या प्रांतावर स्वारी करावी.

अमात्य व रानटी लोकांचे पुढारी, यांची कामगिरी अशीच जाणावी.

विजयेच्छु राजानें शत्रूशीं मित्रत्व दाखवून, आपल्या अमात्यांस दूर करावें. त्यांनीं त्या शत्रूकडे, दूताबरोबर असा संदेश पाठवावा कीं, " आमचा आमच्या राजाशीं सलोखा करून द्यावा. " सदर सलोखा घडवून आणण्याकरितां शत्रूकडून दूत आला म्हणजे विजयेच्छु राजानें त्याची निर्भत्सना करावी आणि म्हणावें कीं, " आमचें व आमच्या अमात्यांचें वांकडें यावें, अशी तुमच्या राजाचीच इच्छा दिसते; खबरदार पुनः येथें आलां तर ! " नंतर विजयेच्छु राजानें एका अमात्यास हद्दपार करावें; त्यानें शत्रूच्या दरबारांत आश्रय घेऊन, विजयेच्छु राजाच्या देशामधून गुप्त हेर, राजद्रोही लोक, दगलबाज लोक, नेभळट असे चोर व रानटी लोक, आणि मित्राची किंवा शत्रूची पर्वा न करणारे घातकी लोक, शत्रूला जमवून द्यावे. तदनंतर शत्रूचा विश्वास बसला म्हणजे शत्रूच्या राज्यामधलि पराक्रमी वीर नष्ट होतील, अशी योजना करावी. ती अशीः—" अमुक सरहद्दीवरील अधिकारी, रानटी लोकांचा अमुक पुढारी, अथवा अमुक सेनापति शत्रूशीं पक्का मिळाला आहे ! त्याचें पारिपत्य केलें पाहिजे, " असें शत्रूस सांगावें. नंतर त्या लोकांवर तो गुन्हा लागू होतो, असें आपल्या हेरांच्या हातीं पकडलेल्या पत्रव्यवहारावरून सिद्ध करून शत्रूच्या हुकुमानें त्यांस ठार करावें. किंवा आश्रय देणाऱ्या राजाला सैन्याची मदत देण्याचा करार करून, त्यास स्वारी करण्याला प्रोत्साहन देऊन, त्याचा नाश करावा.

विजयेच्छु राजानें आपल्या शत्रूचा जो शत्रु असेल, त्याच्या राज्यांतील फितुरी लोकांस वश करूनघेऊन, मग त्याजकडून आपली कांहीं आगळीक करून घेऊन, त्याजवर शिस्त धरावी. आपल्या शत्रूस म्हणावें कीं, ' हा तुझा शत्रु मला उपद्रव देत आहे; आपण उभयतां मिळून त्याचा मोड करूं; मोड केल्यावर तुम्ही वाटेल तर त्याची भूमि द्यावी अथवा द्रव्य द्यावें. " शत्रूनें कबूल केलें म्हणजे त्याचा सत्कार करावा; मग स्वारी सुरू झाल्यावर, गुप्त छाप्यानें

च्छेत्; तमस्य वैरिणा घातयेत्। दण्डेन वा प्रयातुमिच्छेत् न विजिगीषुणा, तथाप्येनमुभयतस्संपीडनेन घातयेत्। अविश्वस्तो वा प्रत्येकशो यातुमिच्छेद्, राज्यैकदेशं वा यातव्यस्य आदातुकामः, तथाप्येनं वैरिणा सर्वसन्दोहेन वा घातयेत्। वैरिणा वा सक्तस्य दण्डोपनयेन मूलमन्यतो हारयेत्।

शत्रुभूम्या वा मित्रं पणेत; मित्रभूम्या वा शत्रुम्। ततः शत्रुभूमिलिप्सायां मित्रेणात्मन्यपकारयित्वाभियुञ्जीत। इति समानाः पूर्वेण सर्व एव योगाः।

शत्रुं वा मित्रभूमिलिप्सायां प्रतिपन्नं दण्डेनानुगृह्णीयात; ततो मित्रगतमतिसन्दध्यात; कृतप्रतिविधानो वा व्यसनमात्मनो दर्शयित्वा मित्रेणामित्रमुत्साहयित्वा आत्मानमभियोजयेत्; ततः संपीडनेन घातयेत्; जीवग्राहेण वा राज्यविनिमयं कारयेत्।

मित्रेणाश्रितश्चेच्छत्रुरग्राह्ये स्थातुमिच्छेत्, सामन्तादिभिर्मूलमस्य हारयेत्; दण्डेन वा त्रातुमिच्छेत्, तमस्य घातयेत्।

तौ चेन्न भिद्येयातां प्रकाशमेवान्योन्यस्य भूम्या पणेत; ततः परस्परं मित्रव्यञ्जना उभयवेतना

---

अगर उघड लढाई देऊन, शत्रू–सरदाराकडून त्याचा नाश करवावा. पण आपल्यावरचा विश्वास उडूं नये म्हणून त्याला कबूल केलेली जहागिरीची देणगी किंवा रोख खंडणी, त्याच्या पुत्रास द्यावी व त्या पुत्रास राज्याभिषेक करून व त्याचें रक्षण करण्याची जबाबदारी आपणाकडे घेऊन, त्याचा विश्वास संपादन करावा. पुढे तो डोईजड झाल्यास, त्यास गुप्तपणें नाहींसें करावें. शत्रु जर लढाईस स्वतः येणार नाहीं, नुसतें सैन्यच पाठवील, तर त्याला त्याच्या शत्रूकरवीं ठार करावें. किंवा विजयेच्छु राजाबरोबर स्वारीवर न निघतां तो आपलें सैन्य घेऊन एकटाच स्वारीवर जाईल तर त्यास दोघांच्या कचाट्यांत पकडून त्याचा नाश करावा. अथवा कोणावरहि भरंवसा न ठेवितां, तो एकेकावर स्वतंत्रपणें स्वारी करूं पाहात असेल, किंवा ज्यावर स्वारी करावयाची, त्याच्या राज्याचा एखादा प्रांत काबीज करूं पाहात असेल, तर त्याचा वैरी गांठून त्याजकडून हरप्रयत्नानें त्याचा घात करावा. अथवा तो जर आपल्या वैऱ्यावर सैन्यासह चाल करून जाण्यांत गुंतला असेल, तर त्याच्या राजधानीवर दुसरीकडून हल्ला करवून, ती घेववावी.

अथवा शत्रूचा मुलूख काबीज करून देण्याचा मित्राशीं करार करावा, किंवा मित्राचा देश काबीज करून देण्याचा शत्रूशीं करार करावा. आणि त्याप्रमाणें त्या देशाच्या अभिलाषानें मित्रानें आगळीक सुरू केली कीं त्याजवर विजयेच्छु राजानें स्वारी करावी. पुढलें सगळें कारस्थान पूर्वीच्या परिच्छेदांत सांगितलें आहे तसें करावें.

शत्रु जर विजयेच्छु राजाच्या मित्राची भूमि काबीज करण्याची इच्छा करील तर त्याच्या इच्छेप्रमाणें विजयेच्छु राजानें त्यास सैन्याची मदत देऊं करावी; आणि तो मित्रत्वानें आपल्याकडे आला कीं त्यास फशीं पाडावें; किंवा स्वारीच्या प्रतिकाराची तरतूद करून ठेवून, काहीं अडचणीमुळें मला स्वतः येतां येत नाहीं, असें शत्रूस कळवावें; आणि मित्राची व शत्रूची लढाई लावून देऊन त्यांत शत्रूला आपल्या स्वतःवर हल्ला करावयाची वेळ आणावी. अशा प्रकारें दोघांच्या कचाट्यांत शत्रू सांपडला म्हणजे त्याला मारावें अथवा त्यास जिवंत हस्तगत करून, त्याचें राज्य विभागून घ्यावें.

मित्राचा आश्रय घेऊन, जर शत्रु एखाद्या दुर्भेद्य स्थलीं बसला असेल, तर शेजारच्या राजांच्या मदतीनें त्याचें राज्य काबीज करावें; सैन्याच्या जोरावर तो बचाव करूं लागला, तर त्याच्या सैन्याचा नाश करावा.

त्या दोघांत फाटाफूट होणार नाहीं, असें जेव्हां दिसून येईल, तेव्हां प्रत्येकाकडे उघड रीतीनें असा निरोप पाठवावा कीं, “मी तुम्हाला दुसऱ्या राजाचें राज्य मिळवून देण्याच्या कामांत मदत करितों.” या निरोपानंतर मित्रत्वाच्या वेषानें राहिलेल्या व दोघांपासूनहि पगार घेणाऱ्या मंडळींनीं त्या उभयतांकडे दूत पाठवून असा मजकूर

वा दूतान् प्रेषयेयुः—' अयं ते राजा भूमिं लिप्सते शत्रुसंहितः ' इति; तयोरन्यतरो जाताशङ्कारोषः पूर्ववच्चेष्टेत।

दुर्गराष्ट्रदण्डमुख्यान् वा कृत्यपक्षहेतुभिरभिविख्याप्य प्रव्राजयेत्, ते युद्धावस्कन्दावरोधव्यसनेषु शत्रुमतिसन्दध्युः, भेदं वास्य स्ववर्गेभ्यः कुर्युः, अभित्यक्तशासनैः प्रतिसमानयेयुः।

लुब्धकव्यञ्जना वा मांसविक्रयेण द्वास्स्था दौवारिकापाश्रयाश्चोराभ्यागमं परस्य द्विस्त्रिरिति निवेद्य लब्धप्रत्यया भर्तुरनीकं द्विधा निवेश्य ग्रामवधेऽवस्कन्दे च द्विषतो ब्रूयुः—' आसन्नश्चोरगणः, महांश्चाक्रन्दः, प्रभूतं सैन्यमागच्छतु ' इति। तदर्पयित्वा ग्रामघातदण्डस्य सैन्यमितरदादाय रात्रौ दुर्गद्वारेषु ब्रूयुः—' हतश्चोरगणः; सिद्धयात्रमिदं सैन्यमागतं; द्वारमपाव्रियताम् ' इति। पूर्वप्रणिहिता वा द्वाराणि दद्युः; तैः सह प्रहरेयुः।

कारुशिल्पिपाषण्डकुशीलववैदेहकव्यञ्जनानायुधीयान् वा परदुर्गे प्रणिदध्यात् । तेषां गृहपतिकव्यञ्जनाः काष्ठतृणधान्यपण्यशकटैः प्रहरणावरणान्यभिहरेयुः; देवध्वजप्रतिमाभिर्वा। ततस्तद्व्यञ्जनाः प्रम-

---

कळवावा कीं, " हा राजा शत्रूशीं मिलाफ करून तुमचा देश काबीज करूं पाहात आहे. " असा मजकूर ऐकून त्यांपैकीं एकजण तरी संशयानें व त्वेषानें प्रेरित होऊन लढाईला उठला तरी काम झालें. त्याची वर सांगितल्याप्रकारें खोड मोडावी.

विजयेच्छु राजानें आपल्या किल्ल्यावरील, प्रांतावरील अथवा सैन्यावरील अधिकाऱ्यावर, शत्रूला सामील झाल्याचा आरोप ठेवून, त्यांस हद्दपार करावें. त्यांनीं शत्रूशीं संगनमत करावें, आणि त्यास एखाद्या लढाईत, दंग्यांत अथवा वेढ्यांत गुंतवून पेंचांत आणावें. अथवा त्यांनीं शत्रूचे जातभाई शत्रूपासून फितवावे आणि सदर जातभाई राजद्रोही आहेत, असें जाहीर करून, आपल्या हेरांच्याकडून पकडलेल्या पत्रांवरून त्यांच्यावरील आरोप शाबीत करावा.

फांसेपारध्यांचे वेष घेतलेल्या गुप्त हेरांनीं शत्रूच्या किल्ल्याच्या दारापाशीं मांस विकण्याच्या निमित्तानें दुकान मांडून, हळूहळू किल्ल्याच्या दारावरील रखवालदारांची मैत्री संपादन करावी; आणि त्यांच्या मार्फतीनें, शत्रुपर्यंत अशी बातमी पोहोंचवावी कीं, चोरांची धाड येणार आहे. अशी बातमी दोन तीन वेळां कानीं आल्यामुळें, सदर बातमी खरी आहे, असा त्याचा विश्वास बसला म्हणजे शत्रूच्या गांवावर हल्ला करण्याकरितां किंवा लुटालूट करण्याकरितां आपल्या राजाचें सैन्य विभागून दोन ठिकाणीं उभें करून ठेवावें; आणि मग असा पुकारा करावा कीं, " चोर अगदीं नजीक येऊन ठेपले आहेत, ओरड चालली आहे, पुष्कळ सैन्य पाठवा. " याप्रमाणें तें सैन्य आलें म्हणजे तें एका टोळीच्या ताब्यांत देऊन टाकावें मग सैन्याची जी दुसरी टोळी असेल, तिनें रात्रीच्या वेळीं किल्ल्याच्या दाराशा येऊन असें ओरडावें कीं, " चोरट्या लोकांचा पाडाव झाला आहे; जय मिळवून हें सैन्य परत आलें आहे; किल्ल्याचे दरवाजे उघडा. " त्याबरोबर इकडे किल्ल्यांत असलेल्या आपल्या हेरांनीं किल्ल्याचीं दार उघडावीं; तीं उघडतांच त्या हेरांच्या साहाय्यानें, त्या सैन्यानें किल्ल्यांतील शिबंदीवर हल्ला करून तो किल्ला घ्यावा.

विजयेच्छु राजाच्या पक्षाकडील जे गुप्त हेर, साधे कारागीर, कुशल कारागीर, पाखंड मतवादी, नट आणि व्यापारी बनलेले असतील, त्यांनीं किंवा शस्त्रजीवी लोकांनीं शत्रूच्या किल्ल्यांत जाऊन राहावें; आणि अशा गुप्त हेरांस शेतकरी होऊन राहिलेल्या हेरांनीं लांकडाच्या, धान्याच्या किंवा गवताच्या गाड्यांतून शस्त्रें व चिलखतें लपवून नेऊन पुरवावीं; अथवा देवाच्या मूर्तींत अथवा पताकांत लपवून आयुधें पुरवावीं. तदनंतर पूजारी बनलेल्या हेरांनीं शंख व नगारे वाजवून शत्रूला अशी खबर द्यावी कीं, उघड किंवा गुप्त हल्ला करण्याकरितां

त्त्वधमवस्कन्दप्रतिग्रहमभिप्रहरणं पृष्ठतः शङ्खदुन्दुभिशब्देन वा प्रविष्टमित्यावेदयेयुः । प्राकारद्वाराट्टालकदानमनीकभेदं घातं वा कुर्युः ।

सार्थगणवासिभिरातिवाहिकैः कन्यावाहिकैरश्वपण्यव्यवहारिभिरुपकरणहारकैर्धान्यक्रेतृविक्रेतृभिर्वा प्रव्रजितलिङ्गिभिर्दूतैश्च दण्डातिनयनं सन्धिकर्म विश्वासनार्थम् । इति राजापसर्पाः ।

एत एवाटवीनामपसर्पाः कण्टकशोधनोक्ताश्च । व्रजमटव्यासन्नमपसर्पाः सार्थं वा चोरैर्घातयेयुः । कृतसङ्केतमन्नपानं चात्र मदनरसविद्धं वा कृत्वापगच्छेयुः । गोपालकवैदेहकाश्च ततश्चोरान् गृहीतलोप्त्रभाराः मदनरसविकारकालेऽवस्कन्दयेयुः । सङ्कर्षणदैवतीयो वा मुण्डजटिलव्यञ्जनः प्रहवणकर्मणा मदनरसयोगाभ्यामतिसन्दध्यात् । अथावस्कन्दं दद्यात् । शौण्डिकव्यञ्जनो वा दैवतप्रेतकार्योत्सवसमाजेष्वाटविकान् सुराविक्रयोपायननिमित्तं मदनरसयोगाभ्यामतिसन्दध्यात् । अथावस्कन्दं दद्यात् ।

ग्रामघातप्रविष्टां वा विक्षिप्य बहुधाटवीम् । घातयेदिति चोराणामपसर्पाः प्रकीर्तिताः ॥

इति कौटिलीयार्थशास्त्रे दुर्गलम्भोपाये त्रयोदशाधिकरणे तृतीयोऽध्यायः अपसर्पप्रणिधिः, आदितस्त्रिचत्वारिंशच्छततमः ॥

---

किंवा लढाई देण्याकरितां एक भले मोठें सशस्त्र सैन्य पाठीमागून येत आहे. नंतर त्या दंगलींत त्यांनीं विजयेच्छु राजाच्या सैन्यास किल्ल्याचे तटांतून अथवा बुरुजांवरून प्रवेश करावयास संधि द्यावी; अथवा शत्रुसैन्याची पांगापांग करून, त्याचा निःपात करावा.

फिरस्ते व्यापारी, भोई, घोड्यांची खरेदीविक्री करणारे व्यापारी; फेरीवाले, धान्याची खरेदीविक्री करणारे व्यापारी, लिंगधारण करणारे संन्यासी, यांचे संरक्षण करणाऱ्या पहारेकऱ्यांचा वेष धारण केलेल्या गुप्त हेरांनीं, अशींच चोरांची ओरड करून, किल्ल्यांतलें सैन्य फसवून दूर न्यावें आणि त्यांचा विश्वास बसण्याकरितां त्यांच्याशीं तहाचा करार करावा.

राजांच्या जवळ राहणाऱ्या हेरांचें हें वर्णन झालें.

उपरिनिर्दिष्ट हेर आणि कंटकशोधन अधिकरणांत सांगितलेले हेर, यांनींच सरहद्दीवरील रानांत हेरांचें काम करावें. ह्यांनीं चोरांची मदत मिळवून शत्रूचीं जनावरें किंवा जंगलाच्या आसपास असलेले व्यापारी यांचा घात करावा. पूर्वीं संकेत ठरवून या हेरांनीं खाण्यापिण्याचे पदार्थ तसेच किंवा मदनवृक्षाच्या रसानें दूषित करून विवक्षित ठिकाणीं ठेवून; तेथून निघून जावें. सदर पदार्थ खाल्ल्यामुळें त्या चोरांस अम्मल चढला, म्हणजे गुराखी हेरांनीं किंवा व्यापारी हेरांनीं त्याठिकाणीं येऊन, त्या चोरांवर हल्ला करावा आणि चोरांनीं लुटलेलें द्रव्य पळवून न्यावें.

मुंडलेल्या किंवा जटाधारी गोसावी हेरांनीं, संकर्षण देवाचे पूजारी म्हणून देवाच्या तीर्थांत मदनवृक्षाचा रस मिसळून, जंगलीं लोकांस प्राशन करावयास द्यावें; आणि मग त्यांजवर छापा घालावा.

दारू विकण्याचा धंदा करणाऱ्या गुप्त हेरानें देवाच्या उत्सवांत, पुण्यतिथीच्या उत्सवांत अथवा सार्वजनिक उत्सवांत दारू विकण्याकरितां म्हणून यावें आणि मदनरसमिश्रित मद्य जंगली लोकांस पाजावें. नंतर इतरांनीं हल्ला करून त्यांचा घात करावा.

आपल्या देशांतील खेडेगांवांचा नाश करण्याकरितां चालून आलेल्या रानटी सैन्याची हेरांनीं युक्तिप्रयुक्तीनें पांगापांग करून त्या रानटी सेनेचा नाश करावा. ज्यांना चोरांच्या सन्निध राहणारे हेर असें म्हणतात त्यांचें हें वर्णन झालें.

# अध्याय १४४ पर्युपासनकर्म, अवमर्दश्च ।



कर्शनपूर्वं पर्युपासनकर्म । जनपदं यथानिविष्टमभये स्थापयेत् । उत्थितमनुग्रहपरिहाराभ्यां निवेशयेदन्यत्रापसरतः; समग्रमन्यस्यां भूमौ निवेशयेदेकस्यां वा वासयेत् । न ह्यजनो जनपदो राज्यमजनपदं वा भवतीति कौटल्यः ।

विषमस्थस्य मुष्टिं सस्यं वा हन्याद् वीवधप्रसारौ च ।
प्रसारवीवधच्छेदान्मुष्टिसस्यवधादपि । वमनाद् गूढघाताच्च जायते प्रकृतिक्षयः ॥

प्रभूतगुणवद्धान्यकुप्ययन्त्रशस्त्रावरणाविष्टिरश्मिसमग्रं मे सैन्यमृतुश्च पुरस्तात्; अपर्तुः परस्य व्याधिदुर्भिक्षनिचयरक्षाक्षयः क्रीतबलनिर्वेदो मित्रबलनिर्वेदश्च ' इति पर्युपासीत ।

कृत्वा स्कन्धावारस्य रक्षां वीवधासारयोः पथश्च, परिक्षिप्य दुर्गं खातसालाभ्यां, दूषयित्वोदकमवस्राव्य परिखाः संपूरयित्वा वा, सुरुङ्गाबलकुटिकाभ्यां वप्रप्राकारौ हारयेत् ।

---

## शत्रूस घेरणें; शत्रूची दाणादाण.

शत्रूस घेरा घालावयाचा, तो त्यास अगोदर जेरीस आणून नंतर घालावा. पादाक्रांत केलेल्या देशांतील लोक पूर्वीप्रमाणेंच निर्भय राहतील, असा तो देश बंदोबस्तांत ठेवावा. देशांतील लोकांनीं बंडाचें निशाण उभारिलें असेल, तर त्या लोकांस तगाई व करमाफी देऊन शांत करावें; मात्र ते देशत्याग करणार असतील, तर तगाई व करमाफी देऊं नये. लढाईच्या सोईसाठीं सगळीच वस्ती उठवून दुसरीकडे पृथक् किंवा एकत्र वस्ती करवावी. ज्या देशांत लोकांची वस्ती नाहीं, त्यास देश कधीं म्हणतां येणार नाहीं; आणि देशाशिवाय राज्य असूं शकत नाहीं, असें कौटिल्याचें मत आहे.

शत्रु अडचणींत आहे, असें पाहून त्याच्या देशांतील पेरणी बंद पाडावी आणि उगवलेल्या पिकांची नासधूस करावी. लष्कराकरितां सांठविलेला दाणागोटा, गवत, कडबा, यांचा फडशा उडवावा.

देशांतील व्यापार बुडविला, धान्यांचीं कोठारें नाहींशीं केलीं, शेतांतील पेरणीची व पिकाची नासाडी केली, लोक देशोधडीस लाविले, पुढाऱ्यांचा गुप्तपणें घात केला म्हणजे अर्थातच तो देश ओसाड होतो.

विजयेच्छु राजास जेव्हां असें वाटत असेल कीं, "आपल्या सैन्यांत खाण्यालायक पुष्टिकारक धान्यें, कच्चा माल, यांत्रिक सामान, हत्यारें, चिलखतें, वेठबिगार, दोर वगैरेंचा मुबलक पुरवठा असून कालहि लढाईस अनुकूल आहे आणि शत्रूला मात्र काल अनुकूल नसून, त्याच्या सैन्यांत दुष्काळाचा व रोगाचा उपद्रव, धान्याचा तुटवडा व बंदोबस्ताचा अभाव आहे आणि भाडोत्री सैनिक व मित्राचे मागून घेतलेले सैनिक युद्धाला कंटाळलेले आहेत," तेव्हां त्यानें शत्रूला घेरण्याचें काम सुरू करावें.

प्रथम आपल्या छावणींत आणि धान्याचा व कहीचा पुरवठा ज्या रस्त्यांनीं येतो त्या रस्त्यांत चांगला बंदोबस्त करून ठेवावा आणि मग शत्रूच्या किल्ल्यास खंदका—तटाभोंवतीं जमून वेढा द्यावा, वेढा दिल्यावर शत्रूचा पाण्याचा पुरवठा दूषित करून टाकावा; खंदक भरलेला असल्यास कोरडा करावा, अथवा कोरडा असल्यास मातीनें भरून काढावा; आणि सुरुंग खोदून किंवा घोरपडी चढवून किल्ल्याचे बुरुज व तट हस्तगत करावेत.

द्वारं च गुलेन निम्नं वा पांसुमालयाच्छादयेत् । बहुलारक्षं यन्त्रैर्घातयेत् । निष्कराद्युपनिष्क्रम्याश्वैश्च प्रहरेयुः । विक्रमान्तरेषु च नियोगविकल्पसमुच्चयैश्चोपायानां सिद्धिं लिप्सेत दुर्गवासिनः ।

श्येनकाकनप्तृभासशुकशारिकोलूककपोतान् ग्राहयित्वा पुच्छेष्वग्नियोगयुक्तान् परदुर्गे विसृजेयुः ।

अपकृष्टस्कन्धावारादुच्छ्रितध्वजधन्वारक्षा वा मानुषेणाग्निना परदुर्गमादीपयेयुः ।

गूढपुरुषाश्चान्तर्दुर्गपालका नकुलवानरबिडालशुनां पुच्छेष्वग्नियोगमाधाय काण्डनिचयरक्षाविधानवेश्मसु विसृजेयुः ।

शुष्कमत्स्यानामुदरेष्वग्निमाधाय वल्लूरे वा वायसोपहारेण वयोभिर्हारयेयुः ।

सरलदेवदारुपूतितृणगुग्गुलुश्रीवेष्टकसर्जरसलाक्षागुलिकाः खरोष्ट्राजावीनां लण्डं चाग्निधारणम् ।

प्रियालचूर्णमवल्गुजमषीमधूच्छिष्टमश्वखरोष्ट्रगोलण्डमित्येष क्षेप्योऽग्नियोगः ।

सर्वलोहचूर्णमग्निवर्णं वा कुम्भीसीसत्रपुचूर्णं वा पारिभद्रकपलाशपुष्पकेशमषीतैलमधूच्छिष्टकश्रीवेष्टकयुक्तोऽग्नियोगः विश्वासघाती वा तेनावलिप्तः शणत्रपुसवल्कवेष्टितो बाण इत्यग्नियोगः ।

---

वाटेंत खिंडार पडलें असल्यास तें गोण्यांनीं भरून काढावें; खोलगट भाग मातीनें भरून काढावा; ज्या भागाचें रक्षण पुष्कळ लोक करीत असतील, त्या भागावर यंत्रांनीं मारा चालवून त्याचा विध्वंस करावा. शत्रूच्या घातक माऱ्यांतून आपल्या सैन्याचा बचाव करून घोडेस्वारांकडून किल्ल्याच्या दारांतून शत्रूवर हल्ला करवावा. एक हल्ला थांबून, दुसरा हल्ला चढवावयाच्या दरम्यानच्या काळांत विशिष्ट किंवा वैकल्पिक अटीवर किंवा संमिश्र स्वरूपाच्या अटींवर, किल्ल्यांतील लोकांस वश करण्याची खटपट चालवावी.

बहिरी ससाणे, कावळे, नप्तृ, भास, पोपट, मैना, घुबडें, कबुतरें वगैरे पक्षी पकडून, त्यांच्या पंखांस ज्वालाग्राही पदार्थ लावून त्यांना शत्रूच्या किल्ल्याकडे सोडावें; अथवा शत्रूच्या किल्ल्यापासून आपली छावणी जवळ असेल तर पाहरेकऱ्यांनीं उंच ध्वज आणि धनुष्यें यांच्या सहाय्यानें मनुष्यांनीं पेटविलेल्या अग्नीनें किल्ल्यास आग लावून द्यावी.

किल्ल्यांत रखवालदार म्हणून राहिलेल्या गुप्त हेरांनीं मुंगुस, वानर, मांजरें व कुत्रीं यांच्या शेंपटांस ज्वालाग्राही पदार्थ लावून बाण, धान्यादि संग्रह यांच्या कोठारांतून त्यांस सोडून द्यावें.

कावळ्यांना उचलून नेतां येतील एवढाल्या सुक्या माशांच्या पोटांत किंवा सुक्या मांसांत ज्वालाग्राही पदार्थ ठेवून, पक्ष्यांकडून आपलें खाद्य समजून, ते ज्वालाग्राही पदार्थ नेले जातील असें करावें.

सरल, देवदार, पूतितृण, गुगूळ, श्रीवेष्टक ( ज्यापासून टर्पेंटाइन तेल होतें, तो वृक्ष ) व सर्ज यांचा चीक, लाखेच्या गोळ्या, आणि उंट, गाढव व शेळ्यामेंढ्या यांच्या लेंड्या, यांच्यांत अग्नि बराच वेळ राहूं शकतो.

प्रियाल झाडाच्या बोंडांची भुकटी, अवल्गुज लांकडाचा कोळसा, मेण आणि घोडा, गाढव, उंट, गाय व बैल यांच्या लेंड्या एकत्र करून जें मिश्रण तयार होतें, त्यांतील अग्नि शत्रूच्या अंगावर दुरून फेंकावयाकरितां उपयोगी पडतो.

सर्व प्रकारच्या लोहधातूचें चूर्ण, अथवा कुंभी, शिसें व कथील यांचें चूर्ण करावें; तें लाल करून देवदार व पलाश फुलांच्या केसरांच्या राखेंत मिसळावें आणि त्यांत तेल, मेण व टर्पेंटाइन घालून गोळ्या तयार कराव्या म्हणजे त्यांत ज्वालाग्राही पदार्थाचा गुण येतो. अग्नीचा संशय न येतां, तो गोळा काम करितो. या गोळ्यांच्या भोंवतीं सणाची दोरी, कथिलाचा व शिशाचा पत्रा घट्ट आवळून ठेवावा, म्हणजे अग्नि-बाण तयार झाला.

अग्निप्रयोगाचें हें वर्णन झालें.

नत्वेव विद्यमाने पराक्रमेऽग्निमवसृजेत् । अविश्वास्यो ह्यग्निः दैवपीडनं च, अप्रतिसंख्यातप्राणिधान्यपशुहिरण्यकुप्यद्रव्यक्षयकरः । क्षीणनिचयं चावाप्तमपि राज्यं क्षयायैव भवति ।

इति पर्युपासनकर्म ।

'सर्वारम्भोपकरणविष्टिसम्पन्नोऽस्मि; व्याधितः पर उपधाविरुद्धप्रकृतिरकृतदुर्गकर्मनिचयो वा निरासारः सासारो वा पुरा मित्रैः सन्धत्ते ' इत्यवमर्दकालः ।

स्वयमग्नौ जाते समुत्थापिते वा प्रहवणे प्रेक्षानीकदर्शनसङ्गसौरिककलहेषु नित्ययुद्धश्रान्तबले बहुलयुद्धप्रतिविद्धप्रेतपुरुषे जागरणक्लान्तसुप्तजने दुर्दिने नदीवेगे वा नीहारसम्प्लवे वावमृद्नीयात् ।

स्कन्धावारमुत्सृज्य वा वनगूढः शत्रुः सत्रान्निष्क्रान्तं घातयेत् ।

मित्रासारमुख्यव्यञ्जनो वा संरुद्धेन मैत्रीं कृत्वा दूतमभित्यक्तं प्रेषयेत्–'इदं ते छिद्रम्; इमे दूष्याः; संरोद्धुर्वा छिद्रमयं ते कृत्यपक्षः' इति । तं प्रतिदूतमादाय निर्गच्छन्तं विजिगीषुर्गृहीत्वा दोषमभिविख्याप्य प्रवास्यापगच्छेत् ततः । मित्रासारव्यञ्जनो वा संरुद्धं ब्रूयात्–' मां त्रातुमुपनिर्गच्छ;

---

पराक्रम व शौर्य अंगीं असेल, तर असे अग्निप्रयोग केव्हांहि करूं नयेत; कारण अग्निप्रयोगावर विश्वास ठेवितां येत नाहीं; त्याचा परिणाम दैवयोगानेंच घडतो. शिवाय त्यायोगानें अनेक प्राण्यांची व जनावरांची हिंसा घडते, धान्याची नासाडी होते, पैसा नाहींसा होतो, कच्चा माल वगैरेचें नुकसान होतें; आणि देशांतील धन–धान्य नष्ट झालें, म्हणजे तो देश ताब्यांत आला, तरी नाशासच कारणीभूत होतो.

येणेंप्रमाणें वेढा घालण्याविषयींचे नियम सांगितले.

विजयेच्छु राजास जर असें वाटत असेल कीं, "आरंभिलेल्या कार्यास आवश्यक तीं सर्व साधनें आपल्यापाशीं आहेत व मजूरहि पुष्कळ आहेत; शत्रु स्वतः रोगग्रस्त असून त्याचे लोक त्यास प्रतिकूल आहेत, असें अनुभवानें कळलें आहे; त्याचा किल्ला नादुरुस्त असून, त्यांत धान्याचा व दारूगोळयाचा संग्रह केलेला नाहीं;त्यास कोणत्याहि मित्राचा आधार नाहीं अथवा असल्यास तो मित्र या पुढें मित्रत्वानें वागणारा नाहीं," तर त्यानें शत्रूचा फडशा पाडण्यास ही योग्य संधि आहे असें समजावें.

शत्रूच्या छावणींत आग आपोआप लागली असेल अथवा मुद्दाम लाविली असेल; यज्ञ–समारंभांत लोक जमले असतील; नाटक, तमाशा किंवा सैन्य पाहण्यांत लोक गर्क झाले असतील; दारूच्या धुंदींत तंटे चालले असतील; एकसारखी लढाई करून सैन्य थकून गेलें असेल; अनेक लढायांमध्यें कैक सैनिक जखमी किंवा ठार झाले असतील; जागरणानें थकवा किंवा झोप आली असेल; दिवसां अभ्रें आलीं असतील; नदीला पूर आला असेल; किंवा धुक्यांत कांहीं दिसेनासें झालें असेल अशी वेळ छापा घालावयास योग्य संधि आहे, असें समजून त्यावेळीं शत्रूची दाणादाण उडवावी.

शत्रु आपली छावणी सोडून जंगलांत दडून बसला असेल, तर तो बाहेर पडल्याबरोबर त्याजवर मारा करावा.

एखाद्यानें शत्रूचा मित्र किंवा त्याच्या सैन्याचा मुख्य असल्याची बतावणी करून, तो घेरला गेला असतां त्याची मैत्री संपादन करून त्याजकडे उघड दूताबरोबर असा संदेश पाठवावा कीं, " अमुक अमुक कमीपणा तुझ्यांत आहे; तुझ्या लोकांपैकीं अमुक अमुक तुला प्रतिकूल आहेत, वेढा घालणाऱ्याची गोम अशी अशी आहे; हा मनुष्य तुझा पक्षपाती आहे, असें समज. " तो दूत आपल्याबरोबर शत्रूचा दूत घेऊन परत येत असतां, विजयेच्छु राजानें त्यास पकडून त्याच्यांवरील आरोप जाहीर करावा व त्यास हद्दपार करावें. यानंतर विजयेच्छु राजानें तेथून निघून जावें. तो निघून गेल्यानंतर मित्रत्वाची बतावणी करणाऱ्या राजानें वेढ्यांत पडलेल्यास असें म्हणावें कीं,

मया वा सह संरोद्धारं जहि' इति। प्रतिपन्नमुभयतस्संपीडनेन घातयेत्; जीवग्राहेण वा राज्यविनिमयं कारयेत्; नगरं वास्य प्रमृद्नीयात्; सारबलं वास्य वमयित्वाभिहन्यात्।

तेन दण्डोपनताटविका व्याख्याताः।

दण्डोपनताटविकयोरन्यतरो वा संरुद्धस्य प्रेषयेत्--'अयं संरोद्धा व्याधितः, पार्ष्णिग्राहेणाभियुक्तः, छिद्रमन्यदुत्थितम्, अन्यस्यां भूमावपयातुकामः' इति। प्रतिपन्ने संरोद्धा स्कन्धावारमादीप्यापयायात्, ततः पूर्ववदाचरेत्।

पण्यसम्पातं वा कृत्वा पण्येनैनं रसविद्धेनातिसन्दध्यात्।

आसारव्यञ्जनो वा संरुद्धस्य दूतं प्रेषयेत्--'मया बाह्यमभिहतमुपनिर्गच्छाभिहन्तुम्' इति। प्रतिपन्नं पूर्ववदाचरेत्।

मित्रं बन्धुं वापदिश्य योगपुरुषाः शासनमुद्राहस्ताः प्रविश्य दुर्गं ग्राहयेयुः।

आसारव्यञ्जनो वा संरुद्धस्य प्रेषयेत्--'अमुष्मिन् देशे काले च स्कन्धावारमभिहनिष्यामि युष्माभिरपि योद्धव्यम्' इति। प्रतिपन्नं यथोक्तमभ्याघातसंकुलं दर्शयित्वा रात्रौ दुर्गान्निष्क्रान्तं घातयेत्।

---

"मला साहाय्य करावयास बाहेर ये; तूं व मी दोघे मिळून वेढा घालणाऱ्याचा समाचार घेऊं." त्याचें म्हणणें कबूल करून शत्रु बाहेर पडला म्हणजे त्यास दोघांच्या कचाट्यांत कोंडून ठार करावें; अथवा त्यास जिवंत पकडून, दोघांनीं त्याचें राज्य वांटून घ्यावें. राजधानी जमीनदोस्त करावी. त्याचें निवडक सैन्य असेल तें बाहेर हुसकून लावून त्याचा नाश करावा.

हाच प्रकार बळानें जिंकलेल्या आणि रानटी सैन्यालाहि लागू आहे.

विजयेच्छु राजानें जिंकलेल्या किंवा अरण्यवासी लोकांच्या एखाद्या पुढाऱ्यानें वेढ्यांत अडकलेल्या राजास असें कळवावें कीं "विजयेच्छु राजा फार आजारी आहे, अथवा पिछाडीचा शत्रु विजयेच्छु राजाच्या मर्मावर हल्ला करण्याच्या विचारांत आहे, अथवा विजयेच्छु राजाविरुद्ध दुसरें कांहीं काहूर उटलें आहे म्हणून तो वेढा टाकून तिकडे निघून जाणार आहे." शत्रूस हें खरें वाटून तो बाहेर आला म्हणजे वेढा घालणाऱ्यानें छावणीस आग लावून दूर जावें. नंतर शत्रूस दोघांनीं कचाटींत धरून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्याचीं हाडें पीठ करावींत.

अथवा नाना प्रकारचा विकाऊ माल गोळा करावा आणि त्यांत विष मिसळून शत्रूकडे तो पोहोंचेल अशी योजना करून त्यास फ़सवावें.

अथवा शत्रूच्या दोस्त राजाची बतावणी करून वेढलेल्या शत्रूस असा संदेश पाठवावा कीं, "विजयेच्छु राजास मी तर बाहेरून जेरीस आणिलेंच आहे; पण तूंहि त्यावर मारा करशील, तर ठीक होईल." यावर विश्वास ठेवून तो बाहेर पडला म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें त्याचा निकाल लावावा.

अथवा कपटी गुप्त हेरांनीं शत्रूचे मित्र किंवा आप्त असें भासवून किल्ल्यांत आण्यायेण्याकरितां सहीशिक्क्यानिशीं परवाने मिळवून किल्ल्यांत प्रवेश करावा आणि तो किल्ला सर करण्याच्या कामीं आंतून मदत करून किल्ला घेववावा.

शत्रूच्या दोस्त राजाची बतावणी करून वेढ्यांत अडकलेल्यास संदेश पाठवावा कीं, "मी अमुक ठिकाणीं व अमुक वेळीं वेढा घालणाऱ्या सैन्यावर हल्ला करीन, तेव्हां तुम्हींहि माझ्याप्रमाणें लढाईत सामील व्हावें." त्यानें कबूल केलें कीं, हल्ल्याची दंगल उठवून द्यावी. ती पाहून तो रात्रीं बाहेर पडला म्हणजे वर सांगितल्यांप्रमाणें त्यास चीत करावें.

यद्वा मित्रमावाहयेद, आटविकं वा, तमुत्साहयेत्--' विक्रम्य संरुद्धे भूमिमस्य प्रतिपद्यस्व ' इति। विक्रान्तं प्रकृतिभिर्दूष्यमुख्यावग्रहेण वा घातयेत्; स्वयं वा रसेन। 'मित्रघातकोऽयम्' इत्यवाप्तार्थः।

विक्रमितुकामं वा मित्रव्यञ्जनः परस्याभिशंसेत्; आप्तभावोपगतः प्रवीरपुरुषानस्योपघातयेत्।

सन्धिं वा कृत्वा जनपदमेनं निवेशयेत्। निविष्टमन्यजनपदमविज्ञातो हन्यात्।

अपकारयित्वा दूष्याटविकेषु वा बलैकदेशमतिनीय दुर्गमवस्कन्देन हारयेत्।

दूष्यामित्राटविकद्वेष्यप्रत्यपसृताश्च कृतार्थमानसंज्ञाचिह्नाः परदुर्गमवस्कन्देयुः।

परदुर्गमवस्कन्द्य स्कन्धावारं वा पतितपराङ्मुखाभिपन्नमुक्तकेशशस्त्रभयविरूपेभ्यश्चाभयम-युध्यमानेभ्यश्च दद्युः। परदुर्गमवाप्य विशुद्धशत्रुपक्षः कृतोपांशुदण्डप्रतीकारमन्तर्बहिश्च प्रविशेत्।

एवं विजिगीषुरमित्रभूमिं लब्ध्वा मध्यमं लिप्सेत। तत्सिद्धावुदासीनम्। एष प्रथमो मार्गः पृथिवीं जेतुम्।

मध्यमोदासीनयोरभावे गुणातिशयेनारिप्रकृतीः साधयेत्। तत उत्तराः प्रकृतीः। एष द्वितीयो मार्गः।

मण्डलस्याभावे शत्रुणा मित्रं मित्रेण वा शत्रुमुभयतःसम्पीडनेन साधयेत्। एष तृतीयो मार्गः।

---

एखाद्या मित्रराजाशीं किंवा रानटी लोकांच्या पुढाऱ्याशीं बोलणें सुरू करून त्यास प्रोत्साहन द्यावें कीं, वेढ्यांत सांपडलेल्या शत्रूवर हल्ला करून त्याचा प्रांत काबीज कर. या सल्ल्याप्रमाणें त्यानें हल्ला केला व किल्ला घेतला म्हणजे तेथील लोकांस किंवा दुर्जनांच्या एखाद्या नायकास मथवून त्याचा घात करावा; अथवा आपणच त्यास विषप्रयोग करून ठार करावें; आणि हा आपल्या मित्रावर उठला होता म्हणून याचा घात करणें भाग पडलें, असें काम फत्ते झाल्यावर जाहीर करावें.

मित्राच्या मिषानें एखाद्यानें शत्रूस जाऊन कळवावें कीं, विजयेच्छु तुझ्यावर स्वारी करणार आहे. यावर विश्वास ठेवून तो दोस्त झाला कीं, त्याच्या सैन्यांतल्या प्रमुख पुरुषांचा नाश करावा.

अथवा त्याजबरोबर तह करून त्यास एखाद्या प्रांतांत ठेवावें; आणि अशा अपरिचित प्रांतांत तो राहिला असतां, एखाद्या माणसानें त्यास कळूं न देतां येऊन त्याचा घात करावा;

अथवा त्यास बंडखोर रानटी लोकांमध्यें सोडून त्याचे हाल करावे मग आपल्या सैन्याची एक तुकडी काढून पलिकडे जावें आणि विजयेच्छु राजास किल्ला सर करण्याची संधि द्यावी. अथवा राजद्रोही लोक, वैरी, रानटी बंडखोर आणि शत्रुपक्षांतून फुटलेले इतर लोक यांनीं, द्रव्यदानानें व बहुमानानें संतुष्ट झालों असें दाखवून शत्रूकडे परत जावें आणि विजयेच्छु राजास किल्ला सर करण्याच्या कामीं अप्रत्यक्ष मदत करावी.

याप्रमाणें किल्ला सर केल्यानंतर किंवा शत्रूच्या छावणीचा धुव्वा उडविल्यानंतर, शत्रूकडील जे लोक रणांत जखमी होऊन पडले असतील, जे लढाईतून मागें फिरले असतील, जे आपण होऊन शरण आले असतील; ज्यांनीं केंस मोकळे सोडले असतील, ज्यांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं असतील, व जे भीतीनें घाबरले असतील, असे लोक शरण आल्यास त्यांस अभय द्यावें; त्याचप्रमाणें जे युद्धांत सामील झाले नसतील, त्यांसहि अभय द्यावें. शत्रूचा किल्ला ताब्यांत आल्यावर अगोदर शत्रूच्या बाजूचे जे लोक असतील त्यांचा किल्ल्यांतून निकाल लावून, आणि आंतून व बाहेरून आपल्या विश्वासांतील माणसांकरवीं बंदोबस्त करून मग किल्ल्यांत प्रवेश करावा.

याप्रमाणें विजयेच्छु राजानें शत्रूचा देश काबीज केल्यावर, मध्यम राजाच्या देशावर डोळा ठेवावा; मध्यम राजाचा देश काबीज कल्यावर, तटस्थ राजाकडे दृष्टि वळवावी. पृथ्वी जिंकण्याचा हाच उत्तम मार्ग होय. मध्यम व तटस्थ राजांच्या अभावीं शत्रूच्या प्रजाजनांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घ्यावीं आणि त्यांच्या मदतीनें दूरचे प्रजाजन वश करून घ्यावे; हा दुसरा मार्ग होय. विजिगीषूनें मित्र राजास आपल्या व शत्रूच्या कचाट्यांत आणि शत्रुराजास आपल्या व मित्राच्या कचाट्यांत गांठून पादाक्रांत करणें; हा तिसरा मार्ग होय.

शक्यमेकं वा सामन्तं साधयेत्; तेन द्विगुणो द्वितीयं, त्रिगुणस्तृतीयम्। एष चतुर्थो मार्गः पृथिवीं जेतुम्।

जित्वा च पृथिवीं विभक्तवर्णाश्रमां स्वधर्मेण भुञ्जीत।
उपजापोऽपसर्पो वा वामनं पर्युपासनम्। अवमर्दश्च पञ्चैते दुर्गलम्भस्य हेतवः॥

इति कौटलीयार्थशास्त्रे दुर्गलम्भोपाये त्रयोदशाधिकरणे चतुर्थोऽध्यायः पर्युपासनकर्म अवमर्दश्च, आदितश्चतुश्चत्वारिंशच्छततमः॥

---

# अध्याय १४५ लब्धप्रशमनम्।

द्विविधं विजिगीषोः समुत्थानम्--अटव्यादिकमेकग्रामादिकं च।
त्रिविधश्चास्य लम्भः--नवो, भूतपूर्वः, पित्र्य इति।
नवमवाप्य लम्भं परदोषान् स्वगुणैश्छादयेत् गुणान् गुणद्वैगुण्येन। स्वधर्मकर्मानुग्रहपरिहारदानमानकर्मभिश्च प्रकृतिप्रियहितान्यनुवर्तेत। यथासम्भाषितं च कृत्यपक्षमुपग्राहयेत्। भूयश्च कृतप्रयासम्। अविश्वास्यो हि विसंवादकः स्वेषां परेषां च भवति; प्रकृतिविरुद्धाचारश्च। तस्मात् समानशीलवेषभाषाचारतामुपगच्छेत्। देशदैवतसमाजोत्सवविहारेषु च भक्तिमनुवर्तेत।

---

अगदीं जवळचा व जिंकण्याला सुलभ असा एक शत्रु राजा प्रथम पादाक्रांत करावा; त्यास जिंकून आपली शक्ति दुप्पट झाली म्हणजे दुसऱ्यावर, आणि दुसऱ्यास जिंकून आपली शक्ति तिप्पट झाली, म्हणजे तिसऱ्यावर चाल करावी; पृथ्वी जिंकण्याचा हा चवथा मार्ग होय.

पृथ्वी जिंकून तींत वर्णव्यवस्था व आश्रमव्यवस्था लावावी आणि धर्मास अनुसरून पृथ्वीचा उपभोग घ्यावा.

बंड उपस्थित करणें, किल्ल्यांत हेर ठेवून देणें, शत्रूला किल्ला सोडून बाहेर पडावयास लावणें, वेढा घालणें आणि चढाई करून फडशा पाडणें, हे मुलूख हस्तगत करण्याचे पांच उपाय आहेत.

---

## मिळविलेलें पचविणें.

विजयेच्छु राजाच्या स्वारीचे दोन हेतु असतातः--अरण्यादिक प्रांत काबीज करणें आणि वसाहत झालेलीं गांवें; शहरें काबिज करणें, असे ते हेतु होत. काबीज करावयाचे प्रांत तीन प्रकारचे असतातः--अगदीं नवीन; पूर्वी एकदां आपण काबीज केलेला ( पण हातचा गेलेला ); आणि वंशपरंपरागत आपला ( पण हातचा गेलेला ).

अगदीं नवीन प्रांत काबीज झाला म्हणजे विजयेच्छु राजानें शत्रूचे दुर्गुण स्वतःच्या सद्गुणांनीं लोपवून टाकावे आणि शत्रु एकपट सद्गुणी असला, तर आपण दुप्पट सद्गुणी व्हावें. विजयेच्छूनें धर्मानुसार आचरण करावें; कर्तव्यतत्पर असावें; योग्य माणसांस इनामें द्यावीं; कर माफ करावे; देणग्या द्याव्या, पदव्या अर्पण कराव्या; आणि प्रजेस जें इष्ट व हितकर असेल, तें करावें. शत्रूचा पक्ष सोडून आपल्या पक्षास अगोदर मिळालेल्या लोकांस कबूल केलेल्या देणग्या व इनामें देऊन खूष करावें; पुढेंहि हरप्रयत्नेंकरून त्यांस संतुष्ट ठेवीत जावें; कारण जो आपल्या वचनाला हरताळ फांसतो, त्यावर त्याचे स्वतःचे लोकहि विश्वास ठेवीत नाहींत, मग शत्रूचे लोक विश्वास ठेवीत नाहींत हें सांगावयास नकोच. त्याचप्रमाणें लोकमतास झुगारून वागणारावरहि कोणी विश्वास ठेवीत नाहीं. म्हणून जिंकलेल्या लोकांचा स्वभाव, वेष, भाषा आणि आचार पूर्ण ओळखून तदनुसार वागलें पाहिजे. जिंकलेल्या देशांतील देवतांचे किंवा समाजाचे जे उत्सव किंवा समारंभ प्रचलित असतील, त्यांबद्दल भक्तिभाव दाखवावा,

देशग्रामजातिसङ्घमुख्येषु चाभीक्ष्णं सत्रिणः परस्यापचारं दर्शयेयुः। माहाभाग्यं भक्तिं च तेषु स्वामिनः स्वामिसत्कारं च विद्यमानम्। उचितैश्चैनान् भोगपरिहाररक्षावेक्षणैर्भुञ्जीत। सर्वदेवताश्रमपूजन च विद्यावाक्यधर्मशूरपुरुषाणां च भूमिद्रव्यदानपरिहारान् कारयेत्। सर्वबन्धनमोक्षणमनुग्रहं दीनानाथव्याधितानां च। चातुर्मास्येष्वर्धमासिकमघातं; पौर्णमासीषु च चातूरात्रिकं; राजदेशनक्षत्रेष्वेकरात्रिकम्। योनिबालवधं पुंस्त्वोपघातं च प्रतिषेधयेत्। यच्च कोशदण्डोपघातिकमधर्मिष्ठं वा चरित्रं मन्येत, तदपनीय धर्म्यव्यवहारं स्थापयेत्। चोरप्रकृतीनां म्लेच्छजातीनां च स्थानविपर्यासमनेकस्थं कारयेद् दुर्गराष्ट्रदण्डमुख्यानां च। परोपगृहीतानां च मान्त्रिपुरोहितादीनां परस्य प्रत्यन्तेष्वनेकस्थं वासं कारयेत्। अपकारसमर्थाननुक्षियतो वा भर्तृविनाशमुपांशुदण्डेन प्रशमयेत्। स्वदेशीयान् वा परेण वावरुद्धानपवाहितस्थानेषु स्थापयेत्।

यश्च तत्कुलीनः प्रत्यादेयमादातुं शक्तः प्रत्यन्ताटवीस्थो वा प्रबाधितुमभिजातः, तस्मै विगुणां भूमिं प्रयच्छेत्, गुणवत्याश्चतुर्भागं वा कोशदण्डदानमवस्थाप्य, यदुपकुर्वाणः पौरजानपदान् कोपयेत्। कुपितैस्तैरेनं घातयेत्।

---

देशांत गांवोगांवीं, जातीजातींत आणि संघांत जे पुढारी असतील, त्यांच्या डोळ्यांपुढें गुप्त हेरांनीं पूर्वीच्या राजाच्या दुर्वर्तनाचें चित्र निरंतर दाखवीत जावें; आणि आपला नवा राजा किती वैभवशाली आहे व त्यास लोकांविषयीं किती प्रेम व आदर वाटत आहे, हें निर्दशनास आणीत जावें! लोकांच्या मालमत्तेचे वाजवी हक्क सुरक्षित ठेवावे व त्यांचें संरक्षण करावें; त्यांस वेळोवेळीं कराची माफी करावी; सर्व देवालयांतील पूजा अर्चा चालू ठेवावी. विद्वान्, वक्ते व धर्मनिष्ठ, यांत जे श्रेष्ठ असतील त्यांस जहागीर किंवा रोख देणगी द्यावी; व कर माफ करावे. जुने कैदी मुक्त करावे. गोरगरीब व रोगग्रस्त, अशा लोकांचा परामर्ष घ्यावा. चातुर्मास्यांत पंधरा दिवस प्राणिहिंसा बंद करावी; शुक्लपक्षांत चार रात्रीं, आणि राजाच्या जन्मदिवशीं व राज्यप्राप्तीच्या वार्षिक समारंभाच्या दिवशींहि प्राणिहिंसा बंद ठेवावी. वित्या गाईम्हशी आणि कालवडी यांचा वध करणें आणि वळू घोडे व बैल यांची खची करणें निषिद्ध ठरवावें. जेणेंकरून खजिन्यास व सैन्यास नुकसान येतें अथवा धर्माचरणांत व्यत्यय येतो असें वाटेल, त्या चालीरीति मना करून, धर्माचरणाचा योग्य प्रघात घालून द्यावा. चोरीचा धंदा करणाऱ्या लोकांस व म्लेच्छ जातीच्या लोकांस वरचेवर आपापलीं ठिकाणें बदलण्यास लावावें; व त्यांस एकत्र राहूं देऊं नये. किल्लेदार, प्रांताधिकारी व सेनाधिकारी यांच्याहि वरचेवर बदल्या कराव्या. पूर्वीच्या राज्यांतले जे मंत्री व पुरोहित आपल्यास अनुकूल झाले असतील, त्यांस सरहद्दीवर वेगवेगळ्या ठिकाणीं राहावयास लावावें. ज्यांचे अंगीं अपकार करण्याचें सामर्थ्य असेल आणि जे आपल्या पूर्वीच्या धन्याच्या नाशामुळें मनांत झुरत असतील, त्यांस गुप्तपणें शासन करून दाबून टाकावें. पूर्वीचे अधिकारी काढून टाकल्यामुळें ज्या जागा रिकाम्या झाल्या असतील, त्या जागांवर आपल्या देशांतले कामगार नेमावे किंवा पूर्वीच्या राजानें ज्यांना बंदींत ठेविले असेल त्यांना नेमावे.

शत्रूच्या घराण्यांतला एखादा पुरुष, हातचा गेलेला देश परत मिळविण्याइतका शूर असल्यास, अथवा सरहद्दीवरील जंगली प्रांतांत राहणारा एखादा सरदार, पीडा देत बसण्याइतका शूर असल्यास, त्यास एखादा नापीक प्रांत किंवा त्याच्या चतुर्थांशाइतक्या क्षेत्राचा सुपीक प्रांत द्यावा; आणि त्याजवर, आपल्याला द्रव्याची व सैन्याची मदत पुरवण्याची अट लादावी. तो तशी मदत पुरवूं लागला म्हणजे अर्थात् तो आपल्या प्रांतातील लोकांस अप्रिय होऊन, त्या लोकांत क्षोभ उत्पन्न करील; व ते लोक क्षुब्ध होऊन त्याचा घात करतील!

प्रकृतिभिरुपक्रुष्टमपनयेद्, औपघातिके वा देशे निवेशयेदिति ।
भूतपूर्वे येन दोषेणापवृत्तः, तं प्रकृतिदोषं छादयेत् । येन च गुणेनोपावृत्तः, तं तीव्रीकुर्यादिति ।
पित्र्ये पितृदोषाञ्छादयेत् । गुणांश्च प्रकाशयेदिति ॥
चरित्रमकृतं धर्म्यं कृतं चान्यैः प्रवर्तयेत् । प्रवर्तयेन्न चाधर्म्यं कृतं चान्यैर्निवर्तयेत् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे दुर्गलम्भोपाये त्रयोदशाधिकरणे पञ्चमोऽध्यायः लब्धप्रशमनम् ।
आदितः पञ्चचत्वारिंशच्छततमः

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य दुर्गलम्भोपाय-
त्रयोदशमधिकरणं समाप्तम् ॥

---

ज्या अधिकाऱ्या विरुद्ध लोकांची ओरड होईल, त्याची बदली करावी आणि त्यास वाईट हवेच्या ठिकाणीं पाठवून द्यावें.

पूर्वी आपल्या ताब्यांत असलेला पण हातचा गेलेला देश परत मिळाल्यास ज्या दोषामुळें तो आपल्या हातून गमावला असेल तो दोष नाहींसा करावा आणि ज्या गुणामुळें आतां त्याची पुनश्च प्राप्ति झाली असेल तो गुण जितका वृद्धिंगत होईल तितका वृद्धिंगत करावा.

आपला वडिलार्जित प्रदेश आपल्यास परत मिळाल्यावर पूर्वजांच्या ज्या दोषामुळें त्या प्रांतास आपण मकलों असूं तो दोष घालवून टाकावा आणि आपले गुण प्रकट करावे व त्याचा सर्वत्र बोलबाला होईल असें करावें.

जें धर्म्य आचरण असेल तें आपण नवीन सुरू करावें किंवा पूर्वी चालू असल्यास त्यास प्रोत्साहन द्यावें. जें अधर्माचरण असेल त्याचा आपण अंगिकार करूं नये; इतरांकडून तसलें आचरण घडत असल्यास त्यास बंदी करावी.



# औपनिषदिकं—चतुर्दशमधिकरणम्।



## अध्याय १४६—परघातप्रयोगः।

चातुर्वर्ण्यरक्षार्थमौपनिषदिकमधर्मिष्ठेषु प्रयुञ्जीत।

कालकूटादिः विषवर्गः श्रद्धेयदेशवेषशिल्पभाजनापदेशैः कुब्जवामनकिरातमूकबधिरजडान्धच्छद्मभिः म्लेच्छजातीयैरभिप्रेतैः स्त्रीभिः पुंभिश्च परशरीरोपभोगेष्वाधातव्यः।

राजक्रीडाभाण्डनिधानद्रव्योपभोगेषु गूढाः शस्त्रनिधानं कुर्युः, सत्राजीविनश्च रात्रिचारिणोऽग्निजीविनश्चाग्निनिधानम्।

चित्रभेककौण्डिन्यककृकणपञ्चकुष्ठशतपदीचूर्णमुच्चिदिङ्गकम्बलिशतकन्देध्मकृकलासचूर्णं गृहगौलिकान्धाहिकक्रकणकपूतिकीटगोमारिकाचूर्णं भल्लातकावल्गुकारसयुक्तं सद्यःप्राणहरमेतेषां वा धूमः।

कीटो वान्यतमस्तप्तः कृष्णसर्पप्रियङ्गुभिः। शोषयेदेष संयोगः सद्यःप्राणहरो मतः॥

धामार्गवयातुधानमूलं भल्लातकपुष्पचूर्णयुक्तमार्धमासिकः। व्याघातकमूलं भल्लातकपुष्पचूर्णयुक्तं कीटयोगो मासिकः। कलामात्रं पुरुषाणां द्विगुणं खराश्वानां चतुर्गुणं हस्त्युष्ट्राणाम्।

---

## अधिकरण १४ वें.

### मंत्र तंत्र प्रयोग.

या अधिकरणांत सांगितलेल्या औषधीमंत्रतंत्रादींचा प्रयोग चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या रक्षणासाठीं धर्मबाह्य लोकांच्यावरच करावा, इतरांवर करूं नये.

आपल्यावर विश्वास बसेल असा देश, वेष, धंदा व उपकरणें यांचा अंगिकार करणाऱ्या आणि कुबडे, खुजे, थोटे, मुके, बहिरे, वेडे, अंधळे इत्यादिकांचीं सोंगें घेणाऱ्या म्लेच्छजातीच्या इष्ट स्त्रियांनीं किंवा पुरुषांनीं शत्रूनें वापरावयाच्या वस्त्रादिकादि वस्तूंवर कालकूटादि विषाचा प्रयोग करावा.

छपून राहिलेल्या हेरांनीं राजाच्या क्रीडेच्या, अलंकाराच्या, उटणादिकांच्या साधनांतून गुप्तशस्त्रें घालून ठेवावीं. दबा धरून बसलेले हेर, रात्रीचा पहारा करणारे हेर किंवा लोहारादिकांचा धंदा करणारे हेर यांनीं आग लावण्याचा प्रयत्न करावा.

चित्रभेक ( बेडूक ) कौंडिन्यक, कृकण, पंचकुष्ठ व शतपदी ( गोम ) यांचें चूर्ण, उच्चिदिंग, कंबली, शतकंद, इध्म, कृकलास ( सरडा ) यांचें चूर्ण आणि गृहगौलिका ( पाल ), अंधाहिक, कृकणक ( बगळा ), पूतिकीट ( पाद्राकिडा ), गोमारिका यांचें चूर्ण भल्लातक ( बिबा ) व अवल्गुका यांच्या रसांत भिजवून तयार केलें, किंवा त्याचा धूर उत्पन्न केला तर तो तात्काळ प्राण हरण करणारा असा होतो.

वरील यादींतील कोणताहि एक प्राणी भाजून तें चूर्ण कृष्णसर्प व प्रियंगु यांच्या चूर्णांत मिसळून तें वाळवून ठेवावें. हें मिश्रण तात्काळ प्राण घेणारें असें होतें.

धामार्गव व यातुधान यांच्या मुळ्यांचें आणि बिब्ब्याच्या फुलांचें चूर्ण एकत्र करून दिल्यास पंधरा दिवसांत मनुष्य राम म्हणतो ! व्याघातकाची मुळी आणि बिब्ब्याचें फूल यांचें चूर्ण करून तें जाळून काजळ धरल्यास ते एक महिन्यांत प्राणघातक होतें. हें मनुष्याला द्यावयाचें तर ६ गुंजा द्यावें, गाढव–घोड्यांना १२ गुंजा द्यावें आणि हत्तीला २४ गुंजा द्यावें.

शतकर्दमोच्चिदिङ्गकरवीरकटुतुम्बीमत्स्यधूमो मदनकोद्रवपलालेन हस्तिकर्णपलाशपलालेन वा प्रवातानुवाते प्रणीतो यावच्चरति तावन्मारयति ।

पूतिकीटमत्स्यकटुतुम्बीशतकर्दमेध्मेन्द्रगोपचूर्णं पूतिकीटक्षुद्रारालाहेमविदारीचूर्णं वा बस्तशृङ्गखुरचूर्णयुक्तमन्धीकरो धूमः । पूतिकरञ्जपत्रहरितालमनःशिलागुञ्जारक्तकार्पासपलालान्यास्फोटकचागोशकृद्रसपिष्टमन्धीकरो धूमः । सर्पनिर्मोकं गोश्वपुरीषमन्धाहिकशिरश्चान्धीकरो धूमः ।

पारावतप्लवकक्रव्यादानां हस्तिनरवराहाणां च मूत्रपुरीषं कासीसहिङ्गुयवतुषकणतण्डुलाः कार्पासकुटजकोशातकीनां च बीजानि गोमूत्रिकाभाण्डीमूलं निम्बशिग्रुफणिज्जकाक्षीबपीलुकभङ्गः सर्पशफरीचर्म हस्तिनखशृङ्गचूर्णमित्येष धूमो मदनकोद्रवपलालेन हस्तिकर्णपलाशपलालेन वा प्रणीतः प्रत्येकशो यावच्चरति तावन्मारयति ।

कालीकुष्ठनडशतावरीमूलं सर्पप्रचलाकक्रकणपञ्चकुष्ठचूर्णं वा धूमः पूर्वकल्पेनार्द्रे शुष्कपलाले वा प्रणीतः सङ्ग्रामावतरणावस्कन्दनसंकुलेषु कृततेजनोदकाक्षिप्रतीकारैः प्रणीतः सर्वप्राणिनां नेत्रघ्नः ।

शारिकाकपोतबकबलाकालण्डमर्काक्षिपीलुकस्नुहिक्षीरपिष्टमन्धीकरणमञ्जनमुदकदूषणं च ।

यवकशालिमूलमदनफलजातीपत्रनरमूत्रयोगः प्लक्षविदारीमूलयुक्तो मूकोदुम्बरमदनकोद्रवक्वाथयुक्तो हस्तिकर्णपलाशक्वाथयुक्तो वा मदनयोगः । शृङ्गिगौतमवृक्षकण्टकारमयूरपदीयोगो गुञ्जालाङ्गली-

---

शतकर्दम, उच्चिदिंग, करवीर, कटुतुंबी ( कडु भोपळा ), आणि मत्स्य यांचा धूर, मदन ( घोत्रा ), आणि कोद्रव यांच्या फोलपटानें अगर एरंड, पळस यांच्या सालींनीं केलेल्या धुराबरोबर वाऱ्यानें पसरविला तर तो धूर जेथपर्यंत पसरेल तेथपर्यंतच्या सर्व प्राण्यांना तो मारक होईल.

पूतिकीट ( पाद्राकिडा ), मत्स्य, कटुतुंबी ( कडूभोपळा ), शतकर्दम, इध्म, इंद्रगोप यांचें चूर्ण किंवा पूतिकीट, क्षुद्रा, अराला ( राळ ), हेमविदारी यांचें चूर्ण बोकडाच्या शिंगाच्या व खुराच्या चूर्णाशीं मिश्र करून तयार केल्यास त्याचा धूर मनुष्याला अंध करतो. पूतिकरंज वृक्षाचीं पानें, हरताळ, मनशीळ, गुंजा, आळता आणि फोलपट यांचें चूर्ण आस्फोट, काच, गाईचें शेण व मूत यांत घोटून त्याचा धूर केला तर तो अंधत्व उत्पन्न करितो. सापाची कांत, गाय व घोडी यांचें शेण आणि अंधाहिकाचें शिर यापासून उत्पन्न केलेला धूर दृष्टि नाहींशी करतो.

पारवळ, बेडूक, मांसाहारी प्राणी, हत्ती, मनुष्यप्राणी व वराह यांचें मूत्र व विष्ठा, कासीस, हिंगु, यवतुष ( भाताचें फोलपट ) तांदूळाच्या कण्या, कापूस, कुटज व कोशातकी यांचें बीं, गोमूत्रिका व भाण्डी यांचीं मुळें, निंब, शीग्रु, फणिज्जका, क्षीव, पीलुक यांचे चूर, सर्प व मत्स्य यांची कातडी, हत्तीचें नख व सुळा यांचें चूर्ण यांचा धूर घोत्रा व कोद्रव यांच्या फोलपटावर किंवा हस्तिकर्ण ( एरंड ) व पलाश ( पळस ) यांच्या कोळशावर उत्पन्न केल्यास जिथपर्यंत पसरेल तिथपर्यंतच्या एकूण एक माणसास ठार मारील.

काली, कुष्ठ, नडवशतावरी यांचें मूळ किंवा सर्प, प्रचलाक, कृकणक व पंचकुष्ठ यांचें चूर्ण यांचा धूर वर सांगितलेल्या प्रकारानें तयार केला अथवा ओल्या किंवा वाळलेल्या फोलपटानें तयार केला आणि तो लढाईच्या किंवा छाप्याच्या भाऊगर्दींत सोडला तर सर्व प्राण्यांच्या नेत्रांना अंधत्व येतें. याकरितां हा धूर सोडणाऱ्यांनीं स्वतःच्या डोळ्यावर त्याचा हा वाईट परिणाम होऊं नये म्हणून तेजनोदक ( तेजाब ) डोळ्यास अगोदर लावून घेतला पाहिजे.

मैना, खबूतर, बगळा, आणि बलाका यांची विष्ठा अर्क, अक्षि, पीलुक व स्नुहि यांच्या चिकांत घोटून अंजन तयार केलें तर तें डोळे नाहींसे करतें व पाण्यांत कालविल्यास पाणी विषारी करितें.

यवक व शालि यांचें मूळ मदनफळ ( घोड्याचें फळ ) आणि मालतीचीं पानें आणि पुरुषाचें मूत्र यांचें मिश्रण करून त्यांत पिंपळाचें व विदारीचें मूळ यांचें चूर्ण आणि मूकोदुंबर, मदन व कोद्रव यांचा काढा किंवा हस्तिकर्ण ( एरंड ) व पळस यांचा काढा मिसळल्यास तो मदमयोग ( विषारी रस ) होतो.

विषमूलिकेङ्गुदीयोगः करवीराक्षिपीलुकार्कमृगमारणीयोगो मदनकोद्रवक्काथयुक्तो हस्तिकर्णपलाशक्काथयुक्तो वा मदनयोगः। समस्ता वा यवसेन्धनोदकदूषणाः।

कृतकण्डलकृकलासगृहगौलिकान्धाहिकधूमो नेत्रवधमुन्मादं च करोति। कृकलासगृहगौलिकायोगः कुष्ठकरः। स एव चित्रभेकान्त्रमधुयुक्तः प्रमेहमापादयति; मनुष्यलोहितयुक्तः शोषम्।

दूषीविषं मदनकोद्रवचूर्णमुपजिह्विकायोगः। मातृवाहकाञ्जलिकारप्रचलाकभेकाक्षिपीलुकयोगो विषूचिकाकरः।

पञ्चकुष्ठककौण्डिन्यकराजवृक्षपुष्पमधुयोगो ज्वरकरः।

भासनकुलजिह्वाग्रन्थिकायोगः खरीक्षीरपिष्टो मूकबधिरकरो मासार्धमासिकः। कलामात्रं पुरुषाणामिति समानं पूर्वेण।

भङ्गक्काथोपनयनमौषधानां चूर्णं प्राणभृताम्। सर्वेषां वा क्काथोपनयनम्; एवं वीर्यवत्तरं भवति। इति योगसम्पत्।

शाल्मलीविदारीधान्यसिद्धो मूलवत्सनाभसंयुक्तश्चुचुन्दरीशोणितप्रलेपेन दिग्धो बाणो यं विध्यति, स विद्धोऽन्यान् दश पुरुषान् दशति; ते दष्टा दशान्यान् दशन्ति पुरुषान्।

भल्लातकयातुधानापामार्गबाणानां पुष्पैरेलकाक्षिगुग्गुलुहालाहलानां च कषायं बस्तनरशोणित-

---

शृंगी, गौतमवृक्ष ( लोध्र ), कण्टकार व मयूरपदी यांचे चूर्ण गुंजा, लांगली, विषमूलिका, व इंगुदि ( हिंगणमिठ ) यांचें चूर्ण किंवा करवीर, अक्षि, पीलुका, अर्क ( रुई ) व मृगमारणी यांचें चूर्ण एरंड व पळस यांच्या पानाशीं काढ्यांत मिश्रित केल्यास तोहि मदनयोग ( विषारी रस ) होतो. किंवा यांतील सर्वच चूण यवस, इन्धन व उदक बिघडवून अपाय करणारीं आहेत.

कृतकंडल, कृकलास, गृहगौलिक व अंधाहिक यांचा धूर दृष्टि नष्ट करता व उन्माद उत्पन्न करितो. कृकलास व गृहगौलिक यांचें मिश्रण कुष्ठ उत्पन्न करतें. याच मिश्रणांत चित्रभेकाच्या आंतड्यांतील रस मिसळल्यास तें प्रमेह रोग उत्पन्न करतें. माणसाचें रक्त मिसळलें तर तें क्षयरोग उत्पन्न करितें.

दूषीविष, मदन व कोद्रव यांच्या चूर्णापासून पडजीभ पडते. मातृवाहक, अंजलिकार, प्रचलाक, भेक, अक्षि, आणि पीलुक यांचें मिश्रण विषूचिका ( महामारी ) रोग उत्पन्न करितें.

पंचकुष्ठक, कौंडिन्यक, राजवृक्ष व पुष्पमधु याचें मिश्रण ताप आणतें.

भास व नकुळ यांचें मांस आणि मंजिष्ठ व पिंपणी यांचें चूर्ण गाढवीच्या दुधांत खलून दिलें तर महिना पंधरा दिवसांत मनुष्य मुका व बहिरा होतो. हें विष माणसाला ६ गुंजा व हत्तीला २४ गुंजा द्यावें असा मात्राभेद पूर्वीचाच येथेंहि मानावा.

वरील प्रयोगांत ज्या वनस्पति सांगितल्या आहेत त्या कुटून त्यांचा काढा करावा आणि जे प्राणी सांगितले आहेत त्यांचें चूर्ण उपयोगांत आणावें. किंवा वनस्पति व प्राणी या सर्वांचाच मिळून काढा करावा. तो अधिक वीर्यवान होतो. या प्रमाणें मिश्रणाचे गूण सांगितले.

शाल्मली व विदारी यांच्या बीजाचें पाणी दिलेला, पिंपळी व बचनाग यांचें चूर्ण फांसलेला आणि चिचुंदरीच्या रक्तानें पूर्ण माखलेला असा बाण ज्याला जखम करतो तो मनुष्य आणखी दहा इसमांना चावला व ते दहा इसम प्रत्येकी दहा दहा इसमांना चावले तरी तीं सर्व मनुष्यें त्या विषानें मृत्यु पावतात.

बिब्बा, यातुधान, अपामार्ग व अर्जुन वृक्ष यांचीं फुलें, एलक, अक्षि गुग्गुल व हालाहल यांचा कषाय आणि मेंढा व मनुष्य यांचें रक्त यापासूनहि विष तयार होतें. त्यांतलें आठ मासे मिश्रण सक्थूचें पीठ व तिळाची

युक्तं दंशयोगः । ततोऽर्धधरणिको योगः सक्तुपिण्याकाभ्यामुदके प्रणीतो धनुश्शतायाममुदकाशयं दूषयति; मत्स्यपरम्परा ह्येतेन दष्टाभिमृष्टा वा विषीभवति; यश्चैतदुदकं पिबति स्पृशति वा ।

रक्तश्वेतसर्षपैर्गोधा त्रिपक्षमुष्ट्रिकायां भूमौ निखातायां निहिता वध्येनोद्धृता यावत् पश्यति, तावन्मारयति । कृष्णः सर्पो वा ।

विद्युत्प्रदग्धोऽङ्गारोऽज्वालो वा विद्युत्प्रदग्धैः काष्ठैर्गृहीतश्चानुवासितः कृत्तिकासु भरणीषु वा रौद्रेण कर्मणाभिहुतोऽग्निः प्रणीतश्च निष्प्रतीकारो दहति ।

कर्मारादग्निमाहृत्य क्षौद्रेण जुहुयात् पृथक् । सुरया शौण्डिकादग्निं भार्ग्यायोऽग्निं घृतेन च ॥

माल्येन चैकपत्न्यग्निं पुंश्चल्यग्निं च सर्षपैः । दध्ना च सूतिकास्वग्निमाहिताग्निं च तण्डुलैः ॥

चण्डालाग्निं च मांसेन चिताग्निं मानुषेण च । समस्तान् वस्तवसया मानुषेण ध्रुवेण च ॥

जुहुयादग्निमन्त्रेण राजवृक्षकदारुभिः । एष निष्प्रतिकारोऽग्निर्द्विषतां नेत्रमोहनः ॥

अदिते ! नमस्ते; अनुमते ! नमस्ते; सरस्वति ! नमस्ते; देव ! सवितर्नमस्ते । अग्नये स्वाहा सोमाय स्वाहा; भूः स्वाहा; भुवः स्वाहा ।

इति कौटलीयार्थशास्त्रे औपनिषदिके चतुर्दशाधिकरणे प्रथमोऽध्यायः परघातप्रयोगः,
आदितः षट्चत्वारिंशदुत्तरशततमः ॥

---

पेंड यांच्याशीं मिश्रित करून पाण्यांत टाकल्यास शंभर धनुष्यें खोल पाणी असलेला जलाशय देखील विषयुक्त होतो. तें पाणी पिणारे त्या जलाशयांतील मासेहि विषारी होतात व जो कोणी मनुष्य हें पाणी पिईल किंवा त्या पाण्याला स्पर्श करील तोहि विषयुक्त होतो.

तांबड्या व पांढऱ्या मोहऱ्यासह सुसर एका मडक्यांत घालून ४५ दिवस जमिनींत पुरून ठेवावी. नंतर ती वध्य पुरुषाकडून बाहेर काढवावी. ती बाहेर काढणाऱ्या पुरुषाची दृष्टि ज्याच्या ज्याच्यावर पडेल तो तो मनुष्य मरण पावतो. कृष्ण सर्पाच्या दृष्टीचाहि असाच गुण आहे.

विजेनें पेटलेला अग्नि किंवा वीजपडून जळलेल्या झाडाच्या लांकडापासून पेठविलेला ज्वालारहित अग्नि घेऊन त्यांत कृत्तिका किंवा भरणी नक्षत्रीं रौद्रविधीनें होम केला असतां तो अग्नि विझविला जात नाहीं असा होतो.

लोहाराच्या घरचा अग्नि आणून त्यांत मधाचा होम करावा, कलालाच्या घरच्या अग्नींत मद्याचा होम करावा, अयोग्नींत भार्गी व तूप यांचा होम करावा, एक पत्नीव्रतस्थ पुरुषाच्या घरच्या अग्नींत फुलांच्या माळांचा, वेश्येच्या अग्नींत मोहऱ्यांचा, सूतिका गृहांतल्या अग्नींत, दह्याचा अग्निहोत्र्याच्या अग्नींत, तांदळांचा चांडाळाच्या अग्नींत मांसाचा, चिताग्नींत माणसाचा याप्रमाणें अग्नींत पृथक् पृथक् होम करून नंतर ते अग्नि एकत्र करून त्यांत बोकडाच्या चरबीचा, माणसाचा आणि वडाच्या व राजवृक्षकाच्या सामिधांचा होम अग्निमंत्रानें करावा. हा अग्नि विझविला जात नाहीं व जो कोणी त्याजकडे पाहील त्याच्या डोळ्यांना भूल पडते.

---

# अध्याय १४७ प्रलम्भने अद्भुतोत्पादनम् ।



शिरीषोदुम्बरशमीचूर्णं सर्पिषा संहृत्यार्धमासिकक्षुद्योगः ।

कशेरुकोत्पलकन्देक्षुमूलबिसदूर्वाक्षीरघृतमण्डसिद्धो मासिकः ।

माषयवकुलत्थदर्भमूलचूर्णं वा क्षीरघृताभ्यां, वल्लीक्षीरघृतं वा समसिद्धं सालपृश्निपर्णीमूलकल्कं पयसा पीत्वा, पयो वा तत्सिद्धं मधुघृताभ्यामशित्वा, मासमुपवसति ।

श्वेतबस्तमूत्रे सप्तरात्रोषितैः सिद्धार्थकैः सिद्धं तैलं कटुकालाबौ मासार्धमासस्थितं चतुष्पद-द्विपदानां विरूपकरणम् ।

तक्रयवभक्षस्य सप्तरात्रादूर्ध्वं श्वेतगर्दभस्य लण्डयवैः सिद्धं गौरसर्षपतैलं विरूपकरणम् ।

एतयोरन्यतरस्य मूत्रलण्डरससिद्धं सिद्धार्थकतैलमर्कतूलपतङ्गचूर्णप्रतिवापं श्वेतीकरणम् ।

श्वेतकुक्कुटाजगरलण्डयोगः श्वेतीकरणम् ।

श्वेतबस्तमूत्रे श्वेतसर्षपाः सप्तरात्रोषितास्तक्रमर्कक्षीरमर्कतूलकटुकमत्स्यविलङ्गाश्च । एष पक्षस्थितो योगः श्वेतीकरणम् ।

समुद्रमण्डूकीशङ्खसुधाकदलीक्षारतक्रयोगः श्वेतीकरणम् ।

कदलयवल्गुजक्षाररसशुक्ताः सुरायुक्तास्तक्रार्कतूलस्नुहिलवणं धान्याम्लं च पक्षस्थितो योगः श्वेतीकरणम् ।

---

## शत्रूची फसवणूक व अद्भुतशक्ति उत्पादन.

शिरीष, उंबर व शमी यांचें चूर्ण तुपाबरोबर मिसळून घेतल्यास पंधरा दिवस भूक लागत नाहीं.

कशेरुक व उत्पल यांचे कांदे, उंसाचें मूळ, मृणाल, दूर्वा यांचा रस दूध व तूप यांचे बरोबर घुसळून घेतल्यास एक महिना भूक लागत नाहीं.

उडीद, यव, कुळथे व दर्भ यांच्या मुळ्यांचें चूर्ण दूधतुपाबरोबर घ्यावें, किंवा मिऱ्याच्या वेलीचा रस तुपाबरोबर घ्यावा; किंवा साल व पृश्निपर्णी यांच्या मुळ्यांचा कल्क समप्रमाणांत सिद्ध करून तो दुधाबरोबर घ्यावा किंवा त्या कल्कानें सिद्ध केलेलें दुध मध व तूप यांबरोबर घ्यावें म्हणजे एक महिना उपवास करतां येतो.

पांढऱ्या बोकडाच्या मुतांत सातरात्रीं भिजविलेल्या मोहऱ्यांचें तेल कडू भोपळयाच्या तुंब्यांत महिनापंधरा दिवस ठेवावें. हें तेल लावल्यास माणसें व जनावरें विरूप होतांत.

पांढऱ्यां गाढवाला सात दिवस ताकांत भिजविलेले यव चारावे. सात दिवसानंतरच्या त्याच्या लेंड्यांतून यव काढून त्यांनीं सिद्ध केलेलें पांढऱ्या मोहऱ्याचें तेल वरच्याप्रमाणेंच विरूप करणारें होतें.

या दोहोंतून कोणाएकाचें ( पांढऱ्या बोकडाचें किंवा पांढऱ्या गाढवाचें ) मूत व लेंड्या यांनीं तयार केलेलें मोहरीचें तेल, अर्क तूल, पतंग यांच्या चूर्णाशीं मिसळून लावलें असतां पांढरा रंग येतो.

पांढरा कोंबडा व अजगर यांची विष्ठा सफेत रंग उत्पन्न करते.

पांढऱ्या बोकडाच्या मुतांत पांढऱ्या मोहऱ्या सात दिवस भिजवाव्या. मग त्यांत ताक, रुईच्या फळांतील कापूस, कटुक, मत्स्य, विलंग यांचें मिश्रण घालून पंधरा दिवस ठेवावें म्हणजे सफेत रंग होतो.

समुद्रांतील मण्डूक, शंख, चुना, केळीच्या सोयटाची राख व ताक यांचें मिश्रणहि श्वेतीकरण करतें.

केळ व अवल्गुज यांच्या क्षार रसानें युक्त अशा शिंपा, दारू, ताक, रुईच्या फळांतील कापूस व चीक, मीठ, धान्याम्ल यांचें मिश्रण पंधरा दिवस ठेवल्या तो श्वेतीकरण योग होतो.

कटुकालाबौ वल्लीगते नगरमर्धमासस्थितं गौरसर्षपपिष्टं रोम्णां श्वेतीकरणम् ।
अर्कतूलोऽर्जुने कीटः श्वेता च गृहगौलिका । एतेन पिष्टेनाभ्यक्ताः केशाः स्युः शङ्खपाण्डराः ॥
गोमयेन तिन्दुकारिष्टकल्केन वा मर्दिताङ्गस्य भल्लातकरसानुलिप्तस्य मासिकः कुष्ठयोगः ।
कृष्णसर्पमुखे गृहगौलिकामुखे वा सप्तरात्रोषिता गुञ्जाः कुष्ठयोगः ।
शुकपित्ताण्डरसाभ्यङ्गः कुष्ठयोगः
कुष्ठस्य प्रियालकल्ककषायः प्रतीकारः ।
कुक्कुटीकोशातकीशतावरीमूलयुक्तमाहारयमाणो मासेन गौरो भवति ।
वटकषायस्नातः सहचरकल्कदिग्धः कृष्णो भवति ।
शकुनकङ्गुतैलयुक्ता हरितालमनःशिलाः श्यामीकरणम् ।
खद्योतचूर्णं सर्षपतैलयुक्तं रात्रौ ज्वलति ।
खद्योतगण्डूपदचूर्णं समुद्रजन्तूनां भृङ्गकपालानां खदिरकर्णिकाराणां पुष्पचूर्णं वा शकुनकङ्गुतैलयुक्तं तेजनचूर्णम् पारिभद्रकत्वङ्मषी मण्डूकवसया युक्ता गात्रप्रज्वालनमग्निना ।
पारिभद्रकत्वग्वज्रकदलीतिलकल्कप्रदिग्धं शरीरमग्निना ज्वलति ।
पीलुत्वङ्मषीमयः पिण्डो हस्ते ज्वलति । मण्डूकवसादिग्धोऽग्निना ज्वलति ।

---

कडू भोपळयाच्या वेलींत सुंठ पंधरादिवस ठेवली व नंतर पांढऱ्या मोहऱ्याशीं तिचें चूर्ण केलें तर त्यायोगानें केस सुद्धां पांढरे होतात.

रुईचा कापूस, अर्जुन वृक्षांतील किड्यांनीं कोरलेलें पीठ, पांढरी पाल यांच्या चूर्णाचा केसाला लेप दिला असतां ते शंखासारिखे पांढरे होतात.

तिंदुक व अरिष्ट यांचा कल्क आणि गाईचें शेण आंगाला फांसून त्यावर बिब्याचा रस लावल्यास एक महिन्यांत कुष्टरोग होतो.

काळया सापाच्या तोंडांत किंवा घरांतील पालीच्या तोंडांत गुंजा सात दिवस ठेविल्या म्हणजे कुष्ठरोग उत्पन्न करणाऱ्या होतात.

पोपटाच्या पोटांतील पित्त आणि अंड्यांतील मगज शरिरास माखला असतां कुष्ठरोग होतो.

प्रियाल झाडाच्या मगजाचा काढा कुष्ठरोगाचा प्रतिकार करितो.

कुक्कुटी, कोशातकी आणि शतावरी यांच्या मुळ्यांचा रस एक महिना घेतला असतां मनुष्य गोरा होतो.

वडाच्या सालीच्या पाण्यानें स्नान करून कोरांटीचा मगज अंगास चोळला असतां मनुष्य काळा होतो.

शकुन व कंगू ह्यांच्या तेलांत हरताळ व मनशीळ उगाळून अंगास लावलें असतां, मनुष्य काळा होतो.

काजव्याचें चूण मोहरीच्या तेलांत मिसळलें असतां रात्रीच्या वेळीं तें चकाकतें.

खद्योत व गंडूपद, समुद्र जंतु, भृंगकपाल, खदिर व कर्णिकार यांच्या फुलांचें चूर्ण, शकुन व कंगू ह्या पक्ष्यांच्या तेलांत मिसळून तयार केलें तर तें चकाकणारें होतें. पारिभद्रकाच्या सालीचें काजळ व बेडकीची चरबी यांचें मलम अंगास लाविलें असतां तें ज्वालाग्राही होतें.

पारिभद्रकाची साल, व वज्रकदली यांचें चूर्ण तिळाच्या कल्काबरोबर घोटून शरिराला लाविलें असतां तें अग्नीनें लवकर पेटतें.

तेन प्रदिग्धमङ्गं कुशाम्रफलतैलसिक्तं समुद्रमण्डूकीफेनकसर्जरसचूर्णयुक्तं वा ज्वलति ।

मण्डूकवसासिद्धेन पयसा कुलीरादीनां वसया समभागं तैलं सिद्धमभ्यङ्गो गात्राणामग्निप्रज्वालनम् । मण्डूकवसादिग्धोऽग्निना ज्वलति ।

वेणुमूलशैवललिप्तमङ्गं मण्डूकवसादिग्धमग्निना ज्वलति ।

पारिभद्रकप्रतिबलावञ्जुलवज्रकदलीमूलकल्केन मण्डूकवसादिग्धेन तैलेनाभ्यक्तपादोऽङ्गारेषु गच्छति ।

उपोदका प्रतिबला वञ्जुलः पारिभद्रकः । एतेषां मूलकल्केन मण्डूकवसया सह ॥
साधयेत् तैलमेतेन पादावभ्यज्य निर्मलौ । अङ्गारराशौ विचरेद् यथा कुसुमसञ्चये ॥

हंसक्रौञ्चमयूराणाम् अन्येषां वा महाशकुनीनाम् उदकप्लवानां पुच्छेषु बद्धा नलदीपिका रात्रावुल्कादर्शनम् ।

वैद्युतं भस्माग्निशमनम् ।

स्त्रीपुष्पपायिता माषा व्रजकुलीमूलं मण्डूकवसामिश्रं चुल्ल्यां दीप्तायामपाचनम् । चुल्लीशोधनं प्रतीकारः ।

पीलुमयो मणिराग्निगर्भः सुवर्चलामूलग्रन्थिः सूत्रग्रन्थिर्वा पिचुपरिवेष्टितो मुखादग्निधूमोत्सर्गः ।

---

पीलू झाडाच्या सालीच्या कोळशाचें चूर्ण करून त्याचा गोळा केला असतां तो हातांत आपोआप पेटतो. त्यालाच बेडकीच्या चरबीचा लेप दिला असतां तो गोळा ज्वालाग्राही होतो.

वरील मलम अंगास चोळून त्यावर कुश व आम्र यांच्या फळांतील चिक फांसला व त्यावर समुद्रांतील बेडूक, समुद्रफेन व सर्जरस यांचा लेप केला असतां शरीर पेट घेतें.

बेडकीच्या चरबीनें सिद्ध केलेलें दूध, खेकड्याची चरबी आणि तितकेंच तेल यांचें मिश्रण आंगाला लाविलें तर तें अग्नि लावतांच पेट घेतें. नुसत्या बेडकीच्या चरबीचा लेप केला तरी अग्नि लावतांच अंग पेटतें.

वेळूच्या मुळाचें चूर्ण आणि शेवाळ अंगाला चोळून त्यावर बेडकाची चरबी चोळली असतां वरील प्रमाणेंच परिणाम होतो.

पारिभद्रक, प्रतिबला, वंजुल व वज्रकदली यांच्या मुळाचा कल्क आणि बेडकाची चरबी तेलांत मिसळून तें तेल पायास लाविलें असतां निखाऱ्यावरून चालतां येतें.

उपोदका, प्रतिबला, वंजुल व पारिभद्रक यांच्या मूळाचा कल्क काढून त्यांत बेडकाची चरबी मिसळून त्यानें तयार केलेलें तेल निर्मळ धुतलेल्या पायास चोळलें तर तो मनुष्य जसा फुलावरून चालावा तसा निखाऱ्यावरून चालत जातो.

हंस, क्रौंच व मयूर किंवा महाशकुनी वगैरे पाण्यांत क्रीडा करणारे पक्षी, यांच्या पुच्छाला देवनळांत पेटविलेले दिवे बांधले असतां रात्रीच्या वेळीं उल्कापाताचा देखावा दिसतो.

विजेनें दग्ध झालेल्या झाडाची राख आगीवर टाकली असतां आग विझते.

स्त्रीपुष्प मिश्रित माष आणि बेडकीच्या चरबीनें मिश्रित असें व्रजकुली मूळ हें चुलींत ठेविलें असतां त्या अग्नीवर कांहींच शिजत नाहीं.

वरील वस्तु चुलींतून काढून टाकणें हाच त्याच्या प्रतीकाराचा उपाय होय.

पीलू लाकडाचा पोकळ गोळा किंवा सुवर्चला झाडाच्या मुळाची पोकळ गांठ किंवा सूत्रग्रंथी यांच्या पोटांत निखारे ठेवून त्यांच्या भोंवतीं दोरा गुंडाळला व तो गोळा तोंडांत धरला तर तोंडांतून धूर व ज्वाला काढण्याचा प्रयोग दाखवितां येतो.

कुशाम्रफलतैलसिक्तोऽग्निर्वर्षप्रवातेषु ज्वलति ।

समुद्रफेनकस्तैलयुक्तोऽम्भसि प्लवमानो ज्वलति ।

प्लवङ्गमानामस्थिषु कल्माषवेणुना निर्मथितोऽग्निर्नोदकेन शाम्यति, उदकेन च ज्वलति ।

शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुरुषस्य वामपार्श्वपर्शुकास्थिषु कल्माषवेणुना निर्मथितोऽग्निः, स्त्रियाः पुरुषस्य वास्थिषु मनुष्यपर्शुकया निर्मथितोऽग्निर्यत्र त्रिरपसव्यं गच्छति, न चात्रान्योऽग्निर्ज्वलति ।

चुचुन्दरी खञ्जरीटः खारकीटश्च पिष्यते । अश्वमूत्रेण संसृष्टा निगलानां तु भञ्जनम् ॥

अयस्कान्तो वा पाषाणः ।

कुलीराण्डदर्दुरखारकीटवसाप्रदेहेन द्विगुणो, दारकगर्भकङ्कभासपार्श्वोत्पलोदकपिष्टश्चतुष्पदाद्विपदानां पादलेपः । उलूकगृध्रवसाभ्यामुष्ट्रचर्मोपानहावभ्यज्य वटपत्रैः प्रतिच्छाद्य पञ्चाशद्योजनान्यश्रान्तो गच्छति । श्येनकङ्ककाकगृध्रहंसक्रौञ्चवीचिरल्लानां मज्जानो रेतांसि वा योजनशताय । सिंहव्याघ्रद्वीपिकाकोलूकानां मज्जानो रेतांसि वा सावर्णिकानि गर्भपतनान्युष्ट्रिकायामभिषूय श्मशाने प्रेतशिशून् वा तत्समुत्थितं मेदो योजनशताय ॥

अनिष्टैरद्भुतोत्पातैः परस्योद्वेगमाचरेत् । आराज्यायेति निर्वादः समानः कोप उच्यते ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे औपनिषदिके चतुर्दशाधिकरणे द्वितीयोऽध्यायः प्रलम्भने अद्भुतोत्पादनम्, आदितः सप्तचत्वारिंशच्छततमः ॥

---

कुश व आम्रफल यांच्या चिकानें माखलेल्या लांकडाचा अग्नि भर पावसांत व वाऱ्यांत देखील विझत नाहीं.

तेलानें युक्त असा समुद्रफेन पाण्यांत देखील जळत राहतो.

वानराच्या हाडापासून वेळूच्या घर्षणानें तयार केलेला अग्नि पाण्यानें शांत न होतां अधिक पेटतो.

शस्त्रानें मारलेल्या किंवा सुळावर दिलेल्या माणसाच्या डाव्या बाजूच्या बरगडीचें हाड घेऊन वेळूच्या घर्षणानें त्यापासून अग्नि उत्पन्न केला किंवा स्त्रीच्या किंवा पुरुषाच्या हाडाशीं पुरुषाच्या बरगडीच्या हाडाचें घर्षण करून अग्नि तयार केला आणि यांतून कोणताहि अग्नि घेऊन एखाद्या ठिकाणीं उलटी प्रदक्षिणा केली तर प्रदक्षिणा केलेल्या जागेंत आग लागत नाहीं.

चिचुंद्री, खंजरीट, खारकीट यांचें चूर्ण घोड्याच्या मुतांत भिजवून त्याचा पायांतील बेड्यांना लेप केला असतां बेड्या तुटून पडतात.

सूर्यकांतमणिहि वरच्याप्रमाणेंच बेडी तोडण्याला उपयोगी पडतो.

कुलीरांड, दर्दुर व खारकीट यांची चरबी माखून माखून दुप्पट जाड केलेलें आणि डुकराच्या गर्भावरील वार, कंक, भास, पार्श्व, उत्पल यांच्या चरबीनें कमावलेलें असें कातडें हें द्विपद व चतुष्पद यांच्या पायाला लावण्याला योग्य लेप होतें. उंटाच्या कातड्याच्या जोड्याला उलूक व गृध्रयांच्या चरबीचा लेप केला आणि त्यावर वडाचीं पानें बांधून ते जोडे वापरले तर न थकतां पन्नास योजनें चालतां येतें. श्येन, कंक, काक, गृध्र, हंस, क्रौंच, वीचिरल्ल यांची चरबी व धातु यांचा लेप जोड्याला दिल्यास शंभर योजनें न दमतां चालतां येतें. सिंह, व्याघ्र, हत्ती, कावळा, घुबड यांची चरबी किंवा रेत आणि कोणत्याहि वर्णाच्या गर्भाच्या भोंवतालची वार याचें मिश्रण मातीच्या भांड्यांत तयार करून तें आणि श्मशानांत पुरलेल्या किंवा जाळलेल्या पोरांची चरबी यांचा लेप केल्यासहि वरच्याप्रमाणेंच १०० योजनें जातां येतें.

अशा प्रकारचे अनिष्ट सूचक व अद्भुत उत्पात शत्रूला घाबरवून सोडून त्याचें राज्य हरण करण्याकरितां योजावें. यांत लोकनिंदा व जनतेचा संताप हा उभयपक्षांना सारखाच लागू आहे.

# अध्याय १४८ प्रलम्भने भैषज्यमन्त्रप्रयोगः ।

मार्जारोष्ट्रवृकवराहश्वाविद्वाग्गुलीनप्तृकाकोलूकानाम् अन्येषां वा निशाचराणां सत्त्वानामेकस्य द्वयोर्बहूनां वा दक्षिणानि वामानि चाक्षीणि गृहीत्वा द्विधा चूर्णं कारयेत् । ततो दक्षिणं वामेन वामं दक्षिणेन समभ्यज्य रात्रौ तमसि च पश्यति ।

एकाम्लकं वराहाक्षि खद्योतः कालशारिवा । एतेनाभ्यक्तनयनो रात्रौ रूपाणि पश्यति ॥

त्रिरात्रोपोषितः पुष्ये शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुंसः शिरःकपाले मृत्तिकायां यवानावास्याविक्षीरेण सेचयेत्; ततो यवविरूढमालामाबध्य नष्टच्छायारूपश्चरति ।

त्रिरात्रोपोषितः पुष्येण श्वमार्जारोलूकवाग्गुलीनां दक्षिणानि वामानि चाक्षीणि द्विधा चूर्णं कारयेत् । ततो यथास्वमभ्यक्ताक्षो नष्टच्छायारूपश्चरति ।

त्रिरात्रोपोषितः पुष्येण पुरुषघातिनः काण्डकस्य शलाकाम् अञ्जनीं च कारयेत्; ततोऽन्यतमेनाक्षिचूर्णेनाभ्यक्ताक्षो नष्टच्छायारूपश्चरति ।

त्रिरात्रोपोषितः पुष्येण कालायसीम् आञ्जनीं शलाकां च कारयेत्; ततो निशाचराणां सत्वानामन्यतमस्य शिरःकपालमञ्जनेन पूरयित्वा मृतायाः स्त्रिया योनौ प्रवेश्य दाहयेत्; तदञ्जनं पुष्येणादधृत्य तस्यामञ्जन्यां निदध्यात् । तेनाभ्यक्ताक्षो नष्टच्छायारूपश्चरति ।

---

### शत्रूला फसविण्यासाठीं औषधि व मंत्र यांचे प्रयोग.

रानमांजर, उंट, लांडगा, डुक्कर, कुत्रा, वडवाघूळ, नप्तृ, कावळा व उलूक किंवा असेच रात्रीं संचार करणारे इतर प्राणी यांच्यापैकीं एक किंवा अनेक प्राणी यांच्या डोळ्यांची बुबुळें काढून डावीं व उजवीं अशीं वेगवेगळीं कुटावींत आणि डाव्या बुबळाचें चूर्ण आपल्या उजव्या डोळ्यांत आणि उजव्या बुबळांचें चूर्ण डाव्या डोळ्यांत घालावें म्हणजे रात्रीच्या वेळीं व अंधारांतहि दिसूं लागतें.

वराहाचा डोळा, काजव्याचा पृष्ठभाग किंवा कालशारिबा नांवाची वनस्पति यांच्यांत एक प्रकारचा आम्लरस असतो. तो आपल्या डोळ्याला चोळला असतां रात्रीच्या वेळीं दिसूं लागतें.

पुष्य नक्षत्रापूर्वी तीन दिवस उपवास करून पुष्यनक्षत्रावर शस्त्रघातानें किंवा सुळावर दिल्यानें मेलेल्या माणसाच्या डोक्याची कवटी मिळवावी व त्या कवटींत माती घालून तींत यव पेरावेत व त्यावर मेंढीचें दूध शिंपडावें. त्या यवाचे रोपे उगवल्यावर त्यांची माळ करून गळ्यांत घालून चालल्यास तो मनुष्य इतरांना दिसत नाहीं व त्याच्या शरीराची छायाहि पडत नाहीं.

तीन दिवस उपोषण करून पुष्य नक्षत्राचे दिवशीं कुत्रें मांजर, घुबड किंवा वडवाघूळ यांच्या उजव्या व डाव्या डोळ्यांच्या बुबुळांचें चूर्ण वेगवेगळें करावें. नंतर डाव्या बुबुळाचें चूर्ण उजव्या डोळ्यांत व उजव्याचे डाव्या डोळ्यांत घालून चालू लागल्यास मनुष्य अदृश्य होतो व त्याची छायाहि दिसत नाहीं.

तीन दिवस उपोषण करून पुष्यनक्षत्राचे दिवशीं एखाद्या पुरुषाचा घात करणाऱ्या अशा बाणाची शलाका ( डोळ्यांत काजळ घालण्याची सळई ) करावी. त्या सळईनें वरील एखाद्या अंजनाचा डोळ्यास लेप केला असतां मनुष्य अदृश्य होतो.

तीन दिवस उपवास करून पुष्यनक्षत्रावर पोलादाचा काजळाचा करंडा व सळई करावी. रात्री संचार करणाऱ्या एखाद्या प्राण्याचें शिरःकपाल घेऊन त्यांत काजळ भरावें व ती कवटी मृतस्त्रीच्या गुह्येंद्रियांत ठेवून ती पेटवावी. आणि पुष्य नक्षत्रीं तें काजळ बाहेर काढून पूर्वोक्त पोलादाच्या करंड्यांत तें भरावें व त्या सळईनें तें अंजन आपल्या डोळ्यांस लावावें म्हणजे वरच्या प्रमाणेंच तो अदृश्य होतो.

यत्र ब्राह्मणमाहिताग्निं दग्धं दह्यमानं वा पश्येत्, तत्र त्रिरात्रोपोषितः पुष्येण स्वयंमृतस्य वाससा प्रसेवं कृत्वा चिताभस्मना पूरयित्वा तमाबध्य नष्टच्छायारूपश्चरति ।

ब्राह्मणस्य प्रेतकार्ये या गौः मार्यते, तस्या अस्थिमज्जाचूर्णपूर्णाहिभस्त्रा पशूनामन्तर्धानम् ।

सर्पदष्टस्य भस्मना पूर्णा प्रचलाकभस्त्रा मृगाणामन्तर्धानम् ।

उलूकवागुलीपुच्छपुरीषजान्वस्थिचूर्णपूर्णाहिभस्त्रा पक्षिणामन्तर्धानम् ।

इत्यष्टावन्तर्धानयोगाः ।

बलिं वैरोचनं वन्दे शतमायं च शम्बरम् । भण्डीरपाकं नरकं निकुम्भं कुम्भमेव च ॥
देवलं नारदं वन्दे वन्दे सावर्णिगालवम् । एतेषामनुयोगेन कृतं ते स्वापनं महत् ॥
यथा स्वपन्त्यजगराः स्वपन्त्यपि चमूखलाः । तथा स्वपन्तु पुरुषा ये च ग्रामे कुतूहलाः ॥
भण्डकानां सहस्रेण रथनेमिशतेन च । इमं गृहं प्रवेक्ष्यामि तूष्णीमासन्तु भाण्डकाः ॥
नमस्कृत्वा च मनवे बद्ध्वा शुनकफेलकाः । ये देवा देवलोकेषु मानुषेषु च ब्राह्मणाः ॥
अध्ययनपारगाः सिद्धाः ये च कैलासतापसाः । एतेभ्यः सर्वसिद्धेभ्यः कृतं ते स्वापनं महत् ॥
अतिगच्छति च मय्यपगच्छन्तु संहताः । अलिते वलिते मनवे स्वाहा ॥

एतस्य प्रयोगः--त्रिरात्रोपोषितः कृष्णचतुर्दश्यां पुष्ययोगिन्यां श्वपाकीहस्ताद् बिलखावलेखनं क्रीणीयात् । तन्माषैः सह कण्डोलिकायां कृत्वा असङ्कीर्ण आदहने निखानयेत् । द्वितीयस्यां चतुर्दश्यामुद्धृत्य कुमार्या पेषयित्वा गुलिकाः कारयेत् । तत एकां गुलिकामभिमन्त्रयित्वा यत्रैतेन मन्त्रेण क्षिपति, तत् सर्वं प्रस्वापयति ।

---

आहिताग्नि अशा ब्राह्मणाचें प्रेत जाळलें जात असलेलें पाहून तेथें तीन दिवस उपोषण करावें. नंतर पुष्य नक्षत्राचे दिवशीं आत्महत्याकरून मेलेल्या माणसाच्या प्रेतावरील कापड काढून घेऊन त्याची पिशवी शिवावी. त्या पिशवींत पूर्वोक्त आहिताग्नि ब्राह्मणाच्या प्रेताची राख भरावी. ही पिशवी खांद्यावर घेऊन संचार करणारा मनुष्य अदृश्य होतो.

ब्राह्मणाच्या उत्तर कार्यांत जी गाय मारली जाते तिचे अस्थि व मज्जा यांचें चूर्ण करावें व तें सापानें टाकलेल्या कांतेंत भरून ती कांत जनावराच्या गळ्यांत बांधावी म्हणजे तें जनावर अदृश्य होतें.

साप चावून मेलेल्या इसमाच्या प्रेताची राख प्रचलाक पक्षाच्या कांतडींत भरली व ती पिशवी पशूच्या गळ्यांत बांधली तर तो पशु अदृश्य होतो.

घुबड व वडवाघुळ यांचें पुच्छ, पुरीष, आणि गुडघ्याचे हाड यांचें चूर्ण करून ते सर्पाच्या कांतेंत भरलें म्हणजे त्या कांतेनें पक्षी अदृश्य होतात.

अदृश्य होण्याचे हे असे आठ प्रयोग आहेत.

'बलिं वैरोचनं वन्दे' इत्यादि मंत्राचा उपयोग पुढीलप्रमाणें करावाः—

ज्या कृष्णचतुर्दशीला पुष्य नक्षत्र असेल अशा चतुर्दशीच्या पूर्वी तीन दिवस उपवास करून चतुर्दशीच्या दिवशीं चांडाली कडून बिलखा नांवाच्या प्राण्यांचे तुकडे विकत घ्यावे; आणि उडदासह तें एका कटोऱ्यांत भरून एकट्यानें स्मशानांत जाऊन तो कटोरा पुरून ठेवावा. दुसऱ्या महिन्याच्या कृष्णचतुर्दशीस तें बाहेर काढून त्याचें चूर्ण करून त्याच्या गोळ्या कराव्या. नंतर वर दिलेला 'बलिं वैरोचनं वन्दे ।' इत्यादि मंत्र म्हणून त्यांतील एकेक गोळी ज्या घरांत टाकली जाईल त्या घरांत सर्व प्राण्यांना गाढ झोंप लागेल.

एतेनैव कल्पेन श्वाविधः शल्यकं त्रिकालं त्रिश्वेतमसङ्कीर्ण आदहने निखानयेत् । द्वितीयस्यां चतुर्दश्याम् उद्धृत्यादहनभस्मना सह यत्रैतेन मन्त्रेण क्षिपति, तत् सर्वं प्रस्वापयति ।

सुवर्णपुष्पीं ब्रह्माणीं ब्रह्माणं च कुशध्वजम् । सर्वांश्च देवता वन्दे वन्दे सर्वांश्च तापसान् ॥
वशं मे ब्राह्मणा यान्तु भूमिपालाश्च क्षत्रियाः । वशं वैश्याश्च शूद्राश्च वशतां यान्तु मे सदा ॥
स्वाहा । अमिले किमिले वसुजारे प्रयोगे फक्के वयुह्वे विहाले दन्तकटके स्वाहा ।
सुखं स्वपन्तु शुनका ये च ग्रामे कुतूहलाः । श्वाविधः शल्यकं चैतत् त्रिश्वेतं ब्रह्मनिर्मितम् ॥
प्रसुप्ताः सर्वसिद्धा हि एतत् ते स्वापनं कृतम् । यावद् ग्रामस्य सीमान्तः सूर्यस्योद्गमनादिति ॥
स्वाहा ।

एतस्य प्रयोगः—श्वाविधः शल्यकानि त्रिश्वेतानि । सप्तरात्रोपोषितः कृष्णचतुर्दश्यां खादिराभिः समिधाभिरग्निमेतेन मन्त्रेणाष्टशतसंपातं कृत्वा मधुघृताभ्याम् अभिजुहुयात् । तत एकमेतेन मन्त्रेण ग्रामद्वारि गृहद्वारि वा यत्र निखन्यते, तत् सर्वं प्रस्वापयति ।

बलिं वैरोचनं वन्दे शतमायं च शम्बरम् । निकुम्भं नरकं कुम्भं तन्तुकच्छं महासुरम् ।
अर्मालवं प्रमीलं च मण्डोलूकं घटोबलम् । कृष्णकंसोपचारं च पौलोमीं च यशस्विनीम् ॥
अभिमन्त्रयित्वा गृह्णामि सिद्धार्थं शवशारिकाम् ।
जयतु जयति च नमः शलकभूतेभ्यः स्वाहा । सुखं स्वपन्तु शुनका ये च ग्रामे कुतूहलाः ॥
सुखं स्वपन्तु सिद्धार्था यमर्थं मार्गयामहे । यावदस्तमयादुदयो यावदर्थं फलं मम ॥
इति स्वाहा ।

एतस्य प्रयोगः--चतुर्भक्तोपवासी कृष्णचतुर्दश्यामसङ्कीर्ण आदहने बलिं कृत्वा एतेन मन्त्रेण शवशारिकां गृहीत्वा पोत्रीपोट्टलिकां बध्नीयात् । तन्मध्ये श्वाविधः शल्यकेन विद्ध्वा यत्रैतेन मन्त्रेण निखन्यते, तत् सर्वं प्रस्वापयति ।

उपैमि शरणं चाग्निं दैवतानि दिशो दश । अपयान्तु च सर्वाणि वशतां यान्तु मे सदा ॥
स्वाहा ।

---

वर दिलेल्या प्रकारानेंच साळूचे तीन काळे व तीन पांढरे केस एकत्र घेऊन एकस्यानें स्मशानांत पुरून ठेवून दुसऱ्या महिन्याच्या कृष्णचतुर्दशीस ते बाहेर काढून वरील मंत्र म्हणून चिताभस्मासह फेकावे म्हणजे त्या ठिकाणचे सर्व प्राणी गाढ निद्रिस्त होतात.

'सुवर्ण पुष्पीं ब्रह्माणीं' या मंत्राचा प्रयोग—सात दिवस उपोषण करून कृष्णचतुर्दशीचे दिवशीं साळूचे तीन पांढरे केस घ्यावेत. नंतर वरील मंत्र म्हणून खदिराच्या झाडाच्या समिधांना १०८ वेळां मध व तूप यांचा लेप करून त्यांच्या आहुती अग्नींत याव्या. नंतर त्यांतला एकेक केस घेऊन वरील मंत्र म्हणत गांवाच्या वेशींत किंवा घराच्या दरवाजांत पुरावा म्हणजे आंतले सर्व प्राणी गाढ निद्रिस्त होतात.

'बलिंवैरोचनंवंदे' या मंत्राचा प्रयोग असा—

चार दिवस नक्तोपोषण करून कृष्णचतुर्दशीचे दिवशीं एकस्यानें स्मशानांत जाऊन तेथें बलि द्यावा; आणि वरील मंत्र म्हणून मेलेली मैना घ्यावी, व ती एका फडक्याच्या घडींत ठेवावी. त्या फडक्याला साळूच्या कांट्या-सारख्या केसानें टोचावें व तें फडकें वरील मंत्र म्हणून पुरून टाकावें. ज्या घराच्या दरवाज्यांत तें पुरलें जाईल त्यांतील सर्व प्राणी निद्रावश होतील.

'उपैमि शरणं चाग्निं' या मंत्राचा प्रयोगः—

एतस्य प्रयोगः—त्रिरात्रोपोषितः पुष्येण शर्करा एकविंशतिसंपातं कृत्वा मधुघृताभ्याम् अभिजुहुयात्। ततो गन्धमाल्येन पूजयित्वा निखानयेत्। द्वितीयेन पुष्येणोद्धृत्यैकां शर्करामभिमन्त्रयित्वा कवाटमाहन्यात्। अभ्यन्तरं चतसृणां शर्कराणां द्वारमपाव्रियते।

चतुर्नक्तोपवासी कृष्णचतुर्दश्यां भग्नस्य पुरुषस्यास्थ्ना ऋषभं कारयेत्; अभिमन्त्रयेच्चैतेन, द्विगोयुक्तं गोयानमाहृतं भवति। ततः परमाकाशे विक्रामति।

सदा रविरविः सगण्डपरिघाति सर्वं भणाति। चण्डालीकुम्बीत्तम्बकटुकसारीघः सनारीभगोऽसि स्वाहा।

तालोद्घाटनं प्रवापनं च।

त्रिरात्रोपोषितः पुष्येण शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुंसः शिरःकपाले मृत्तिकायां तुवरीरावास्योदकेन सेचयेत्। जातानां पुष्येणैव गृहीत्वा रज्जुकां वर्तयेत्। ततः सज्ज्यानां धनुषां यन्त्राणां च पुरस्ताच्छेदनं ज्याच्छेदनं करोति।

उदकाहिभस्त्रामुच्छ्वासमृत्तिकया स्त्रियाः पुरुषस्य वा पूरयेत्, नासिकाबन्धनं मुखग्रहश्च।

वराहबस्तिमुच्छ्वासमृत्तिकया पूरयित्वा मर्कटस्नायुनावबध्नीयाद्; आनाहकरणम्।

कृष्णचतुर्दश्यां शस्त्रहताया गोः कपिलायाः पित्तेन राजवृक्षमयीममित्रप्रतिमाम् अञ्ज्यात्, अन्धीकरणम्।

---

तीन दिवस उपोषण करून पुष्य नक्षत्राचे दिवशीं एकवीस खडे घ्यावे आणि मध व तूप यांचें अग्नींत हवन करून त्या खड्यांची गंधमाल्यादिकांनीं पूजा करावी व ते खडे पुरून ठेवावेत. दुसऱ्या महिन्यांत पुष्य नक्षत्र येतांच ते खडे काढून वरील मंत्र म्हणून एकेक खडा दरवाजावर फेंकावा. असे चार खडे दरवाजाच्या चार कोपऱ्यांवर फेंकले असतां मधला दरवाजा उघडतो.

चार दिवस नक्त उपवास करून कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं एखाद्या माणसाच्या मोडलेल्या हाडापासून बैलाची मूर्ति करावी; व तिची वरील मंत्रानें पूजा करावी. असे दोन बैल तयार झाले म्हणजे ते बैल गाडीला जोडावे. त्या गाडींत बसलें असतां आकाशांत संचार करितां येतो.

‘ सदारविरवि ’ इत्यादि मंत्र म्हणून होम करावा. घराचा दरवाजा उघडण्यांचे आणि घरांतील प्राण्यांना गाढ झोंप आणविण्याचे हे प्रयोग सांगितले.

तीन दिवस उपोषण करून पुष्य नक्षत्रावर शस्त्रानें मारलेल्या किंवा फांशीं दिलेल्या माणसाचे डोक्याची कवटी घेऊन तींत माती भरावी व त्या मातींत तुवरीचें बीं पेरून पाणी घालावें. वेल उगवल्यावर पुष्य नक्षत्रीं वेल तोडून त्याची दोरी तयार करावी. ती दोरी धनुष्याच्या किंवा यंत्राच्या समोर धरून तोडली असतां शत्रूचे धनुष्याची दोरी तुटते.

जल सर्पाची कात घेऊन तींत एखाद्या स्त्रीनें किंवा पुरुषानें फुंकून धूळ भरावी. ती कात जसजशी भरत जाईल तसतसें शत्रूचें नाक व तोंड सुजून बंद होतें.

कुत्र्याचें किंवा डुकराचें जठर काढून त्यांत वरच्याप्रमाणें धूळ भरावी व ती पिशवी माकडाच्या स्नायूंनें माणसाच्या शरीरावर बांधावी म्हणजे त्या मनुष्याचें मलमूत्र बंद होतें.

कृष्णचतुर्दशीच्या दिवशीं शस्त्रानें मारलेल्या कपिलागाईच्या मस्तकांतील गोरोचन काढून घ्यावें आणि राजवृक्षाच्या लांकडाची शत्रूची प्रतिमा करून त्या प्रतिमेच्या डोळ्याला त्या गोरोचनाचें अंजन करावें म्हणजे शत्रूचे डोळे जातात.

चतुर्नक्तोपवासी कृष्णचतुर्दश्यां बलिं कृत्वा शूलप्रोतस्य पुरुषस्यास्थ्ना कीलकान् कारयेत्। एतेषामेकः पुरीषे मूत्रे वा निखात आनाहं करोति; पादेऽस्यासने वा निखातः शोषेण मारयति; आपणे क्षेत्रे गृहे वा वृत्तिच्छेदं करोति।

एतेन कल्पेन विद्युद्दग्धस्य वृक्षस्य कीलका व्याख्याताः।
पुनर्नवमवाचीनं निम्बः काकमधुश्च यः। कपिरोम मनुष्यास्थि बद्ध्वा मृतकवाससा॥
निखन्यते गृहे यस्य पिष्ट्वा वा यं प्रपाययेत्। सपुत्रदारः सधनस्त्रीन् पक्षान् नातिवर्तते॥
पुनर्नवमवाचीनं निम्बः काकमधुश्च यः। स्वयंगुप्ता मनुष्यास्थि पदे यस्य निखन्यते॥
द्वारे गृहस्य सेनाया ग्रामस्य नगरस्य वा। सपुत्रदारः सधनस्त्रीन् पक्षान् नातिवर्तते॥
अजमर्कटरोमाणि मार्जारनकुलस्य च। ब्राह्मणानां श्वपाकानां काकोलूकस्य चाहरेत्॥
एतेन विष्ठावक्षुण्णा सद्य उत्सादकारिका। प्रेतनिर्मालिका किण्वं रोमाणि नकुलस्य च॥
वृश्चिकाल्यहिकृत्तिश्च पदे यस्य निखन्यते। भवत्यपुरुषः सद्यो यावत् तन्नापनीयते॥

त्रिरात्रोपोषितः पुष्येण शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुंसः शिरःकपाले मृत्तिकायां गुञ्जा आवास्योदकेन च सेचयेत्। जातानाममावास्यायां पौर्णमास्यां वा पुष्ययोगिन्यां गुञ्जावल्लीर्ग्राहयित्वा मण्डलिकानि कारयेत्। तेष्वन्नपानभाजनानि न्यस्तानि न क्षीयन्ते।

---

चार दिवस उपवास करून कृष्णचतुर्दशीचे दिवशीं बलि देऊन सुळावर दिलेल्या पुरुषाच्या अस्थीपासून खिळे तयार करावे. तो खिळा ज्याच्या मलमूत्रांत टाकला जाईल त्याचें मलमूत्र बंद होत. अथवा तो खिळा एखाद्याच्या बसण्याच्या जागेंत पुरला असतां तो मनुष्य क्षयरोग होऊन मरतो. तो खिळा घरांत, दुकानांत किंवा शेतांत पुरला असतां वृत्तिच्छेद होतो.

याचप्रमाणें विजेनें दग्ध झालेल्या झाडाच्या लांकडापासून खिळे तयार केले असतां त्यांचाहि असाच उपयोग होतो.

पुनर्नवा, अवाचीन, निंब, व काकमधु या वनस्पतींचीं पानं, माकडाचे केस, माणसाचें हाड इतके जिन्नस प्रेतावरील वस्त्रांत बांधून ज्याच्या घरांत पुरले जातात किंवा त्यांचें चूर्ण करून ज्याला पाजलें जातें तो पुत्र, दारा, धन, यांसह दीड महिन्यांत नाश पावतो.

पुनर्नवा, अवाचीन, निंब, काकमधु, स्वयंगुप्ता ( वनस्पति ) व माणसाचें हाड इतक्या वस्तु ज्याच्या बसण्याच्या जागेखालीं किंवा घराच्या, छावणीच्या, गांवाच्या किंवा शहराच्या द्वारांत पुरल्या जातात त्याचा पुत्रधनदारादिकांसह दीड महिन्यांत नाश होतो.

शेळी, मर्कट, मांजर, मुंगूस, ब्राह्मण, चांडाळ, कावळा व घुबड यांचें केस घेऊन ज्याच्या विष्ठेंत वाटले जातात त्याचा तात्काळ नाश होतो.

प्रेतावरील निर्माल्य, मद्यबीज, मुंगुसाचे केस आणि विंचू, भोंगा व सर्प यांचें कातडें इतक्या वस्तु एकत्र करून ज्याच्या बसण्याउठण्याच्या जागेखालीं पुरल्या जातात तो पुरुष तात्काल नपंसक बनतो व त्या वस्तु काढून टाकीपर्यंत त्याचें नपुंसकत्व नाहींसें होत नाहीं.

तीन दिवस उपोषण करून शस्त्रानें मारलेल्या किंवा सुळावर चढविलेल्या पुरुषाच्या डोक्याची कवटी घेऊन पुष्य नक्षत्रावर तिच्यांत माती घालून तींत गुंजा पेराव्या व पाणी घालावें. वेल वाढला म्हणजे पुष्य नक्षत्र युक्त अमावास्येच्या किंवा पौर्णिमेच्या दिवशीं ती वेल तोडून तिची चुंबळ करावी. त्या चुंबळीवर अन्नपानादिकांनी भरलेलीं भांडीं ठेवलीं असतां त्या भांड्यांतील पदार्थ संपत नाहींत.

रात्रिप्रेक्षायां प्रवृत्तायां प्रदीपाग्निषु मृतधेनोः स्तनानुत्कृत्य दाहयेत् । दग्धान् वृषमूत्रेण पेषयित्वा नवकुम्भमन्तर्लेपयेत्; तं ग्राममपसव्यं परिणीय तत्र न्यस्तं नवनीतमेषां तत् सर्वमागच्छतीति ।

कृष्णचतुर्दश्यां पुष्ययोगिन्यां शुनो लग्नकस्य योनौ कालायसीं मुद्रिकां प्रेषयेत्; तां स्वयं पतितां गृह्णीयात्; तया वृक्षफलान्याकारितान्यागच्छन्ति ।

मन्त्रभैषज्यसंयुक्ता योगा मायाकृताश्च ये । उपहन्यादमित्रांस्तैः स्वजनं चाभिपालयेत् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे औपनिषदिके चतुर्दशाधिकरणे तृतीयोऽध्यायः प्रलम्भने भैषज्यमन्त्रप्रयोगः, आदितोऽष्टचत्वारिंशच्छततमः ॥

# अध्याय १४९ स्वबलोपघातप्रतीकारः ।



स्वपक्षे परप्रयुक्तानां दूषिविषगराणां प्रतीकारे श्लेष्मातककपित्थदन्तिदन्तशठगोजीशिरीषपाटलीबलास्योनाकपुनर्नवाश्वेतावरणक्काथयुक्तं चन्दनसालावृकीलोहितयुक्तं तेजनोदकं राजोपभोग्यानां गुह्यप्रक्षालनं स्त्रीणां सेनायाश्च विषप्रतीकारः ।

पृषतनकुलनीलकण्ठगोधापित्तयुक्तं मषीराजिचूर्णं सिन्दुवारितवरणवारुणीतण्डुलीयकशतपर्वाग्रपिण्डीतकयोगो मदनदोषहरः ।

सृगालविन्नामदनसिन्दुवारितवरणवारणवल्लीमूलकषायाणामन्यतमस्य समस्तानां वा क्षीरयुक्तं पानं मदनदोषहरम् ।

---

रात्रींच्या वेळीं दिवे लावून तमाशा चालू असतां मेलेल्या गाईची कांस कापून ती त्या दिव्यावर जाळावी. ती राख बैलाचें मूत शिंपडून भिजवावी आणि नव्या कोऱ्या मातीच्या घागरीला त्या राखेचा लेप करावा. नंतर ती घागर घेऊन गांवाला उलटी प्रदक्षिणा करून ती घागर जेथें ठेवली जाईल तेथें गांवांतील सर्वांच्या घरचें लोणी येऊन पडतें.

पुष्य नक्षत्र असलेल्या कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं माजलेल्या कुत्रीच्या गुह्येंद्रियांत पोलादाची मुद्रिका घालून ठेवावी. ती आपोआप बाहेर पडली म्हणजे ती उचलून घ्यावी. पुढें त्या मुद्रिकेनें ज्या ज्या फळाचें नांव घेऊन पाचारण करावें तें तें फळ येऊन पडतें.

मंत्र व औषधि आणि जादूटोणे यांच्या या प्रकारांनीं शत्रूचा नाश करावा आणि स्वजनांचें असल्या अभिचारापासून रक्षण करावें.

## अध्याय १४९ आपल्या सैन्याच्या घाताचा प्रतीकार

शत्रूनें आपल्या लोकांवर दूषित प्राणिजन्य किंवा अन्य विषांचा प्रयोग केला असतां त्याचा प्रतीकार करण्याचे मार्गः—

श्लेष्मातक, कपित्थ, उदुंबर, जांभूळ, शठगोजी, शिरीष व पाटली, बलाकी, स्योनाक, पुनर्नवा, व श्वेतावरण यांचा काढा चंदन व शालावृकाचें रक्त यांचें मिश्रण हें एक प्रकारचें तेजाब बनतें. राजाला ज्या स्त्रियांचा उपभोग घ्यावयाचा असतो त्या स्त्रियांचे गुह्य अंग वरील तेजाबानें धुवावें. सैन्यानेंहि वरील तेजाबाचा उपयोग केल्यास विषाचा प्रतिकार होतो.

ठिपक्यांचें हरिण, मुंगस, मोर व सुसर यांचें पित्त व कोळशाची पूड आणि सिंदुवारिक, वरण, वारुणी, तण्डुलीयक ( तांदुळजा ) व शतपर्वा ( वेळू ) यांच्या पानांचीं अग्रें यांच्या पासून जें औषध तयार होतें तें विषाचा नाश करितें.

सृगालविन्ना, धोत्रा, सिंदुवारित, वरण व पिंपळी यांच्या मुळ्यांचा काढा ( पृथक्त्वें करून किंवा सर्वांचा मिळून ) दुधाबरोबर प्राशन केला असतां मदनविष दूर होतें.

कैडर्यपूतितिलतैलमुन्मादहरं नस्तःकर्म । प्रियङ्गुनक्तमालयोगः कुष्ठहरः ।

कुष्ठलोध्रयोगः पाकशोषघ्नः । कटुफलद्रवन्तीविलङ्गचूर्णं नस्तःकर्म शिरोरोगहरम् ।

प्रियङ्गुमञ्जिष्ठातगरलाक्षारसमधुकहरिद्राक्षौद्रयोगो रज्जूदकविषप्रहारपतननिस्संज्ञानां पुनः-प्रत्यानयनाय ।

मनुष्याणामक्षमात्रं; गवाश्वानां द्विगुणं; चतुर्गुणं हस्त्युष्ट्राणाम् । रुक्मगर्भश्चैषां मणिः सर्वविषहरः ।

जीवन्तीश्वेतामुष्ककपुष्पवन्दाकानामक्षीवे जातस्य अश्वत्थस्य मणिः सर्वविषहरः ।

तूर्याणां तैः प्रलिप्तानां शब्दो विषविनाशनः । लिप्तध्वजं पताकां वा दृष्ट्वा भवति निर्विषः ॥

एतैः कृत्वा प्रतीकारं स्वसैन्यानामथात्मनः । अमित्रेषु प्रयुञ्जीत विषधूमाम्बुदूषणान् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे औपनिषदिके चतुर्दशाधिकरणे चतुर्थोऽध्यायः

स्वबलोपघातप्रतीकारः, आदित एकोनपञ्चाशच्छततमः ॥

एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्यौपनिषदिकं
चतुर्दशमधिकरणं समाप्तम् ॥

---

कटुफळ, करंज आणि तीळ यांचें तेल हें उन्मादरोग दूर करतें.

वाघांटी आणि नक्तमाल यांचा रस काढून त्याचें नस्य केलें असतां तें कुष्ठ रोग दूर करतें.

कुष्ठ आणि लोध्र यांच्या औषधानें जरा व क्षयरोग दूर होतात.

कटुफल, द्रवन्ती आणि विलंग या वनस्पतींचें सत्व काढून त्यांचें नस्य केलें असतां अर्धशिशी किंवा कपाळदुखी दूर होते.

वाघांटी, मंजिष्ठ, तगर, लाक्षारस, ज्येष्ठमध, हळद आणि मध यांचें मिश्रण गळफांसामुळें, पाण्यांत बुडाल्यामुळें, विष प्रयोगामुळें, मारामुळें किंवा आपटल्यामुळें आलेली बेशुद्धि नाहींशी करिते.

हें औषध मनुष्याला पावतोळा द्यावें, बैल—घोडे वगैरे जनावरांना अर्धा तोळा द्यावें आणि हत्ती व उंट यांना एक तोळा द्यावें. वरील औषधाच्या मात्रेंत सोनें घालून हेमगर्भ मणि तयार केल्यास तो सर्व विषांचा प्रतीकार करतो.

जीवन्ती, श्वेता व मुष्कक यांचे पुष्प आणि वन्द्राक व लिंबाचे झाडावर उगवलेला अश्वत्थवृक्ष यांच्या चूर्णाची मात्रा केली असतां ती सर्व विषांचा परिहार करिते.

वरील औषधें वाद्यांला लावून तीं वाद्यें वाजविलीं असतां त्यांचा आवाज विषाचा दोष दूर करितो. किंवा वरील औषधांचा लेप कापडाला करून त्या कापडाचें निशाण केलें तर तें निशाण पाहून देखील विष उतरतें.

याप्रमाणें वर सांगितलेले उपाय योजून राजानें स्वतःचें आणि आपल्या सैन्याचें संरक्षण करावें. आणि विषारी धूर व पाणी विषारी करून सोडणें वगैरे साधनांनीं आपल्या शत्रूंचा नाश करावा.



# तन्त्रयुक्तिः--पञ्चदशमधिकरणम् ।



## अध्याय १५० तन्त्रयुक्तयः ।



मनुष्याणां वृत्तिरर्थः, मनुष्यवती भूमिरित्यर्थः; तस्याः पृथिव्या लाभपालनोपायः शास्त्रमर्थशास्त्रमिति ।

तद् द्वात्रिंशद्युक्तियुक्तम्--अधिकरणं, विधानं, योगः, पदार्थः, हेत्वर्थः, उद्देशः, निर्देशः, अपदेशः, अतिदेशः, प्रदेशः, उपमानं, अर्थापत्तिः, संशयः, प्रसङ्गः, विपर्ययः, वाक्यशेषः, अनुमतं, व्याख्यानं, निर्वचनं, निदर्शनं, अपवर्गः, स्वसंज्ञा, पूर्वपक्षः, उत्तरपक्षः, एकान्तः, अनागतावेक्षणम् , अतिक्रान्तावेक्षणं, नियोगः, विकल्पः, समुच्चयः, ऊह्यमिति ।

यमर्थमधिकृत्योच्यते तदधिकरणम्--"पृथिव्या लाभे पालने च यावन्त्यर्थशास्त्राणि पूर्वाचार्यैः प्रस्थापितानि प्रायशस्तानि संहृत्यैकमिदमर्थशास्त्रं कृतम्" ( अधि० १. अध्या० १ ) इति ।

शास्त्रस्य प्रकरणानुपूर्वी विधानम्—"विद्यासमुद्देशः, वृद्धसंयोगः, इन्द्रियजयः, अमात्योत्पत्तिः" ( अधि० १. अध्या० १ ) इत्येवमादिकमिति ।

वाक्ययोजना योगः--"चतुर्वर्णाश्रमो लोकः" ( अधि० १. अध्या० ४ ) इति ।

पदावधिकः पदार्थः--"मूलहरः इति पदम् । "यः पितृपैतामहमर्थमन्यायेन भक्षयति स मूलहरः" ( अधि० २. अध्या० ९ ) इत्यर्थः ।

---

# अधिकरण १५ वें.

## अर्थशास्त्रांतील विवेचनपद्धतीचें स्पष्टीकरण.

मनुष्यांच्या चरितार्थाचें जें साधन तो अर्थ. ज्या भूमीवर मनुष्यांची वस्ती आहे ती भूमि म्हणजे अर्थ. अशा भूमीचा लाभ व तिचें पालन या संबंधी उपाय सांगणारें जें शास्त्र तें अर्थशास्त्र.

या अर्थशास्त्राचें विवेचन करण्यांत पुढील ३२ प्रकार उपयोगांत आणलेले आहेत. ते असे—१ अधिकरण २ विधान ३ योग ४ पदार्थ ५ हेत्वर्थ ६ उद्देश ७ निर्देश ८ उपदेश ९ अपदेश १० अतिदेश ११ प्रदेश १२ उपमान १३ अर्थापत्ति १४ संशय १५ प्रसंग १६ विपर्यय १७ वाक्यशेष १८ अनुमत १९ व्याख्यान २० निर्वचन २१ निदर्शन २२ अपवर्ग २३ स्वसंज्ञा २४ पूर्वपक्ष २५ उत्तरपक्ष २६ एकान्त २७ अनागतावेक्षण २८ अतिक्रान्तावेक्षण २९ नियोग ३० विकल्प ३१ समुच्चय आणि ३२ ऊह्य.

या शब्दांचें स्पष्टीकरण पुढें दिल्याप्रमाणें—

**१ अधिकरण**—ज्या विषयाला उद्देशून कांहीं सांगितलें जातें तें अधिकरण. जसें 'पृथ्वीची प्राप्ति आणि प्राप्त झालेल्या पृथ्वीचें पालन कसें करावें......या विषयीं हें अर्थशास्त्र मी लिहीत आहे.'

**२ विधान**—शास्त्रांतील प्रकरणांचा अनुक्रम सांगणें तें विधान जसें–विद्येचा उद्देश, वृद्धांची सेवा, इंद्रियसंयमन, अमात्यांची उत्पत्ति इ. इ.

**३ योग**—कारकसंबंधयुक्त वाक्ययोजना म्हणजे योग. जसें–समाज चतुर्वर्णात्मक व चतुराश्रमात्मक आहे.

**४ पदार्थ**—पदांतून निघणारा जो अर्थ तो पदार्थ जसें–जो वडिलार्जित संपत्ति फुकट खातो तो 'मूलहर.

हेतुरर्थसाधको हेत्वर्थः--"अर्थमूलौहि धर्मकामौ" ( अधि० १. अध्या० ७ ) इति ।

समासवाक्यमुद्देशः--"विद्याविनयहेतुरिन्द्रियजयः" ( अधि० १. अध्या ६ ) इति ।

व्यासवाक्यं निर्देशः--"कर्णत्वगक्षिजिह्वाघ्राणेन्द्रियाणां शब्दस्पर्शरूपरसगन्धेष्वविप्रतिपत्तिरिन्द्रियजयः" ( अधि० १. अध्या० ६ ) इति ।

एवं वर्तितव्यमित्युपदेशः--"धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत न निस्सुखः स्यात्" ( अधि० १. अध्या० ७ ) इति ।

एवमसावाहेत्यपदेशः--"मन्त्रिपरिषदं द्वादशामात्यान् कुर्वीतेति मानवाः; षोडशेति बार्हस्पत्याः; विंशतिमित्यौशनसाः यथासामर्थ्यमिति कौटल्यः" ( अधि० १. अध्या० १५ )।

उक्तेन साधनमतिदेशः--"दत्तस्याप्रदानमृणादानेन व्याख्यातम्" ( अधि० ३. अध्या० १६ ) इति ।

वक्तव्येन साधनं प्रदेशः--"सामदानभेददण्डैर्वा यथापत्सु व्याख्यास्यामः ( अधि० ७. अध्या० १४ ) इति ।

दृष्टेनादृष्टस्य साधनमुपमानम्--"निवृत्तपरिहारान् पितेवानुगृह्णीयात्" ( अधि० २. अध्या० १ ) इति ।

यदनुक्तमर्थादापद्यते सार्थापत्तिः--"लोकयात्राविद् राजानमात्मद्रव्यप्रकृतिसम्पन्नं प्रियहितद्वारेणाश्रयेत" ( अधि० ५. अध्या० ४ ) नाप्रियहितद्वारेणाश्रयेत्यर्थादापन्नं भवतीति ।

---

५ हेत्वर्थ—प्रतिपादित विधानाची पुष्टि करणारा जो अर्थ तो हेत्वर्थ. जसें–धर्म व काम हे संपत्तीवर अवलंबून आहेत.

६ उद्देश—संक्षेपानें बह्वर्थबोध करणें म्हणजे उद्देश. जसें–इंद्रियजयावर विद्या व विनय अवलंबून आहेत.

७ निर्देश—वरच्याच्या उलट सर्व शब्दांचा स्पष्ट उल्लेख करणें म्हणजे निर्देश. जसें–कान, त्वचा, नेत्र, जिव्हा, घ्राण या इंद्रियांनीं अनुक्रम शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांचा अनुभव न येणें म्हणजे इंद्रियजय.

८ उपदेश—'अमुक प्रकारें वागावें' असें सांगणें हा उपदेश. जसें–धर्म व अर्थ यांना विरोध न येईल अशा रीतीनें कामाचा उपभोग घ्यावा.

९ अपदेश—'अमका अमुक सांगतो' असें सांगणें हा अपदेश. जसें–मंत्रिपरिषदेंत बारा अमात्य असावेत असें मानवांचें मत आहे. सोळा असावेत असें बार्हस्पत्याचें मत आहे.

१० अतिदेश—जें सांगितलें आहे त्यावरून न सांगितलेलें समजून येईल असें म्हणणें हा अतिदेश होय. जसें–दिलेली वस्तु परत न केल्यास तीस कर्ज फेडीचे नियम लागू होतात.

११ प्रदेश—जें पुढें सांगावयाचें आहे त्याची पूर्व सूचना करणें म्हणजे प्रदेश. जसें–साम, दाम, भेद, दंड या उपायांनीं पुढें आपत्ति प्रकरणांत सांगण्यांत येणार आहे त्या रीतीनें कार्य साधावें.

१२ उपमान—दृष्ट पदार्थावरून अदृष्टाचा बोध म्हणजे उपमान. जसें—प्रजेला सूट देऊन राजानें पित्याप्रमाणें प्रजेचा संभाळ करावा.

१३ अर्थापत्ति—न सांगतां साहजिकच जो अर्थ निष्पन्न होतो ती अर्थापत्ति. जसें—'राजाकडे जावयाचें तें त्याच्या मर्जीतल्या माणसांच्या मार्फत जावें' असें सांगितलें असतां 'गैर मर्जीतल्या माणसांच्या मार्फत जाऊं नये' हें आपोआप लक्षांत येतें.

उभयतोहेतुमानर्थः संशयः—"क्षीणलुब्धप्रकृतिमपचरितप्रकृतिं वा" (अधि० ७ अध्या०५ ) इति।

प्रकरणान्तरेण समानोऽर्थः प्रसङ्गः—"कृषिकर्मप्रदिष्टायां भूमाविति समानं पूर्वेण" (अधि० १. अध्या० ११ ) इति।

प्रतिलोमेन साधनं विपर्ययः—"विपरीतमतुष्टस्य" ( अधि० १. अध्या १६ ) इति।

येन वाक्यं समाप्यते, स वाक्यशेषः—"छिन्नपक्षस्येव राज्ञश्चेष्टानाशश्चेति" (अधि० ८. अध्या० १ ) तत्र शकुनेरिति वाक्यशेषः।

परवाक्यमप्रतिषिद्धमनुमतम्—"पक्षावुरस्यं प्रतिग्रह इत्यौशनसो व्यूहविभागः" (अधि० १०. अध्या० ६ ) इति।

अतिशयवर्णना व्याख्यानम्—"विशेषतश्च सङ्घानां सङ्घधर्मिणां च राजकुलानां द्यूतनि" मित्तो भेदः तन्निमित्तो विनाश इत्यसत्प्रग्रहः पापिष्ठतमो व्यसनानां तन्त्रदौर्बल्यात्" (अधि० ८. अध्या० ३ ) इति।

गुणतः शब्दनिष्पत्तिर्निर्वचनम्—"व्यस्यत्येनं श्रेयस इति व्यसनम्" (अधि० ८. अध्या० १ ) इति।

दृष्टान्तो दृष्टान्तयुक्तो निदर्शनम्—"विगृहीतो हि ज्यायसा हस्तिना पादयुद्धमिवाभ्युपैति (अधि० ७. अध्या० ३ )।

---

१४ संशय—हें किंवा तें असें दर्शविणें तो संशय. जसें—ज्या राजाचे प्रजाजन क्षीण व लोभी आहेत त्या राजावर स्वारी करावी किंवा ज्याचे प्रजाजन बंडखोर झाले आहेत त्यावर स्वारी करावी.

१५ प्रसंग—पूर्वीच्या प्रकरणांत सांगितलेला क्रम येथेंहि लागू आहे असें सांगणें हा प्रसंग होय. जसें—या हेराला शेत कामाला लावून त्याच्याकडून पूर्वी सांगितलेल्या हेरांप्रमाणेंच कामें करून घ्यावीं.

१६ विपर्यय—उलट क्रम सांगणें म्हणजे विपर्यय. जसें–जे असंतुष्ट असतील त्यांच्यांशीं वरच्याच्या उलट वर्तन करावें.

१७ वाक्यशेष—अर्थ पूर्ण करण्याकरिसां जो वाक्यांश पुढें जोडावा लागतो त्यास वाक्यशेष म्हणतात. जसें–पंख तोडलेल्या...प्रमाणें राजाची हालचाल बंद होते, या वाक्यांत 'तोडलेल्या' या पुढें, 'कपोता' हा वाक्यशेष.

१८ अनुमत—दुसऱ्याचें मत देऊन त्याचा निषेध केला नसेल तेव्हां तें अनुमत समजावें. जसें–'दोन्ही टोकें, मध्यभाग आणि राखीव सैन्य' हा उशनसांचा व्यूह विभाग होय.

१९ व्याख्यान—एकाच सिद्धान्ताचें अनेक प्रकारांनीं विवरण करणें म्हणजे व्याख्यान. जसें–द्यूतानें संघांमध्यें व संघधर्मी राजघराण्यांमध्यें भेद उत्पन्न होतो व नाश होतो. त्याच प्रमाणें तंत्रदौर्बल्य उत्पन्न होतें; म्हणून द्यूत हें व्यसन सर्वांत पापिष्ठ होय.

२० निर्वचन—शब्दाच्या व्युत्पत्तीवरूनच अर्थ काढणें म्हणजे निर्वचन. जसें–श्रेयापासून जें दूर नेतें ( व्यस्यति ) तें व्यसन.

२१ निदर्शन—दृष्टान्तानें एखादें विधान सिद्ध करणें हें निदर्शन. जसें–बलिष्ठाशीं वैर करणें हें हत्तीबरोबर पादचारी माणसानें युद्ध करण्यासारखें आहे.

अभिप्लुतव्यपकर्षणमपवर्गः—" नित्यमासन्नमरिबलं वासयेदन्यत्राभ्यन्तरकोपशङ्कायाः " ( अधि० ९. अध्या० २ ) इति।

परैरसमितः शब्दः स्वसंज्ञा—प्रथमा प्रकृतिस्तस्य भूम्यनन्तरा द्वितीया भूम्येकान्तरा तृतीया ( अधि० ६. अध्या० २ ) इति।

प्रतिषेद्धव्यं वाक्यं पूर्वपक्षः--" स्वाम्यमात्यव्यसनयोरमात्यव्यसनं गरीयः " ( अधि० ८. अध्या० १ ) इति।

तस्य निर्णयनवाक्यमुत्तरपक्षः--" तदायत्तत्वात्; तत्कूटस्थानीयो हि स्वामी " ( अधि० ८. अध्या० १ ) इति।

सर्वत्रायत्तमेकान्तः--" तस्मादुत्थानमात्मनः कुर्वीत " ( अधि० १. अध्या० १९ ) इति।

पश्चादेवं विहितमित्यनागतावेक्षणम्—" तुलाप्रतिमानं पौतवाध्यक्षे वक्ष्यामः " ( अधि० २. अध्या० १२ ) इति।

पुरस्तादेवं विहितमित्यतिक्रान्तावेक्षणम्--" अमात्यसम्पदुक्ता पुरस्तात् " ( अधि० ६. अध्या० १ ) इति।

एवं नान्यथेति नियोगः—" तस्माद् धर्ममर्थं चास्योपदिशेन्नाधर्ममनर्थं च " ( अधि० १. अध्या० १७ ) इति।

अनेन वानेन वेति विकल्पः--" दुहितरो वा धर्मिष्ठेषु विवाहेषु जाताः " ( अधि० ३. अध्या० ५ ) इति।

---

२२ अपवर्ग—अतिव्याप्त विधानाचा संकोच करून व्याप्ति मर्यादित करणें म्हणजे अपवर्ग. जसें—शत्रूचें सैन्य नेहमीं जवळ छावणी घालून ठेवावें; मात्र आपल्या राज्यांत असंतोष पसरण्याची धास्ती असेल तेव्हां हा नियम लागू नाहीं.

२३ स्वसंज्ञा—ज्या शब्दाचा अर्थ संकेतानें ठरलेला नसून एखाद्यानें स्वतःच योजलेला असेल ती स्वसंज्ञा—जसें—स्वतःचें राज्य ही त्याची पहिली प्रकृति; शेजारचें राज्य ही दुसरी प्रकृति, शेजाऱ्याच्या शेजारचें राज्य ही तिसरी प्रकृति.

२४ पूर्वपक्ष—ज्या विधानाचें खंडन करावयाचें असतें तो पूर्व पक्ष. जसें—स्वामित्व व अमात्य या दोन व्यसनांतून अमात्यव्यसन हें अधिक संकटकारक.

२५ उत्तरपक्ष—पूर्वपक्षाचें खंडन करून स्थापिलेला तो उत्तरपक्ष. जसें—" या गोष्टी राजावर अवलंबून असतात. राजा हाच त्यांचें उगमस्थान होय. "

२६ एकान्त—निरपवाद असें जें विधान तो एकान्त. जसें— म्हणून राजानें स्वतः उद्योग करावा.

२७ अनागतावेक्षण—पुढें येणाऱ्या विधानाची पूर्व सूचना म्हणजे अनागतावेक्षण. जसें—तुलाप्रतिमानाचें स्पष्टीकरण पौतवाध्यक्ष प्रकरणांत आम्ही करूं.

२८ अतिक्रान्तावेक्षण—मागें येऊन गेलल्या विधानाची आठवण देणें हें अतिक्रान्तविक्षण. जसें—अमात्याच्या अंगचे गुण पूर्वी सांगितले आहेत.

२९ नियोग—असेंच, इतर रीतीनें नव्हे, असें निश्चय पूर्वक सांगणें म्हणजे नियोग. जसें—म्हणून त्याला धर्माचा व अर्थाचा उपदेश करावा; अनर्थाचा उपदेश करूं नये.

३० विकल्प—असें किंवा असें, याला विकल्प म्हणतात. जसें-- त्याची संपत्ति मुलांना किंवा धार्मिक विवाहापासून झालेल्या मुलींना मिळेल.

अनेन चानेन चेति समुच्चयः--"स्वसञ्जातः पितृबन्धूनां च दायादः" ( अधि० ३. अध्या० ७ ) इति ।

अनुक्तकरमूह्यम्---'यथावद् दाता प्रतिग्रहीता च नोपहतौ स्यातां, तथानुशयं कुशलाः कल्पयेयुः" ( अधि ३. अध्या० १६ ) इति ॥

एवं शास्त्रमिदं युक्तमेताभिस्तन्त्रयुक्तिभिः । अवाप्तौ पालने चोक्तं लोकस्यास्य परस्य च ॥
धर्ममर्थं च कामं च प्रवर्तयति पाति च । अधर्मानर्थविद्वेषानिदं शास्त्रं निहान्ति च ॥
येन शास्त्रं च शस्त्रं च नन्दराजगता च भूः । अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ॥

इति कौटलीयार्थशास्त्रे तन्त्रयुक्तौ पञ्चदशाधिकरणे प्रथमोऽध्यायः

तन्त्रयुक्तयः । आदितः पञ्चाशच्छततमोऽध्यायः ।

**एतावता कौटलीयस्यार्थशास्त्रस्य तन्त्रयुक्तिः**
**पञ्चदशमधिकरणं समाप्तम् ॥**

दृष्ट्वा विप्रतिपत्तिं बहुधा शास्त्रेषु भाष्यकाराणाम् । स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रं च भाष्यं च ॥

---

**३१ समुच्चय**---दोन उपाय एकमेकांना पोषक म्हणून एकत्र सांगितलें असतील तर तो समुच्चय. जसें---आपल्यापासून आणि पितृबंधूंच्या पासून झालेला तो दायाद.

**३२ ऊह्य**---अमुकच करा असें न सांगतां नुसती दिशा दाखविली असते त्यास ऊह्य म्हणतात. जसें---जेणेंकरून देणारा व घेणारा या दोघांचेंहि नुकसान होणार नाहीं अशा प्रकारचा निर्णय तज्ज्ञांनीं द्यावा.

अशाप्रकारें हें अर्थशास्त्र वर निर्दिष्ट केलेल्या तंत्रयुक्तींनीं युक्त असें आहे; आणि इहलोकाचें व परलोकाचें साधन व पालन व्हावें म्हणून तें सांगण्यांत आलें आहे.

हें अर्थशास्त्र धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांची प्रवृत्ति करतें व त्या पुरुषार्थांचें रक्षणहि करतें आणि हें शास्त्र अधर्माचा व अर्थविरोधक गोष्टींचा नाश करतें.

ज्यानें रागाच्या सपाट्यांत आपली शास्त्रज्ञता प्रकट करून आपलें बुद्धिरूप शस्त्र म्यानांतून बाहेर काढलें आणि नन्दराजाच्या हातून हीं भूमि हिसकून घेतली त्यानें ( आर्यचाणक्यानें ) हें अर्थशास्त्र रचिलें.

शास्त्रावर भाष्य लिहिणाऱ्या भाष्यकारांच्या हातून अनेक वेळां चुका झालेल्या पाहून विष्णुगुप्तानें सूत्रांबरोबरच त्यांवरचें भाष्यहि स्वतःच केलें.



# चाणक्यसूत्राणि.



१ सुखस्य मूलं धर्मः । सुखाचें मूळ धर्म.
२ धर्मस्य मूलमर्थः । धर्माचें मूळ अर्थ ( संपत्ति ).
३ अर्थस्य मूलं राज्यम् । संपत्तीचें मूळ राज्य.
४ राज्यमूलमिन्द्रियजयः । राज्यप्राप्तीचें मूळ इंद्रियजय.
५ इन्द्रियजयस्य मूलं विनयः । इंद्रियजयाचें मूळ शिक्षण.
६ विनयस्य मूलं वृद्धोपसेवा । शिक्षणाचें मूळ वृद्धांची सेवा.
७ वृद्धसेवाया विज्ञानम् । वृद्धांच्या सेवेपासून अनुभवजन्य ज्ञान मिळतें.
८ विज्ञानेनात्मानं संपादयेत् । अनुभवजन्य ज्ञानानें आत्मज्ञान प्राप्त होतें.
९ संपादितात्मा जितात्मा भवति । आत्मज्ञानानें मनुष्य मनोनिग्रही बनतो.
१० जितात्मा सर्वार्थैस्संयुज्येत । मनोनिग्रही मनुष्याला सर्व अर्थ प्राप्त होतात.
११ अर्थसंपत्प्रकृतिसंपदं करोति । अर्थप्राप्तीच्या योगानें अमात्यजनपदादि प्रकृति स्वाधीन होते.
१२ प्रकृतिसंपदा ह्यनायकमपि राज्यं नीयते । अमात्यादि प्रकृतीच्या जोरावर निर्नायक असा राज्यशकटहि चालवितां येतो.
१३ प्रकृतिकोपस्सर्वकोपेभ्यो गरीयान् । प्रकृतिकोप हा इतर सर्व प्रकारच्या क्षोभापेक्षां भयंकर आहे.
१४ अविनीतस्वामिलाभादस्वामिलाभः श्रेयान् । अशिक्षित व दुःशील राजापेक्षां राजा नसणेंच बरें.
१५ संपाद्यात्मानमन्विच्छेत्सहायवान् । आत्मिक संपत्ति प्राप्त करून घेऊन मग सहाय्यक संपादन करावेत.
१६ नासहायस्य मन्त्रनिश्चयः । ज्या राजाला कोणीहि साहाय्यकर्ता नाहीं त्या राजाची कोणतीहि मसलत निश्चित होत नाहीं.
१७ नैकं चक्रं परिभ्रमयति । एका चाकानें राज्यशकट चालूं शकत नाहीं.
१८ सहायस्समसुखदुःखः । जो सुखांत व दुःखांत सारखाच साथीदार असतो त्यालाच साहाय्यकर्ता म्हणावें.
१९ मानी प्रतिमानिनमात्मनि द्वितीयं मन्त्रमुत्पादयेत् । मानी पुरुष दुसऱ्या मानी पुरुषाशीं स्पर्धा करून निराळेंच कारस्थान उभें करील.
२० अविनीतं स्नेहमात्रेण न मन्त्रे कुर्वीत । केवळ स्नेहसंबंधावरून अविनीत मनुष्याला मसलतींत घेऊं नये.
२१ श्रुतवन्तमुपधाशुद्धं मन्त्रिणं कुर्वीत । जो विद्वान असून इमानाच्या कसोटीस उतरलेला असेल त्याला मंत्रिपद देण्यांत यावें.
२२ मन्त्रमूलास्सर्वारम्भाः । राजाच्या सर्व मसलती गुप्त खलबतावर अवलंबून असतात.
२३ मन्त्ररक्षणे कार्यसिद्धिर्भवति । मसलत गुप्त राखली तरच कार्यसिद्धि होते.
२४ मन्त्रविस्रावी कार्यं नाशयति । जो मसलत फोडतो तो कार्यनाश करितो.
२५ प्रमादात् द्विषतां वशमुपयास्यति । हातून प्रमाद घडला कीं, राजा शत्रूच्या तावडींत सांपडतो.
२६ सर्वद्वारेभ्यो मन्त्रो रक्षितव्यः । आपली मसलत कोणत्याहि मार्गांनें बाहेर न फुटेल, अशी योजना करावी.
२७ मन्त्रसंपदा राज्यं वर्धते । मसलतीच्या बळावर राज्याची अभिवृद्धि होते.
२८ श्रेष्ठतमां मन्त्रगुप्तिमाहुः । मसलत गुप्त राखणें ही सर्वांत उत्कृष्ट राजनीति होय.
२९ कार्यान्धस्य प्रदीपो मन्त्रः । जो किंकर्तव्यतामूढ झाला असेल, त्याला मसलत मार्ग दाखविते.
३० मन्त्रचक्षुषा परच्छिद्राण्यवलोकयन्ति । मंत्ररूपी डोळ्यानें राजाला शत्रूंचीं मर्मस्थानें दिसतात.

३१ मन्त्रकाले न मत्सरः कर्तव्यः । खलबताचे वेळीं एकमेकांविषयीं मत्सर धरतां कामा नये.
३२ त्रयाणामेकवाक्ये संप्रत्ययः । तिघांचें एकमत पडलें म्हणजे खरेपणाविषयीं खात्री बाळगावी.
३३ कार्याकार्यतत्त्वार्थदर्शिनो मन्त्रिणः । कार्याकार्यविवेक बरोबर दाखविणारे तेच खरे मन्त्री.
३४ षट्कर्णाद्भिद्यते मन्त्रः । मसलत षट्कर्णी झाली कीं, ती फुटणार म्हणून समजावें.
३५ आपत्सु स्नेहसंयुक्तं मित्रम् । संकटकालीं देखील ज्याचा स्नेह टिकतो, तोच खरा मित्र.
३६ मित्रसंग्रहणे बलं संपद्यते । मित्रांचा संग्रह केला म्हणजे बलाची अभिवृद्धि होते.
३७ बलवानलब्धलाभे प्रयतते । जो बलसंपन्न होतो, तोच अप्राप्त गोष्टी प्राप्त करून घेण्यासाठीं झटतो.
३८ अलब्धलाभो नालसस्य । आळशाला अप्राप्त गोष्टीची प्राप्ति होत नाहीं.
३९ अलसस्य लब्धमपि रक्षितुं न शक्यते । प्राप्त झालेलें वैभव देखील आळशाच्या हातीं टिकत नाहीं.
४० न चालसस्य रक्षितं विवर्धते । तें कदाचित् टिकलें तरी त्याची वाढ होत नाहीं.
४१ स भृत्यान् प्रेषयति । आळशी मनुष्य प्रत्येक कामांत नोकरावर अवलंबून असतो.
४२ अलब्धलाभादिचतुष्टयं राज्यतन्त्रम् । अलब्धाचा लाभ, लब्धाचें परिरक्षण, रक्षिताचें वर्धन, आणि वर्धिताचें सत्पात्रीं दान, या चार गोष्टी साधणें म्हणजे राज्याधिकार हातीं असणें होय.
४३ राज्यतन्त्रायत्तं नीतिशास्त्रम् । नीतिशास्त्र राज्यतंत्राला अनुसरून असलें पाहिजे.
४४ राज्यतन्त्रेष्वायत्तौ तन्त्रावापौ । राज्यरक्षण व नवीन राज्यप्राप्ति राज्यकारभारावर अवलंबून असते.
४५ तन्त्रं स्वविषयकृत्येष्वायत्तम् । राज्यरक्षण हें अंतर्गत राज्यकारभारावर अवलंबून आहे.
४६ आवापो मण्डलनिविष्टः । नवी राज्यप्राप्ति ही राज्यमंडलावर अवलंबून असते.
४७ सन्धिविग्रहयोनिर्मण्डलः । तह किंवा लढाई यांचा उगम राजमंडलांत होतो.
४८ नीतिशास्त्रानुगो राजा । नीतिशास्त्राला अनुसरून वागणारा, तोच खरा राजा.
४९ अनन्तरप्रकृतिश्शत्रुः । आपल्या शेजारचा जो राजा तो आपला ( स्वाभाविक ) शत्रु.
५० एकान्तरितं मित्रमिष्यते । आपल्या शत्रूच्या पलिकडे ज्याचें राज्य असेल, तो आपला ( स्वाभाविक ) मित्र होतो.
५१ हेतुतश्शत्रुमित्रे भविष्यतः । शत्रुत्व किंवा मित्रत्व हें कांहीं तरी हेतूवरून ठरत असतें.
५२ हीयमानस्सन्धिं कुर्वीत । आपला पक्ष दुर्बल होऊं लागला कीं, सलोखा करावा.
५३ तेजो हि संधानहेतुस्तदर्थानाम् । सलोखा करावा अशी इच्छा करणाराच्या अंगीं तेज असेल, तर सलोखा घडून येतो.
५४ नातप्तलोहो लोहेन संधीयते । लोखंड तापल्या शिवाय दुसऱ्या लोखंडाशीं सांधतां येत नाहीं.
५५ बलवान् हीनेन विगृह्णीयात् । बलवानानें दुर्बळाशीं विग्रह करावा.
५६ न ज्यायसा समेन वा । आपल्या हून जो वरचा असेल किंवा जो समबल असेल, त्याच्याशीं विग्रह करूं नये.
५७ गजपादयुद्धमिव बलवद्विग्रहः । बलवानाशीं विग्रह करणें, हें पादचाऱ्यानें हत्तीशीं युद्ध करण्याप्रमाणें आहे.
५८ आमपात्रमामेन सह विनश्यति । कच्चें मडकें दुसऱ्या कच्च्या मडक्यावर आपटलें तर त्या दोहोंचाहि नाश होतो.
५९ अरिप्रयत्नमभिसमीक्षेत । शत्रूच्या हालचालीवर नीट नजर ठेवावी.
६० संधायैकतो वा । हें कार्य एकट्यानें किंवा दुसऱ्या राजाशीं दोस्ती करून करावें.
६१ अमित्रविरोधादात्मरक्षामावसेत् । शत्रूनें विरोध मांडला तर आपल्या बचावाची तयारी असावी.
६२ शक्तिहीनो बलवन्तमाश्रयेत् । दुर्बल राजानें बलवंताचा आश्रय करावा.
६३ दुर्बलाश्रयो दुःखमावहति । दुर्बलाचा आश्रय केला असतां दुःखच प्राप्त होतें.
६४ अग्निवद्राजानमाश्रयेत् । राजाचा आश्रय करावयाचा, तो विस्तवाप्रमाणें त्याच्याशीं जपून करावा.

६५ राज्ञः प्रतिकूलं नाचरेत् । राजाच्या मर्जीविरुद्ध आचरण करूं नये.

६६ उद्धतवेषधरो न भवेत् । राजाच्या समोर डामडौलाचा पोशाख करूं नये.

६७ न देवचरितं चरेत् । राजासारखें आचरण आपण करण्याच्या नादीं लागूं नये.

६८ द्वयोरपीर्ष्यतोः द्वैधीभावं कुर्वीत । ज्या दोन राजांत एकमेकांशीं चढाओढ चालू असेल त्यांच्यांत कलह पेटवून द्यावा.

६९ न व्यसनपरस्य कार्यावाप्तिः । व्यसनांत गुंग होऊन जाणाऱ्या माणसाकडून कार्यसिद्धि होत नाहीं.

७० इन्द्रियवशवर्ती चतुरङ्गवानपि विनश्यति । जो राजा इंद्रियांचा गुलाम बनला, त्याजवळ चतुरंगसेना असली, तरी त्याचा नाश होतो.

७१ नास्ति कार्यं द्यूतप्रवृत्तस्य । जो द्यूताच्या नादीं लागला, त्याच्या हातून कोणतेंहि कार्य होत नाहीं.

७२ मृगयापरस्य धर्मार्थौ विनश्यतः । जो शिकारीच्या नादीं लागला, तो धर्म व अर्थ ह्या दोन्ही पुरुषार्थांस मुकतो.

७३ अर्थेषणा न व्यसनेषु गण्यते । अर्थ प्राप्तीची इच्छा मनांत बाळगणें, हें व्यसन नव्हे.

७४ न कामासक्तस्य कार्यानुष्ठानम् । जो कामासक्त झाला, त्याच्या हातून कार्य तडीस जात नाहीं.

७५ अग्निदाहादपि विशिष्टं वाक्पारुष्यम् । कठोर वाक्य हें अग्नीच्या चटक्याहून अधिक तापदायक आहे.

७६ दण्डपारुष्यात्सर्वजनद्वेष्यो भवति । कठोर शासनानें राजा सर्व लोकांच्या द्वेषाला पात्र होतो.

७७ अर्थतोषिणं श्रीः परित्यजति । अर्थप्राप्तीनें संतुष्ट होणाऱ्या माणसाचा लक्ष्मी त्याग करते.

७८ अमित्रो दण्डनीत्यामायत्तः । शत्रु दंडनीतीनेंच स्वाधीन ठेवितां येतो.

७९ दण्डनीतिमधितिष्ठन् प्रजास्संरक्षति । दंडनीतीचा अवलंब करून राजा प्रजेचें संरक्षण करितो.

८० दण्डस्संपदा योजयति । दंडनीति संपत्ति मिळवून देते.

८१ दण्डाभावे मन्त्रिवर्गाभावः । दंडनीतीच्या अभावीं मंत्रिवर्गाचाहि अभाव होतो.

८२ न दण्डादकार्याणिकुर्वन्ति । दंडाचा धाक आहे म्हणूनच लोक पापकर्में करींत नाहींत.

८३ दण्डनीत्यामायत्तमात्मरक्षणम् । आत्मसंरक्षण हेंहि दंडनीतीवर अवलंबून आहे.

८४ आत्मनि रक्षिते सर्वं रक्षितं भवति । आत्मसंरक्षण झालें तर इतर सर्व वस्तूंचें रक्षण होतें.

८५ आत्मायत्तौ वृद्धिविनाशौ । आपला उत्कर्ष किंवा अपकर्ष आपल्याच स्वाधीन आहे.

८६ दण्डो हि विज्ञाने प्रणीयते । दंडाचा उपयोग शास्त्रानुसार करावा.

८७ दुर्बलोपि राजा नावमन्तव्यः । राजा दुर्बल असला तरी त्याचा अपमान करूं नये.

८८ नास्त्यग्नेर्दौर्बल्यम् । अग्नि केव्हांहि दुर्बल आहे असें म्हणतांच येत नाहीं.

८९ दण्डे प्रतीयते वृत्तिः । लोकांचे सर्व व्यवसाय दंडामुळेंच योग्यपणें चालतात.

९० वृत्तिमूलमर्थलाभः । व्यवसाय असेल तरच अर्थप्राप्ति होते.

९१ अर्थमूलौ धर्मकामौ । धर्म व काम हे अर्थावर अवलंबून आहेत.

९२ अर्थमूलं कार्यम् । कोणतेंहि कार्य अर्थावर अवलंबून असतें.

९३ यदल्पप्रयत्नात्कार्यसिद्धिर्भवति । संपत्तिवानाची कार्यसिद्धि अल्पश्रमानें होऊं शकते.

९४ उपायपूर्वं न दुष्करं स्यात् । योग्य उपायपूर्वक कार्य केलें असतां कोणतेंहि कार्य दुष्कर नाहीं.

९५ अनुपायपूर्वं कार्यं कृतमपि नश्यति । योग्य तजवीज आगाऊ न करितां कार्य केलें तरी तें नासतें.

९६ कार्यार्थिनामुपाय एव सहायः । कार्य करण्याची इच्छा करणाऱ्याला उपाय हाच साहाय्यक आहे.

९७ कार्यं पुरुषकारेण लक्ष्यं संपद्यते । प्रयत्नानें केलेलें कार्य शेवटास जातें.

९८ पुरुषकारमनुवर्तते दैवम् । प्रयत्नाच्या पाठोपाठ दैव येतें.

९९ दैवं विनाऽतिप्रयत्नं करोति यत्तद्विफलम् । दैवाच्या अनुकूलतेविना अतिप्रयत्न करून देखील तो विफल होतो.

१०० असमाहितस्य वृत्तिर्न विद्यते। ज्याचें चित्त ठिकाणावर नाहीं, त्याला पोटाचा उद्योगहि साधत नाहीं.
१०१ पूर्वं निश्चित्य पश्चात्कार्यमारभेत्। आधीं विचारपूर्वक निश्चय ठरवून मग कार्याला प्रारंभ करावा. ×
१०२ कार्यान्तरे दीर्घसूत्रता न कर्तव्या। कार्य हातीं घेतल्यावर त्यांत चेंगटपणा करूं नये. २ ३५.
१०३ न चलचित्तस्य कार्यावाप्तिः। चंचल वृत्तीच्या मनुष्याकडून कोणतेंहि कार्य तडीस जाऊं शकत नाहीं.
१०४ हस्तगतावमाननात्कार्यव्यतिक्रमो भवति। जें हस्तगत झालें त्यांचा अवमान केल्यानें कार्यांचा नाश होतो.
१०५ दोषवर्जितानि कार्याणि दुर्लभानि। दोषरहित अशीं कार्यें दुर्मिळ.
१०६ दुरनुबन्धं कार्यं नारभेत। ज्याचा परिणाम वाईट होणार, असलें कार्य आरंभूंच नये.
१०७ कालवित् कार्यं साधयेत्। जो योग्यकाल जाणतो, तोच आपलें कार्य साधील.
१०८ कालातिक्रमात्काल एव फलं पिबति। कालातिक्रम केला असतां काळच कार्याचें फळ खाऊन टाकतो.
१०९ क्षणं प्रति कालविक्षेपं न कुर्यात्सर्वकृत्येषु। कोणत्याहि कार्यांत एक क्षणभर देखील दिरंगाई करूं नये.
११० देशफलविभागौ ज्ञात्वा कार्यमारभेत। देशकालपरिस्थिति जाणून कोणत्याहि कार्याला आरंभ करावा.
१११ दैवहीनं कार्यं सुसाध्यमपि दुस्साध्यं भवति। दैव अनुकूल नसलें म्हणजे सोपें कार्यहि दुःसाध्य होऊन बसतें.
११२ नीतिज्ञो देशकालौ परीक्षेत। नीतिज्ञ पुरुषानें देशकालपरिस्थिति यांची योग्य पारख करून ठेवावी.
११३ परीक्ष्यकारिणि श्रीश्चिरं तिष्ठति। विचारपूर्वक कार्य करणाऱ्याजवळ लक्ष्मी चिरकाल राहते.
११४ सर्वाश्च संपदः सर्वोपायेन परिग्रहेत्। हरएक उपाय करून सर्व प्रकारची संपत्ति वश करून ठेवावी.
११५ भाग्यवन्तमपरीक्ष्यकारिणं श्रीः परित्यजति। जो देशकालपरिस्थिति जाणत नाहीं, तो भाग्यवान् असला तरी लक्ष्मी त्याला सोडून जाते.
११६ ज्ञानानुमानैश्च परीक्षा कर्तव्या। प्रत्यक्ष ज्ञान व अनुमान ह्या दोन साधनांनीं कार्यांची परीक्षा करावी.
११७ यो यस्मिन् कर्मणि कुशलस्तं तस्मिन्नेव योजयेत्। जो ज्या कामांत निपुण असेल, त्या कामावरच त्याची योजना करावी.
११८ दुस्साध्यमपि सुसाध्यं करोत्युपायज्ञः। जो योग्य उपाय जाणतो, तो दुःसाध्य कार्यहि सुसाध्य करितो.
११९ अज्ञानिना कृतमपि न बहुमन्तव्यम्। मूर्खानें एखादें कार्य केलें तरी त्याला नसतें महत्व देऊं नये.
१२० याद‍ृच्छिकत्वात् कृमिरपि रूपान्तराणि करोति। यदृच्छेनें कीटकसुद्धां कांहींतरी मूर्ती घडवून आणितो.
१२१ सिद्धस्यैव कार्यस्य प्रकाशनं कर्तव्यम्। जें कार्य शेवटास गेलें, त्याचीच परिस्फुटता करावी.
१२२ ज्ञानवतामपि दैवमानुषदोषात्कार्याणि दुष्यन्ति। शहाण्या माणसाचें कार्य देखील दैवी व मानवी दोषांमुळें बिघडतें.
१२३ दैवं शान्तिकर्मणा प्रतिषेद्धव्यम्। दैवाची प्रतिकूलता शांतिकर्मानें दूर करावी.
१२४ मानुषीं कार्यविपत्तिं कौशलेन विनिवारयेत्। मानवी प्रतिकूलता कौशल्यानें दूर करावी.
१२५ कार्यविपत्तौ दोषान् वर्णयन्ति बालिशाः। काम बिघडलें म्हणजे बालिश लोक त्या कार्यांतील दोषांचा पाढा वाचूं लागतात.
१२६ कार्यार्थिना दाक्षिण्यं न कर्तव्यम्। ज्याला कार्य साधावयाचें आहे त्यानें भिडस्तपणाच्या नादीं लागूं नये.
१२७ क्षीरार्थी वत्सो मातुरूधः प्रतिहन्ति। दूध पिणारें वासरूं आपल्या आईच्या कासेला ढोसे मारितें.
१२८ अप्रयत्नात्कार्यविपत्तिर्भवेत्। प्रयत्न सोडून दिला कीं, कार्यहानि होते.
१२९ न दैवप्रमाणानां कार्यसिद्धिः। जो दैवावर हवाला देऊन बसतो त्याची कार्यसिद्धि होत नाहीं.
१३० कार्यबाह्यो न पोषयत्याश्रितान्। ज्याला कांहीं कार्य राहिलें नाहीं, तो आश्रितांचें पोषण करण्याचा त्रास घेत नाहीं.
१३१ यः कार्यं न पश्यति सोऽन्धः। ज्याला आपलें कर्तव्य दिसत नाहीं, तो अंध म्हणावा.
१३२ प्रत्यक्षपरोक्षानुमानैः कार्याणि परीक्षेत। प्रत्यक्ष, परोक्ष व अनुमान या तीन प्रकारांनीं कार्यांचा विचार करावा.

१३३ **अपरीक्ष्यकारिणं श्रीः परित्यजति** । विचार न करितां जो कार्य करितो, त्याचा लक्ष्मी त्याग करिते.

१३४ **परीक्ष्य तार्या विपत्तिः** । विचार करून कार्य केल्यानें संकटांतून पार पडतां येतें.

१३५ **स्वशक्तिं ज्ञात्वा कार्यमारभेत** । आपली शक्ति ओळखून कार्याला हात घालावा.

१३६ **स्वजनं तर्पयित्वा यश्शेषभोजी सोऽमृतभोजी** । आपले सगळे आप्तजन तृप्त झाल्यावर शेष राहील त्यांत जो भोजन करितो, त्याला अमृतभोजी ( विघसाशी ) असें म्हणतात.

१३७ **सर्वानुष्ठानादायमुखानि वर्धन्ते** । सर्व अनुष्ठानांपासून लाभाची अभिवृद्धि होते.

१३८ **नास्ति भीरोः कार्यचिन्ता** । भित्र्या माणसाच्या मनांत कर्तव्याचा विचारच येत नाहीं.

१३९ **स्वामिनश्शीलं ज्ञात्वा कार्यार्थी कार्यं साधयेत्** । धन्याचा स्वभाव ओळखून कार्यसाधूनें आपले काम साधावें.

१४० **धेनोश्शीलज्ञः क्षीरं भुङ्क्ते** । ज्याला गाईची खोड माहीत असते त्याला त्या गाईचें दूध मिळतें.

१४१ **क्षुद्रे गुह्यप्रकाशनमात्मवान्न कुर्यात्** । समर्थानें क्षुद्र माणसाजवळ आपली गुप्त गोष्ट सांगूं नये.

१४२ **आश्रितैरप्यवमन्यते मृदुस्वभावः** । मृदु स्वभावाच्या माणसाचा अपमान आश्रित माणसें देखील करितात.

१४३ **तीक्ष्णदण्डस्सर्वैरुद्वेजनीयो भवति** । कठोर शिक्षा करणाऱ्याचा सर्वजण कंटाळा करितात.

१४४ **यथार्हदण्डकारी स्यात्** । राजानें गुन्ह्याच्या प्रमाणांत शासन करणारा असें व्हावें.

१४५ **अल्पसारं श्रुतवन्तमपि न बहुमन्यते लोकः** । पुष्कळ शिकलेला पण अंगांत सामर्थ्य नसलेला, अशा माणसाला कोणी मान देत नाहीं.

१४६ **अतिभारः पुरुषमवसादयति** । शक्तीबाहेर ओझें घेतलें कीं, मनुष्य खचून जातो.

१४७ **यस्संसदि परदोषं शंसति स स्वदोषबहुत्वं प्रख्यापयति** । सभेंत जो दुसऱ्याचे दोष सांगतो तो आपल्या अंगच्या अनेक दोषांचें प्रदर्शन करितो.

१४८ **आत्मानमेव नाशयत्यनात्मवतां कोपः** । दुबळ्यांचा कोप आत्मनाशालाच कारण होतो.

१४९ **नास्त्यप्राप्यं सत्ववताम्** । बलवानाला अप्राप्य असें कांहींच नाहीं.

१५० **साहसेन न कार्यसिद्धिर्भवति** । साहसानें कार्यसिद्धि होत नाहीं.

१५१ **व्यसनार्तो विस्मरत्यप्रवेशेन** । व्यसनाधीन मनुष्यानें कोणतीहि गोष्ट वेळच्यावेळीं लिहून न ठेवल्यानें तो ती विसरून जातो.

१५२ **नास्त्यनन्तरायः कालविक्षेपे** । दिवसगत लावली कीं विघ्नें हीं ठेवलेलींच.

१५३ **असंशयविनाशात्संशयविनाशश्श्रेयान्** । निःसंशय विनाशापेक्षां संशयित विनाश पत्करला.

१५४ **अपरधनानि निक्षेप्तुः केवलं स्वार्थम्** । दुसऱ्याचें द्रव्य तिसऱ्याकडे गहाण टाकणें ही स्वार्थीपणाची परमावधी होय.

१५५ **दानं धर्मः** । दान हाच धर्म.

१५६ **नार्यागतोऽर्थवद्विपरीतोऽनर्थभावः** । सज्जनांना संपत्ति मिळाल्यानें जितकें संकट वाटतें, तितकें दारिद्र्य आल्यानें संकट वाटत नाहीं.

१५७ **यो धर्मार्थौ न विवर्धयति स कामः** । जो धर्म व अर्थ यांची अभिवृद्धि होऊं देत नाहीं, तो काम.

१५८ **तद्विपरीतोऽनर्थसेवी** । जो धर्म व अर्थ यांच्या विरुद्ध वागतो तो आपणावर अनर्थ ओढवून घेतो.

१५९ **ऋजुस्वभावपरो जनेषु दुर्लभः** । सरळ स्वभावाचीं माणसें दुर्मिळच असतात.

१६० **अवमानेनागतमैश्वर्यमवमन्यते साधुः** । अपमानानें प्राप्त झालेल्या ऐश्वर्याला साधुपुरुष तुच्छ मानितात.

१६१ **बहूनपि गुणानेकदोषो ग्रसति** । एक जरी दोष असला, तरी तो अनेक गुणांचें मातेरें करून टाकतो.

१६२ **महात्मना परेण साहसं न कर्तव्यम्** । महात्म्याशीं कोणीहि भलत्यानें साहस करूं नये.

१६३ **कदाचिदपि चारित्रं न लङ्घयेत्** । मनुष्यानें केव्हांहि सदाचाराचें उल्लंघन करूं नये,

१६४ क्षुधाऽऽर्तो न तृणं चरति सिंहः। सिंह भुकेला तरी गवत खात नाहीं.
१६५ प्राणादपि प्रत्ययो रक्षितव्यः। आपल्या प्राणापेक्षांहि आपल्या वचनाला अधिक जपावें.
१६६ पिशुनश्श्रोता पुत्रदारैरपि त्यज्यते। हलक्या कानाच्या माणसाचा बायकामुलेंसुद्धां त्याग करितात.
१६७ बालादप्यर्थजातं शृणुयात्। हिताची गोष्ट लहान मुलाकडून देखील ऐकून घ्यावी.
१६८ सत्यमप्यश्रद्धेयं न वदेत्। जिच्यावर विश्वास बसणार नाहीं अशी गोष्ट खरी असली तरी बोलूं नये.
१६९ नाल्पदोषाद्बहुगुणास्त्यज्यन्ते। थोड्याशा दोषामुळें पुष्कळ गुणांचा त्याग करूं नये.
१७० विपश्चित्स्वपि सुलभा दोषाः। शहाण्या माणसाच्या अंगींदेखील दोष सहज सांपडतात.
१७१ नास्ति रत्नमखण्डितम्। ज्याला कोठेंहि खाचखोंच नाहीं असें रत्न दुर्मिळ.
१७२ मर्यादातीतं न कदाचिदपि विश्वसेत्। कोणावरहि मर्यादेबाहेर विश्वास ठेवूं नये.
१७३ अप्रिये कृतं प्रियमपि द्वेष्यं भवति। अप्रिय मनुष्यानें केलेलें सत्कृत्यहि त्याज्य वाटतें.
१७४ नमन्त्यपि तुलाकोटिः कूपोदकक्षयं करोति। पाणी वर काढण्याच्या यंत्राची दांडी खालीं वांकली तरी ती विहिरींतल्या पाण्याचा फडशा पाडिते.
१७५ सतां मतं नातिक्रमेत्। साधूंच्या मताचा अव्हेर करूं नये.
१७६ गुणवदाश्रयान्निर्गुणोपि गुणी भवति। गुणवन्ताच्या सहवासानें निर्गुणी मनुष्य देखील गुणी बनतो.
१७७ क्षीराश्रितं जलं क्षीरमेव भवति। दुधांत मिसळलेलें पाणी दूधच होतें.
१७८ मृत्पिण्डोपि पाटलिगन्धमुत्पादयति। मातीला देखील पाटलि पुष्पाच्या सहवासानें सुगंध प्राप्त होतो.
१७९ रजतं कनकसंगात्कनकं भवति। सोन्याच्या संसर्गानें रुपें देखील सोनें बनतें.
१८० उपकर्तर्यपकर्तुमिच्छत्यबुधः। मूर्ख मनुष्य उपकारकरणाऱ्यालाच अपाय करूं इच्छितो.
१८१ न पापकर्मणामाक्रोशभयम्। पापी माणसांना जननिंदेची पर्वा वाटत नाहीं.
१८२ उत्साहवतां शत्रवोऽपि वशीभवन्ति। उत्साही माणसांना शत्रूदेखील वश होतात.
१८३ विक्रमधना राजानः। पराक्रम हेंच राजांचें धन होय.
१८४ नास्त्यलसस्यैहिकामुष्मिकम्। आळशी माणसाला ऐहिक सुख नाहीं व पारलौकिक सुखहि नाहीं.
१८५ निरुत्साहाद्दैवं पतति। निरुत्साहामुळें चांगलें नशीब देखील निरुपयोगी होतें.
१८६ मत्स्यार्थीव जलमुपयुज्यार्थं गृह्णीयात्। मासे धरूं इच्छिणारा कोळी ज्याप्रमाणें पाण्याला योग्य वाट लावून मासे पकडतो, त्याप्रमाणें मनुष्यानें आपलें कार्य साधावें.
१८७ अविश्वस्तेषु विश्वासो न कर्तव्यः। जे विश्वासाला अपात्र असतील त्यांच्यावर विश्वास ठेवूंनये.
१८८ विषं विषमेव सार्वकालम्। विष हें सदोदित विषच असणार.
१८९ अर्थसमादाने वैरिणां सङ्ग एव न कर्तव्यः। आपलें कार्य साधण्याचा प्रयत्न करीत असतां वैऱ्याशीं कसलाहि संबंध ठेवूं नये.
१९० अर्थसिद्धौ वैरिणं न विश्वसेत्। शत्रूकडून आपल्या कार्याची सिद्धि होईल असें कधीं मानूं नये.
१९१ अर्थाधीन एव नियतसंबन्धः। कायमचा संबंध उद्देशावर अवलंबून असतो.
१९२ शत्रोरपि सुतस्सखा रक्षितव्यः। शत्रूचा मुलगा मित्र झाल्यास त्याचेंहि रक्षण करावें.
१९३ यावच्छत्रोश्छिद्रं पश्यति तावद्धस्तेन वा स्कन्धेन वा वाह्यः। शत्रूचें मर्मस्थान समजून येई-पर्यंत त्याला हाताखांद्यावर फेलून धरावा.
१९४ शत्रुं छिद्रे परिहरेत्। शत्रूचें मर्मस्थान दिसतांच त्यावर घाव घालावा.
१९५ आत्मच्छिद्रं न प्रकाशयेत्। आपलें मर्म प्रकट करूं नये.
१९६ छिद्रप्रहारिणश्शत्रवः। शत्रू हे मर्मावर घाव घालणारच.
१९७ हस्तगतमपि शत्रुं न विश्वसेत्। शत्रू दीन होऊन स्वाधीन झाला तरी त्याच्यावर विश्वास ठेवूं नये.
१९८ स्वजनस्य दुर्वृत्तं निवारयेत्। स्वजनांच्या ठिकाणीं दुर्गुण दिसून आल्यास त्याचें निवारण करावें.

१९९ स्वजनावमनोपि मनस्विनां दुःखमावहति । स्वपक्षीयांनीं अपमान केला तरी मानी माणसांना दुःख होतें.
२०० एकाङ्गदोषः पुरुषमवसादयति । शरीराच्या कोठल्याहि भागांत दोष उत्पन्न झाला तरी त्यानें मनुष्य खचून जातो.
२०१ शत्रुं जयति सुवृत्तता । सदाचरणानें शत्रू जिंकला जातो.
२०२ निकृतिप्रिया नीचाः । नीच माणसांना दुष्कृत्यांचीच आवड असते.
२०३ नीचस्य मतिर्न दातव्या । नीचांना शिकविण्याच्या भरीस पडूं नये.
२०४ तेषु विश्वासो न कर्तव्यः । नीच लोकांवर विश्वास ठेवूं नये.
२०५ सुपूजितोपि दुर्जनः पीडयत्येव । दुर्जनाचा कितीहि सन्मान केला तरी तो ताप देणारच.
२०६ चन्दनादीनपि दावाऽग्निर्दहत्येव । दावाग्नि चंदनाची देखील झाडें जाळतोच.
२०७ कदाऽपि पुरुषं नावमन्येत । केव्हांहि कोणत्याहि माणसाचा अपमान करूं नये.
२०८ क्षन्तव्यमिति पुरुषं न बाधेत । क्षमा करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून, कोणाहि माणसाला पीडा देऊं नये.
२०९ भर्त्राऽधिकं रहस्युक्तं वक्तुमिच्छन्त्यबुद्धयः । मूर्ख लोक धन्यानें सांगितलेली गुप्त गोष्ट बाहेर फोडण्याची इच्छा करितात.
२१० अनुरागस्तु फलेन सूच्यते । कृतीवरून मनांतलें प्रेम दर्शविलें जातें.
२११ आज्ञाफलमैश्वर्यम् । आपली आज्ञा सर्वांकडून मानली जाणें हेंच ऐश्वर्याचें लक्षण आहे.
२१२ दातव्यमपि बालिशः परिक्लेशेन दास्यति । अवश्य द्यावयाची गोष्ट देखील मूर्ख मनुष्य मोठ्या कष्टानें देतो.
× २१३ महदैश्वर्यं प्राप्याप्यधृतिमान् विनश्यति । मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें तरी देखील ज्याला धीर नाहीं, त्याचा नाश होतो.
उ.र.२. २१४ नास्त्यधृतेरैहिकामुष्मिकम् । ज्याला धीर नाहीं त्याला इहलोक नाहीं व परलोकहि नाहीं.
२१५ न दुर्जनैस्सह संसर्गः कर्तव्यः । दुर्जनांच्या बरोबर सहवास करूंनये.
२१६ शौण्डहस्तगतं पयोप्यवमन्येत । दारू विकणाऱ्याच्या हातीं दूध असलें तरी तें कोणी स्वीकारणार नाहीं.
२१७ कार्यसंकटेष्वर्थव्यवसायिनी बुद्धिः । संकटाचे वेळीं जी बुद्धि स्थिर राहते तीच खरी बुद्धि.
२१८ मितभोजनं स्वास्थ्यम् । मित आहार म्हणजे शरीरस्वास्थ्य.
२१९ पथ्यमप्यपथ्याजीर्णे नाश्नीयात् । अपथ्य केल्यानें अजीर्ण झालें असतां पथ्यकर पदार्थहि खाऊं नयेत.
२२० जीर्णभोजिनं व्याधिर्नोपसर्पति । पहिलें पचल्यावर मगच जो दुसऱ्यांदा खातो त्याच्या वाऱ्यासहि रोग उभा राहूं शकत नाहीं.
२२१ जीर्णशरीरे वर्धमानं व्याधिं नोपेक्षेत । शरीर क्षीण झालें असतां वाढणाऱ्या रोगाची उपेक्षा करूं नये.
२२२ अजीर्णे भोजनं दुःखम् । अजीर्ण झालें असतां भोजन दुःखप्रद होतें.
२२३ शत्रोरपि विशिष्यते व्याधिः । शत्रूपेक्षां देखील व्याधि अधिक तापदायक होतो.
२२४ दानं निधानमनुगामि । दान हें संचयावर अवलंबून असतें.
२२५ पटुतरे तृष्णापरे सुलभमतिसन्धानम् । ज्याला अत्यंत हांव असते त्याला फसविणें अगदीं सोपें असतें.
२२६ तृष्णया मतिश्छाद्यते । लोभामुळें बुद्धीवर आवरण पडतें.
२२७ कार्यबहुत्वे बहुफलमायातिकं कुर्यात् । अनेक कामें आलीं असतां ज्यापासून पुष्कळ व दीर्घकालिक फलनिष्पत्ति होणार असेल, तें कार्य आधीं करावें.
२२८ स्वयमेवावस्कन्नं कार्यं निरीक्षेत । बिघडलेल्या कार्याची आपण स्वतः देखरेख करावी.
२२९ मूर्खेषु साहसं नियतम् । मूर्ख मनुष्यांच्या ठायीं साहस निश्चितपणें असतें.

२३० मूर्खेषु विवादो न कर्तव्यः । मूर्खांशीं वादविवाद करूं नये.
२३१ मूर्खेषु मूर्खवत्कथयेत् । मूर्ख लोकांशीं मूर्खाप्रमाणेंच बोलावें.
२३१ आयसैरायसं छेद्यम् । लोखंडानेंच लोखंडाचा छेद करतां येतो.
२३३ नास्त्यधीमतस्सखा । बुद्धिहीनाला कोणीहि मित्र असत नाहीं.
२३४ धर्मेण धार्यते लोकः । सर्व जग धर्मानें धारण केलें जातें.
२३५ प्रेतमपि धर्माधर्मावनुगच्छतः । धर्म आणि अधर्म हे मरणोत्तरहि माणसाच्या बरोबर जातात.
२३६ दया धर्मस्य जन्मभूमिः । दया हें धर्माचें मूलस्थान आहे.
२३७ धर्ममूले सत्यदाने । सत्य आणि दान हींहि धर्मावर अवलंबून आहेत.
२३८ धर्मेण जयति लोकान् । धर्मानेंच सर्व लोक जिंकतां येतात.
२३९ मृत्युरपि धर्मिष्ठं रक्षति । मृत्यूसुद्धां धर्मिष्ठ माणसाचें रक्षण करतो.
२४० धर्माद्विपरीतं पापं यत्रयत्र प्रसज्यते तत्र धर्मावमतिर्महती प्रसज्यते । जेथें धर्माविरुद्ध पापाचरण होत असतें तेथें धर्माविषयीं अगदींच अनादर दिसून येतो.
२४१ उपस्थितविनाशानां प्रकृतिकारेण लक्ष्यते । ज्यांचा नाश जवळ आला आहे त्यांची स्वाभाविक स्थिति चर्येवरूनसुद्धां समजते.
२४२ आत्मविनाशं सूचयत्यधर्मबुद्धिः । अधर्माकडे बुद्धीचा ओढा दिसूं लागला कीं नाशकाल जवळ आला असें समजावें.
२४३ पिशुनवादिनोऽरहस्यम् । चहाडखोराचे जवळ कोणचीहि गुप्त गोष्ट गुप्त राहात नाहीं.
२४४ पररहस्यं नैव श्रोतव्यम् । दुसऱ्याची गुप्त गोष्ट कधींहि ऐकत बसूं नये.
२४५ वल्लभस्य कारकत्वमधर्मयुक्तम् । राजाच्या मर्जीतल्या लोकांची प्रेरणा अधर्मयुक्त असते.
२४६ स्वजनेष्वतिक्रमो न कर्तव्यः आपल्याच लोकांची अमर्यादा करूं नये.
२४७ माताऽपि दुष्टा त्याज्या । आईसुद्धां दुष्ट असेल तर तिचा त्याग करावा.
२४८ स्वहस्तोपि विषदिग्धश्छेद्यः । आपला हात झाला तरी तो विषयुक्त झाल्यास कापूनच काढावा लागतो.
२४९ परोपि च हितो बन्धुः । परका मनुष्य असला तरी तो हितकर्ता असल्यास, त्यास बंधूच समजावें.
२५० कक्षादप्यौषधं गृह्यते । गवतापासून देखील औषध काढण्यांत येतें.
२५१ नास्ति चोरेषु विश्वासः । चोरांच्यावर विश्वास ठेवूं नये.
२५१ अप्रतीकारेष्वनादरो न कर्तव्यः । जे प्रतीकार करीत नाहींत त्यांचा अनादर करूं नये.
२५३ व्यसनं मनागपि बाधते । व्यसन अल्प असलें तरी तें बाधतें.
२५४ अमरवदर्थजातमर्जयेत् । आपण अमर आहोंत असेंच जणूं कांहीं समजून संपत्ती मिळवीत जावी.
२५५ अर्थवान् सर्वलोकस्य बहुमतः । जो संपत्तिमान् तो सर्व लोकांना मान्य.
२५६ महेन्द्रमप्यर्थहीनं न बहुमन्यते लोकः । इंद्रदेखील संपत्तिहीन झाला तर त्यास कोणी मान देणार नाहीं.
२५७ दारिद्र्यं खलु पुरुषस्य जीवितं मरणम् । दारिद्र्य हें मनुष्याचें जिवंत मरण आहे.
२५८ विरूपोऽर्थवान् सुरूपः । श्रीमंत मनुष्य कुरूप असला तरी तो सुरूप मानला जातो.
२५९ अदातारमप्यर्थवन्तमर्थिनो न त्यजन्ति । धनवान मनुष्य कंजूष असला तरी याचक लोक त्याचा त्याग करीत नाहींत.
२६० अकुलीनोपि कुलीनाद्विशिष्टः । श्रीमंत मनुष्य कुलहीन असला तरी कुलीनापेक्षां तो श्रेष्ठ ठरतो.
२६१ नास्त्यमानभयमनार्यस्य । अनार्य माणसाला अपमानाचें भय वाटत नाहीं.
२६२ न चेतनवतां वृत्तिभयम् । ज्याच्या अंगांत पाणी आहे, त्याला पोट भरण्याची काळजी वाटत नाहीं.
२६३ न जितेन्द्रियाणां विषयभयम् । जो जितेंद्रिय आहे, त्याला विषयाचें भय वाटत नाहीं.

२६४ न कृतार्थानां मरणभयम् । जो कृतार्थ झाला आहे, त्याला मरणाची भीति नाहीं.

२६५ कस्यंचिदर्थं स्वमिव मन्यते साधुः । साधूलोक कोणाचेंहि कल्याण झालें तरी तें आपलेंच कल्याण मानतात.

२६६ परविभवेष्वादरो न कर्तव्यः । दुसऱ्याचे संपत्तीवर कधींहि दृष्टि ठेवूं नये.

२६७ परविभवेष्वादरोपि नाशमूलम् । दुसऱ्याचे संपत्तीवर दृष्टि ठेवणें हें देखील नाशाचें मूळ आहे.

२६८ पलालमपि परद्रव्य न हर्तव्यम् । दुसऱ्याच्या मालकीच्या गवताच्या काडीला देखील हात लावूं नये.

२६९ परद्रव्यापहरणमात्मद्रव्यनाशहेतुः । परक्याच्या द्रव्याचा अपहार करणें हें स्वतःच्या द्रव्यनाशाला कारण होतें.

२७० न चौर्यात्परं मृत्युपाशः । मृत्युपाश हा कांहीं चौर्याहून वेगळा नाहीं.

२७१ यवागूरपि प्राणधारणं करोति काले । प्रसंगविशेषीं पेज सुद्धां प्राणधारणास उपयोगी पडते.

२७२ न मृतस्यौषधं प्रयोजनम् । मेलेल्या माणसास औषधाची काय गरज ?

२७३ समकाले स्वयमपि प्रभुत्वस्य प्रयोजनं भवति । अनुकूल काल आला असतां स्वतःच मनुष्य ऐश्वर्य मिळविण्यास समर्थ होतो.

२७४ नीचस्य विद्याः पापकर्मणि योजयन्ति । नीच माणसाची विद्या त्याला पाप करावयाला लावते.

२७५ पयःपानमपि विषवर्धनं भुजङ्गस्य नामृतं स्यात् । सापाला दूध पाजलें तरी त्यापासून विषच उत्पन्न होतें. अमृत उत्पन्न होत नाहीं.

२७६ न हि धान्यसमो ह्यर्थः । धान्यासारखी दुसरी संपत्ति नाहीं.

२७७ न क्षुधासमश्शत्रुः । भुकेसारखा शत्रु नाहीं.

२७८ अकृतेर्नियता क्षुत् । जो कांहींच उद्योग करीत नाहीं, त्याला भूक पाठीस लागणारच.

२७९ नास्त्यभक्ष्यं क्षुधितस्य । भुकेलेल्यास अभक्ष्य असें कांहींच नसतें.

२८० इन्द्रियाणि जरावशं कुर्वन्ति । इंद्रियें मनुष्याला वृद्धत्व प्राप्त करून देतात.

२८१ सानुक्रोशं भर्तारमाजीवेत् । दयाळु धन्याची चाकरी करून उपजीविका करावी.

२८२ लुब्धसेवी पावकेच्छया खद्योतं धमति । कृपणाची सेवा करणारा अग्नीच्या इच्छेनें काजव्याला फुंकर घालितो.

२८३ विशेषज्ञं स्वामिनमाश्रयेत् । विवेकी धन्याचा आश्रय करावा.

२८४ पुरुषस्य मैथुनं जरा । मैथुनानें पुरुषाला वार्धक्य येतें.

२८५ स्त्रीणाममैथुनं जरा । मैथुनाभावानें स्त्रियांना वार्धक्य येतें.

२८६ न नीचोत्तमयोर्वैवाहः । नीच व उत्तम अशा विषम स्थितींतल्या स्त्रीपुरुषांचा विवाह होऊं नये.

२८७ अगम्यागमनादायुर्यशःपुण्यानि क्षीयन्ते । अगम्यागमन केलें असतां आयुष्य, यश व पुण्य यांचा क्षय होतो.

२८८ नास्त्यहङ्कारसमश्शत्रुः । अहंकारासारखा शत्रु नाहीं.

२८९ संसदि शत्रुं न परिक्रोशेत् । सभेमध्यें शत्रूविषयीं हाकाटी करूं नये.

२९० शत्रुव्यसनं श्रवणसुखम् । शत्रूवर संकट आलेलें गोड वाटतें.

२९१ अधनस्य बुद्धिर्न विद्यते । निर्धनाला बुद्धि नसते.

२९२ हितमप्यधनस्य वाक्यं न गृह्यते । निर्धनाचें वचन हितकर असलें तरी त्याचा कोणी स्वीकार करीत नाहीं.

२९३ अधनस्स्वभार्ययाऽप्यवमन्यते । निर्धनाला भार्येकडूनदेखील अपमान सोसावा लागतो.

२९४ पुष्पहीनं सहकारमपि नोपासते भ्रमराः । पुष्परहित अशा आंब्याच्या झाडावर भोंगे बसत नाहींत.

२९५ विद्या धनमधनानाम् । निर्धन मनुष्याला विद्या हेंच धन.

२९६ विद्या चोरैरपि न ग्राह्या। विद्या ही चोराकडूनसुद्धां चोरली जात नाहीं.
२९७ विद्यया ख्यापिता ख्यातिः। विद्येनें मिळालेली कीर्ति हीच खरी प्रख्याति.
२९८ यशश्शरीरं न विनश्यति। कीर्तिरूपी देह नाहींसा होत नाहीं.
२९९ यः परार्थमुपसर्पति स सत्पुरुषः। जो दुसऱ्याकरितां झटतो, तोच सत्पुरुष.
३०० इन्द्रियाणां प्रशमं शास्त्रम्। जें इंद्रियांचा उपशम करितें तें शास्त्र.
३०१ अशास्त्रकार्यवृत्तौ शास्त्राङ्कुशं निवारयति। शास्त्रविरुद्ध आचरण करण्याची प्रवृत्ति झाली असतां शास्त्ररूपी अंकुशच त्याचें निवारण करूं शकतो.
३०२ नीचस्य विद्या नोपेतव्या। नीच माणसाजवळची विद्या शिकूं नये.
३०३ म्लेच्छभाषणं न शिक्षेत। म्लेंच्छ भाषा शिकूं नये.
३०४ म्लेच्छानामपि सुवृत्तं ग्राह्यम्। म्लेंच्छांचेंदेखील सदाचरण असेल त्याचें ग्रहण करावें.
३०५ गुणे न मत्सरः कर्तव्यः। गुणाविषयीं मत्सरभाव बाळगूं नये.
३०६ शत्रोरपि सुगुणो ग्राह्यः। शत्रूचा देखील सद्गुण असेल तो घ्यावा.
३०७ विषादप्यमृतं ग्राह्यम्। विषापासूनहि अमृत ग्रहण करावें.
३०८ अवस्थया पुरुषस्संमान्यते। ज्या स्थितींत पुरुष असेल, त्या स्थितीप्रमाणें त्याला मान मिळतो.
३०९ स्थान एव नराः पूज्यन्ते। मनुष्य योग्य स्थानीं असेल तरच त्याला मान मिळतो.
३१० आर्यवृत्तमनुतिष्ठेत्। आर्यवृत्तीला अनुसरून आपलें आचरण ठेवावें.
३११ कदाऽपि मर्यादां नातिक्रमेत्। सदाचाराच्या मर्यादेचें केव्हांहि उल्लंघन करूं नये.
३१२ नास्त्यर्घः पुरुषरत्नस्य। पुरुषरूपी रत्नाची किंमत करतां येत नाहीं.
३१३ न स्त्रीरत्नसमं रत्नम्। स्त्रीरत्नासारखें दुसरें रत्न नाहीं.
३१४ सुदुर्लभं रत्नम्। रत्न हें दुर्मिळच असणार.
३१५ अयशो भयं भयेषु। सर्व भयांत अपकीर्तीचें भय मोठें.
३१६ नास्त्यलसस्य शास्त्राधिगमः। आळशाचा शास्त्रांत प्रवेश होऊं शकत नाहीं.
३१७ न स्त्रैणस्य स्वर्गाप्तिर्धर्मकृत्यं च। स्त्रैण मनुष्याच्या हातून धर्मकृत्यें घडत नाहींत व त्याला स्वर्गप्राप्तिहि होत नाहीं.
३१८ स्त्रियोपि स्त्रैणमवमन्यन्ते। स्त्रियांकडूनदेखील स्त्रैणाचा अपमान होतो.
३१९ न पुष्पार्थी सिञ्चति शुष्कतरुम्। फुलाची अपेक्षा करणारा वठलेल्या झाडाला पाणी घालीत नाहीं.
३२० अद्रव्यप्रयत्नो वालुकाक्काथनादनन्यः। द्रव्याशिवाय कोणताहि प्रयत्न, वाळूचा काढा करण्यासारखा निष्फळ होतो.
३२१ न महाजनहासः कर्तव्यः। थोर पुरुषांचा उपहास करूं नये.
३२२ कार्यसंपदं निमित्तानि सूचयन्ति। शुभ शकून कार्यसिद्धि सुचवितात.
३२३ नक्षत्रादपि निमित्तानि विशेषयन्ति। नक्षत्रापेक्षां शकुनांचें महत्त्व अधिक आहे.
३२४ न त्वरितस्य नक्षत्रपरीक्षा। ज्याला कामाची घाई आहे, त्यानें नक्षत्र पाहात बसूं नये.
३२५ परिचये दोषा न छाद्यन्ते। ओळखीच्या माणसापासून दोष लपून राहूं शकत नाहींत.
३२६ स्वयमशुद्धः परानाशङ्कते। जो स्वतः दुर्बुद्धीचा आहे, त्याला दुसऱ्याविषयीं शंका येते.
३२७ स्वभावो दुरतिक्रमः। स्वभावाचें अतिक्रमण करणें अशक्य.
३२८ अपराधानुरूपो दण्डः। अपराधाला अनुरूप अशी शिक्षा देण्यांत यावी.
३२९ कथानुरूपं प्रतिवचनम्। जसा प्रश्न असेल तसें उत्तर द्यावें.
३३० विभवानुरूपमाभरणम्। जशी ऐपत असेल तसे अलंकार धारण करावें.
३३१ कुलानुरूपं वृत्तम्। आपल्या कुळाला शोभेल असें वर्तन ठेवावें,

३३२ कार्यानुरूपः प्रयत्नः। कार्याच्या मानानें प्रयत्न करावा.
३३३ पात्रानुरूपं दानम्। याचकाच्या पात्रतेला अनुसरून दान द्यावें.
३३४ वयोऽनुरूपो वेषः। वयाला शोभेल असा वेष धारण करावा.
३३५ स्वाम्यनुकूलो भृत्यः। चाकरानें नेहमीं धन्याची मर्जी धरून वागावें.
३३६ भर्तृवशवर्तिनी भार्या। भार्येनें भर्त्याच्या मनाप्रमाणें वागावें.
३३७ गुरुवशानुवर्ती शिष्यः। शिष्यानें गुरूच्या आज्ञेप्रमाणें वागावें.
३३८ पितृवशानुवर्ती पुत्रः। पुत्रानें पित्याच्या आज्ञेप्रमाणें वर्तन ठेवावें.
३३९ अत्युपचारश्शङ्कितव्यः। अति आदरसत्कार होऊं लागल्यास शंका येऊं लागते.
३४० स्वामिनि कुपिते स्वामिनमेवानुवर्तेत। धनी रागावला असतां त्याच्याच मर्जीनुरूप वर्तन ठेवावें.
३४१ मातृताडितो वत्सो मातरमेवानुरोदिति। आईनें मुलास मारिलें तरी तें मूल आईजवळच रडत असतें.
३४२ स्नेहवतस्स्वल्पो हि रोषः। ज्याच्या मनांत स्नेहबुद्धि आहे, त्याच्या मनांत राग फारवेळ राहात नाहीं.
३४३ आत्मच्छिद्रं न पश्यति परच्छिद्रमेव पश्यति बालिशः। बालिश मनुष्य स्वतःचे दोष न पाहतां दुसऱ्याचे दोष पाहात असतो.
३४४ सोपचारः कैतवः। कपटी मनुष्य बाह्योपचारांत तत्पर असतो.
३४५ काम्यैर्विशेषैरुपचरणमुपचारः। हौसेसारख्या व दुर्मिळ वस्तु अर्पण करणें, ह्याच खरा उपचार होय.
३४६ चिरपरिचितानामत्युपचारश्शङ्कितव्यः। पुष्कळ दिवसांचा परिचय असला तरी अति शिष्टाचार शंकेला कारण होतो.
३४७ गौर्दुष्करा श्वसहस्रादेकाकिनी श्रेयसी। एकटी नाठाळ देखील गाय हजार कुत्र्यांहून बरी.
३४८ श्वोमयूरादद्यकपोतो वरः। उद्यां मिळणाऱ्या मोरापेक्षां आज मिळालेला कपोत अधिक बरा.
३४९ अतिसंगो दोषमुत्पादयति। अति परिचय दोष उत्पन्न करितो.
३५० सर्वं जयत्यक्रोधः। ज्यानें क्रोध टाकला, तो सर्व कांहीं जिंकूं शकेल.
३५१ यद्यपकारिणि कोपः कोपे कोप एव कर्तव्यः। आपल्यावर अपकार करणाऱ्याच्या मनांत कोप असेल तर आपणहि त्याच्यावर कोपच करावा.
३५२ मतिमत्सु मूर्खमित्रगुरुवल्लभेषु विवादो न कर्तव्यः। बुद्धिवानाशीं त्याचप्रमाणें मूर्खाशीं, मित्राशीं, गुरूशीं व आपल्या प्रियजनाशीं वादविवाद करूं नये.
३५३ नास्त्यपिशाचमैश्वर्यम्। घोरकर्माशिवाय ऐश्वर्य प्राप्त होत नाहीं.
३५४ नास्ति धनवतां सुकर्मसु श्रमः। श्रीमंतांना सत्कर्म करण्यांत श्रम पडत नाहींत.
३५५ नास्ति गतिश्रमो यानवताम्। ज्यांच्या घरीं वहान आहे त्यांना चालण्याचे श्रम पडत नाहींत.
३५६ अलोहमयं निगळं कलत्रम्। बायको ही बिनलोखंडाची बेडीच आहे.
३५७ यो यस्मिन् कुशलस्स तस्मिन् योक्तव्यः। जो ज्या कामांत कुशल असेल त्याला त्या कामावर नेमावें.
३५८ दुष्कलत्रं मनस्विनां शरीरकर्शनम्। दुष्ट पत्नीशीं गांठ पडली कीं, मानी माणसाचें शरीरशोषण होतें.
३५९ अप्रमत्तो दारान् निरीक्षेत। स्त्रियांवर दक्षतेनें नजर ठेवावी.
३६० स्त्रीषु किंचिदपि न विश्वसेत्। स्त्रियांवर किंचितहि विश्वास ठेवूं नये.
३६१ न समाधिः स्त्रीषु लोकज्ञता च। स्त्रियांचे ठिकाणीं मनःसमाधान किंवा जनपरीक्षा नसते.
३६२ गुरूणां माता गरीयसी। सर्व गुरूंमध्यें माता श्रेष्ठ समजावी.
३६३ सर्वावस्थासु माता भर्तव्या। कशीहि अवस्था प्राप्त झाली तरी मातेचें पोषण केलेंच पाहिजे.
३६४ वैरूप्यमलङ्कारेणाच्छाद्यते। शरीराचा कुरूपपणा अलंकारानें झांकतां येतो.
३६५ स्त्रीणां भूषणं लज्जा। विनय हें स्त्रियांचें भूषण.

३६६ विप्राणां भूषणं वेदः । वेदविद्या हें विप्राचें भूषण.
३६७ सर्वेषां भूषणं धर्मः । धर्म हें सर्वांचेंच भूषण आहे.
३६८ भूषणानां भूषणं सविनया विद्या । विनयशीलता असून विद्या असणें हें सर्व भूषणांचें भूषण आहे.
३६९ अनुपद्रवं देशमावसेत् । ज्या देशांत कसलाहि उपद्रव नाहीं, त्या देशांत वस्ती करावी.
३७० साधुजनबहुलो देशः । ज्यांत चांगल्या लोकांची बहुसंख्या असते त्यालाच देश असें म्हणतात.
३७१ राज्ञो भेतव्यं सार्वकालम् । राजाला नेहमीं भिऊन वागावें.
३७२ न राज्ञः परं दैवतम् । राजाहून श्रेष्ठ दुसरें दैवत नाहीं.
३७३ सुदूरमपि दहति राजवह्निः । राजरूपी वन्हि दूर अंतरावरचे पदार्थहि जाळूं शकतो !
३७४ रिक्तहस्तो न राजानमभिगच्छेत् । रिक्त हस्तानें राजदर्शनाला जाऊं नये.
३७५ गुरुं च दैवतं च । गुरु व देव यांच्याहि दर्शनाला तोच नियम लागू आहे.
३७६ कुटुम्बिनोऽभेतव्यम् । कुटुंबी माणसाची भीति बाळगण्याचें कारण नाहीं.
३७७ गन्तव्यं च सदा राजकुलम् । राजवाड्यांत जाण्या येण्याचा अवश्य परिपाठ ठेवावा.
३७८ राजपुरुषैस्संबन्धं कुर्यात् । अधिकारी पुरुषाशीं स्नेहसंबंध राखावा.
३७९ राजदासी न सेवितव्या । राजदासी सेवन करण्याला योग्य नव्हे.
३८० न चक्षुषाऽपि राजानं निरीक्षेत । राजाकडे वर डोळे करून धिटाईनें पाहूं नये.
३८१ पुत्रे गुणवति कुटुम्बिनः स्वर्गः । गुणवान् पुत्र असणें हा संसारी माणसाचा स्वर्ग होय.
३८१ पुत्रा विद्यानां पारं गमयितव्याः । पुत्रांना विद्येंत पारंगत करावें.
३८३ जनपदार्थं ग्रामं त्यजेत् । देशाकरितां एका गांवाचा त्याग करावा.
३८४ ग्रामार्थं कुटुम्बस्त्यज्यते । गांवाकरितां एका कुटुंबाचा त्याग करावा.
३८५ अतिलाभः पुत्रलाभः । पुत्रलाभ हा सर्वांत श्रेष्ठ लाभ होय.
३८६ दुर्गतेः पितरौ रक्षति स पुत्रः । दुर्गतीपासून मातापितरांचें जो रक्षण करतो तोच खरा पुत्र.
३८७ कुलं प्रख्यापयति पुत्रः । पुत्राच्याच योगानें कुलाचा नावलौकिक होतो.
३८८ नानपत्यस्य स्वर्गः । ज्याला अपत्य नाहीं, त्याला स्वर्ग नाहीं.
३८९ या प्रसूते साभार्या । जिला संतति होते तिलाच भार्या म्हणावें.
३९० तीर्थसमवाये पुत्रवतीमनुगच्छेत् । अनेक स्त्रिया एकाच काळीं ऋतुमती असतां जिला पुत्र होतात तिच्याशीं समागम करावा.
३९१ न तीर्थाभिगमनाद्ब्रह्मचर्यं नश्यति । ऋतुकालीं स्त्रीशीं गमन केल्यानें ब्रह्मचर्याचा नाश होत नाहीं.
×३९२ न परक्षेत्रे बीजं विनिक्षिपेत् । परक्षेत्राचे ठिकाणीं बीं पेरूं नये.
अ.५ ३९३ पुत्रार्था हि स्त्रियः । स्त्रिया ह्या पुत्रप्राप्तीकरतांच आहेत.
३९४ स्वदासी परिग्रहो हि स्वदासभावः । आपल्या दासीशीं समागम करणें म्हणजे स्वतः दास बनणें होय.
३९५ उपस्थितविनाशः पथ्यवाक्यं न शृणोति । ज्याचा विनाशकाल प्राप्त झाला त्याला त्याच्या हिताची गोष्ट रुचत नाहीं.
३९६ नास्ति देहिनां सुखदुःखाभावः । मनुष्याच्या पाठिमागें सुखदुःखें हीं सारखीं लागलींच आहेत.
३९७ मातरमिव वत्साः सुखदुःखानि कर्तारमेवानुगच्छन्ति । वांसरूं ज्याप्रमाणें आईला शोधून तिजकडे जातें त्याप्रमाणें सुखदुःखें हीं कर्त्यांला शोधून त्याजकडे जातात.
३९८ तिलमात्रमप्युपकारं शैलमात्रं मन्यते साधुः । साधू जो असतो तो तिळाएवढा उपकार पर्वताएवढा मानतो.
३९९ उपकारोऽनार्येष्वकर्तव्यः । दुष्ट माणसावर उपकार करूं नये.

४०० प्रत्युपकारभयादनार्यश्शत्रुर्भवति । दुष्ट माणसावर उपकार केल्यास, आपल्याला प्रत्युपकार करावा लागेल या भीतीनें, तो शत्रु होतो.

४०१ स्वल्पमप्युपकारकृते प्रत्युपकारं कर्तुमार्यो न स्वपिति । जो सज्जन असतो तो अत्यल्प उपकाराची देखील फेड केल्यावाचून झोंप घेत नाहीं.

४०२ न कदाऽपि देवताऽवमन्तव्या । देवतांचा केव्हांहि अपमान करूं नये.

४०३ न चक्षुषः समं ज्योतिरस्ति । डोळ्यांसारखें दुसरें तेज नाहीं.

४०४ चक्षुर्हि शरीरिणां नेता । डोळा ह्याच मनुष्यांचा मार्गदर्शक आहे.

४०५ अपचक्षुषः किं शरीरेण । आंधळ्याला देह असून नसून सारखाच.

४०६ नाप्सु मूत्रं कुर्यात् । पाण्यांत लघुशंका करूं नये.

४०७ न नग्नोजलं प्रविशेत् । नग्नस्थितींत पाण्यांत प्रवेश करूं नये.

४०८ यथा शरीरं तथा ज्ञानम् । जसा देह, तसें ज्ञान.

४०९ यथा बुद्धिस्तथा विभवः । जशी बुद्धि, तसें वैभव.

४१० अग्नावग्निं न निक्षिपेत् । आगींत आणखी आग भरीला घालूं नये.

४११ तपस्विनः पूजनीयाः । तपस्वी लोकांची पूजा अर्चा करावी.

४१२ परदारान् न गच्छेत् । परस्त्री गमन करूं नये.

४१३ अन्नदानं भ्रूणहत्यामपि मार्ष्टि । अन्नदानानें भ्रूणहत्येचेंहि पातक जातें.

४१४ न वेदबाह्यो धर्मः । वेदाला सोडून कांहीं धर्म नाहीं.

४१५ कदाचिदपि धर्मं निषेवेत । कसेंहि करून धर्माचें सेवन करावें.

४१६ स्वर्गं नयति सूनृतम् । सत्य भाषणानें स्वर्गप्राप्ति होते.

४१७ नास्ति सत्यात्परं तपः । सत्याहून श्रेष्ठ कोणतेंहि तप नाहीं.

४१८ सत्यं स्वर्गस्य साधनम् । सत्य हें स्वर्गाचें साधन आहे.

४१९ सत्येन धार्यते लोकः । सत्यानेंच समाजाचें धारण होतें.

४२० सत्याद्देवो वर्षति । सत्यामुळेंच पाऊस पडतो.

४२१ नानृतात्पातकं परम् । अनृतासारखें दुसरें पाप नाहीं.

४२२ न मीमांस्या गुरवः । गुरुजनांच्या वर्तनाची मीमांसा करीत बसूं नये.

४२३ खलत्वं नोपेयात् । दुष्टबुद्धि मनांत येऊं देऊं नये.

४२४ नास्ति खलस्य मित्रं । दुष्ट माणसाला कोणी मित्र मिळत नाहीं.

४२५ लोकया । दरिद्रं बाधते । लोक व्यवहार दरिद्री माणसाला जाचतो.

४२६ अतिशूरो दानशूरः । दानशूर हा सर्वांत शूर समजावा.

४२७ गुरुदेवब्राह्मणेषु भक्तिर्भूषणम् । गुरु, देव व ब्राह्मण यांचे ठिकाणीं भक्ति असणें हें भूषण होय.

४२८ सर्वस्य भूषणं विनयः । विनय हें सर्वांचेंच भूषण आहे.

४२९ अकुलीनोपि विनीतः कुलीनाद्विशिष्टः । हलक्या कुळांतला पण विनयसंपन्न पुरुष उचकुळांतल्या पण विनयहीन पुरुषापेक्षां श्रेष्ठ.

४३० आचारादायुर्वर्धते कीर्तिश्च । सदाचारानें आयुष्य व कीर्ति हीं वाढतात.

४३१ प्रियमप्यहितं न वक्तव्यम् । प्रिय परंतु अपथ्यकारक असें भाषण बोलूं नये.

४३२ बहुजनविरुद्धमेकं नानुवर्तेत । बहुजनांचें मत सोडून एकट्याच्याच मतास अनुसरूं नये.

४३३ न दुर्जनेषु भागधेयः कर्तव्यः । दुर्जन माणसाशीं भागीदारी करूं नये.

४३४ न कृतार्थेषु नीचेषु सम्बन्धः । कृतार्थ झालेल्या नीच माणसाशी संबंध ठेवूं नये.

४३५ ऋणशत्रुव्याधिष्वशेषः कर्तव्यः । ऋण, शत्रु व व्याधि-ह्यांचा लवमात्र शेष ठेवूं नये.

४३६ भृत्याऽनुवर्तनं पुरुषस्य रसायनम् । कल्याणप्रद अशा मार्गानें वागणें हेंच रसायन होय.

४३७ नार्थिष्ववज्ञा कार्या । याचकांची अवज्ञा करूं नये.

४३८ दुष्करं कर्म कारयित्वा कर्तारमवमन्यते नीचः । नीच पुरुष दुसऱ्याकडून दुष्कर असें काम करवून मग त्याचा तिरस्कार करितो.

४३९ नाकृतज्ञस्य नरकान्निवर्तनम् । कृतघ्न माणसाची नरकापासून सुटका नाहीं.

४४० जिह्वायत्तौ वृद्धिविनाशौ । भरभराट किंवा नाश हीं दोन्हीहि जिभेच्या आधीन आहेत.

४४१ विषामृतयोराकरी जिह्वा । जीभ ही विषाची व अमृताचीहि खाण आहे.

४४२ प्रियवादिनो न शत्रुः । जो मनासारखें बोलणारा असतो, त्याला कोणी शत्रु असत नाहीं.

४४३ स्तुता अपि देवतास्तुष्यन्ति । स्तुति केली असतां देवतादेखील संतुष्ट होतात.

४४४ अनृतमपि दुर्वचनं चिरं तिष्ठति । एखाद्यासंबंधीं केलेलें वाईट भाषण खोटें असलें तरी दीर्घकाल राहतें.

४४५ राजद्विष्टं न च वक्तव्यम् । राजाला अप्रिय असें भाषण बोलूं नये.

४४६ श्रुतिसुखात् कोकिलालापात्तुष्यन्ति । कोकिळेचे आलाप कानांला गोड लागतात म्हणून त्यापासून लोकांना संतोष वाटतो.

४४७ स्वधर्महेतुस्सत्पुरुषः । जो स्वधर्माप्रमाणें वागतो, तो सत्पुरुष.

४४८ नास्त्यर्थिनो गौरवम् । याचकांना मोठेपणा कधीं येत नाहीं.

४४९ स्त्रीणां भूषणं सौभाग्यम् । सौभाग्य हें स्त्रियांचें भूषण.

४५० शत्रोरपि न पतनीया वृत्तिः । शत्रुच्या देखील वृत्तीचा नाश करूं नये.

४५१ अप्रयत्नोदकं क्षेत्रम् । ज्या ठिकाणीं परिश्रमाशिवाय पाणी मिळतें तेंच शेत उत्तम.

४५२ एरण्डमवलम्ब्य कुञ्जरं न कोपयेत् । एरंडाच्या झाडाचा आश्रय करून हत्तीला चिडवूं नये.

४५३ अतिप्रवृद्धा शाल्मली वारणस्तम्भो न भवति । शेवरीचें झाड कितीहि वाढलें तरी तें हत्ती बांधण्याला योग्य होत नाहीं.

४५४ अतिदीर्घोपि कर्णिकारो न मुसली । धोतऱ्याचें झाड कितीहि मोठें झालें तरी त्याचें लाकूड मुसळाला उपयोगी पडत नाहीं.

४५५ अतिदीप्तोपि खद्योतो न पावकः । काजवा कितीहि चमकला तरी तो विस्तवाचें काम करीत नाहीं.

४५६ न प्रवृद्धत्वं गुणहेतुः । केवळ वयानें किंवा आकारानें मोठा झाल्यानें अंगांत गुण येत नाहींत.

४५७ सुजीर्णोपि पिचुमन्दो न शङ्कुलायते । लिंबाचें झाड कितीहि जुनें झालें तरी तें चाकूनें कापतां येत नाहीं.

४५८ यथा बीजं तथा निष्पत्तिः । जसें बीज तसा अंकुर.

४५९ यथा श्रुतं तथा बुद्धिः । जशी विद्या तशी बुद्धि.

४६० यथा कुलं तथाऽऽचारः । जसें कुल तसा आचार.

४६१ संस्कृतः पिचुमन्दो न सहकारी भवति । लिंबाच्या झाडाला कितीहि संस्कार केले तरी तें आंब्याचें झाड बनत नाहीं.

४६२ न चागत सुखं त्यजेत् । हातीं आलेलें सुख टाकूं नये.

४६३ स्वयमेव दुःखमधिगच्छति । दुःख आपोआपच आपल्याकडे येतें; तें शोधावें लागत नाहीं.

४६४ रात्रिचारणं न कुर्यात् । रात्रीच्या वेळीं भटकत हिंडूं नये.

४६५ न चार्धरात्रं स्वपेत् । सहा तासांहून अधिक वेळ निजूं नये.

४६६ तद्विद्वद्भिः परीक्षेत । निजण्याला योग्य वेळ कोणती हें शहाण्यांनीं ठरवावें.

४६७ परगृहमकारणतो न प्रविशेत् । कारणावांचून दुसऱ्याचे घरीं जाऊं नये.

४६८ ज्ञात्वाऽपि दोषमेव करोति लोकः । सदाचार माहीत असूनसुद्धां लोक दोषाचरण करितात.

४६९ शास्त्रप्रधाना लोकवृत्तिः । लोकांचें आचरण शास्त्राला प्राधान्य देणारें असावें.

४७० शास्त्राभावे शिष्टाचारमनुगच्छेत्‌ । जेथें शास्त्राचें वचन नसेल तेथें शिष्टाचाराप्रमाणें वागावें.
४७१ नाचरिताच्छास्त्रं गरीयः । आचरणापेक्षां शास्त्र श्रेष्ठ नाहीं.
४७२ दूरस्थमपि चारचक्षुः पश्यति राजा । हेरांच्या मार्फत राजा दूरच्या गोष्टीहि पाहूं शकतो.
४७३ गतानुगतिको लोकः । लोक हे गतानुगतिक असतात.
४७४ यमनुजीवेत्‌ तं नापवदेत्‌ । ज्यांचें अन्न आपण खातों त्यांची निंदा करूं नये.
४७५ तपस्सार इन्द्रियनिग्रहः । इन्द्रियनिग्रह हें तपाचें मर्म आहे.
४७६ दुर्लभःस्त्रीबन्धनान्मोक्षः । स्त्रियांचे बंधनापासून सुटका होणें कठीण.
४७७ स्त्री नाम सर्वाशुभानां क्षेत्रम्‌ । स्त्री ही सर्व अशुभ गोष्टींचें उत्पत्तिस्थान आहे.
४७८ न च स्त्रीणां पुरुषपरीक्षा । स्त्रियांना पुरुषांची परीक्षा नसते.
४७९ स्त्रीणां मनः क्षणिकम्‌ । स्त्रियांचें मन चंचल असतें.
४८० अशुभद्वेषिणः स्त्रीषु न प्रसक्ताः । ज्याला आपलें अकल्याण होऊं नयेसें वाटत असेल त्यानें स्त्रियांच्या ठायीं आसक्त होऊं नये.
४८१ यज्ञफलज्ञास्त्रिवेदविदः । ज्यांना यज्ञाचें फल समजलें त्यांना तीनहि वेदांचे ज्ञान झाल्याप्रमाणें आहे.
४८२ स्वर्गस्थानं न शाश्वतं यावत्पुण्यफलम्‌ । स्वर्गलोक हा शाश्वत नसून पुण्याई असेंपर्यंतच टिकणारा आहे.
४८३ न च स्वर्गपतनात्परं दुःखम्‌ । स्वर्गांतून खालीं येण्याइतकें मोठें दुःख दुसरें नाहीं.
४८४ देही देहं त्यक्त्वा ऐन्द्रपदं न वाञ्छति । प्राप्त झालेला देह टाकून देही प्रत्यक्ष इंद्रपदाचीहि इच्छा करीत नाहीं.
४८५ दुःखानामौषधं निर्वाणम्‌ । मोक्ष हें सर्व दुःखांवर औषध आहे.
४८६ अनार्यसंबन्धाद्वरमार्यशत्रुता । अनार्यांशीं स्नेह जोडण्यापेक्षां आर्यांशीं शत्रुत्व पुरवलें.
४८७ निहन्ति दुर्वचनं कुलम्‌ । दुष्टभाषणानें कुळाचा नाश होतो.
४८८ न पुत्रसंस्पर्शात्परं सुखम्‌ । पुत्रस्पर्शासारखें दुसरें सुख नाहीं.
४८९ विवादे धर्ममनुस्मरेत्‌ । न्यायनिवाडा करितांना धर्माची आठवण ठेवावी.
४९० निशान्ते कार्यं चिन्तयेत्‌ । पहाटेच्या वेळीं कार्याची योजना करावी.
४९१ प्रदोषे न संयोगः कर्तव्यः । प्रदोषकाळीं स्त्रीसंभोग करूं नये.
४९२ उपस्थितविनाशः दुर्नयं मन्यते । ज्याचा विनाशकाळ जवळ आला त्याला अनीतीचा मार्गच चांगला वाटूं लागतो.
४९३ क्षीरार्थिनः किं करिण्या । ज्याला दूध पाहिजे असेल, त्याला हत्तीण काय कामाची ?
४९४ न दानसमं वश्यम्‌ । दानासारिखें दुसरें वशीकरण नाहीं.
४९५ परायत्तेषूत्कण्ठां न कुर्यात्‌ । परस्वाधीन गोष्टीविषयीं अधीर होऊं नये.
४९६ असत्समृद्धिरसद्भिरेव भुज्यते । पापाच्या धनाचा उपभोग पाप्यांनाच आवडतो.
४९७ निम्बफलानि काकैर्भुज्यन्ते । कडूलिंबाचीं फळें कावळेच खातात.
४९८ नाम्भोधिस्तृष्णामपोहति । समुद्र कांहीं तहानेल्याची तहान भागवूं शकत नाहीं.
४९९ वालुका अपि स्वगुणमाश्रयन्ते । वाळूदेखील आपल्याला अनुरूप अशा गुणाचा आश्रय करितें.
५०० सन्तोऽसत्सु न रमन्ते । साधुलोकांना दुष्टांच्या संगतींत आनंद वाटत नाहीं.
५०१ हंसःप्रेतवने न रमते । हंसाला स्मशानभूमींत रहाणें आवडत नाहीं.
५०२ अर्थार्थं प्रवर्तते लोकः । लोक आपला मतलब साधण्याकरितां कार्याला प्रवृत्त होतात.
५०३ आशया बध्यते लोकः । सर्व लोक आशेनें बद्ध झालेले आहेत.
५०४ न चाशापरैश्श्रीस्सह तिष्ठति । जो आशारहित असतो त्याचेजवळ लक्ष्मी रहात नाहीं.
५०५ आशापरे न धैर्यम्‌ । ज्याला आशा नाहीं त्याला धैर्यहि नाहीं.

५०६ दैन्यान्मरणमुत्तमम् । दैन्यापेक्षां मरण चांगलें.

५०७ आशा लज्ज व्यपोहति । आशा ही माणसाला निर्लज्ज करते.

५०८ न मात्रा सह वासः कर्तव्यः । मातेच्याच सहवासांत नेहमीं राहूं नये.

५०९ आत्मा न स्तोतव्यः । आपली आपण स्तुति करूं नये.

५१० न दिवा स्वप्नं कुर्यात् । दिवसा झोंप घेऊं नये.

५११ न चासन्नमपि पश्यत्यैश्वर्यान्धः न शृणोतीष्टं वाक्यम् । संपत्तीची धुंदी आलेल्या माणसाला जवळचेंहि दिसत नाहीं व इष्ट गोष्ट सांगितली तरी ऐकूं येत नाहीं.

५१२ स्त्रीणां न भर्तुः परदैवतम् । स्त्रियांना भर्त्याहून अन्य दैवत नाहीं.

५१३ तदनुवर्तनमुभयसौख्यम् । भर्त्यांचे मनाप्रमाणें वागण्यांत उभयतांनाहि ( किंवा इहपरलोकांत ) सुख आहे.

५१४ अतिथिमभ्यागतं पूजयेद्यथाविधि । अतिथिअभ्यागतांची यथाविधि पूजा करावी.

५१५ नास्ति हव्यस्य व्याघातः । यज्ञांत अर्पण केलेली वस्तु फुकट जात नाहीं.

५१६ शत्रुर्मित्रवत्प्रतिभाति । बुद्धि मोहित झाली म्हणजे शत्रु मित्रासारखा वाटूं लागतो.

५१७ मृगतृष्णा जलवद्भाति । मृगजल खऱ्या पाण्याप्रमाणें वाटूं लागतें.

५१८ दुर्मेधसामसच्छास्त्रं मोहयति । ज्याची बुद्धि मोहित झाली त्यांना खोटें शास्त्र खरें वाटूं लागतें.

५१९ सत्संगः स्वर्गवासः । सत्संग हाच स्वर्गवास होय.

५२० आर्यः स्वमिव परं मन्यते । साधुपुरुष इतरांनाहि आपल्यासारखेंच मानतो.

५२१ रूपानुवर्ती गुणः । गुण हा रूपाला अनुसरून असतो.

५२२ यत्र सुखेन वर्तते तदेव स्थानम् । जेथें सुखानें राहतां येईल तेंच राहाण्याला योग्य स्थान.

५२३ विश्वासघातिनो न निष्कृतिः । विश्वासघातक्याला प्रायश्चित्त नाहीं.

५२४ दैवायत्तं न शोचेत् । दैवाधीन गोष्टीविषयीं शोक करूं नये.

५२५ आश्रितदुःखमात्मन इव मन्यते साधुः । आपल्या पदरच्या लोकांचें जें दुःख तें आपलेंच दुःख, असें साधु समजतो.

५२६ हृद्गतमाच्छाद्यान्यद्वदत्यनार्यः । जो अनार्य आहे तो खरें हृद्गत झांकून निराळेंच बोलत असतो.

५२७ बुद्धिहीनः पिशाचतुल्यः । जो बुद्धिहीन, तो पिशाचासारखा समजावा.

५२८ असहायः पथि न गच्छेत् । सोबत्याशिवाय प्रवास करूं नये.

५२९ पुत्रो न स्तोतव्यः । पुत्राची स्तुति करूं नये.

५३० स्वामी स्तोतव्योऽनुजीविभिः । नोकरानें आपल्या धन्याची स्तुति करावी.

५३१ धर्मकृत्येष्वपि स्वामिन एव घोषयेत् । आपल्या धर्मकृत्यांत सुद्धां आपल्या धन्याचेंच नांवाची घोषणा करावी.

५३२ राजाज्ञां नातिलङ्घयेत् । राजाच्या आज्ञेचें उल्लंघन करूं नये.

५३३ यथाऽऽज्ञप्तं तथा कुर्यात् । जसा हुकूम असेल, तशीच बजावणी करावी.

५३४ नास्ति बुद्धिमतां शत्रुः । बुद्धिवानाला कोणी शत्रु नसतो.

५३५ आत्मच्छिद्रं न प्रकाशयेत् । आपलें मर्म प्रगट करूं नये.

५३६ क्षमावानेव सर्वं साधयति । जो क्षमाशील असतो, त्याचीं सगळीं कार्यें साधतात.

५३७ आपदर्थं धनं रक्षेत् । संकटकालाकरितां द्रव्य राखून ठेवावें.

५३८ साहसवतां प्रियं कर्तव्यम् । ज्यानीं आपल्याकरितां धाडस केलें असेल, त्यांना आनंद होईल असें करावें.

५३९ श्वः कार्यमद्य कुर्वीत । उद्यांचें काम आजच करावें.

५४० आपराह्णिकं पूर्वाह्ण एव कर्तव्यम् । दोनप्रहरचें काम सकाळींच करावें.

५४१ व्यवहारानुलोमो धर्मः । धर्म हा व्यवहाराला धरून असला पाहिजे.
५४२ सर्वज्ञता लोकज्ञता । लोकांची खरी परीक्षा असणें म्हणजेच सर्वज्ञता.
५४३ शास्त्रज्ञोऽप्यलोकज्ञो मूर्खतुल्यः । जो शास्त्र जाणतो पण लोकपरीक्षा जाणत नाहीं तो मूर्खासारखा होय.
५४४ शास्त्रप्रयोजनं तत्त्वदर्शनम् । तत्त्व काय आहे हें सांगणें हाच शास्त्राचा हेतु.
५४५ तत्त्वज्ञानं कार्यमेव प्रकाशयति । तत्त्वज्ञान झालें म्हणजे आपलें कर्तव्य स्पष्ट दिसूं लागतें.
५४६ व्यवहारे पक्षपातो न कार्यः । न्यायाचे कामांत पक्षपात करूं नये.
५४७ धर्मादपि व्यवहारो गरीयान् । धर्मापेक्षाहि न्यायाचें काम अधिक महत्त्वाचें आहे.
५४८ आत्मा हि व्यवहारस्य साक्षी । न्यायाच्यां कामाला आत्मा हाच साक्षी.
५४९ सर्वसाक्षी ह्यात्मा । आत्मा हाच सर्वसाक्षी आहे.
५५० न स्यात्कूटसाक्षी । खोटी साक्ष देऊं नये.
५५१ कूटसाक्षिणो नरके पतन्ति । खोटी साक्ष देणारे नरकांत जातात.
५५२ प्रच्छन्नपापानां साक्षिणो महाभूतानि । गुप्तपणें केलेल्या पापाला पंचमहाभूतें हेच साक्षीदार.
५५३ आत्मनः पापमात्मैव प्रकाशयति । आपलें पाप आपणच उघडकीस आणतो.
५५४ व्यवहारेऽन्तर्गतमाकारस्सूचयति । न्यायाचे कामांत चेहऱ्यावरून मनांतलें इंगित प्रगट होतें.
५५५ आकारसंवरणं देवानामशक्यम् । मनांतील गोष्ट चेहऱ्यावर दिसूं न देणें देवांनाहि अशक्य आहे.
५५६ चोरराजपुरुषेभ्यो वित्तं रक्षेत् । चोर व सरकारी अधिकारी यांचे पासून धनाचें रक्षण करावें.
५५७ दुर्दर्शना हि राजानः प्रजा नाशयन्ति । ज्या राजाचें प्रजेला दर्शनसुद्धां दुर्लभ होतें, ते राजे प्रजेचा नाश करितात.
५५८ सुदर्शना हि राजानः प्रजा रञ्जयन्ति । ज्यांचें दर्शन प्रजेला सुलभ असतें, ते राजे प्रजेला आनंद देतात.
५५९ न्याययुक्तं राजानं मातरं मन्यन्ते प्रजाः । न्यायी राजाला प्रजाजन माबाप समजतात.
५६० तादृशस्स राजा इह सुखं ततः स्वर्गमाप्नोति । अशा प्रकारचा राजा येथें सुख व पुढें स्वर्ग प्राप्त करून घेतो.
५६१ अहिंसालक्षणो धर्मः । अहिंसा हें धर्माचें लक्षण आहे.
५६२ स्वशरीरमपि परशरीरं मन्यते साधुः । आपलें शरीरदेखील लोकांकारितां आहे असें साधु समजतो.
५६३ मांसभक्षणमयुक्तं सर्वेषाम् । मांसभक्षण हें सर्वांनाच अयुक्त आहे.
५६४ न संसारभयं ज्ञानवताम् । जो ज्ञानी झाला त्याला संसाराचें भय नाहीं.
५६५ विज्ञानदीपेन संसारभयं निवर्तते । विज्ञानरूपी दिव्यानें संसाराचें भय नाहीसें होतें.
५६६ सर्वमनित्यं भवति । सर्व गोष्टी अनित्य वाटूं लागतात.
५६७ कृमिशकृन्मूत्रभाजनं शरीरं पुण्यपापजन्महेतुः । कृमि, विष्ठा, मूत्र यांचें स्थान असें हें शरीर पुण्यपापाला कारण होतें.
५६८ जन्ममरणादिषु दुःखमेव ।जन्म व मरण हीं दुःखमयच होत.
५६९ तपसः स्वर्गमाप्नोति । तपाच्या योगानें स्वर्गप्राप्ति होते.
५७० क्षमायुक्तस्य तपो विवर्धते । जो क्षमायुक्त आहे, त्याच्या तपाची वृद्धि होते.
× ५७१ तस्मात्सर्वेषां कार्यसिद्धिर्भवति । तपामुळेंच सर्वांची कार्यसिद्धि होते.

॥ इति चाणक्यसूत्राणि ॥

# कौटिलीय अर्थशास्त्रांतील विषयांची सूचि.

## पूर्वार्ध—भाग.

### अ.



### आ.

## ल.



## व.

# कौटिलीय अर्थशास्त्रांतील विषयांची सूचि.

## उत्तरार्ध–भाग.

ल



व

# कौटलीय अर्थशास्त्रांतील विशिष्टार्थक कठिण शब्दांचा कोश.

अंसपथः—स्थलमार्ग.
अकान्तिः—कळाहीनपणा.
अकृत्य—फितूर न होणारा.
अक्षपटलं—हिशेबाची कचेरी.
अक्षशाला—हिशेबाची कचेरी.
अक्षीबः—समुद्रांतील मीठ.
अग्निजीवी—लोहार.
अणिद्वारं—दिंडी.
अतिनयनं—हद्दीपलीकडे नेणें.
अत्ययः—द्रव्यदंड.
अतिसन्धिः—फसवणूक.
अत्याहित—अतिधाडशी.
अत्याहारित—ज्याच्यापासून अतिशय द्रव्य उकळलें आहे असा.
अद्वैध्यः—वेगळा न होणारा
अधिकरणी—हत्यारें
अनुपातः—पाठलाग करणारी मंडळी
अनुलासः—मधली मोकळी जागा
अन्तर्धिः—बफरस्टेटचा राजा
अन्वाधिः—कायदेशीर पालक
अपराजिता—दुर्गादेवी
अपसर्पः—गुप्तहेर
अपवर्तकः—एकप्रकारचा हार
अपहृत—अफरातफर झालेला; गिळलेला
अप्रणीतः—उपयोगांत न आणलेला
अप्रतिहतः—विष्णु
अप्रार्थनीयः—ज्याच्या जवळ मीड चालत नाहीं असा; ज्याच्यावर हात टाकणें योग्य नव्हे असा.
अभियास्यत्कर्म—चाल करून जाणें
अभिषेकः—स्नान
अरत्निः—मुंडा हात
अरला—द्यूत खेळण्याचा कातड्याचा पट
अरिष्टः—कडूनिंब

अर्थोपधा—लांच घेण्यासंबंधाची परीक्षा
अवगूर्णं—शस्त्र उगारून आंगावर जाणें
अवघाटकं—मोत्यांचा एक दागिना
अवरुद्धः—अटकेंत ठेवलेला
अवस्कंदः—शौचकूप
असंमोषः—चिकाटी; दृढनिश्चय
असक्तपृषतं—ठिपके नसलेला
अस्थितुत्थं—हाडाची भुकटी
आक्रन्दः—पिछाडीचा मित्र राजा
आणिः—गाडीच्या चाकाची खीळ
आधानगतिकः—विविध गति जाणणारा
आन्तरवत्यं—कामरूप देशांतल्या आन्तरवती नदीकांठीं होणारें चंदनाचे वृक्ष
आन्वीक्षिकी—तर्कशास्त्र; न्यायशास्त्र
आपमित्यकं—परत देण्याच्या बोलीनें आणलेलें धान्य.
आभीक्ष्ण्यश्रवणं—पुनः पुनः पठन करणें.
आम्भीयाः—आम्भाचार्यांचे अनुयायी
आरालिक—हलवाई
आलकन्दकं—अलकंद नांवाच्या देशांत होणारें
आवापः—शिलकी सैन्य
आवेशनिनः—कारागीर
आसारः—मदतीला येणारें सैन्य
आस्तरकः—फरास
आहिछत्रकं—एकजातीचा हिरा
आहितकः—द्रव्य देऊन करारबंद केलेले नोकर
इन्द्रच्छंदः—१००८ सर असलेला हार
इन्द्रवानकं—हिऱ्याची एक जात
ईक्षणिकः—हेर
उच्चिदिङ्गः—खेंकडा
उत्सेचकः—नावेंतील पाणी काढून टाकणारा
उदञ्जरं—पाण्याचा हौद

उदास्थित—भ्रष्टसंन्यासी हेर
उपकण्ठी—पोकळ दांडीचा तराजू
उपजाप—चिथावणी
उपधा—सच्चेपणाची कसोटी
उपयुक्तः—नेमणूक झालेला वरीष्ठ कामगार
उपरिनिबन्धः—खोडाबेडी
उपवादः—टोंचून बोलणें
उपशीर्षकं—एकप्रकारचा हार
उपस्कंदनं—अडखळून पाडविण्याचें साधन
उपस्करः—खाण्यापिण्याचे जिन्नस
उपस्थानं—आगाऊ घेतलेलें उत्पन्न
उपस्थायुकः—माहुत
उरस्यं—व्यूहाचा मध्यभाग
उल्लोपिका—एक खाद्य पदार्थ
उष्ट्री—मातीचें मडकें
ऊरुवेष्टः—कोलदांडा
एकांगवधः—शरीराच्या एकाद्या अवयवास इजा
औद्राः—उद्रनामक जलचर प्राण्यांचीं चामडीं
औपवेणुकः—मंडलांत गरकन फिरण्याची घोड्याची चाल
औरभ्रकं—टक्कर देणाऱ्या एडक्यासारिखें
कक्षौ—व्यूहाच्या पिछाडीचीं दोन टोकें.
कटभंगमुष्टिः—कडधान्याची मूठ
कटवानकं—पडदा
कटशर्करा—खडीसाखर
कणकुण्डकं—भूस; कोंडा
कण्टकारः—शाल्मली वृक्ष
कण्डोली—रौळी.
कन्याप्रकर्म—कन्येला बिघडविणें.
कपालसन्धिः—सर्वस्वी घातक असा तह

कपिशीर्षकः–रस्त्याच्या कडेला बसविलेले हद्दीचे दगड.
करटं–कृमियुक्त.
करटकमुखं–कातरीचा सांधा.
करमर्दः–करवंद
कर्मनिषद्या–कारखाने.
कर्मसंवत्सर–हिशेबी कामाचें वर्ष.
कलमितिका–हत्तीच्या पाठीवरची झूल.
कलाय पुष्पकः–कलाय पुष्पाच्या रंगाचें
कल्पना–हत्तीचे शृंगार
कल्यः–ज्यांत संकट नाहीं असा लाभ
कशेरुकं–एक जातीचें गवत
काकणिक–दोन गुंजा वजनाचें
काक्षीवः–गोपीचंदन ;तुरटी
काचं–लवाडी
कान्तनामकं–कान्त नामक देशांत मिळणारें कातडें
काम्बुकं–कम्बु पर्वतांत सांपडणारें (रुपें)
कारुकर्म–शिल्पकर्म; कारागिरी
कार्मारिकः–तोमर
कालशारिवा–भद्रा नांवाची काळ्या रंगाची एक वनस्पति
कार्वटिकं–खार्वटिक–( २०० गांवांमध्यें मुख्य असें तालुक्याचें ठिकाण
कासीसं–मोरचूद; हिराकस
किलाटः–ताक
कुप्यं–जंगलांतील कच्चा माल
कुरुम्बः–नारिंगी रंगाचें
कुलत्थाः–कुळीथ
कुल्याः–तळघरें; भुयारें
कुशिक्या–पारडीं कमी अधिक असलेला तराजू
कृकणः–पारवा
कृकलासः–सरडा
कृत्यपक्षः–फितूर होण्याजोगा जनसमूह
केवलकः–गुराख्याची घोंगडी
कैडर्यः–घाणेरा करंज; कढीनिंब
कोठः–लाल
कोल–लिंबू, ( कागदी ); बोर
कोशातकी–एक वनस्पति
कौटः–एक प्रकारचें रत्न
कौपीनदर्शनं–नग्न हिंडणें
कौलेयं–कुला नांवाच्या नदींत उत्पन्न झालेलें मोतीं
कौष्ठेयकं–झाडांचें उत्पन्न
क्रमुकः–सुपारी, रोठा
क्रयिमं–वाढीच्या बोलीनें ठेवून घेतलेलें धान्य
क्षीरपकः–पांढऱ्या रंगाचें एक रत्न
क्षुद्रकं–सोन्याचे पोकळ किंवा भरीव मणी तयार करणें
क्षुद्रा–रिंगणी; एक वनस्पति
क्षेमं–मिळालेल्याचें रक्षण
क्षौद्रं–मेण
खंजनः–पाणथळ जमीन
खंजरीटः–ताजवा पक्षी
खंडसंघात्यं–अनेक तुकडे एकत्र जोडून केलेलें कापड
खनकयोधिनः–खंदकांतून लढणारे
खरकं–खरवडलेलें
खरपट्टः–लोखंडाचा पत्रा ( कैद्याच्या गळ्यांतला
खारकीटः–क्षारभूमींतील एक किडा
गंडिका–झाडांचीं खोडें; खल; ठोकळा.
गंडूपदः–गांडूळ
गर्भधान्यं–पेरलेलें ( पण न उगवलेलें ) धान्य
गर्भिणिका–स्थूलमध्या
गाणनिक्य–हिशेबतपासणी; खानेसुमारी मोजदाद
गिलः–आमिष
गुरुसमुत्थं–चेंगट; कामास झटपट न लागणारा
गृष्टिः–बोरीचें झाड
गृहपतिक व्यंजनः–शेतकऱ्याचे स्वरूपांतला हेर
गोजी–गोजिव्हा नांवाची वनस्पति
गोमारिका–एकप्रकारची औषधी
गोमूत्रकः–गाईच्या मूत्राच्या रंगाचा
गोमूत्रिका–एक वनस्पति; गवत
गोमेदकः–एक रत्न
गोशीर्षकं–गोरोचन; पीतचंदन
गौडिकं–गौडदेशांतलें
ग्रामभृतकः–गांवांतील किरकोळ नोकर
ग्रामेरुकं–एक प्रकारचें चंदन
घुणजग्धं– किड्यांनीं पोखरलेलें
घोटमुखः–अवंतीच्या राजपुत्राचा अध्यापक
चंक्रान्तः–सैन्याची पिछाडी
चक्रिचतुष्पदं–गाड्या व पखालीचीं जनावरें
चतुरश्रिका–चौकोनी आसन (लोकरीचें)
चंद्र चित्रा–चामड्याची एक जात
चंद्रोत्तरा– „ „
चाक्रवालिकं–एका विशिष्ट देशांतील रुपें
चातुरन्तः–समुद्रवलयांकित पृथ्वीचा अधिपति
चापकुक्षिः–धनुष्याकृति व्यूहाची बगल
चापपक्षः–धनुष्याकृति व्यूहाची बाजू
चारकः–दिवाणी तुरुंग
चारायणः–मगध देशांतला एक मंत्री
चार्यं–आचरण
चित्रभोगं–अनेक तऱ्हांनीं उपयोगी पडणारा मित्र
चित्रमेकः–ठिपक्याचा बेडूक
चिङ्गिटं–चिंबूड
चिमियः–एक प्रकारचें वेत
चीनसी एक जातीचें कातडें
चुंचुवालुका–बारीक वाळू
चेलं–कपडे
चैत्यं–देऊळ; पूजेचें स्थान; समाधि
चोचं–दालचिनी
चोरप्रसंग–चोराच्या बंदोबस्ताकरितां घ्यावयाचा कर
चोररज्जुकः–चोरांचा बंदोबस्त ठेवणारा कामगार—
चोररज्जुः–चोर पकडणाऱ्यांना द्यावयाचा मुशाहिरा

चौर्णेयं–चूर्णा नदींत उत्पन्न झालेलें मोतीं
छंदिका–खासगी खर्चाकरितां दिलेली रक्कम ( पॉकेट मनी )
छंदोविचितिः–छंदःशास्त्र
छायानालिका प्रतोदः–राजास वेळेची इषारत देण्याचीं साधनें
जघनाभिघातः–पिछाडीवर हल्ला
जंघाकरिकः–जासूद
जंभकविद्या–वशीकरण विद्या
जयन्तः–कार्तिक स्वामी
जरायुः–गर्भाचें वेष्टण, वार
जानुभंजनी–घातक शस्त्र
जांबवाभः–जांभळाच्या रंगाचे
जावकं–जावक देशांतलें चंदन
जीवकः–जैन भिक्षुक
जीवन्ती–एक वनस्पति
जोंगकं–एक प्रकारचें चंदन
जोंगनी–सांडस
ज्योतीरसकः–एकजातीचें रत्न
झषास्यः–मत्स्यमुखासारखा व्यूह
डमरः–दंगा; युद्ध
तगरः–एक वनस्पति
तरल प्रतिबंधं–मोत्याचा एक प्रकारचा हार
तर्कुः–सुताची चाती
तर्कुभ्रामी–किरणांचें परावर्तन करणारा ( हिरा )
तालिच्छकं–धावळी
तादात्विकः–हातातोंडाशीं गांठ असणारा; उत्पन्न व खर्च बरोबर असणारा
तारं–रजत; रुपें
तार्णसं–एका जातीचें चंदन
तार्याघं–नावेंत बसून टाळतां येण्याजोगा
तालमूलं–ताडाच्या मुळाच्या आकाराचें
तिंदुकः–टेंमुरणी
तीक्ष्णः–तीक्ष्ण संज्ञक हेर
तीर्थकरः–यात्रेकरू; प्रतिग्रह घेणारा
तीर्थग्रहणं–पाणवठ्याची जागा हस्तगत करणें
तीर्थघातः–क्षेत्राचे ठिकाणीं गुन्हा करणारा
तीर्थाभिग्रहः–उताराची वाट अडविणें
तुत्थोद्गतं–तुत्थ पर्वतांत सांपडलेलें
तुलामानपौतवं–वजनें व मापें यांची परीक्षा
तुलोत्सेधः–तुळईची लांबी; खांबाची उंची
तुवरी–एक वनस्पति
तूर्यफेला–वाघाची पेटी
तृतीयसारं–बलानें तिसऱ्या दर्जाचें, कनिष्ठ
तेजनतैलं–तेजाब
तेजनाग्निः–अग्नीसारखीं चकाकणारीं द्रव्यें
तोत्रोपवाह्यः–अंकुशाच्या मारानें चालणारा ( हत्ती )
तौरूपं–काळसर लाल असें चंदन
त्यक्तात्मा–जिवावर उदार झालेला
त्रपु–कथील
त्रपुसं–कथील
त्रिशूल प्रकरः–एक प्रकारचें शस्त्र
दंडखेदी–दंड देतां देतां टेकीसआलेला
दंडमंडल व्यूहः–दंडाकार व वर्तुलाकार व्यूह रचना
दंडसंधिः–सैन्य मदतीला देण्याच्या अटीवर तह
दन्ती–जैपाळ
दन्तशः–आंबट; चिंच; कवठ
दरणहीना–कांटे नसलेलीं
दशकुली–दहा दहा कुळें एकत्र राहणारी अशी वस्ती
दशवर्गाधिपतयः–दहा दहा सैनिकांवरील नाईक
दशवर्गिकः–पुरोहितादि दहा अधिकारी
दांडकर्मिकं–गुप्तशिक्षा
दारः–तटाला पडलेलें खिंडार; खाच खळगा
दारकगर्भः–डुकराच्या गर्भावरील वार
दिवायामं–रात्रंदिवस
दुर्विद्धं–भलतीकडे भोंक पाडलेलें
दुहिलिका–केसाळ
दूतप्रावर्तिमं–परराष्ट्रांतील वकिलातीचा खर्च
दूषीविषं–एक प्रकारची वनस्पति
दूष्यः–राजद्रोहाचा संशय आलेला मनुष्य
दृढकः–एक प्रकारचा व्यूह
दृतिः–बुधला, पखाल, लोहाराचा भाता, कातड्यानें मढविलेला टोकरा
देयविसर्गः–येणें असलेल्या रकमेची सूट
देयात्यादानं–नियमाहून अधिक वसूल घेणें
देवच्छंदः–एक प्रकारचा मोत्याचा दागिना
देवदंडः–बुरुजावर ठेवलेला खिळे रोवलेला दंड
देवपथः–गुप्तरस्ता; भुयार
देवरात्रिः–हरिजागर; रात्रीचें भजन
देवसरः–पाणी कधीं न आटणारें सरोवर
देशलौल्यं–देशोदेशीं भटकणारा
देशावस्थापनं–देशासंबंधीं विचार
देशोपनतसन्धिः–जमिनीचें उत्पन्न देऊन केलेला तह
दोंगकं–एक जातीचें चंदन
द्रवन्ती–एक वनस्पति, उंदीरकानी
द्रोणमुखं–एक प्रकारची व्यूह रचना
द्वैराज्यं–दुहेरी राजांचा अम्मल
धरकः–वजन करणारा कांटेवाला
धरणं–सोळामासे वजनाचें माप
धर्मविजयी–धर्मानें युद्ध व संधि करणारा
धर्मावसथी–धर्मशाळेवरील अधिकारी
धर्मोपधा–धार्मिक कसोटी लावून परीक्षा
धान्यकान्तं–धान्याचें पीक येणारी जमीन
धान्वनं–मरुप्रदेश; वाळवंट, मरुदुर्ग
धामार्गवः–आघाडा
धारयिष्णुः–स्मरणाचा धड
नक्तमालः–करंज
नक्तमाललता–करंजलता
नक्षत्रमाला–एका प्रकारचा दागिना
नडः–देवनल

नंदकः—आनंददायक
नलतूला—एकप्रकारचें कातडें
नलाधानं—देवनळानें युक्त
नस्तः प्रयोगः—नस्यप्रयोग
नागपर्वतकम्—नागपर्वतावरील
नागरकः—नगररक्षक
नागरायणं—वेशीवर टक्कर मारणें
नादेयाः—नदीकांठचे
नारोष्ट्रः—निशाणीप्रमाणें हालचाल करणारा हत्ती
नालिः—फुंकणी
नाली—नळी, मूस
निगूढोपहितः—गुप्तपणें राहिलेले हेर
निधातृकः—खजीनदार
निधायकः—खजीनदार
निम्नयोधिनः—तळघाटांतून लढणारे
निरस्त्वातिनी—न उखळणारी
निर्मालिका—निर्माल्य
निशान्तप्रणिधिः—राजवाड्याची रचना
निष्वारः—संचारास प्रतिबंध
निःशर्करा—खडे, वाळू, माती नसलेली.
निष्करः—निकर; जोराचा हल्ला, घातक मारा
निसृष्टार्थः—पूर्ण अधिकार दिलेला दूत
निसृष्टिलेखः—अधिकारदान किंवा संमतिदर्शक लेख
निसृष्टिस्थापना—आपला अधिकार दुसऱ्यास देण्याची क्रिया.
नीप्रं—घराचें छप्पर
नीलावलीयः—नीलरेखा असलेला
नीवी—शिल्लक; रोकड
नैत्रं—नेतृत्व; राजनीतीचें धोरण
नैषेचनिकं—मृताच्या प्रीत्यर्थ वाटलेलें पान
न्यंगं—शारीरिक व्यंग
पक्षौ—व्यूहाच्या अघाडीचीं दोन टोकें
पंचकुली—पांच कुळें एकत्र राहतात अशी जमीन
पंचकुष्ठम्—कुड्याच्या पाळ्याचीं पान, मूल फल इत्यादि
पंचांगः—पांच अंगें असणारा ( मंत्र )
पंचालिकं—खिळे ठोकलेली फळी
पण्यसंपातः—विक्रीचा माल एकत्र करणें
परमिश्रा—जींत शत्रू व मित्र एकत्र झाले आहेत अशी आपत्ति
परावापः—शत्रूचें शिल्की सैन्य
परिदान लेखः—दान देण्यासंबंधानें लेख
परिदेशः—दोन रज्जूंचा एक परिदेश ( लांबीचें माप )
परिपणित संधिः—अटी ठरवून केलेला तह
परिबंधः—बाजू; पक्ष संबंध
परिभाषणं—रागे भरणें; इषारा देणें
परिरयः—चौदा अंगुलांचें एक माप
परिवर्तकः—एका जातीचें धान्य घेऊन दुसरें धान्य देणारा
परिस्तोमः—एक प्रकारचें कांबळें
परिहापणं—उत्पन्न कमी करणें; खर्च वाढविणें
परिहारः—सूट
परिहार लेखः—सूट देण्याविषयीं आज्ञापत्र
परिहारोपहतः—सूट देऊन क्षीण झालेला
परूषकं—साखर लिंबू
पर्युपासनकर्म—वेढा घालून बसणें
पर्युषितायः—मागील सालची जमा; शिल्लक जमा.
पर्शुकास्थि—बरगडीचें हाड
पष्ठौही—बाळगर्भिणी; वयांत आलेली कालवड
पांडुकाली—करड्या रंगाची
पाण्ड्यकवाटकं—मलयकोटि पर्वतांत उत्पन्न झालेलें
पादगोपा—पादरक्षक; घोड्याची जोपासना करणारे
पानानुबंधः—मद्यपानाची चटक
पारंचिकं—मोडणें; खिळखिळे करणें
पारलौहित्यकं—ब्रह्मपुत्रा नदीपलीकडील देशांतलें चंदन
पारशमाः—खेचरें
पारिकर्मिकः—हत्तीची चाकरी करण्यांत कुशल नोकर
पारिपतन्तकः—व्यूहाचा एक प्रकार
पारिवेल्ली—वांकड्या दांडीचा तराजू
पारिहीणिकं—नुकसानभरपाईबद्दल दिलेलें
पारीक्षिकं—नाणें पारखण्याबद्दल फी
पार्ष्णिग्राहः—पिछाडीचा शत्रु
पार्ष्णिग्राहासारः—पिछाडीच्या शत्रूचा मित्र
पाशिक्यं—पाशिका नदींत उत्पन्न झालेलें
पिंकः—सोन्याच्या दागिन्यांत हिणकस घालून सोनें काढून घेणें
पिचुः—सरकी काढलेला कापूस
पिंछः—पीस; मोरपीस
पिंडारकः—म्हशी पाळणारे
पिंडीतकः—मरवा; गेळा
पिण्याकः—तेलाची पेंड
पीलु—कठिण कवचीचें एक फळ; अक्रोड
पीलुकः—अक्रोडासारखें लहान फळ
पुद्गलं—दागिने करावयाचें सोनें
पुनर्नवा—एक औषधी वनस्पति; घेंटुळी
पुलकः—मध्यभागीं काळसर असलेलें एक रत्न
पुष्पच्छिद्रः—ठिपके ठिपके असलेला
पुष्पवन्दाका—कण्हेरीच्या झाडावर होणारी वेली
पूतिकरंजाः—घाण येणाऱ्या करंजाच्या बिया
पूतिकिट्टः—काजळ
पूतिकीटः—पाद्राकिडा
पूतितैलं—घाणेरें तेल; करंजाचें तेल
पृश्निपर्णी—पिठवण नांवाची वनस्पति
पौत्रीपोत्तलिका—वस्त्राची घडी; चिंध्यांची बाहुली
पौरव्यावहारिकः—नगराधिकारी; नगराध्यक्ष
प्रकीर्णिका—सैन्याच्या मिश्र हालचाली
प्रकृष्ट भौमं—विजिगीषूच्या राज्यापासून अगदीं दूर असलेल्या भूमीचा अधिपति
प्रचलाकः—मोराचा पिसारा
प्रच्छंदकः—स्वैर संचारी

प्रणिधिः–योजना; विचार
प्रतिक्रान्तः–मागें सरकलेला
प्रतिकूर्पः–माताच्या शितासारख्या रंगाचें रत्न
प्रतिग्रहः–मदत, सहाय्य, परिवार
प्रतिजापः–फितुरीस प्रतिसहकार करणें
प्रतिपत्तिमान्–समयसूचक
प्रतिपातः–दंड; भरपाई
प्रतिबला–एक औषधी
प्रतिभूः–जामीन
प्रतिमंचौ–अमोरसमोर असे ओटे
प्रतिरागी–जसा असेल तसा वर्ण दाखविणारा
प्रतिलेपी–पातळ केलेलें; रस केलेलें
प्रतिवर्णकं–रंगाचा तपशील
प्रतिवर्णिका–कस, कसोटी
प्रतिवापः–मिसळ; मिश्रण
प्रतिवेशः–शेजारचा राजा; शेजारी
प्रतीवापः–रंग बदलण्याकरितां घालावयाचें मिश्रण
प्रतोली–रस्ता
प्रत्यन्तस्कंध–सरहद्दीवरचें सैन्य
प्रत्यपसृतः–शत्रुपक्षांतून फुटून आलेला व फितुरीकरितां पुनः त्याजकडे परत गेलेला
प्रत्यावापः–पायदळाचें शिल्लकी सैन्य
प्रत्यासारवती–विस्तीर्ण; पिछेहाट करण्यास सोयीची
प्रदरः–एक प्रकारचा व्यूह
प्रदेष्टा–न्यायाधीश; कमिशनर
प्रधावितिका–जाण्यायेण्याचा रस्ता; पायऱ्या; जिना
प्रमार–सांधीचा रोग
प्रयामः–महागाई; धान्याच्या दराची चढ उतार
प्रवहणं–वाहन; रथ; नौका
प्रशास्ता–नियामक; सैन्यावरील अधिकारी
प्रशोध्यं–मुष्किलीनें वसूल होणारी रक्कम; बाकी

प्रसन्नायोगः–एक प्रकारच्या दारूचा मसाला
प्रसाधकः–राजाला सजविणारा सेवक
प्रसारः–सैन्याचा विस्तार; फालतू सैन्य
प्रसारवृद्धिः–फालतूक सैन्य
प्रसेवः–पिशवी; पोतें
प्रस्तीतं–टणक; कठिण
प्रहवणं–यज्ञादि उत्सव
प्रातिभाव्यबंधः–जांमिनकीच्या करारानें बांधून घेणें
प्राप्तनीवी–मिळालेली बाकी
प्रामित्यकं–मागून आणिलेलें धान्य
प्रावरकः–राजाला पोषाख चढविणारा
प्रावदिक–गोष्टी सांगणारा
प्रावृत्तिकलेखः–अमुक करा असा आज्ञार्थक लेख
प्राज्यप्राशं–अन्नपाण्याचा भरपूर संग्रह
प्रेक्षा–नाटक, तमाशा इत्यादि देखावे.
प्रैयकं–नीळसर पिवळें रत्न
प्लक्षः–पिंपरी; वड
प्लवकाः–डोंबारी; गारुडी
प्लोतिः–तुकडा; पट्टी (बैठकीच्या कापडाची)
फणिज्जकः–पांढरा मरवा; जंबीर
फलकहारः–अनेक पदर असलेला हार
फलवाटः–बागाईत जमीन
फाणितं–काकवी; राब
फेनकः–फेस; समुद्रफेण
फेला–उच्छिष्ट शेष; पेटी; डबा
बन्धकीपोषकाः–दासी बाळगून उपजीविका करणारे
बलकुटिका–घोरपड
बला–चिकणा; एक वनस्पति
बलाका–बगळा
बलावापः–शिलकी सैन्याची मदत
बहुमुखं–एकट्यालाच मक्ता न देतां अनेकांना मोकळीक ठेवणें
बालसूर्यकः–बालसूर्याच्या रंगाचें लाल रत्न

बाहिरिकः–बौद्ध विहार
बाहूत्सारः–सैन्याच्या आजूबाजूपासून शत्रूला पिटाळून लावणें
बिसी–एक प्रकारचें चामडें
बोल्लनं–बोलणें; बडबड, टकळी
ब्रह्मदेयिक–ब्राह्मणाला दान दिलेलें
भग्नानुपातः–पळ काढणाऱ्यांचा पाठलाग
भग्नोत्सृष्टकं–विशिष्ट कारणानें पळावयास दिलेल्या गुरांचा कळप
भंगप्रदानं–पराजय झाल्याची बतावणी
भद्रश्रीयं–एका जातीचें चंदन
भयोपधा–भीतिदर्शवून सच्चेपणाची कसोटी पाहणें
भव्यारंभीं–मोठें अचाट काम अंगावर घेणारा
भागानुप्रविष्टकं–ठराविक मोबदला घेऊन पाळलेला गुरांचा कळप
भाजनी–एक प्रकारची तराजू; माप
भांडफेला–दागिन्याची पेटी
भांडी–एक वनस्पति
भिंगिसी–नेपाळी कांबळें
भूमिछिद्रविधानं–भूमीची शेतकी वगैरे कामासाठीं विभागणी
भूमिभोगं–ज्याच्यापासून भूमीचा लाभ होतो असा मित्र
भूम्येकान्तराः–सरहद्दीच्या पलीकडच्या देशास लागून असलेल्या देशाचे राजे
भृंगारः–सुवर्णपात्र, सोनें
भृतबलं–पगारी खडें सैन्य
भृत्यंभाविनः–नैमित्तिक मित्र
भोगव्यूह–सर्पाच्या वेटाळ्यासारखा व्यूह
भ्रेष–नाश; दुष्ट श्वापदांचा उपद्रव
मंचः–ओटा, सिंहासन, माचा
माणिमंतकं–एक प्रकारचा हिरा
मणिसोपानकं–एक प्रकारचा दागिना
मंडः–फेंस; निवळी, पेज
मत्कुण–दांत नसलेला हत्ती
मत्स्यंडिका–गुळीसाखर
मदनः–धोत्रा
मदनरसयोगः–धोत्र्याचा किंवा इतर मादक रस पाजणें

मद्रकं—मद्रदेशांतील
मधूच्छिष्टः—मेण
मयूरपदी—एकप्रकारची औषधी
मषी—काजळ; कोळसा
मसूरकं—मसुरीच्या आकाराचें
महाकच्छवर्धनं—समुद्राची पूजा
महाबिसी—एकप्रकारचें चामडें
माणवप्रकाशनं—लबाडी उघडकीस आणणें
माणवकः—वीस सरांचा हार
मातृका—दाई
मातृवाहकः—एकजातीचा पक्षी
मानुषाग्निः—प्रेतदहनाचा अग्नि
मायकः—माप घालणारा; आवटी, मापाड्या
मार्गायुकः—शिकारीस उपयोगी पडणारा ( हत्ती )
मालं—माळरान
मालेयकं—एकजातीचें चंदन ( मलय पर्वतावरचें )
मालेयकः—एकजातीचा मणी
मित्रविक्षिप्तं—मित्राच्या कार्याकरितां दूर-वर पांगलेलें ( सैन्य )
मुंडकद्वारं—कमानीचा दरवाजा
मुंडहर्म्यं—शिखर किंवा घुमट नसलेला वाडा
मुंडानीकं—पटाईत किंवा करोल सैन्य
मुरजकं—मृदंगाच्या आकाराचें
मुष्ककः—मारवा
मुष्टिवधः—पेरलेलें बीं नाहींसें करणें,
मुसुंढिः—गदा
मूकमूषा—पोकळ मूस
मूताः—गवताचीं किंवा बांबूचीं बंधनें किंवा वेष्टणें
मूलरक्षणं—राजधानीचें रक्षण
मूलवापः—ऊंस, कांदे, गाजर वगैरेंचा मळा
मूलहरः—जमेहून खर्च अधिक करणारा
मूलाटवर्णः—दह्यासारख्या रंगाचा
मूषा—सोनाराची मूस
मृगमारणी—एक जातीची वनस्पति
मृगाश्मकः—एकजातीचें काळसर पांढरें रत्न
मृत्युकूटः—मृत्यूचें गुप्त स्थान
मेदकयोगः—मेदक नांवाच्या मद्याचा मसाला
मेथीप्रततिपरिक्षेपः—कांटेरी झुडपांचा काट
मैलेयकः—एकजातीचें रत्न
मोक्षणं—बंदिवान झालेल्याची सुटका
मोरटा—मोरवेल; खैर; उंसाचें मूळ
मोहनगृहं—गुप्तवाटामुळें शत्रूला फसविणारें
मौखः—गुरुशिष्य संबंध
यमकं—जुळें ( मोतीं )
यमकः—घोड्याची एक चाल
यवागूपीत—पेज पाजवून हैराण करणें
यष्ट्युपबाह्यः—नुसत्या कांठीनें हांकतां येणारा
यातव्यः—ज्यावर चाल करून जाणें योग्य आहे असा शत्रु
यात्रा—शत्रूवर चालकरून जाणें
यानं—लष्कराची युद्धार्थ तयारी
यानकं—चाकावर बसविलेला दंड
युक्तः—सरकारनें नेमलेला कामगार
युगपिंगनकालः—नवीन खोंडाला गाडीला जोडण्याचा योग्य काल
युग्मोरस्यः—व्यूहाची एकप्रकारची ( द्विकेंद्रक ) रचना
योगक्षेमवधः—उपजीविकेचें साधन नाहींसें करणें
योगधूमः—कपटानें शत्रुसैन्यावर सोडलेला विषारी धूर
योगपुरुषाः—गुप्तहेर
योगवामनं—कपटानें शत्रूला हुसकून लावणें
योगाग्निः—कपटानें श सैन्यांत पसरविलेली आग
योगापसर्पः—कपटानें शत्रूच्या राज्यांत जाऊन राहणारे
रश्मिकलापः—चौपन्न सरांचा मोत्यांचा हार
रश्मिग्रहणं—युद्धाचेवेळीं डोळ्यावर ऊन न येईल अशी जागा पकडणें
रसदाः—विषप्रयोग करणारे हेर
राजविहारः—राजाची क्रीडा
राजवृक्षः—बाहव्याचें झाड
राजशब्दिनः—स्वतःस राजे म्हणविणारे
राजहारः—राज्याच्या खासगी खर्चाकरितां त्यानें घेतलेली रक्कम
राढा—शोभा, कान्ति
राशिमूलं—शेतांत रास केल्यानंतर खालीं राहिलेलें धान्य
रूपदर्शकः—नाण्याची पारख करणारा
रूपाजीवाः—वेश्या; देहविक्रय करणाऱ्या सौंदर्यवान् बायका
रूपिकं—नाणें पाडून देण्याबद्दल घ्यावयाचा कर
रोचनी—हळद
लकुटः—हातीं धरावयाची काठी
लक्षण्यः—कृत्रिम पण सुंदर
लक्षलंभाधिकारः—बिनचूक नेम मारण्यांत पटाईत झालेला
लभकः—मत्त; बेफाम झालेला
लघुसमुत्थं—झटपट कार्य करणारा; चेंगट नव्हे असा
लंबरा—सरपोस
लांगली—पृथक्पर्णी वनस्पति
लोकयात्रा—लोकांचे व्यवहार
लोप्त—लूट
लोहिताक्षः—रक्तछटा असलेलें एक रत्न
वंशरागः—बांबूच्या पानाच्या रंगाचें रत्न
वक्तृप्रयोक्तारः—योग्य प्रयोग जाणणारे व समजूत देण्यांत कुशल
वज्रं—हिरा
वंजुलः—वोरू वेत
वत्सनाभः—बचनाग
वधावधः—तुडवून ठार मारणें किंवा जीवंत पकडणें
वनविचयः—रानांतून शत्रूस हुसकून लावणें

वंदाका–बांडगूळ
वप्रं–प्राकार; तट
वरकारं–शांतिकर्म; कल्याण चिंतणारें कर्म
वरणः–तट, कुंपण, तटावरून फिरणाऱ्याला आश्रयार्थ बांधलेली भिंत
वर्गः–विराम चिन्ह
वर्तनकालः–बैलाला पातीला जुंपण्याचा काळ
वर्तनी–सरहद्दीवरची जकात
वर्तमानायः–चालू जमा; खेळतें भांडवल
वर्धकिः–सुतार
वर्धमानकः–घोड्याची एक चाल
वल्गनः–घोड्याची एक विशेष गति
वल्लूरं–चंदन; झाडी, वेली
वहः–एक माप
वाक्यविप्रेक्षणं–कोण काय बोलतो तें चोरून ऐकणें
वाक्संगः–बोलतांना अडखळणें
वातग्रहणं–वारा अनुकूल राहील अशी रणभूमि पकडणें
वानलटी–घराचें छप्पर
वारणवल्ली–गजपिंपळी
वारिपथभोगः–जलमार्गावरून होणारी वाहतूक
वारुण योगः–जलसमाधी
वारुणी–दूर्वा
वाशी–वासकवृक्ष
वासविचयः–छावणीच्या जागेंतून शत्रूला घालवून देणें
वासितकं–मुलामा चढविणें
वास्तुच्छिद्रं–इमारतीकरितां जमिनीची विभागणी
विकः–स्तनंधयः; कासेपासून न सुटलेला
विजयच्छंदः–मोत्यांच्या दागिन्याचा एक प्रकार
वितंस–पक्ष्याचें चित्र
विदलं–डाळिंब
विदारी–भुई कोहळा, सालवण
विदुलः–वेताची छडी; बोरूची काठी
विद्रवः–ज्वालामुखीचा स्फोट; पळापळ
विधा–हत्तीचें अन्न
विधेयत्वं–हुकमतींत वागण
विनयः–शिक्षण; वळण; निग्रह
विभीषिका–बुजगावणें; भयप्रदर्शन
विमलकवर्णः–स्फटिक
विलखावलेखनं–उंदराच्या जातीच्या प्राण्याच्या शरीराचा तुकडा
विलंग–एक औषधी
विलवणं–भेसळ केलेलें मीठ
विलोपः–लूट
विलोपभृतं–लुटीवर निर्वाह करणारे
विल्घः–धान्यादि संचय; कई
विवात–गायरान
विशालविजयः–व्यूहाचा एक प्रकार
विशिष्टच्छन्दिकाः–ज्यांना खासगी खर्चाकरितां मोठी नेमणूक आहे असे राजपुत्र
विषयग्रहणं–शत्रूला हल्ला करण्याला कठीण अशी छावणीची जागा काबीज करणें
विषमूलिका–एक वनस्पति
विष्टि–वेठ; वेठीचा मजूर
विसरः–ज्यांतील पाणी आटतें असें सरोवर
विशिखा–सराफ कट्टा
वीचिरलः–अंगावर कांबळ्यासारखे पट्टे असलेला एक प्राणी
वीवधः–देशांत येणारी धान्यादिकांची मदत
वृक्षाम्लं–चिंच
वृध्युदयः–उत्कर्षास चढविणारा लाभ निरंतर प्राप्ति देणारा लाभ
वृश्चिकबंधः–विंचवासारखें उलटें वाकवून बांधणें; खोडावेडी
वेणिका–तराफा
वेलकं–लोखंड व रुपें यांचें मिश्रण
वेल्लनं–लाटणें
वेशशौण्डिका–वेश्यागृह व मद्यपानगृह
वैजयन्तः–इंद्र
वैदेहः–विदेह देशांतील
वैधरणं–नुकसान भरपाईकरितां द्यावयाची रक्कम
व्यायामयुद्धं–उघड समोर समोर राहून केलेलें युद्ध
व्यायोगः–सैन्य रचना; व्यूह
व्यावेधनं–शत्रुसैन्यांत शिरून त्यास त्रासदेणें
व्यावेशनं–शत्रूसैन्यांत शिरून त्यास घाबरविणें
व्युष्टं–प्रातःकाल; प्रभातकाल
व्रजपर्यग्रं–जनावरांचें वर्णन व त्याची नोंद
व्रजिकः–एक लोकसत्ताक राज्य
शकटवाटः–गाडीरस्ता
शकलः–गोडबोल्या
शणः–ताग
शतपदी–गोम, घोण
शतपर्वा–दूर्वा; वेळू
शतैकीय–शंभरांत एक
शत्रुवेदनं–शत्रुत्वाचा ताप; शत्रूची पीडा
शम्या–जोखडाची खुंटी; काठी, बैल जुंपावयाचें साधन
शमः–चौदा अंगुळांचें एक माप
शलः–चौदा अंगुळाचें एक माप
शल्यकं–केस; कांटा; टोंचणारा पदार्थ
शाकुला–एक प्रकारचें चामडें
शाखाहननं–कुठार; कुऱ्हाड
शालिः–साळी; जवादि मार्जार
शिग्रुः–शेवगा
शिलाप्रवालकः–एकजातीचें रत्न
शिलाशिक्यं–आंत दगड ठेवलेलें शिंकें

शीकवल्ली–शिकेकाई
शीतवृष्टिः–चंद्रकान्तमणि
शीर्षकं–दागिन्याचा एक प्रकार
शुक्रपुलकः–मध्यंतरीं पांढरें असें एक रत्न
शुद्धोपवाह्यः–आपण होऊन चालणारा (हत्ती)
शुल्कं–राजाला द्यावयाचा कर
शुल्बं–तांबें
शुल्बशास्त्रं–धातुशास्त्र
शून्यपालः–राजप्रतिनिधी; राजा लढाईस गेला असतां मागें कारभार पहाणारा
शून्यमूलः–ज्याच्या राजधानींत सैन्य शिल्लक राहिलें नाहीं असा
शृंगाटकं–त्रिशूळासारखें हत्यार
शृंगिशुक्तिजं–सोन्याचा एक भेद
शृंगी–वटवृक्ष; प्लक्षवृक्ष
श्यावं–काळसर
श्रीकटनकं–एक जातीचा हिरा
श्रीवेष्टकः–एक सुगंधी वृक्ष; पिंपळ; बेल
श्वभ्रं–खळगा
श्वेततारं–उजळा दिलेलें; रंग चढवलेलें
श्वेता–एक वनस्पति
संज्ञालिपिः–विशिष्ठ खुणांवर बसविलेली भाषा
संयानं–हत्तीची एक विशिष्ट गती
संयानीयपथः–उतार पेठेचा रस्ता
संयूह्यं–जाड पत्र्यानें मढविणें; पुरण पटल्यासारखा दागिना बनविणें
संस्थानं–चालू कारभार, जुनी वहिवाट; दाखला
सकटुकक्ष्या–दोरीला गांठी असलेला तराजू
संकटः–दुष्प्रवेश्य असा देश
संख्यानं–गणित
संख्यायकः–कुळकर्णी; हिशेब लिहिणारा
संघाटि–आग लावण्याकरितां उपयोगांत येणारा दीर्घ दंड
संघात्यं–तार काढून सांखळीसारखा दागिना बनविणें
सत्तलिका–गालीचा
सत्रं–दबा धरून बसणें; दबा धरण्याची जागा
सत्रस्थानं–दबा धरून बसण्याचीं स्थानें
संदंशः–चिमटा
सन्नामिनी–झटका देऊन वांकवितां येणारी (तराजू)
सन्नाहगुणाः–युद्धाची तयारी व तिचा उपयोग
सन्निधाता–खजिनदार
समाराष्ट्रकं–विदर्भ देशांतलें रत्न
समन्तभद्रकं–हत्तीच्या कमरेवर गुंडाळावयाचा पट्टा
समयकर्मनिक्षेपः–करारास अनुसरून ठेवावयाचा निधि
समा–सपाट; उंचसखलनसलेली
समाधिः–तह, करारनामा
समाधिमोक्षः–तह मोडणें;
समाहर्ता–करवसूल करणारा कामगार
समाव्हय–पैज किंवा सोडत; पशुपक्ष्यांचें युद्ध पैजेसाठीं
संभूयप्रयाणं–एकत्र जमून स्वारी करणें
संभूयसमुत्थानं–सहकारितेनें उभारलेलें काम
समुदयः–जमा झालेली रक्कम
समुद्दानकालः–सैन्य उभारणीची वेळ
समेधाशास्तिः–आपल्या दैवांत काय आहे तें जाणण्याच्या इच्छेनें आलेला
संपातनिश्चारः–सरहद्दीवरून जाणाऱ्या येणाऱ्यावर नजर ठेवणारें
संपुटिका–मांडचोळणा
संप्रिय–सर्वांना प्रिय
संभूययात्रिकः–विजिगीषु बरोबर स्वारीस निघालेला
सरकं–सडक; रस्ता
सरकपांसुधावकः–रस्ते लोटणारा; झाडूवाला
सरलः–देवदार वृक्ष
सर्जरसः–राळ
सर्पसारी–एक प्रकारचा व्यूह
सहस्रैकीयः–हजारांत एक
सांवननिकी–मादक; वशीकरण औषधी
सातनं–सातन देशांतलें चंदन
सातिना–जलचर प्राण्याचें कातडें
सातीनः–एक जातीचा वेल
सान्नाह्यः–संग्रामोपयोगी (हत्ती)
सामूरं–समूरजातीच्या हरणाचें कातडें
सामूली–एक प्रकारचें चामडें
सामेधिकः–वैभवप्राप्तीचीं अनुष्ठानें जाणणारा
सालपरिक्षेपः–लांकडाचा कोट
सिंहनिका–सडणें भरडणें गाळणें वगैरे कामाची मजुरी
सिक्थकं–मेढब
सिन्दुवारितः–सिंधुवारवृक्ष
सीता–शेतकीचें उत्पन्न
सीतात्ययः–पिकाचा नाश
सुगन्धिकूर्पः–एका जातीचें रत्न
सुराकिण्वविचयः–दारू तयार करण्याची क्रिया
सुलभकः–पांढऱ्या रंगाचें रत्न
सुवर्चला–एक झाड
सुवर्चिका–क्षार, सोरा
सुवर्णमाक्षिका–एक धातु
सुषमारूपं–शुभ संवत्सराचें लक्षण
सूतिकाकूपः–बाळंतिणीची मोरी
सूना–कत्तलखाना
सृगालविन्ना–एक औषधि
सैमिकः–सीमेवरील रक्षक
सौभिका–गारुडी
सौभितिका–हत्तीच्या पाठीवरची झूल
सौरिकं–मद्यासंबंधी

सौवर्ण्यकुड्यकं–आसामातील सुवर्णकुड्य गांवचें चंदन

सौवीरक–संत्रें

स्कन्प्रावर्तिमं–खांद्यावरून पाणी वाहून पिकविलेल्या शेतीवरील कर

स्कन्धोपनेयः–हप्त्याहप्त्यानें भरणा करावयाचा

स्तंभः–गर्व

स्तंभवर्गः–करबंदीची चळवळ करणारे

स्तंभसंक्रमः–खांबावर उभारलेला तात्पुरता पूल

स्थानिकः–शहराच्या एका भागाचा अधिकारी

स्थानीयं–शहर

स्थावरः–अचल; न मोडणारा ( तह )

स्थूलकर्णः–एकप्रकारचा व्यूह

स्नुही–निवडुंग

स्योनाकः–एक जातीची वनस्पति

स्रवन्मध्यः–मध्यें प्रकाशमान असें एक रत्न

स्रौवः–याज्ययाजक संबंध

स्वर्णनालिका–आंत सोनें ठेवलेली वेळूची फुंकणी

स्वर्णभूमिजः–मर्मर देशांतलें चंदन

स्वप्नं–अयोग्यवेळीं निद्रा

स्ववग्रहः–वजनदार; अनेक आप्त इष्ट असलेला

स्वाजीवः–स्वावलंबी

हरणिः–तळ्याच्या पाण्याशेजारची ओली जमीन

हस्तप्रावर्तिमं–हातानें पाणी घालून वाढविलेल्या शेतावरील कर

हस्तिकर्णः–एरंड

हारहूरकं–हरहूर नगरांत होणारें द्राक्षमद्य

हिरण्यप्रतिग्राहिणः–लांच घेणारे

हिरण्यभोगं–ज्याच्यापासून सुवर्णाचा लाभ होतो असा मित्र

हीनच्छन्दिकाः–ज्यांना खासगी खर्चाची रक्कम कमी मिळते असे (क्षत्रियपुत्र)

हीनसंधिः–नुकसान सोसून केलेला तह

हीनानुसारणं–पराजित सैन्याचा पाठलाग

हैमनं–हेमंतऋतु किंवा तत्संबंधीं,

हैमन्यः–हिमालयांतील प्रदेश

ह्रादीयं–बार्बरी देशांतील सरोवरांत उत्पन्न झालेलें






## पण्डित वामनशास्त्री किंजवडेकरकृत ग्रंथ

१ संस्कारमीमांसा — २—८—०

प्राप्तिस्थान—चित्रशाला प्रेस, पुणें.

२ आधानपद्धतिः — १—१४—०

३ अग्निहोत्रचंद्रिका — २—१४—०

४ पशालम्भमीमांसा

५ दर्शपूर्णमासप्रकाश

प्राप्तिस्थान—आनंदाश्रम, पुणें.

६ सत्ता और धर्म मीमांसाशास्त्र ( हिंदी ) — ०—१२—०

प्राप्तिस्थान—मीमांसा विद्यालय, पुणें.

### मीमांसाविद्यालयाचें प्रकाशन

१ पूर्वमीमांसापद्धतीचा इतिहास — १—०—०

२ पूर्वमीमांसाया ऐतिह्यम् — १—०—०

३ मीमांसाविद्यालयाचा स्वरूपालोक — १—०—०

४ यज्ञियपात्रप्रदर्शनिका — ३—०—०

प्राप्तिस्थान—मीमांसाविद्यालय, पुणें.

---

१ मीमांसादर्शनम् ( शाबरभाष्य, तन्त्रवार्तिक, टुप्टीका यांसह ) — २१—९—०

भाग पांच

प्राप्तिस्थान—आनन्दाश्रम पुणें.

टीप—वरील सर्व पुस्तकें, शिवाय इतर सर्व तऱ्हेचीं संस्कृत, प्राकृत, पाली आणि अर्धमागधी वगैरे भाषांतील पुस्तकें ' ओरिएण्टल बुक एजन्सी १५ शुक्रवार, पुणें ' यांजकडे मिळतात.